श्रीसोमसेनकृत

# त्रैवर्णिकाचार अथवा धर्मरसिकशास्त्र.

मराठी भाषांतरासह.

---

प्रसिद्ध करणार

राजूबाई भ्रतार वीरचंद, धाराशिव.

आवलबाई भ्रतार अमीचंद, धाराशिव.

---

कोल्हापूर जैनेंद्र छापखाना सन १९१०

किमत ३ रुपये

# त्रैवर्णिकाचार

## अथवा

# धर्मरसिकशास्त्र.

वाचकहो! ह्या जगांत सर्वलोक सुखप्राप्तीकरितां नेहमी खटपट करीत आहेत, ही गोष्ट आह्मी नव्यानें सांगितली पाहिजे असें नाहीं. सुख हा विषय आगोपालांगन सुविदित आहे. लहान मुलें सुद्धां " बाळा तूं हें काय करतोस? " असें विचारिलें असतां " गम्मत करतो " असे ह्मणतात. गम्मत ह्मणजे सुखाचा प्रयत्न होय. तेव्हां लहान मुलापासून तों वृद्धांपर्यंत सर्वांना सुख हा विषय निःसंशयपणें प्रिय आहे ह्मणून त्याची प्राप्ती व्हावी ह्याकरिता आह्मा सर्वांची खटपट चाललेली आहे. ह्या आमच्या खटपटी अनेक प्रकारच्या आहेत. कित्येक लोक द्रव्य मिळविण्याची खटपट करीत आहेत, कित्येक लोक स्त्री मिळावी ह्मणून उद्योग करीत आहेत, कित्येक पुत्र होण्याकरितां प्रयत्न करीत आहेत, कित्येक विद्याप्राप्तीकरितां

रात्रंदिवस मेहनत करीत आहेत, कित्येक राज्य मिळविण्याच्या धादलींत गुंतले आहेत, कित्येक निराळेच दुर्व्यापार करण्यांत गुंतले आहेत, असें नेहमी आपल्या दृष्टी पडतें. त्यावरून सुखाचें साधन एकच नसून तीं अनेक आहेत, सुखप्राप्तीकरितां असें ह्मणणें भाग पडतें. परंतु आमच्या पूर्वाचार्यांनी आपल्या विशाल बुध्दीनें विचार करून सर्व सुखाचें एकच साधन शोधून काढलें आहे. वर सांगितलेलीं साधनें चिरस्थायी नसून स्वल्पकालांत नाश पावणारी आहेत, परंतु हें साधन चिरस्थायी असून अविनाशी आहे. वरील साधनात अनेकाचें पारतंत्र्य असतें, परंतु पूर्वाचार्यांनी शोधून काढलेल्या साधनात मनुष्य स्वतंत्र होऊन सुखानुभव करतो. वरील द्रव्यपुत्रादिक साधनें ही एखादेवेळी दुःखाला कारणीभूत होतात; परंतु ह्या साधनापासून दुःखतर मुळींच होत नसून, उलट कोणत्याही कारणानें दुःख प्राप्त झालें असल्यास त्याचें निवारणच होतें. असें हें सर्व सुखसाधनापेक्षां अत्यंत महत्वाचें साधन आहे. आता इतक्या ह्या वर्णनावरून 'हें साधन कोणतें असावें' अशी जिज्ञासा वाचकांना होणें अगदी साहजिक आहे. त्याचे उत्तर आचार्यांनी फार थोड्या शब्दात दिलें आहे. ते ह्मणतात— भव्यहो! 'सुखं च न विना धर्मात्' ह्मणजे सुख हें धर्मावांचून होत नाहीं. तेव्हां धर्म हेंच सुखाचे मुख्य साधन आहे.

आमच्या शास्त्रकारानीं सुखाचे विनाशी आणि अविनाशी असे दोन भेद केले आहेत, आणि त्यांना ते क्रमानें अभ्युदय आणि निःश्रेयस अशीं नांवें देतात. जीवाला संसारांत स्त्रीपुत्रादिकांपासून जें सुख होतें, व स्वर्गांत जें सुख होतें त्याला अभ्युदय असें ह्मणतात, आणि जीव ह्या जन्ममरणात्मक संसारापासून मुक्त होऊन जें सुख भोगतो त्याला निःश्रेयस ह्मणतात. हीं दोनही प्रकारचीं सुखें धर्माच्या योगानें जीवाला प्राप्त होतात असा आपल्यातील सर्वज्ञ तीर्थंकर भगवंतानीं सिद्धांत बांधून ठेविला आहे. आणि ह्या सिद्धांतावर येणाऱ्या शंकाचा सर्वथा निरास करण्याकरिता आपल्यांतील प्राचीन पंडितानीं आपली कुशाग्रबुद्धि खर्च करून मोठमोठे ग्रंथ लिहून ठेऊन आमच्यावर अनंत उपकार केले आहेत. ते ग्रंथ समग्र वांचून पाहिले असता धर्म हें सुखसाधन आहे किंवा नाहीं ह्या शंकेचा सहज निरास होण्यासारखा आहे.

ह्या धर्माचे क्रियाकांड आणि ज्ञानकांड असे दोन भाग कल्पितां येण्यासारखे आहेत. त्यांतील क्रियाकांडांत आपण ज्यांना ‘ धार्मिकक्रिया , असें समजतों त्या क्रियांचा समावेश होतो. ह्या

क्रिया कशा करावयाच्या ह्याबद्दल अकलंकदेव वगैरे मोठमोठ्या पंडितांनी अकलंकसंहिता वगैरे मोठमोठे ग्रंथ केले आहेत. ते ग्रंथ फार मोठे असल्यानें अल्पबुद्धि अशा जिज्ञासु लोकांची जिज्ञासा तृप्त होत नाहीं; हें मनांत आणून भट्टारक श्रीसोमसेन मुनींनी "त्रैवर्णिकाचार" ह्मणून लहानसा ग्रंथ लिहून ठेविला आहे. ह्या ग्रंथांत बऱ्याच नित्यनैमित्तिक क्रियांचा त्यांनीं समावेश केला असून त्या त्या क्रियेला लागणाऱ्या मंत्रांचाही उल्लेख केला आहे. हा ग्रंथ प्रत्येक जैन ह्मणविणाऱ्या श्रद्धालु श्रावकानें अवश्य संग्रहीं ठेविला पाहिजे. कारण, अलीकडे आमच्या लोकांत जैन धर्मांतील क्रियाचें ज्ञान लुप्तप्राय झालें असल्यानें कोणालाच आपल्या नित्यनैमित्तिक क्रिया करतां येत नाहींत. इतकेंच नसून आपल्यामध्ये अमूक अमूक क्रिया आहेत किंवा नाहीत ह्याचें सुद्धां ज्ञान नाहीसें झालें आहे. ही आमच्या समाजांतील न्यूनता जावी आणि अंशतः तरी आपल्या सधर्मीयाना धर्मज्ञान व्हावें ह्याकरितां आह्मी हा श्रीसोमसेन मुनींनी केलेला ग्रंथ आमच्या संस्कृतानभिज्ञ वाचकाकारितां फार परिश्रमानें माहिती मिळवून मराठींत भाषांतर करून छापिला आहे. आमच्या धर्मबंधूंना आमची सविनय प्रार्थना आहे कीं, हा ग्रंथ प्रत्येकानें आपल्या संग्रहीं ठेवून

ह्यांत सांगितल्याप्रमाणें धार्मिक क्रिया करावयास प्रवृत्त झाल्यावांचून आमच्या श्रमाचें साफल्य होणें शक्य नाहीं, ही गोष्ट त्यानीं लक्षांत ठेवावी.

श्रीसोमसेन भट्टारकाचें जीवनचरित्र आह्मांस कोठेंच उपलब्ध झालें नाहीं ह्याबद्दल आह्मास फार खेद होतो. आमच्या सधर्मीय वाचकापैकीं कोणास कांहीं विदित असल्यास अथवा इतउत्तर विदित झाल्यास त्यानीं कृपा करून ते आह्मास कळवावें. ह्मणजे आह्मी कृतज्ञापूर्वक ते आमच्या जैनबोधक मासिकांत अवश्य ठेऊ. त्यानीं पहिल्या अध्यायांतील नवव्या श्लोकात आपण हा जो त्रैवर्णिकाचार ग्रंथ केला त्यात कोणकोणत्या ग्रंथकारांचे ग्रंथ प्रमाण मानले आहेत ते समजण्याकरितां त्या ग्रंथकारांचीं नावें घातली आहेत. त्यात श्रीजिनसेनाचार्यांचेही नाव आहे. परंतु श्रीजिनसेनाचार्यांनीं महापुराणांत जें सांगितलें आहे, त्यांत आणि ह्या श्रीसोमसेनमुनीश्वरांच्या सांगण्यांत आह्माला कोठें कोठें थोडा फरक वाटतो. तो आह्मी भाषांतरात एक दोन ठिकाणीं दाखविला आहे. आतां तो फरक नुसत्या श्रीजिनसेनाचार्यांच्या ग्रंथाशींच आहे किंवा त्यांनीं त्या श्लोकांत सांगितलेल्या बाकीच्या ग्रंथाशीं देखील आहे; किंवा त्या बाकीच्या ग्रंथकारांच्या मताप्रमाणें हें ह्याचें लिहीणेंच योग्य आहे, ह्याचा विचार आज आह्मांस

करावयाची सोय नाही. कारण, बाकीचे ग्रंथ आज आह्मांस पहावयास मिळाले नाहीत. ते जेव्हां पहावयास मिळतील त्यावेळी आह्मी ह्याचा योग्य विचार करूं. आज आह्मांस ह्या फरकाबद्दल इतकेच वाटते की, श्रीसोमसेन मुनीश्वरांनी ज्यापेक्षा श्रीजिनसेनाचार्यांचे नांव लिहून त्यांच्याबद्दल आपली असलेली पूज्यबुद्धि व्यक्त करून (अध्याय १ श्लोक ६ पहा) देखील त्यांनी लिहिल्याच्या विरुद्ध कोठे कोठें लिहिलें आहे; त्यापेक्षा बाकीच्या ग्रंथकारांशी ह्यांचे ऐकमत्य असावें. असो.

हा ग्रंथ श्रीसोमसेन भट्टारकांनी फारच थोडक्यात केला असून व्यवहारांत ज्या गोष्टींची नेहमी आवश्यकता असते त्या सर्व गोष्टीचा त्यांनी ह्या आपल्या ग्रंथांत बराच समावेश केलेला आहे. ह्यांत त्रैवर्णिक ह्मणजे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्यांचा नित्यनैमित्तिकक्रियेसंबंधी बहुतेक सर्व आचार सांगितला असल्यानें धार्मिक लोकांनी हे एक पुस्तक सध्या संग्रहीं ठेवलें असतां व त्यात सांगितल्याप्रमाणे क्रिया करण्याचा संप्रदाय ठेवला असता धर्माभिमानाला मूर्तस्वरूप आल्यासारखें होणार आहे. या ग्रंथाचें मराठी भाषांतर करितांना सिद्धांतशास्त्रसंपन्न श्रीयुत पंडित आप्पणा उपाध्याय उदगांवकर यांनी बरीच माहिती देऊन आह्मास मदत केली; याबद्दल आह्मी त्यांचे अभिनंदन करितो.

हा ग्रंथ आमच्या सर्व जैन बंधूंना संग्रही ठेवता येणें शक्य नाहीं. कारण, आमच्या समाजात गरीब लोक फार आहेत. ह्यांकरिता आमच्या धनवान् व वदान्य अशा सधर्मीयाना आमची अशी विनंति आहे कीं, त्यानीं आपल्या स्वतांच्या द्रव्यव्ययानें आपल्या शक्तीप्रमाणें कांहीं पुस्तकें घेऊन गरीब सधर्मीयाना दिला असता त्या पुस्तकांचा अभ्यास करून जितके लोक यथास्थित धर्मक्रिया करतील तितक्याना धार्मिक बनविल्याचें श्रेय आमच्या ह्या धनिकाना प्राप्त होणार आहे.

आपला,

कल्लाप्पा भरमाप्पा निटवे.

कोल्हापूर

॥ श्रीवीतरागाय नम ॥

# त्रैवर्णिकाचारांतील विषयांची

## अनुक्रमणिका.

### अध्याय पहिला.

## अध्याय १३ वा.

**समाप्त.**

|| श्रीवीतरागाय नम ||

( अथ भट्टारकसोमसेनविरचितः )

# । त्रैवर्णिकाचारः ।

## || प्रथमोऽध्यायः ||

मङ्गलाचरणम् ||

श्रीचन्द्रप्रभदेवदेवचरणौ नत्वा सदा पावनौ ।
संसारार्णवतारकौ शिवकरौ धर्मार्थकामप्रदौ ॥
वर्णाचारविकासकं वसुकरं वक्ष्ये सुशास्त्रं परं ।
यत् श्रुत्वा सुचरन्ति भव्यमनुजाः स्वर्गादिसौख्यार्थिनः ॥ १ ॥

अर्थ— धर्म, अर्थ आणि काम ह्या तीन पुरुपार्थांची सिद्धि करुन देणारे, भव्यजीवांना संसारसमुद्रांतून तरून नेणारे आणि त्यांचें कल्याण करणारे–ह्मणजे त्यांना मोक्ष प्राप्ति करून देणारे, असे–आणि पवित्र

असे जे श्रीचंद्रप्रभजिनाचे चरण त्यांना सर्वदा नमस्कार करून; मी, ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या वर्णाचा नित्यनैमित्तिक आचारांचा स्पष्टपणें बोध करून देणारें, व सर्व प्रकारच्या संपत्तीला देणारें असें शास्त्र सांगतों. जें शास्त्र श्रवण करून स्वर्गादिसुखांची इच्छा करणारे भव्य जीव सर्वदा सदाचारानें वागतील.

यः श्रीमद्धरिवंशवंशजलजाल्हादैकसूर्योपमो ।
ये के धर्मपरायणा गुणयुतास्तेषां सदा स्वाश्रयः ॥
ज्ञानध्यानविकासको मुनिजनैः सेव्यो मुदा धार्मिकैः ।
स श्रीमान्मुनिसुव्रतो जिनपतिर्दद्यान्मनोवाञ्छितम् ॥ २ ॥

अर्थ— जो हरिवंशरूपी कमलाला आनंद देणारा सूर्यच कीं काय! असा, आणि जो धार्मिक आणि सद्गुणी अशा लोकांचे सर्वदा रक्षण करणारा आहे, आणि जो केवलज्ञान आणि शुक्लध्यान ह्यांची वृद्धि करणारा असल्यामुळें धर्मतत्पर असा मुनिसमूह आनंदानें ज्याची सेवा करीत आहे, तो सर्व ऐश्वर्यांनी युक्त असलेला मुनिश्रेष्ठ श्रीजिनपति, आमचे मनोरथ पूर्ण करो!

वन्दे तं पार्श्वनाथं कमठमदहरं विश्वतत्त्वप्रदीपं ।
कर्मारिघ्नं दयालुं मुदितशतमखैः सेव्यपादारविन्दम् ॥

शेषेशो यस्य पादौ शिरसि विधृतवानातपत्रं च मूर्ध्नि ।
मुक्तिश्रीर्यस्य वाञ्छां प्रतिदिनमतुलां वाञ्छति प्रीतियुक्ता ॥ ३ ॥

अर्थ— कमठाच्या गर्वाचा नाश करणारा, संपूर्ण तत्त्वें जगाला स्पष्टपणें समजावून देणारा, घाति व अघाति कर्मरूपी शत्रूचा विध्वंस करणारा, असा, आणि देवेंद्र आनंदानें ज्याच्या पदकमलांची सेवा करीत आहेत असा, आणि धरणींद्रही ज्याचे चरण अपल्या मस्तकावर धारण करीत आहे व ज्याच्या मस्तकावर छत्र धारण करीत आहे असा, आणि ज्याची सर्वजगाच्या कल्याणाची इच्छा—मुक्ति लक्ष्मीलाही—आपल्याला असावी असें वाटत आहे [ ह्मणजे पार्श्वनाथाला ज्याप्रमाणें सर्वांच्या कल्याणाची इच्छा आहे, त्याप्रमाणें आपल्याला सर्वांच्या कल्याणाची इच्छा असावी असें ज्याच्याकडे पाहून मुक्तिलक्ष्मीलाही वाटत आहे ] असा परम दयालु जो श्रीपार्श्वनाथस्वामी, त्याला मी नमस्कार करतों.

नौमि श्रीवर्द्धमानं मुनिगणसहितं सप्तभङ्गप्रयोगै- ।
र्निर्दिष्टं येन तत्त्वं नवपदसहितं सप्तधाऽऽचारयुक्त्या ॥
सुज्ञानक्ष्माजबीजं नवनयकलितं मोक्षलक्ष्मप्रदायं ।
सुप्रामाण्यं परैकान्तमतविरहितं पश्चिमं तं जिनेन्द्रम् ॥ ४ ॥

अर्थ— केवलज्ञानरूपी वृक्षाचें बीजच कीं काय! असें असल्यामुळें जीवाला जें मोक्षाच्या चिन्हांनीं

युक्त करीत आहे असें, नऊ प्रकारच्या नयांनीं व्यापिलेलें व परमतांतील एकांतवाद ज्यांत नसल्यानें प्रमाणभूत असलेलें असें जें नऊ प्रकारचें तत्त्व, तें ज्यानें सात प्रकारच्या व सप्तभंगीच्या प्रयोगानें सर्व लोकांस स्पष्ट दाखविलें तो शेवटचा जिनपति जो वर्धमानस्वामी त्याला मी नमस्कार करतों.

श्रीभारतीमखिललोकसुखावधारिणी- ।
मानन्दकन्दजननीं जनजाड्यनाशिनीम् ॥
तत्त्वावकाशकरिणीं वरबुद्धिदायिनीं ।
वन्दे हितार्थसुखसाधनकार्यकारिणीम् ॥ ५ ॥

अर्थ— संपूर्ण जीवांना सुख कोणतें हें दाखऊन देणारी, त्यांच्या अंतःकरणांत आनंदाचें बीज उत्पन्न करणारी, त्यांचें अज्ञान घालवून त्यांना तत्त्वज्ञान करून देणारी, आणि सर्व जीवांच्या कल्याणाकरितां सुखप्राप्तिरूपी कार्य करणारी, अशी जी सुबुद्धि देणारी वाग्देवता तिला मी नमस्कार करतों.

चारित्रोज्वलगन्धवासितजनं शिष्येषु कल्पद्रुमं ।
वन्देऽहं परलोकसारसुखदं सिद्धान्तपारप्रदम् ॥
आचार्यं जिनसेनमात्मचिदुदैर्भव्यौघसस्यं घनं ।
संसेव्यं प्रगुणैर्गरिष्ठपददं रत्नत्रयालङ्कृतम् ॥ ६ ॥

अर्थ— ज्यानें आपल्या सदाचाराच्या सुगंधानें सर्वांना सुगंधयुक्त केले आहे, जो शिष्यांचे मनोरथ पूर्ण करण्याच्या कामांत कल्पवृक्षच कीं काय! असा आहे, आपल्या आत्म्याच्या चिच्छक्तिरूपी उदकाच्या योगानें जो भव्यजीवरूपी धान्याला मेघाप्रमाणें आहे, गुणवान् लोक ज्याची सेवा करितात, जो आपल्या भजकांना मुक्तिपद देतो असा, रत्नत्रयाच्या योगानें भूषित झालेला, परलोकांतील उत्तम सुखाला देणारा आणि शिष्यांना सिद्धांतशास्त्रांत पारंगत करणारा असा जो श्रीजिनसेनाचार्य, त्याला मी नमस्कार करतों.

कलियुगकलिहन्ता कुन्दकुन्दो यतीन्द्रो ।
भवजलनिधिपोतः पूज्यपादो मुनीन्द्रः ॥
गुणनिधिगुणभद्रो योगिनां यो गरिष्ठो ।
जयति नियमयुक्तः सिद्धसेनो विशुद्धः ॥ ७ ॥

अर्थ— कलियुगांत उत्पन्न झालेला जो अनेक वाद्यांचा कलह, त्याचा नाश करणारा, सर्वयतीमध्ये श्रेष्ठ असा श्रीकुंदकुन्दाचार्य उत्कर्ष पावत आहे. भवसमुद्रांतून तरून जाण्याची नौकाच कीं काय! असा मुनींद्र श्रीपूज्यपादयति सर्वांत महत्व पावला आहे. संपूर्ण योगिलोकांत श्रेष्ठ व सद्गुणांचा समुद्र असा गुणभद्रमुनि, उन्नतीला प्राप्त झाला आहे. आणि सर्वदा नियमानें वागत असल्यानें पवित्र असा

सिद्धसेनमुनींही उत्कर्ष पावन आहे. तात्पर्य, हे वरील चारही मुनी पूज्यतेला प्राप्त झाले आहेत.

महेन्द्रकीर्तेश्चरणाब्जयुग्मं मे । स्वान्ते सदा तिष्ठतु सौख्यकारि ॥
सिध्दान्तपाथोनिधिपारगस्य । शिष्यादिवर्गेषु दयान्वितस्य ॥ ८ ॥

अर्थ— सिध्दांत शास्त्ररूपी समुद्राच्या परतीरी गेलेला, शिष्यवर्गावर सर्वदा दया करणारा असा जो महेंद्रकीर्तिमुनि, त्याचे सुखद असे चरणयुग्म माझ्या अंतःकरणात सर्वदा राहो!

प्रतिज्ञा.

यत्प्रोक्तं जिनसेनयोग्यगणिभिः सामन्तभद्रैस्तथा ।
सिध्दान्ते गुणभद्रनाममुनिभिर्भट्टाकलङ्कैः परैः ॥
श्रीसूरिद्विजनामधेयविबुधैराशाधरैर्वाग्वरैः ।
स्तद्दृष्ट्वा रचयामि धर्मरसिकं शास्त्रं त्रिवर्णात्मकम् ॥ ९ ॥

अर्थ— श्रीजिनसेनाचार्य, श्रीसमंतभद्राचार्य, गुणभद्राचार्य, भट्ट अकलंकदेव, श्रीसूरिद्विज, आशाधर पंडित वगैरे विद्वानांनी सिद्धांतशास्त्रात ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या तीन वर्णांचा आचार जो सांगितला आहे, तो पाहून, मी त्या त्रैवर्णिकांच्या धार्मिक क्रियांचा बोध करून देणाऱ्या शास्त्राची रचना करितों.

ब्रह्मज्ञानविकासका व्रततपोयुक्ताश्च ते ब्राह्मणाः ।
त्रायन्ते शरणच्युतानपि नरांस्ते क्षत्रियाः सम्मताः ॥
धर्माधर्मविवेकचारचतुरा वैश्याः स्मृता भूतले ।
ज्ञानाचारमहं पृथक्पृथगतो वक्ष्यामि तेषां परम् ॥ १० ॥

अर्थ— जे आत्म्याच्या शुद्धपरिणामांची वृद्धि करणारे व व्रते आणि तप ह्यांनी युक्त असे असतात ते ब्राह्मण होत. शरण न आलेल्या लोकांचे देखील जे रक्षण करितात ते क्षत्रिय होत. धर्म कोणता आणि अधर्म कोणता ह्याचा विचार करून त्याला अनुसरून वागणारे असे जे असतात ते वैश्य समजावेत. ह्याप्रमाणे ह्या जगात ह्या तीन वर्णांचे जे लोक आहेत, त्यांचे ज्ञान व आचार कसे असावेत? हें मी निरनिराळें सांगणार आहे.

सज्जनदुर्जनवर्णन.

सन्तो जना न गणयन्ति सदा स्वभावात् । क्षुद्रैः प्रकल्पितमुपद्रवमल्पचत्कौ ॥
दाह्यं तृणाग्निशिखया भुवि तूलसेकं । तापोऽपि नैव किल यत्पुरतोदकानाम् ॥ ११ ॥

अर्थ— ह्या जगांत नीच लोक सज्जनांना जो त्रास देतात, त्याला सज्जन मुळीच जुमानीत नाहीत. तो त्रास दुर्जनांनाच दुःसह होतो. कारण, गवताची काडी पेटून जी ज्वाला उत्पन्न होते तिच्या योगानें

कापूस जळतो. परंतु पाण्याला नुसती ऊब देखील लागत नाही. तात्पर्य, ग्रंथकारांचे ह्या श्लोकात असें ह्मणणें आहे की, मी आरंभिलेल्या ह्या ग्रंथरचनेबद्दल दुष्ट लोक जरी मला दोष देत असले तथापि त्यापासून माझ्या मनाला मुळीच उपद्रव होत नाही. कारण, क्षुद्र लोकांनी दिलेला उपद्रव तशा लोकांनांच दुःसह होतो; मोठ्याला त्याचे कांहीच वाटत नाही.

गुणानुपादाय सदा परेषां । गुणैर्गुनानां गुणिनो भवन्तु ॥
सन्तोऽथ दोषानपि दुर्जनाश्च । सर्वे स्वदोषाः परिकल्पनीयाः ॥ १२ ॥

अर्थ— गुणवान् लोकांच्या गुणांचे ग्रहण करून सज्जन हे सर्वदा गुणी असेच असोत. आणि गुणवानांच्या दोषांचें ग्रहण करून दुर्जनही दुर्जन असेच राहोत. गुणवानामध्यें दुर्जनांनी ग्रहण करण्यासारखे दोष असतात काय? अशी जर शंका येईल, तर, तिचे उत्तर इतकेंच की, सज्जनामध्यें दोष नसतात. तथापि दुर्जन आपल्या दोषांचीच त्यांचे ठिकाणी कल्पना करितात.

गृह्णातु दोषं स्वयमेव दुर्जनो । धनं स्वकीयं न निषिध्यते मया ॥
गुणान्मदीयानपि याचितो मुहुः । सर्वत्र नाङ्गीकुरुताद्गुठेन सः ॥ १३ ॥

अर्थ— दुर्जन हा माझे दोष आपण होऊनच घेऊं दे! तें त्याचेंच द्रव्य असल्यानें मी त्याला मुळीच नको ह्मणत नाही. आणि मी जरी वारंवार त्याची प्रार्थना केली तथापि तो माझे गुण मुद्दाम घेणार नाही.

ह्मणजे माझ्यामध्यें गुण आहेत असें तो मुद्दामच मानणार नाहीं.

कविर्वेत्ति काव्यश्रमं सत्कवेर्हि । स्फुटं नाकविः काव्यकर्तृत्वहीनः ॥
यथा बालकोत्पत्तिपीडां प्रसूतौ । न वन्ध्या विजानाति जानाति सूता ॥ १४ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें गर्भांतून मूल बाहेर येतांना किति क्लेश होतात, हें जी स्त्री प्रसूत झाली असेल तिलाच कळतें, वंध्येला कळत नाहीं; त्याप्रमाणें, चांगल्या कवीला काव्य करण्याला किति क्लेश भोगावे लागतात हें जो कवि असेल त्यालाच कळतें. ज्याला कविता करता येत नाहीं त्याला मुळींच कळत नाहीं. ह्मणून दुर्जनांनीं आह्मांला दोष दिल्यास त्यांत आश्चर्य नाहीं.

गुणेषु दोषेषु न यस्य चातुरी । निन्दा स्तुतिर्वा न हि तेन कीर्त्यते ॥
जात्यन्धकस्येव हि धृष्टकस्य वै । रूपेऽत्र हासाय परं विचारणा ॥ १५ ॥

अर्थ— गुण कोणते व दोष कोणते, हें समजण्याचें चातुर्य ज्याच्यामध्यें नाहीं, तो जर त्यासंबंधानें कांहीं बोलला, तर त्यानें निंदा केली असेंही होत नाहीं, व स्तुति केली असेंही होत नाहीं. तर, ज्याप्रमाणें जन्मांधानें रूपाच्या बऱ्यावाईटपणाबद्दल विचार करणें हास्यास्पद होतें; त्याप्रमाणें त्या मूर्खाचे गुणदोषांविषयींचे विचार हास्यास्पद होतात.

काव्यं सूते कविरिह कलौ तद्गुणं सन्त एव । तन्वन्त्याराद्गुणगणनया स्वं गुणं ख्यापयन्तः ॥

छन्दोविरुद्धं यदलक्षणं वा। काव्यं भवेच्चेन्निबिडं प्रमादात् ॥
तदेव दूरीकुरुतात्र भव्यं। साध्वेव हि स्वीकुरुतात्र सन्तः ॥ १८ ॥

अर्थ— ह्या ग्रंथांत जर एखादी कविता दुर्लक्षामुळे छंदःशास्त्रातील नियमांस सोडून झाली असेल, किंवा एखादी कविता जर चाललेल्या विषयाला अगदींच सोडून भलत्याच विषयाबद्दल झाली असेल, तर सज्जनांनीं ती तेवढी काढून टाकून, ज्या कविता चांगल्या असतील त्याच घ्याव्यात!

परिहर्तव्यो दुर्जन इह लोके भूषितोऽपि गुणजालैः ॥
मणिना भूषितमूर्धा फणी न किं भयङ्करो नृणाम् ॥ १९ ॥

अर्थ— दुष्ट मनुष्य अनेक गुणांनी युक्त जरी असला तथापि ह्या जगांत सर्वांनी त्याचा त्याग करावा, ह्मणजे त्याचा कोणीही सहवास करूं नये. कारण, सर्पाच्या मस्तकावर जरी रत्न असते तथापि तो ज्याप्रमाणे लोकांना भीतीच उत्पन्न करीत असतो, त्याप्रमाणें दुष्ट मनुष्य केव्हांही त्रासच देणार आहे.

वक्त्याचे लक्षण

सर्वेषां दर्शनानां मनसि परिगतज्ञानवेत्ता भवेद्धि ।
वक्ता शास्त्रस्य धीमान्विमलशिवसुखार्थी सुतत्त्वावभासी ॥
निर्लोभः शुद्धवाग्मी सकलजनहितं चिन्तकः क्रोधमुक्तो ॥

श्रोत्याचें लक्षण.

धर्मी ध्यानी दयाढ्यो व्रतगुणमणिभिर्भूपितोऽद्ब्रो भवेत्सः ।
श्रोता त्यागी च भोगी जिनवचनरतो ज्ञानविज्ञानयुक्तः ॥
निन्दादोषादिमुक्तो गुरुपदकमले पद्पदः श्रीसमर्थः ।
सच्छास्त्रार्थावधारी शिवसुखमतिमान् पण्डितः सद्विवेकी ॥ २२ ॥

अर्थ— श्रोता हा धर्माचरण करणारा, ध्यान करणारा, दयाळू, व्रतें व सद्गुण ह्यांनी युक्त असलेला, उदार असून संपत्तिचा योग्यप्रकारें उपभोग घेणारा, श्री जिनांच्या वचनावर प्रेम करणारा, ज्ञान (सामान्यज्ञान ह्मणजे दर्शन) आणि विज्ञान (विशेष ज्ञान) ह्यांनी युक्त असलेला, कोणाची निंदा वगैरे न करणारा, सद्गुरूच्या चरणकमलांवर भ्रमराप्रमाणें गढून राहणारा, संपत्तिमान्, गुरूनें सांगितलेला सदुपदेश मनांत ठेवणारा, मोक्षप्राप्तीची इच्छा करणारा, बुद्धिमान्, शहाणा आणि चांगला विचार करणारा असा असावा.

श्रोत्याचे प्रकार

चतुर्दशात्र वै सन्ति श्रोतारः शास्त्रहेतवः ॥ उत्तमा मध्यमा नीचास्त्रिविधा लोकवर्तिनः ॥२३॥

अर्थ— ह्या जगांत शास्त्रश्रवण करणारे (श्रोते) चवदा प्रकारचे आहेत. त्या चवदा प्रकारच्या

आहे. ह्याचे तात्पर्य असे आहे की, गाय गरीब असल्यामुळे, ती—दुष्टपणा न करता—त्या मानानें दुसऱ्याचा उपयोग करते. हंसाचा, पाणी आणि दूध ही निरनिराळी करण्याचा गुण स्वाभाविक असल्याचे सर्वांस माहीत आहे. मृत्तिकेचा, पाणी आपल्यांत जिरविण्याचा गुण स्वाभाविक आहे. आणि राघूचा शिकविलेलें तेवढें ध्यानांत ठेवण्याचा गुणही स्वाभाविक आहे. ह्मणून ह्या चारी वस्तूंत वास्तविक पाहिले असता स्वाभाविक गुणच सांपडतात. ह्याच्या उलट जर ह्या वस्तूंत दोष दृष्टी पडत असले, तर ते स्वाभाविक नसून, औपाधिक आहेत हें स्पष्ट आहे. तेव्हां ज्या श्रोत्यांमध्यें अशाप्रकारचे ( स्वाभाविक ) गुणच असतात, दोष असत नाहीत, त्या श्रोत्यांची गणना उत्तम श्रोत्यांत केली हें योग्य आहे. शेळी, शिला आणि छिद्र पडलेली घागर ह्यांच्यासारखे जे श्रोते असतात, ते मध्यम श्रोते समजावेत, ह्याचें विवेचन असें की, ज्याप्रमाणें मागें गायीपासून दुसऱ्याचा उपयोग होत असल्याचे सांगितलें आहे, त्याप्रमाणे ह्या ठिकाणीही समजावयाचें आहे. फरक इतकाच की, गाईपासून अधिक उपयोग होतो आणि शेळीपासून दुसऱ्याचा थोडासा उपयोग होतो. ह्मणून शेळीसारखे दुसऱ्याचा थोडासा उपयोग करणारे जे श्रोते असतात तें मध्यमश्रोते होत. तसेंच शिलेप्रमाणें असणारे श्रोतेही मध्यम समजावेत. ह्यांत शिलेप्रमाणें असणारे श्रोते ह्मणजे आपल्याला न समजलें तरी, कोणत्याही प्रकारचा दुष्टपणा न करतां स्वस्थपणें बसून ऐकणारे श्रोते असा अर्थ घ्यावयाचा आहे. तेव्हां समजून किंवा न समजून उगीच वितंडवाद किंवा

घाणीच्या जाग्यांत रमतो, त्याप्रमाणें वक्त्याची सहज जरी चुकी दिसली तथापि ज्याला आनंद होतो तो श्रोता नीच मानावा. माजर आपल्या सजातीयांचा द्वेष करितें, त्याप्रमाणें इतर श्रोत्यांशी द्वेष करणारा श्रोता नीच होय. आणि नासलेलें रक्तच जसें प्रिय होतें त्याप्रमाणें ज्याला वाईट तेवढेंच प्रिय होतें तो श्रोता नीच होय असें समजावें. या तीनप्रकारच्या श्रोत्यांपैकीं कनिष्ठ प्रतीच्या श्रोत्याला धर्मशास्त्र सांगूं नये.

उपोद्घात

श्रीसामायिकशौचसान्ध्यविधिसत्पूजासुमन्त्राशनं ।
द्रव्योपार्जनगर्भधाप्रभृतयस्त्रिंशत्क्रियाः सत्रिकाः ॥
मौञ्जीबन्धनसद्व्रतोपदिशनं पाणिग्रहर्षिव्रते ।
ग्रन्थे सूतककं त्रयोदशतयाध्यायान् विधास्याम्यहम् ॥ २६ ॥

अर्थ— सामायिक, शौच, संध्याकालचा विधि, पूजा, मंत्र, भोजन, द्रव्यसंपादन, गर्भाधान वगैरे तेहेत्तीस क्रिया, मौंजीबंधन, सद्व्रतोपदेश, विवाह, मुनिव्रत आणि आशौच हे तेरा विषय तेरा अध्यायांत मी ( ग्रंथकार ) सांगणार आहे.

गुणान् ग्रन्थस्य वक्तुश्च श्रोतॄणां क्रमशः स्फुटम् ॥
विधायाध्यायकानेव कथयामोऽधुनाऽत्र तान् ॥ २७ ॥

अर्थ— ग्रंथ, वक्ता आणि श्रोता ह्यांचे गुण क्रमाने स्पष्टपणे सांगून आतां मागील श्लोकांत सांगितलेले अध्याय येथून पुढे मी सांगण्यास आरंभ करणार आहे.

ध्यानं तावदहं वदामि विदुषां ज्ञानार्णवे यन्मत- ।
मार्तं रौद्रसधर्म्यशुक्लचरमं दुःखादिसौख्यप्रदम् ॥
पिण्डस्थं च पदस्थरूपरहितं रूपस्थनामापरं ।
तेषां भिन्नचतुश्चतुर्विषयजा भेदाः परे सन्ति वै ॥ २८ ॥

अर्थ— सर्व पंडितांना मान्य असलेले ध्यान ( चिंतन ) मी प्रथम सांगतो. ते आर्तध्यान, रौद्रध्यान, धर्म्यध्यान आणि शुक्लध्यान असे चार प्रकाराचे आहे. ते दुःख सुख ह्या दोहोसही देणारे असें आहे. तसेच पिंडस्थ, पदस्थ, रूपस्थ आणि रूपरहित अशी दुसरी ध्यानें आहेत. ह्या आर्त वगैरे चार प्रकारच्या ध्यानांपैकी प्रत्येकाचे निरनिराळे चार चार भेद आहेत; ते पुढे दाखविल्याप्रमाणे समजावेत.

आर्तध्यानाचे भेद

आर्तध्यानं चतुर्भेदमिष्टवस्तुवियोगजम् ।
अनिष्टवस्तुयोगोत्थं किञ्चिद्दृष्ट्वा निदानजम् ॥ २९ ॥
किञ्चित्पीडादिके जाते चिन्तां कुर्वन्ति चेज्जडाः ॥

तस्मात्त्याज्यं तु पापस्य मूलमार्तं सुदूरतः ॥ ३० ॥

अर्थ— आपल्याला प्रिय असलेली वस्तु प्राप्त नाहींशी झाल्याकारणानें उत्पन्न होणारें, नको असलेली वस्तु प्राप्त झाल्यामुळें उत्पन्न होणारें, दुसऱ्याचें चागलें पाहिल्यामुळें उत्पन्न होणारें आणि आपल्याला पीडा झाल्यामुळें उत्पन्न होणारें असें चार प्रकारचें आर्तध्यान आहे. हें अज्ञानी लोकांचे ठिकाणीं दृष्टी पडतें. हें ध्यान पापाचें बीज असल्यामुळें दूर टाकून द्यावें.

रौद्रध्यानाचे भेद

प्राणिनां रोदनाद्रौद्रः क्रूरः सत्त्वेषु निर्घृणः ॥
पुमांस्तत्र भवं रौद्रं विद्धि ध्यानं चतुर्विधम् ॥ ३१ ॥
हिंसानन्दान्मृषानन्दात्स्तेयानन्दात्प्रजायते ॥
परिग्रहाणामानन्दात्त्याज्यं रौद्रं च दूरतः ॥ ३२ ॥

अर्थ— अन्यजीवास रडावयास लावणारा, क्रूर आणि जीवावर दया न करणारा असा जो पुरुष, त्याचें जे ध्यान ( चिंतन ) त्यास रौद्रध्यान असें ह्मणतात. हें हिंसा केल्यानें होणाऱ्या आनंदामुळें उत्पन्न होणारें, खोटें बोलल्यामुळें होणाऱ्या आनंदापासून उत्पन्न होणारें, चोरी केल्यानें होणाऱ्या आनंदापासून उत्पन्न होणारें आणि परिग्रह वाढविल्यामुळें होणाऱ्या आनंदापासून उत्पन्न होणारें असे चार प्रकारचें आहे.

हें देखील पापाचें बीज असल्यानें ह्याचाही सर्वथा त्याग करावा.

धर्मध्यानाचे भेद.

आज्ञापायविपाकसंस्थानादिविचयान्तकाः ॥ धर्मध्यानस्य भेदाः स्युश्च-
त्वारः शुभदायकाः ॥ ३३ ॥ यत्प्रोक्तं जिनदेवेन सत्यं तदिति निश्चयः ॥
मिथ्यामतपरित्यक्तं तदाज्ञाविचयं मतम् ॥ ३४ ॥ येन केन प्रकारेण
जैनो धर्मः प्रवर्धते ॥ तदेव क्रियते पुम्भिरपायविचयं मतम् ॥ ३५ ॥
शुभाशुभं च यत्कार्यं क्रियते कर्मशत्रुभिः ॥ तदेव भुज्यते जीवैर्वि-
पाकविचयं मतम् ॥ ३६ ॥ श्वभ्रे दुःखं सुखं स्वर्गे मध्यलोकेऽपि तद्वयम् ॥
लोकोऽयं त्रिविधो ज्ञेयः संस्थानविचयं परम् ॥ ३७ ॥

अर्थ— आज्ञाविचय, अपायविचय, विपाकविचय आणि संस्थानविचय हे धर्मध्यानाचे चार भेद आहेत. ह्यांचे विवरण पुढे लिहिल्याप्रमाणे समजावें. ज्या चिंतनांत किंवा ध्यानांत– "श्रीजिनेंद्रांनी जें सांगितलें आहे तेंच खरें आहे" असा निश्चय असतो आणि ज्यांत मिथ्यामत मुळीच नसतें ते आज्ञाविचय नांवाचे धर्मध्यान होय. ज्या चिंतनांत जिनेंद्रांनी सांगितलेला धर्म कशानें वृद्धिंगत होईल ह्याचा विचार मनुष्यांनी केला जातो तें अपायविचय नांवाचे धर्मध्यान होय. कर्मरूपी शत्रु जें शुभ किंवा अशुभ फल देतात, तेच

फल जीव उपभोगतात असें जे चिंतन, तें विपाकविचय नांवाचें धर्मध्यान होय. आणि नरकांत दुःख आहे, स्वर्गात फक्त सुखच आहे आणि ह्या मध्यलोकांत ह्मणजे पृथ्वीवर सुख व दुःख हीं दोन्ही आहेत; ह्मणून हें त्रैलोक्य तीन प्रकारचें आहे असें जें चिंतन तें संस्थानविचय नांवाचें धर्मध्यान होय. ह्या ध्यानाचे हे चारही प्रकार कल्याण करणारे असल्यानें हें ध्यान जीवांनी अवश्य करावें.

शुक्लध्यानाचे भेद

शुक्लध्यानं चतुर्भेदं साक्षान्मोक्षपदप्रदम् ॥ पृथक्त्वादिवितर्काख्यवी-
चारं प्रथमं मतम् ॥ ३८ ॥ एकत्वादिवितर्काख्यवीचारं च द्वितीयकम् ॥
सूक्ष्मक्रियाप्रतीपाति तृतीयं शुक्लमुत्तमम् ॥ ३९ ॥ व्युपरताक्रियानि-
वृत्ति तुर्यं शुक्लमुच्यते ॥ एतेषां नामतोऽर्थश्च ज्ञायते गुणवत्तया ॥ ४० ॥

अर्थ— शुक्लध्यान चार प्रकारचे आहे. तें साक्षात् मोक्षपदाची प्राप्ति करून देणारें आहे. त्याचे भेद—पृथक्त्ववितर्कवीचार, एकत्ववितर्कवीचार, सूक्ष्मक्रियाप्रतिपाति आणि व्युपरतक्रियानिवृत्ति—ह्या नांवांचे आहेत. त्यांचीं हीं नांवें त्यांच्या गुणावरून ठेविलेली असल्यामुळें त्यांचे ( त्या भेदांचें ) स्वरूप त्यांच्या नांवांवरून सहज समजण्यासारखें आहे. तथापि वाचकांस स्पष्ट समजण्याकरितां पुढे त्याचें विवेचन ग्रंथकार करतात.

पृथक्त्वेन वितर्कस्य वीचारो यत्र तद्विदुः ॥ सवितर्कं सवीचारं पृथक्त्वादिपदाह्वयम् ॥ ४१ ॥

अर्थ— जीवाजीवादि सर्व पदार्थ एकमेकापासून अगदीं भिन्न आहेत असा जो विचार किंवा जे चिंतन, त्यास पृथक्त्ववितर्कवीचार नांवाचें शुक्लध्यान ह्मणतात.

एकत्वेन वितर्कस्य स्याद्यत्राविचरिष्णुना ॥ सवितर्कसवीचारमेकत्वादिपदाभिधम् ॥ ४२ ॥

अर्थ— सर्व वस्तु एकरूप आहेत असा विचार ज्यांत नसतो ते एकत्ववितर्कावीचार नांवाचे शुक्लध्यान होय.

मनोवचनकायांश्च सूक्ष्मीकृत्य च सूक्ष्मिकाम् ॥
क्रियां ध्यायेत्परं ध्यानं प्रतिपातपराङ्मुखम् ॥ ४३ ॥

अर्थ— मन, वाणी आणि शरीर ह्यांस सूक्ष्म करून, न विघडूं देतां एकाग्रतेने जे सूक्ष्मक्रियेचें ध्यान कोणीही करील, तें सूक्ष्मक्रियाप्रतिपाति नांवाचे शुक्लध्यान समजावे. हे ध्यान सयोगकेवली मुनि करितात.

ततो निरुद्धयोगः सन्नयोगी विगतास्रवः ॥
समुच्छिन्नक्रियाध्यानमनिवृत्ति तदा भवेत् ॥ ४४ ॥

अर्थ— मग (सूक्ष्मक्रियाप्रतिपाति नांवाचे शुक्लध्यान केल्यानतर) मनोयोग, काययोग आणि वचनयोग ह्या तिन्ही योगाचा निरोध करून, ज्याचे आस्रव बंद झाले आहेत असा अयोगकेवली सर्वक्रियेच्या उपरमाचें जें ध्यान करतो ते व्युपरतक्रियानिवृत्ति नांवाचे शुक्लध्यान समजावे. [ ह्या श्लोकांत अनिवृत्ति

तदा भवेत् ह्या ठिकाणी अनिवृत्ति तु तद्भवेत् असा पाठ चांगला ]

आर्तरौद्रसुधर्माख्यशुक्लध्यानानि चागमे ॥ ज्ञेयानि विस्तरेणैव कारणं सुखदुःखयोः ॥ ४५ ॥

अर्थ— आर्तध्यान आणि रौद्रध्यान ही दोन ध्यानें दुःख देणारी आहेत. आणि धर्मध्यान व शुक्लध्यान ही दोन ध्यानें सुख देणारी आहेत. ह्या ध्यानांचें स्वरूप जैनागमात विस्तारानें सांगितलें आहे. तें जिज्ञासु श्रावकांनी त्यावरूनच समजून घ्यावें.

यत्किञ्चिद्दृश्यते लोके तत्सर्वं देहमध्यगम् ॥ इति चिन्तयते यत्तु पिण्डस्थं ध्यानमुच्यते ॥४६॥

अर्थ— जें कांही ह्या लोकांत आहे तें सगळें देहात भरलेलें आहे असें चिंतन, त्याला पिंडस्थध्यान ह्मणतात.

एकद्वित्रिचतुःपञ्चषडष्टौ षोडशादिकाः ॥ अक्षरात्म्यपरा मन्त्राः शराग्निसंख्यकास्तथा ॥ ४७ ॥

एवं मन्त्रात्मकं ध्यानं पदस्थं परमं कलौ ॥ शरीरजीवयोर्भेदो यत्र रूपस्थमस्तु तत् ॥ ४८ ॥

अर्थ— एक, दोन, तीन, चार, पाच, सहा, आठ, सोळा, पसतीस अशा अक्षरांचे जे मंत्र असतात, त्यांचें जे चिंतन त्याला पदस्थध्यान असें ह्मणतात. हें ध्यान कलियुगात मोठें उत्कृष्ट मानिलेलें आहे. शरीर व जीव ह्यांचा भेद ज्यांत विषय असतो असें जें चिंतन त्यास रूपस्थचिंतन किंवा रूपस्थध्यान असें ह्मणतात.

अष्टकर्मविनिर्मुक्तमष्टभिर्भूषितं गुणैः ॥ यत्र चिन्तयते जीवो रूपातीतं तदुच्यते ॥ ४९ ॥

अर्थ— ज्या ध्यानांत–आठ प्रकारच्या कर्मापासून मुक्त झालेलें व आठ गुणांनी युक्त असलेलें असें जें आपलें स्वरूप,– त्याचें जीव चिंतन करतो ते रूपातीत ध्यान होय.

प्रात कालाचा विधि

प्रातश्चोत्थाय पुम्भिर्जिनचरणयुगे धार्यते चित्तवृत्ति-।
रार्तं रौद्रं विहाय प्रतिसमयमिदं चिन्त्यते सप्ततत्त्वी ॥
ध्यानं धर्म्यं च शुक्लं विगतकलिमलं शुद्धसामायिकं च।
कुत्रत्योऽयं मदात्मा विविधगुणमयः कर्मभारः कुतो मे ॥ ५० ॥

अर्थ— मनुष्यांनी प्रातःकालीं शयनावरून उठून श्रीजिनेंद्राचे चरण मनांत आणावेत. आर्त व रौद्र असे दोन प्रकारचे ध्यान टाकून द्यावें; आणि जीव अजीव वगैरे सांत तत्त्वांचा प्रतिक्षणी विचार करावा. धर्म्य आणि शुक्ल असे दोन प्रकारचें ध्यान करावे. ज्याने कलियुगांत होणाऱ्या सर्व पातकांचा नाश होत आहे असे सामायिक करावे. आणि अनेकगुणांनी युक्त असा हा माझा आत्मा कोठून आला आहे? मला हें कर्माचें ओझें कोठून प्राप्त झालें आहे? हा विचार करावा.

संसारे बहुदुःखभारजटिले दुष्कर्मयोगात्परं।
जीवोऽयं नरजन्म पुण्यवशातः प्राप्तः कदाचित्कचित् ॥

दुष्प्रापं जिनधर्ममूर्जितगुणं सम्प्राप्य सन्धीयते।
नानादुष्कृतनाशनं सुखकरं ध्येयं परं योगिभिः ॥ ५१ ॥

अर्थ— दुष्कर्मांच्या संबंधामुळें अनेक प्रकारच्या दुःखांनीं भरलेल्या ह्या संसारात हा जीव पुण्यकर्मांच्या उदयानें मनुष्यजन्माला प्राप्त झाला आहे. ह्या नरजन्मांत ह्या जीवानें—ज्याचा महिमा फार मोठा आहे आणि ज्याची प्राप्ति होणें फार कठिण अशा—जिनधर्माची प्राप्ति करून घेऊन सुखकर असा पापक्षय करावा. असा विचार प्रातःकाली मनुष्यांनीं करावा.

आहारसाध्वसपरिग्रहमैथुनाख्याः । सञ्ज्ञाश्चतस्र इति ताभिरुपद्रुतोऽङ्गी ॥
कुत्रापि नो स लभते भुवनत्रयेऽस्मिन् । सौख्यस्य लेशमपि चिन्त्यमिति प्रभाते ॥ ५२ ॥

अर्थ— आहार, भय, परिग्रह आणि मैथुन ह्या चार संज्ञा आहेत ( ह्या चारीला संज्ञा असें नाव आहे. ) ह्या चारी संज्ञांच्या योगानें पीडित झालेल्या ह्या जीवाला, ह्या त्रिभुवनांत कोठेंही थोडेसेंही सुख प्राप्त होत नाहीं! असें चिंतन प्रातःकाळीं करावें.

दुःखं श्वभ्रेषु शीतं बहुलमतितरामुष्णमेव क्षुदादि- ।
च्छेदो भेदश्च घर्षः क्रकचविधितया पीलनं यन्त्रमध्ये ॥
शारीरं चान्त्रनिष्कासनमपि बहुधा ताडनं मुद्गराद्यै- ।

रग्निज्वालानुषङ्गः प्रचुरदुरिततो वर्तते श्रूयमाणम् ॥ ५३ ॥

अर्थ— नरकांत फार दुःख आहे. तेथें कोठें थंडी अतिशय असते, कोठें उष्ण असते, तेथें भुकेपासून फार त्रास होतो. तसेच नरकांत कोठें शरीर तोडतात, कोठें त्याला भोंके पडतात, कोठें करवताने कापतात, कोठें यंत्रांत घालून पिळून टाकतात, कोठें तर शरीरांतील आंतडीही काढतात, तसेच मोठमोठ्या सोट्यानीं पुष्कळ मार देतात, पेटलेल्या अग्नीतहीं टाकतात. ह्याप्रमाणे पुष्कळ पातक केल्यानें अनेक दुःखे भोगावी लागतात! असे आह्मी ऐकलें आहे. असे प्रातःकाली चिंतन करावे.

तिर्यक्ष्वातपशीतवर्षजनितं दुःखं भयं कानने ।
सिंहादेरतिभारकर्मवहनं सन्ताडनं छेदनम् ॥
क्षुत्तृष्णादि च कीटनाममशकैर्दंशस्तथा माक्षिकैः ।
स्वाधीनत्वपराङ्मुखं विधिवशाद्बन्धादिकं वर्तते ॥ ५४ ॥

अर्थ— तिर्यंच योनींतही फार दुःख असतें. उष्ण, थंडी आणि पर्जन्य ह्यांच्यापासून दुःख होते. अरण्यांत सिंहादि पशुपासून भय उत्पन्न होतें. मनुष्यें पाठीवर अतिशय ओझे लादतात, मारतात, एखादा अवयव देखील कांपतात. क्षुधा आणि तृषा ह्यांच्यापासून पीडा होते. किडे व डांस वगैरे प्राणी पीडा देतात. दुर्दैवामुळें स्वतंत्रपणा नसल्याकारणानें लोक बांधून घालतात. ह्याप्रमाणें अनेक दुःखे

भोगावी लागतात. असें प्रातःकाली चिंतन करावें.

मर्त्येष्विष्टवियोगजं दुरिततो दुःखं तथा मानसं ।
शारीरं सहजं चतुर्विधमिदं चागन्तुकं श्रूयते ॥
दारिद्र्यानुभवः प्रतापहरणं कीर्तिक्षयः सर्वथा ।
रौद्रार्तिप्रभवं तथा व्यसनज बन्धादिकं चापरम् ॥ ५५ ॥

अर्थ— मनुष्ययोनींत पाहिलें असतां, मनुष्यांना पूर्वजन्मीच्या पातकामुळें इष्ट वस्तूचा जो वियोग होतो त्यामुळें दुःख होतें. शिवाय मनास होणाऱ्या पीडा, शरीरास होणाऱ्या पीडा, सहज म्हणजे जन्माबरोबर आलेली पीडा आणि आगंतुक म्हणजे अकस्मात् प्राप्त झालेल्या पीडा ही चार दुःखें प्रत्येक मनुष्याच्या पाठीस लागलेलीं असतात. आणखी मनुष्याला दारिद्र्य भोगावें लागतें, त्यामुळें दुःख होतें. शक्तीचा ऱ्हास होतो, त्यामुळें दुःख होतें. अकीर्ति झाल्यामुळें दुःख होतें. रौद्रध्यानापासून दुःख होतें. अनेक व्यसनें जडतात त्यामुळें दुःख होतें. एखादे वेळी राजदंड होऊन बंदिखान्यांत पडावें लागल्यामुळें दुःख होतें. अशी अनेक प्रकारांनी दुःखें होतात. असेंही चिंतन प्रातःकाली करावें.

देवेष्वेव च मानसं बहुतरं दुःखं सुखच्छेदक ।
देवीनां विरहात्प्रजायत इति प्रायः स्वपुण्यच्युतेः

इन्द्रस्यैव सुवाहनादिभवनं दासत्वमङ्गीकृतं ।
नानैश्वर्यपराङ्मुखं मरणतो भीतिस्तस्था दुस्तरा ॥ ५६ ॥

अर्थ— देवांविषयीं विचार केला असतां त्यांना देवींच्या वियोगामुळें सुखाचा नाश होऊन दुःख होतें. आणि आपल्या पुण्यकर्मापासून भ्रंश झाला म्हणजे इंद्राचेंच वाहन वगैरे व्हावें लागतें; किंवा ज्यांत संपत्तीचें सुख बिलकूल नाहीं असा इंद्राचा सेवकपणा करावा लागतो. वरें, इतकें होऊनही मरणाची भयंकर भीतितर आहेच. तेव्हां देवांनाही अनेक दुःखें भोगावी लागतात!

लोकोऽयं नाट्यशाला रचितसुरचना प्रेक्षको विश्वनाथो ।
जीवोऽयं नृत्यकारी विविधतनुधरो नाटकाचार्यकर्म ॥
तस्माद्रक्तं च पीतं हरितसुधवलं कृष्णमेवात्र वर्णं ।
धृत्वा स्थूलं च सूक्ष्मं नटति सुनटवत् नीचकोच्चैः कुलेषु ॥ ५७ ॥

अर्थ— हें जगत् ही एक चांगली तयार केलेली नाट्यशाला आहे; जगत्पति जो सिद्ध परमेष्ठी तो प्रेक्षक आणि अनेक प्रकारचे देह धारण करणारा असा जीव नृत्य करणारा आहे. तो नाटकाचार्याचेंही काम आपणच करतो. म्हणून जीव हा; तांबडा, पिंवळा, हिरवा, पांढरा, काळा वगैरे वर्ण धारण करून चांगल्या नटाप्रमाणें मोठें किंवा लहान असें अनेक प्रकारचे स्वरूप धारण करून नीच उच्च कुलांत

सोंग घेतो. ( ह्मणजे जन्म घेतो. )

क्वचित्कान्ताश्लेषात्सुखमनुभवत्येष मनुजः । क्वचिद्गीतं श्राव्यं विविधवररागैश्च श्रृणुयात् ॥
क्वचिन्नृत्यं पश्यन्नखिलतनुयष्टीविलसितं । रतिं मन्येताहो उचितविषयो धर्मविमुखः ॥ ५८ ॥

अर्थ— हा मनुष्य एखादे ठिकाणीं प्रिययुवतीच्या गाढालिंगनापासून होणाऱ्या सुखाचा अनुभव घेतो. एखादे ठिकाणीं उत्कृष्ट अशा अनेक रागांनीं मिश्र झालेलें सुश्राव्य गायन श्रवण करतो. एखाद्या ठिकाणीं ज्यांत सर्वांग हलत आहे असें सुंदर नृत्य पाहून संतोष मानतो. ह्याप्रमाणें विषयसेवनांत गढून गेल्यानें धर्माचरणाकडे मुळींच पहात नाहीं. हें मोठें आश्चर्य आहे!

क्वचित्कांता कमलवदना हावभावं करोति । क्वचित् दुःखं नरककुहरे पंचधाप्राणघातात् ॥
क्वचिच्छत्रं चमरसहितं दासपुम्भिः प्रयुक्तं । क्वचित्कीटो मृतभवितनौ प्राणिनां कर्मयोगात् ॥ ५९

अर्थ— हा जीव आपल्या कर्मयोगामुळें, एखाद्या ठिकाणीं जिचें मुख कमलाप्रमाणें आहे अशा स्त्रीचें स्वरूप घेऊन अनेक प्रकारचे हावभाव करतो. एखाद्या वेळीं पंचप्राणांच्या नाशामुळें नरकांत दुःख भोगतो. एखादे वेळीं दासजनांकडून आपल्यावर छत्रचामरें धरवितो. आणि एखादे वेळीं एखाद्या प्रेताच्या शरीरांतला किडा होतो! ह्याप्रमाणें प्रातःकाळीं मनुष्यानें वर सांगितलेला सर्व विचार करावा. हा प्रातःकालचा विधि झाला.

सामायिक

महाव्रतं दुर्धरमेव लोके । धर्तुं न शक्तोऽहमपि क्षणं वा ॥
संसारपाथोनिधिमत्र केनो- । पायेन चापीह तरामि दीनः ॥ ६० ॥
इत्यादिकं चेतसि धार्यमाणः । पल्यङ्कदेशात्सुमुनीन्द्रबुध्द्या ॥
पवित्रवस्त्रः सुपवित्रदेशे । सामायिकं मौनयुतश्च कुर्यात् ॥ ६१ ॥

अर्थ— ह्या लोकांत महाव्रत धारण करणें फार कठिण आहे; ह्मणून तें धारण करणास मी देखील समर्थ नाहीं. ह्या जगांत दीन असलेला मी, कोणत्यातरी उपायानें हा संसारसमुद्र तरून जाईन. ह्याप्र-माणें मनांत विचार करून, आपण एक मुनींद्र आहोत अशा बुद्धीनें शय्येवरून उठून, श्रावकानें शुद्धवस्त्र धारण करून शुद्ध देशावर मौन धारण करून सामायिक करावें.

समता सर्वभूतेषु संयमे शुभभावना ॥ आर्तरौद्रपरित्यागस्तद्धि सामायिकं मतम् ॥ ६२॥

अर्थ— सर्वप्राण्यांचे ठिकाणीं समबुद्धि धारण करणें, संयमाविषयीं सद्बुद्धि ठेवणें आणि आर्त व रौद्र ह्या दोन प्रकारच्या ध्यानांचा त्याग करणें ह्यास सामायिक असें ह्मणतात.

योग्यकालासनस्थानमुद्राऽऽवर्तशिरोनतिः ॥ विनयेन यथाजातकृतिकर्मामलं भजेत् ॥ ६३ ॥

अर्थ— योग्य काल, योग्य आसन, योग्य स्थान, योग्य मुद्रा, योग्य आवर्त आणि योग्य अशी

मस्तकांची नम्रता करून विनयानें मुनीप्रमाणें कृतिकर्माचें ( आवश्यकक्रियांचें ) सेवन करावें.

जीविते मरणे लाभेऽलाभे योगे विपर्यये ॥ बन्धावरौ सुखे दुःखे सर्वदा समता मम ॥ ६४ ॥

अर्थ— जगणें आणि मरणें, लाभ आणि हानि, संयोग आणि वियोग, बंधु आणि शत्रु, सुख आणि दुःख ह्यांच्याविषयीं माझी सर्वदा समबुद्धि आहे. अशी भावना सामायिकाचे वेळीं करावी.

पापिष्ठेन दुरात्मना जडधिया मायाविना लोभिना ।
रागद्वेषमलीमसेन मनसा दुष्कर्म यन्निर्मितम् ॥
त्रैलोक्याधिपते जिनेन्द्र भवतः श्रीपादमूलेऽधुना ।
निन्दापूर्वमहं जहामि सततं वर्वर्तिषुः सत्पथे ॥ ६५ ॥

अर्थ— हे त्रैलोक्यनाथा श्रीजिनेंद्रा! अत्यंत पातकी दुष्ट अज्ञान कपटी लोभी आणि रागद्वेषांच्या योगानें मलिन झालेला असा जो मी, त्या माझ्या हातून मनानें आतांपर्यंत जें पापकर्म झालें असेल; तें पापकर्म या वेळीं तुझ्या चरणाजवळ-त्याची निंदा करून-सोडून देतों. मी आतां सर्वदा सन्मार्गानें वागण्याची इच्छा करीत आहे.

षडावश्यकसत्कर्म कुर्याद्विधिवदञ्जसा ॥ तदभावे जपः शुद्धः कर्त्तव्यः स्वात्मशुद्धये ॥ ६६ ॥

अर्थ— श्रावकानें आपल्या शुद्धीकरितां षडावश्यकक्रिया यथाविधि तत्काळ कराव्यात. त्या जर

होत नसतील तर मंत्रांचा जप करावा.

सिद्धचक्रप्रसादेन मन्त्राः सिध्यन्ति साधवः ॥
तस्मात्तदग्रतो मन्त्रान्समाराध्य ततोऽर्चयेत् ॥ ६७ ॥

अर्थ— सिद्धचक्राच्या प्रसादानें सर्व मंत्र सिद्ध होतात. ह्मणून प्रथम सिद्धचक्राच्या अग्रभागीं मंत्रांची उपासना करून नंतर पूजादि कर्मांत त्यांचा उपयोग करावा.

ऊर्ध्वाधो रयुतं सबिन्दुसपरं ब्रह्मस्वरावेष्टितं ।
वर्गापूरितदिग्गताम्बुजदलं तत्सन्धितत्त्वान्वितम् ॥
अन्तः पत्रतटेष्वनाहतयुतं ह्रींकारसंवेष्टितं ।
देवं ध्यायति यः स मुक्तिसुभगो वैरीभकण्ठीरवः ॥ ६८ ॥

अर्थ— खाली आणि वर रेफानें युक्त असलेल्या हकाराला ( र्हूँ ह्या बीजाक्षराला ) ओंकारानें वेष्टित करावें, आणि त्याच्या भोवती स्वराक्षराचे वलय करावें. त्या वलयाला सभोवती कमलपत्राकार आठ दलें करावीत. त्या प्रत्येक दलांत क्रमानें स्वर व कवर्ग, चवर्ग, टवर्ग, तवर्ग, पवर्ग, यवर्ग आणि शवर्ग हे आठ वर्ग एक एक अशा क्रमाने लिहावेत. त्या प्रत्येक दोन दलांच्या सांध्यांत तत्त्वाक्षर लिहावे. ( र्हूँ ह्या एका बीजालाच तत्त्व असे कर्नाटकीयांचें मत आहे, आणि ' णमो अरहंताणं '

ह्या पदाला तत्त्व ह्मणावें असें औत्तरात्यांचें (उत्तरेकडील लोकांचें) मत आहे. आह्मांस कर्नाटकीयांचें मत मान्य आहे. पुढील श्लोक पहा) प्रत्येक दलाच्या शेवटाला अनाहत मंत्र लिहावा. आणि अशा ह्या अष्टदल कमलाच्या भोंवतीं 'ॐ ह्रीं' ह्या मंत्राचें वेष्टन करावें. ह्याला मंत्रराज ह्मणतात. अशा ह्या मंत्राच्या आकृतीचें जो ध्यान करतो, तो मुक्तीच्या प्राप्तीमुळें भाग्यवान् होतो. आणि शत्रुरूपी गजांचा नाश करणारा सिंहच की काय? असा होतो.

ऊर्ध्वाधो रेफसंयुक्तं सपरं बिन्दुलाञ्छितम् ॥
अनाहतयुतं तत्त्वं मन्त्रराजं प्रचक्षते ॥ ६९ ॥ ॐ र्हं ॥

अर्थ— वर आणि खालीं रेफानें ह्मणजे रकारानें युक्त असें जें हकारयुक्त तत्त्व ह्मणजे (र्ह्रूं हा जो बीज मंत्र) त्याला मंत्रराज असें ह्मणतात.

ॐकारं बिन्दुसंयुक्तं नित्यं ध्यायन्ति योगिनः ॥
कामदं मोक्षदं चैव ॐकाराय नमो नमः ॥ ७० ॥

अर्थ— अनुस्वारानें युक्त अशा ॐकाराचें (ॐ) ह्या अक्षराचें योगी (मुनि) ध्यान करतात. तो ॐकार इच्छित विषयाची प्राप्ति करून देणारा असून मोक्षप्राप्ति करून देणारा असा आहे. त्याला आमचा नमस्कार असो.

अवर्णस्य सहस्रार्धं जपन्नानन्दसम्भृतः ॥
प्राप्नोत्येकोपवासस्य निर्जरां निर्जितास्रवः ॥ ७१ ॥

अर्थ— जो आनंदानें युक्त असलेला मनुष्य अवर्णाचा पांचशेहे जप करतो त्याला एका उपवासाचें फळ मिळून त्याच्या कर्मांची निर्जरा होते. आणि तितका वेळ नवीन कर्मांचा आस्रव होत नाहीं.

हवर्णान्तः पार्श्वजिनोऽधो रेफस्तलगतः स धरेन्द्रः ॥
तुर्यस्वरः सबिन्दुः स भवेत्पद्मावतीसञ्ज्ञः ॥ ७२ ॥

अर्थ— ऱ्हीं ह्या मंत्रांतील हकार हा पार्श्वजिनस्वरूपी आहे. खालीं असलेला रेफ हा धरणेंद्रस्वरूपी आहे. आणि बिंदुसहित तुर्यस्वर ह्मणजे ईकार हा पद्मावतीस्वरूप आहे. ह्मणजे ऱ्हीं हें धरणेंद्रपद्मावती सहित पार्श्वजिनाचें स्वरूप आहे. असें समजावें.

मंत्राचे भेद

त्रिभुवनजनमोहकरी विद्येयं प्रणवपूर्वनमनान्ता ॥
एकाक्षरीति सञ्ज्ञा जपतः फलदायिनी नित्यम् ॥ ७३ ॥

अर्थ— जिच्या आरंभीं प्रणव ( ॐकार ) आहे आणि जिच्या शेवटीं नमः हा शब्द आहे अशी एकाक्षरी नावाची त्रैलोक्याला मोह करणारी विद्या ( ॐ ऱ्हां नमः हा मंत्र ) जप करणाऱ्याला नेहमीं चांगलें

फल देणारी आहे.

**अर्हमित्यक्षरंब्रह्म वाचकं परमेष्ठिनः ॥ सिद्धचक्रस्य सद्बीजं सर्वतः प्रणमाम्यहम् ॥ ७४ ॥**

अर्थ— ‘ अर्ह ’ हीं दोन अक्षरें ब्रह्मस्वरूप आहेत आणि परमेष्ठीचीं वाचक ( अर्ह या शब्दाचा परमेष्ठी असा अर्थ आहे ) असून, तीं अक्षरें सिद्धचक्राचें मुख्यबीजभूत आहेत म्हणून त्यांना मी सर्वप्रकारें नमस्कार करतों.

**चतुर्वर्णमयं मन्त्रं चतुर्वर्णफलप्रदम् ॥ चतूरात्रं जपेद्योगी चतुर्थस्य फलं भवेत् ॥ ७५ ॥**

अर्थ— अरिहंत ह्या चार अक्षरांचा जो हा ( अरिहंत हा ) मंत्र आहे, तो धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या चार पुरुपार्थांची सिद्धि करून देणारा आहे. ह्या मंत्राचा जप चार दिवस जो योगी करील त्याला मोक्षप्राप्ति होते.

**विद्यां षड्वर्णसम्भूतामजय्यां पुण्यशालिनीम् ॥**
**जपन् प्रागुक्तमभ्येति फलं ध्यानी शतत्रयम् ॥ ७६ ॥**

अर्थ— सहा अक्षरांनीं वनलेला ‘ अरिहंत सिद्ध ’ हा मंत्र अजिंक्य असून पुण्यप्रद आहे. जो कोणी एकाग्रचित्तानें ह्याचा तीनशेंहे जप करतो, त्याला पूर्वीचें फल ( मोक्ष ) प्राप्त होईल.

**चतुर्दशाक्षरं मन्त्रं चतुर्दशसहस्रकम् ॥ यो जपेदेकचित्तेन स रागी रागवर्जितः ॥ ७७ ॥**

अर्थ— “ श्रीमदृषभादिवर्धमानान्तेभ्यो नमः ” ह्या चवदा अक्षरांच्या मंत्राचा जो कोणी एकाग्रतेनें

चवदा हजार जप करतो, तो विषयासक्त जरी असला तथापि वीतराग होतो.

पञ्चत्रिंशद्भिरेवात्र वर्णैश्च परमेष्ठिनाम् ॥ मन्त्रैः प्राकृतरूपैश्च न कस्यापि कृतो व्ययः ॥ ७८ ॥
स्मर्तव्यः सानुरागेण विषयेष्वपरागिणा ॥ वीरनाथप्रसादेन धर्मं विदधता परम् ॥ ७९ ॥
अपराजितमंत्रोऽयं सर्वविघ्नविनाशनम् ॥ मङ्गलेषु च सर्वेषु प्रथमं मङ्गलं मतः ॥ ८० ॥

अर्थ— " णमो अरिहंताणं । णमो सिद्धाणं । णमो आइरियाणं । णमो उवज्झायाणं । णमो लोए सव्वसाहूणं । " हा पस्तीस अक्षरांनी युक्त असलेला परमेष्ठीचा मंत्र आहे. हा प्राकृतभाषेतील मंत्र आहे. ह्याच्या योगानें कोणाचाही नाश झालेला नाहीं. ह्मणजे ह्या मंत्राचा जप करणारा कोणताही जीव अधोगतीस गेलेला नाहीं. ह्मणून सरागांनीं व वीतरागांनी दोघांनीही ह्या मंत्राचें चिंतन अवश्य करावें; आणि श्रीवीरनाथाच्या कृपेनें धर्मसंचय करावा. ह्या मंत्रास 'अपराजितमंत्र' असें नांव आहे. हा मंत्र सर्वविघ्नांचा नाश करणारा असल्यामुळें मंगलकृत्यात प्रथम मंगल समजून ह्याचा उपयोग करावा.

स्मर मन्त्रपदोद्भूतां महाविद्यां जगत्सुताम् ॥ गुरुपञ्चकनामोत्थां षोडशाक्षरराजिताम् ॥ ८१ ॥

अर्थ— पंचगुरूंच्या नांवापासून उत्पन्न झालेली व मंत्ररूप असलेल्या अशा शब्दापासून तयार झालेली " अर्हत्सिद्धाचार्योपाध्यायसर्वसाधुभ्यो नमः " ही सोळा अक्षरांनीं सुशोभित दिसणारी जी महाविद्या (महामंत्र) त्याचें तूं स्मरण कर!

ॐ नमः सिद्धमित्येतन्मन्त्रं सर्वसुखप्रदम् ॥ जपतां फलतीहेष्टं स्वयं स्वगुणजृम्भितम् ॥८२॥

अर्थ— 'ओं नमः सिद्धं' हा मंत्र सर्वप्रकारचें सुख देणारा आहे. ह्याचा जप करणारांचे सर्व मनोरथ सिद्ध होतात. आणि आत्म्याचे जे स्वाभाविक गुण आहेत ते आपोआप प्रकाशमान होतात. ह्याला पंचाक्षरी मंत्र ह्मणतात. "णमो अरिहंताणं" हा सप्ताक्षरी मंत्र होय. "अरिहंतसिद्धं नमः" ह्यास अष्टाक्षरी मंत्र ह्मणतात. "अरिहंतसिद्धसाधुभ्यो नमः" ह्याला एकादशाक्षरी मंत्र ह्मणतात. "अरिहंतसिद्धसर्वसाधुभ्यो नमः" ह्याला त्रयोदशाक्षरी मंत्र ह्मणतात. आणि "ओं ऱ्हॉं ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हें ऱ्हैं ऱ्हों ऱ्हौं ऱ्हः अ सि आ उ सा सम्यग्दर्शनज्ञानचारित्रेभ्यो नमः" ह्याला सप्तविंशत्यक्षरी मंत्र ह्मणतात.

इत्थं मन्त्रं स्मरति सुगुणं यो नरः सर्वकालं ।
पापारिघ्नं सुगतिसुखदं सर्वकल्याणबीजम् ॥
मार्गे दुर्गे जलगिरिगहने सङ्कटे दुर्घटे वा ।
सिंहव्याघ्रादिजाते भवभयकदते रक्षकं प्राणभाजाम् ॥ ८३ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें हा वर सांगितलेला मंत्र पापरूपी शत्रूचा नाश करणारा आहे. सद्गति आणि सुख ह्यांना देणारा व सर्वकल्याणाची प्राप्ति करून देणारा आहे. ह्या मंत्राचें जो कोणी मनुष्य सर्वदा स्मरण करतो, त्याचें—भयंकर मार्गांत, पाण्यांत, पर्वतावर, अरण्यांत, संकटांत, बिघडलेल्या कामांत, तो मंत्र रक्षण

करितो. आणि सिंह, व्याघ्र, वगैरेपासून उत्पन्न झालेल्या व संसारापासून उत्पन्न झालेल्या भीतीचा नाश करतो.

अयं मन्त्रो महामन्त्रः सर्वपापविनाशकः ॥ अष्टोत्तरशतं जप्तो धत्ते कार्याणि सर्वशः ॥८४॥

अर्थ— ह्या मंत्राला महामंत्र ह्मणतात. हा सर्वपातकांचा नाश करणारा आहे. ह्याचा एकशे आठ वेळां जप केला असतां सर्व कार्य सिद्ध होतात.

हिंसानृतान्यदारेच्छाचुराश्चातिपरिग्रहः ॥ अमूनि पञ्च पापानि दुःखदायीनि संसृतौ ॥ ८५ ॥
अष्टोत्तरशतं भेदास्तेषां पृथगुदाहृताः ॥ हिंसा तत्र कृता पूर्वं करोति च करिष्यति ॥ ८६ ॥
मनोवचनकायैश्च ते तु त्रिगुणिता नव ॥ पुनः स्वयं कृतकारितानुमोदैर्गुणाहतिः ॥ ८७ ॥
सप्तविंशतिस्ते भेदाः कषायैर्गुणयेच्च तान् ॥ अष्टोत्तरशतं ज्ञेयमसत्यादिषु तादृशम् ॥ ८८ ॥

अर्थ— हिंसा, खोटें भाषण, परस्त्रीची इच्छा, चोरी आणि पुष्कळ परिग्रह ही पांच पातकें ह्या संसारांत फार दुःख देणारीं आहेत. ह्या प्रत्येकाचे एकशेंहें आठ प्रकार होतात. त्यांत उदाहरणाकरितां हिंसेचे प्रकार सांगतों. प्रथम हिंसेचे भूतकालची—ह्मणजे पूर्वी केलेली—हिंसा, वर्तमानकालची—ह्मणजे आतां होत असलेली—हिंसा आणि भविष्यकालची—ह्मणजे पुढें होणारी—हिंसा असे तीन प्रकार होतात; त्या तीन प्रकारांतील प्रत्येक प्रकाराचे मनानें केलेली हिंसा, वाणीनें केलेली हिंसा आणि शरीरानें केलेली हिंसा असे तीन प्रकार होतात. ह्मणजे हिंसा नऊ प्रकारची झाली. ह्या नऊ प्रकारांपैकी प्रत्येक प्रकाराचे

कृत (स्वतः केलेली हिंसा) कारित (दुसऱ्याकडून करविलेली हिंसा) आणि अनुमोदित (दुसऱ्यानें केली असतां मान्य केलेली हिंसा) असे तीन भेद आहेत. ह्यामुळें हिंसेचे एकंदर सत्तावीस भेद झाले. आतां ह्या सत्तावीस प्रकारांपैकी प्रत्येकप्रकार जो घडतो त्याला कारण-क्रोध, मान, माया आणि लोभ ह्या चार कषायांपैकीं कोणतातरी एक-कषाय असतोच. ह्मणून क्रोधामुळें होणारी हिंसा, मानामुळें होणारी हिंसा, मायेमुळे होणारी हिंसा आणि लोभामुळे होणारी हिंसा असे हिंसेचे चार प्रकार झाले. वर दाखविलेल्या सत्तावीस भेदांपैकीं किंवा प्रकारांपैकीं प्रत्येक प्रकार किंवा भेद चार प्रकारचा झाल्यानें हिंसेचे एकंदर एकशेहे आठ प्रकार होतात. ह्याप्रमाणेंच खोटें बोलणें, वगैरेंचेही प्रत्येकाचे एकशेहे आठ प्रकार होतात. ते वाचकांनी थोडीशी सूक्ष्म बुद्धि करून विचार केला ह्मणजे सहज समजण्यासारखे आहेत. हे भेद तत्त्वार्थसूत्रांच्या सहाव्या अध्यायांतील आठव्या सूत्रांत सविस्तर सांगितले आहेत.

आता हिंसेचे जे एकशेहे आठ प्रकार वर सांगितले, त्याचीच दुसरी एक तऱ्हा सांगतात—

पृथ्वीपानीयतेजःपवनसुतरवः स्थावराः पञ्चकायाः ॥
नित्यानित्यौ निगोदौ युगलशिखिचतुः सञ्ज्यसञ्ज्ञित्रसाः स्युः ।
एते प्रोक्ता जिनैर्द्वादश परिगुणिता वाङ्मनःकायभेदै- ।
स्ते चान्यैः कारिताद्यैस्त्रिभिरपि गुणिताश्चाष्टशून्यैकसंख्याः ॥ ८९ ॥

अर्थ— पृथ्वीकायिक, जलकायिक, तेजःकायिक, वायुकायिक, आणि वनस्पतिकायिक असे पांच त्रस जीव; नित्यनिगोद आणि अनित्यगोद हे दोन जीव, आणि द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, संज्ञिपंचेंद्रिय आणि असंज्ञिपंचेंद्रिय असे जीवांचे एकंदर बारा भेद शास्त्रांत सांगितले आहेत. ह्यांतील प्रत्येक जीवाची हिंसा—मनानें, वाणीनें आणि शरीरानें—अशी तीन प्रकारची असल्यामुळें हिंसेचे छत्तीस प्रकार झाले. आणि त्या छत्तीस प्रकारांपैकीं प्रत्येक प्रकार कृत, कारित आणि अनुमोदित असा तीन तीन प्रकारचा असल्यानें एकंदर हिंसेचे एकशेहे आठ प्रकार झाले.

वश्यकर्मणि पूर्वाह्णः कालश्च स्वस्तिकासनम् ॥
उत्तरा दिक् सरोजाख्या मुद्रा विद्रुममालिका ॥ ९० ॥
जपाकुसुमवर्णा च वषट् पल्लव एव च ॥

अर्थ— कोणा एखाद्याच्या वशीकरणाकरितां जर मंत्रजप करावयाचा असेल, तर तो पूर्वाह्णांत (सूर्योदयापासून पंधरा घटका कालास पूर्वाह्ण म्हणतात.) करावा. जप करण्याच्या वेळीं स्वस्तिकासन असावें, उत्तरेकडे तोंड करावें, कमलमुद्रा असावी, पोवळ्यांची माळ असावी, तांबडा रंग असावा, आणि मंत्राच्या शेवटीं "वषट्" असें म्हणावें. त्याला 'पल्लव' असें नांव आहे.

आकृष्टिकर्मणि ज्ञेय दण्डासनमतः परम् ॥ ९१ ॥

अङ्कुशाख्या सदा मुद्रा पूर्वाह्णः काल एव च ॥
दक्षिणा दिक् प्रवालानां माला वौषट् च पल्लवः ॥ ९२ ॥
उदयार्कनिभो वर्णः स्फुटमेतन्मतान्तरम् ॥

अर्थ— कोणाचेंही आकर्षण करावयाचें असल्यास दंडासन असावें. अंकुशमुद्रा असावी. जप पूर्वाह्णांत करावा. दक्षिणदिशेकडे तोंड करून बसावें. मंत्राच्या शेवटीं वौषट् हा पल्लव असावा. पोवळ्यांची माळ असावी. सूर्योदयाच्या वेळीं रंग असतो तसा रंग असावा.

स्तम्भकर्मणि पूर्वा दिक् पूर्वाह्णः काल उच्यते ॥ ९३ ॥
शुम्भमुद्रा च पीताभो वर्णो वज्रासनं मतम् ॥
ठठेति पल्लवो नाम माला स्वर्णमणिश्रिता ॥ ९४ ॥

अर्थ— स्तंभन करावयाचें असल्यास पूर्वदिशेकडे तोंड करून बसावें. मंत्रजप पूर्वाह्णांत करावा. शुभमुद्रा असावी. पिवळा रंग असावा. वज्रासन असावें. 'ठठ' हा पल्लव असावा आणि सुवर्णाच्या मण्यांची माळ असावी.

निषेधकर्मणीशानदिक् सन्ध्या समयोऽपि च ॥
भद्रपीठासनं प्रोक्तं वज्रमुद्रा विशेषतः ॥ ९५ ॥

कृष्णो वर्णश्च वै घे घे इति पल्लव उच्यते ॥
पुत्रजीवकृता माला विज्ञेया विविधैर्गुणैः ॥ ९६ ॥

अर्थ— कोणाचा तिरस्कार करावयाचा असल्यास उत्तरेकडे तोंड करून संध्याकाळीं जप करावा. भद्रपीठ नांवाचें आसन असावें. वज्रमुद्रा, काळा रंग, 'घे घे' हा मंत्राच्या शेवटीं पल्लव, पुत्रजीवमण्यांची (?) माला इतकी साधनें असावींत.

विद्वेषकर्मणि प्रायो मध्याह्नः काल इष्यते ॥
अग्निदिक्चापि धूम्रभो वर्णो हूमिति पल्लवः ॥ ९७ ॥
प्रवालाख्या मता मुद्रा कुर्कुटासनमुत्तमम् ॥
पुत्रजीवकृता माला जपने तत्र शस्यते ॥ ९८ ॥

अर्थ— द्वेष उत्पन्न करण्याकरितां करावयाच्या जपास मध्याह्नकाल इष्ट मानलेला आहे. ह्या जपास आग्नेयी दिशेकडे तोंड करून वसावें. धूम्रवर्ण असा रंग असावा. मंत्राच्या शेवटी "हूं" हा पल्लव लावावा. प्रवालमुद्रा असावी. कुक्कुटासन असावें. जपाला पुत्रजीवाची माला फार उत्तम असें शास्त्रांत सांगितलें आहे.

उच्चाटकर्मणि प्रोक्तमासनं कुर्कुटाभिधम् ॥

वायव्यदिक्चापराह्णः कालो मुद्रा प्रवालजा ॥ ९९ ॥
धूम्रवर्णो मतो वर्णो फडित्येव हि पल्लवः ॥

अर्थ— उच्चाटनकर्मांत कुक्कुटासन असावें. वायव्य दिशेकडे तोंड करून बसावें. मध्यान्हानंतरचा काल असावा. प्रवालमुद्रा असावी. धूम्रवर्णाचा रंग असावा. आणि मंत्राच्या शेवटीं 'फट्' असा पल्लव लावावा.

शान्तिकर्मणि विज्ञेयं पङ्कजासनमुत्तमम् ॥ १०० ॥
समयश्चार्धरात्रश्च वारुणी दिक्प्रशस्यते ॥
ज्ञानमुद्रा मौक्तिकानां माला स्वाहेति पल्लवः ॥ १०१ ॥
चन्द्रकान्तसमो वर्णः श्वेतवासोऽपि पुष्पकम् ॥

अर्थ— शांतिकर्मांत कमलासन उत्तम समजावें. मध्यरात्रीचा काल आणि पश्चिमदिशा फार चांगली मानली आहे. ज्ञानमुद्रा असावी. मोत्यांची माळ, मंत्राच्या शेवटीं "स्वाहा" असा पल्लव, चंद्रकांतमण्या-सारखा पांढरा रंग, पांढरें वस्त्र आणि पांढरें पुष्प ही फार चांगलीं मानलीं आहेत.

पौष्टिके कर्मणि प्रातःकालो नैर्ऋत्यदिङ्मता ॥ २ ॥
पङ्कजासनमेतद्धि ज्ञानमुद्रा विधानतः ॥
स्वधेति पल्लवो वर्णश्चन्द्रकान्तसमो मतः ॥ ३ ॥

मौक्तिकी नाममालेति पुष्पं श्वेतं च चीवरम् ॥
द्वादशाङ्गुलपर्वाणि दक्षिणावर्ततो जपेत ॥ ४ ॥
नववारान्यतो नाशः पापस्य प्रविजायते ॥

अर्थ— पौष्टिककर्माला नैर्ऋत्यदिशा आणि प्रातःकाल शास्त्रकारांनी योग्य मानले आहेत. ह्या कर्माला कमलासन असावें. ज्ञानमुद्रा असावी. मंत्राच्या शेवटी "स्वधा" असा पल्लव असावा. चंद्रकातमण्यासारखा रंग असावा. मोत्याची माला, पांढरें वस्त्र असावें. कोणत्याही मंत्राचा जप आपल्या हाताच्या बोटांच्या बारा पेऱ्यांनीं मोजून केला असतां चालतो. ही पेरी दक्षिणावर्त (दक्षिणेकडे फेरा येईल अशा रीतीनें) मोजावीत. अशा प्रकारे नऊ वेळां (एकशेहे आठ वेळां) जप केला असतां सर्वपातकांचा नाश होतो.

तर्जन्यङ्गुष्ठयोगेन विद्वेषोच्चाटने जपः ॥ ५ ॥
कनिष्ठाङ्गुष्ठकाभ्यां तु कर्म शत्रुविनाशने ॥
अङ्गुष्ठानामिकाभ्यां तु जपेदुत्तमकर्मणि ॥ ६ ॥

अर्थ— तर्जनी (आंगठ्याजवळचें बोट) आणि आंगठा ह्या दोन बोटांनी माळेंतील मणि ओढून जो जप करावयाचा, तो, शत्रूच्या उच्चाटनाचा जप करावा. ह्मणजे शत्रूच्या उच्चाटनाकरितां जेव्हां जप करावयाचा असेल तेव्हां तर्जनी आणि आंगठा ह्या दोन बोटांनी माळेंतील मणि ओढून जप करावा.

शेवटचें बोट आणि आंगठा ह्या दोन बोटांनीं शत्रूच्या नाशाबद्दलचा जप करावा. अनामिका (शेवटच्या बोटाच्या जवळचें बोट) आणि आंगठा ह्या दोन बोटांनीं सर्वप्रकारच्या शुभकर्मांत जप करावा. आणि आकर्षण करावयाच्या कर्मात आंगठा आणि मधलें बोट ह्या दोन बोटांनीं जप करावा.

आता माळेचे प्रकार सांगतात.

माला सुपञ्चवर्णानां रत्नानां सर्वकार्यदा ॥
स्तम्भने दुष्टसन्त्रासे जपेत् प्रस्तरकर्कराम् ॥ ७ ॥
शत्रूच्चाटे च रुद्राक्षा विद्वेषेऽरिष्टबीजजा ॥
स्फाटिकी सूत्रजा माला मोक्षार्थिनां तु निर्मला ॥ ८ ॥

अर्थ— काळा, निळा, पिवळा, पांढरा आणि तांबडा ह्या पांच रंगांच्या रत्नांची माला, सर्वकार्यांची सिद्धि करणारी समजावी. स्तंभन करावयाचें असल्यास, किंवा दुष्टाला त्रास द्यावयाचा असल्यास दगडाच्या खड्यांच्या योगानें जप करावा. शत्रूचें उच्चाटन करावयाचें असल्यास रुद्राक्षांची माला असावी. द्वेष उत्पन्न करावयाचा असल्यास अरिष्टबीजांची (रिठ्याची किंवा वाळंतलिंबाच्या बियांची) माला करावी. मोक्षाची इच्छा करणाऱ्यांनीं स्फटिकाची आणि सुतांत ओंवलेली माला करावी.

धर्मार्थकाममोक्षार्थी जपेद्वै पुत्रजीवजाम् ॥ शान्तये पुत्रलाभाय जपेदुत्पलमालिकाम् ॥ ९ ॥

अर्थ— धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या चारी पुरुषार्थांची इच्छा करणारानें पुत्रजीवाच्या मालेनें जप करावा. आणि शांतीकरितां आणि पुत्रप्राप्तीकरितां कमलाक्षाच्या मालेने जप करावा.

आता मंत्र सांगतात.

ॐ ह्राँ अर्हद्भ्यो नमः। ॐ ह्रीँ सिद्धेभ्यो नमः। ॐ ह्रूँ आचार्येभ्यो नमः। ॐ ह्रौं पाठकेभ्यो नमः। ॐ ह्रः सर्वसाधुभ्यो नमः॥ इति मुक्त्यर्थिनामाराधनमन्त्रः॥

हा मोक्षाची इच्छा करणाऱ्यांनी उपासना करण्याचा मंत्र समजावा.

ॐ ह्रां अर्हद्भ्यः स्वाहा। ॐ ह्रीं सिद्धेभ्यः स्वहा ॐ ह्रूं आचार्येभ्यः स्वाहा। इत्यादिर्होममंत्रः॥

हा होमाचा मंत्र समजावा.

ॐ ह्राँ अर्हद्भ्यः स्वधा। ओं ह्रीँ सिद्धेभ्यः स्वधा। इत्यादिः शान्तिकपौष्टिकमन्त्रः॥

हा शान्तिक पौष्टिक कर्माचा मंत्र समजावा.

ॐ ह्राँ अर्हद्भ्यो हूं फट्। ॐ ह्रीँ सिद्धेभ्यो हूं फट्। इत्यादिर्विद्वेषमंत्रः॥

हा शत्रूचा मंत्र समजावा.

ॐ ह्राँ अर्हद्भ्यो हूँ वषट्। ओं ह्रीँ सिद्धेभ्यो हूं वषट्। इत्याद्याकर्षणमन्त्रः॥

हा आकर्षणाचा मंत्र समजावा.

ॐ ऱ्हाँ अर्हद्भ्यो वषट्। ॐ ऱ्हीं सिद्धेभ्यो वषट्। इत्यादिर्वशीकरणमंत्रः ॥

हा मंत्र वशीकरणाचा होय असें समजावें.

ॐ ऱ्हाँ अर्हद्भ्यः ठ ठ। इत्यादिः स्तम्भनमन्त्रः ॥

हा स्तंभनाचा मंत्र समजावा.

ॐ ऱ्हाँ अर्हद्भ्यो घे घे। इति मारणमन्त्रः ॥

हा मारणाचा मंत्र समजावा. ( ह्या मंत्रांत व वरील मंत्रांत आरंभींचीं तेवढी वाक्यें दिलेलीं आहेत. पहिला जो मुक्तीचा मंत्र सांगितला आहे, त्यांत जितकीं वाक्यें आहेत, तितकीं वाक्यें प्रत्येक मंत्रात अवश्य असलीं पाहिजेत. त्याकरितां प्रत्येक मंत्रांत जी वाक्यें कमी असतील तीं पहिल्या मंत्रावरून जुळवून घेऊन, त्या पुढें त्या त्या कामनेच्या उद्देशानें जे पल्लव सांगितले आहेत ते लावावेत. ह्मणजे पूर्णमंत्र होईल. )

मंत्रजप करण्याचीं स्थानें सांगतात.

एकान्तस्थानके मन्त्रं मुक्त्यर्थं तु जपेच्छुचौ ॥
स्मशाने दुष्टकार्यार्थं शान्त्याद्यर्थो जिनालये ॥ १० ॥

अर्थ— मोक्षप्राप्तीकरता जो जप करावयाचा तो शुद्ध अशा एकांतस्थलीं करावा. दुष्ट कार्याकरितां जो

जप करावयाचा तो स्मशानात करावा. आणि शांतीकरितां जप करणाऱ्या मनुष्यानें तो जिनालयांत करावा.

श्रीसद्गुरूपदेशेन मंत्रोऽयं सत्फलप्रदः ॥ तस्मात्सामायिकं कार्यं नोचेन्मन्त्रमिमं जपेत् ॥ ११॥

अर्थ— ह्या मंत्राचा सद्गुरूनें उपदेश केल्यानें तो चांगलें फल देतो. ह्मणून ज्यांना सामायिक होत नसेल त्यांनीं ह्या ( पंचनमस्कारमंत्राचा ) जप करावा.

आकृष्टिं सुरसम्पदां विदधती मुक्तिश्रियो वश्यता- ।
मुच्चाटं विपदां चतुर्गतिभुवां विद्वेषमात्मैनसाम् ॥
स्तम्भं दुर्गमनं प्रति प्रतिदिनं मोहस्य संमोहनं ।
पायात्पञ्चनमस्क्रियाऽक्षरमयी साऽऽराधनादेवता ॥ १२ ॥

अर्थ— देवांच्या संपत्तीचें आकर्षण करणारी, मुक्तिश्रीला वश करून देणारी, नरकादि चार गतीमध्यें उत्पन्न होणाऱ्या दुःखाचें उच्चाटण करणारी, आत्म्याच्या पापांचा द्वेष करणारी, प्रतिदिवशीं दुराचाराचें स्तंभन करणारी, मोहाचा संमोहन करणारी अशी अक्षरात्मक पंचनमस्काररूपी ती उपास्य देवता आमचें रक्षण करो. असें ह्मणावें.

तत. समुत्थाय जिनेन्द्रबिम्बं । पश्येत्परं मङ्गलदानदक्षम् ॥
पापप्रणाशं परपुण्यहेतुं । सुरासुरैः सेवितपादपद्मम् ॥ १३ ॥

अर्थ—नंतर उठून-सर्व पातकांचा नाश करणारें, पुण्यप्राप्तीला साधनीभूत असलेलें, देवदानव ह्यांनी ज्याच्या पादकमलांची सेवा केली आहे असें व मंगलप्रद असें जें—जिनबिंब, त्याचें दर्शन करावें. आणि पुढें लिहिल्याप्रमाणें प्रार्थना करावी.

प्रातःकाळीं जिनबिंबाचे दर्शन करण्याची स्तुति

सुप्तोत्थितेन सुमुखेन सुमङ्गलाय। द्रष्टव्यमस्ति यदि मङ्गलमेव वस्तु ॥
अन्येन किं तदिह नाथ तवैव वक्त्रं। त्रैलोक्यमङ्गलनिकेतनमीक्षणीयम् ॥ १४ ॥

अर्थ— प्रातःकाळीं निजून उठलेल्या मनुष्यानें मंगलकारक वस्तूच जर पहावयाची असेल, तर, हे भगवन्! सर्व जगांच्या मंगलाचें स्थान असें तुझें मुखच पहाणें योग्य आहे. दुसऱ्या वस्तु पाहून काय उपयोग आहे? कांही नाहीं.

श्रीलीलायतनं महीकुलगृहं कीर्तिप्रमोदास्पदं।
वाग्देवीरतिकेतनं जयरमाक्रीडानिधानं महत् ॥
स स्यात्सर्वमहोत्सवैकभवनं यः प्रार्थितार्थप्रदं।
प्रातः पश्यति कल्पपादपदलच्छायं जिनांघ्रिद्वयम् ॥ १५ ॥

अर्थ— जो मनुष्य प्रातःकाळीं—कल्पवृक्षाच्या कोमल पल्लवाप्रमाणें रक्तवर्ण अशा व इच्छितफलाची प्राप्ति

करून देणाऱ्या अशा श्रीजिनेंद्राच्या चरणद्वंद्वाचें दर्शन करील, तो लक्ष्मीचें क्रीडास्थान होईल. संपूर्ण पृथ्वीचें वंशपरंपरेनें रहाण्याचें घरच असा (ज्याच्या वंशपरंपरेनें पृथ्वीपतित्वाचा अधिकार चालेल असा) होईल कीर्तीच्या आनंदाची जागा होईल. वाग्देवतेचें क्रीडामंदिर होईल. जयलक्ष्मीच्या करमणुकीचें चांगलें साधनच की काय असा होईल. आणि सर्व महोत्सवांचें घरच की काय? असा होईल.

धन्यः स एव पुरुषः समतायुतो यः। प्रातः प्रपश्यति जिनेन्द्रमुखारविन्दम् ॥
पूजासुदानतपसि स्पृहणीयचित्त-। स्सेव्यः सदस्तु नृसुरैर्मुनिसोमसेनैः ॥ ११९ ॥

अर्थ— सर्वा समबुद्धीनें युक्त असलेला असा जो मनुष्य, प्रातःकालीं श्रीजिनेंद्राच्या मुखकमलाचें दर्शन करतो, तो, पूजा, दान आणि तप ह्यांविषयीं ज्याच्या मनाचें सर्वांना अनुकरण करावेंसें वाटत आहे असा तोच पुरुष धन्य होय. आणि तो मनुष्यातील देव असे जे सोमसेन मुनि, त्यांनी सेवा करण्यास योग्य आहे. तात्पर्य, त्याची सोमसेनमुनि सेवा करतील.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपणे भट्टारकश्रीसोमसेनविरचिते सामायिकाध्याय प्रथम ॥

पहिला अध्याय समाप्त.

---

॥ श्रीवीतरागाय नम ॥

## ॥ द्वितीयाध्यायप्रारम्भः ॥

शान्तिनाथं जिनं नत्वा पापशान्तिविधायकम् ॥
वक्ष्येऽधुना त्रिवर्णानां शौचाचारक्रियाक्रमम् ॥ १ ॥

अर्थ— सर्वपातकांचा नाश करणाऱ्या श्रीशांतिनाथाला नमस्कार करून, त्रैवर्णिकांच्या शुद्धतेच्या क्रियेचा क्रम आतां सांगतों.

शौचेन सँस्कृतो देहः संयमार्थं भवेत्परम् ॥
विना शौचं तपो नास्ति विशिष्टान्वयजे नरि ॥ २ ॥

अर्थ— शुद्धतेनें संस्कार केलेला ( शुद्ध केलेला देह ) संयमाला चांगला साधनीभूत होतो. म्हणून, ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या तीन वंशांत जन्मलेल्या पुरुषास शुद्धतेवांचून तपाची प्राप्ति होत नाहीं.

संस्कृता शोभना भूमिर्बीजानां सत्फलप्रदा ॥
कारणे सति कार्यं स्यात्कारणस्यानुसारतः ॥ ३ ॥

अर्थ— नांगरणें वगैरे क्रियांच्या योगाने संस्कार केलेली चांगली जमीन, चांगले पीक देते.

सूतकाद्यघशुध्दिश्च बाह्यशुध्दिरिति स्मृता ॥ १० ॥

अर्थ— स्नान, आचमन आणि धुतलेलें वस्त्र ही शरीराची शुद्धता (बाह्यशुध्दि) करणारी आहेत. सूतकादिपापापासून जी शुध्दि–ह्मणजे सूतकादिपातकांची जी निवृत्ति–ती बाह्यशुद्धि असें समजावें.

आचारः प्रथमो धर्मः सर्वेषां धर्मिणां मते ॥
गर्भाधानादिभेदैश्च बहुधा स समुच्यते ॥ ११ ॥

अर्थ— सर्व धार्मिकांच्या मतांत आचार हाच मुख्य धर्म मानिला आहे. तो आचार गर्भाधान वगैरे अनेक भेदांनीं धर्मग्रंथांत सांगितला आहे.

कार्यविचार.

पूर्वोक्तविधिना कृत्वा सामायिकादिसत्क्रियाम् ॥
गृहकार्यं तथा चित्ते चिन्तनीयं गृहस्थकैः ॥ १२ ॥

अर्थ— पूर्वीं सांगितलेल्या विधीनें सामायिक वगैरे क्रिया करून गृहस्थश्रावकांनीं आपल्या घरांतील कृत्यांचा ( आज काय करावयाचें त्याचा ) विचार करावा.

कालं देहं स्थित देशं शत्रुं मित्रं परिग्रहम् ॥
आयं व्ययं धनं वृत्तिं धर्मं दानादिकं स्मरेत् ॥ १३ ॥

अर्थ— त्यांत आपला काल, आपलें शरीर, आपला रहाण्याचा देश, आपला शत्रु, आपला मित्र, आपला परिवार, आपली प्राप्ति, आपला खर्च, आपलें द्रव्य, आपली जीविका, आपला धर्म आणि आपण करावयाचें दान वगैरे गोष्टीचा विचार करावा.

तथाऽपराह्णपर्यन्तं प्राह्णादारभ्य तद्दिने ॥
यत्कर्तव्य विशेषेण तद्धीत हृदि स्फुटम् ॥ १४ ॥

अर्थ— तसेंच त्या दिवशी सकाळपासून दोनप्रहरपर्यंत करावयाचें जें आपलें मुख्य कर्तव्य असेल तेंही मनांत आणावें.

वहिर्दिशागमन.

समतास्थानकं त्यक्त्वा गृहीत्वा पूर्ववस्त्रकम् ॥
सर्ववस्त्रं विना वस्त्रे धातव्ये चाधरोत्तरे ॥ १५ ॥

अर्थ— मग सामायिक ज्या ठिकाणी केलें ती जागा सोडावी, आणि पूर्वींची वस्त्रें धारण करावीं. त्यांत अंगरखा, रुमाल, वगैरे न घेतां फक्त नेसावयाचें व पांघरावयाचें अशी दोनच वस्त्रें घ्यावीं.

नमः सिध्देभ्य इत्युक्त्वा नासास्वरानुसारतः ॥
अग्रपाद पुरो दत्वा शनैर्गच्छेज्जिनं स्मरन् ॥ १६ ॥

अर्थ—नंतर 'नमः सिध्देभ्यः' असें ह्मणून नाकांतील ज्या बाजूनें श्वास वहात असेल तो पाय प्रथम पुढें टाकून जिनेंद्रांचें स्मरण करीत हळू हळू गमन करावें.

ग्राहयित्वा गृहीत्वा वा कर्पूरं कुङ्कुमं तथा ॥
उशीरं चन्दनं दूर्वादर्भाक्षत तिलांस्तथा ॥ १७ ॥
पश्यन्नीर्यापथं मार्गे व्रजेदेवाप्रमत्तकः ॥
चाण्डालसूतकादीनां स्पर्शन परिवर्जयेत् ॥ १८ ॥

अर्थ— कापूर, केशर, वाळा, चंदन, दूर्वा, दर्भ अक्षता आणि तिल हे पदार्थ दुसऱ्याजवळ देऊन अथवा आपण घेऊन, जावयाच्या मार्गाकडे नीट लक्षपूर्वक पहात गमन करावें. जातांना चांडाल, सूतकी वगैरेंचा स्पर्श आपल्यास होऊं देऊं नये.

मलमूत्रोत्मर्गस्थान

दूरदेशे सहागूढे जीवकीटविवर्जिते ॥
प्रासुके चापि विस्तीर्णे लोकदर्शनदूरगे ॥ १९ ॥
भूतप्रेतपिशाचादियक्षलौकिकदेवता- ।
पूजास्थानं परित्यज्य तूत्सृजेन्मलमूलकम् ॥ २० ॥

अर्थ— ह्याप्रमाणें गांवापासून लांब जाऊन, गुप्त ठिकाणी जेथें जीवजंतु किडे वगैरे नाहीत अशा कोरड्या व विस्तीर्ण जागी लोकांना आपण दिसणार नाही अशा ठिकाणीं—भूतें, प्रेतें, पिशाच, यक्ष, ग्रामदेवता वगैरेंच्या पूजनाचें स्थळ सोडून—मलमूत्रांचें विसर्जन करावें.

दशहस्तं परित्यज्य मूत्रं कुर्याज्जलाशये ॥
शतहस्तं पुरीषं तु नदीतीरे चतुर्गुणम् ॥ २१ ॥

अर्थ— एखाद्या तळ्याजवळ जर मूत्रोत्सर्गास बसण्याचा प्रसंग येईल, तर, त्या तळ्यापासून दहा हात जागा टाकून पलीकडे बसावें. आणि शौचास बसण्याचा प्रसंग आल्यास शंभर हात जागा टाकून बसावें. हाच प्रकार नदीच्या तीरावर करण्याचा प्रसंग आल्यास चौपट (मूत्रास चाळीस हात व शौचास चारशेहे हात) जागा टाकून बसावें.

शौचनिषिद्धस्थान

हलकृष्टे जले चित्यां वल्मीके गिरिमस्तके ॥
देवालये नदीतीरे दर्भपुष्पेषु शाद्वले ॥ २२ ॥
कूलच्छायासु वृक्षेषु मार्गे गोष्ठाम्बुभस्मसु ॥
अग्नौ च गच्छन् तिष्ठंश्च विष्ठां मूत्रं च नोत्सृजेत् ॥ २३ ॥

अर्थ— नांगरलेली जमीन, पाण्याची जागा, वारुळ, डोंगराचा माथा, देवालय, नदीचें तीर, दर्भाची व फुलांची जागा, गवत उगवलेली जागा, नदीतीरावरील सांवलीची जागा, वृक्षांच्या खालची जागा, जनावरांचा गोठा, पाणी, भस्माचे ठिकाण आणि अग्नि इतक्या ठिकाणी मूत्र व मल ह्यांचे विसर्जन करूं नये. तसेंच चालतां चालतां, किंवा उभ्यानें करूं नये.

अनुदके धौतवस्त्रे अक्षरलिपिसन्निधौ ॥
स्नात्वा कच्छान्वितो भुक्त्वा मलमूत्रे च नोत्सृजेत् ॥ २४ ॥

अर्थ— पाणी नसतांना, धुतलेलें वस्त्र नेसले असतां, पुस्तक किंवा दुसरें कांहीं लिहिलेलें जवळ असतां, मलमूत्रांचें विसर्जन करूं नये. तसेंच स्नान केल्यावर करूं नये. कासोटा घालून करूं नये आणि भोजन झाल्यावर करू नये.

अग्न्यर्कविधुगोसूर्यदीपसन्ध्याम्बुयोगिनः ॥
पश्यन्नभिमुखश्चैतान् विष्ठां मूत्रं च नोत्सृजेत् ॥ २५ ॥

अर्थ— अग्नि, सूर्य, चंद्र, गाय, दीप, पाणी आणि योगी ह्यांच्याकडे तोंड करून मलमूत्रांचें विसर्जन करूं नये. आणि संध्याकाळी पश्चिमेकडे तोंड करून करूं नये.

अरण्येऽनुदके रात्रौ चोरव्याघ्राकुले पथि ॥ सकृन्मूत्रपुरीषे द्रव्यहस्तो न दुष्यति ॥ २६ ॥

अर्थ— ज्या अरण्यांत पाणी नाहीं तेथें, रात्री आणि ज्या रस्त्यांत चोरांचा व वाघ वगैरे क्रूर पशूंचा उपद्रव असेल तेथें मलमूत्रांचें विसर्जन करूं नये. मलमूत्रांचा वेग अनावर झाला असतां उदक नसल्यास (द्रव्यहस्तो न दुष्यति (?)) कांहींतरी धातुमय पदार्थ हातांत घेऊन मलमूत्रोत्सर्ग केला असतां दोष नाहीं.

**कृत्वा यज्ञोपवीतं च पृष्ठतः कण्ठलम्बितम् ॥ विण्मूत्रे तु गृही कुर्याद्वामकर्णे व्रतान्वितः ॥ २७ ॥**

अर्थ— गृहस्थ श्रावकानें मूलाच्या व शौचाच्या वेळीं यज्ञोपवीत गळ्यांतून पाठीवर लोंबत सोडावें. आणि व्रती श्रावकानें डाव्या कानावर ठेवावें. दोघांनीही गळ्यांतून काढूं नये.

**मूत्रे तु दक्षिणे कर्णे पुरीषे वामकर्णके ॥ धारयेद्ब्रह्मसूत्रं तु मैथुने मस्तके तथा ॥ २८ ॥**

अर्थ— किंवा गृहस्थ श्रावकानें मूत्राच्या वेळीं यज्ञोपवीत उजव्या कानावर ठेवावें, आणि शौचाच्या वेळीं डाव्या कानावर ठेवावें. तसेंच मैथुनाच्या वेळीं डोक्यावर ठेवावें.

**अन्तर्धाय तृणैर्भूमिं शिरः प्रावृत्य वाससा ॥ वाचं नियम्य यत्नेन ष्ठीवनोच्छ्वासवर्जितः ॥ २९ ॥**
**कृत्वा समौ पादपृष्ठौ मलमूत्रे समुत्सृजेत् ॥ अन्यथा कुरुते यस्तु यमं पश्यति न गृही ॥ ३० ॥**

अर्थ— मलमूत्रांच्या विसर्जनाच्या वेळीं, ज्या जागीं मलमूत्रांचें विसर्जन करावयाचें असेल ती जागा गवतानें आच्छादित करून, मस्तकाला वस्त्र गुंडाळावें. आणि न बोलतां, श्वासोच्छ्वास न करतां न थुंकतां मलमूत्र विसर्जन करावें. तसेंच त्यावेळीं दोनी पावलें सारखीं असावीत; मागें पुढें असूं नयेत.

असें जो न करील तो संयम जाणत नाहीं असें समजावें.

**प्रभाते मैथुने चैव प्रस्रावे दन्तधावने ॥ स्नाने च भोजने वान्त्यां सप्त मौनं विधीयते ॥३१॥**

अर्थ— प्रात काली, मैथुनाच्या वेळी, मूत्र व शौच करीत असतां, दांत घांसत असतां, स्नानाच्या वेळी, भोजनाच्या प्रसंगी आणि वांति होत असतां ह्या सात प्रसंगांत मौन धारण करावें.

**काष्टादिनाऽप्यपानस्थममेध्यं निर्मृजीत च ॥ कन्दमूलफलाङ्गारैर्नामेध्यं निर्मृजीत च ॥ ३२ ॥**

अर्थ— गुदद्वाराला लागलेली घाण वाळलेल्या लांकडानें किंवा दुसऱ्या कशाने तरी काढावी. कंद, मुळें व फळें ह्यांच्या योगानें ती घाण काढूं नये.

शौचास बसावयाच्या आधीं क्षेत्रपालाची प्रार्थना करावी लागते त्याचा मंत्र सांगतात—

**ॐ ऱ्हीं अत्र क्षेत्रपाल क्षमस्व, मां मनुजं जानीहि, स्थानादस्मात्प्रयाहि, अहं पुरीषोत्सर्गं करोमीति स्वाहा ॥**

अर्थ— ह्या ठिकाणीं असलेल्या क्षेत्रपाला! मला क्षमा कर! मला तूं मनुष्य आहे असें समज आणि ह्या स्थलापासून तूं निघून जा. मी मलाचा त्याग करतों.

**क्षेत्रपालाज्ञया क्षेत्रे पूर्वास्यो वोत्तरामुखः ॥ शिरःप्रदेशे कर्णे वा धृतयज्ञोपवीतकः ॥ ३३ ॥**

**पूर्वादिदिक्षु निक्षिप्तदृष्टिरूर्ध्वमधोऽपि वा ॥ मन्दतालोभतृष्णासु चित्संस्मरन्मलं सृजेत् ॥३४॥**

मन्दतामतिराभस्यमन्यचित्तत्वमुत्सृजेत् ॥ इति पाठः साधीयान् ॥

अर्थ— ह्याप्रमाणें क्षेत्रपालाची प्रार्थना करून त्याच्या आज्ञेनें-पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे तोंड करून, मस्तकावर किंवा कानावर यज्ञोपवीत ठेवून, वर, खालीं आणि चोहीकडे पाहून शौचास वसावें. शौचाच्या वेळीं वेग आवरून धरून कमी करूं नये. व वेग अधिकही करूं नये. तसेंच मनांत भलत्याच विषयाचें चिंतन करूं नये. ह्या रीतीनें मलोत्सर्ग करावा.

ततो वामकराङ्गुष्ठान्नङ्गुलिद्वितयेन वै ॥ शिश्नस्याग्रं गृहीत्वैवं किञ्चिद्दूरं व्रजेद्गृही ॥ ३५ ॥

अर्थ— नंतर डाव्या हाताचा अंगठा व त्याच्या जवळचें बोट ह्या दोन बोटांनी जननेंद्रियाचें अग्र धरून शौचास वसलेल्या जाग्यापासून थोडे अंतरावर जावें.

प्रासुकं जलमादाय चोपविश्य यथोचितम् । जानुद्वयस्य मध्ये तु करौ न्यस्याचरेच्छुचिम् ॥३६

अर्थ— नंतर ज्यांत जंतु नाहीत असें पाणी घेऊन, खालीं वसून आणि दोन्हीं गुडघ्यांच्या आंत दोनी हात घेऊन योग्य प्रकारें गुदप्रक्षालन करावें.

तीर्थे शौचं न कर्तव्यं कुर्वीतोद्धृतवारिणा ॥ गालितेन पवित्रेण कुर्याच्छौचमनुद्धतः ॥ ३७ ॥

अर्थ— तीर्थात गुदप्रक्षालन करूं नये. पाणी भांड्यानें काढून तें गाळून त्या पवित्र जलानें गुदप्रक्षालन करावें.

जलपात्रं ज्येष्ठहस्ते वामहस्तेन शौचकम् ॥
पुनः प्रक्षाल्य हस्तं तं पुनः शौचं विधीयते ॥ ३८ ॥

अर्थ— उजव्या हातांत पाण्याचें भांडें घेऊन डाव्या हाताने गुदद्वार धुवावे. असें एकवार झालें म्हणजे पुनः तो हात धुवून टाकून पुनः गुदद्वार धुवावें.

शौचं च द्विविधं प्रोक्तं बाह्यमाभ्यंतरं तथा ॥
मृज्जलाभ्यां स्मृतं बाह्यं भावशुद्ध्या तथाऽन्तरम् ॥ ३९ ॥

अर्थ— बाह्य शुद्धि आणि अभ्यंतरशुद्धि अशी शुद्धि दोन प्रकारची आहे. त्यांपैकीं माती आणि पाणी ह्यांच्या योगानें बाह्यशुद्धि होते. आणि आत्म्याच्या परिणामांच्या शुद्धीनें अंतःशुद्धि होते.

अपवित्रः पवित्रो वा सुस्थितो दुस्थितोऽपि वा ॥ ध्यायेत्पञ्चनमस्कारं सर्वपापैः प्रमुच्यते ॥४०॥

अर्थ— मनुष्य अपवित्र असो अथवा पवित्र असो, चांगल्या स्थितीत असो अथवा वाईट स्थितींत असो, पंचनमस्कार मंत्राचें चिंतन केल्यानें तो सर्वपातकापासून मुक्त होतो.

अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ॥ यः स्मरेत्परमात्मानं स बाह्याभ्यन्तरं शुचिः ॥४१

अर्थ— तसेंच मनुष्य पवित्र, अपवित्र किंवा कोणत्याही स्थितींतील जरी असला तथापि परात्म्याचें चिंतन केलें असतां, तो बाह्यशुद्धि आणि अंतःशुद्धि ह्या दोहींस प्राप्त होतो.

आता बाह्यशुद्धि सांगतात

**चुलकं वारिणा पूर्णं मृत्स्नांशकैः ससभिः ॥ हस्तेनैकेन हस्तस्यैकस्य शौचं पुनःपुनः ॥ ४२ ॥**

अर्थ— पाण्यानें चुळा भरून टाकाव्या. आणि मातीचे सात गोळे घेऊन ते एका हातानें दुसऱ्या हातास लावावे. ह्याप्रमाणें पुनःपुनः करावें.

**त्रिवारमेवमाशौच्य द्वौ करौ क्षालयेत्ततः ॥ कटिस्नानं जलैः कृत्वा पादौ प्रक्षालयेत्तत ॥४३॥**

अर्थ— ह्याप्रमाणें तीन वेळ हातांची शुद्धि करून मग हात धुवून टाकावेत. मग पाण्यानें कंबरेपर्यंत स्नान करून नंतर पाय धुवावेत.

**मृच्छुभ्रवर्णा विप्रस्य क्षत्रिये रक्तमृत्तिका ॥ वैश्यस्य पीतवर्णा तु शूद्रस्य कृष्णमृत्तिका ॥ ४४ ॥**

अर्थ— ब्राह्मणानें पांढरी माती घ्यावी, क्षत्रियानें तांबडी माती घ्यावी, वैश्यानें पिवळी आणि शूद्रानें काळी माती घ्यावी.

निषिद्धमृत्तिका

**अन्तर्गृहे देवगृहे वल्मीके मूपकस्थले ॥ कृतशौचावशेषे च न ग्राह्याः पञ्चमृत्तिकाः ॥ ४५ ॥**

अर्थ— मध्यगृह, देवगृह, वारुळ, उंदराचें बीळ आणि शौचाची जागा ह्या पांच ठिकाणची माती घेऊं नये.

**मलमूत्रसमीपे च वृक्षमूलस्थिता च या ॥ वापीकूपतडागस्था न ग्राह्याः पञ्च मृत्तिकाः ॥ ४६ ॥**

अर्थ— मलमूत्रांच्या विसर्जनाची जागा, वृक्षाचें मूळ, विहीर, आड आणि तळें ह्या पांच ठिकाणांतील माती घेऊं नये.

मार्गोपरस्मशानस्थां पांसुलां मतिमॉस्त्यजेत् ॥
कीटाङ्गारास्थिसंयुक्ता नाहरेत्कर्करान्विताः ॥ ४७ ॥

अर्थ— जाण्यायेण्याचा रस्ता व स्मशान ह्यांतील माती घेऊं नये. धुरळ्याची माती घेऊं नये. किडे, अग्नि आणि हाडें ह्यांनीं युक्त असलेली माती व खडे असलेली माती घेऊं नये.

ग्राह्यमृत्तिका

आहरेन्मृत्तिकां गेही स्थलीसरित्कूलयोः ॥ शुध्दक्षेत्रस्य मध्यस्थां तथा प्रासुकखानिजाम् ॥४८॥

अर्थ— गृहस्थ श्रावकानें, चोपून साफ न केलेल्या जाग्यांतील माती घ्यावी. किंवा नदीचें तीर, स्वच्छ असलेलें शेत, किंवा जींत जीवजंतु नाहीं अशी खाण ह्यांतील माती घ्यावी.

अलाभे मृदस्तूक्ताया यस्मिन्देशे तु या भवेत् ॥ तया शौचं प्रकुर्वीत गृही मृत्तिकयाऽपि च ॥४९॥

अर्थ— वर सांगितलेल्या तऱ्हेची माती जर न मिळेल तर, ज्या देशांत जसली माती मिळेल तसल्या मातीनें गृहस्थ श्रावकानें आपली शुद्धि करावी.

मृत्तिकेचें प्रमाण

अर्धबिल्वफलमात्रा प्रथमा मृत्तिका स्मृता ॥
द्वितीया तु तृतीया तु तदर्धार्धा प्रकीर्तिता ॥ ५० ॥

अर्थ— वर जे मातीचे सात गोळे सांगितले आहेत त्यापैकीं पहिला गोळा अर्ध्या बेलफळ एवढा करावा. दुसरा त्याच्या निम्म्यानें असावा. तिसरा त्याच्या (दुसऱ्याच्या) निम्मा असावा. ह्याप्रमाणें प्रमाणाचे गोळे असावेत.

एका लिङ्गे करे तिस्र उभयं पादयुग्मके ॥ पञ्चापाने नखे सप्त सर्वाङ्गे ह्येक एव च ॥ ५१ ॥

अर्थ— लिंगाला एक गोळा, हाताला तीन गोळे, पायाला दोन गोळे, गुदद्वाराला पांच गोळे, नखाला सात गोळे आणि सर्वांगाला एक गोळा ह्याप्रमाणें लावावेत.

यद्दिवा विहितं शौचं तदर्धं निशि कीर्तितम् ॥ तदर्धमातुरे प्रोक्तं आतुरस्यार्धमध्वनि ॥ ५२ ॥

अर्थ— दिवसा जितके वेळां मृत्तिका लावावयास सांगितली आहे, त्याच्या निम्म्यानें रात्रीं लावावी. रोग्याला रात्रीं लावावयाच्या निम्म्यानें लावावी. आणि मार्गांत असतांना रोग्याला लावावयाच्या निम्म्याने लावावी.

स्त्रीशूद्रादेरशक्तानां बालानां चोपवीतिनाम् ॥
गन्धलेपादिकं कार्यं शौचं प्रोक्तं महर्षिभिः ॥ ५३ ॥

. अर्थ— स्त्रिया, शूद्र, अशक्त मनुष्यें, लहान मुलें आणि मौंजीबंधन झालेली मुलें ह्यांनी शुद्धतेकरितां गंधलेपन करावें असें शास्त्रकार मुनींनी सांगितलें आहे.

शौचे यत्नः सदा कार्यः शौचमूलो गृही स्मृतः ॥
शौचाचारविहीनस्य समस्ता निष्फलाः क्रियाः ॥ ५४ ॥

अर्थ— गृहस्थश्रावकानें अंतर्बाह्यशुद्धतेविषयीं सर्वदा प्रयत्न करावा. कारण, अंतर्बाह्यशुद्धता हेंच गृहस्थपणाचें मुख्य साधन आहे. आणि शुध्दता आणि सदाचार ह्यांनीं रहित असलेल्या मनुष्याच्या सर्व धार्मिक क्रिया निष्फल होतात.

हृदने द्विगुण मूत्रान्मैथुने त्रिगुणं भवेत् ॥ निद्रायां वीर्यपाते च यथायोग्यं समाचरेत् ॥५५॥

अर्थ— मूत्रविसर्गास जितके वेळां शुद्धता करावयाची त्याच्या दुप्पट शौचाच्या प्रसंगीं शुद्धता करावी. मैथुनाच्या वेळीं तिप्पट करावी. आणि झोंपेंत स्वप्नावस्थेंत वीर्यपात झाला असतां योग्यप्रकारें शुद्धता करावी.

पादपृष्ठे पादतले तिस्रास्तिस्रश्च मृत्तिकाः ॥ एकैकया मृदा पादौ हस्तौ प्रक्षालयेत्तदा ॥ ५६ ॥

अर्थ— पावलांच्या वरच्या बाजूस व खालच्या बाजूस ह्मणजे तळव्यास तीन तीन वेळ मृत्तिका लावावी. त्यांत प्रत्येक वेळीं मृत्तिका लावल्यावर हात पाय धुवावेत.

वामं प्रक्षालयेत्पादं शूद्रादेर्वा कथञ्चन ॥ शौचादृते वामपादं पश्चाद्दक्षिणमेव च ॥ ५७ ॥

अर्थ— डावा पाय प्रथम धुवावा, आणि नंतर उजवा पाय धुवावा. शूद्रादिकानी कसेंही केलें असतां चालतें. तथापि त्यांनी देखील शौचास जाऊन आलेल्या वेळेवाचून इतर प्रसंगी डावा पायच प्रथम धुवावा; आणि मागून उजवा पाय धुवावा.

॥ इति शौचविधिः ॥

आता दंतधावनाचा ( दात घासण्याचा ) विधि सांगतात—

किञ्चिद्दूरं ततो गत्वा वासित्वा निर्मले जले ॥ पाणिपादौ च प्रक्षाल्य मुखधावनमाचरेत ॥ ५८ ॥

अर्थ— नंतर तेथून थोडें लांव जाऊन स्वच्छ पाण्यांत उभे रहावें. आणि हातपाय धुवून नंतर तोंड धुवावें.

ॐ नमोऽर्हते भगवते सुरेन्द्रमुकुटरत्नप्रभाप्रक्षालितपादपद्माय अहमेव शुद्धोदकेन पादप्रक्षालनं करोमि स्वाहा ॥ १ ॥ अनेनावशिष्टेन मृदंशेन पादौ प्रक्षालयेत् ॥

अर्थ—नंतर-"ॐ नमोऽर्हते भगवते" इत्यादि-वर लिहीलेला मंत्र ह्मणून पूर्वी खर्चून राहिलेली मृत्तिका पायास लावून पाय धुवावेत.

ॐ ह्रीँ ह्रौँ असुझुर असुझुर सुकुरु भव तथा हस्तशुद्धिं करोमि स्वाहा ॥ २ ॥ अनेन जलेन हस्तप्रक्षालनम् ॥

अर्थ— नंतर-"ॐ ह्रीँ ह्रौँ" इत्यादिक-मंत्र ह्मणून पाण्यानें हात धुवावेत.

अर्थ— चुळा भरून टाकावयाच्या त्या आपल्यापासून दूर अंतरावर टाकाव्या. नंतर पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे तोंड करून दोन वेळां आचमन करावें. मग मौन धरून पुण्यकाष्ठानें (ती काष्टें पुढें सांगतात.) दांत घांसावेत. याप्रमाणें न केल्यास तोंड पारोसें राहिल्यानें गृहस्थश्रावक अशुद्ध होतो.

दंतधावनास निषिद्ध काष्टें.

खदिरश्च कारञ्जश्च कदम्बश्च वटस्तथा ॥ तित्तिणी वेणुवृक्षश्च निम्ब आम्रस्तथैव च ॥ ६३ ॥
अपामार्गश्च विल्वश्च ह्यर्क आमलकस्तथा ॥ एते प्रशस्ताः कथिता दन्तधावनकर्मणि ॥ ६४ ॥

अर्थ— खदिर, करंज, कदंब, चिंच, वेळू, लिंब, आंबा, अघाडा, बेल, रुई आणि आंवळा या वृक्षांच्या काड्या दांत घांसण्यास उत्तम समजाव्यात.

समिधां क्षीरवृक्षस्य प्रमाणं द्वादशाङ्गुलम् ॥ कनिष्ठिकासमस्थूलं पूर्वार्द्धेन त्रिकल्कृते (?) ॥६५॥

अर्थ— किंवा वडाची बारीक फांदी घ्यावी. दांत घांसण्यास घ्यावयाची काडी बारा बोटें लांब व करंगळी एवढी जाड अशी असावी.

आता दंतधावनास निषिद्ध काष्टें व निषिध्द दिवस सांगतात—

गुवाकतालहिन्तालकेतक्यश्च महावटः ॥ खर्जूरी नालिकेरश्च ससैते तृणराजकाः ॥ ६६ ॥
तृणराजसमोपेतो यः कुर्याद्दन्तधावनम् ॥ निर्दयः पापभागी स्यादनन्तकायिकं त्यजेत् ॥ ६७ ॥

अर्थ— सुपारी, ताड, हिताड, केवडा, महावट (?) खजूर आणि नारळ ह्या सात झाडांना तृणराज असें नांव आहे. ह्या तृणराजांच्या काड्यांनीं जो दंतधावन करतो, तो निर्दय आणि पापी होतो. ह्मणून ह्या झाडांच्या काड्या दंतधावनास घेऊं नयेत. कारण ही काष्ठें अनंतकायिक जीव आहेत.

द्वितीया पञ्चमी चैव ह्यष्टम्येकादशी तथा ॥ चतुर्दशी तथैतासु दन्तधावं च नाचरेत् ॥ ६८ ॥
अर्कवारे व्यतीपाते संक्रान्तौ जन्मवासरे ॥ वर्जयेद्दन्तकाष्ठं तु व्रतादीनां दिनेषु च ॥ ६९ ॥

अर्थ— द्वितीया, पंचमी, अष्टमी, एकादशी आणि चतुर्दशी ह्या तिथीस दंतधावन करूं नये. तसेंच रविवार, व्यतीपात असलेला दिवस, संक्रांतीचा दिवस, आपला जन्मदिवस आणि व्रतांचा दिवस ह्या दिवशीं दंतधावन करूं नये.

तृणपर्णैः सदा कुर्यादेकां चतुर्दशीं विना ॥ तस्यामपि च कर्तव्यं शुष्ककाष्ठैर्जिनार्चने ॥ ७० ॥

अर्थ— गवत आणि झाडांचीं पानें ह्यांच्या योगानें चतुर्दशीवाचून बाकी सर्व दिवशीं दंतधावन करावें. चतुर्दशीच्या दिवशीं देखील जर जिनपूजा करावयाची असेल तर वाळलेल्या काड्यांनीं दंतधावन करावें. [ ह्यावरून बाकीच्या ( निषिद्ध नसलेल्या दिवशीं ) दंतधावनास ज्या काड्या घ्यावयाच्या त्या ओल्या असाव्यात, असें सिद्ध होतें. ]

सहस्रांशावनुदिते यः कुर्याद्दन्तधावनम् ॥ स पापी नरकं याति सर्वजीवदयातिगः ॥ ७१ ॥

अर्थ— सूर्योदय होण्याच्या पूर्वी जो दंतधावन करतो, तो पापी होतो. व निर्दय होऊन मरण पावतो.

अङ्गारवालुकाभिश्च भस्मादिनखरैस्तथा ॥ इष्टकालोष्ठपाषाणैर्न कुर्याद्दन्तधावनम् ॥ ७२ ॥

अर्थ— कोळसा, वाळू, भस्म, नखें, वीट, ढेंकूळ आणि दगड ह्यांनी दंतधावन करू नये.

अलाभे दन्तकाष्ठानां निषिध्दायां तिथावपि ॥ अपां द्वादशगण्डूषैर्मुखशुद्धिः प्रजायते ॥७३॥

अर्थ— दंतधावनास अवश्य अशी वर सांगितलेली काष्ठें जर न मिळाली, तर, पाण्याच्या बारा चुळा भरून टाकाव्यात; ह्मणजे शुद्धि होते हा प्रकार निषिद्ध दिवशीही करावा.

नेत्रयोर्नासिकायाश्च कर्णयोर्विवराणि च ॥ नखान् स्कन्धौ च कक्षादि शोधयेदम्भसा नरः॥७४॥

अर्थ— डोळे, नाक, कान, नखे, खांदे आणि काखा हे अवयव पाण्यानें स्वच्छ करावेत.

जलाशये न कर्तव्यं निष्ठीवं मुखधावनम् ॥
किञ्चिद्दूरेऽपि तीरस्य पुनर्नायाति तद्यथा ॥ ७५ ॥

अर्थ— जलाशयांत थुंकूं नये व तोंडही धुवूं नये. तीरावरून थोडें दूर जाऊन चूळ भरून टाकलेलें पाणी ज्या तऱ्हेनें पुनः जलाशयांत येणार नाही अशा रीतीनें थुंकावें.

तोयेन देहद्वाराणि सर्वतः शोधयेत्पुनः ॥
आचमनं ततः कार्यं त्रिवारं प्राणशुद्धये ॥ ७६ ॥

अर्थ— शरीरावरील रोमरंध्रें पाण्यानें स्वच्छ करावीत. नंतर प्राणाच्या शुद्धीकरितां तीन वेळा आचमन करावें.

आचमनं सदा कार्यं स्नानेन रहितेऽपि च ॥
आचमनयुतो देही जिनेन शौचवान्मतः ॥ ७७ ॥

अर्थ— स्नान जरी केलें नाहीं तथापि आचमन सर्वदा करावें. कारण आचमन केलेला मनुष्य शुद्ध आहे असें श्रीजिनांनी मानिलें आहे.

सन्ध्याया लक्षणं मुद्रा आचमस्यापि लक्षणम् ॥
कथयिष्यामि चाग्रेऽहं स्नानस्य विधिरुच्यते ॥ ७८ ॥

अर्थ— संध्येचें आणि आचमनाचें मुख्य लक्षण अशी जी मुद्रा, ती मी पुढें सांगणार आहे. आता स्नानाचा विधि सांगतों.

तैलस्य मर्दनं चादौ कर्तव्यमन्यहस्तकैः ॥ यथा सर्वाङ्गशुद्धिः स्यात्पुष्टिश्चापि विशेषतः ॥ ७९ ॥

अर्थ— प्रथम दुसऱ्याकडून आपल्या अंगाला तेल चोळून घ्यावें. कारण त्या योगानें सर्व शरीर स्वच्छ होतें व त्यांत शक्ति येते.

उक्तंच— पात्रदानं स्वहस्तेन परहस्तेन मर्दनम् ॥

तिलकं गुरुहस्तेन मातृहस्तेन भोजनम् ॥ ८० ॥

अर्थ— नीतिशास्त्रांत असें सांगितलें आहे की, सत्पात्राला दान आपल्या हातानें करावें. अंग चोळणें दुसऱ्याकडून करवावें. आपल्या कपाळाला गंधाचा तिलक लावावयाचा तो गुरूच्या हातानें लावून घ्यावा. आणि अन्न आईच्या हातानें वाढून घ्यावें.

तैलमर्दनविधि

अष्टम्यां च चतुर्दश्यां पञ्चम्यामर्कवासरे ॥
व्रतादीनां दिनेष्वेव न कुर्यात्तैलमर्दनम् ॥ ८१ ॥

अर्थ— अष्टमी, चतुर्दशी, पंचमी, रविवार आणि व्रतादिकांचे दिवस ह्या दिवशीं तेलानें मर्दन करूं नये.

चरे विलग्ने शशिजीवभौमे। रिक्तातिथौ स्यादुभये च पक्षे ॥
तैलावलेपं तु मृदाविधृत्यं (?)। स्नान नराणां विरुजत्वकारि ॥ ८२ ॥

अर्थ— चरलग्न असतांनां, आणि सोमवार, बृहस्पतिवार व मंगळवार ह्या वारी, तसेंच शुक्लपक्ष व कृष्णपक्ष ह्यातील रिक्तातिथीवर तेलाचें मर्दन करून स्नान केलें असतां मनुष्याला रोग होत नाहीं.

हस्ते ऐन्द्रे च रेवत्यां सौम्ये चार्द्रापुनर्वसौ ॥
स्नातो व्रतान्वितो जीवो व्याधिना नैव बाध्यते ॥ ८३ ॥

अर्थ— जो हस्त, धनिष्ठा, रेवती, मृग, आर्द्रा आणि पुनर्वसु ह्या नक्षत्रांवर अंगाला तेल चोळून स्नान करितो आणि व्रतें पाळतो, त्याला रोगांची पीडा होत नाही.

सोमे कीर्तिः प्रसरति वरा रौहिणेये हिरण्यं ।
देवाचार्ये तरणितनये वर्धते नित्यमायुः ॥
तैलाभ्यङ्गात्तनुजमरणं दृश्यते सूर्यवारे ।
भौमे मृत्युर्भवति नितरां भार्गवे वित्तनाशः ॥ ८४ ॥

अर्थ— सोमवारी तेल लावून स्नान केलें असतां सत्कीर्ति वाढते. बुधवारीं केलें असतां सुवर्णप्राप्ति होते. गुरुवारी व शनिवारी केलें असतां आयुष्य वाढतें. आणि रविवारी तेल लाविले असतां पुत्राचा नाश होतो. मंगळवारी तेल लावून स्नान केल्यास स्वतःला मृत्यु प्राप्त होतो. आणि शुक्रवारीं केलें असतां द्रव्यनाश होतो.

विवाहे यदि सम्पत्तौ सूतकान्ते महोत्सवे ॥
रजसि मित्रकार्येषु स्नापयेत्सर्ववासरे ॥ ८५ ॥

अर्थ— विवाहांत, संपत्ति मिळाली असतां, सूतकाच्या शेवटी, मित्राचें कार्य असता कोणत्याही वारीं तेल लावून स्नान करावें. आणि स्त्रियांनी ऋतुमती असतांना ( चवथे दिवशी ) कोणत्याही दिवशी तेल

लावून स्नान करावे.

घृतं च सार्षपं तैलं यत्तैलं पुष्पवासितम् ॥ न दोषः पक्वतैलेषु चाभ्यङ्गे न तु नित्यशः ॥ ८६ ॥

अर्थ— तूप, मोहरीचें तेल अथवा फुलांचा वास ज्याला येत आहे असें तेल अंगास लावावयास योग्य असें समजावें. हीं तेलें जरी शिजविलेली असली तथापि अभ्यंगस्नानाचे दिवशी तीं निर्दोष समजावींत. आणि इतर दिवशी तीं निर्दोष समजूं नयेत.

दशदिशासु सन्दद्याद्बलिं च तैलबिन्दुना ॥
नखेषु लेपयेदादौ पूरयेत्कर्णचक्षुषी ॥ ८७ ॥

अर्थ— तेल अंगास लावावयाच्या वेळीं दहा दिशेकडे तेलाच्या बिंदूंनीं बली द्यावेत. नंतर प्रथम नखांना तेल लावावें. मग कानांत आणि डोळ्यांत घालावें.

अन्योच्छिष्टं च जन्तूनां मृतानां च कलेवरैः ॥
मिश्रितं चर्मपात्रस्थं वर्जयेत्तैलमर्दनम् ॥ ८८ ॥

अर्थ— दुसऱ्यांनी लावून उरलेलें, किडे ज्यांत पडून मेले आहेत असें, आणि चामड्याच्या भांड्यांत असलेलें तेल अंगास लावूं नये.

मृत्तिकाभिस्त्यजेत्तैलं सुगन्धान्यैश्च वस्तुभिः ॥

खलेनाम्लफलेनापि नान्यथा शुचितां व्रजेत् ॥ ८९ ॥

अर्थ— माती ज्यांत मिसळलेली आहे, ज्यांत घाण पदार्थ पडलेले आहेत, आणि ज्यांत आंबट फळें टाकली आहेत असली तेलें अंगास लावूं नयेत. ती तेलें लाविलीं असतां मनुष्य अशुद्ध होतो.

स्नानविधि

उष्णोदकेन पश्चात्तु प्रासुके निर्मले स्थले ॥
स्नानं कुर्याद्यथा श्राद्धो जीवबाधा न जायते ॥ ९० ॥

अर्थ— नंतर ज्यांत जीवजंतू नाहीत अशा स्वच्छ जाग्यांत ऊनपाण्यानें श्रावकानें स्नान करावें. तें अशा बेतानें करावें की, त्यामुळें कोणत्याही जीवास पीडा होऊं देऊं नये.

कषायद्रव्यमिश्रेण सुवस्त्रशोधितेन वा ॥
नातिस्तोकेन नीरेण स्नायाद्वा नातिभूरिणा ॥ ९१ ॥

अर्थ— ज्याचा रस तुरट आहे असें द्रव्य ज्यांत मिसळलेलें आहे अशा व वस्त्रांतून गाळलेल्या पाण्याने स्नान करावें. तें पाणी अगदीच थोडेंही असूं नये आणि फार अधिकही असूं नये.

पाषाणस्फालित तोयं सन्तप्तं सूर्यरश्मिभिः ॥ पशुभिर्घातितं पादैः प्रासुकं निर्झरागतम् ॥९२॥
रेणुकायन्त्रिभिर्ज्ञातं तथा गन्धकवासितम् ॥ प्रासुकं स्नानशौचाय न तु पानाय शुध्यते ॥९३॥

अर्थ— जें पाणी दगडावरून आपटून पडत असेल तें पाणी प्रासुक ( निर्जंतुक ) होय. तसेंच सूर्याच्या किरणांनी तापलेलें, किंवा पशूंच्या पायांनी तुडविलेलें, अथवा झऱ्यांतून वहात असलेलें अशा प्रकारचें पाणीही प्रासुक समजावें, त्याचप्रमाणें वाळूच्या यंत्रांतून येणारें किंवा ज्याला गंधकाचा वास येत आहे तेंही पाणी प्रासुक असें समजावें. हें पाणी फक्त स्नानाच्या मात्र उपयोगीं पडतें. गंधकाचा वास येत असल्यानें पिण्याच्या उपयोगी नाहीं.

मिथ्यादृष्टिभिरज्ञानैः कृततीर्थानि यानि वै ॥ तेषु स्नानं न कर्तव्यं भूरिजीवनिपातिषु ॥९४॥

अर्थ— ज्ञानशून्य अशा मिथ्यादृष्टींनीं कल्पिलेली जी तीर्थें असतील त्यांत स्नान करूं नये. कारण त्यांत जीवजंतु फार असल्यानें त्याची हिंसा होते.

यदि तत्रैव गन्तव्यं कुसङ्गासङ्गदोषतः ॥ तस्माध्दृत्वा जलैः स्नायाद्भिन्नदेशे सुशोधिते ॥ ९५ ॥

अर्थ— जर एखाद्या दुष्टाच्या संगतीमुळें त्या तीर्थाचे ठिकाणीं जाणें भाग पडलें, तर त्यांतून आपल्या स्नानाला लागणारें पाणी निराळें काढून, एखाद्या शुद्ध जाग्यांत जाऊन स्नान करावें.

पञ्चेन्द्रियशवस्पर्शो विनातैलं न शुध्यति ॥ ब्रह्मचारियतीनां तु न योग्यं तैलमर्दनम् ॥ ९६ ॥

अर्थ— पचेंद्रियजीवाच्या प्रेताचा स्पर्श झाला असतां तेल अंगास लावल्यावांचून मनुष्य शुद्ध होत नाहीं. परंतु ब्रह्मचारी आणि यती ह्यांनीं केव्हांच तेल लावूं नये.

सप्ताहान्यम्भसा स्नायी गृही शूद्रत्वमाप्नुयात् ॥
तस्मात्स्नानं प्रकर्तव्यं रविवारे तु वर्जयेत् ॥ ९७ ॥

अर्थ— सतत सात दिवस जर पाण्यानें स्नान केलें नाहीं तर त्रैवर्णिक गृहस्थ शूद्रपणा पावतो. ह्मणून गृहस्थानें स्नान अवश्य केलें पाहिजे. त्यांत रविवारीं स्नान नाहीं केलें तर चालेल. बाकीच्या वारी केलें पाहिजे.

अत्यन्तं मलिनः कायो नवच्छिद्रसमन्वितः ॥ स्रवत्येव दिवा रात्रौ प्रातःस्नानं विशोधनम् ॥९८

अर्थ— हा देह अनेक प्रकारच्या मलांनीं युक्त असल्यानें सर्वदा मलांनाच स्रवत असतो. ह्मणून प्रातःकाली स्नान करावें, ह्मणजे तो शुद्ध होतो.

प्रातः स्नातुमशक्तश्चेन्मध्याह्ने स्नानमाचरेत् ॥ स्वयं स्त्रियाऽथवा शिष्यैः पुत्रैरुद्धृतवारिभिः ॥९९

अर्थ— प्रातःकाली स्नान करण्यास जर एखादा असमर्थ असेल तर त्यानें मध्याह्नकाली स्नान करावें. स्नानाला लागणारें पाणी आपण स्वतः किंवा आपल्या पत्नीनें, अथवा आपल्या शिष्यानें, अगर आपल्या पुत्रानें आणलेलें असावें.

न स्नायात् क्षुद्रहस्तेन नैकहस्तेन वा तथा ॥ नागालितजलेनापि न दुर्गन्धेन वारिणा ॥१००॥

अर्थ— नीच किंवा हलक्या प्रतीच्या मनुष्याकडून अंगावर पाणी घेऊन स्नान करूं नये. एका हातानें

स्नान करूं नये. जें पाणी गाळलेलें नाहीं त्यानें स्नान करूं नये. तसेंच ज्याला घाण वास येतो त्या पाण्यानें स्नान करूं नये.

कराभ्यां धारयेद्दर्भं शिखाबन्धं विधाय च ॥ प्राणायामं ततः कुर्यात्सङ्कल्पं च समुच्चरेत् ॥१०१॥

अर्थ— दोन्ही हातांत दर्भ धारण करून, शेंडीला गाठ मारून, प्राणायाम करावा. आणि नंतर संकल्प करावा.

द्विराचम्य निमज्याथ पुनरेवं द्विराचमेत् ॥
मन्त्रेणैव शिखां बध्वा प्राणायामं च वै पुनः ॥ १०२ ॥
स्नात्वाऽथ देहं प्रक्षाल्य पुनः स्नात्वा द्विराचमेत् ॥
पञ्चपरमेष्ठिपदैर्नवभिर्मार्जयेदथ ॥ १०३ ॥
साङ्गुष्ठयज्ञसूत्रेण त्रिः प्रदक्षिणमाचरेत् ॥
याः प्रवर्तन्त इति जले इदं मेऽत्र प्रवर्तनम् (?) ॥ १०४ ॥

अर्थ— नंतर दोन वेळ आचमन करून स्नान करावें. नंतर पुनः दोन वेळ आचमन करावें. मग मंत्र म्हणून शेंडी बांधून प्राणायाम करावा. पुनः स्नान करून सर्व अंग धुवावें. आणि पुनः दोन वेळ आचमन करावें. नंतर पंचपरमेष्ठीच्या मंत्रानें नऊ वेळ मार्जन करावें. मग यज्ञोपवीत उजव्या हाताच्या अंगठ्यांत धरून, तो अंगठा पाण्यांत तीन वेळ प्रदक्षिणाकार फिरवावा. आणि "याः क्रिया जले

प्रवर्तन्ते ता मे भवन्तु" असें ह्मणावें. (१)

**सङ्कल्पं सूत्रपठनं मार्जनं चाघमर्षणम् ॥ देवादितर्पणं चैव पञ्चाङ्गं स्नानमाचरेत् ॥ १०५ ॥**

अर्थ— संकल्प करणें, मंत्र ह्मणणें, मार्जन करणें, अघमर्षण करणें आणि देवादिकांचें तर्पण करणें ह्या पांच क्रिया स्नानाच्या वेळीं करावयाच्या असल्यानें, स्नान हें पंचांग (पांच अंगांनी युक्त असें) आहे. तें त्याप्रमाणें पंचांगसहित करावें. (उजव्या हातांत पाणी घेऊन, उजव्या नाकपुडीनें श्वास वर ओढून डाव्या नाकपुडीनें त्या हातांतील पाण्यावर श्वास सोडावा. आणि त्या श्वासाबरोबर माझ्या शरीरांतील सर्व पातकें बाहेर गेली असें समजावें. ह्याला 'अघमर्षण' ह्मणतात.)

**गृहस्याभिमुखं स्नायान्मार्जनं चाघमर्षणम् ॥**
**अन्यत्रार्कमुखो रात्रौ प्राङ्मुखोदङ्मुखोऽपि वा ॥ १०६ ॥**

अर्थ— घरांत स्नान करावयाचें झाल्यास स्नान, मार्जन आणि अघमर्षण घराकडे तोंड करून करावें. आणि दुसरीकडे स्नान करणें झाल्यास सूर्याकडे तोंड करून स्नान करावें. तसेंच रात्रीं स्नान करणें झाल्यास पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे तोंड करून स्नान करावें.

**सन्ध्याकालेऽर्चनाकाले संक्रान्तौ ग्रहणे तथा ॥ वमने मद्यमांसास्थिचर्मस्पर्शेऽङ्गनारतौ ॥१०७॥**
**अशौचान्ते च रोगान्ते स्मशाने मरणश्रुतौ ॥ दुःस्वप्ने च शवस्पर्शे स्पर्शनेऽन्त्यजनेऽपि वा १०८**

स्पृष्टे विण्मूत्रकाकोलूकश्वानग्रामसूकरे ॥ ऋषीणां मरणे जाते दूरान्तमरणे श्रुते ॥ १०९ ॥
उच्छिष्टास्पृश्यवान्तादिरजस्वलादिसंश्रये ॥ अस्पृश्यस्पृष्टवस्त्रान्नभुक्तपत्रविभाजने ॥ ११० ॥
शुद्धे वारिणि पूर्वोक्तं यन्ले मन्त्रे (?) सचेलकः ॥ कुर्यात्स्नानत्रयं जिह्वादन्तधावनपूर्वकम् ॥१११॥
अर्घं च तर्पणं मन्त्रजपदानार्चनं चरेत् ॥ बहिरन्तर्गता शुद्धिरेवं स्याद्गृहमेधिनाम् ॥ ११२ ॥

अर्थ— आता स्नान केव्हां अवश्य केलें पाहिजे तें सांगतात— संध्या व पूजा करण्याच्या वेळीं स्नान अवश्य करावें. संक्रांति व ग्रहण आलें असतां स्नान करावें. तसेंच वांति झाली असता व मद्य, मास, हाडें, कातडे ह्यांचा स्पर्श झाला असतां आणि मैथुन केलें असतां स्नान अवश्य करावें. अशौचाची समाप्ति झाल्यावर आणि रोग गेल्यावर स्नान अवश्य करावें. स्मशानांत गेलें असतां, कोणी-तरी मेलेलें ऐकलें असतां, वाईट स्वप्न पडलें असतां प्रेताचा किंवा अंत्यज वगैरे लोकांचा स्पर्श झाला असतां; विष्ठा, मूत्र, कावळा, घुबड, श्वान, गांवांतील डुकर ह्यांचा स्पर्श झाला असतां; कोणी मुनि मरण पावल्याचें ऐकलें असतां; कोणी आपला संबधी दूरच्या गांवीं मेल्याचें ऐकिलें असतां; उष्ट्यानें असलेला (भोजन केल्यावर हात तोंड धुण्याच्या आधीं त्या मनुष्याला उष्टा ह्मणतात.) मनुष्य, वांति झालेला मनुष्य, विटाळशी बायको ह्यांतील कोणाचाही स्पर्श झाला असतां; ज्याला आपण स्पर्श करूं नये अशा मनुष्यानें किंवा दुसऱ्या जीवानें शिवलेलें वस्त्र अन्न ह्यांचा स्पर्श झाला असतां; जेवतांना पान फाटलें असतां पूर्वीं

प्रवर्तन्ते ता मे भवन्तु" असें ह्मणावें. (१)

**सङ्कल्पं सूत्रपठनं मार्जनं चाघमर्षणम् ॥ देवादितर्पणं चैव पञ्चाङ्गं स्नानमाचरेत् ॥ १०५ ॥**

अर्थ— संकल्प करणें, मंत्र ह्मणणें, मार्जन करणें, अघमर्षण करणें आणि देवादिकांचें तर्पण करणें ह्या पांच क्रिया स्नानाच्या वेळीं करावयाच्या असल्यानें, स्नान हें पंचांग (पांच अंगांनीं युक्त असें) आहे. तें त्याप्रमाणें पंचांगसहित करावें. (उजव्या हातांत पाणी घेऊन, उजव्या नाकपुडीनें श्वास वर ओढून डाव्या नाकपुडीनें त्या हातांतील पाण्यावर श्वास सोडावा. आणि त्या श्वासाबरोबर माझ्या शरीरांतील सर्व पातकें बाहेर गेलीं असें समजावें. ह्याला 'अघमर्षण' ह्मणतात.)

**गृहस्याभिमुखं स्नायान्मार्जनं चाघमर्षणम् ॥**
**अन्यत्रार्कमुखो रात्रौ प्राङ्मुखोदङ्मुखोऽपि वा ॥ १०६ ॥**

अर्थ— घरांत स्नान करावयाचें झाल्यास स्नान, मार्जन आणि अघमर्षण घराकडे तोंड करून करावें. आणि दुसरीकडे स्नान करणें झाल्यास सूर्याकडे तोंड करून स्नान करावें. तसेंच रात्रीं स्नान करणें झाल्यास पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे तोंड करून स्नान करावें.

**सन्ध्याकालेऽर्चनाकाले संक्रान्तौ ग्रहणे तथा ॥ वमने मद्यमांसास्थिचर्मस्पर्शेऽङ्गनारतौ ॥१०७॥**
**अशौचान्ते च रोगान्ते स्मशाने मरणश्रुतौ ॥ दुःस्वप्ने च शवस्पर्शे स्पर्शनेऽन्त्यजनेऽपि वा १०८**

स्पृष्टे विण्मूत्रकाकोलूकश्वानग्रामसूकरे ॥ ऋषीणां मरणे जाते दूरान्तमरणे श्रुते ॥ १०९ ॥
उच्छिष्टास्पृश्यवान्तादिरजस्वलादिसंश्रये ॥ अस्पृश्यस्पृष्टवस्त्रान्नभुक्तपत्रविभाजने ॥ ११० ॥
शुद्धे वारिणि पूर्वोक्तं यन्त्रे मन्त्रे (?) सचेलकः ॥ कुर्यात्स्नानत्रयं जिह्वादन्तधावनपूर्वकम् ॥१११॥
अर्घं च तर्पणं मन्त्रजपदानार्चनं चरेत् ॥ बहिरन्तर्गता शुद्धिरेवं स्याद्गृहमेधिनाम् ॥ ११२ ॥

अर्थ— आतां स्नान केव्हां अवश्य केलें पाहिजे तें सांगतात— संध्या व पूजा करण्याच्या वेळीं स्नान अवश्य करावें. संक्रांति व ग्रहण आलें असतां स्नान करावें. तसेंच वांति झाली असतां व मद्य, मांस, हाडें, कातडें ह्यांचा स्पर्श झाला असतां आणि मैथुन केलें असतां स्नान अवश्य करावें. अशौचाची समाप्ति झाल्यावर आणि रोग गेल्यावर स्नान अवश्य करावें. स्मशानांत गेलें असतां, कोणी-तरी मेलेलें ऐकलें असतां, वाईट स्वप्न पडलें असतां प्रेताचा किंवा अंत्यज वगैरे लोकांचा स्पर्श झाला असतां; विष्ठा, मूत्र, कावळा, घुबड, श्वान, गांवांतील डुक्कर ह्यांचा स्पर्श झाला असतां; कोणी मुनि मरण पावल्याचें ऐकलें असता; कोणी आपला संबंधी दूरच्या गांवीं मेल्याचें ऐकिलें असतां; उष्ट्यानें असलेला (भोजन केल्यावर हात तोंड धुण्याच्या आधीं त्या मनुष्याला उष्टा ह्मणतात.) मनुष्य, वांति झालेला मनुष्य, विटाळशी बायको ह्यांतील कोणाचाही स्पर्श झाला असतां; ज्याला आपण स्पर्श करूं नये अशा मनुष्यानें किंवा दुसऱ्या जीवानें शिवलेलें वस्त्र अन्न ह्याचा स्पर्श झाला असतां; जेवतांना पान फाटलें असतां पूर्वीं

सांगितल्याप्रमाणें शुद्धोदकानें अंगावर असलेल्या वस्त्रासह तीन वेळां स्नान करावें. स्नानाच्या पूर्वी जिह्वा आणि दांत घांसावेत. याप्रमाणें स्नान केल्यावर अर्घ्य देणें, तर्पण, मंत्रजप, दान, पूजा या क्रिया कराव्यात. अर्थात् वर सांगितलेल्या निमित्तांपैकीं कोणतेंही निमित्त झालें असतां स्नान करण्याच्या पूर्वी या क्रिया करूं नयेत. याप्रमाणें केलें असतां गृहस्थश्रावकांची अंतर्बाह्यशुद्धि होते.

इत्येवं गृहमेधिनां शुचिकरः स्वाचारधर्मो मया ।
प्रोक्तो जैनमतानुसारसकलं शास्त्रं समालोक्य च ॥
शौचाचारवपुं विना तनुभृतां नास्त्यत्र धर्मः क्वचित् ।
मन्त्रोंस्तस्य विधानतो भवभिदे संक्षेपतः कथ्यते (?) ॥ ११३ ॥

" संक्षेपतो वच्म्यह " इति समीचीन पाठः ॥

अर्थ— जैनमतांतील सर्व शास्त्राचें अवलोकन करून मी गृहस्थ श्रावकांना त्यांच्या शरीराची शुद्धि करणारा हा सदाचार ( स्वधर्म ) सांगितला आहे. या सदाचाराला धर्म असें म्हणण्याचें बीज असें आहे कीं, शुद्धता आणि आचार यापेक्षां निराळा धर्म कोठेंच नाहीं. म्हणून गृहस्थांचा जो सदाचार तोच त्यांचा धर्म होय. आतां त्या धर्मकृत्यांत उपयोगी पडणारे मंत्र विधानपूर्वक मी संक्षेपानें सांगतों. कारण ते मंत्र म्हणून वर सांगितलेल्या क्रिया केल्या असतां त्या क्रिया त्या जीवाची अंतरंगबहिरंग शुद्धि करून त्याच्या

संसारबंधाचा नाश करण्यास साधनीभूत होणाऱ्या आहेत.

ॐ ह्रीं क्ष्वीं स्नानस्थानभूः शुध्यतु स्वाहा ॥ १ ॥ इति स्नानस्थानं शुचिजलेन सिञ्चयेत् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं क्ष्वीं' इत्यादि मंत्रानें ज्या जागीं स्नान करावयाचें त्या जागेवर शुद्ध जलानें सेचन करावें.

ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा इदं समस्तं गङ्गादिनदीनदतीर्थजलं भवतु स्वाहा ॥ २ ॥ इत्यनेन स्नानजलं हस्ताग्रेण स्पृशेत् ॥

अर्थ— "ॐ ह्रां ह्रीं" इत्यादि मंत्रानें स्नान करण्याकरितां घेतलेल्या पाण्यास हातानें स्पर्श करावा.

झं ठं स्वरावृतं योज्यं मण्डलद्वयवेष्टितम् ॥ तोये न्यस्याग्रतर्जन्या तेनानुस्नानमावहेत् ॥११४॥

इत्युक्तं यंत्रं जलमध्ये लिखित्वा मंत्रयेत्ततः ॥

अर्थ— "झं आणि ठं" ही दोन मंत्राक्षरें सोळा स्वरांनी वेष्टित करावीत. ह्मणजे ह्या दोन अक्षरांच्या भोंवत्यानें 'अ आ' वगैरे सोळा स्वर लिहावेत. त्यांत 'झं ठं' ही दोन अक्षरें मध्यें लिहून त्यांच्या भोंवत्यानें एक मंडल काढावें. नंतर त्या मंडलाच्या बाहेर 'अ आ' वगैरे सोळा स्वर लिहावेत, आणि त्या स्वरांच्या भोंवत्यानें दुसरें एक मंडल काढावें. ह्याप्रमाणें हें यंत्र स्नानाच्या पाण्यांत काढून मग त्या पाण्यानें स्नान करावें. हें यंत्र पाण्यांत काढल्यावर त्या पाण्याचे अभिमंत्रण करावें लागतें. त्याचा मंत्र सांगतात—

झ्वीं क्ष्वीं हं सः ॥ ३ ॥ इति बीजाक्षरप्रयुक्तसुरभिमुद्रां प्रदर्शयन्मन्त्रमिमं पठेत् ॥

अर्थ— 'क्ष्वीं क्ष्वीं हं सः' हा मंत्र म्हणून धेनुमुद्रा करून पाण्याला दाखवावी आणि पुढील मंत्र तोंडानें म्हणावा.

ॐ अमृते अमृतोद्भवे अमृतवर्षिणि अमृतं स्रावय स्रावय सं सं क्लीं क्लीं ब्लूं ब्लूं द्रां द्रां द्रीं द्रीं द्रावय द्रावय हं क्ष्वीं क्ष्वीं हं सः अ सि आ उ सा सर्वमिदममृतं भवतु स्वाहा ॥ ४ ॥ इति मन्त्रेण स्नानजलममृतीकृत्य तत्र त्रिः पञ्चकृत्वो वा–

ॐ ह्रीं अर्हं नमः । मम सर्वकर्ममलं प्रक्षालय प्रक्षालय स्वाहा ॥ ५ ॥ इति मंत्रेण कुण्डजलमध्ये स्नावनं कुर्यात् ॥

अर्थ— "ॐ अमृते–" इत्यादि मंत्र तोंडानें म्हणून 'स्नानाचें पाणी अमृतच कीं काय! असें झालें आहे' अशी कल्पना करून, त्या पाण्यात "ॐ ह्रीं अर्हं नमः" इत्यादि मंत्र म्हणत तीन वेळां किंवा पांच वेळां बुड्या माराव्यात.

तत उत्थाय पूर्ववदाचम्य– ॐ ह्रीं श्रीं क्लीं ऐं अर्हं अ सि आ उ सा जलमार्जनं करोमि स्वाहा । मम समस्तदुरितसन्तापापनोदोऽस्तु स्वाहा ॥ ६ ॥ इति त्रिरुच्चार्य हस्ताग्रेण मार्जनं कृत्वा तदन्ते चुलकोदकेन त्रिः परिषेचनं कुर्यात् ॥

अर्थ— नंतर उठून पूर्वीप्रमाणेच आचमन करून, "ॐ ह्रीं श्रीं" इत्यादि मंत्रानें तीन वेळा मार्जन करावें. त्या प्रत्येक मार्जनाला मंत्र पुनः ह्मणावा. मार्जन झाल्यावर हातांत पाणी घेऊन आपल्या भोवत्यानें तीन वेळ फिरवावें. ह्याला परिषेचन असें ह्मणतात.

भूयः स्नात्वा आचम्य च तत्र जलतर्पणं कुर्यात् । तद्यथा—

अर्थ— नंतर पुनः स्नान करून आचमन करून त्या ठिकाणीं पाण्यानें तर्पण करावें. त्याचे मंत्र पुढें सांगितले आहेत.

ॐ ह्रां अर्हद्भ्यः स्वाहा ॥ १ ॥ ॐ ह्रीं सिद्धेभ्यः स्वाहा ॥ २ ॥ ॐ ह्रूं सूरिभ्यः स्वाहा ॥ ३ ॥ ॐ ह्रौं पाठकेभ्यः स्वाहा ॥ ४ ॥ ॐ ह्रः सर्वसाधुभ्यः स्वाहा ॥ ५ ॥ ॐ ह्रां जिनधर्मेभ्यः स्वाहा ॥ ६ ॥ ॐ ह्रां जिनागमेभ्यः स्वाहा ॥ ७ ॥ ॐ ह्रां जिनचैत्येभ्यः स्वाहा ॥ ८ ॥ ॐ ह्रां जिनालयेभ्यः स्वाहा ॥ ९ ॥ ॐ ह्रां सम्यग्दर्शनेभ्यः स्वाहा ॥ १० ॥ ॐ ह्रां सम्यग्ज्ञानेभ्यः स्वाहा ॥ ११ ॥ ॐ ह्रां सम्यक्चारित्रेभ्यः स्वाहा ॥ १२ ॥ ॐ ह्रां सम्यक्तपोभ्यः स्वाहा ॥ १३ ॥ ॐ ह्रां अस्मद्गुरुभ्यः स्वाहा ॥ १४ ॥ ॐ ह्रां अस्मद्विद्यागुरुभ्यः स्वाहा ॥ १५ ॥ पञ्चदश तर्पणमन्त्राः । एतैस्तर्पणं कुर्यात् ॥ ततो जलान्निर्गमनक्रिया अग्रे वक्ष्यते ॥

अर्थ— हे वरील पंधरा मंत्र ह्मणून पंधरा वेळ तर्पण करावें. मग पाण्यांतून बाहेर येणें ही क्रिया करावयाची आहे. ती पुढील सर्गात सांगतों.

शौचाचारविधिः शुचित्वजनकः प्रोक्तो विधानागमे ।
पुंसां सद्व्रतधारिणां गुणवतां योग्यो युगेऽस्मिन्कलौ ॥
श्रीभट्टारकसोमसेनमुनिभिः स्तोकोऽपि विस्तारतः ।
प्रायः क्षत्रियवैश्यविप्रसुखकृत् सर्वत्र शूद्रोऽप्रियः ॥ ११९ ॥

अर्थ— शरीर व अंतःकरण ह्या दोहोंलाही शुद्ध करणारा असा शुद्धीचा आणि आचाराचा जो विधि क्रियाशास्त्रांत सांगितला आहे तो व्रती आणि चतुर अशा श्रावकांनी ह्या कलियुगांत करण्यास अगदीं योग्य आहे. तो विधि कर्मकाडांत फार थोडा सांगितला ह्मणून श्रीसोमसेनमुनि भट्टारक ह्यांनीं त्याचेंच हें विस्तारानें स्वरूप सांगितलें आहे. हा विधि क्षत्रिय, वैश्य आणि ब्राह्मण ह्या त्रिवर्गाला फार सुखकर आहे. शूद्राला मात्र सुखकर नाहीं.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपके भट्टारकश्रीसोम-
सेनविरचिते शौचाचारकथनीयो नाम
द्वितीयोऽध्याय ॥ २ ॥

॥ श्रीवीतरागाय नम ॥

## ॥ तृतीयाध्यायप्रारम्भः ॥

वीरनाथं प्रणम्यादौ सर्वपापविनाशकम् ॥
जलान्निर्गमनं पश्चात्किं कर्तव्यं तदुच्यते ॥ १ ॥

अर्थ— सर्व पातकांचा नाश करणारा असा जो श्री वीरनाथ त्याला प्रथम नमस्कार करून नंतर स्नान झाल्यावर पुढें काय करावयाचें तें सांगतों.

नीरान्निर्गमनं जलाशयतटे वस्त्रादिकप्रोक्षणं ।
वस्त्राणां परिधारणं समतले भूमेश्च शुद्धे ततः ॥
सुश्रोत्राचमनं च मार्जनविधिं सन्ध्याविधिं चोत्तमं ।
वक्ष्यामि क्रमशः क्रियाविधिमतां शुद्धाः क्रिया : ससधा ॥ २ ॥

क्रिया षड्विधा । इति पाठ समीचीन ॥

अर्थ— पाण्यांतून निघून तीरावर येणें, वस्त्रादिकांवर प्रोक्षण करणें, सपाट आणि शुद्ध अशा भूमीवर वस्त्र नेसणें, श्रोत्राचमन, मार्जनविधि आणि संध्याविधि ह्या सहा शुद्ध क्रिया क्रमानें पुढें सांगतों.

जलान्निस्सृत्य प्राक्स्थाने निर्मले जन्तुवर्जिते ॥

अन्तरङ्गविशुध्यर्थं स्थित्वाऽर्हत्स्नानमाचरेत् ॥ ३ ॥

अर्थ— पाण्यातून बाहेर निघून शुद्ध आणि जेथें जीवजंतु नाहींत अशा जाग्यावर अंतःकरणाच्या शुद्धतेकरितां अर्हत्स्नान पुढें सांगितल्याप्रमाणें करावें.

हस्ताभ्यां जलमादाय सकृदेवाभिमन्त्रितम् ॥
मस्तके च मुखे बाह्वोर्हृदये पृष्ठदेशके ॥ ४ ॥
अभिषिञ्चेत्स्वमात्मानं मन्त्रैः सुरभिमुद्रया ॥
एकवृत्त्या जपेच्छक्त्या भक्त्या पञ्चनमस्क्रियाम् ॥ ५ ॥

अर्थ— हातांनीं पाणी घेऊन त्याला एकवार अभिमंत्रण करावें. मग मस्तक, मुख, बाहु, हृदय आणि पाठ ह्या प्रदेशांवर त्या पाण्याचें मंत्र ह्मणून सेचन करावें. मग धेनुमुद्रा करून एकाग्रमनानें भक्तीनें आपल्या शक्तीप्रमाणें पंचनमस्कारमंत्राचा जप करावा.

शास्त्रोक्तविधिना स्नात्वा द्विराचम्य ततःपरम् ॥
प्राणायामं ततः कृत्वा सङ्कल्प्य तर्पयेदथ ॥ ६ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें शास्त्रोक्तविधीनें स्नान करून मग दोन वेळ आचमन करावें. नंतर प्राणायाम करून संकल्प करावा. मग तर्पण करावें.

**अक्षतोदकपूर्णेन देवतीर्थेन तर्पयेत् ॥ जयादिदेवताः सर्वाः प्राङ्मुखश्चोपवीत्यथ ॥ ७ ॥**

अर्थ— पूर्वेकडे तोंड करून व उपवीती होऊन ( उजव्या हातांत यज्ञोपवीत घालून ) अक्षता आणि पाणी ह्यांच्या योगानें जयादि सर्व देवांचें देवतीर्थानें तर्पण करावें. [ बोटांच्या शेंड्यांना देवतीर्थ असें नांव आहे. बोटांच्या बुडाकडील भागाला ऋपितीर्थ असें नांव आहे आणि आंगठा आणि अंगठ्यानजीकचें बोट ह्या दोहोंच्या मधल्या भागाला पितृतीर्थ असें नांव आहे. हें लक्षांत ठेवावें. ]

**उदङ्मुखो निवीती तु यवसम्मिश्रितोदकैः ॥**
**गौतमादिमहर्षीणां (?) तर्पयेदृपितीर्थतः ॥ ८ ॥** महर्षीन्वे इति पाठः साधुः ॥

अर्थ— गळ्यांतून माळेप्रमाणे यज्ञोपवीत लोंबत सोडून यवांनीं ( जंव नांवाच्या धान्यानें ) युक्त जें उदक त्याच्या योगानें ऋपितीर्थानें गौतमादि महर्षींचें उत्तरेकडे तोंड करून तर्पण करावें.

**दक्षिणाभिमुखो भूत्वा प्राचीनावीत्यनातपम् ( ? ) ॥**
**तिलैः सन्तर्पयेत्तीर्थेपितरो वृषभादयः ॥ ९ ॥**

अर्थ— प्राचीनावीति करून ( डाव्या हातांत यज्ञोपवीत घालून ) दक्षिणदिशेकडे तोंड करून तिल आणि उदक ह्यांच्या योगानें वृषभादि तीर्थपितरांचें तर्पण करावें.

**यन्मया दुष्कृतं पापं शारीरमलसम्भवम् ॥**

तत्पापस्य विशुध्यर्थं देवानां तर्पयाम्यहम् ॥ १० ॥

यन्मया दुष्कृतं तोयं शारीरमलसम्भवात् ॥ इति पाठः साधुः ॥

अर्थ— शरीराच्या मलापासून ज्याची उत्पत्ति आहे असें जें मीं पाप केलें असेल त्यापासून माझी शुद्धता होण्याकरितां मी देवांचें तर्पण करतों.

असंस्काराश्च ये केचिज्जलाशाः पितरः सुराः ॥

तेषां सन्तोषतृप्त्यर्थं दीयते सलिलं मया ॥ ११ ॥

अर्थ— जे माझे कित्येक पितर संस्कार (उपनयनादि क्रिया) केल्यावांचून मृत झाले असून उदकाची इच्छा करीत असतील व जे देव उदकाची इच्छा करीत असतील, त्यांच्या संतोषाकरितां आणि तृप्तीकरितां मी हें पाणी देतों.

हस्ताभ्यां विक्षिपेत्तोयं तत्तीरे सलिलाद्बहिः ॥

उत्तार्य पीडयेद्वस्त्रं मन्त्रतो दक्षिणे ततः ॥ १२ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें पूर्वीचे श्लोक ह्मणून दोनी हातांनीं पाणी घेऊन, तें ज्या जलाशयांत स्नान केलें असेल त्या जलाशयांतील पाण्याच्या बाहेर तीरावर सोडावें. नंतर अंगावरील वस्त्र काढून पुढील मंत्र ह्मणून दक्षिणेकडच्या बगलेला तें पिळावें.

केचिदस्मत्कुले जाता अपूर्वव्यन्तरासुराः ॥ ते गृह्णन्तु मया दत्तं वस्त्रनिष्पीडनोदकम् ॥ १३ ॥

अर्थ— आमच्या कुलात जे कित्येक व्यंतर असुर त्यांच्या योनींत जन्मले असतील, ते, हें मी दिलेलें वस्त्र पिळण्याचें पाणी घेऊं देत. हा वस्त्र पिळण्याचा मंत्र समजावा.

दर्भान्विसृज्य तत्तीरे ह्युपवीती द्विराचमेत् ॥
अक्लिन्नवस्त्रं सम्प्रोक्ष्य शुचीव इति मन्त्रतः ॥ १४ ॥
परिधाय सुवस्त्रं वै युग्मवस्त्रस्य मन्त्रतः ॥
प्रागेव निमृजेद्देहं शिरोऽङ्गान्यथवा द्वयम् ॥ १५ ॥

अर्थ— त्या जलाशयाच्या तीरावर हातांतील दर्भ टाकून द्यावेत. नंतर उपवती (माळेप्रमाणें यज्ञोपवीत) करून दोन वेळ आचमन करावें. मग जें न भिजलेलें (कोरडें) वस्त्र असेल त्याच्यावर 'शुचीव'? ह्या मंत्रानें पाणी शिंपडावें, आणि युग्मवस्त्राच्या मंत्रानें तें वस्त्र नेसावें. हें वस्त्र नेसण्याच्या पूर्वीच डोकें व अंग पुसावें. ( श्लोक ५९ खालील तिसरा मंत्र पहा )

तस्मात् (? ततः) कायं न मृजीत ह्यम्बरेण करेण वा ॥
श्वानलेह्येन साम्यं च पुनःस्नानेन शुध्यति ॥ १६ ॥

अर्थ— वस्त्र नेसल्यानंतर वस्त्रानें किंवा नुसत्या हस्तानेंही अंग पुसूं नये. कारण, तसें अंग पुसलें

असतां ते कुतऱ्यानें चाटल्यासारखें होतें. आणि तो मनुष्य पुनः स्नान केल्यावांचून शुद्ध होत नाहीं.

तिस्रः कोट्योऽर्धकोटी च यावद्रोमाणि मानुषे ॥
वसन्ति तावत्तीर्थानि तस्मान्न परिमार्जयेत् ॥ १७ ॥

अर्थ— मनुष्याच्या अंगावर जे साडेतीन कोटी केश आहेत तितकीं तीं तीर्थें आहेत. ह्मणून स्नान करून शुद्ध झालेल्या मनुष्यानें वस्त्र नेसल्यावर अंग पुसूं नये.

पिबन्ति शिरसो देवाः पिबन्ति पितरो मुखात् ॥
मध्याच्च यक्षगन्धर्वा अधस्तात्सर्वजन्तवः ॥ १८ ॥

अर्थ— वस्त्र नेसल्यानंतर जें अंगावर पाणी रहातें, तें, मस्तकांतील पाणी देव पितात. मुखावरचें पाणी पितर प्राशन करितात. मधल्या शरीरांतील पाणी यक्ष व गंधर्व पितात. आणि खालच्या भागांतील पाणी सर्व जीवजंतु प्राशन करतात.

सुरापानसमं तोयं पृष्ठतः केशबिन्दवः ॥
दक्षिणे जाह्नवीतोयं वामे तु रुधिरं भवेत् ॥ १९ ॥

अर्थ— स्नान केल्यावर शेंडीतून जें पाणी गळतें, तें जर पाठीवर गळेल तर तें मद्याप्रमाणें समजावें. दक्षिणेकडच्या ह्मणजे उजव्या बाजूला जर गळेल तर तें गंगानदीचें उदक होय. आणि तें जर डाव्या

बाजूला गळेल तर तें रक्तप्रमाणें समजावें.

स्नानं कृत्वा धृते वस्त्रे पतन्ति केशबिन्दवः ॥
तत्स्नानं निष्फलं विद्यात् पुनः स्नानेन शुध्यति ॥ २० ॥

अर्थ— स्नान करून वस्त्र नेसल्यावर जर केशांतून पाणी पडेल तर तें स्नान निष्फल समजावें. तो मनुष्य पुनः स्नान केल्यानें शुद्ध होतो.

आता वस्त्राविषयीं सागतात—

अपवित्रपटो नग्नो नग्नश्चार्धपटः स्मृतः ॥
नग्नश्च मलिनोद्वासी नग्नः कौपीनवानपि ॥ २१ ॥
कषायवाससा नग्नो नग्नश्चानुत्तरीयमान् ॥
अन्तःकच्छो बहिःकच्छो मुक्तकच्छस्तथैव च ॥ २२ ॥
साक्षान्नग्नः स विज्ञेयो दश नग्नाः प्रकीर्तिताः ॥

अर्थ— अपवित्र वस्त्र नेसणारा, अर्धें वस्त्र नेसणारा, मळकट वस्त्र नेसणारा, कौपीन नेसणारा, भगवें वस्त्र नेसणारा, अंगावरचें वस्त्र न घेणारा, कटिसूत्राच्या आंत कासोटा घालणारा, बाहेर कासोटा घालणारा, मुळींच कासोटा न घालणारा आणि मुळींच वस्त्र न नेसणारा असे दहा प्रकारचे नग्न आहेत. ह्मणजे ह्या

दहा प्रकारच्या मनुष्यांना शास्त्रांत नग्न ह्मटलें आहे; ह्मणून ह्यांपैकीं नऊ प्रकारांत जरी वस्त्र आहे तथापि ते नग्नच समजावेत.

द्व्यंगुलं चतुरङ्गुलं चोत्तरीयं विनिर्मितम् ॥ २३ ॥
कषायधूम्रवर्णं च केशजं केशभूषितम् ॥
छिन्नाग्रं चोपवस्त्रं च कुत्सितं नाचरेन्नरः ॥ २४ ॥

अर्थ— दोन बोटें किंवा चार बोटें रुंदीचें वस्त्र अंगावर घेऊं नये. तसेंच भगवें वस्त्र, धुरकट वस्त्र, लोकरीचें वस्त्र, ज्यात लोकरीचें काम केलेलें आहे असें वस्त्र, आणि ज्याचें शेवट (दशा) तुटलेल्या अथवा फाटलेल्या आहेत असलें वस्त्र, हीं वस्त्रें पांघरण्यास अंगावर घेऊं नयेत.

दग्धं जीर्णं च मलिनं मूषकोपहृतं तथा ॥
खादितं गोमहिष्याद्यैस्तत्त्याज्यं सर्वथा द्विजैः ॥ २५ ॥

अर्थ— जळलेलें, जुनें झालेलें, मळकट, उंदरानें तोडलेलें आणि गाय, ह्मैस वगैरे जनावरांनीं चघळलेलें अशा प्रकारचें असेल तें वस्त्र त्रैवर्णिकांनी अगदीं टाकून द्यावें.

नील रक्तं तु यद्वस्त्रं दूरतः परिवर्जयेत् ॥
स्त्रीणां स्फीतार्थसंयोगे शयनीये न दुष्यति ॥ २६ (?)

स्त्रीणा तु पतिसंयोगे शयनीये न दुष्यति ॥ अयं पाठ समीचीन ॥

अर्थ— काळें वस्त्र आणि तांबडें वस्त्र मुळींच नेसूं नये. स्त्रियांनीं शय्येवर असतांना नेसलें असतां दोष नाही.

रक्षणाद्विक्रयाच्चैव तद्वृत्तेरुपजीवनात् ॥
अपवित्रो भवेद्देही त्रिभिः पक्षैर्विशुध्यति ॥ २७ ॥

अर्थ— काळ्या रंगाचें किंवा तांबड्या रंगाचें वस्त्र आपल्याजवळ बाळगून ठेविलें असतां, अथवा तसलीं वस्त्रें तयार करून आपला निर्वाह केला असतां गृहस्थ श्रावक अशुद्ध होतो. तो, तो पूर्वीचा धंदा सोडल्यावर दीड महिन्यांनीं शुद्ध होतो.

नीलरक्तं यदा वस्त्रं श्राद्धः स्वाङ्गेषु धारयेत् ॥
जन्तुसन्ततिसंवासो वसेद्यमपुरे ध्रुवम् ॥ २८ ॥

अर्थ— काळें किंवा तांबडें वस्त्र जर श्रावक आपल्या अंगावर धारण करील तर तो यमाच्या नगरांत अंगावर किडे पडून चिरकाल वास करील. ह्मणजे तो यमपुरीला जाईल व त्याच्या अंगांत किडे पडतील.

कौशिके पट्टसूत्रे च नीलीदोषो न विद्यते ॥
स्त्रियो वस्त्रं सदा त्याज्यं परवस्त्रं च वर्जयेत् ॥ २९ ॥

अर्थ— रेशमी वस्त्र आणि डोक्यास बांधावयाचें वस्त्र ह्यांत काळेपणाचा दोष नाही. ह्मणजे ह्यांत काळा

रंग असला असतां चालेल. स्त्रियांनी नेसावयाचें वस्त्र पुरुषांनीं नेसूं नये. तसेंच दुसऱ्याचें वस्त्र नेसूं नये. कारण, असें सांगितलें आहे की,

परान्नं परवस्त्रं च परशय्या परस्त्रियः ॥

परस्य च गृहे वासः शक्रस्यापि श्रियं हरेत् ॥ ३० ॥

अर्थ— दुसऱ्याचें अन्न खाणें, दुसऱ्याचें वस्त्र नेसणें, दुसऱ्याच्या अंथरुणावर निजणें, परस्त्रीशीं समागम करणें आणि दुसऱ्याच्या घरीं रहाणें ह्या योगानें इंद्राची देखील संपत्ति नाश पावेल! मग मनुष्याची कथा काय? ह्मणून दुसऱ्याचें वस्त्र नेसूं नये.

अधौतं कारुधौतं वा पूर्वेद्युर्धौतमेव च ॥

त्रयमेतदसम्बन्धं सर्वकर्मसु वर्जयेत् ॥ ३१ ॥

अर्थ— न धुतलेलें वस्त्र, परटानें धुतलेलें व पूर्वदिवशीं धुतलेलें हीं वस्त्रें कोणत्याही क्रियेला नेसूं नयेत.

ईषध्दौतं स्त्रिया धौतं शूद्रधौतं च चेटकैः ॥

बालकैर्धौतमज्ञानैरधौतमिति भाष्यते ॥ ३२ ॥

अर्थ— थोडेंसें धुतलेलें किंवा स्त्रियांनी धुतलेलें, अथवा शूद्रानें किंवा नोकरानें धुतलेलें, अज्ञान अशा लहान मुलांनीं धुतलेलें अशा वस्त्रास न धुतलेलें वस्त्र असेंच ह्मणतात. ह्मणून ह्या प्रकारची वस्त्रें नेसूं नयेत.

अप्सु नोत्पीडयेद्वस्त्रं सर्वथा श्रावको द्विजः ॥
शुष्कं चोपरि खट्वायास्तद्वस्त्रं च न धारयेत् ॥ ३३ ॥

अर्थ— त्रैवर्णिक श्रावकानें पाण्यांत वस्त्र केव्हांही पिळूं नये. आणि वाजल्यावर किंवा खाटेवर सुकविलेलें वस्त्र नेसूं नये.

नवम्यां पञ्चदश्यां तु संक्रान्तौ श्राद्धवासरे ॥
वस्त्रं निष्पीडयेन्नैव न च क्षारे नियोजयेत् ॥ ३४ ॥

अर्थ— नवमी आणि पौर्णिमा ह्या तिथीस, तसेंच संक्रांति दिवशी आणि श्राद्धाचे दिवशीं वस्त्र पिळूं नये; आणि तें क्षारांतही घालूं नये. ह्मणजे भट्टीस घालूं नये.

स्नानं कृत्वाऽऽर्द्रवस्त्रं तु मूर्ध्नि नोत्तारयेद्गृही ॥
आर्द्रवस्त्रमधस्ताच्च पुनः स्नानेन शुध्यति ॥ ३५ ॥

अर्थ— स्नान केल्यावर ओलें वस्त्र जें फेडावयाचें तें खालच्या खालींच फेडावें. वर डोकीकडच्या बाजूनें घेऊं नये. तसें केलें असतां पुनः स्नान केलें ह्मणजे शुध्द होतो.

प्रत्यग्दक्षिणयोः कृत्वा पुनः शौचं विधीयते ॥ (?)
एकवस्त्रो न भुञ्जीत न कुर्याद्देवपूजनम् ॥ ३६ ॥

न कुर्यात्पितृकर्माणि दानहोमजपादिकम् ॥
खण्डवस्त्रावृतश्चैव वस्त्रार्धप्रावृतस्तथा ॥ ३७ ॥

अर्थ— एक वस्त्र नेसून अंगावर दुसरें वस्त्र जर घेतलेलें नसेल तर त्या एक वस्त्रावर भोजन करूं नये, देवपूजा करूं नये, पितृक्रिया करूं नये, दान, जप आणि होम ह्या क्रियाही करूं नयेत. तसेंच एक फाडून त्याची दोन वस्त्रें केलीं असल्यास तसल्या वस्त्रावर ( तीं वस्त्रें नेसून व पांघरुन ) कोणतीही वरील क्रिया करूं नये. त्याप्रमाणेंच अर्धें वस्त्र नेसून आणि अर्धें वस्त्र पांघरुन देखील वरील क्रिया करूं नयेत. कारण शास्त्रांत असें सांगितलें आहे कीं—

उक्तंच— स्नानं दानं जपं होमं स्वाध्यायं पितृतर्पणम् ॥
नैकवस्त्रो गृही कुर्याच्छ्राध्दभोजनसत्क्रियाम् ॥ ३९ ॥

अर्थ— गृहस्थानें एक वस्त्र धारण करून, स्नान, दान, जप, होम, स्वाध्याय, पितृतर्पण, श्राद्ध आणि भोजन ह्या क्रिया करूं नयेत.

धार्यमुत्तरीयमादौ ततोऽन्तरीयकं तथा ॥ चतुष्कोणं भवेद्वस्त्रमन्तरीयं च निर्मलम् ॥ ४० ॥

अर्थ— पांघरावयाचें वस्त्र प्रथम धारण करावें; नंतर नेसावयाचें वस्त्र नेसावें. नेसावयाच्या व पांघरावयाच्या ह्या दोनी वस्त्रांचे चारी कोपरे शाबूद असावेत; फाटलेले नसावेत. आणि वस्त्र स्वच्छ असावें.

त्रिहस्तं तु विशालं स्याद्धायतं पञ्चहस्तकम् ॥ अधोवस्त्रं तु हस्ताष्टं द्विहस्तं विस्तरान्मतम् ॥ ४१ ॥

अर्थ— तीन हात रुंदीचें वस्त्र फार मोठें होतें, म्हणून पांघरावयाचें वस्त्र दोन हात रुंद आणि पांच हात लांब असावें. आणि नेसावयाचें वस्त्र दोन हात रुंद आणि आठ हात लांब असें असावें.

पट्टकूलं तथा सौत्रं शुभ्रं वा पीतमेव च ॥ कदाचिद्रक्तवस्त्रं स्याच्छेषवस्त्रं तु वर्जयेत् ॥ ४२ ॥

अर्थ— पट्टवस्त्र (?) व सुताचें वस्त्र हीं वस्त्रें नेसण्यास व पांघरण्यास योग्य आहेत. तीं पांढरीं अथवा पिवळीं असावीत. एखाद्यावेळीं तांबडीं असलीं तरी चालतात. पण बाकीचीं कोणतींही वस्त्रें नेसण्यास व पांघारण्यास उपयोगी नाहीत.

रोमजं चर्मजं वस्त्रं दूरतः परिवर्जयेत् ॥ नातिस्थूलं नातिसूक्ष्मं विकारपरिवर्जितम् ॥ ४३ ॥

अर्थ— केशापासून ( लोंकरीपासून ) तयार केलेलें वस्त्र, चामड्याचें वस्त्र हीं वस्त्रें मुळींच घेऊं नयेत. नेसावयाचें व पांघरावयाचें वस्त्र फार जाड असूं नये व अगदीं बारीकही असूं नये, मध्यम प्रतीचें असावें. आणि त्यांत कोणत्याही प्रकारची विकृति ( फाटणें, जळणें, वगैरे ) झालेली नसावी.

लम्बयित्वा पुरा कोणद्वयं तेनैव वाससा ॥ आवेष्टयेत्कटीदेशं वामेन पार्श्वबन्धनम् ॥ ४४ ॥

अर्थ— वस्त्र नेसण्याचे वेळीं त्या वस्त्राचे दोन्ही पदर पुढच्या बाजूस लोंबत सोडावेत [ आपण नेहमीं वस्त्र नेसतांना ज्याप्रमाणें एक आंखूड व एक लांब असे दोनी पदर पुढल्याबाजूस प्रथम धरतों तें नीट लक्षांत

आणिलें असतां समजेल. ] आणि मग त्या वस्त्रानें कंबरेला वेष्टन करावें. [ ह्या वेळी उजव्या हातांतील पदर डाव्या हातांत आणि डाव्या हातांतील पदर उजव्या हातांत येत असतो. ] नंतर डावीकडील वगलेला वस्त्राचें बंधन करावें ह्मणजे डाव्या कुशीजवळ वस्त्र खोवावें.

कोणद्वयं ततः पश्चात्समीचीनं प्रकच्छयेत् ॥ कटीमेखलिकामन्तर्देशे गोप्यां प्रबन्धयेत् ॥ ४५ ॥

अर्थ— मग एका पदराचे दोन कोपरे घेऊन पाठीकडल्या वगलेला कासोटा बांधावा. कंबरेची मेखला ( करदोडा ) वस्त्राच्या आंत गुप्त असावी. बाहेर दिसूं नये.

आजानुकं तथाऽऽजङ्घं चानलीकं गृहोत्तमैः ॥ धारयेदुत्तरीयं तु यथादेहं पिधापयेत् ॥ ४६ ॥

अर्थ— नेसलेलें वस्त्र गुडघ्यापर्यंत किंवा पिंडरीपर्यंत अथवा घोट्यापर्यंत नेसावें आणि पांघरावयाचें वस्त्र शरीराच्या अदमासानें पांघरावें.

आजानुकं क्षत्रियाणामाजङ्घं वैश्यसम्मतम् ॥ आघोण्टं ब्रह्मपुत्राणां शूद्राणां शूद्रवन्मतम् ॥ ४७ ॥

अर्थ— क्षत्रियांचें नेसावयाचें वस्त्र गुडघ्यापर्यंत असावें. वैश्यांचें पिंडरीपर्यंत असावें. ब्राह्मणांचें वस्त्र घोट्यापर्यंत असावें. आणि शूद्रांचें वस्त्र त्यांच्या चालीप्रमाणें असावें.

नोत्तरीयमधः कुर्यान्नोपर्यधस्थमम्बरम् ॥ अज्ञानाद्यदि कुर्वीत पुनः स्नानेन शुध्यति ॥ ४८ ॥

अर्थ— पांघरण्याचें वस्त्र नेसूं नये आणि नेसावयाचें पांघरूं नये. गैर समजुतीनें जर अशी उलटा-

पालट झाली, तर, पुनः स्नान करावें; ह्मणजे मनुष्य शुद्ध होतो.

अथोत्तरीयवस्त्रं तु पूर्ववद्धार्यते बुधैः ॥ एवं वस्त्रद्वयं धृत्वा धर्मकर्म समाचरेत् ॥ ४९ ॥

अर्थ— नंतर ( स्नान केल्यानंतर ) पूर्वीप्रमाणें अंगावरचें वस्त्र अंगावर घ्यावें आणि नेसावयाचें वस्त्र नेसावें. ह्याप्रमाणें दोन वस्त्रें धारण करून श्रावकानें आपली धार्मिक क्रिया करावी.

ये सन्ति द्रव्यसंयुक्तास्तेषां सर्वं निवेदितम् ॥
निस्स्पृहाणां दरिद्राणां यथाशक्ति विलोकयेत् ॥ ५० ॥

अर्थ— हा वरील आचार जो सांगितला तो सर्व धनवान् लोकांकरितां समजावा. जे निःस्पृह आणि दरिद्री असतील, त्यांनीं आपल्या शक्तीप्रमाणें करावा. ह्मणजे त्यांना दुसरें वस्त्र मिळत नसेल तर त्यांनीं एका वस्त्रावरच निर्वाह करावा.

वामहस्तेन सन्धार्य वस्त्रमार्द्रं निपीडयेत् ॥ स्वहस्तेन स्वजातीयहस्तेन प्राणियत्नतः ॥ ५१ ॥

अर्थ— ओलें वस्त्र डाव्या हातांत धरून पिळावें. तें आपणच पिळावें किंवा आपल्या सजातीय मनुष्याकडून पिळून घ्यावें.

आतां स्नानाचे प्रकार सांगतात—

मान्त्रं भौमं तथाऽऽग्नेयं वायव्यं दिव्यमेव च ॥

वारुणं मानसं चैव सप्त स्नानान्यनुक्रमात् ॥ ५२ ॥

अर्थ— मंत्रस्नान, भूमिस्नान, अग्निस्नान, वायुस्नान, दिव्यस्नान, जलस्नान आणि मानसस्नान अशीं सात प्रकारचीं स्नानें आहेत.

प्रातःस्नाने त्वशक्तश्चेन्मार्जयेदार्द्रवाससा ॥ उत्तमाङ्गादिपादान्तं स भवेत्स्नानकृद्गृही ॥ ५३ ॥

अर्थ— प्रातःस्नान करण्यास मनुष्य जर अशक्ततेमुळें असमर्थ असेल तर त्यानें ओल्या वस्त्रानें मस्तकापासून पायापर्यंत अंग पुसावें. ह्मणजे त्यानें स्नान केल्यासारखें होतें.

आपः स्वभावतः शुद्धाः किं पुनर्वह्नितापिताः ॥

अतः सन्तः प्रशंसन्ति स्नानमुष्णेन वारिणा ॥ ५४ ॥

अर्थ— पाणी हें स्वभावतःच शुद्ध आहे. तेंच जर अग्नीनें तापविलें तर मग अधिकच शुद्ध होतें. ह्मणून पंडितलोक उष्णोदकानें स्नान करणें फारच प्रशस्त मानतात.

अभ्यङ्गे चैव माङ्गल्ये गृहे चैव तु सर्वदा ॥ शीतोदकेन न स्नायान्न धार्यं तिलकं तथा ॥ ५५ ॥

अर्थ— अंगाला तेल लाविलें असतां, मंगलकार्यात आणि घरांत स्नान करावयाचें असतां शीतोदकानें केव्हांही स्नान करूं नये. तसेंच स्नान केल्यावांचून गंध लावूं नये.

शीतास्वप्सु निक्षिपेन्न उष्णमुष्णासु शीतकम् ॥

ताभिः स्नाने कृते प्रोक्तं प्रायश्चित्तं जिनागमे ॥ ५६

अर्थ— थंड पाण्यांत ऊन पाणी घालूं नये, आणि ऊन पाण्यांत थंड पाणी घालूं नये. कारण, तसल्या मिसळलेल्या पाण्यानें स्नान केल्यास जिनागमात ( शास्त्रांत ) प्रायश्चित्त सांगितलें आहे.

स्वक्रियानिरतो गेही गृहे चापि विधानतः ॥
करोति पञ्चधाऽऽचारं नदीं गन्तुमशक्तकः ॥ ५७ ॥
सङ्कल्पं सूत्रपठनं मार्जनं चाघमर्षणम् ॥
देवतातर्पणं चैव गृहे पञ्च विवर्जयेत् ॥ ५८ ॥

अर्थ— आपला सदाचार चालविण्याविषयीं सिद्ध असलेला गृही श्रावक, नदीला जाऊन स्नान करण्यास असमर्थ झाला असतां घरांत देखील स्नानासंबंधानें करण्याच्या पांचही क्रिया करतो. परंतु गुप्तमंत्राचा जप, सूत्रपठन, मार्जन, प्रायश्चित्त आणि देवतातर्पण ह्या पांच क्रिया मात्र घरांत करूं नयेत.

अन्त्यजैः खनिताः कूपा वापी पुष्करिणी सरः ॥
तेषां जलं न तु ग्राह्यं स्नानपानाय च क्वचित् ॥ ५९ ॥

अर्थ— अंत्यजांनी खणलेली जीं आड, विहीर किंवा तळीं असतील, त्याचें पाणी स्नानाला अथवा पिण्याला केव्हांही घेऊं नये.

पाण्यातून बाहेर निघण्याचा मंत्र.

अथ जलान्निर्गमनमन्त्रः । ॐ नमोऽर्हते भगवते संसारसागरनिर्गताय अहं जलान्निर्गच्छामि स्वाहा ॥ १ ॥ जलान्निर्गमनमन्त्रः ॥

अर्थ— " ॐ नमो " इत्यादि हा पाण्यांतून बाहेर निघण्याचा मंत्र होय.

ॐ ह्रीं क्ष्वीं क्ष्वीं अर्हं हं सः परमपावनाय वस्त्रं पावनं करोमि स्वाहा ॥ २ ॥ स्नानकाले सन्धौतवस्त्रप्रोक्षणम् ॥

अर्थ— " ॐ ह्रीं क्ष्वीं इत्यादि " हा धुतलेल्या वस्त्रांचें प्रोक्षण करण्याचा मंत्र आहे.

ॐ श्वेतवर्णे सर्वोपद्रवहारिणि सर्वमहाजनमनोरञ्जनि परिधानोत्तरीयधारिणि हं झं वं मं हं सं तं परिधानोत्तरीय धारयामि स्वाहा ॥ ३ ॥ इत्यनेन पूर्वप्रक्षालितप्रोक्षितानिर्द्रववस्त्रद्वयेनान्तरीयोत्तरीयसन्धारणम् ॥

अर्थ— ॐ श्वेतवर्णे इत्यादि मंत्रानें पूर्वी धुतलेलीं व प्रोक्षण केलेलीं दोन वस्त्रें धारण करावीत.

आचमनाचा विधि.

उपस्थित्वा शुचौ देशे स्नात्वाऽस्नात्वा तथैव च ॥
आचमोऽवश्य कर्तव्यस्ततोऽसौ शौचवान्मतः ॥ ६० ॥

अर्थ— स्नान केल्यावर अथवा स्नान न केलें असतांही शुद्ध जाग्यावर बसून आचमन अवश्य करावें. कारण, आचमन केल्यानें मनुष्य शुद्ध होतो.

देशं कालं वयो वंशं गोत्रं जातिं गुरुं तथा ॥
संस्मृत्य प्राक्संध्यायां सङ्कल्प्याचमनं चरेत् ॥ ६१ ॥

अर्थ— प्रातःकाली आपल्या रहाण्याचा देश, सध्या असलेला काल, आपला वंश, आपलें गोत्र, आपली जाति आणि आपला गुरु इतक्यांचें स्मरण करून संकल्प करून आचमन करावें.

पूर्ववद्वस्त्रमादाय कुर्यादाचमनं बुधः ॥
न तिष्ठन्न स्थितो नम्रो नामन्त्रो नास्पृशन् जलम् ॥ ६२ ॥

अर्थ— स्नान केल्यावर पूर्वी सांगितल्याप्रमाणे वस्त्र धारण करून आचमन करावें. तें उभें राहून करूं नये, वांकून करूं नये, मंत्रावांचून करूं नये आणि जलस्पर्श केल्यावांचून करूं नये.

सव्यहस्तेन (?) त्र्यङ्गुल्या शङ्खीकृत्य पिबेत्पयः ॥
माषमात्रं प्रमाणं स्याज्जलमाचमने शुभम् ॥ ६३ ॥

अर्थ— उजव्या हातानें तीन बोटांनी शंखमुद्रा करून जलप्राशन करावें. आचमनाचें पाणी उडीदभर असावें, हें त्याचें मुख्य प्रमाण आहे.

सम्मृज्यात्तिर्यगास्यं त्रिः संवृत्त्याङ्गुष्ठमूलतः ॥
अधोवक्त्रमुपरिष्टात्तलेन द्विः सम्मार्जयेत् ॥ ६४ ॥

अर्थ— आचमन केल्यावर दोनी ओंठ मिटून हाताच्या अंगठ्याच्या मूळानें नुसतें ओंठ तीन वेळां पुसावें; आणि खालच्या ओंठाच्या खालचा भाग हाताच्या तळव्यानें दोन वेळ पुसावा.

एकवारं स्पृशेदास्यं तर्जन्याद्यंगुलित्रिभिः ॥ घ्राणरन्ध्रद्वयं स्पृशेत्तर्जन्यङ्गुष्ठयुग्मतः ॥ ६५ ॥ स्पृशेच्चाक्षिद्वयं साक्षादनामिकांगुष्ठतोऽपि च ॥ श्रोत्रयोर्युगलं पश्चात्कनिष्ठिकाङ्गुष्ठयोगतः ॥ ६६ ॥ अंगुष्ठेन तु नाभिं च करतलेन वक्षसि ॥ बाहुयुग्मं कराग्रेण सर्वाभिर्मस्तकं स्पृशेत् ॥ ६७॥

अर्थ— तर्जनी वगैरे तीन बोटांनी एक वेळ तोंडाला स्पर्श करावा. तर्जनी आणि आंगठा ह्या दोहोंच्या योगानें नाकाच्या दोनी छिद्रांना स्पर्श करावा. अनामिका ( मधल्या बोटाच्या पलीकडील बोट ) आणि आंगठा ह्या दोन बोटांनी दोनी डोळ्यांना स्पर्श करावा. शेवटचें बोट आणि आंगठा ह्या दोन बोटांनी कानांला स्पर्श करावा. अंगठ्यानें नाभी आणि तळहातानें ऊर ह्यांना स्पर्श करावा. बोटांच्या शेंड्यांनी दोनी बाहुट्यांना स्पर्श करावा, आणि सगळ्या बोटांनी मस्तकाला स्पर्श करावा.

आचमनेऽङ्गभेदास्तु चैते द्वादशधा मताः ॥

क्रियाभेदास्तथा ज्ञेयाः पञ्चदशेति संख्यया ॥ ६८ ॥

अर्थ— एका आचमनांत ही बारा अंगें स्पर्श करावयाची असतात. आणि क्रिया मात्र पंधरा होतात.

भुजद्वयाशिरोनाभिमुखरन्ध्राणि सप्तधा ॥
वक्षश्च द्वादशाङ्गानि प्रोक्तानि श्रीजिनागमे ॥ ६९ ॥

अर्थ— दोन बाहु, मस्तक, नाभि, मुखांतील सात छिद्रें ( मुखाचें एक, डोळे आणि कान ह्यांची प्रत्येकाची दोन दोन, मिळून सात छिद्रें ) आणि ऊर हीं बारा अंगें जिनागमांत सांगितलीं आहेत.

एतेष्वङ्गेषु प्रस्वेदो जायते श्रमयोगतः ॥
विण्मूत्रोत्सर्जने भोगे भोजने गमनादिषु ॥ ७० ॥

अर्थ— मल आणि मूत्र ह्यांचें विसर्जन, स्त्रीसंभोग, भोजन आणि गमन ह्या व्यापारामुळें जे श्रम होतात, त्यांच्या योगानें वर जीं बारा अंगें सांगितलीं त्यांना घाम येतो.

श्रोत्रचक्षुर्मुखघ्राणकक्षाकुक्षिषु नाभिषु ॥
स्रावो जातो यतस्तस्माच्चाचमनं क्रियते पुनः ॥ ७१ ॥

अर्थ— आणि कान, डोळे, तोंड, नाक, दोनी कुश्या, दोनी काखा आणि नाभि ह्यांच्या ठिकाणी स्राव होतो. ह्मणून वरचेवर आचमन करावें. [ आचमन केलें ह्मणजे तीं अंगें वरचेवर पुसलीं जातात.

त्यामुळें त्यांचा मल जातो. ]

आचम्यैवं कुशं कृत्वाऽनामिकायां सुनिर्मलम् ॥
नासाग्रं च तयाऽङ्गुष्ठकेन धृत्वा विधानतः ॥ ७२ ॥
कुम्भकः पूरकश्चैव रेचकश्च विधीयते ॥
अन्तस्थं सकलं पापं रेचकात्क्षयमाप्नुयात् ॥ ७३ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें आचमन करून स्वच्छ दर्भाचें पवित्र अनामिकेंत घालावें. मग ती अनामिका आणि अंगुष्ठ ह्या दोन बोटांनी नाक धरून पूरक ( वर श्वास ओढणें ) कुंभक ( पोटांत वायु दाबून धरणें ) आणि रेचक ( नाकावाटें वायू बाहेर सोडणें ) असा प्राणायाम करावा. त्यांत रेचकानें आंतील सर्व पाप नाश पावतें. ह्मणजे बाहेर निघून जातें.

दक्षिणे रेचकं कुर्याद्वामेनापूर्य चोदरम् ॥
कुम्भकेन जपं कुर्यात्प्राणायामः स उच्यते ॥ ७४ ॥

अर्थ— नाकाच्या दोन छिद्रापैकीं डावेकडील छिद्रानें उदरांतील अवकाश भरेपर्यंत पूरक करावा आणि उजव्या छिद्रानें रेचक करावा. आणि मध्यें जेव्हां कुंभक असेल त्या वेळी जप करावा. ह्यास प्राणायाम असें ह्मणतात.

पञ्चाङ्गुलीभिर्नासाग्रपीडनं प्रणवाभिधा ॥
मुद्रेयं सर्वपापघ्नी वानप्रस्थगृहस्थयोः ॥ ७५ ॥

अर्थ— पांचही बोटांनी नाकाचा शेंडा दाबून धरणें ह्याला 'प्रणवमुद्रा' ह्मणतात. ही मुद्रा वानप्रस्थ आणि गृहस्थ ह्यांच्या सर्व पातकांचा नाश करिते. ह्मणून त्यांनींच ती मुद्रा करावी, दुसऱ्यांनीं करूं नये.

कनिष्ठानामिकाङ्गुष्ठैर्नासाग्रस्य प्रपीडयन् ॥
ओंकारमुद्रा सा प्रोक्ता यतेश्च ब्रह्मचारिणः ॥ ७६ ॥

अर्थ— हाताचें शेवटचें बोट, अनामिका आणि अंगुष्ठ ह्या तीन बोटांनीं नाक धरणें ह्याला 'ओंकारमुद्रा' असें ह्मणतात. ही यती आणि ब्रह्मचारी ह्यांनाच करावयास सांगितली आहे.

तीर्थतटे प्रकर्तव्यं प्राणायामं तथाऽऽचमम् ॥
सन्ध्या श्राद्धं च पिण्डस्य दानं गेहेऽथवा शुचौ ॥ ७७ ॥

अर्थ— प्राणायाम, संध्या, श्राद्ध आणि पिंडदान ह्या क्रिया तीर्थाच्या तीरावर कराव्यात. किंवा घरांतील शुद्ध जाग्यांत कराव्यात.

सिंहकर्कटयोर्मध्ये सर्वा नद्यो रजस्वलाः ॥
तासां तटे न कुर्वीत वर्जयित्वा समुद्रगाः ॥ ७८ ॥

अर्थ— कर्कसंक्रमण आणि सिंहसंक्रमण ह्या दोन संक्रमणांत सर्व नद्या रजस्वला असतात; ह्मणून त्या दोन संक्रमणात त्यांच्या तीरावर कांहींच करूं नये. परंतु ज्या नद्या स्वतः समुद्राला मिळाल्या आहेत त्या मात्र रजस्वला समजूं नयेत.

उपाकर्मणि चोत्सर्गे प्रातःस्नाने तथैव च ॥
चन्द्रसूर्यग्रहे चैव रजोदोषो न विद्यते ॥ ७९ ॥

अर्थ— उपाकर्म, उत्सर्जन, प्रातःस्नान आणि चंद्रसूर्याच्या ग्रहणाच्या निमित्तानें प्राप्त होणारें स्नान ह्या कृत्यांस नद्यांचा रजस्वलापणाचा दोष मानूं नये.

धनुस्सहस्राण्यष्टौ तु गतिर्यासां न विद्यते ॥
न ता नद्यः समाख्याता गर्तास्ताः परिकीर्तिताः ॥ ८० ॥

अर्थ— आठ हजार धनुष्यपर्यंत लांब जी नदी गेली नसेल तिला नदी असें ह्मणूं नये. तर तो एक प्रकारचा खड्डाच समजावा.

दर्भाविषयीं.

कुशाः काशा यवा दूर्वा उशीराश्च कुकुन्दराः
गोधूमा व्रीहयो मुंजा दश दर्भाः प्रकीर्तिताः ॥ ८१ ॥

अर्थ— कुश, काश नांवाचें गवत, दूर्वा, वाळा, कुकुंदर (?) एक प्रकारचें गवत, गहू, भात, जव आणि मोळ ह्या दहा प्रकारच्या वस्तूंना दर्भ ह्मणावें.

नभोमासस्य दर्शे तु शुभ्रान् दर्भान् समाहरेत् ॥
अयातयामास्ते दर्भा नियोज्याः सर्वकर्मसु ॥ ८२ ॥

अर्थ— श्रावणमासाच्या अमावास्येला पांढऱ्या वर्णाचे दर्भ उपडून आणावेत. ते दर्भ शिळे होत नाहींत. ते दर्भ सर्व कर्मांत ग्राह्य समजावेत.

कृष्णपक्षे चतुर्दश्यामानेतव्या कुशा द्विजैः ॥
अकालिकास्तथा शुद्धा अत ऊर्ध्वं विगर्हिताः ॥ ८३ ॥

अर्थ— ह्या अमावास्येला न आणतां मध्येंच जर दर्भ आणावयाचे असतील, तर, ते कृष्णपक्षांतील चतुर्दशीच्या दिवशीं आणावेत. ह्मणजे ते शुद्ध समजण्यास हरकत नाहीं. ह्याहून दुसऱ्या कोणत्याही दिवशीं आणलेले दर्भ अशुद्ध समजावेत.

शुद्धिमन्त्रेण सम्मन्त्र्य सकृच्छित्वा समुध्दरेत् ॥
अच्छिन्नाग्रा अशुष्काग्राः पूजार्थं हरिताः कुशाः ॥ ८४ ॥

अर्थ— शुद्धीच्या मंत्रानें अभिमंत्रण करून दर्भ उपडून घ्यावेत. ते दर्भ हिरवे असावेत; त्यांचे

शेंडे तुटलेले अथवा वाळलेले असूं नयेत. हे दर्भ पूजेच्या उपयोगीं पडतात.

कुशालाभे तु काशाः स्युः काशाः कुशमयाः स्मृताः ॥
काशाभावे गृहीतव्या अन्ये दर्भा यथोचितम् ॥ ८५ ॥

अर्थ— कुश नावांचे दर्भ जर मिळाले नाहींत तर काश नांवाचे दर्भ घ्यावेत. कारण, तें काश नावाचे गवतही दर्भाप्रमाणेंच मानलें आहे. तेंही न मिळालें तर जसे मिळतील तसे दुसरे दर्भ घ्यावेत.

धर्मकृत्येषु सर्वेषु कुशा ग्राह्याः समाहिताः ॥
दूर्वाः श्लक्ष्णाः सदा ग्राह्याः सर्वेषु शुभकर्मसु ॥ ८६ ॥

अर्थ— सर्व धर्मकृत्यांत कुश नांवाचे दर्भ अवश्य घ्यावेत. आणि ताज्या दूर्वा सर्व प्रकारच्या शुभकर्मांत घ्याव्यात.

ये त्वन्तर्गर्भिता दर्भा ये छेद्या नखैस्तथा ॥
कुथिताश्चाग्निदग्धाश्च कुशा यत्नेन वर्जिताः ॥ ८७ ॥

अर्थ— ज्या दर्भाच्या आंत सुरळी आहे असे दर्भ, नखांनीं खुडलेले दर्भ, विजा केलेले दर्भ आणि अग्नीनें जळलेले दर्भ, हे दर्भ केव्हांच घेऊं नयेत.

अमावास्यां (?) न च छिंद्यात्कुशांश्च समिधस्तथा ॥

अष्टम्यां च चतुर्दश्यां पंचम्यां धर्मपर्वसु ॥ ८८ ॥

अर्थ— अमावास्येच्या दिवशीं (श्रावण अमावास्येवांचून इतर अमावास्येच्या दिवशी) आणि अष्टमी, चतुर्दशी, पंचमी व इतर पर्वतिथि ह्या दिवशी-दर्भ आणि समिधा कापूं नयेत.

समित्पुष्पकुशादीनि श्रोत्रियः स्वयमाहरेत् ॥
शूद्रानीतैः क्रयक्रीतैः कर्म कुर्वन्व्रजत्यधः ॥ ८९ ॥

अर्थ— समिधा, फुलें आणि दर्भ हे पदार्थ श्रावकानें आपणच काढून आणावेत. असें न करितां जर ते दर्भ शूद्रानें काढून आणलेले घेतले, किंवा विकत मिळत असलेले घेतले आणि त्यांचा कर्मांत उपयोग केला, तर, तो मनुष्य अधःपाताला पावतो.

आता पवित्राचें लक्षण सांगतात

चतुर्भिर्दर्भपिञ्जूलैर्ब्राह्मणस्य पवित्रकम् ॥
एकैकन्यूनमुद्दिष्टं वर्णे वर्णे यथाक्रमम् ॥ ९० ॥

अर्थ— चार-दर्भांच्या योगानें ब्राह्मणाचे पवित्रक होतें. बाकीच्या वर्णांनी एकेक दर्भ क्रमाने कमी करून पवित्रक करावें. ह्मणजे क्षत्रियांनी तीन दर्भांचें आणि वैश्यांनी दोन दर्भांचें पवित्रक करावें.

सर्वेषां वा भवेत् द्वाभ्यां पवित्रं ग्रथितं नवम् ॥

त्रिभिश्च शान्तिके कार्ये पौष्टिके पञ्चभिस्तथा ॥ ९१ ॥

अर्थ— अथवा सर्व वर्णांच्या लोकांचें (त्रैवर्णिकांचें) पवित्रक दोन दर्भांचेंच असावें. शांतिकृत्यांत तीन दर्भांचें व पौष्टिककर्मांत पांच दर्भांचें असावें; एवढा त्यांत विशेष आहे.

चतुर्भिश्चाभिचारे तु निष्कामैरिति केचन ॥
द्वौ दर्भौ दक्षिणे हस्ते सर्वदा नित्यकर्मणि ॥ ९२ ॥

अर्थ— जारणमारण कर्मांत चार दर्भांचें पवित्रक असावें. कितिएकांचें म्हणणें निष्काम मनुष्यांनीं चार दर्भांचें पवित्र घालावें असें आहे. नित्यकर्मांत उजव्या हातांत दोन दर्भांचें पवित्र सर्वदा धारण करावें.

पूजायां तु त्रयो ग्राह्याः साग्राः स्युः षोडशाङ्गुलाः ॥
द्विमूलमेकतः कुर्यात्पवित्रं चाग्रमेकतः ॥ ९३ ॥

अर्थ— पूजा करतांना तीन दर्भांचें पवित्रक घालावें. पवित्राचे दर्भ सोळा बोटें लांब असावेत. त्या सर्व दर्भांचे बुडखे एकाच बाजूस असावेत, आणि शेंडे एका बाजूस जुळून असावेत.

द्व्यङ्गुलं मूलवलयं ग्रन्थिरेकाङ्गुला मता ॥ चतुरङ्गुलमग्रं स्यात्पवित्रस्य प्रमाणकम् ॥ ९४ ॥

अर्थ— बोटांत घालावयाचें पवित्राचें वलय दोन बोटें असावें. गाठ एक बोट, आणि शेंडा चार बोटें असावा; असें पवित्राचें प्रमाण आहे.

स्नाने दाने जपे यज्ञे स्वाध्याये नित्यकर्मणि ॥
सपवित्रौ सदर्भौ वा करौ कुर्वीत नान्यथा ॥ ९५ ॥

अर्थ— स्नान, दान, जप, यज्ञ, स्वाध्याय आणि नित्यकर्म ह्या कर्मांत पवित्र किंवा दर्भ ह्यांनीं युक्त हात असावेत. इतर वेळी पवित्र किंवा दर्भ हातांत धारण करूं नयेत.

करयुग्मस्थितैर्दर्भैः समाचामति यो गृही ॥
महत्पुण्यफलं तस्य भुक्ते चतुर्गुणं भवेत् ॥ ९६ ॥

अर्थ— दोन्ही हातांत दर्भ धारण करून जो गृहस्थ श्रावक आचमन करतो, त्याचें पुण्यफल फार मोठें आहे. आणि पवित्र धारण करून भोजन करील तर तें पुण्य चौपट अधिक होईल.

दर्भ विना न कुर्वीत चाचमं जिनपूजनम् ॥
जिनयज्ञे जपे होमे ब्रह्मग्रन्थिर्विधीयते ॥ ९७ ॥

अर्थ— दर्भ धारण केल्यावांचून आचमन, जिनपूजन वगैरे क्रिया करूं नयेत. जिनपूजन जप आणि होम ह्या कर्मांत पवित्राला ब्रह्मग्रंथि ( ब्रह्मगांठ ) असावी.

सपवित्रः सदर्भो वा कर्माङ्गाचमनं चरेत् ॥
नोच्छिष्टं तत्पवित्रं तु भुक्त्वोच्छिष्टं तु वर्जयेत् ॥ ९८ ॥

अर्थ— पवित्र किंवा दर्भ हातांत धारण करून आचमन करावें. ह्याप्रमाणें आचमन केल्यानें तें पवित्र उष्टें होत नाहीं. फक्त भोजन केलें ह्मणजे मात्र उष्टें होतें. मग तें पवित्र टाकून द्यावें.

पवित्राचे प्रकार.

दार्भं नागं च ताम्रं वा राजतं हैममेव च ॥
त्रिभूपा दक्षिणे पाणौ पवित्रं चोत्तरोत्तरम् ॥ ९९ ॥

अर्थ— दर्भ, शिस्सें, तांबें, रुपें आणि सोनें ह्यांतील कोणत्याही एक प्रकारचें पवित्र करून उजव्या हातांत घालावें. ह्यांत पहिल्यापेक्षां दुसरें, त्यापेक्षां तिसरें, ह्याप्रमाणें उत्तरोत्तर पवित्रें अधिक शुद्ध समजावींत.

अनामिक्यां(?) धृतं हैमं तर्जन्यां रौप्यमेव च ॥
कनिष्ठायां धृतं ताम्रं तेन पूतो भवेन्नरः ॥ १०० ॥

अर्थ— अनामिकेच्या ठिकाणीं सोन्याचें पवित्र, तर्जनीच्या ठिकाणीं रुप्याचें आणि कनिष्ठिकेच्या ठिकाणीं तांब्याचें पवित्र धारण केलें असतां, त्या योगानें मनुष्य शुद्ध होतो.

कर्णयोः कुण्डले रम्ये कङ्कणं करभूपणम् ॥
उत्तरियं योगपट्टं पादुके रौप्यनिर्मिते ॥ १०१ ॥

अर्थ— श्रावकानें कानांत कुंडलें, हातांत सुवर्णाचें कंकण, उत्तरीय वस्त्र, योगपट्ट ( मस्तकास बांध-

ण्याचें वस्त्र ) आणि रुप्याच्या पादुका हे पदार्थ अवश्य धारण करावेत.

न धार्यं पितरि ज्येष्ठे भ्रातरि सुखजीवति ॥
योगपट्टं च तर्जन्यां मौंजं रौप्यं च पादुका ॥ १०२ ॥

अर्थ— पिता किंवा वडील बंधु जीवंत असतां योगपट्ट, तर्जनीच्या ठिकाणीं रुप्याचें अथवा मोळाचें पवित्रक आणि पादुका ह्या वस्तु धारण करूं नयेत.

॥ अथ सन्ध्याचमनमन्त्रः ॥

पवित्रप्रदेशे उपविश्य सन्ध्या कार्या ॥

अर्थ— पवित्र जागीं बसून संध्या करावी. प्रथम पुढें सांगितल्याप्रमाणें संकल्प करावा.

ॐ अद्य भगवतो महापुरुषस्य श्रीमदादिब्रह्मणो मतेऽत्र सरस्तीरे
तस्य प्रपौत्रः तस्य पौत्रः तस्य पुत्रः श्रीवत्सगोत्रजोऽहं देवदत्तनामा
प्रातःसन्ध्यां करिष्य इति मुकुलितकरः संकल्पः ॥

अर्थ— 'ओं अद्य भगवतो' इत्यादि संकल्प प्रथम करावा. तो करतांना दोनी हात जोडलेले असावेत. ह्या संकल्पांत ' तस्य प्रपौत्रः ( त्याचा पणतु ) तस्य पौत्रः (त्याचा नातु) आणि तस्य पुत्रः ( त्याचा मुलगा ) असा मी असें ह्मणावयाचें असतें. त्या ठिकाणीं संकल्प करणाऱ्यानें आपल्या पणजाचें, अजाचें आणि

बापाचें जें नांव असेल, तें उच्चारावें. तसेंच 'श्रीवत्सगोत्रजः' असें ज्याठिकाणीं आहे तेथें संकल्प करणाऱ्यानें आपल्या गोत्राचा उच्चार करावा. आणि 'देवदत्तनामा' ह्या ठिकाणीं संकल्प करणाऱ्यानें आपल्या नांवाचा उच्चार करावा. ह्याप्रमाणें संकल्प करावा.

ॐ ह्रीँ इवीँ क्ष्वीँ वं मं हं सं तं पं द्रां द्रीं हं सः स्वाहा ॥ १ ॥ इत्यनेनाचमनं कुर्यात् ॥ शंखमुद्रितहस्तेन सर्वोऽप्यत्र पिबेज्जलम् ॥

अर्थ— ॐ ह्रीँ, इत्यादि मंत्र ह्मणून आचमन करावें. आचमनाचें पाणी शंखाकार हस्तानें सर्वांनी (त्रैवर्णिकांनीं) प्राशन करावें.

ॐ ॐ ॐ ॥ इत्येवं प्रत्येकमुच्चारयन् अंगुष्ठमूलेन त्रिधा वक्त्रं तिर्यक् सम्मार्जयेत् ॥

अर्थ— ॐ ॐ ॐ असें तीन वेळां ह्मणून प्रत्येक वेळीं अंगठ्याच्या मुळानें आडवें [ उजवीकडून डावीकडे ] तोंड पुसावें. ह्याप्रमाणें तीन वेळ करावें.

ह्रीँ ह्रीँ ह्रीँ ॥ इति हस्ततलेनोपरिष्टादधो द्विः सम्मार्जयेत् ॥

अर्थ— ह्रीं ह्रीं ह्रीं असें ह्मणून तळहातानें वरून खालीं ह्याप्रमाणें दोन वेळां तोंड पुसावें.

इवीँ इवीँ ॥ इति तर्जन्यादित्रयेणास्यं स्पृशेत् ॥

अर्थ— ह्या मंत्रानें तर्जनी वगैरे तीन बोटांनीं तोंडाला स्पर्श करावा.

क्ष्वीँ इत्येकवार मुखं एवं तर्जन्यंगुष्ठाभ्यां दक्षिणं वामं च नासाविवरं वं मं ॥ अंगुष्ठानामिकाभ्यां चक्षुषी हं सं ॥ कनीयस्यंगुष्ठयुग्मेन श्रोत्र-युग्मं तं पं ॥ अंगुष्ठेन नाभिं द्रां ॥ तलेन हृदयं द्रीँ ॥ हस्ताग्रेण भुज-शिखरयुगं हं सः ॥ समस्तहस्तकेन मस्तकं स्पृशेदेकवारमेव स्वाहा इति ॥ श्रोत्राचमनविधिः क्रियाभेदात्पञ्चदशधा । अङ्गभेदात्पुनर्द्वादशधा ॥

अर्थ— नंतर "क्ष्वी" ह्या मंत्रानें एकवार मुखाला स्पर्श करावा. "वं मं" ह्या मंत्रानें अंगठा आणि त्याच्या जवळचें बोट ह्या दोहोंनी नाकाच्या छिद्रांस स्पर्श करावा. अंगठा आणि अनामिका ह्या दोन बोटांनी "हं स" ह्या मंत्राने दोनी डोळ्यांस स्पर्श करावा. शेंवटचें बोट आणि अंगठा ह्या दोन बोटांनी "त पं" ह्या मंत्राने दोनी कानांस स्पर्श करावा. "द्रां" ह्या मत्रानें नुसत्या अंगठ्यानें नाभीला स्पर्श करावा. "द्रीँ" ह्या मंत्रानें तळहताने उराला स्पर्श करावा. "हं सः" ह्या मंत्रानें सर्व बोटांच्या शेवटानें दोनी बाहुल्यांस स्पर्श करावा. आणि "स्वाहा" ह्या मंत्रानें सर्व हातानें मस्तकाला एकवार स्पर्श करावा. ह्याप्रमाणें हा श्रोत्राचमनाचा विधि सांगितला. ह्या विधींत पंधरा क्रिया आहेत, आणि स्पर्श करण्याचीं अंगें बारा आहेत. हा वरील विधि करतांना त्या त्या बोटास वगैरे पाणी लावून त्या त्या अंगाला स्पर्श करावा.

ततोऽनामिकायां दर्भं निधायानामिकाङ्गुष्ठाभ्यां नासाग्रं गृहीत्वा ।

ॐ भूर्भुवः स्वः अ सि आ उ सा प्राणायामं करोमि स्वाहा ॥

इति त्रिरुच्चार्य कुम्भकपूरकरेचकान् कुर्वन् प्राणायामं कुर्यात् ॥

॥ इति सन्ध्योपासनविधि ॥

अर्थ— नंतर अनामिकेंत पवित्रक धारण करून, अनामिका आणि अंगठा ह्या दोन बोटांनीं नाकाचा अग्रभाग धरावा. आणि 'ॐ भुर्भूवः स्वः" इत्यादि मंत्र तीन वेळां ह्मणून प्रणायाम करावा. त्यांत पूरक कुंभक आणि रेचक हे करावेत. हा संध्योपासनाचा विधि सांगितला. आतां अर्घ्योपासनेचा विधि पुढें सांगतात.

॥ अथार्घोपासनाविधिः ॥

शुद्धां कृत्वा ततो भूमिं शोधितोदकसेचनैः ॥
उपविश्य नदीतीरे तत्र जन्तुविवर्जिते ॥ १०३ ॥
आचमनं ततः कृत्वाऽनामिकायां कुशं ततः ॥
निधाय मार्जनं कृत्वा मस्तकोपरि सेचयेत् ॥ १०४ ॥
सव्यहस्तेन देवेभ्यो दत्वा भूमौ जलाञ्जलिम् ॥
पीत्वाऽऽचम्य च सम्मार्ज्य मस्तकोपरि सिञ्चयेत् ॥ १०५ ॥

अर्थ— आतां अर्घ्य देण्याचा विधि सांगतात. नदीच्या तीरावरील भूमि गाळलेलें पाणी शिंपडून

शुद्ध करावी. त्या भूमीवर जीवजंतु नसावेत. मग त्या ठिकाणी बसून पुनः पूर्वी सांगितलेल्या विधीनें आचमन करून, अनामिकेंत दुसरें पवित्र धारण करावें. मग मार्जन करून आपल्या मस्तकावर पाणी शिंपडावें. नंतर उजव्या हातानें देवांना "भूमीवर अंजलि भरून" पाणी द्यावें. ह्याप्रमाणें केल्यावर पुनः आचमन व मार्जन करून मस्तकावर पाणी शिंपडावें.

षट् वा त्रीण्यथवाऽर्घाणि समुद्धार्यं सुधीस्ततः ॥
कुशाद्यासनसुस्थाने चोपविश्य समासतः ॥ १०६ ॥
वंशासने दरिद्रः स्यात्पाषाणे व्याधिपीडितः ॥
धरण्या दुःखसम्भूतिर्दौर्भाग्यं दारुकासने ॥ १०७ ॥
तृणासने यशोहानिः पल्लवे चित्तविभ्रमः ॥
अजिने ज्ञाननाशः स्यात्कम्बले पापवर्द्धनम् ॥ १०८ ॥
नीले वस्त्रे परं दुःखं हरिते मानभंगता ॥
श्वेतवस्त्रे यशोवृद्धिर्हारिद्रे हर्षवर्धनम् ॥ १०९ ॥
रक्तं वस्त्रं परं श्रेष्ठं प्राणायामविधौ ततः ॥
सर्वेषां धर्मसिध्यर्थं दर्भासनं तु चोत्तमम् ॥ ११० ॥

अर्थ— देवांना जी पाण्याची अंजली द्यावयाची ती सात वेळां अथवा तीन वेळां द्यावी. ज्या पाण्यानें ही क्रिया करावयाची तें पाणी नदींतून एका भांड्यात निगाळून घेतलेलें असावें. मग जप करण्याकरितां दर्भासनावर किंवा दुसऱ्या कमल्यातरी आसनावर बसावें. त्यांत, वेळूच्या आसनावर जपास बसलें असतां दारिद्र्य येतें. दगडावर बसलें असतां रोगांची पीडा होते. भूमीवर बसलें असतां दुःख प्राप्त होतें. लांकडाच्या आसनावर बसलें असतां दुर्भाग्य प्राप्त होतें. गवताच्या आसनावर बसलें असतां कीर्तीचा नाश होतो. झाडाच्या पानाच्या आसनावर बसलें असतां मनाला भ्रांति पडते. हरणाच्या किंवा दुसऱ्या कातड्यावर बसलें असतां ज्ञानाचा नाश होतो. फाटक्यावर किंवा दुसऱ्या कोणत्याही लोंकरीच्या आसनावर बसलें असतां पापाची वृद्धि होते. काळ्या वस्त्रावर बसलें असतां फार दुःख होतें. हिरव्या रंगाच्या वस्त्रावर बसलें असतां मानभंग होतो. पांढऱ्या वस्त्रावर यशाची वृद्धि होते. पिंवळ्या वस्त्रावर बसलें असतां सुखाची वृद्धि होते. तांबडें वस्त्र प्राणायामाला फारच उत्तम मानिलें आहे. आणि सर्व धार्मिक क्रियेची सिद्धि होण्यास दर्भाचें आसन श्रेष्ठ आहे असें समजावें.

जप करण्याची रीति.

समं ध्याने मनः कृत्वा मध्यदेशेषु निश्चलम् ॥
ज्ञानमुद्राङ्कितो भूत्वा स्वाङ्के तु वामहस्तकम् ॥ १११ ॥

अंगुष्ठतर्जनीभ्यां तु सव्यहस्तेन निर्मलाम् ॥
जपमालां समादाय जपं कुर्याद्विचक्षणः ॥ १२ ॥

अर्थ— जपाच्या वेळी अंत करणाची समता असावी व तें निश्चल करून त्याची शरीराच्या मध्यभागीं स्थापना करावी. मग ज्ञानमुद्रा करून आपला डावा हात आपल्या डाव्या मांडीवर ठेवावा; आणि उजव्या हातानें जपाची माळ धरावी. ती तर्जनी आणि अंगुष्ठ ह्या दोन बोटांनीं धरावी; आणि जप करावा.

नमस्कारपञ्चपदान् जपेद्यथावकाशकम् ॥
अष्टोत्तरशतं चार्द्धमष्टाविंशतिकं तथा ॥ १३ ॥
द्विद्व्येकपदविश्राम उच्छ्वासाः सप्तविंशतिः ॥
सर्वपापं क्षयं याति जसे पञ्चनमस्कृते ॥ १४ ॥

अर्थ— मग पंचनमस्कारपदाचा जप आपल्याला जसा अवकाश असेल त्याप्रमाणें-एकशेहे आठ किंवा चोपन्न अथवा अठ्ठावीस-करावा. त्यांत 'पांच नमस्कारमंत्रांपैकीं प्रथम पहिल्या दोन नमस्कार मंत्रांच्या पुढें थांबावें. ह्मणजे अर्हद्भ्यो नमः सिध्देभ्यो नमः हे दोन मंत्र ह्मणून थोडें थांबावें. मग पुढले दोन आचार्येभ्यो नमः उपाध्यायेभ्यो नमः मंत्र ह्मणून थांबावें. नंतर एक साधुभ्यो नमः मंत्र ह्मणून थांबावें. ह्या थांबण्यांत श्वास वरती ओढूं नये. कारण एकशेहे आठ वेळा जर मंत्राचा जप करणें असेल, तर

त्याला लागणाऱ्या कालांत सत्तावीस वेळां श्वास वरतीं ओढावा. ह्मणजे वरीलप्रमाणें थांबून पंचनमस्कारमंत्राच्या चार आवृत्ति झाल्या ह्मणजे श्वास वर ओढून घ्यावा. ह्याप्रमाणें प्रत्येक चार चार जप झाल्यावर श्वास वरती ओढावा. अशा रीतीनें जप केला असतां सर्व पातकांचा नाश होतो.

वाचिकाख्य उपांशुश्च मानसस्त्रिविधः स्मृतः ॥
त्रयाणां जपमालानां स्याच्छ्रेष्ठो ह्युत्तरोत्तरः ॥ ११५ ॥

अर्थ— वाचिक, उपांशु आणि मानस असे जपाचे तीन प्रकार आहेत. त्या तीहींत पुढला पुढला जप श्रेष्ठ समजावा. ह्मणजे वाचिकजपापेक्षा उपांशुजप श्रेष्ठ, आणि उपांशुजपापेक्षां मानसजप श्रेष्ठ असें समजावें.

यदुच्चनीचस्वरितैः शब्दैः स्पष्टपदाक्षरैः ॥
मन्त्रमुच्चारयेद्वाचा जपो ज्ञेयः स वाचिकः ॥ ११६ ॥

अर्थ— उच्च, नीच आणि स्वरित ह्या स्वरांनी युक्त असलेल्या शब्दांचा व अक्षरांचा स्पष्ट उच्चार करून मंत्र ह्मणणें हा वाचिकजप जाणावा. (उच्च ह्मणजे उंच स्वर, नीच ह्मणजे खालचा स्वर, आणि स्वरित ह्मणजे उच्च आणि नीच ह्या दोहोंच्या मिश्रणानें झालेला स्वर असें समजावें.)

शनैरुच्चारयेन्मन्त्रं मन्दमोष्ठौ प्रचालयेत् ॥
अपरैरश्रुतः किञ्चित्स उपांशुर्जपः स्मृतः ॥ ११७ ॥

अर्थ— मंत्राचा उच्चार हळू करून ओठ थोडेसे हलवावेत. ह्याप्रमाणें दुसऱ्यास न ऐकूं येईल अशा रीतीनें केलेल्या जपास उपांशुजप असें ह्मणतात.

विधाय चाक्षरश्रेण्या वर्णोद्वर्णं पदात्पदम् ॥
शब्दार्थचिन्तनं भूयः कथ्यते मानसो जपः ॥ ११८ ॥

अर्थ— मंत्रांतील वर्ण व शब्द जसे असतील तसेच ते एकापुढें एक अशा रीतीनें ठेवून (मंत्राच्या अक्षरांत व शब्दांत मागें पुढें न होऊं देतां मनांत आणून) त्यांतील शब्दांच्या अर्थाचा विचार करून जो जप केला जातो, तो मानसजप समजावा.

मानसः सिद्धिकाम्यानां पुत्रकाम्य उपांशुकः ॥
वाचिको धनलाभाय प्रशस्तो जप ईरितः ॥ ११९ ॥

अर्थ— सिद्धीची इच्छा करणाऱ्यानीं मानसजप करावा. पुत्राची इच्छा करणाऱ्यांनीं उपांशु जप करावा. आणि धनलाभाची इच्छा करणाऱ्यांनीं वाचिकजप करावा.

वाचिकस्त्वेक एव स्यादुपांशुः शत उच्यते ॥
सहस्रं मानसः प्रोक्तो जिनसेनादिसूरिभिः ॥ १२० ॥

अर्थ— वाचिक जप एकवेळ केला असतां तो एक वारच केला असें होतें. आणि उपांशुजप एकवार

केला असतां शंभर वेळां केल्याप्रमाणें होतो. तसेंच मानसजपही एकवार केला असतां हजार वेळां केल्यासारखा होतो.

ब्रह्मचारी गृहस्थश्च शतमष्टोत्तरं जपेत् ॥
वानप्रस्थश्च भिक्षुश्च सहस्रादधिकं जपेत् ॥ १२१ ॥

अर्थ— ब्रह्मचारी आणि गृहस्थ ह्यांनी एकशेंहे आठ जप करावा. आणि वानप्रस्थ व यती ह्यांनीं एक हजार आठ जप करावा.

अनध्यायेऽष्टोत्तरं स्याच्छातमन्यत्र चार्द्धकम् ॥
पूजायां दशकं ज्ञेयं यथाशक्ति समाचरेत् ॥ २२ ॥

अर्थ— अनध्यायाच्या दिवशी ( स्वाध्यायास वर्ज्य असलेल्या दिवशीं ) वानप्रस्थ आणि यति ह्यांनी एकशेंहे आठ जप करावा. ब्रह्मचारी आणि गृहस्थ ह्यांनी अर्धा ह्मणजे चोपन्न जप करावा. पूजेच्या प्रसंगी दहा जप करावा किंवा आपल्या शक्तीप्रमाणें करावा.

गृहे जपफलं प्रोक्तं वने शतगुणं भवेत् ॥
पुण्यारामे तथाऽरण्ये सहस्रगुणितं मतम् ॥ २३ ॥
पर्वते दशसाहस्रं नद्यां लक्षमुदाहृतम् ॥

कोटिं देवालये प्राहुरनन्तं जिनसन्निधौ ॥ २४ ॥

अर्थ— घरांत जप केल्यापासून जें फल सांगितलें आहे त्याच्या शंभरपट फल वनात जप केला असतां प्राप्त होतें. पुण्यकारक अशा बागेंत अथवा अरण्यांत जप केला असतां हजारपट फल प्राप्त होतें. पर्वतावर दहा हजारपट, नदीवर लक्षपट, देवालयांत कोटिपट आणि श्रीजिनेंद्राच्या सन्निध जप केला असतां अनंतपट फल प्राप्त होतें.

जपत्यागाची कारणें.

व्रतच्युतान्त्यजातीनां दर्शने भाषणे श्रुतौ ॥
क्षुतेऽधोवातगमने जृम्भणे जपमुत्सृजेत् ॥ २५ ॥

अर्थ— आतां जपाच्या वेळीं काय काय असूं नये तें सांगतात— व्रतापासून भ्रष्ट झालेले लोक व अंत्यज लोक हे दृष्टीं पडले असतां, ह्यांच्यांशीं भाषण केलें असतां आणि ह्यांचें भाषण ऐकिलें असतां तत्काल जप करण्याचें सोडावें. तसेंच शिंक आली असतां, पश्चिम द्वारानें वायु सरकला असतां आणि जांभई आली असतां जप करण्याचें सोडावें.

प्रासाद्याचम्य चैतेषां प्राणायामं षडंगकम् ॥
कृत्वा सम्यक् जपेच्छेषं यद्वा जिनादिदर्शनम् ॥ २६ ॥

अर्थ— वर जी जप सोडण्याची कारणें सांगितली आहेत, त्यांपैकी कोणतेंही कारण झालें असतां आचमन करून षडंग प्राणायाम करावा. किंवा श्रीजिनेंद्रादिकांच्या प्रतिमांचें दर्शन करावें. आणि मग राहिलेला जप समाप्त करावा.

एवं जपविधिं कृत्वा तत उत्थाय भक्तितः ॥
हस्तौ द्वौ मुकुलीकृत्य पूर्वाभिमुखसंस्थितः ॥ २७ ॥
वन्दनाकर्म सन्ध्याया निवर्त्यालसवर्जितः ॥
उपविशेत्पुनस्तत्र शिष्टामाचरितुं क्रियाम् ॥ २८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें भक्तीनें जपविधि समाप्त करून उठून उभें राहावें. मग पूर्वेकडे तोंड करून दोनी हात जोडून संध्येसंबंधी वंदना नांवाची क्रिया करावी. मग राहिलेली क्रिया करण्याकरितां त्याच आसनावर बसावें

सव्यजानुपुरो दर्भयुक्तहस्तद्वयस्तथा ॥
वामहस्तमधः कृत्वा मुकुलीकृत्य दक्षिणम् ॥ २९ ॥
त्रिरुच्चार्य ततो मंत्रं प्राणायामोदितं पुरा ॥
आचमनं पुनः कुर्यान्मुक्तिमार्गप्रदायकम् ॥ १३० ॥
जिनेन्द्रादिमहर्षीणां दर्भदूर्वोदकैस्तथा ॥

वृषभादिसुपितॄणां तिलमिश्रोदकैः परम् ॥ ३१ ॥
जयादिदेवतानां च तर्पणं चाक्षतोदकैः ॥
एवं विधाय सन्ध्यायाः कर्म सान्ध्यं समापयेत् ॥ ३२ ॥

अर्थ— मग उजव्या मांडीवर डावा हात खाली आणि उजवा हात वर असा ठेवावा. दोनी हातांच्या गर्भात दर्भ असावेत. ह्याप्रमाणें झाल्यावर मग प्राणायामाकरितां पूर्वी जो मंत्र सांगितला आहे, तो मंत्र तीन वेळां ह्मणावा. नंतर आचमन करावें. मग दर्भ, दूर्वा आणि अक्षता ह्यांनीं मिश्र अशा उदकानें जिनेंद्र वगैरे महर्षींचें तर्पण करावें. तिल आणि उदक ह्याच्या योगानें वृषभ वगैरे पितरांचें तर्पण करावें. आणि अक्षता व उदक ह्यांच्या योगानें जयादि देवतांचें तर्पण करावें. ह्याप्रमाणें सर्व कर्म झाल्यावर संध्याकर्माची समाप्ति करावी.

शौचान्ते रोगपीडान्ते मृतकानुगमे तथा ॥
अस्पृश्यस्पर्शने चैव आचमादिक्रियां चरेत् ॥ ३३ ॥

अर्थ— वर सांगितलेल्या आचमन व प्राणायाम ह्या क्रिया–स्नान वगैरे करून शुद्ध झाल्यावर (किंवा मलमूत्र विसर्गानंतर शुद्ध झाल्यावर) शरीरांतील रोगाची पीडा नाहीशी झाल्यावर, प्रेताच्या मागून गेलें असतां आणि स्पर्श करण्यास अयोग्य अशा पदार्थांचा स्पर्श झाला असतां–अवश्य कराव्यात.

स्नानतर्पणके त्यक्त्वा शेषां चापि चरेत्क्रियाम् ॥
सर्वां मध्याह्नसायाह्नसन्ध्ययोर्द्विजसत्तमः ॥ ३४ ॥

अर्थ— मध्यान्हकाल आणि सायंकाल ह्या दोनी वेळीं स्नान आणि तर्पण ह्या दोन क्रिया सोडून बाकीच्या वर सांगितलेल्या सर्व क्रिया त्रैवर्णिक श्रावकानें कराव्यात.

संध्येचा काल.

सूर्योदयाच्च प्रागेव प्रातःसन्ध्यां समापयेत् ॥
तारकादर्शनात्पूर्वं सन्ध्यां सायान्हिकीं चरेत् ॥ ३५ ॥
मध्यसन्ध्या तु मध्यान्हे काले कृत्यं फलप्रदम् ॥
अकाले निर्मितं कार्यं स्वल्पं फलति वा न वा ॥ ३६ ॥

अर्थ— प्रातःसंध्या सूर्योदयाच्या पूर्वींच समाप्त करावी. संध्याकाळची संध्या आकाशांत नक्षत्रें दिसूं लागण्याच्या पूर्वीं करावी. आणि मध्यान्हसंध्या मध्यान्हकालीं करावी. कारण योग्यकालीं कर्म केलें असतां तें फल देणारें होतें. आणि अयोग्यकाली केले असतां त्यापासून फल उत्पन्न होतें किंवा नाही ह्याचा संशयच आहे.

घटिकाद्वितयं कालादतिक्रामति चेत्तदा ॥

न दोषाय भवत्यत्र लोकास्याद्दूषणं स्मृतम् ॥ ३७ ॥

अर्थ— कर्माला जो योग्य काल वर सांगितला, त्यापेक्षां दोन घटिकाच जर अधिक झाल्या तर त्यांत दोष नाहीं. परंतु लोकांच्या मुखानें तसें कर्म करणाऱ्याची निंदा होते. ह्मणून तसें करूं नये.

उत्तमा तारकोपेता मध्यमा लुप्ततारका ॥
अधमा सूर्यसंयुक्ता प्रातःसन्ध्या त्रिधा स्मृता ॥ ३८ ॥

अर्थ— जी प्रातःसंध्या पहाटेस नक्षत्रें दिसत असतां होते ती उत्तम समजावी. जी नक्षत्रें दिसेनाशी झाली असतां केली जाते ती मध्यम, आणि सूर्योदयानंतर जी केली जाते ती अधम समजावी. ह्याप्रमाणे प्रातःसंध्येचे तीन प्रकार आहेत.

अहो रात्रेश्च यः सन्धिः सूर्यनक्षत्रवर्जितः ॥
सा तु सन्ध्या समाख्याता मुनिभिस्तत्त्वदर्शिभिः ॥ ३९ ॥

अर्थ— सूर्योदय होण्याच्या पूर्वी आणि नक्षत्रें दिसेनाशी झाल्यावर जो दिवस आणि रात्र ह्यांच्या जोडणीचा काल त्यास संध्या ह्मणावें. असें तत्त्वज्ञानी मुनीनीं सांगितलें आहे.

सन्ध्योत्तमा तृतीयांशे पञ्चमांशे दिनस्य तु ॥
मध्याह्निकी तदूर्ध्वं वा पूर्वेव स्याद्विधौ हि सा ॥ १४० ॥

अर्थ— दिवसाच्या तिसऱ्या भागांत किंवा पांचव्या भागांत मध्यान्हसंध्या करावी. त्याच्या पुढें केलेली संध्या पूर्वीप्रमाणें निष्फल समजावी.

सन्ध्याकाले तु सम्प्राप्ते सन्ध्यां नैवमुपासते ॥
जीवमानो भवेच्छूद्रो मृतः श्वा चैव जायते ॥ ४१ ॥

अर्थ— संध्येचा काल प्राप्त झाला असतां जो संध्या करीत नाहीं; तो जीवंत आहे तोंपर्यंत शूद्र होतो. आणि मेल्यानंतर श्वान होतो.

सन्ध्याकाले त्वतिक्रान्ते स्नात्वाऽऽचम्य यथाविधि ॥
जपेदष्टशतं जाप्यं ततः सन्ध्यां समाचरेत् ॥ ४२ ॥

अर्थ— संध्याकर्म करण्याचा काल निघून गेला असतां, योग्य कालीं संध्याकर्म न झालें असल्यानें; तें करण्याकरितां पुनः स्नान करावें. मग आचमन करून एकशेंहे आठ जप करावा. आणि नंतर संध्या करावी.

राष्ट्रभङ्गे नृपक्षोभे रोगार्तौ सूतकेऽपि च ॥
सन्ध्यावन्दनविच्छित्तिर्न दोषाय कदाचन ॥ ४३ ॥

अर्थ— आपण रहात असलेल्या देशाचा नाश, राजाचा कोप, शरीरांत रोगाची पीडा, ह्यांपैकीं कोणतेंही कारण उत्पन्न झाल्यामुळें संध्यावंदनकर्म जर झालें नाहीं, तर कांहीही दोष लागत नाहीं.

देवाग्निद्विजविद्यानां कार्ये महति सम्भवे ॥
सन्ध्याहीने न दोषोऽस्ति यत्तत्सत्कर्मसाधनात् ॥ ४४ ॥

अर्थ— देव, अग्नि, द्विज आणि विद्या ह्या संबंधाचें कोणतेंही मोठें कार्य व्हावयाचें असल्यामुळें जर संध्या राहिली, तथापि सत्कार्य साधावयाचें असल्यामुळें दोष लागत नाहीं.

॥ अथार्घ्यवितरणमन्त्रः ॥

ॐ ह्रीं क्ष्वीं उपवेशनभूः शुध्यतु स्वाहा ॥ १ ॥ दर्भादिना उपवेशनभूमिं मार्जयेत् ॥

अर्थ— आतां अर्घ्य देण्याचा मंत्र सांगतात– प्रथम "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें बसावयाची जागा दर्भानें किंवा दुसऱ्या कशानें तरी लोटून स्वच्छ करावी.

ॐ ह्रीं अमृते अमृतोद्भवे अमृतवर्षिणि अमृतं स्रावय स्रावय सं सं क्लीं क्लीं ब्लूं ब्लूं
द्रां द्रां द्रीं द्रीं द्रावय द्रावय हं झं क्ष्वीं हं सः अ सि आ उ सा मार्जनं शिर उपरि
सेचनं करोमि स्वाहा ॥ २ ॥ मार्जनान्ते शिरःपरिषेचनम् ॥

अर्थ— नंतर "ॐ ह्रीं अमृते" इत्यादि मंत्रानें मार्जन करावें. आणि मग मस्तकावर पाणी शिंपडावें.

ॐ ह्रीं लॉं वः पः क्लीं क्ष्वीं हं सः चुलकोदकधारणं करोमि स्वाहा ॥ ३ ॥

ततः सव्यचुलकेनोदकमुध्दृत्य ॥

अर्थ— नंतर "ॐ ह्रीं क्ष्वीं" इत्यादि मंत्रानें उजव्या हातानें चुळकांत (पसांत) पाणी घ्यावें.

ॐ ह्रीं अर्हत्सिद्धाचार्योपाध्यायसर्वसाधवो मम दुष्कृतनिष्कृतं अन्तःशुद्धिं कुर्वन्तु ।

हं अं क्ष्वीं क्ष्वीं चुलकामृतं पिबामि स्वाहा ॥ ४ ॥ जलपानं कृत्वाऽऽचम्य ॥

आणि आचमन करावें.

अर्थ— मग "ॐ ह्रीं अर्हत्सिद्ध" इत्यादि मंत्रानें तें चुळकांतील पाणी प्यावें.

ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः नमोऽर्हते भगवते श्रीमते पद्ममहापद्मतिगिंछकेसरिमहा-
पुण्डरीकपुण्डरीकगङ्गासिन्ध्वादिनदनद्याशुदकेन कनककलशपरिपूरितेन वररत्नगन्ध-
पुष्पाक्षताद्यैरभ्यर्चितामोदितेन जगद्वन्द्यार्हत्परमेश्वराभिषवपवित्रीकृतेन मार्जनं
करोमि स्वाहा ॥ ५ ॥ इति जलं संस्पृश्याऽभिमन्त्र्य ॥

अर्थ— नंतर "ओ ह्रां ह्रीं" इत्यादि मंत्रानें जलाला स्पर्श करून त्याचें अभिमंत्रण करावें.

ॐ नमोऽर्हते भगवते श्रीमते प्रक्षीणाशेषदोषाय दिव्यतेजोमूर्तये नमः श्रीशान्ति-
नाथाय शान्तिकराय सर्वविघ्नप्रणाशनाय सर्वरोगापमृत्युविनाशनाय सर्वपरकृतक्षु-
द्रोपद्रवविनाशनाय सर्वक्षामडामरविनाशनाय ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि
आ उ सा नमः द्रौं द्रौं वं शं मं हं सं तं पं क्ष्वीं क्ष्वीं क्ष्वीं हं सः अ सि आ उ सा
मम सर्वशान्तिं कुरु कुरु स्वाहा ॥ ६ ॥

मार्जनं कृत्वा शिरः परिषिच्य षडर्घ्याणि समुद्धरेत ॥

अर्थ— "ॐ नमोऽर्हते भगवते" इत्यादि मंत्रानें मार्जन करून मस्तकावर पाणी शिंपडून पुढील मंत्रानें सहा अर्घ्यें द्यावीत.

ॐ ऱ्हीं सर्वभवनेन्द्रार्चितसमस्ताकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ १ ॥
ॐ ऱ्हीं व्यन्तरेन्द्रार्चितसमस्ताकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ २ ॥
ॐ ऱ्हीं ज्योतिष्केन्द्रार्चितसमस्ताकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ ३ ॥
ॐ ऱ्हीं कल्पेन्द्रार्चितसमस्ताकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ ४ ॥
ॐ ऱ्हीं सर्वाहमिन्द्रार्चितसमस्ताकृतिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ ५ ॥
ॐ ऱ्हीं विश्वेन्द्रार्चितमध्यलोकास्थितसमस्तकृत्रिमाकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ ६ ॥ षडर्घ्यमन्त्राः ॥

अर्थ— हे सहा अर्घ्य देण्याचे मंत्र आहेत. ह्यांतील प्रत्येक मंत्रानें एक एक ह्याप्रमाणें सहा अर्घ्यें द्यावींत.

अथार्घ्यत्रयमन्त्राः ॥ ॐ ऱ्हीं विश्वचक्षुषे स्वाहा ॥ १ ॥ ॐ ऱ्हीं अनुचराय स्वाहा ॥ २ ॥ ॐ ऱ्हीं ज्योतिर्मतये स्वाहा ॥ ३ ॥ इत्यर्घ्यत्रयमन्त्राः ॥

अर्थ— आतां तीन अर्घ्यांचे मंत्र सांगतात. "ॐ ऱ्हीं" इत्यादि हे तीन मंत्र आहेत. ह्यांतील

प्रत्येक मंत्रानें एकेक अर्घ्य द्यावें.

णमो अरिहंताणमित्यादिमन्त्रेणाष्टोत्तरशतं तथा चतुःपञ्चाशत्तथा ससविंशतिकं जपेत् ॥

अर्थ—मग "णमो अरिहंताणं" इत्यादि मंत्राचा एकशेहे आठ किंवा चोपन्न अथवा सत्तावीस इतका जप करावा.

ततश्च ॥ स्वयम्भूर्भगवानर्हन्परः परमपूरुषः ॥
परमात्मा पवित्रात्मा पवित्रयतु नो मनः ॥ ४५ ॥
देवदेवो महादेवः परात्मा परमेश्वरः ॥
परमः परमब्रह्म स्वयम्भूतः पुनातु नः ॥ ४६ ॥
भूर्भुवःस्वः स्वधा स्वाहा पवित्रं पावनं परम् ॥
पूतं भागवतं ज्योतिः पुनीतान्मम मानसम् ॥ ४७ ॥
इत्युच्चार्य परमात्मानं नमस्कुर्यात् ॥

अर्थ— नंतर " स्वयंभूर्भगवानर्हन् " इत्यादि तीन श्लोक म्हणून परमात्मा जो श्रीजिनेंद्र त्याला नमस्कार करावा.

ततो जलाञ्जलिं गृहीत्वा क्षं वं व्हः पः हः स्वाहा ॥ इति मन्त्रमुच्चारयन् प्रदक्षिणं परिक्रम्य पूर्वस्यां दिशि जलं विसृजेत् ॥

अर्थ— पुढें आपल्या अंजलींत पाणी घेऊन " झं वं " इत्यादि मंत्र ह्मणत आपल्या सभोवतीं प्रदक्षिणा करावी. आणि तें अंजलींतील उदक पूर्वदिशेकडे तोंड करून खाली सोडावें.

ततोऽपि मुकुलितकरकुड्मलः सन् " ॐ नमोऽर्हते भगवते श्रीशान्ति-
नाथाय शान्तिकराय सर्वविघ्नप्रणाशनाय सर्वरोगापमृत्युविनाशनाय
सर्वपरकृतक्षुद्रोपद्रवविनाशनाय मम सर्वशांतिर्भवतु ॥" इत्युच्चार्य—

अर्थ— मग हात जोडून " ॐ नमोऽर्हते भगवते " इत्यादि मंत्र ह्मणावा. नंतर पूर्वेकडे तोंड करून " पूर्वस्यां दिशि इन्द्रः प्रसीदतु " असें ह्मणावें. आग्नेयदिशेकडे तोंड करून " आग्नेय्यां दिशि अग्निः प्रसीदतु " असे ह्मणावें. दक्षिणेकडे तोंड करून " दक्षिणस्या दिशि यमः प्रसीदतु " असें ह्मणावें. नैर्ऋत्यदिशेकडे तोंड करून " नैर्ऋत्यां दिशि निर्ऋतः प्रसीदतु " असें ह्मणावें. पश्चिमेकडे तोंड करून " पश्चिमस्यां दिशि वरुणः प्रसीदतु " असें ह्मणावें. वायव्यदिशेकडे तोंड करून " वायव्यां दिशि वायुः प्रसीदतु " असें ह्मणावें. उत्तरेकडे तोंड करून " उत्तरस्यां दिशि यक्षः प्रसीदतु " असें ह्मणावें. ईशान्य दिशेकडे तोंड करून "ईशान्यां दिशि ईशानः प्रसीदतु" असें ह्मणावें. खाली तोंड करून "अधरस्यां दिशि धरणेन्द्रः प्रसीदतु" असे ह्मणावें. आणि वरती तोंड करून " ऊर्ध्वायां दिशि चन्द्रः प्रसीदतु " असें ह्मणावें.

इति दशदिक्पालान्प्रसाद्य सन्ध्यावन्दनां निवर्तयेत् ॥

अर्थ— ह्याप्रमाणें दशदिक्पालांना प्रसन्न करून घेऊन संध्यावंदन कर्म समाप्त करावें.

अथोत्तरक्रिया ॥ तदनन्तरमुपविश्य सव्यजान्वग्रे दर्भगर्भं मुकुलीकृत्य करकुड्मलमधरीकृत्य वामहस्तं विन्यस्य प्राणायाममन्त्रं त्रिरुच्चार्य- मोक्षमार्गस्य नेतारं भेत्तारं कर्मभूभृताम् ॥ ज्ञातारं विश्वतत्त्वानां वन्दे तद्गुणलब्धये ॥ १ ॥ सम्यग्दर्शनज्ञानचारित्राणि मोक्षमार्गः ॥ इति वाचनां गृहीत्वा दर्भोदकेन ऋषीणां तर्पणं कुर्यात् ॥ तद्यथा—

अर्थ— आतां पुढची क्रिया सांगतात— संध्यावंदन झाल्यावर आसनावर पर्यंकासनानें बसून उजव्या गुडघ्यावर दोनी हात कमलाच्या कळीप्रमाणें जोडून ठेवावेत. त्यांत डावा हात खालीं आणि उजवा हात वरती असावा. हातांत दर्भ असावेत. मग प्राणायाममंत्राचा तीन वेळां उच्चार करून "मोक्षमार्गस्य नेतारं" हा श्लोक आणि "सम्यग्दर्शन" इत्यादि म्हणावें. मग हातांत दर्भ धरून ऋषींचें तर्पण करावें. त्याचे मंत्र पुढें दिलेले आहेत.

ऋषितर्पण.

ॐ ह्रीं अर्हत्परमेष्ठिनस्तर्पयामि । ॐ ह्रीं सिद्धपरमेष्ठिनस्तर्पयामि ॥
ॐ ह्रीं आचार्यपरमेष्ठिनस्तर्पयामि । ॐ ह्रीं उपाध्यायपरमेष्ठिनस्त-

र्पयामि ॥ ॐ ऱ्हीं सर्वसाधुपरमेष्ठिनस्तर्पयामि ॥ ॐ ऱ्हीं जिनांस्तर्पयामि ॥ ॐ ऱ्हीं अवधिजिनांस्तर्पयामि ॥ ॐ ऱ्हीं परमावधिजिनांस्तर्पयामि ॥ ॐ ऱ्हीं सर्वावधिजिनांस्तर्पयामि ॥ ॐ ऱ्हीं अनन्तावधिजिनांस्तर्पयामि १० ॥ एवं ११ ॐ ऱ्हीं कोष्ठबुद्धींस्तर्पयामि ॥ १२ ॐ ऱ्हीं बीजबुद्धींस्तर्पयामि ॥ १३ ॐ ऱ्हीं पादानुसारिणस्तर्पयामि ॥ १४ ॐ ऱ्हीं सम्भिन्नश्रोतॄंस्तर्पयामि ॥ १५ ॐ ऱ्हीं प्रत्येकबुद्धांस्तर्पयामि ॥ १६ ॐ ऱ्हीं स्वयम्बुद्धांस्तर्पयामि ॥ १७ ॐ ऱ्हीं बोधितबुद्धांस्तर्पयामि ॥ १८ ॐ ऱ्हीं ऋजुमतींस्तर्पयामि ॥ १९ ॐ ऱ्हीं विपुलमतींस्तर्पयामि ॥ २० ॐ ऱ्हीं दशपूर्विणस्तर्पयामि ॥ २१ ॐ ऱ्हीं चतुर्दशपूर्विणस्तर्पयामि ॥ २२ ॐ ऱ्हीं अष्टाङ्गमहानिमित्तकुशलांस्तर्पयामि ॥ २३ ॐ ऱ्हीं विक्रियर्द्धिप्रासांस्तर्पयामि ॥ २४ ॐ ऱ्हीं विद्याधरांस्तर्पयामि ॥ २५ ॐ ऱ्हीं चारणांस्तर्पयामि ॥ २६ ॐ ऱ्हीं प्रज्ञाश्रवणांस्तर्पयामि ॥ २७ ॐ ऱ्हीं आकाशगामिनस्तर्पयामि ॥ २८ ॐ ऱ्हीं आस्यविषांस्तर्पयामि २९ ॥ ॐ ऱ्हीं दृष्टिविषांस्तर्पयामि ॥ ३० ॐ ऱ्हीं उग्रतपस्विनस्तर्पयामि ॥

३१ ॐ ह्रीं दीप्ततपस्विनस्तर्पयामि ॥ ३२ ॐ ह्रीं तप्ततपस्विनस्तर्पयामि ॥ ३३ ॐ ह्रीं महातपसस्तर्पयामि ॥ ३४ ॐ ह्रीं घोरतपसस्तर्पयामि ॥ ३५ ॐ ह्रीं घोरगुणांस्तर्पयामि ॥ ३६ ॐ ह्रीं घोरपराक्रमांस्तर्पयामि ॥ ३७ ॐ ह्रीं घोरब्रह्मचारिणस्तर्पयामि ॥ ३८ ॐ ह्रीं आमर्षौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ३९ ॐ ह्रीं क्ष्वेलौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४० ॐ ह्रीं जल्लौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४१ ॐ ह्रीं विप्रौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४२ ॐ ह्रीं सर्वौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४३ ॐ ह्रीं मनोबलिनस्तर्पयामि ॥ ४४ ॐ ह्रीं वाग्बलिनस्तर्पयामि ॥ ४५ ॐ ह्रीं कायबलिनस्तर्पयामि ॥ ४६ ॐ ह्रीं अमृतस्राविणस्तर्पयामि ॥ ४७ ॐ ह्रीं मधुस्राविणस्तर्पयामि ॥ ४८ ॐ ह्रीं सर्पिस्स्राविणस्तर्पयामि ॥ ४९ ॐ ह्रीं क्षीरस्राविणस्तर्पयामि ॥ ५० ॐ ह्रीं अक्षीणमहानसांस्तर्पयामि ॥ ५१ ॐ ह्रीं अक्षीणमहालयांस्तर्पयामि ॥ ५२ ॐ ह्रीं अर्हं लोके सर्वसिद्धायतनानि तर्पयामि स्वाहा ॥ ५३ ॐ ह्रीं अर्हं भगवतो महतिमहावीरवर्द्धमानबुद्धिऋषींस्तर्पयामि ॥ इति ऋषितर्पणमन्त्रा त्रिपञ्चा-

शत् ॥ ततस्तेषां नमस्कारमन्त्रोऽयम्— ॐ ह्रीं अर्हं क्ष्वीं क्ष्वीं नमः ॥

अर्थ— वर तर्पणाचे त्रेपन्न मंत्र सांगितले आहेत. त्यांतील प्रत्येक मंत्रानें तर्पण करावें. ह्या तर्पणास ऋषितर्पण ह्मणतात. हें तर्पण झाल्यावर ज्यांचें तर्पण आपण केलें त्यांना "ॐ ह्रीं अर्हं" इत्यादि मंत्रानें नमस्कार करावा.

### पितृतर्पण

अथ पितॄणां तर्पणं कुर्यात्तिलोदकेन— १ ॐ ह्रीं अर्हं श्रीऋषभस्य भगवतः पितरौ तर्पयामि ॥ २ ॐ ह्रीं अर्हं अजितस्य भगवतः पितरौ तर्पयामि ॥ ३ ॐ ह्रीं अर्हं सम्भवस्य भगवतः पितरौ तर्पयामि ॥ ४ ॐ ह्रीं अर्हं भगवतोऽभिनन्दनस्य पितरौ तर्पयामि ॥ ५ ॐ ह्रीं अर्हं इत्यादि वर्धमानपर्यन्तं योज्यम् ॥ २४ ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मत्पितरौ तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तात्पितरौ तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तत्पितरौ तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मद्दीक्षागुरुं तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मद्विद्यागुरुं तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मच्छिक्षागुरुं तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तेषां पितरस्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तेषां पितृतात्पितृतात्पितरस्त-

र्पयामि ॥ एवं द्वात्रिंशन्मन्त्राः पितृणां तर्पणार्थं ॥ तेषां नमस्कार-
मन्त्रोऽयम् । ॐ ह्रीं अर्हं नमः ॥

अर्थ— नंतर तीळ आणि उदक यांच्या योगानें पितरांचें तर्पण करावें. त्याचे मंत्र बत्तीस क्रमानें सांगितले आहेत. याप्रमाणें तर्पण झाल्यावर ज्या पितरांचें आपण तर्पण केलें त्यांना संतोष होण्याकरितां "ॐ ह्रीं अर्हं नमः" या मंत्रानें त्यांना नमस्कार करावा.

देवतातर्पण.

अथाक्षतोदकेन देवतानां तर्पणं तन्मन्त्राः ॥ ॐ ह्रीं अर्हं जयाद्यष्टदेव-
तास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं रोहिण्यादिषोडशविद्यादेवतास्तर्पयामि ॥
ॐ ह्रीं अर्हं यक्षादिपञ्चदशातिथिदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं सूर्या-
दिनवग्रहदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं इन्द्रादिदशदिक्पालदेवता-
स्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं श्यामाद्यष्टदिक्कन्यादेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं
गोमुखादिचतुर्विंशतियक्षदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं चक्रेश्वर्यादि-
चतुर्विंशतियक्षीदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं असुरादिदशविधभव-
नवासिदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं किन्नराद्यष्टविधव्यन्तरदेवता-

स्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं चन्द्रादिपञ्चविधज्योतिष्कदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं सौधर्मादिवैमानिकदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं सर्वाहमिन्द्रदेवतास्तर्पयामि। इति तर्पणमन्त्राः॥ अतो नमस्कारमन्त्रोऽयम्॥ ॐ ह्रीं अर्हं अ सि आ उ सा ॐ क्रौं नमः ॥ इति प्रातस्सन्ध्योपासनक्रमः ॥ ७ ॥ एवं मध्याह्नसायाह्नयोः स्नानतर्पणान्यपि विहाय आचमनादिशेषाक्रियां सर्वामाचरेत्॥ शिरःपरिषेचनं जलाञ्जल्यर्घ्याणि जाप्यं देवपूजादि सर्वं कर्तव्यम् ॥

अर्थ— नंतर अक्षता आणि उदक ह्यांच्या योगानें देवतांचें तर्पण करावें. त्याचे मंत्र वर सांगितले आहेत. हें तर्पण झाल्यावर नमस्काराचा जो मंत्र सांगितला आहे त्या मंत्रानें तर्पण केलेल्या सर्व देवतास नमस्कार करावा. ह्याप्रमाणे प्रातःकालच्या सन्ध्येचा विधि सांगितला. मध्यान्हकाली आणि सायंकालीही ह्याप्रमाणेच विधि करावा. त्यांत फक्त स्नान आणि तर्पण ह्या दोन क्रिया मात्र करण्याची गरज नाहीं ह्मणून तेवढ्या क्रिया सोडून बाकीच्या सर्व क्रिया (मस्तकावर उदकसेचन करणें, जलांजलि देणे, अर्घ्य देणें, जप करणें, देवपूजा वगैरे) सर्व कराव्यात.

इत्थं युक्तिविधानतः सुसकलं सन्ध्यादिकोपासनं ।

ये कुर्वन्ति नरोत्तमा भवभयाद्भीताश्च ते दुर्लभाः ॥
संसाराम्बुधिनौसमां शिवकरां भव्यात्मनां प्राणिनां ।
तस्मादादरपूर्विकां बुधजनाः कुर्वन्तु सन्ध्यां सदा ॥ १४८ ॥

अर्थ— अशाप्रकारें वर सांगितलेली संध्योपासनक्रिया, जे कोणी युक्तिप्रयुक्तीनें करतात: ते संसाराला मुळींच भीत नाहीत. म्हणून हे सज्जन हो! भव्यजीवांना संसारसमुद्रातून तारून नेणारी नौकाच कीं काय! अशी ही संध्योपासनक्रिया तुम्ही मोठ्या भक्तीनें नेहमीं करा!!!

श्रीब्रह्मसूरिद्विजवंशरत्नं । श्रीजैनमार्गप्रविबुद्धतत्त्वः ॥
वाचन्तु तस्यैव विलोक्य शास्त्रं । कृतं विशेषान्मुनिसोमसेनैः ॥ १४९ ॥

अर्थ— त्रैवर्णिकाच्या वंशात मुकुटमणि आणि ज्यांना श्रीजिनांनीं सांगितलेल्या मार्गाचीं तत्त्वें उत्कृष्ट समजलीं आहेत असे ब्रह्मसूरि नांवाचे पंडित होऊन गेले. त्यांनीं केलेलें शास्त्र पाहून श्रीसोमसेनमुनींनीं हें शास्त्र विस्तारानें रचिलें आहे. तें तुम्हीं भव्यजीवांनीं अवश्य पठन करावें.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपके भट्टारकश्रीसोमसेनविरचिते स्नानवस्त्राचमनसन्ध्यातर्पणवर्णनो नाम तृतीयोऽध्यायः ॥

श्रीवीतरागाय नम

## ॥ चतुर्थोऽध्यायः ॥

त्रैलोक्ययात्रां चरितुं प्रवीणा। धर्मार्थकामाः प्रभवन्ति यस्याः॥
प्रसादतो वर्तत एव लोके। सरस्वती सा वसतान्मनोऽब्जे ॥ १ ॥

अर्थ— जिच्या कृपेमुळेंच धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ त्रैलोक्यांत संचार करण्यास समर्थ होतात; म्हणजे त्रैलोक्यात प्रसिध्दीला प्राप्त होतात; आणि जी या जगांत वास करीत आहे, ती सर्वस्वती देवी माझ्या अंतःकरणरूपी कमलांत वास करो.

शान्तिप्रदं सम्प्रति शान्तिनाथं। देवाधिदेवं वरतत्त्वभाषम् ॥
नत्वा प्रवक्ष्ये गृहधर्ममत्र। यतो भवेत्स्वर्गसुखं सुभोगम् ॥ २ ॥

अर्थ— जैनमतांतील मुख्य तत्वांचें ज्यानें प्रतिपादन केलें आहे आणि जो आपल्या भक्तास शांति देतो असा देवाधिदेव जो शांतिनाथ त्याला नमस्कार करून, ज्याच्यापासून जीवाला स्वर्गसुख सहज भोगावयास मिळेल असा गृहस्थांचा धर्म आतां मी सांगतों.

अस्पृश्य जीव व पदार्थ.

कृत्वैवं सुजलाशये स मुदितश्चोत्थाय तस्माच्छनै-।

रीर्यायाः पथशोधनं शुचितरं कुर्वन्व्रजेत्स्वं गृहम् ॥

अस्नातान् सकलान् जनान्नहि तदा मार्गे स्पृशेन्नोत्तमान् ।

स्नातान् शूद्रजनान्प्रमादबहुलान् शुद्रानपि नो स्पृशेत् ॥ ३ ॥

अर्थ— पूर्वी सांगितल्याप्रमाणें शुद्ध अशा जलाशयांत स्नान करून तेथून आपल्या गृहाकडे जाण्यास निघावें. त्या वेळीं ईर्यापथशुद्धि ( जाण्याच्या मार्गाची शुद्धि ) करून मग चालूं लागावें. ज्यांनीं स्नान केलें नाहीं असे आपल्यापेक्षां वरिष्ठ जरी कोणी मार्गात आढळले तथापि त्यांना स्पर्श करूं नये. त्याचप्रमाणें एखादा शूद्र जरी स्नान केलेला असला तथापि त्याला स्पर्श करूं नये. तसेंच नेहमीं हिंसा करणारे असे जे लोक त्यांनाही स्पर्श करूं नये. असे लोक कोणते हे पुढील श्लोकांत सांगतात.

मद्यविक्रयिणं शूद्रं कुलालं मद्यपायिनम् ॥ नापितं च शिलास्फोटं कुविन्दकमतः परम् ॥४॥ काल्लिकं मालिकं चैव हिंसकं मुद्गलादिकम् ॥ उच्छिष्टपर्णचर्मास्थिच्युतशृंगनखानपि ॥५॥ रोमकेशखुरान्दन्तास्रक्तविण्मूत्रपूयकान् ॥ श्लेष्मनिष्ठीवशूद्रान्नहण्डिकादीन् द्विहस्ततः ॥ ६ ॥ काककुर्कुटमार्जारखरोष्ट्रग्रामसूकरान् ॥ कुष्ठिकुर्कुररोगार्तच्छिन्नांगपतिताभरान् ॥ ७ ॥ कितवान्मत्तमत्तांश्च बन्धनागाररक्षकान् ॥ मलाक्तवस्त्रसं-

युक्तान् ॥ डोम्बमुख्यान् त्रिहस्ततः ॥८॥ तक्षकान्रजकान् स्वर्णकारकान्
ताम्रकुट्टकान् ॥ अयोनिगडसिन्दूरहिंगुहिंगुलकारकान् ॥९॥ शस्त्रवैद्यान-
ग्निवैद्याञ्जलौकारक्तपायिनः ॥ चर्मादीनतिजीर्णांगान् त्यजेद्धस्तचतुष्टयात् ॥ १० ॥

अर्थ— मद्याचा विक्रय करणारे, शूद्र, कुंभार, मद्यपी मनुष्य, न्हावी, पाथरवट, कोष्टी, साळी, माळी, पारध करणारे असे मुसलमान वगैरे ह्यांना स्पर्श करूं नये. तसेंच, उष्टीं पानें, चमडें, हाडें, आणि ण्याच्या अंगावरून गळून पडलेली किंवा काढून टाकलेली शिंगें, नखें, अंगावरील केश, डोकीचे केश, खुर, दांत, रक्त, विष्ठा, मूत्र, पू, कफ, थुंकी आणि शूद्रादिकांचें अन्न, व मडके ह्या वस्तूंपासून दोन हात लांब असावें. त्याप्रमाणेंच कावळा, कोंबडा, मांजर, गाढव, उंट, गांवांतील डुकर, रक्तपित्ति झालेला मनुष्य अथवा जनावर, कुतरें, रोगी मनुष्य, ज्याचे अवयव तोडले आहेत असा मनुष्य, भ्रष्ट झालेला अनुष्य, लुच्चा मनुष्य, डोकें फिरलेला मनुष्य, तुरुंगावरील पहारेकरी, ज्यांची वस्त्रें घाण आहेत अशी मनुष्यें आणि डोंवारी वगैरे लोक ह्यांच्यापासून तीन हातांवर लांब असावें. सुतार, परीट, सोनार, तांबट, लोहार, सिंदूर, हिंग आणि हिंगुळ ( इंगळक ) हे पदार्थ तयार करणारे लोक, शस्त्रवैद्य, डागणारे वैद्य, जळवा लाऊन रक्त काढणारे लोक, आणि ज्यांचें शरीर अगदी जीर्ण झालें आहे असे लोक ह्यांच्यापासून चार हातांवर लांब असावें.

पञ्चहस्तादृतुमर्तीं सूतिकां हस्तषट्कतः ॥
चाण्डालचर्मकारादीन् हस्तसप्त परित्यजेत् ॥ ११ ॥

अर्थ— ऋतुमती असलेल्या स्त्रीपासून पांच हात लांब असावें. बाळंतिणीपासून सहा हात लांब असावें. चांडाल आणि चाभार यांपासून सात हात लांब असावें.

मांसभारं सुराकुम्भं युगद्वयं तु वर्जयेत् ॥
नृतिरश्चश्च दुर्गन्धिशवं तु युगपञ्चकम् ॥ १२ ॥
अस्पृश्यगृहजं भस्म धूलीधूमतुषादिकान् ॥
अस्पृशन्निजगेहं स गच्छेज्जीवदयापरः ॥ १३ ॥

अर्थ— मांसाचा ढीग आणि मद्याचें पात्र यापासून आठ हातावर लांब असावें. मनुष्य, पशुपक्षी इत्यादिकांच्या कुजलेल्या प्रेतापासून वीस हात लांब असावें. त्याप्रमाणेंच स्नान करून घराकडे जात असतां, ज्यांना आपण केव्हांच स्पर्श करीत नाहीं अशा लोकांच्या घरांतून उडून आलेले राख, धुरळा, धूर, कोंडा, वगैरे पदार्थ आपल्या अंगावर येऊं देऊं नयेत. तसेंच वाटेनें चालत असतां कोणत्याही जीवाला त्रास देऊ नये. सर्वांवर दया करावी.

अथ गृहलक्षणम्

विजातिम्लेच्छशूद्राणां गेहाद्दूरं भवेद्गृहम् ॥
काष्ठधूमादिसंसर्गं न कुर्यात्कुड्यमेलनम् ॥ १४ ॥

अर्थ— आतां गृहाचें लक्षण सांगतात— विजातीचे लोक, मुसलमान लोक आणि शूद्र लोक ह्यांच्या घरापासून आपलें घर दूर असावें. त्यांच्या घराचे वासे, त्यांच्या घरांतून येणारा धूर इत्यादिकांचा संपर्क आपल्या घराला होऊं देऊं नये. तसेंच त्यांच्या घराच्या भिंतीला आपल्या घराची भिंत देखील लागून असूं नये.

तेषां हि श्रूयते शब्दो हिंसादिदुष्टवाचकः ॥
केशास्थिचर्मदु स्पर्शो न भवेत्त्वं तथा कुरु ॥ १५ ॥

अर्थ— विजातीय लोक वगैरे लोकांच्या घराजवळ जर आपलें घर असेल, तर, त्यांचे हिंसा वगैरे दुष्कृत्याचे वाचक शब्द आपल्यास नेहमीं ऐकावे लागतात. ह्मणून अशा लोकांच्या रहाण्याच्या ठिकाणापासून जैनाचे घर दूर असावें. तसेंच आपल्या घराला केश, हाडें आणि चामडें ह्यांचा स्पर्श न होईल असें घर असावें.

तेषां जलप्रवाहस्य नीचभागं विवर्जयेत् ॥
मानिनां पापशीलानां सक्तानां दुष्टसङ्गतौ ॥ १६ ॥

अर्थ— वर जे विजातीय वगैरे लोक सांगितले आहेत, त्यांच्या घरांतील पाणी ज्या सखल जाग्यांत

वहात येत असेल, त्या सरळ जाग्यांत आपलें घर असूं नये. तसेंच आपल्या घराजवळ अभिमानी, पातकी आणि दुष्टांची संगति करणार असे लोक असूं नयेत.

नगरस्यान्त्यसद्भागे न कुर्याद्गृहबन्धनम् ॥
श्वपचसूकरादीनां प्रवेशो न हि सौख्यदः ॥ १७ ॥

अर्थ— आपण ज्या गांवांत रहातो त्या गांवाच्या शेवटाला आपलें घर बांधूं नये. घरांत कुत्रें, गांवडुकर, वगैरे पशू शिरले असतां त्या घरांत आपल्यास सुख लागणार नाहीं असें समजावें.

सङ्कीर्णमार्ग उच्छिष्टमलमूत्रादिदूषितः ॥
वेश्यातस्करव्याघ्रादिसम्बन्धं दूरतस्त्यजेत् ॥ १८ ॥

अर्थ— जेथें सर्वजातीचे लोक जमतात असा रस्ता आपल्या घराजवळ असूं नये. उष्टे पदार्थ, मल, मूत्र इत्यादि पदार्थ टाकण्याची जागा आपल्या घराजवळ असूं नये. वेश्या आणि चोर यांचीं घरें जवळ असूं नयेत. त्याचप्रमाणें व्याघ्र वगैरे जंगली जनावरांचें ठिकाणही आपल्या घराजवळ असूं नये.

उत्तमस्थानमालोक्य सर्पादिपरिवर्जितम् ॥
रम्यं तत्र गृहं कुर्याद्यथाद्रव्यं यथारुचि ॥ १९ ॥

अर्थ— वर सांगितलेले उपद्रव ज्या ठिकाणीं नाहींत आणि सर्पादिकांनी पीडा जेथें नाहीं असें उत्तम

स्थळ पाहून त्या ठिकाणीं आपल्या द्रव्याची अनुकूलता जशी असेल त्या मानानें आपल्या इच्छेप्रमाणें सुशोभित असें घर बांधावें.

रेणुपाषाणनीरान्तं खनयेत्पृथिवीतलम् ॥
शङ्खखर्परचर्मास्थिविण्मूत्रं दूरतस्त्यजेत् ॥ २० ॥

अर्थ— मुरमाचे दगड अथवा पाणी हीं लागेपर्यंत पाया काढावा. शंख, खापऱ्या, चामडें, हाडें, विष्ठा आणि मूत्र हे घराजवळ न टाकतां दूर टाकावेत.

पाषाणैश्चेष्टकामृद्भिश्चूर्णैर्भूर्बध्यते दृढम् ॥
सुदिने सुमुहूर्ते वा जिनपूजापुरस्सरम् ॥ २१ ॥

अर्थ— दगड, विटा, माती आणि चुना ह्यांच्या योगानें भूमि फार बळकट होते; म्हणून हे पदार्थ घालून घरांतील जमीन करावी. घर बांधावयाचें तें चांगला दिवस पाहून सुमुहूर्तावर श्रीजिनेंद्राची पूजा प्रथम करून बांधावयास प्रारंभ करावें.

भुक्तिशालाऽग्निदिक्कोणे नैर्ऋत्यां शयनस्थलम् ॥
वायव्यां स्नानगेहं स्यादीशान्यां जिनमन्दिरम् ॥ २२ ॥
पश्चिमे चित्रशाला तु नानाजनसमाश्रया ॥

दक्षिणे तु जलस्थानं ह्युत्तरे श्रीघनाश्रयः ॥ २३ ॥
पूर्वस्यां निर्गमद्वारं घण्टातोरणभूषितम् ॥
मध्ये नृत्यन्ति नर्तक्यो गीतहास्यविनोदकैः ॥ २४ ॥
सदनस्य बहिर्भागे शाला गोधनसम्भृता ॥
गजाश्वरथपादातैस्तत्रैव स्थीयतेऽन्त्यनः ॥ २५ ॥

अर्थ— त्या घरांत आग्नेयदिशेकडे पाकगृह असावें. नैर्ऋत्यदिशेस निजण्याची जागा असावी. वायव्यदिशेस स्नानाची जागा असावी. ईशान्यदिशेस जिनमंदिर असावें. पश्चिमेकडे पुष्कळ लोकांना बसण्यासारखी चित्रशाळा असावी. दक्षिणेकडे पाण्याचें ठिकाण असावें. उत्तरेकडे द्रव्य ठेवण्याची जागा (जामदारखाना) असावी. आणि पूर्वदिशेकडे घराचा दरवाजा असावा. त्याला तोरण लाविलेलें असावें आणि घाटही बांधलेली असावी. तसेंच मध्यभागीं नर्तन करणाऱ्या स्त्रियांच्या नृत्याची जागा असावी. घराच्या बाहेरच्या जागेस गोठा असावा. ही जागा घराच्या बाहेर असल्यानें, त्यांत हत्ती, घोडे, रथ, चाकर मनुष्यें वगैरे रहावयाची असतात.

गृहकिङ्किणि ससान्ता उपर्युपरि संस्थिताः ॥
चूर्णकाचसुवर्णादिलेपनैर्लेपिताः पराः ॥ २६ ॥

अर्थ— एक, दोन, तीन असे सातापर्यंत मजले घराला करावेत. त्यांतील भिंतीस चुना किंवा सोनें ह्यांचे गिलावे करावेत. आणि काचेचीं तावदाने लावावीत.

नानाशृंगैश्च संयुक्तं मालाचन्द्रोपकादिभिः ॥
पुत्रोत्पत्तिविवाहादिकल्याणपरिपूजितम् ॥ २७ ॥

अर्थ— घराला अनेक शिखरें गच्च्या वगैरे असाव्यात. घरांत पुत्रोत्पत्ति, विवाह वगैरे मंगल कार्यें होत असावीत.

चैत्यस्य वामभागे तु होमशालां समापयेत् ॥
धूमावकाशकस्थानं सल्लकीकदलीयुतम् ॥ २८ ॥

अर्थ— जिनमंदिराच्या डाव्या बाजूस होमशाला करावी. त्यांतून धूर जाण्याला मार्ग असावा. आणि ज्या बाजूला धूर जात असेल तिकडे सळई, केळी हीं झाडें लावावीत.

पल्यङ्कं कुसुमानि चन्दनरसः कर्पूरकस्तूरिका ।
स्वाद्वन्नं वनिता स्वरूपसहिता हास्यादिका सत्क्रिया ॥
ताम्बूलं वरभूषणानि तनुजा दानाय सत्सम्पदो ।
गेहे यस्य स एव सन्ति विभवा धन्यश्च पुण्यात्मकः ॥ २९ ॥

अर्थ— निजण्याचा पलंग, सुवासिक फुलें, चंदनाची उटणी, कापूर, कस्तूरी, मधुर अन्न, रूपवती अशी पत्नी, हास्य विनोद वगैरे गमतीचे व्यापार, तांबूल, उंची दागिने, पुत्र, आणि धर्म करण्याकरितां द्रव्य ही संपत्ति ज्याच्या घरांत असेल, तो धन्य होय! आणि तोच पुण्यवान् होय.

चैत्यालयप्रवेश.

गत्वा तत्र जिनागारं शनैः स्थित्वा बहिःस्थले ॥
पादौ प्रक्षाल्य संशोध्य सम्यगीर्यापथं क्रमात् ॥ ३० ॥
त्रिःपरीत्य जिनेन्द्रस्य गेहं चान्तर्विशेद्बुधः ॥
मुखवस्त्रं समुद्धाट्य जिनवक्त्रं विलोकयेत् ॥ ३१ ॥

अर्थ— त्या आपल्या घरांत हळू हळू जाऊन, जिनमंदिराच्या बाहेर उभे राहून, आपले पाय धुवावेत. मग ईर्यापथशुद्धि करून, जिनेंद्राला तीन प्रदक्षिणा करून, मंदिरांत प्रवेश करावा. आणि जिनेंद्राच्या मुखावरील वस्त्र काढून त्याच्या मुखाचें दर्शन करावें. आणि पुढील स्तोत्रानें जिनदर्शनाचें माहात्म्य वर्णन करावें.

जिनदर्शनस्तवन.

दर्शनं जिनपतेः शुभावहं । सर्वपापशमनं गुणास्पदम् ॥
स्वर्गसाधनमुशन्ति साधवो । मोक्षकरणमतः परं च किं ॥ ३२ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राचें दर्शन अत्यंत शुभकारक आहे, तें सर्व पातकांचा नाश करणारें व सर्व सद्गुणांचें वसतिस्थान आहे. सज्जन लोक श्रीजिनेंद्राचें दर्शन हेंच स्वर्गाचें मुख्यसाधन आहे असें ह्मणतात. मग मोक्षाचें साधन तरी ह्यापेक्षां निराळें कोणतें असावयाचें आहे?

दर्शनं जिनरवेः प्रतापव- । च्चित्तपद्मपरमप्रकाशकम् ॥
दुष्कृतैकतिमिरापहं शुभं । विघ्नवारिपरिशोषकं सदा ॥ ३३ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्ररूपी जो सूर्य, त्याचें दर्शन प्रतापशाली असल्यानें तें अंतःकरणरूपी कमलाचा विकास करणारें, पातकरूपी अंधकाराचा नाश करणारें, कल्याणप्रद आणि सर्वदा विघ्नरूपी उदक शोषून टाकणारें असें आहे.

दर्शनं जिननिशापतेः परं । जन्मदाहशमनं प्रशस्यते ॥
पुण्यनिर्मलसुधाप्रवर्षणं । वर्धनं सुखपयोनिधेः सतः ॥ ३४ ॥

अर्थ— श्रीजिनपतिरूपी जो चंद्र त्याचें दर्शन जन्ममरणरूपी उकाड्याचा नाश करणारें आहे; आणि पुण्यरूपी स्वच्छ अमृताचा वर्षाव करणारें असून सत्पुरुषांच्या सुखरूपी समुद्राला भरती आणणारें आहे.

दर्शनं जिनसुकल्पभूरुहः । कल्पितं हि मनसा प्रपूरयेत् ॥
सर्वलोकपरितापनाशनं । पम्फुलीति फलतो महीतले ॥ ३५ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्र हाच जो कल्पवृक्ष त्याचें दर्शन हें मनात आणलेलें देणारें असें आहे. आणि सर्व लोकांच्या संसारतापाचा नाश करणारें असून या पृथ्वीवर उत्कृष्ट फलांनीं ( दर्शन करणाऱ्याचें कल्याण करणें या फलांनीं ) गजबजून गेलें आहे.

दर्शनं जिनसुकामगोरलं । कामितं भवति यत्प्रसादतः ॥
दोग्धि दुग्धमपि वित्तकाम्यया । शुद्धमेव मन इत्युदाहृतम् ॥ ३६ ॥

अर्थ— मीं श्रीजिनेंद्ररूपी जी कामधेनु तिचें दर्शन केलें ह्मणजे पुरें आहे. कारण, माझे सर्व मनोरथ श्रीजिनेंद्ररूपी कामधेनूच्या कृपेनें सफल होणारे आहेत. ही कामधेनु अशी आहे कीं, भव्यजीवानें द्रव्याच्या इच्छेनें तिची धार काढली असतां ती धार काढणाराचें अंतःकरण शुद्ध करते ह्मणजे त्याची द्रव्यतृष्णा दूर करते.

दर्शनं जिनपयोनिधेर्भृशं । सौख्यमौक्तिकसमूहदायकम् ॥
सद्धनं गुणगभीरमुत्तमं । ज्ञानवारिविपुलप्रवाहकम् ॥ ३७ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्ररूपी समुद्राचें दर्शन हें सौख्यरूपी मौक्तिकाना देणारें आहे. आणि ज्ञानरूपी उदकाची पुष्कळ वृष्टि करणारा असा जो सद्गुणरूपी उत्तम मेघ त्यालाही देणारें आहे.

अद्याभवत्सफलता नयनद्वयस्य । देव त्वदीयचरणाम्बुजवीक्षणेन ॥

अद्य त्रिलोकतिलक प्रतिभासते मे । संसारवारिधिरयं चुलकप्रमाणः ॥ ३८ ॥

अर्थ— हे देवा! आज तुझ्या चरणकमलांच्या दर्शनानें माझ्या दोनी डोळ्यांची सफलता झाली. हे प्रभो! आज मला हा संसारसमुद्र पसाभर पाण्याप्रमाणें भासूं लागला आहे.

किसलयितमनल्पं त्वद्विलोकाभिलाषात् ।
कुसुमितमतिसान्द्रं त्वत्समीपप्रयाणात् ॥
मम फलितममन्दं त्वन्मुखेन्दोरिदानीं ।
नयनपथमवासाद्देव पुण्यद्रुमेण ॥ ३९ ॥

अर्थ— हे देवाधिदेवा! माझ्या पुण्यरूपी वृक्षाला–तुझें दर्शन करण्याची जी मला इच्छा झाली तीमुळें कोमल पानें आल्याप्रमाणें झालें आहे. [ ह्मणजे तुझ्या दर्शनाची मला जी इच्छा झाली ती माझ्या पुण्यरूपी वृक्षाची पालवी होय. ] त्या इच्छेमुळें तुझ्याजवळ माझें येणें झाल्यानें त्या वृक्षाला फुलांचा बहार आल्यासारखें झालें आहे. (तुझ्या चरणाजवळ येणें हें पुण्यवृक्षांची फुलें होत.) आणि तुझा मुखचंद्र ह्या वेळीं माझ्या दृष्टीस पडल्यानें त्या वृक्षाला फळें आल्याप्रमाणें झालें आहे. (तुझ्या मुखचंद्राचें दर्शन हें पुण्यवृक्षाचें फल होय.)

शर्वरीषु शशिना प्रयोजनं । भास्करेण दिवसे किमीश्वर ॥

त्वन्मुखेन्दुदलिते नमस्तते । भूतलेऽत्र तरुयोस्तु का स्तुतिः ॥ ४० ॥

अर्थ— हे प्रभो! अंधकारानें (अज्ञानानें) व्याप्त झालेलें हें भूतल, जर तुझ्या मुखचंद्रानें प्रकाशमान (ज्ञानवान्) होत आहे, तर रात्रीच्यावेळीं चंद्रानें काय प्रयोजन आहे? आणि दिवसा सूर्यानें तरी काय प्रयोजन आहे? कांहीं नाहीं. कारण, त्यानें कांहीं कार्यच जगांत राहिलें नाहीं. म्हणून, त्यांची स्तुति करण्यात कांहींच अर्थ नाहीं.

अमितगुणगणानां त्वद्गतानां प्रमाणं । भवति समधिगन्तुं यस्य कस्यापि वाञ्छा ॥
प्रथममपि स तावद्व्योम कत्यङ्गुलं स्या- । दिति च सततसंख्याभ्यासमङ्गीकरोतु ॥ ४१ ॥

अर्थ— हे नाथा! तुझ्या ठिकाणीं असलेल्या असंख्य गुणाचें प्रमाण समजावें अशी जर कोणाला इच्छा होईल; तर, त्यानें प्रथम आकाश किति अंगुलें लांब आहे तें मोजण्याकरितां संख्येचा अभ्यास करावा. तात्पर्य—आकाश किती अंगुळें लांब आहे याची संख्या समजणें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें, तुझ्या गुणांची संख्या समजणेंही शक्य नाहीं.

देव त्वदङ्घ्रिनखमण्डलदर्पणेऽस्मि- । न्नर्घ्ये निसर्गरुचिरे चिरदृष्टवक्त्रः ॥
श्रीकीर्तिकान्तिधृतिसङ्गमकारणानि । भव्यो न कानि लभते शुभमङ्गलानि ॥ ४१ ॥

अर्थ— हे देवा! स्वभावतःच सुंदर असलेल्या आणि पूज्य अशा या तुझ्या चरणनखरूपी दर्पणात जो

भव्यजीव फार वेळ आपलें मुख अवलोकन करतो ( तुझ्या चरणावर जो फार वेळ नम्र होतो ; ) तो भव्यजीव, संपत्ति, कीर्ति, कांति आणि धृति ( धैर्य ) ह्याच्या प्राप्तीचीं कोणती मंगल साधनें मिळवीत नाहीं? सर्व साधनें मिळवितो. ह्मणजे श्रीजिनेंद्राचें दर्शन करणाऱ्या मनुष्याच्याजवळ संपत्ति, कीर्ति, कांति आणि धृति, ह्या प्राप्त होण्याचीं सर्व साधनें आपोआप चालून येतात.

त्वद्दर्शनं यदि ममास्ति दिने दिनेऽस्मिन् । देव प्रशस्तफलदायि सदा प्रसन्नम् ॥
कल्पद्रुमार्णवसुरग्रहमन्त्रविद्या- । चिन्तामणिप्रभृतिभिर्न हि कार्यमस्ति ॥ ४२ ॥

अर्थ— भगवन्! विपुल फल देणारें आणि सर्वदा आनंदमय असें हें तुझें दर्शन जर मला प्रतिदिवशीं होईल, तर कल्पवृक्ष, समुद्र, देव, ग्रह, मंत्र, विद्या, चिन्तामणि वगैरेच्या योगानें माझें कांहींच काम नाहीं. कल्पवृक्ष वगैरे इच्छितफल देणाऱ्या वस्तूंची मला मुळींच गरज नाहीं.

जिनपूजाक्रम

इति संस्तुत्य देवं तमुपविश्य जिनाग्रतः
भार्यायै याचितं वस्तु पानीयाक्षतचन्दनम् ॥ ४३ ॥
पुष्पं नैवेद्यदीपांश्च धूपं फलमतः परम् ॥
समालोक्य च संशोध्य पूजा कार्या सुबुद्धितः ॥ ४४ ॥

जिनेंद्राच्या उजव्या बाजूस दर्भासनावर बसावें.

वनिताहस्ततो वाऽन्यशिष्यहस्तात्तथाऽपि च ॥
गृहीत्वा त्वर्चनाद्रव्यं पूजयेज्जिननायकम् ॥ ४८ ॥

अर्थ— नंतर स्वस्त्रीकडून किंवा शिष्याकडून अथवा दुसऱ्या कोणाकडून आणविलेलें पूजाद्रव्य (पूजेचे पदार्थ) घेऊन, त्या ठिकाणी पुढीलप्रमाणें श्रीजिनेंद्राची पूजा करावी.

पञ्चवर्णैर्महाचूर्णै रङ्गवल्लीं समालिखेत् ॥ कदलीसल्लकीस्तम्भैरिक्षुदण्डैः सतोरणैः ॥ ४९ ॥ घण्टाचमरसम्भूपैर्भूपयेज्जिनवेदिकाम् ॥ पूर्णकुम्भार्चनाद्रव्यदर्भांश्च वामभागतः ॥ ५० ॥ गन्धकुट्यां जिनेन्द्रस्यं प्रतिमां च निवेशयेत् ॥ सिद्धचक्रस्य यन्त्रं च पूजयेद्गुरुपादुकाम् ॥ ५१ ॥ सहस्रनाम देवस्य पठेत्तावद्विधानतः ॥ सकलीकरणं कृत्वा शोधयेन्निजदेहकम् ॥ ५२ ॥ गन्धपुष्पाक्षतैस्तोयैः पूजाद्रव्याणि शोधयेत् ॥ पूजोपकरणस्तोमं शोधयेच्छुचिभिर्जलैः ॥ ५३ ॥

अर्थ— पाच रंगांच्या निरनिराळ्या चूर्णानें रंगवल्ली काढावी. केळी किंवा सळई ह्यांचे खांब, ऊंस, तोरण, घाट, चवऱ्या आणि अनेक प्रकारचीं भूपणें ह्यांच्या योगानें ती वेदिका (कट्टा) सुशोभित करावी.

पाण्याची घागर, पूजेचे पदार्थ आणि दर्भ हे आपल्या डाव्या हाताकडे ठेवावेत. मग गंधकुटीच्या ठिकाणी श्रीजिनेंद्राच्या प्रतिमेचें स्थापन करावें. सिद्धचक्राचें यंत्र आणि गुरूच्या पादुका ह्यांची पूजा करावी. श्रीजिनाचें सहस्रनाम स्तोत्र पठण करावें. सकलीकरण करून आपल्या देहाची शुद्धि करावी. गंध, फुलें, अक्षता वगैरे पूजेचे पदार्थ पाण्यानें शुद्ध करावेत. तसेंच आणखी पूजेला लागणारी सामग्रीही पाण्यानें धुवून शुद्ध करावी.

तत ईशानदिग्भागे वास्तुवायुकुमारकान् ॥
मेघाग्निनागदेवांश्च भूमिशुद्धिविधायकान् ॥ ५४ ॥
दर्भाम्बुवन्हिभिः शुद्धैर्भूमिं संशोध्य पूजयेत् ॥
महावाद्यनिनादेन पुष्पांजलीभिरञ्जसा ॥ ५५ ॥
शिष्या विद्यागुरूंश्चात्र सार्घ्यदानेन तर्पयेत् ॥
अग्निकोणे क्षेत्रपालं गुडतैलैश्च पूजयेत् ॥ ५६ ॥

अर्थ— मग ईशान्येकडच्या बाजूस भूमिशुद्धि करणाऱ्या वास्तुदेवता आणि वायुकुमार, मेघकुमार, अग्निकुमार आणि नागकुमार ह्यांची पूजा करावी. पूजा करण्याच्या अगोदर दर्भ, पाणी आणि अग्नि ह्यांच्या योगानें भूमीची शुद्धता करावी. आणि नंतर पूजा करावी. पूजेच्या वेळी मोठमोठी वाद्यें

वाजवावीत. देवांवर पुष्पांजलि घालावी. ह्याच ठिकाणीं आपल्या विद्यागुरूंला अर्घ्य देऊन त्यांची पूजा करावी. नंतर आग्नेयकडील वाजूस गूळ आणि तेल ह्या द्रव्यांनी क्षेत्रपालाची पूजा करावी.

ईशानदिशि नागॉश्च क्षीरैरञ्जलिपूरितैः ॥
आभिः पुण्याभिरित्यादि श्लोकेन भुवमर्चयेत् ॥ ५७ ॥

अर्थ— ईशान्यदिशेला जी नागकुमारांची पूजा सांगितली ती ओंजळभर पाण्यानें करावी. आणि "आभिः पुण्याभि" इत्यादिश्लोकानें ( हा श्लोक पुढें आहे ) भूमीची पूजा करावी.

आभिः पुण्याभिरद्भिः परिमलबहलेनामुना चन्दनेन ।
श्रीद्धिक्पेयै-(!)-रमीभिः शुचिसदकचयैरुद्गमैरेभिरुद्धैः ॥
हृद्यैरेभिर्निवेद्यैर्मखभवनमिमैर्दीपयद्भिः प्रदीपै- ।
र्धूपैः प्रेयोभिरेभिः पृथुभिरपि फलैरेभिरर्चामि भूमिम् ॥ ५८ ॥

"आभिः पुण्याभि" इत्यादि श्लोकानें भूमीचें पूजन करण्यास वरील श्लोकांत सांगितलें आहे, तो श्लोक हाच होय. हा श्लोक ह्मणून, जल, गंध, पुष्प, अक्षता, नैवेद्य, दीप, धूप आणि फल ह्या पदार्थांच्या योगानें भूमीची पूजा करावी.

ततः श्रुतं गुरुं सिद्धं यक्षान्यक्षीश्च देवताः ॥

करावी. आणि त्या भगवंताच्या चरणाचा स्पर्श झालेलें गंध आपल्या कपाळास लावावें.

तिलकाचे प्रकार.

आतपत्रं तथा चक्रं अर्धचन्द्रं त्रिशूलकम् ॥
मानस्तम्भस्तथा सिंहपीठकं चेति षड्विधम् ॥ ६३ ॥

अर्थ— छत्राकार, चक्राकार, अर्धचंद्राकार, त्रिशूलाकार, मानस्तंभाकार आणि सिंहासनाकार असे गंध लावण्याचे सहा प्रकार आहेत.

छत्रत्रयमिति स्मृत्वा आतपत्रमुदाहृतम् ॥
धर्मचक्रमिति स्मृत्वा चक्राकारं च कारयेत् ॥ ६४ ॥
पाण्डुशिलेति संस्मृत्य अर्धचन्द्रं विनिर्मितम् ॥
रत्नत्रयमिति ज्ञात्वा त्रिदण्डं तिलकं स्थितम् ॥ ६५ ॥
मानस्तम्भाकृति कार्यं मानस्तम्भाभिधानकम् ॥
सिंहासनं जिनेन्द्रस्य संस्मृत्य सिंहविष्टरम् ॥ ६६ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या तीन छत्रांचें स्मरण करून छत्राकार गंध लावावें. धर्मचक्राचें स्मरण करून चक्राकार गंध लावावें. तीर्थकराच्या जन्माभिषेकाच्या वेळी असलेल्या शुभ्रशिलेचें स्मरण करून अर्धचंद्राकार

गंध लावावें. रत्नत्रयाचें स्मरण करून त्रिशूलाकार गंध लावावें. मानस्तंभाचें स्मरण करून मानस्तंभाकार गंध लावावें. आणि श्रीजिनेंद्राच्या सिंहासनाचे स्मरण करून सिंहासनाकार किंवा पीठाकार गंध लावावें.

तिलकाचीं स्थाने.

आतपत्रार्धचन्द्रे वा यदा भाले धृते तदा ॥
वक्षसि भुजयोः कण्ठे त्रिशूलाकृतिमादिशेत् ॥ ६७ ॥

अर्थ— ज्यावेळीं कपाळावर अर्धचंद्राकार किंवा छत्राकार गंध लाविले असेल, त्यावेळीं ऊर, दोनी बाहू आणि कंठ ह्यांवर त्रिशूलाकार गंध लावावें.

भाले स्तम्भं तथा पीठं भुजादौ स्वस्तिकं तदा ॥
त्रिदण्डमथवा चक्रं तदाकृति तथा भवेत् ॥ ६८ ॥

अर्थ— कपाळावर जेव्हां स्तंभाकार किंवा पीठाकार गंध लाविलें असेल त्या वेळीं बाहू वगैरे ठिकाणीं स्वस्तिकाकार, त्रिशूलाकार अथवा चक्राकार गंध लावावें.

सर्वाङ्गलेपनं प्रोक्तं सर्वेषु तिलकेषु वा ॥
तदुपरि त्रिशूलाद्यानाकारान्परिचिन्तयेत् ॥ ६९ ॥

अर्थ— कपाळास कोणत्याही प्रकारचा तिलक लावावयाचा असला तथापि सर्वांगाला गंध लावून त्यावर

त्रिशूल वगैरे आकाराचें गंध लावावें.

तिलकाच्या आकृति.

आतपत्रं त्वर्धचन्द्रं तिर्यग्रेखं प्रकीर्तितम् ॥
त्रिदण्डं मानिकस्तम्भमूर्ध्वरेखमुदाहृतम् ॥ ७० ॥
सिंहपीठं तथा चक्रं वर्तुलं वर्तुलाकृति ॥
स्तम्भश्चैकांगुलव्यासो द्व्यंगुलोऽप्यथवा भवेत् ॥ ७१ ॥

अर्थ— छत्र आणि अर्धचंद्र ह्या आकृति आडव्या रेषेच्या आहेत. त्रिशूल आणि मानस्तंभ ह्या दोन आकृति उभ्या रेषेच्या आहेत. सिंहासन आणि चक्र ह्या दोन आकृति वर्तुलाकार आहेत. स्तंभाकृति ही एक बोट किंवा दोन बोटें रुंद असावी.

अङ्गुलं विष्टरव्यासे चतुरङ्गुलमेव वा ॥
भ्रूकेशयोश्च संव्याप्य विशालं स्तम्भविष्टरम् ॥ ७२ ॥
चक्रं तथैव विज्ञेयं त्रिदण्डं केशसंगतम् ॥
आतपत्रं त्वर्द्धचन्द्रं रागिणां सुखकारणम् ॥ ७३ ॥

अर्थ— सिंहासनाकार लाविलेल्या गंधाचा व्यास एक अंगुल किंवा दोन अंगुलें असावा. आणि स्तंभ

सिहासन आणि चक्र ह्या आकृतीचें गंध, भुवयांच्या केसावरूनही येईल, इतकें मोठें लावावें. त्रिशूलाकार गंध भुवयांच्या केसावर येऊं देऊं नये. केसाजवळ असावें. छत्र आणि अर्धचंद्र ह्या आकृति, विपर्यी लोकांना संतोष देणाऱ्या आहेत.

सर्वांगे रचना कार्या विकारपरिवर्जिता ॥
भुजयोर्भालदेशे वा कण्ठे हृद्युदरेऽपि च ॥ ७४ ॥

अर्थ— ह्या वर सांगितलेल्या गंधाच्या आकृति सर्वांगावर न बिघडूं देता लावाव्यात. ह्मणजे दोन भुज, कपाळ, गळा, ऊर आणि पोट ह्या सहा स्थानांवर लावाव्यात.

चतुर्वर्णाचे तिलकभेद

अर्धचन्द्रातपत्रे तु कुर्वन्ति क्षत्रियाः पराः ॥
स्तम्भं पीठं तथा छत्रं ब्राह्मणानां शुभप्रदम् ॥ ७५ ॥
मानस्तम्भं तथा छत्रं वैश्यानां तु सुखप्रदम् ॥
शूद्राणां तु भवेच्चक्रमितरेषां त्रिदण्डकम् ॥ ७६ ॥

अर्थ— क्षत्रियांनी अर्धचंद्र आणि छत्र ह्या आकृतीचें गंध लावावें. ब्राह्मणांनी मानस्तंभ, सिंहासन किंवा छत्र ह्या आकृतीचे लावावें. ते त्यांना मंगलकारक आहे. मानस्तंभ आणि छत्र ह्या आकृतीचें गंध

वैश्यांनीं लावावें. शूद्रांनीं चक्राकार गंध लावावें, आणि इतर लोकांनीं त्रिशूलाकार लावावें.

क्षत्रियवैश्यविप्राणां योषितां तिलकं स्मृतं ॥
अर्धचन्द्रस्तथा छत्रं तिर्यग्रेखाचतुष्टयम् ॥ ७७ ॥

अर्थ— क्षत्रिय, वैश्य, ब्राह्मण आणि त्यांच्या स्त्रिया ह्यांनीं तिलक अवश्य लावावा. तो अर्धचंद्राकार किंवा छत्राकार तिलकाच्या आडव्या चार रेघा असाव्यात.

त्रैवर्णिकाचे तिलकाचे पदार्थ.

योषितां सर्वशूद्राणां स्तम्भं पीठं त्रिदण्डकम् ॥
चन्दनकुङ्कुमश्रेष्ठद्रव्यैस्त्रिवर्णके स्मृतम् ॥ ७८ ॥

अर्थ— शूद्र आणि त्यांच्या स्त्रिया ह्यांनी स्तंभाकार, सिंहासनाकार किंवा त्रिशूलाकार तिलक धारण करावा. त्रैवर्णिकांनीं लावावयाचें गंध चंदन, केशर किंवा दुसरीं उंची सुगंध द्रव्यें ह्यांचें असावें.

शूद्राच्या तिलकाचे पदार्थ.

निम्बकाष्ठैर्मृदा वाऽथ शूद्राणां शुभ्रभस्मना ॥
सिन्दूरैर्वा निशाचूर्णैः सर्वासां योषितां वरम् ॥ ७९ ॥

अर्थ— लिंबाचें खोड किंवा मृत्तिका अथवा पांढरी राख ह्यांचा तिलक शूद्रांनीं धारण करावा. सर्व-

वर्णाच्या स्त्रियांनी सिंदूर किंवा हळदीची पूड ह्यांचा तिलक धारण करावा, हें फार उत्तम आहे.

अक्षतधारण.

सुगन्धलेपनस्योर्ध्वं मध्येभालं धरेद्गृही ॥
अङ्गुलाग्रमिते देशे जिनपादार्चिताक्षतान् ॥ ८० ॥

अर्थ— कपाळाला गंध लावल्यावर, कपाळाच्या मध्यभागीं अंगुलीच्या अग्राइतक्या जाग्यांत जिनपूजनाच्या अक्षता गृहस्थानें धारण कराव्यात.

गंधलेपनाचा महिमा.

ब्रह्मघ्नो वाऽथ गोघ्नो वा तस्करः सर्वपापकृत् ॥
जिनांघ्रिगन्धसम्पर्कान्मुक्तो भवति तत्क्षणात् ॥ ८१ ॥

अर्थ— ब्रह्महत्या, गोहत्या, चोरी अथवा कोणतींही पातकें करणारा असा जरी मनुष्य असला, तथापि त्यानें श्रीजिनेंद्राच्या चरणांचा स्पर्श ज्याला झाला आहे असें गंध आपल्या अंगास लाविलें असतां, तो त्याच क्षणीं सर्वपातकांपासून मुक्त होतो.

गंध लावण्याच्या बोटांचीं फलें.

अङ्गुष्ठः पुष्टिदः प्रोक्तो यशसे मध्यमा भवेत् ॥

अनामिका श्रियं दद्यान्मुक्तिं दद्यात्प्रदेशिनी ॥ ८२ ॥

अर्थ—अंगठा पुष्टी देणारा आहे. मधलें बोट कीर्ति देणारें आहे. अनामिका हें बोट संपत्ति देणारें आहे. आणि अंगठ्याजवळचें बोट मोक्ष देणारें आहे. असें शास्त्रकारांनीं सांगितलें आहे.

श्रीकामः पुष्टिकामो वा यथेष्टं तिलकं चरेत् ॥
अभ्यंगोत्सवकाले तु कस्तूरीचन्दनादिना ॥ ८३ ॥

अर्थ— संपत्तीची किंवा पुष्टीची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें पाहिजे तसा तिलक लावावा. आणि तेल अंगास लावून स्नान केलें असतां किंवा कांहीं उत्सव असतां कस्तूरी, चंदन वगैरे पदार्थांचा तिलक लावावा.

तिलकावाचून न करावयाचीं कृत्यें.

जपो होमस्तथा दानं स्वाध्यायः पितृतर्पणम् ॥
जिनपूजा श्रुताख्यानं न कुर्यात्तिलकं विना ॥ ८४ ॥

अर्थ— जप, होम, दान, स्वाध्याय, पितृतर्पण, जिनपूजा आणि शास्त्राचें व्याख्यान ह्या क्रिया तिलक धारण केल्यावांचून करूं नयेत.

वस्त्रयुग्मं यज्ञसूत्रं कुण्डले मुकुटस्तथा ॥
मुद्रिका कंकणं चेति कुर्याच्चन्दनभूषणम् ॥ ८५ ॥

अर्थ— अंगावरील दोनी वस्त्रें, यज्ञोपवीत, कुंडलें, मुकुट ( शिरोभूषण ) अंगठ्या, आणि हातांतील कडें ह्या सर्व वस्तु गंध लावून सुशोभित कराव्या.

ब्रह्मग्रन्थिसमायुक्तं दर्भैस्त्रिपञ्चभिः स्मृतम् ॥
मुष्ठ्यग्रं वलयं रम्यं पवित्रमिति धार्यते ॥ ८६ ॥

अर्थ— तीन अथवा पांच दर्भ घेऊन त्यांना ब्रह्मग्रंथि करून त्या ब्रह्मग्रंथींतून बाहेर आलेले दर्भाचे शेंडे चार अंगुलें लांब सोडावेत, ह्याप्रमाणें केलें असतां त्या दर्भाची पुढे वलयामध्यें गांठ आणि खाली शेंडे अशी आकृति होते. ह्यास पवित्र असें ह्मणतात. हें पवित्र अनामिका ह्या बोटांत धारण करावें.

एवं जिनांघ्रिगन्धैश्च सर्वांगं स्वस्य भूषयेत् ॥
इन्द्रोऽहमिति मत्वाऽत्र जिनपूजा विधीयते ॥ ८७ ॥

अर्थ— याप्रमाणें जिनबिंबाच्या पायावरील गंधानें आपलें सर्व अंग ( ठिकठिकाणच्या अलंकारांच्या ऐवजीं गंधलेपन करून ) भूषित करावें. आणि येथें मी इंद्र उभा आहे अशी भावना करून जिनपूजा करावी.

श्रीपीठस्थापन

पाण्डुकाख्यां शिलां मत्वा श्रीपीठं स्थापयेत्क्रमात ॥
मध्ये श्रीकारमालेख्य दर्भाक्षतजलैः शुभैः ॥ ८८ ॥

अर्थ— मेरुपर्वतावर इंद्रानें जेथें जिनेंद्रास जन्माभिषेक केला, ती पांडुक नांवाची शिला हीच होय. अशी भावना करून; श्रीपीठ स्थापन करून त्यामध्यें 'श्री' हें अक्षर लिहावें आणि त्या श्रीकारसहित पीठाची अष्टद्रव्यांनीं पूजा करावी.

प्रतिमास्थापन

ततो मङ्गलपाठेन प्रतिमां तत्र चानयेत् ॥
सिद्धादीनां च यन्त्राणि स्थापयेन्मन्त्रयुक्तितः ॥ ८९ ॥

अर्थ— त्यानंतर त्या पीठावर मंगलपाठ ( स्तुतिस्तवन ) उच्चारीत जिनप्रतिमा स्थापन करावी आणि त्याचप्रमाणें सिद्धचक्र वगैरे यंत्रांचीहि मंत्रसहित स्थापना करावी.

प्रक्षाल्य जिनबिम्बं तत्सुगन्धैर्वासितैर्जलैः ॥
आव्हानं स्थापनं कृत्वा सन्निधानं तथैव च ॥ ९० ॥
ततः पञ्चगुरुमुद्रां निधृत्य परिदर्शयेत् ॥
ततः पाद्यविधिं कृत्वा जलैराचमयेज्जिनम् ॥ ९१ ॥
ततो नीराजनं कृत्वा पूजयेदष्टधार्चनैः ॥
भस्मोदनशलाकागोमयपिण्डनिराजनां ॥ ९२ ॥

अर्थ— श्रीपीठावर जिनबिंब स्थापन करितांना त्या बिंबास आव्हान स्थापन सांनिधापन वगैरे विधि मंत्रपूर्वक करून; तें बिंब सुगंधयुक्त जलांनी प्रक्षालित करावें. त्यानंतर आपल्या हस्ताची पंचगुरुमुद्रा करून ती मुद्रा प्रतिमेपुढें तीनवार फिरवून दाखवावी. त्यानंतर प्रतिमेस पाद्य ( कमळाची मुळी, पांढऱ्या मोहऱ्या, दूर्वा आणि अक्षता मिळून अर्पण करणें यास पाद्य ह्मणतात. ) देऊन, जलानें आचमन करवावें ह्मणजे प्रतिमेच्या मुखास तीनवार उदक द्यावें. त्यानंतर नीराजनविधी करून, अष्टद्रव्यांनी पूजा करावी. शुद्धगोमयाचें भस्म, भात, दर्भाच्या कांड्या, गोमय ( अंतराळीं धरलेलें गाईचें शेण ) पिंड ( पंचवर्ण भाताचें पिंड ) इत्यादि द्रव्यांनी नीराजन करावें. ह्मणजे हीं द्रव्यें देवावरून उतरून टाकावीं.

चतुष्कोणेषु कुम्भांश्च मालाचन्दनचर्चितान् ॥
फलपल्लववक्त्रस्थान्ससूत्रान्स्थापयेत्क्रमात् ॥ ९३ ॥

अर्थ— श्रीपीठासमोर चौरंगावर च्यारी कोणांत पुष्पमाळा व चंदनातिलक यांनीं युक्त व ज्यांच्या मुखावर फळें आणि पानें ठेविलीं आहेत असे चार कुंभ क्रमानें स्थापन करावे.

अर्घ्यैः सम्पूज्य कुम्भांस्तांस्ततो दिक्पालकान्दश ॥
अर्घ्यपाद्यादिभिर्यज्ञभागवल्यादिभिर्यजेत् ॥ ९४ ॥

अर्थ— त्या कुंभाची अर्घ्यांनी पूजा करून, नंतर दहा दिक्पाल देवांची अर्घ्य, पाद्य, यज्ञोपवीत, बलि

वगैरे देऊन पूजा करावी.

कलशस्थापन.

ततः पुष्पाञ्जलिं दत्वा वाद्यनिर्घोषनिर्भरैः ॥
उध्दृत्य कलशान्पूर्वांस्तज्जलैः स्नापयेज्जिनम् ॥ ९५ ॥

अर्थ— नंतर पूजेच्या भूमीवर पुष्पांजलि देऊन, अनेक वाद्यांचा घोष चालू असतांना, स्थापन केलेल्या नऊ कलशांपैकीं च्यार कलश सोडून मधले चार कलश उचलून त्यांतल्या जलांनीं जिनबिंबास अभिषेक करावा.

पचामृताभिषेक

इक्षुरसभृतैः कुम्भैस्तथा घृतघटैः परैः ॥
दुग्धकुम्भैस्तथा दध्नः कुम्भैः संस्नापयेत्पुनः ॥ ९६ ॥

अर्थ— त्यानंतर उंसाचा रस भरलेल्या कुंभांनीं, त्यानंतर तूप भरलेल्या कलशांनीं, त्यानंतर दुधाच्या कलशांनीं आणि शेवटीं दहीं भरलेल्या कलशांनीं अभिषेक करावा, उंसाचा रस मिळत नाहीं तेव्हां नारळाचा रस किंवा आंब्याचा रस अभिषेकास घेतात.

कोणकलशाभिषेक.

सर्वौषधिरसैश्चापि चोध्दृत्य श्रीजिनेश्वरम् ॥

कोणस्थैः कलशैर्देवं युक्त्या संस्नापयेत्ततः ॥ ९७ ॥

अर्थ— त्यानंतर सर्वौषधींचा रस जिनप्रतिमेच्या सर्वांगास लावून; त्यावर, पूर्वी स्थापिलेल्या च्यार कोणांवरील च्यार कलशांतील जलांनीं अभिषेक करावा. ( कंकोळ, मिरे, वेलदोडे, लवंग, श्रीखंड, कर्पूर, केशर, अगरु, तगर, देवदारु, जातिफल वगैरे पदार्थ पिसून पाण्यांत कालवून तयार करणें यास सर्वौषधिरस ह्मणतात. )

जिनपादोदकग्रहण.

गन्धद्रव्यविमिश्रैश्च जलैः संस्नापयेत्पुनः ॥
पादोदकं जिनेन्द्रस्य प्रकुर्यात्स्वस्य मूर्द्धनि ॥ ९८ ॥

अर्थ— त्यानंतर पुनः गंधद्रव्यांनी मिश्र अशा जलांनीं जिनबिंबास अभिषेक करावा आणि त्या प्रतिमेच्या पायाचें उदक आपल्या मस्तकीं सिंपावें.

अष्टद्रव्यार्चन.

वस्त्राञ्चलैस्तथागुञ्छ्य संस्थाप्य यन्त्रमध्यतः ॥
पूजयेदष्टधा द्रव्यैर्निर्मलैश्चन्दनादिभिः ॥ ९९ ॥

अर्थ— त्यानंतर ती प्रतिमा वस्त्राच्या पदरांनीं स्वच्छ पुसून पुनः त्या पीठयंत्रावर स्थापना करून निर्मल

अशा जलगंधादि द्रव्यांनी अष्टप्रकारें पूजा करावी.

सिद्धयन्त्रादिपूजन.

ततः सिद्धादियन्त्राणि श्रुतं गुरुं च पूजयेत् ॥
यक्षयक्षीसुरान्सर्वान्यथायोग्यसमभ्यर्चयेत ॥ १०० ॥

अर्थ— त्यानंतर सिद्धचक्र वगैरे यंत्रें, शास्त्र, गुरु, यक्ष, यक्षी व सर्व देव यांची यथायोग्य पूजा करावी.

शेषधारण.

त्रिःपरीत्य जिनाधीशं भक्त्या नत्वा पुनः पुनः ॥
जिनश्रीपादपीठस्थां शेषां शिरसि धारयेत् ॥ १ ॥

अर्थ— नंतर जिनेंद्राला तीन प्रदक्षिणा करून व भक्तीनें पुनः पुनः नमस्कार करून जिनपीठावर असलेले गंध, अक्षता, पुष्प, वगैरे पदार्थ आपल्या मस्तकावर धारण करावेत.

होमाचा विधि

एवमाराधनां कृत्वा होमशालां ततो व्रजेत् ॥
समिधाद्यर्चनाद्रव्यं गृहीत्वा निजभार्यया ॥ २ ॥

अर्थ— आतां होमाचा विधि सागतों– वर सांगितल्याप्रमाणें पूजा झाल्यावर समिधा वगैरे होमद्रव्य

आपल्या पत्नीच्या हातांत देऊन आपण होमशालेंत जावें.

लक्षणं होमकुण्डानां वक्ष्ये शास्त्रानुसारतः ॥
भट्टारकैकसन्धेश्च दृष्ट्वा निर्मलसंहिताम् ॥ ३ ॥

अर्थ— एकसंधि भट्टारकाची निर्दोष अशी संहिता ( ग्रंथ ) पाहून व शास्त्राला अनुसरून प्रथम होमकुंडांचें लक्षण सांगतों.

होमकुंडस्थान.

संशोधितमहीदेशे जिनस्य वामभागतः ॥
अष्टहस्तसुविस्तारा दीर्घा तथैव वेदिका ॥ ४ ॥
चतुःपष्ठ्यंशकान् कृत्वा चतुष्कोणे समांशकान् ॥
राक्षसांशान् परित्यज्य पश्चिमायां ततो दिशि ॥ ५ ॥
मनुष्यांशेषु तिर्यक्षु वेदिकां कारयेत्पराम् ॥
तत्र श्रीजिननाथानां प्रतिमां स्थापयेत्पराम् ॥ ६ ॥

अर्थ— जिनेंद्राच्या डाव्या बाजूला शुद्ध भूमीवर आठ हात लांबीरुंदीचा एक कट्टा घालावा. त्या कट्ट्यावर ज्यांचे चारी कोपरे सारखे आहेत असे चवसष्ट भाग करावेत. त्यांपैकीं राक्षसांशाचा भाग टाकून

देऊन पश्चिमेकडील बाजूस आडव्या असलेल्या मनुष्यभागावर एक वेदिका ( लहान कट्टा ) करावी; आणि त्या वेदिकेवर श्रीजिनेंद्राची प्रतिमा स्थापन करावी. [ हे वरील चवसष्ट भाग आणि त्यांतील राक्षसांश वगैरे समजण्यास या ग्रंथाच्या शेवटचीं चित्रें पहावीं. ]

ततोऽग्रदेवभागेषु छत्रत्रयं निवेशयेत् ॥
चक्रत्रयं तथा यक्षयक्षीश्च स्वस्तिकं परम् ॥ ७ ॥

अर्थ— त्या जिनप्रतिमेच्या अग्रभागीं असलेल्या देवभागांवर छत्रत्रय, चक्रत्रय, यक्ष यक्षी आणि स्वस्तिक ह्यांची स्थापना करावी.

ब्रह्मभागाँस्ततस्त्यक्त्वा देवमानुषभागयोः ॥
पूर्वे ब्रह्मांशकात्तत्र कुण्डत्रयं तु कारयेत् ॥ ८ ॥
मध्ये कुण्डं वरं तेषां त्रयाणां क्रियते शृणु ॥
अरत्न्यगाधविस्तारं चतुरस्रं त्रिमेखलम् ॥ ९ ॥

अर्थ— त्या पूर्वीच्या मोठ्या वेदिकेवरील ब्रह्मभाग सोडून देव आणि मनुष्य ह्यांच्या भागांत ब्रह्मभागाच्या पूर्वेकडील बाजूस तीन कुंडें करावीत. त्यांपैकीं मधलें कुंड चतुष्कोण असून त्याची लांबी रुंदी आणि खोली एक एक मुंडा हात असावी. आणि त्या कुंडाच्या सभोवती तीन मेखला ( कट्टे ) कराव्यात.

त्रिकोणं दक्षिणे कुण्डं कुर्याद्वर्तुलमुत्तरे ॥
तत्रादिमेखला याश्चाप्यवसेयाश्च पूर्ववत् ॥११०॥
भूताङ्घिगुणमात्राः स्युर्मेखलाः प्रथमादयः ॥
मात्रायामं तथैतेषां कुण्डानामन्तरं भवेत् ॥ ११ ॥

अर्थ— त्या मधल्या कुंडाच्या दक्षिणेकडील बाजूला त्रिकोणी कुंड करावें. आणि उत्तरेकडील बाजूला वर्तुलाकार कुंड करावें. त्या दोनी कुंडालाही पहिल्या कुंडाप्रमाणेंच मेखला कराव्यात. त्यांपैकी पहिल्या मेखलेची उंची आणि रुंदी पांच मात्रा असावी. (हाताच्या अंगठ्याच्या पेऱ्यास मात्रा असे ह्मणतात) त्याच्या वरील दुसऱ्या मेखलेची उंची व रुंदी चार मात्रा असावी. आणि त्यावरील तिसऱ्या मेखलेची उंची व रुंदी तीन मात्रा असावी. आणि प्रत्येक दोन कुंडांच्या मध्यें एक मात्रा अंतर असावें.

परितो दिक्षु दिक्पालपीठिकाः कुण्डवेदिकाम् ॥
ततः समर्च्य तत्सर्वं संशोध्य च जलादिभिः ॥ १२ ॥
चतुरस्रं ततः कुण्डं त्रिकोणं तदनन्तरम् ॥
ततो वृत्तमपि प्रार्चेदम्भोधररसादिभिः ॥ १३ ॥

अर्थ— त्या कुंडांच्या भोवत्यानें अष्ट दिशांना आठ दिक्पालांची पीठें करावीत. नंतर जल वगैरेंच्या

योगानें सर्वांची शुद्धता करून सर्वांची पूजा करावी. त्यांत प्रथम चौकोनी कुंड नंतर त्रिकोण कुंड आणि नंतर वर्तुल कुंड ह्याप्रमाणें क्रमानें शुद्धता व पूजा करावी.

तीर्थकृद्गणभृच्छेषकेवल्यन्त्यमहोत्सवे ॥
प्राप्य ते पूजनाङ्गत्वं पवित्रत्वमुपागताः ॥ १४ ॥
ते त्रयोऽपि प्रणेतव्याः कुण्डेष्वेषु महानयम् ॥
गार्हपत्याहवनीयदक्षिणाग्निप्रसिद्धया ॥ १५ ॥

अर्थ–तीर्थंकर, गणधर आणि बाकीचे केवलीमुनि ह्यांच्या निर्वाणमहोत्सवांत पूज्य झालेले आणि त्या योगानें पवित्रेला पावलेले असे तीन अग्नि त्या तीन कुडांत घालावेत. त्यांत पहिलें जें चतुष्कोण कुंड, तें तीर्थकरकुंड होय. त्यांतील अग्नीस गार्हपत्य असें नांव आहे. दुसरें त्रिकोण गणधरकुंड होय. त्यांतील अग्नीस आहवनीय असें नांव आहे. आणि वर्तुलाकृति जें कुंड असतें, तें केवलींचें कुंड होय. त्यांतील अग्नीस दक्षिणाग्नि ह्मणतात.

चतुष्कोणे चतुस्तम्भाः सल्लकीकदलीयुताः ॥
घण्टातोरणमालाढ्या मुक्तादामविभूषिताः ॥ १६ ॥
चन्द्रोपकयवारैश्च चामरैर्दर्पणैस्तथा ॥
धूपघटैः करतालैः केतुभिः कलशैर्युताः ॥ १७ ॥

अर्थ— मोठ्या वेदिकेच्या चारी बाजूस चार खांब, सळईचीं पानें व केळीचे खांब ह्यांनीं युक्त असे उभे करावेत. त्यांना घंटा, तोरणें व माळा बांधाव्यात. मोत्यांचे घोस सोडून ते खांब सुशोभित करावेत. त्यांच्यावरील चांदव्याला चंद्रोपक (यंत्राचें चित्र) लावावें. त्या खांबांवर यवार (तीळ पांढऱ्या मोहऱ्या, जिरे, गहूं वगैरे मंगल धान्य) ठेवावें. चवऱ्या, दर्पण धूपघट, करताळ, पताका आणि कलश ह्या मंगल वस्तु त्यांच्या जवळ असाव्यात.

एवं होमगृहं गत्वा पश्चिमाभिमुखं तदा ॥
उपविश्य क्रियाः कार्या नमस्कारपुरस्सराः ॥ १८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें होमगृह तयार करून त्यांत पश्चिमेकडे तोंड करून बसावें. आणि नमस्कार करून नंतर पूजा करण्यास आरंभ करावा. (ह्या ठिकाणीं देवाचें मुख ज्या दिशेकडे असेल ती पूर्वदिशा समजावी. अर्थात् आपण देवाकडे तोंड करून बसलों असतां आपलें तोंड पश्चिमेकडे होतें असें समजावें. पूजाविधींत सर्वत्र असेंच समजणेचें आहे.)

तत्रादौ वायुमेघाग्निवास्तुनागाँश्च पूजयेत् ॥
क्षेत्रपालं गुरुं पितॄन् शेषान्देवान्यथाविधि ॥ १९ ॥
जिनेन्द्रसिद्धसूरींश्च पाठकान् साधुसंयुतान् ॥

श्रुतं सम्पूज्य युक्त्याऽत्र पुण्याहवचनं पठेत् ॥ १२० ॥

अर्थ— त्यांत प्रथम वायुकुमार, मेघकुमार, अग्निकुमार, वास्तुदेवता, नागकुमार ह्यांची पूजा करून, नंतर क्षेत्रपाल, गुरु, पितर आणि बाकीचे देव ह्यांची यथाविधि पूजा करावी. श्रीजिनेंद्र, सिद्ध, सूरि, पाठक (उपाध्याय) आणि साधु ह्यांची पूजा करून श्रुताची पूजा करावी. मग पुण्याहवाचनाचें पठण करावें.

चक्रत्रयं दक्षिणेऽस्मिन् वामे छत्रत्रयं यजेत् ॥
पूर्णकुम्भं पुरोभागे यक्षयक्ष्यौ च पार्श्वयोः ॥ २१ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या दक्षिणेकडील बाजूला चक्रत्रयाची पूजा करावी. आणि डावेकडील बाजूला छत्रत्रयाची पूजा करावी. अग्रभागीं पूर्णकुंभाची पूजा करून त्याच्या दोहींबाजूस यक्ष आणि यक्षी ह्यांची पूजा करावी.

कुण्डस्य पूर्वभागे तु दर्भासनोऽवरेमुखः ॥
पद्मासनं समाश्रित्य पूजाद्रव्यं तु विन्यसेत् ॥ २२ ॥
होमद्रव्यप्रदानाय शिष्यवर्गं नियोजयेत् ॥
मौनं व्रतं समादाय ध्यायेच्च परमेश्वरम् ॥ २३ ॥

अर्थ— कुंडाच्या पूर्वेकडील बाजूला दर्भाचें आसन घालून त्यावर पश्चिमेकडे तोंड करून पद्मासन करून

वसावें. आणि जवळ पूजेला लागणाऱ्या वस्तु ठेवाव्यात. होमाला लागणारे पदार्थ आपल्या हातात देण्याकरितां शिष्यांची योजना—संभव असल्यास—करावी. आपण मौनव्रत धारण करून परमेश्वराचें ध्यान करावें.

जिनेंद्रमर्घ्यदानेन परात्मानं च तर्पयेत् ॥
मध्येकुण्डं सुगन्धेन विलिखेदग्निमण्डलम् ॥ २४ ॥
सम्पूज्य होमकुण्डं तमग्निं सन्धुक्षयेत्परम् ॥
नूतनाग्निर्भवेद्योग्यो होमसन्धुक्षणे तदा ॥ २५ ॥

अर्थ— नंतर श्रीजिनेंद्राला अर्घ्यदान करून परमात्म्याचें तर्पण करावें. कुण्डाच्या मध्यभागीं सुगंधद्र-व्यानें अग्निमंडल काढावें; आणि कुंडाची पूजा करावी नंतर त्या कुंडांत अग्नि प्रदीप्त करावा. अग्नि ताजा असला ह्मणजे पेटविण्याला योग्य असतो, ह्मणून अग्नि चांगला रसरशीत असावा.

दर्भपूलं पवित्रं तु रक्तवस्त्रेण वेष्टितम् ॥
तेन सञ्ज्वालयेत्कुण्डं स्वमन्त्रेण ससर्पिषा ॥ २६ ॥

अर्थ— शुद्ध अशी दर्भाची जुडी घेऊन तिला तांबडें वस्त्र गुंडाळून त्याच्या योगानें व तुपानें अग्नि प्रज्वलित करावा. त्यावेळी अग्नीचा मंत्र ह्मणावा.

तत आचम्य च प्राणायामं कुर्यात् ततः स्तुतिम् ॥
अग्नेरावाहनं कृत्वा पूजयेदष्टधाऽर्चनैः ॥ २७ ॥

अर्थ— नंतर आचमन करून प्राणायाम करावा. मग अग्नीची स्तुति करून त्याचें आवाहन करावें; आणि त्याचें अष्टधार्चन करावे. (१ जल, २ गंध, ३ अक्षता, ४ पुष्प, ५ चरु, ६ दीप, ७ धूप आणि ८ फल ह्या द्रव्यांनीं पूजन करणें ह्याला अष्टधार्चन ह्मणतात.)

गार्हपत्याग्निमादाय ज्वालयेत्तूत्तरेऽनलम् ॥
उत्तराग्निं तु संगृह्य ज्वालयेद्दक्षिणेऽनलम् ॥ २८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें अग्नीचें पूजन झाल्यावर त्या कुंडांतील थोडासा अग्नि घेऊन उत्तरेकडच्या कुंडांत घालून प्रज्वलित करावा. मग त्या कुंडांतील अग्नि घेऊन दक्षिणेकडील कुंडांत (वर्तुलाकृति कुंडांत) घालून प्रज्वलित करावा.

मेखलासु तिथिदेवान् ग्रहानिन्द्रांस्ततः क्रमात् ॥
पूजयेदुपरिष्टात्तु भक्त्या युक्त्या समन्त्रतः ॥ २९ ॥

अर्थ— नंतर कुंडांच्या मेखलांच्या ठिकाणीं तिथिदेवता, नवग्रह, इंद्र ह्यांची पूजा क्रमानें भक्तियुक्त अंतःकरणानें युक्तीनें मंत्र पठण करीत करावी.

दिक्पालान् परितः कुण्डं वेदिकायां तु तर्पयेत् ॥
कृतेषु लघुपीठेषु यथास्वं स्वदिशास्वपि ॥ १३० ॥
शाल्योदनं घृतं पक्कं नैवेद्यं रसपायसम् ॥
सिञ्चेत्क्षीरैर्घृतैर्मिश्रं दुग्धकेक्षुरसान्वितम् ॥ ३१ ॥

अर्थ— मग कुंडाच्या भोंवतीं वेदिकेवर अष्टदिक्पालांची पूजा करावी. त्यांचीं लहान लहान पीठें करून त्यांच्या त्यांच्या दिशेकडे त्यांची स्थापना केलेली असावी. तांदळांचा भात, तूप, शिजलेलें अन्न, उसाचा रस, दुधाची खीर ह्यांचा त्यांना नैवेद्य दाखवावा. तसेंच तो भात पाणी, तूप, दूध, उंसाचा रस ह्यांनी मिश्रित करून शिंपडावा.

स्रुक् आणि स्रुवा.

इन्धनं क्षीरवृक्षस्य स्रुक् स्रुवं चन्दनं तथा ॥
अश्वत्थस्याप्यभावेऽस्य तत्पत्रं वा नियोजयेत् ॥ ३२ ॥

अर्थ— आतां स्रुची (होमद्रव्य ज्यांत घालून अग्नींत टाकतात तें पात्र.) आणि स्रुवा (तूप अग्नींत हवन करण्याचें पात्र ह्मणजे पळी.) ह्यांचें लक्षण सांगतों. वडाच्या लांकडाची स्रुची करावी. आणि चंदनाच्या लांकडाचा स्रुवा करावा. हीं दोनी काष्ठें मिळत नसल्यास पिंपळाच्या काष्ठाचीं दोनीं पात्रें करावी.

किंवा त्या दोन्हीं पात्रांबद्दल पिंपळाच्या पानांची योजना करावी.

तत: पलाशपत्रेण क्षीरक्ष्मारुहपत्रत: ॥
स्रुक्स्रुवणोथवास्तु दद्यादादावाज्याहुतिं बुध: ॥ ३३ ॥
गोपुच्छसदृशा स्रुक् च स्रुवाग्रं नासिकासमम् ॥
दैर्घ्यं द्वयोररत्नि: स्यान्नाभिदण्ड: षडङ्गुल: ॥ ३४ ॥

अर्थ— अथवा वर सांगितलेलें लांकूड मिळत नसल्यास पळसाच्या किंवा वडाच्या पानाची स्रुक् आणि स्रुवा ही पात्रें तयार करावीत, त्या स्रुचीनें किंवा स्रुव्यानें तूपाची आहुती द्यावी. स्रुक् नांवाचें पात्र गायीच्या शेंपटीच्या आकाराचें-ह्मणजे लांबट तोंडाचें-करावें. आणि स्रुवा नांवाचें पात्र आपल्या नाकाच्या आकाराचें-रुंदट तोंडाचें-करावें. त्या पात्रांची तोंडें व मागील दांडा मिळून एक मुंडा हात लांबी असावी. त्यांत दांडा सहा बोटें लांब असावा. हें प्रमाण लाकडाचीं पात्रें करावयाचीं असल्यास समजावें.

तद्द्वयं दर्भपूलेन प्रमृज्यासेचयेज्जलै: ॥
काष्ठै: प्रताप्य तद्द्वन्द्वं ताभ्यां घृतं च होमयेत् ॥ ३५ ॥

अर्थ— तीं दोन्ही पात्रें होमाच्या वेळीं दर्भपूलानें ( दर्भाच्या जुडीने ) मार्जित करून (पुसून) त्यांच्यावर उदक सिंचन करावें. आणि पात्रें अग्नीवर तापवून त्यांच्या योगानें अग्नीत घृतहोम करावा.

अग्निज्वाला तु महती तथा कुर्यात् घृताहुतिम् ॥
आधिकेऽग्नौ गवां दुग्धैः कुशाग्रैः परिषेचयेत् ॥ ३६ ॥
त्रिषु कुण्डेषु सादृश्यं कुर्याद्धोमसमानताम् ॥
गार्हपत्याहवनीयदक्षिणाग्निं क्रमाद्यजेत् ॥ ३७ ॥

अर्थ— अग्नींत तुपाची जी आहुति घालावयाची ती ज्या तऱ्हेनें अग्नीची ज्वाला मोठी होईल तशा तऱ्हेने घालावी. अग्नीची ज्वाला फारच मोठी झाल्यास त्याच्यावर दर्भाच्या अग्राने गायीचे दूध शिंपडावें. तीनी कुंडात सारखाच होम करावा. कमीजास्ती करूं नये. त्यांत प्रथम गार्हपत्याग्नीत ( चतुष्कोण कुंडांत ), नंतर आहवनीय अग्नीत ( त्रिकोण कुंडांत ) आणि त्यानंतर दक्षिणाग्नीत ( वर्तुल कुंडांत ) अशा क्रमाने होम करावा.

तर्पण

तर्पणं पीठिकामन्त्रैः कुसुमाक्षतचन्दनैः ॥
मृष्टाम्बुपूर्णपाणिभ्यां कुर्वन्तु परमेष्ठिनाम् ॥ ३८ ॥

अर्थ— होम झाल्यानंतर करावयाचे तर्पण सांगतात— पीठिकामंत्रांनी ( णमो अरिहंताणं वगैरे मंत्रांनी ) फुलें, अक्षता, गंध आणि शुद्ध उदक हे पदार्थ अंजलीत घेऊन परमेष्ठींचे तर्पण करावें.

समिधा.

पिप्पलेन पलाशेन शम्या वा द्वादशाङ्गुलम् ॥
आर्द्रेन्धनैर्बुधः कुर्यात्समिधां होममुत्तमम् ॥ ३९ ॥

अर्थ— आतां होमास लागणाऱ्या समिधा सांगतात— पिंपळ, पळस किंवा शमी ह्यांच्या बारा बोटें लांबीच्या ओल्या समिधा घेऊन त्यानें होम करावा.

क्षीरद्रुमैर्वाऽथ पलाशभूरुहैः । सशर्कराक्षीरघृतप्लुतैः पृथक् ॥
होमेऽष्टविंशद्भिरिमैः (?) समिन्धनै- । र्नमोऽर्हतेत्यादिभिरेव पञ्चभिः ॥ १४० ॥

अर्थ— अथवा वड किंवा पळस ह्यांच्या समिधा काढून त्या साखर, दूध, तूप ह्यांत निरनिराळ्या भिजवून " नमोऽर्हते " वगैरे पांच मंत्रांनीं होम करावा. होमाच्या समिधा अठ्ठावीस असाव्यात.

वटिका.

काश्मीरागुरुकर्पूरगुडगुग्गुलचन्दनैः ॥
पुष्पाक्षतजलैर्लाजामिलितैरक्षसम्मितैः ॥ ४१ ॥
जयादिदेवतामन्त्रैरग्रेराहुतिमम्बुना ॥
ब्रह्ममायादिहोमान्ते वटिकाहोममाचरेत् ॥ ४२ ॥

अर्थ— आतां होमाच्या वटिका [ गोळया ] सांगतात— केशर, काळा चंदन, कापूर, गूळ, गुग्गुळ, पांढरा चंदन, फुलें, अक्षता, पाणी आणि लाह्या इतके पदार्थ मिसळून वेहेड्याच्या फळाएवढ्या वटिका [ गोळया ] कराव्यात. आणि जयादि देवतांच्या मंत्रानें अग्नीमध्यें होम करावा. मग ब्रह्म, माया वगैरे देवतांचा जलानें होम केल्यावर वटिकाहोम करावा. ह्या ठिकाणीं जलानें जो होम करावयाचा, तो जलामध्येंच करावयाचा, असें समजावें.

अन्न.

शाल्योदनं क्षीरविचित्रभक्ष्य- । पक्वान्नसर्पिः श्रृतपायसं च ॥
सुस्वादु पक्वं कदलीफलं च । स्रुचाऽक्षमात्रं मिलितं जुहोमि ॥ ४३ ॥

अर्थ— होमाचें अन्न सांगतात— तांदळांचा भात, दूध, अनेकप्रकारचे भक्ष्य पदार्थ, शिजलेलीं अन्नें, तूप, दुधाचा खवा, पिकलेलें आणि मधुर असें केळ हे सर्व पदार्थ मिसळून वेहेड्याच्या फळायेवढें स्रुचीमध्यें घेऊन अग्नींत हवन करावें.

अन्नाभावे जुहुयात्तु तण्डुलानोषधीन् स्रुचा ॥
पयो दधि घृतं चापि शर्करां वा फलानि च ॥ ४४ ॥

अर्थ— अन्न जर नसेल तर तांदूळ, वनस्पति, दूध, दही, तूप आणि साखर हे पदार्थ किंवा फळें

स्रुचीमध्यें घेऊन होम करावा.

उत्तानेन तु हस्तेन त्वङ्गुष्ठाग्रेण पीडिते (?) ॥
संहिताङ्गुलिपाणिस्तु मन्त्रतो जुहुयाद्धविः ॥ ४५ ॥

अर्थ— होम करावयाच्या वेळीं हात उत्ताणा असावा; आणि बोटांवर अंगठा दाबावा, तसेंच हाताचीं बोटें एकमेकांना चिकटलेलीं असावींत. ह्याप्रमाणें करून मंत्र ह्मणून होम करावा.

दिक्पालास कोरान्नाहुति.

प्रस्थप्रमाणचणकाढकमाषमुद्ग- । गोधूमशालियवमिश्रितसप्तधान्यैः ॥
होमे पृथग्विधृतमुष्टिभिरग्निकुण्डे । वारांश्च सप्त विषमग्रहदोषशान्त्यै ॥ ४६ ॥

अर्थ— एक शेर हरभरे, आणि उडीद, मूग, गहूं, भात, जव आणि तीळ ( हे श्लोकांत नाहींत. परंतु त्यांवांचून सात धान्यें होत नाहींत, ह्मणून लिहिले आहेत ) हीं सर्व धान्यें मिळून एक पायली, ह्याप्रमाणें सर्व मिसळून, एकेक मूठ निरनिराळीं घेऊन, अग्निकुंडांत-प्रत्येक दिक्पालाबद्दल सात सात वेळ असा-होम केला असतां दिक्पालांची शांति होत्ये. आणि दुष्टस्थानीं असलेल्या ग्रहांच्या उद्देशानें होम केला असता त्यांपासून होणारी पीडा दूर होते. ह्या होमाला कोरान्नाहुति असें ह्मणतात.

नवग्रह होम.

हुत्वा स्वमन्त्रचितमम्बुनि सससस- । मुष्टिप्रमाणतिलशालियवप्रसक्तिम् ॥
नीत्वा घृतप्लुतसमिद्भिरथाग्निकुण्डे । एकादशस्थवद्भवन्तु सदा ग्रहा वः ॥ ४७ ॥

अर्थ— नवग्रहशांतीचा विशेष प्रकार असा आहे कीं— त्या ग्रहाच्या मंत्रानें भांड्यांत पाणी सांठवून त्यांत तीळ, भात, जव वगैरे धान्याचें प्रत्येक ग्रहाच्या उद्देशानें सात सात वेळां हवन करावें. आणि हीं धान्यें व घृतयुक्त समिधा ह्यांचें हवन अग्निकुंडांत करावें. असें केलें असतां सर्व ग्रह तुह्माला एकादशस्थानीं असल्याप्रमाणें सुख देतील.

अर्कैः पलाशैः खदिरैर्मयूरै- । र्बोधिद्रुमैः फल्गुशमीसमिद्भिः ॥
दुर्वाकुशाभ्यां क्रमशो ग्रहाणां । सूर्यादिकानां जुहुयात्प्रशान्त्यै ॥ ४९ ॥

अर्थ— रुई, पळस, खदिर, ( खैर, ) अघाडा, पिंपळ, काळा उंबर, शमी, ह्यांच्या समिधा आणि दुर्वा व दर्भ ह्यांच्या योगानें क्रमानें सूर्यादिनवग्रहांचें हवन केलें असतां ( सूर्याच्या शांतीकरितां रुईच्या समिधा, चंद्राच्या शांतीकरितां पळसाच्या समिधा ह्याप्रमाणें क्रमानें त्या त्या ग्रहाच्या शांतीकरितां हवन केलें असतां ) सूर्यादिनवग्रहांची शांति होते.

अर्केण नश्यति व्याधिः पलाशः कामितप्रदः ॥
खदिरश्चार्थलाभश्च अपामार्गोऽरिनाशकः ॥ ५० ॥

अश्वत्थेन हरेद्रोगं दर्भोदुम्बरभाग्यदः ॥
शमी च पापनाशाय दूर्वा चायुःप्रवर्द्धिनी ॥ ५१ ॥

अर्थ— रुईच्या समिधांनीं होम केला असतां व्याधीचा नाश होतो. पळसाच्या समिधांनी इष्टप्राप्ति होते. खैरानें द्रव्यलाभ होतो. अघाड्यानें शत्रूचा नाश होतो. पिंपळाच्या समिधांनीं रोगांचें हरण होतें. दर्भ आणि उंबर ह्यान्या समिधांनीं भाग्य येतें. शमीच्या समिधांनी पातकाचा नाश होतो. आणि दूर्वांच्या हवनानें आयुष्य वाढतें. असें ह्या समिधांचें फळ आहे.

धौतादिवर्णं प्रमुखादिवर्णं । काञ्चीदुकूलं नखच्छिद्रहस्तम् ॥
देवाङ्गवस्त्रोज्वलकुन्दद्रीप्रं । आच्छादनं यज्ञगृहेषु सर्वम् ॥ ५२ ॥ (?)

यदि कुण्डास्त्रयः सन्ति तदा सर्वं समीहितम् ॥
पृथगष्टशतं होम्यं आज्यान्नकुसुमं समित् ॥ ५३ ॥

अर्थ— जर अग्निकुंडें तीन असतील तर सर्व कर्म यथास्थित होतेंच आहे. त्या कुंडांत तूप, अन्न, फुलें आणि समिधा ह्या प्रत्येक द्रव्याचा एकशेंहे आठ वेळ होम करावा.

एकमेव यदा कुण्डं गार्हपत्ये चतुरस्रके ॥
सर्वा अप्याहुतीः कुर्यात्पृथगष्टोत्तरं शतम् ॥ ५४ ॥

अर्थ— आणि जर एकच कुंड असेल, तर त्या चतुष्कोण कुंडांत गार्हपत्याग्नींतच सर्व आहुती निरनिराळ्या एकशेहे आठ वेळां द्याव्यात.

अन्नं समिल्लवङ्गापोऽञ्जलिचतुर्विधेषु च ॥
होमेषु यत्नतः कुर्यान्मध्ये मध्ये घृताहुतिम् ॥ ५५ ॥
कुर्यात्पूर्णाहुतिं चान्त्ये ग्रहस्तोत्रं तथा पठेत् ॥
त्रिःपरीत्य नमस्कारं महावाद्यसमन्वितम् ॥ ५६ ॥
तस्माद्भस्म समादाय पवित्रं पापनाशनम् ॥
धरेद्भालादिदेशेषु तिलकं कारयेद्बुधः ॥ ५७ ॥

अर्थ— अन्न, समिधा, लवंगा, उदक ह्या चार प्रकारच्याही होमांत प्रत्येक द्रव्याचा होम संपल्यावर अग्नींत तुपाची आहुति द्यावी. सर्व होम समाप्त झाल्यावर शेवटीं पूर्णाहुति (तुपाची धार मध्ये न तुटेल अशा रीतीनें अग्नींत सारखी सोडणें) द्यावी. ग्रहांचें स्तोत्र ह्मणावें. मग महावाद्यांचा घोष चालला असतां अग्नीला तीन प्रदक्षिणा कराव्यात. अग्नींतील भस्म पवित्र आणि पापनाशक असतें, ह्मणून तें घेऊन कपाळ वगैरे स्थानाला लावावें.

निशोपाविधि.

सत्वचः समिधः कार्या ऋज्व्यः श्लाघ्याः समास्तथा ॥
शस्ता दशाङ्गुलास्ताः स्युर्द्वादशाङ्गुलकाश्च वा ॥ ५८ ॥
षण्मासं स्याच्छमी ग्राह्या खादिरं तु त्रिमासिकम् ॥
मासत्रयं तु पालाशी अश्वत्थोऽहरहस्स्मृतः ॥ ५९ ॥
दिनमेकमपामार्गो ग्राह्यश्चार्कस्तथैव च ॥
वटादयोऽपि ग्राह्याः स्युस्त्रिदिनं स्यादुदुम्बरः ॥ १६० ॥
एतेषामप्यभावे तु कुशा इत्यपरे विदुः ॥
मासमेकं कुशो ग्राह्यो दूर्वा स्यात्सद्य एव च ॥ ६१ ॥

अर्थ— कांहीं विशेष नियम सांगतात– समिधा सालीसह असून त्या सरळ आणि एकसारख्या असाव्यात. त्या दहा अंगुलें किंवा बारा अंगुलें लांबीच्या असाव्यात. शमीच्या समिधा काढलेल्या दिवसापासून सहा महिनेपर्यंत होमाच्या उपयोगीं पडतात. खैराच्या समिधा तीन महिने उपयोगीं पडतात. पळसाच्या समिधा तीन महिने उपयोगी पडतात. पिंपळाच्या समिधा रोजच्यारोज नव्या असाव्यात. अघाड्याच्या समिधा एक दिवसाच्या असल्यास ग्राह्य होतात. रुईच्या समिधाही त्याचप्रमाणें एक दिवसाच्या शिळ्या असल्यास ग्राह्य होत. वड, उंबर वगैरेच्या समिधा तीन दिवस ग्राह्य होत. ह्या समिधा

जर न मिळतील तर त्यांच्या ऐवजी दर्भ घ्यावेत, असें दुसरे कित्येक पंडित समजतात. दर्भ काढलेल्या दिवसापासून एक महिनापर्यंत ग्राह्य होत. दूर्वा मात्र त्याच वेळीं काढलेल्या होमास घ्याव्यात.

कोद्रवं चणकं माषं मसूरं च कुलित्थकम् ॥
कांजिपक्वं परान्नं च वैश्वदेवे तु वर्जयेत् ॥ ६२ ॥

अर्थ— कोद्रव ( हरीक नावाचें धान्य ), हरभरे, उडीद, मसूरा, कुळथ्या, कांजींत शिजविलेलें अन्न आणि दुसऱ्याचें अन्न हे पदार्थ वैश्वदेवकर्मात वर्ज्य करावेत.

प्रतिष्ठादिमहत्कार्ये कुर्यादेवं सविस्तरम् ॥
नित्यकर्मणि संक्षेपात्तत्सर्वं विधिपूर्वकम् ॥ ६३ ॥

अर्थ— बिंबप्रतिष्ठा वगैरे मोठ्या कर्मांत हा सर्व विधि वर सांगितल्याप्रमाणें सविस्तर करावा. आणि नित्यकर्मात संक्षेपानें सर्व यथाविधि करावें.

होमाचे प्रकार.

होमस्तु त्रिविधो ज्ञेयो गृहिणां शान्तिकारकः ॥
पानीयवालुकाकुण्डभेदाद्रम्यः स्वशक्तितः ॥ ६४ ॥

अर्थ— गृही श्रावकानें करावयाचा शांतिक होम जलहोम, वालुकाहोम आणि कुंडहोम ( अग्निहोम )

असा तीन प्रकारचा आहे. तो त्यानें आपल्या, शक्तीप्रमाणें दिसण्यांत सुंदर दिसेल असा करावा.

जलहोम

यत्सद्वर्तुलकुण्डलक्षणमिदं श्रीवारिहोमे जिनैः ।
प्रोक्तं ताम्रमृदादिवस्तुरचिते कुण्डे समारोपितम् ॥
कुर्याच्छ्रीतिथिदेवता ग्रहसुराः शेषाश्च सन्तर्प्यताम् ।
शान्त्यर्थं जलहोममिष्टममलं दुष्टग्रहाणां बुधः ॥ ६५ ॥

अर्थ— जलहोमाच्या उद्देशानें श्रीजिनेंद्रांनीं कुंडाचें जें हें वर्तुलाकार लक्षण सांगितलें आहे, तें तांबें, माती वगैरेंनीं केलेल्या कुंडाच्या ठिकाणी जुळवावें. ह्मणजे माती, तांबें, वगैरे वस्तूंचें जलहोमाकरितां वर्तुलाकार कुंड करावें. आणि त्या कुंडांत तिथिदेवता, सूर्यादिग्रह, आणि बाकीचे देव ह्यांच्या संतोषाकरितां जलहोम करावा.

श्रीखण्डतण्डुलस्रग्भिः सम्भूषितमलं वरम् ॥
शुद्धतीर्थोदकैः पूर्णं जलकुण्डं महामहे ॥ ६६ ॥
सन्धौतशोधितव्रीहिपुञ्जे जिनमहोत्सवे ॥
संस्थाप्य पूजकाचार्यो जलहोमं समाचरेत् ॥ ६७ ॥

अर्थ— चंदन, अक्षता, माळा ह्यांनीं अत्यंत सुशोभित आणि पवित्र अशा तीर्थोदकानें परिपूर्ण असें जल-

कुंड यज्ञांत करावें. आणि तें धुतलेल्या साळीच्या भाताच्या पुंजावर ठेवून पूजकाचार्यानें त्यांत जलहोम करावा.

सप्तधान्यैस्तु दिक्पालाँस्त्रिधान्यैस्तु नवग्रहान् ॥
पक्वान्नं नालिकेरं च यथा शक्त्यत्र होमयेत् ॥ ६८ ॥

अर्थ— सप्तधान्यांच्या योगानें दिक्पालांच्या उद्देशानें हवन करावें. आणि त्रिधान्यांच्या योगानें नवग्रहांच्या उद्देशानें होम करावा. अन्न व नारळ ह्यांचाही आपल्या शक्तीप्रमाणें होम करावा. जलहोमाला नारळांतील खोबरें काढून घालतात हें प्रसिद्ध आहे.

आचमं तर्पणं प्राणायाममत्र विधानतः ॥
अपां कुंडे विधिं कुर्यादत्रापि सर्वमञ्जसा ॥ ६९ ॥

अर्थ— आचमन, तर्पण, प्राणायाम वगैरे सर्व कर्मं ह्या जलहोमाच्या वेळीं देखील यथाविधि प्रत्यक्ष केलीं पाहिजेत.

दिक्पालाः प्रतिसेवनाकुलजगद्दोषार्हदण्डोत्कटाः ॥
सद्धर्मप्रणये नियद्भगवत्सेवानियोगेऽपि च ॥
पूजापात्रकराः प्रभतःसरमुपेत्योपात्तबल्यर्चनाः ।
प्रत्यूहान्निखिलान्निरस्यत तनुस्नानोत्सवोत्साहिताः ॥ ७० ॥

अर्थ— दिक्पालांची प्रार्थना– हे दिक्पाल हो! कुमार्गानें वागण्यांत गढून गेलेल्या लोकांना त्यांच्या दोषाला योग्य अशा प्रकारचा दंड करण्याला तयार असलेले तुह्मी जिनांच्या प्रतिबिंबांना स्नान घालण्याचा हा मी जो उत्साह केला आहे त्याच्या योगानें आनंदित होऊन, आणि ज्या ज्या वेळीं मी पूजापात्र हातांत घेऊन जिनपूजेकरितां पुढें जाऊं लागेन; त्या त्या वेळीं माझ्या जवळ येऊन तुह्मी वली आणि पूजा ह्यांचें ग्रहण करून, माझ्या सद्धर्माचरणाच्या कृत्यांत आणि मी आरंभिलेल्या श्रीजिनेंद्र-पूजामहोत्सवाच्या कर्मात येण्याऱ्या विघ्नांचा तुह्मी नाश करा!

वालुकाहोम.

सम्मार्ज्य गोमयैर्भूमिं गन्धोदकैश्च सिञ्चयेत् ॥
तटिनीवालुकास्तत्र प्रसार्य हस्तमात्रतः ॥ ७१ ॥
तदुपर्यश्वत्थैः काष्ठैः शिखराकारसञ्चयम् ॥
कुर्यादन्यैश्च काष्ठैर्वा होमकुण्डे यथा पुरा ॥ ७२ ॥
नवग्रहान् तिथिदेवान् दिक्पालान् शेषदेवकान् ॥
अग्निसन्धुक्षणं कृत्वा पूजयेदग्निनायकम् ॥ ७३ ॥
आचमं तर्पणं जाप्यं समिधा त्वादिहोमकम् ॥

कुर्याच्छेषं विधानं तु संक्षेपादग्निहोमवत् ॥ ७४ ॥

अर्थ— आतां वालुकाहोम सांगतात– गायीच्या शेणानें जमीन सारवून त्याच्यावर गंधोदकाचें सेंचन करावें. मग नदीतील वाळू त्यावर एक हात लांबरुंद पसरावी. त्याच्यावर पिंपळाची लांकडें अथवा दुसरी लांकडें पूर्वी होमकुंडांत रचल्याप्रमाणें शिखराच्या आकाराचीं रचावीत. मग नवग्रह, तिथिदेवता, दिक्पाल आणि वाकीच्या देवता ह्यांचें पूजन करून, तीं लांकडें पेटवून अग्निनायकाचें पूजन करावें. अग्निहोमाप्रमाणेंच आचमन, तर्पण, जप, समिधांनी पूर्वी करावयाचा होम, वगैरे सर्व विधि संक्षेपानें करावा.

होमाचे प्रसग.

व्रतबन्धे विवाहे वा सूतके पातके तथा ॥
जिनगेहप्रतिष्ठायां नूतनगृहनिर्मितौ ॥ ७५ ॥
ग्रहपीडादिके जाते महारोगोपशान्तिके ॥
गर्भाधानविधाने तु पित्रादिमरणे तथा ॥ ७६ ॥
कुण्डानां लक्षणं प्रोक्तं प्रागेव होमलक्षणे ॥
यथावसरमालोक्य कुर्याद्धोमविधिं बुधः ॥ ७७ ॥

अर्थ— व्रतबंध, विवाह, सूतकसमाप्ति, पातकाचें प्रायश्चित्त, जिनमंदिरप्रतिष्ठा, नवीन गृह बांधणें ह्या कृत्यांत आणि ग्रहांची पीडा होत असतां, महामारी वगैरे मोठ्या रोगांची शांति करावयाची असतां, गर्भाधान करावयाचें असतां, आणि पिता वगैरे मरण पावले असतां, होमकृत्यांत जें कुंडाचें लक्षण सांगितलें आहे त्याप्रमाणें कुंड करून कालाला अनुसरून होमविधि करावा.

होमाचें फळ.

कृते होमविधौ लोके सर्वशान्तिः प्रजायते ॥
वक्ष्येऽधुना परग्रन्थे यजमानस्य लक्षणम् ॥ ७८ ॥

अर्थ— असा होमविधि केला असतां लोकांत सर्वप्रकाराची शांति होते. आतां पुढील ग्रंथांत यजमानाचें लक्षण (यजमान कोण असावा हें) सांगतों.

यजमान.

यजमानस्तु मुख्योऽत्र पत्नी पुत्रश्च कन्यका ॥
ऋत्विक् शिष्यो गुरुर्भ्राता भागिनेयः सुतापतिः ॥ ७९ ॥
एतेनैव हुतं यत्तु तद्ध्रुवं स्वयमेव हि ॥
कार्यवशात्स्वयं कर्ता कर्तुं यदि न शक्यते ॥ ८० ॥

अर्थ— पूजादिविधि करणारा मुख्य जो असेल तो यजमान होय. जर कांहीं तशाच अपरिहार्य अडचणीमुळे तो यजमान ते कृत्य करण्याला समर्थ नसेल, तर त्याच्याकरितां त्याची पत्नी, पुत्र, कन्या, ऋत्विज, शिष्य, गुरु, बंधु, वहिणीचा मुलगा, जांवई ह्यांपैकीं कोणींतरी करावें. ह्यांनीं आपल्याकरितां जें हवन वगैरे केलें असेल तें आपण—ह्मणजे मुख्यकर्त्यानेंच—केल्याप्रमाणें होतें.

होमाचा काल.

भानौ समुदिते विप्रो जुहुयाद्धवनं तथा ॥
अनुदिते तथा प्रातर्गवां च मोचनेऽपि वा ॥ ८१ ॥
हस्तादूर्ध्वं रविर्यावद्भुवं हित्वा न गच्छति ॥
तावदेव हि कालोऽयं प्रातस्तूदितहोमिनाम् ॥ ८२ ॥

अर्थ— होमाचा काल सांगतात— सूर्य उदय पावल्यावर ब्राह्मणानें हवन करावें. किंवा सूर्योदयाच्या पूर्वीं होम करावा. अथवा गायी रानांत सोडण्याच्या वेळीं होम करावा. जे सूर्य उदय पावल्यावर होम करणारे आहेत त्यांचा काल, प्रातःकालीं सूर्य उदय पावून भूमीपासून एक हात जोंपर्यंत वर आला नाहीं, तोंपर्यंतच असतो.

प्रातर्द्वादश नाड्यस्तु सायं तु नव नाडिकाः ॥

होमकालः समुद्दिष्टो मुनिभिस्तत्त्वदर्शिभिः ॥ ८३ ॥

अर्थ— वर सांगितलेला होमकाल मुख्यकाल होय. गौणकाल तत्त्वदर्शी मुनींनीं प्रातःकालीं सूर्योदयापासून बारा घटका होईतोंपर्यंत आणि सायंकाळी सूर्यास्तानंतर नऊ घटकापर्यंत सांगितला आहे.

अग्निहोत्र्याची प्रतिष्ठा.

एवं प्रतिदिनं कुर्वन्नग्नेरुपासनाविधिम् ॥
अग्निहोत्री द्विजः प्रोक्तः स विप्रैर्ब्रह्मवेदिभिः ॥ ८४ ॥
धार्मिको भूमिदेवोऽसावाहिताग्निर्द्विजोत्तमैः ॥
आर्यश्चोपासकः शिष्टः पुण्यात्मेति प्रकीर्तितः ८५ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें प्रतिदिवशीं अग्न्युपासनेचा विधि जो करतो, तो अग्निहोत्र द्विज होय. (ह्या ठिकाणी 'द्विज' शब्द घातल्यानें अग्निहोत्रविधि त्रैवर्णिकांनी करतां येतो असें सिद्ध होतें.) असें ब्रह्मवेत्ते विप्र ह्मणतात. असा अग्निहोत्री जो असेल, तोच धार्मिक आणि भूदेव ह्मणजे भूमीवरील देव होय. त्यालाच आहिताग्नि (ज्यानें अग्नि ठेवला आहे असा) ह्मणतात. त्रैवर्णिकामध्यें श्रेष्ठ अशा लोकांनीं ह्यालाच आर्य, उपासक, शिष्ट, पुण्यात्मा असें ह्मटलें आहे.

अग्निहोत्राचें फल

आहिताग्निर्द्विजश्चैको यत्र ग्रामे वसत्यहो ॥
ससेतयो न तत्र स्युः शाकिनीभूतराक्षसाः ॥ ८६ ॥
व्याघ्रसिंहगजाद्याश्च पीडां कुर्वन्ति नो कदा ॥
अकाले मरणं नास्ति सर्पव्याधिभयं न च ॥ ८७ ॥
प्रजा नृपप्रधानाद्याः सर्वेऽत्र सुखिनो जनाः ॥
धनधान्यैः परिपूर्णा गोधनं तुष्टिपुष्टिदम् ॥ ८८ ॥
बहवः सन्ति ते यत्र अग्निहोत्रद्विजाः पुरे ॥
तस्य देशे क्वचिन्न स्यादाधिव्याधिप्रपीडनम् ॥ ८९ ॥
तेभ्यो दानं नृपैर्देयं यथेष्टं गोकुलादिकम् ॥
ग्रामक्षेत्रगृहामत्ररत्नाभरणवस्त्रकम् ॥ ९० ॥

अर्थ— आहिताग्नि एक द्विज ज्या गांवांत रहातो, त्या ठिकाणी सातही प्रकारची महाभयाचीं साधनें (अतिवृष्टि, अवर्षण, उंदीर, डोळ, राघू, स्वदेशांतील युद्ध, आणि दुसऱ्या देशांशीं युद्ध) उत्पन्न होत नाहींत. शाकिनी, भुतें, राक्षस, व्याघ्र, सिंह, हत्ती वगैरे पशु, हे केव्हांही त्या ठिकाणी पीडा करीत नाहींत. त्या गांवांत कोणालाही अपमृत्यु येत नाहीं, सर्पाची आणि रोगांची भीति उत्पन्न होत

नाहीं. त्या गांवांतील प्रजा आणि राजा, प्रधान, वगैरे सर्व सुखी असतात. त्या ठिकाणीं धन आणि धान्य विपुल असतें, आणि पहाण्यावरोबर संतोष देणाऱ्या व गांवाचें पोपण करणाऱ्या अशा गायी पुष्कळ असतात. आणि ते अग्निहोत्री द्विज पुष्कळ ज्या नगरांत असतात त्या देशांत कोठेंही काळजी आणि रोग ह्यांची पीडा होत नाहीं. असल्या अग्निहोत्री ब्राह्मणांना राजानें गायी, गांवें, क्षेत्रें, घरें, भांडी, रत्नें, अलंकार, वस्त्र ह्या वस्तू वाटतील तितक्या दान कराव्यात.

श्रीजिनपुजा.

जिनबिम्बमथानीय पूर्वं देवगृहे न्यसेत् ॥
सिध्दादीनां तु यन्त्राणि स्वस्वस्थाने निवेशयेत् ॥ ९१ ॥
जिनेन्द्रसदनद्वारे क्षेत्रपालान् समर्चयेत् ॥
मध्यदेशे तु सद्देवान् गन्धर्वांस्तत्र दक्षिणे ॥ ९२ ॥
किन्नरान्वामभागे च भूतप्रेतांश्च दक्षिणे ॥
शेषांश्च बलिदानेन तर्पयेद्वामभागतः ॥ ९३ ॥
ब्रह्मभागे तु ब्रह्माणं अष्टौ दिशाधिपान्बहिः ॥
अर्घ्यपाद्ययज्ञभागैरमृतैः प्राक्प्रतर्पयेत् ॥ ९४ ॥

**त्रिहस्तं तु विशालं स्याद्यायतं पञ्चहस्तकम् ॥ अधोवस्त्रं तु हस्ताष्टं द्विहस्तं विस्तरान्मतम् ॥ ४१ ॥**

अर्थ— तीन हात रुंदीचें वस्त्र फार मोठें होतें, म्हणून पांघरावयाचें वस्त्र दोन हात रुंद आणि पांच हात लांब असावें. आणि नेसावयाचें वस्त्र दोन हात रुंद आणि आठ हात लांब असें असावें.

**पट्टकूलं तथा सौत्रं शुभ्रं वा पीतमेव च ॥ कदाचिद्रक्तवस्त्रं स्याच्छेषवस्त्रं तु वर्जयेत् ॥ ४२ ॥**

अर्थ— पट्टवस्त्र (?) व सुताचें वस्त्र ही वस्त्रें नेसण्यास व पांघरण्यास योग्य आहेत. तीं पांढरीं अथवा पिवळी असावीत. एखाद्यावेळी तांबडी असलीं तरी चालतात. पण बाकीची कोणतीही वस्त्रें नेसण्यास व पांघरण्यास उपयोगी नाहीत.

**रोमजं चर्मजं वस्त्रं दूरतः परिवर्जयेत् ॥ नातिस्थूलं नातिसूक्ष्मं विकारपरिवर्जितम् ॥ ४३ ॥**

अर्थ— केशापासून ( लोंकरीपासून ) तयार केलेलें वस्त्र, चामड्याचें वस्त्र ही वस्त्रें मुळींच घेऊं नयेत. नेसावयाचें व पांघरावयाचें वस्त्र फार जाड असूं नये व अगदी बारीकही असूं नये, मध्यम प्रतीचें असावें. आणि त्यांत कोणत्याही प्रकारची विकृति ( फाटणें, जळणें, वगैरे ) झालेली नसावी.

**लम्बयित्वा पुरा कोणद्वयं तेनैव वाससा ॥ आवेष्टयेत्कटीदेशं वामेन पार्श्वबन्धनम् ॥ ४४ ॥**

अर्थ— वस्त्र नेसण्याचे वेळीं त्या वस्त्राचे दोन्ही पदर पुढच्या बाजूस लोंबत सोडावेत [ आपण नेहमीं वस्त्र नेसतांना ज्याप्रमाणें एक आंखूड व एक लांब असे दोनी पदर पुढल्याबाजूस प्रथम धरतों तें नीट लक्षांत

आणिलें असतां समजेल. ] आणि मग त्या वस्त्रानें कंबरेला वेष्टन करावें. [ ह्या वेळी उजव्या हातांतील पदर डाव्या हातांत आणि डाव्या हातांतील पदर उजव्या हातांत येत असतो. ] नंतर डावीकडील वगलेला वस्त्राचें वंधन करावें ह्मणजे डाव्या कुशीजवळ वस्त्र खोवावें.

**कोणद्वयं ततः पश्चात्समीचीनं प्रकच्छयेत् ॥ कटीमेखलिकामन्तर्देशे गोप्यां प्रबन्धयेत् ॥ ४५ ॥**

अर्थ— मग एका पदराचे दोन कोपरे घेऊन पाठीकडल्या वगलेला कासोटा वांधावा. कंबरेची मेखला ( करदोडा ) वस्त्राच्या आंत गुप्त असावी. वाहेर दिसूं नये.

**आजानुकं तथाऽऽजङ्घं चानलीकं गृहोत्तमैः ॥ धारयेदुत्तरीयं तु यथादेहं पिधापयेत् ॥ ४६ ॥**

अर्थ— नेसलेलें वस्त्र गुडघ्यापर्यंत किंवा पिंडरीपर्यंत अथवा घोट्यापर्यंत नेसावें आणि पांघरावयाचें वस्त्र शरीराच्या अदमासाने पांघरावें.

**आजानुकं क्षत्रियाणामाजङ्घं वैश्यसम्मतम् ॥ आघौण्टं ब्रह्मपुत्राणां शूद्राणां शूद्रवन्मतम् ॥ ४७ ॥**

अर्थ— क्षत्रियांचें नेसावयाचें वस्त्र गुडघ्यापर्यंत असावे. वैश्यांचें पिंडरीपर्यंत असावें. ब्राह्मणांचें वस्त्र घोट्यापर्यंत असावें. आणि शूद्रांचें वस्त्र त्यांच्या चालीप्रमाणें असावें.

**नोत्तरीयमधः कुर्यान्नोपर्यधस्स्थमम्बरम् ॥ अज्ञानाद्यदि कुर्वीत पुनः स्नानेन शुध्यति ॥ ४८ ॥**

अर्थ— पांघरण्याचे वस्त्र नेसूं नये आणि नेसावयाचें पांघरूं नये. गैर समजुतीनें जर अशी उलटा-

पालट झाली, तर, पुनः स्नान करावें; ह्मणजे मनुष्य शुद्ध होतो.

अथोत्तरीयवस्त्रं तु पूर्ववद्धार्यते बुधैः ॥ एवं वस्त्रद्वयं धृत्वा धर्मकर्म समाचरेत् ॥ ४९ ॥

अर्थ— नंतर ( स्नान केल्यानंतर ) पूर्वीप्रमाणें अंगावरचें वस्त्र अंगावर घ्यावें आणि नेसावयाचें वस्त्र नेसावें. ह्याप्रमाणें दोन वस्त्रें धारण करून श्रावकानें आपली धार्मिक क्रिया करावी.

ये सन्ति द्रव्यसंयुक्तास्तेषां सर्वं निवेदितम् ॥
निस्स्पृहाणां दरिद्राणां यथाशक्ति विलोकयेत् ॥ ५० ॥

अर्थ— हा वरील आचार जो सांगितला तो सर्व धनवान् लोकांकरितां समजावा. जे निःस्पृह आणि दरिद्री असतील, त्यांनीं आपल्या शक्तीप्रमाणें करावा. ह्मणजे त्यांना दुसरें वस्त्र मिळत नसेल तर त्यांनीं एका वस्त्रावरच निर्वाह करावा.

वामहस्तेन सन्धार्य वस्त्रमार्द्रं निपीडयेत् ॥ स्वहस्तेन स्वजातीयहस्तेन प्राणियत्नतः ॥ ५१ ॥

अर्थ— ओलें वस्त्र डाव्या हातांत धरून पिळावें. तें आपणच पिळावें किंवा आपल्या सजातीय मनुष्याकडून पिळून घ्यावें.

आतां स्नानाचे प्रकार सांगतात—

मान्त्रं भौमं तथाऽऽग्नेयं वायव्यं दिव्यमेव च ॥

वारुणं मानसं चैव सप्त स्नानान्यनुक्रमात् ॥ ५२ ॥

अर्थ— मंत्रस्नान, भूमिस्नान, अग्निस्नान, वायुस्नान, दिव्यस्नान, जलस्नान आणि मानसस्नान अशीं सात प्रकारचीं स्नानें आहेत.

प्रातःस्नाने त्वशक्तश्चेन्मार्जयेदार्द्रवाससा ॥ उत्तमाङ्गादिपादान्तं स भवेत्स्नानकृच्छुचिः ॥ ५३ ॥

अर्थ— प्रातःस्नान करण्यास मनुष्य जर अशक्ततेमुळें असमर्थ असेल तर त्यानें ओल्या वस्त्रानें मस्तकापासून पायापर्यंत अंग पुसावें. म्हणजे त्यानें स्नान केल्यासारखें होतें.

आपः स्वभावतः शुद्धाः किं पुनर्वह्निनापिताः ॥

अतः सन्तः प्रशंसन्ति स्नानमुष्णेन वारिणा ॥ ५४ ॥

अर्थ— पाणी हें स्वभावतःच शुद्ध आहे. तेंच जर अग्नीनें तापविलें तर मग अधिकच शुद्ध होतें. म्हणून पंडितलोक उष्णोदकानें स्नान करणें फारच प्रशस्त मानतात.

अभ्यङ्गे चैव माङ्गल्ये गृहे चैव तु सर्वदा ॥ शीतोदकेन न स्नायाद्व धार्यं तिलकं तथा ॥ ५५ ॥

अर्थ— अंगाला तेल लाविलें असतां, मंगलकार्यांत आणि घरांत स्नान करावयाचें असतां शीतोदकानें केव्हांही स्नान करूं नये. तसेंच स्नान केल्यावांचून गंध लावूं नये.

शीतास्वप्सु निक्षिपेच्च उष्णमुष्णासु शीतकम् ॥

ताभिः स्नाने कृते प्रोक्तं प्रायश्चित्तं जिनागमे ॥ ५६

अर्थ— थंड पाण्यांत ऊन पाणी घालूं नये, आणि ऊन पाण्यांत थंड पाणी घालूं नये. कारण, तसल्या मिसळलेल्या पाण्यानें स्नान केल्यास जिनागमांत (शास्त्रांत) प्रायश्चित्त सांगितलें आहे.

स्वक्रियानिरतो गेही गृहे चापि विधानतः ॥
करोति पञ्चधाऽऽचारं नदीं गन्तुमशक्तकः ॥ ५७ ॥
सङ्कल्पं सूत्रपठनं मार्जनं चाघमर्पणम् ॥
देवतातर्पणं चैव गृहे पञ्च विवर्जयेत् ॥ ५८ ॥

अर्थ— आपला सदाचार चालविण्याविषयीं सिद्ध असलेला गृही श्रावक, नदीला जाऊन स्नान करण्यास असमर्थ झाला असतां घरांत देखील स्नानासंबंधानें करण्याच्या पांचही क्रिया करतो. परंतु गुप्तमंत्राचा जप, सूत्रपठन, मार्जन, प्रायश्चित्त आणि देवतातर्पण ह्या पांच क्रिया मात्र घरांत करूं नयेत.

अन्त्यजैः खनिताः कूपा वापी पुष्करिणी सरः ॥
तेषां जलं न तु ग्राह्यं स्नानपानाय च क्वचित् ॥ ५९ ॥

अर्थ— अंत्यजांनीं खणलेली जीं आड, विहीर किंवा तळीं असतील, त्यांचें पाणी स्नानाला अथवा पिण्याला केव्हांही घेऊं नये.

पाण्यातून बाहेर निघण्याचा मंत्र.

अथ जलान्निर्गमनमन्त्रः । ॐ नमोऽर्हते भगवते संसारसागरनिर्गताय अर्हं जलान्निर्गच्छामि स्वाहा ॥ १ ॥ जलान्निर्गमनमन्त्रः ॥

अर्थ— " ॐ नमो " इत्यादि हा पाण्यांतून बाहेर निघण्याचा मंत्र होय.

ॐ ह्रीं क्ष्वीं क्ष्वीं अर्हं हं सः परमपावनाय वस्त्रं पावनं करोमि स्वाहा ॥ २ ॥ स्नानकाले सन्धौतवस्त्रप्रोक्षणम् ॥

अर्थ— " ॐ ह्रीं क्ष्वीं इत्यादि " हा धुतलेल्या वस्त्रांचें प्रोक्षण करण्याचा मंत्र आहे.

ॐ श्वेतवर्णे सर्वोपद्रवहारिणि सर्वमहाजनमनोरञ्जनि परिधानोत्तरीयधारिणि हं क्षं वं मं हं सं तं परिधानोत्तरीय धारयामि स्वाहा ॥ ३ ॥ इत्यनेन पूर्वप्रक्षालितप्रोक्षितनिर्द्रववस्त्रद्वयेनान्तरीयोत्तरीयसन्धारणम् ॥

अर्थ— ॐ श्वेतवर्णे इत्यादि मंत्रानें पूर्वी धुतलेलीं व प्रोक्षण केलेलीं दोन वस्त्रें धारण करावींत.

आचमनाचा विधि

उपस्थित्वा शुचौ देशे स्नात्वाऽस्नात्वा तथैव च ॥
आचमोऽवश्य कर्तव्यस्ततोऽसौ शौचवान्मतः ॥ ६० ॥

अर्थ— स्नान केल्यावर अथवा स्नान न केलें असतांही शुद्ध जाग्यावर वसून आचमन अवश्य करावें. कारण, आचमन केल्यानें मनुष्य शुद्ध होतो.

देशं कालं वयो वंशं गोत्रं जातिं गुरुं तथा ॥
संस्मृत्य प्राह्णसन्ध्यायां सङ्कल्प्याचमनं चरेत् ॥ ६१ ॥

अर्थ— प्रातःकाली आपल्या रहाण्याचा देश, सध्या असलेला काल, आपला वंश, आपलें गोत्र, आपली जाति आणि आपला गुरु इतऱ्यांचें स्मरण करून संकल्प करून आचमन करावें.

पूर्ववद्वस्त्रमादाय कुर्यादाचमनं बुधः ॥
न तिष्ठन्न स्थितो नग्नो नामन्त्रो नास्पृशन् जलम् ॥ ६२ ॥

अर्थ— स्नान केल्यावर पूर्वी सांगितल्याप्रमाणें वस्त्र धारण करून आचमन करावें. तें उभें राहून करूं नये, वांकून करूं नये, मंत्रावाचून करूं नये आणि जलस्पर्श केल्यावांचून करूं नये.

सव्यहस्तेन (?) त्र्यङ्गुल्या शङ्खीकृत्य पिबेत्पयः ॥
माषमात्रं प्रमाणं स्याज्जलमाचमने शुभम् ॥ ६३ ॥

अर्थ— उजव्या हातानें तीन बोटांनी शंखमुद्रा करून जलप्राशन करावें. आचमनाचें पाणी उडीदभर असावें, हें त्याचें मुख्य प्रमाण आहे.

सम्मृज्यात्तिर्यगास्यं त्रिः संवृत्त्याङ्गुष्ठमूलतः ॥
अधोवक्त्रमुपरिष्टात्तलेन द्विः सम्मार्जयेत् ॥ ६४ ॥

अर्थ— आचमन केल्यावर दोनी ओंठ मिटून हाताच्या अंगठ्याच्या मूळानें नुसतें ओंठ तीन वेळां पुसावें; आणि खालच्या ओंठाच्या खालचा भाग हाताच्या तळव्यानें दोन वेळ पुसावा.

एकवारं स्पृशेदास्यं तर्जन्याद्यंगुलित्रिभिः ॥ घ्राणरन्ध्रद्वयं स्पृशेत्तर्जन्यङ्गुष्ठयुग्मतः ॥ ६५ ॥ स्पृशेच्चाक्षिद्वयं साक्षादनामिकांगुष्ठतोऽपि च ॥
श्रोत्रयोर्युगलं पश्चात्कनिष्ठिकाङ्गुष्ठयोगतः ॥ ६६ ॥ अंगुष्ठेन तु नाभिं च करतलेन वक्षसि ॥ बाहुयुग्मं कराग्रेण सर्वाभिर्मस्तकं स्पृशेत् ॥ ६७॥

अर्थ— तर्जनी वगैरे तीन बोटांनी एक वेळ तोंडाला स्पर्श करावा. तर्जनी आणि आंगठा ह्या दोहोंच्या योगानें नाकाच्या दोनी छिद्रांना स्पर्श करावा. अनामिका ( मधल्या बोटाच्या पलीकडील बोट ) आणि आंगठा ह्या दोन बोटांनी दोनी डोळ्यांना स्पर्श करावा. शेवटचें बोट आणि आंगठा ह्या दोन बोटांनी कानांला स्पर्श करावा. अंगठ्यानें नाभी आणि तळहातानें ऊर ह्यांना स्पर्श करावा. बोटांच्या शेंड्यांनी दोनी बाहुंच्यांना स्पर्श करावा, आणि सगळ्या बोटांनीं मस्तकाला स्पर्श करावा.

आचमनेऽङ्गभेदास्तु चैते द्वादशधा मताः ॥

क्रियाभेदास्तथा ज्ञेयाः पञ्चदशेति संख्यया ॥ ६८ ॥

अर्थ— एका आचमनांत हीं बारा अंगें स्पर्श करावयाचीं असतात. आणि क्रिया मात्र पंधरा होतात.

भुजद्वयाशिरोनाभिमुखरन्ध्राणि सप्तधा ॥
वक्षश्च द्वादशाङ्गानि प्रोक्तानि श्रीजिनागमे ॥ ६९ ॥

अर्थ— दोन बाहु, मस्तक, नाभि, मुखांतील सात छिद्रें (मुखाचें एक, डोळे आणि कान यांचीं प्रत्येकाचीं दोन दोन, मिळून सात छिद्रें) आणि ऊर हीं बारा अंगें जिनागमांत सांगितलीं आहेत.

एतेष्वङ्गेषु प्रस्वेदो जायते श्रमयोगतः ॥
विण्मूत्रोत्सर्जने भोगे भोजने गमनादिषु ॥ ७० ॥

अर्थ— मल आणि मूत्र यांचें विसर्जन, स्त्रीसंभोग, भोजन आणि गमन ह्या व्यापारामुळें जे श्रम होतात, त्याच्या योगानें वर जीं बारा अंगें सांगितलीं त्यांना घाम येतो.

श्रोत्रचक्षुर्मुखघ्राणकक्षाकुक्षिषु नाभिषु ॥
स्रावो जातो यतस्तस्माचाचमनं क्रियते पुनः ॥ ७१ ॥

अर्थ— आणि कान, डोळे, तोंड, नाक, दोनी कुश्या, दोनी काखा आणि नाभि यांच्या ठिकाणीं स्राव होतो. ह्मणून वरचेवर आचमन करावें. [आचमन केलें ह्मणजे तीं अंगें वरचेवर पुसलीं जातात.

अर्थ— कुश, काश नांवाचें गवत, दूर्वा, वाळा, कुकुंदर (?) एक प्रकारचें गवत, गहू, भात, जव आणि मोळ ह्या दहा प्रकारच्या वस्तूंना दर्भ ह्मणावें.

नभोमासस्य दर्शे तु शुभ्रान् दर्भान् समाहरेत् ॥
अयातयामास्ते दर्भा नियोज्याः सर्वकर्मसु ॥ ८२ ॥

अर्थ— श्रावणमासाच्या अमावास्येला पांढऱ्या वर्णाचे दर्भ उपटून आणावेत. ते दर्भ शिळे होत नाहींत. ते दर्भ सर्व कर्मांत ग्राह्य समजावेत.

कृष्णपक्षे चतुर्दश्यामानेतव्या कुशा द्विजैः ॥
अकालिकास्तथा शुद्धा अत ऊर्ध्वं विगर्हिताः ॥ ८३ ॥

अर्थ— ह्या अमावास्येला न आणतां मध्येंच जर दर्भ आणावयाचे असतील, तर, ते कृष्णपक्षांतील चतुर्दशीच्या दिवशीं आणावेत. ह्मणजे ते शुद्ध समजण्यास हरकत नाहीं. ह्याहून दुसऱ्या कोणत्याही दिवशीं आणलेले दर्भ अशुद्ध समजावेत.

शुद्धिमन्त्रेण सम्मन्त्र्य सकृच्छित्वा समुध्दरेत् ॥
अच्छिन्नाग्रा अशुष्काग्राः पूजार्थे हरिताः कुशाः ॥ ८४ ॥

अर्थ— शुद्धीच्या मंत्रानें अभिमंत्रण करून दर्भ उपटून घ्यावेत. ते दर्भ हिरवे असावेत; त्यांचे

शेंडे तुटलेले अथवा वाळलेले असूं नयेत. हे दर्भ पूजेच्या उपयोगीं पडतात.

कुशालाभे तु काशाः स्युः काशाः कुशमयाः स्मृताः ॥
काशाभावे गृहीतव्या अन्ये दर्भा यथोचितम् ॥ ८५ ॥

अर्थ— कुश नावांचे दर्भ जर मिळाले नाहींत तर काश नांवाचे दर्भ घ्यावेत. कारण, तें काश नावाचें गवतही दर्भाप्रमाणेंच मानलें आहे. तेंही न मिळालें तर जसे मिळतील तसे दुसरे दर्भ घ्यावेत.

धर्मकृत्येषु सर्वेषु कुशा ग्राह्याः समाहिताः ॥
दूर्वाः श्लक्ष्णाः सदा ग्राह्याः सर्वेषु शुभकर्मसु ॥ ८६ ॥

अर्थ— सर्व धर्मकृत्यांत कुश नांवाचे दर्भ अवश्य घ्यावेत. आणि ताज्या दूर्वा सर्व प्रकारच्या शुभकर्मांत घ्याव्यात.

ये त्वन्तर्गर्भिता दर्भा ये छेद्या नखैस्तथा ॥
कुथिताश्चाग्निदग्धाश्च कुशा यत्नेन वर्जिताः ॥ ८७ ॥

अर्थ— ज्या दर्भांच्या आंत सुरळी आहे असे दर्भ, नखांनीं खुडलेले दर्भ, विजा केलेले दर्भ आणि अग्नीनें जळलेले दर्भ, हे दर्भ केंव्हाच घेऊं नयेत.

अमावास्यां (?) न च छिंद्यात्कुशांश्च समिधस्तथा ॥

स्नाने दाने जपे यज्ञे स्वाध्याये नित्यकर्मणि ॥
सपवित्रौ सदर्भौ वा करौ कुर्वीत नान्यथा ॥ ९५ ॥

र्थ— स्नान, दान, जप, यज्ञ, स्वाध्याय आणि नित्यकर्म ह्या कर्मांत पवित्र किंवा दर्भ ह्यांनीं युक्त हात . इतर वेळीं पवित्र किंवा दर्भ हातांत धारण करूं नयेत.

करयुग्मस्थितैर्दर्भैः समाचामति यो गृही ॥
महत्पुण्यफलं तस्य भुक्ते चतुर्गुणं भवेत् ॥ ९६ ॥

अर्थ— दोन्ही हातांत दर्भ धारण करून जो गृहस्थ श्रावक आचमन करतो, त्याचें पुण्यफल फार मोठें आहे. आणि पवित्र धारण करून भोजन करील तर तें पुण्य चौपट अधिक होईल.

दर्भं विना न कुर्वीत चाचमं जिनपूजनम् ॥
जिनयज्ञे जपे होमे ब्रह्मग्रन्थिर्विधीयते ॥ ९७ ॥

अर्थ— दर्भ धारण केल्यावांचून आचमन, जिनपूजन वगैरे क्रिया करूं नयेत. जिनपूजन जप आणि होम ह्या कर्मांत पवित्राला ब्रह्मग्रंथि ( ब्रह्मगांठ ) असावी.

सपवित्रः सदर्भो वा कर्माङ्गाचमनं चरेत् ॥
नोच्छिष्टं तत्पवित्रं तु भुक्त्वोच्छिष्टं तु वर्जयेत् ॥ ९८ ॥

त्रिभिश्च शान्तिके कार्ये पौष्टिके पञ्चभिस्तथा ॥ ९१ ॥

अर्थ— अथवा सर्व वर्णांच्या लोकांचें ( त्रैवर्णिकांचें ) पवित्रक दोन दर्भांचेच असावें. शांतिकृत्यांत तीन दर्भांचें व पौष्टिककर्मांत पांच दर्भांचें असावें; एवढा त्यांत विशेष आहे.

चतुर्भिश्चाभिचारे तु निष्कामैरिति केचन ॥
द्वौ दर्भौ दक्षिणे हस्ते सर्वदा नित्यकर्मणि ॥ ९२ ॥

अर्थ— जारणमारण कर्मांत चार दर्भांचें पवित्रक असावें. कितिएकांचे ह्मणणें निष्काम मनुष्यांनीं चार दर्भांचें पवित्र घालावे असे आहे. नित्यकर्मांत उजव्या हातांत दोन दर्भांचें पवित्र सर्वदा धारण करावें.

पूजायां तु त्रयो ग्राह्याः साग्राः स्युः षोडशाङ्गुलाः ॥
द्विमूलमेकतः कुर्यात्पवित्रं चाग्रमेकतः ॥ ९३ ॥

अर्थ— पूजा करतांना तीन दर्भांचें पवित्रक घालावें. पवित्राचे दर्भ सोळा बोटें लांब असावेत. त्या सर्व दर्भांचे बुडखे एकाच बाजूस असावेत, आणि शेंडे एका बाजूस जुळून असावेत.

द्व्यङ्गुलं मूलवलयं ग्रन्थिरेकाङ्गुला मता ॥ चतुरङ्गुलमग्रं स्यात्पवित्रस्य प्रमाणकम् ॥ ९४ ॥

अर्थ— बोटांत घालावयाचें पवित्राचें वलय दोन बोटें असावें. गाठ एक बोट, आणि शेंडा चार बोटें असावा; असें पवित्राचें प्रमाण आहे.

स्नाने दाने जपे यज्ञे स्वाध्याये नित्यकर्मणि ॥
सपवित्रौ सदर्भौ वा करौ कुर्वीत नान्यथा ॥ ९५ ॥

अर्थ— स्नान, दान, जप, यज्ञ, स्वाध्याय आणि नित्यकर्म ह्या कर्मांत पवित्र किंवा दर्भ ह्यांनीं युक्त हात असावेत. इतर वेळीं पवित्र किंवा दर्भ हातांत धारण करूं नयेत.

करयुग्मस्थितैर्दर्भैः समाचामति यो गृही ॥
महत्पुण्यफलं तस्य भुक्ते चतुर्गुणं भवेत् ॥ ९६ ॥

अर्थ— दोन्ही हातांत दर्भ धारण करून जो गृहस्थ श्रावक आचमन करतो, त्याचें पुण्यफल फार मोठें आहे. आणि पवित्र धारण करून भोजन करील तर तें पुण्य चौपट अधिक होईल.

दर्भं विना न कुर्वीत चाचमं जिनपूजनम् ॥
जिनयज्ञे जपे होमे ब्रह्मग्रन्थिर्विधीयते ॥ ९७ ॥

अर्थ— दर्भ धारण केल्यावांचून आचमन, जिनपूजन वगैरे क्रिया करूं नयेत. जिनपूजन जप आणि होम ह्या कर्मांत पवित्राला ब्रह्मग्रंथि ( ब्रह्मगांठ ) असावी.

सपवित्रः सदर्भो वा कर्माङ्गाचमनं चरेत् ॥
नोच्छिष्टं तत्पवित्रं तु भुक्त्वोच्छिष्टं तु वर्जयेत् ॥ ९८ ॥

अर्थ— पवित्र किंवा दर्भ हातांत धारण करून आचमन करावें. ह्याप्रमाणें आचमन केल्यानें तें पवित्र उष्टें होत नाहीं. फक्त भोजन केलें ह्मणजे मात्र उष्टें होतें. मग तें पवित्र टाकून द्यावें.

पवित्राचे प्रकार

दार्भं नागं च ताम्रं वा राजतं हैममेव च ॥
त्रिभूपा दक्षिणे पाणौ पवित्रं चोत्तरोत्तरम् ॥ ९९ ॥

अर्थ— दर्भ, शिस्सें, तांबें, रुपें आणि सोनें ह्यांतील कोणत्याही एक प्रकारचें पवित्र करून उजव्या हातांत घालावें. ह्यांत पहिल्यापेक्षां दुसरें, त्यापेक्षां तिसरें, ह्याप्रमाणें उत्तरोत्तर पवित्रें अधिक शुद्ध समजावींत.

अनामिक्यां(?) धृतं हैमं तर्जन्यां रौप्यमेव च ॥
कनिष्ठायां धृतं ताम्रं तेन पूतो भवेन्नरः ॥ १०० ॥

अर्थ— अनामिकेच्या ठिकाणी सोन्याचे पवित्र, तर्जनीच्या ठिकाणी रुप्याचे आणि कनिष्ठिकेच्या ठिकाणी तांब्याचे पवित्र धारण केलें असतां, त्या योगानें मनुष्य शुद्ध होतो.

कर्णयोः कुण्डले रम्ये कङ्कणं करभूषणम् ॥
उत्तारियं योगपट्टं पादुके रौप्यनिर्मिते ॥ १०१ ॥

अर्थ— श्रावकानें कानात कुंडलें, हातांत सुवर्णाचें कंकण, उत्तरीय वस्त्र, योगपट्ट ( मस्तकास बांध-

ण्याचें वस्त्र ) आणि रुप्याच्या पादुका हे पदार्थ अवश्य धारण करावेत.

न धार्यं पितरि ज्येष्ठे भ्रातरि सुखजीवति ॥
योगपट्टं च तर्जन्यां मौंजं रौप्यं च पादुका ॥ १०२ ॥

अर्थ— पिता किंवा वडील बंधु जीवंत असतां योगपट्ट, तर्जनीच्या ठिकाणी रुप्याचें अथवा मोळाचें पवित्रक आणि पादुका ह्या वस्तु धारण करूं नयेत.

॥ अथ सन्ध्याचमनमन्त्रः ॥

पवित्रप्रदेशे उपविश्य सन्ध्या कार्या ॥

अर्थ— पवित्र जागीं बसून संध्या करावी. प्रथम पुढें सांगितल्याप्रमाणें संकल्प करावा.

ॐ अद्य भगवतो महापुरुषस्य श्रीमदादिब्रह्मणो मतेऽत्र सरस्तीरे
तस्य प्रपौत्रः तस्य पौत्रः तस्य पुत्रः श्रीवत्सगोत्रजोऽहं देवदत्तनामा
प्रातःसन्ध्यां करिष्य इति मुकुलितकरः संकल्पः ॥

अर्थ— 'ओं अद्य भगवतो' इत्यादि संकल्प प्रथम करावा. तो करतांना दोनी हात जोडलेले असावेत. ह्या संकल्पांत ' तस्य प्रपौत्रः ( त्याचा पणतु ) तस्य पौत्रः (त्याचा नातु) आणि तस्य पुत्रः ( त्याचा मुलगा ) अमा मी असें ह्मणावयाचें असते. त्या ठिकाणीं संकल्प करणाऱ्यानें आपल्या पणजाचें, अजाचें आणि

वापाचें जें नांव असेल, तें उच्चारावें. तसेंच 'श्रीवत्सगोत्रजः' असें ज्याठिकाणीं आहे तेथें संकल्प करणाऱ्यानें आपल्या गोत्राचा उच्चार करावा. आणि 'देवदत्तनामा' ह्या ठिकाणीं संकल्प करणाऱ्यानें आपल्या नांवाचा उच्चार करावा. ह्याप्रमाणें संकल्प करावा.

ॐ ह्रीं क्ष्वीं क्ष्वीं वं मं हं सं तं पं द्रां द्रीं हं सः स्वाहा ॥ १ ॥ इत्यनेनाचमनं कुर्यात् ॥ शंखमुद्रितहस्तेन सर्वोऽप्यत्र पिबेज्जलम् ॥

अर्थ— ॐ ह्रीं, इत्यादि मंत्र ह्मणून आचमन करावें. आचमनाचें पाणी शंखाकार हस्तानें सर्वांनी ( त्रैवर्णिकांनी ) प्राशन करावें.

ॐ ॐ ॐ ॥ इत्येवं प्रत्येकमुच्चारयन् अंगुष्ठमूलेन त्रिधा वक्त्रं तिर्यक् सम्मार्जयेत् ॥

अर्थ— ॐ ॐ ॐ असें तीन वेळां ह्मणून प्रत्येक वेळी अंगठ्याच्या मुळानें आडवें [ उजवीकडून डावीकडे ] तोंड पुसावें. ह्याप्रमाणे तीन वेळ करावें.

ह्रीं ह्रीं ह्रीं ॥ इति हस्ततलेनोपरिष्टादधो द्विः सम्मार्जयेत् ॥

अर्थ— ह्रीं ह्रीं ह्रीं असें ह्मणून तळहातानें वरून खालीं ह्याप्रमाणें दोन वेळां तोंड पुसावें.

क्ष्वीं क्ष्वीं ॥ इति तर्जन्यादित्रयेणास्यं स्पृशेत् ॥

अर्थ— ह्या मंत्रानें तर्जनी वगैरे तीन बोटांनी तोंडाला स्पर्श करावा.

क्ष्वीं इत्येकवार मुखं एवं तर्जन्यंगुष्ठाभ्यां दक्षिणं वामं च नासाविवरं वं मं ॥ अंगुष्ठानामिकाभ्यां चक्षुषी हं सं ॥ कनीयस्यंगुष्ठयुग्मेन श्रोत्र-युग्मं तं पं ॥ अंगुष्ठेन नाभिं द्रां ॥ तलेन हृदयं द्रीं ॥ हस्ताग्रेण भुज-शिखरयुगं हं सः ॥ समस्तहस्तकेन मस्तकं स्पृशेदेकवारमेव स्वाहा इति ॥ श्रोत्राचमनविधिः क्रियाभेदात्पञ्चदशधा । अङ्गभेदात्पुनर्द्वादशधा ॥

अर्थ— नंतर "क्ष्वीं" ह्या मंत्राने एकवार मुखाला स्पर्श करावा. "वं मं" ह्या मंत्रानें अंगठा आणि त्याच्या जवळचें बोट ह्या दोहोंनी नाकाच्या छिद्रांस स्पर्श करावा. अंगठा आणि अनामिका ह्या दोन बोटांनी "हं सं" ह्या मंत्रानें दोनी डोळ्यांस स्पर्श करावा. शेंवटचें बोट आणि अंगठा ह्या दोन बोटांनी "तं पं" ह्या मंत्रानें दोनी कानांस स्पर्श करावा. "द्रां" ह्या मंत्रानें नुसत्या अंगठ्यानें नाभीला स्पर्श करावा. "द्रीं" ह्या मंत्रानें तळहातानें उराला स्पर्श करावा. "हं सः" ह्या मंत्रानें सर्व बोटांच्या शेवटानें दोनी बाहुंस्यांस स्पर्श करावा. आणि "स्वाहा" ह्या मंत्रानें सर्व हातानें मस्तकाला एकवार स्पर्श करावा. ह्याप्रमाणें हा श्रोत्राचमनाचा विधि सांगितला. ह्या विधींत पंधरा क्रिया आहेत, आणि स्पर्श करण्याचीं अंगें बारा आहेत. हा वरील विधि करतांना त्या त्या बोटास वगैरे पाणी लावून त्या त्या अंगाला स्पर्श करावा.

ततोऽनामिकायां दर्भं निधायानामिकाङ्गुष्ठाभ्यां नासाग्रं गृहीत्वा ।

ॐ भूर्भुवः स्वः अ सि आ उ सा प्राणायामं करोमि स्वाहा ॥

इति त्रिरुच्चार्य कुम्भकपूरकरेचकान् कुर्वन् प्राणायामं कुर्यात् ॥

॥ इति सन्ध्योपासनविधि ॥

अर्थ— नंतर अनामिकेंत पवित्रक धारण करून, अनामिका आणि अंगठा ह्या दोन बोटांनीं नाकाचा अग्रभाग धरावा. आणि 'ॐ भुर्भूवः स्वः" इत्यादि मंत्र तीन वेळां ह्मणून प्रणायाम करावा. त्यांत पूरक कुंभक आणि रेचक हे करावेत. हा संध्योपासनाचा विधि सांगितला. आतां अर्घ्योपासनेचा विधि पुढें सांगतात.

॥ अथार्घोपासनाविधिः ॥

शुद्धां कृत्वा ततो भूमिं शोधितोदकसेचनैः ॥
उपविश्य नदीतीरे तत्र जन्तुविवार्जिते ॥ १०३ ॥
आचमनं ततः कृत्वाऽनामिकायां कुशं ततः ॥
निधाय मार्जनं कृत्वा मस्तकोपरि सेचयेत् ॥ १०४ ॥
सव्यहस्तेन देवेभ्यो दत्वा भूमौ जलाञ्जलिम् ॥
पीत्वाऽऽचम्य च सम्मार्ज्य मस्तकोपरि सिञ्चयेत् ॥ १०५ ॥

अर्थ— आतां अर्घ्य देण्याचा विधि सांगतात. नदीच्या तीरावरील भूमि गाळलेलें पाणी शिंपडून

शुद्ध करावी. त्या भूमीवर जीवजंतु नसावेत. मग त्या ठिकाणी बसून पुनः पूर्वी सांगितलेल्या विधीनें आचमन करून, अनामिकेंत दुसरें पवित्र धारण करावें. मग मार्जन करून आपल्या मस्तकावर पाणी शिंपडावें. नंतर उजव्या हातानें देवांना "भूमीवर अंजलि भरून" पाणी द्यावें. ह्याप्रमाणें केल्यावर पुनः आचमन व मार्जन करून मस्तकावर पाणी शिंपडावें.

पट् वा त्रीण्यथवाऽर्घाणि समुद्धार्य सुधीस्ततः ॥
कुशाद्यासनसुस्थाने चोपविश्य समासतः ॥ १०६ ॥
वंशासने दरिद्रः स्यात्पाषाणे व्याधिपीडितः ॥
धरण्या दुःखसम्भूतिर्दौर्भाग्यं दारुकासने ॥ १०७ ॥
तृणासने यशोहानिः पल्लवे चित्तविभ्रमः ॥
अजिने ज्ञाननाशः स्यात्कम्बले पापवर्द्धनम् ॥ १०८ ॥
नीले वस्त्रे परं दुःखं हरिते मानभंगता ॥
श्वेतवस्त्रे यशोवृद्धिर्हारिद्रे हर्षवर्धनम् ॥ १०९ ॥
रक्तं वस्त्रं परं श्रेष्ठं प्राणायामविधौ ततः ॥
सर्वेषां धर्मसिद्ध्यर्थं दर्भासनं तु चोत्तमम् ॥ ११० ॥

अर्थ— देवांना जी पाण्याची अंजली द्यावयाची ती सहा वेळां अथवा तीन वेळां द्यावी. ज्या पाण्यानें ही क्रिया करावयाची तें पाणी नदींतून एका भांड्यांत निराळें घेतलेलें असावें. मग जप करण्या-करितां दर्भासनावर किंवा दुसऱ्या कसल्यातरी आसनावर बसावें. त्यांत, वेळूंच्या आसनावर जपास बसलें असतां दारिद्र्य येतें. दगडावर बसलें असतां रोगांची पीडा होते. भूमीवर बसलें असतां दुःख प्राप्त होतें. लांकडाच्या आसनावर बसलें असतां दुर्भाग्य प्राप्त होतें. गवताच्या आसनावर बसलें असतां कीर्तीचा नाश होतो. झाडाच्या पानांच्या आसनावर बसलें असतां मनाला भ्रांति पडते. हरणाच्या किंवा दुसऱ्या कातड्यावर बसलें असतां ज्ञानाचा नाश होतो. कांबळ्यावर किंवा दुसऱ्या कोणत्याही लोंकरीच्या आसनावर बसलें असतां पापाची वृद्धि होते. काळ्या वस्त्रावर बसलें असतां फार दुःख होतें. हिरव्या रंगाच्या वस्त्रावर बसलें असतां मानभंग होतो. पांढऱ्या वस्त्रावर यशाची वृद्धि होते. पिंवळ्या वस्त्रावर बसलें असतां सुखाची वृद्धि होते. तांबडें वस्त्र प्राणायामाला फारच उत्तम मानिलें आहे. आणि सर्व धार्मिक क्रियेची सिद्धि होण्यास दर्भाचें आसन श्रेष्ठ आहे असें समजावें.

जप करण्याचा विधि

**समं ध्याने मनः कृत्वा मध्यदेशेषु निश्चलम् ॥**
**ज्ञानमुद्राङ्कितो भूत्वा स्वाङ्के तु वामहस्तकम् ॥ १११ ॥**

अंगुष्ठतर्जनीभ्यां तु सव्यहस्तेन निर्मलाम् ॥
जपमालां समादाय जपं कुर्याद्विचक्षणः ॥ १२ ॥

अर्थ— जपाच्या वेळीं अंतःकरणाची समता असावी व तें निश्चल करून त्याची शरीराच्या मध्यभागीं स्थापना करावी. मग ज्ञानमुद्रा करून आपला डावा हात आपल्या डाव्या मांडीवर ठेवावा; आणि उजव्या हातानें जपाची माळ धरावी. ती तर्जनी आणि अंगुष्ठ ह्या दोन बोटांनी धरावी; आणि जप करावा.

नमस्कारपञ्चपदान् जपेद्यथावकाशकम् ॥
अष्टोत्तरशतं चार्द्धमष्टाविंशतिकं तथा ॥ १३ ॥
द्विद्व्येकपदविश्राम उच्छ्वासाः सप्तविंशतिः ॥
सर्वपापं क्षयं याति जसे पञ्चनमस्कृते ॥ १४ ॥

अर्थ— मग पंचनमस्कारपदाचा जप आपल्याला जसा अवकाश असेल त्याप्रमाणें—एकशेहे आठ किंवा चोपन्न अथवा अठ्ठावीस—करावा. त्यांत पांच नमस्कारमंत्रांपैकीं प्रथम पहिल्या दोन नमस्कार मंत्रांच्या पुढें थांबावें. ह्मणजे अर्हद्भ्यो नमः सिध्देभ्यो नमः हे दोन मंत्र ह्मणून थोडें थांबावें. मग पुढले दोन आचार्येभ्यो नमः उपाध्यायेभ्यो नमः मंत्र ह्मणून थांबावें. नंतर एक साधुभ्यो नमः मंत्र ह्मणून थांबावें. ह्या थांवण्यांत श्वास वरतीं ओढूं नये. कारण एकशेहे आठ वेळा जर मंत्राचा जप करणें असेल, तर

त्याला लागणाऱ्या कालांत सत्तावीस वेळां श्वास वरती ओढावा. ह्मणजे वरीलप्रमाणें थांबून पंचनमस्कारमंत्राच्या चार आवृत्ति झाल्या ह्मणजे श्वास वर ओढून घ्यावा. ह्याप्रमाणें प्रत्येक चार चार जप झाल्यावर श्वास वरती ओढावा. अशा रीतीनें जप केला असतां सर्व पातकांचा नाश होतो.

वाचिकाख्य उपांशुश्च मानसस्त्रिविधः स्मृतः ॥
त्रयाणां जपमालानां स्याच्छ्रेष्ठो ह्युत्तरोत्तरः ॥ ११५ ॥

अर्थ— वाचिक, उपांशु आणि मानस असे जपाचे तीन प्रकार आहेत. त्या तीहींत पुढला पुढला जप श्रेष्ठ समजावा. ह्मणजे वाचिकजपापेक्षां उपांशुजप श्रेष्ठ, आणि उपांशुजपापेक्षां मानसजप श्रेष्ठ असे समजावें.

यदुच्चनीचस्वरितैः शब्दैः स्पष्टपदाक्षरैः ॥
मन्त्रमुच्चारयेद्वाचा जपो ज्ञेयः स वाचिकः ॥ ११६ ॥

अर्थ— उच्च, नीच आणि स्वरित ह्या स्वरांनी युक्त असलेल्या शब्दांचा व अक्षरांचा स्पष्ट उच्चार करून मंत्र ह्मणणें हा वाचिकजप जाणावा. ( उच्च ह्मणजे उंच स्वर, नीच ह्मणजे खालचा स्वर, आणि स्वरित ह्मणजे उच्च आणि नीच ह्या दोहोंच्या मिश्रणानें झालेला स्वर असें समजावें )

शनैरुच्चारयेन्मन्त्रं मन्दमोष्ठौ प्रचालयेत् ॥
अपरैरश्रुतः किञ्चित्स उपांशुर्जपः स्मृतः ॥ ११७ ॥

अर्थ— मंत्राचा उच्चार हळू करून ओठ थोडेसे हलवावेत. ह्याप्रमाणें दुसऱ्यास न ऐकूं येईल अशा रीतीनें केलेल्या जपास उपांशुजप असें ह्मणतात.

विधाय चाक्षरश्रेण्या वर्णाद्वर्णं पदात्पदम् ॥
शब्दार्थचिन्तनं भूयः कथ्यते मानसो जपः ॥ ११८ ॥

अर्थ— मंत्रांतील वर्ण व शब्द जसे असतील तसेच ते एकापुढें एक अशा रीतीनें ठेवून ( मंत्राच्या अक्षरांत व शब्दांत मागें पुढें न होऊं देतां मनांत आणून ) त्यांतील शब्दांच्या अर्थाचा विचार करून जो जप केला जातो, तो मानसजप समजावा.

मानसः सिद्धिकाम्यानां पुत्रकाम्य उपांशुकः ॥
वाचिको धनलाभाय प्रशस्तो जप ईरितः ॥ ११९ ॥

अर्थ— सिध्दीची इच्छा करणाऱ्यांनीं मानसजप करावा. पुत्राची इच्छा करणाऱ्यांनी उपांशु जप करावा. आणि धनलाभाची इच्छा करणाऱ्यांनीं वाचिकजप करावा.

वाचिकस्त्वेक एव स्यादुपांशुः शत उच्यते ॥
सहस्रं मानसः प्रोक्तो जिनसेनादिसूरिभिः ॥ १२० ॥

अर्थ— वाचिक जप एकवेळ केला असतां तो एक वारच केला असें होतें. आणि उपांशुजप एकवार

केला असतां शंभर वेळां केल्याप्रमाणें होतो. तसेंच मानसजपही एकवार केला असतां हजार वेळां केल्यासारखा होतो.

ब्रह्मचारी गृहस्थश्च शतमष्टोत्तरं जपेत् ॥
वानप्रस्थश्च भिक्षुश्च सहस्रादधिकं जपेत् ॥ १२१ ॥

अर्थ— ब्रह्मचारी आणि गृहस्थ ह्यांनी एकशेहे आठ जप करावा. आणि वानप्रस्थ व यती ह्यांनीं एक हजार आठ जप करावा.

अनध्यायेऽष्टोत्तरं स्याच्छतमन्यत्र चार्द्धकम् ॥
पूजायां दशकं ज्ञेयं यथाशक्ति समाचरेत् ॥ २२ ॥

अर्थ— अनध्यायाच्या दिवशीं ( स्वाध्यायास वर्ज्य असलेल्या दिवशीं ) वानप्रस्थ आणि यति ह्यांनीं एकशेहे आठ जप करावा. ब्रह्मचारी आणि गृहस्थ ह्यांनी अर्धा म्हणजे चोपन्न जप करावा. पूजेच्या प्रसंगी दहा जप करावा किंवा आपल्या शक्तीप्रमाणें करावा.

गृहे जपफलं प्रोक्तं वने शतगुणं भवेत् ॥
पुण्यारामे तथाऽरण्ये सहस्रगुणितं मतम् ॥ २३ ॥
पर्वते दशसाहस्रं नद्यां लक्षमुदाहृतम् ॥

कोटिं देवालये प्राहुरनन्तं जिनसन्निधौ ॥ २४ ॥

अर्थ— घरांत जप केल्यापासून जें फल सांगितलें आहे त्याच्या शंभरपट फल वनांत जप केला असता प्राप्त होतें. पुण्यकारक अशा बागेंत अथवा अरण्यांत जप केला असतां हजारपट फल प्राप्त होतें. पर्वतावर दहा हजारपट, नदीवर लक्षपट, देवालयांत कोटिपट आणि श्रीजिनेंद्राच्या सन्निध जप केला असतां अनंतपट फल प्राप्त होतें.

जपत्यागाची कारणे

व्रतच्युतान्त्यजातीनां दर्शने भाषणे श्रुतौ ॥
क्षुतेऽधोवातगमने जृम्भणे जपमुत्सृजेत् ॥ २५ ॥

अर्थ— आतां जपाच्या वेळीं काय काय असूं नये तें सांगतात— व्रतापासून भ्रष्ट झालेले लोक व अंत्यज लोक हे दृष्टीं पडले असतां, ह्यांच्यांशीं भाषण केलें असतां आणि ह्यांचें भाषण ऐकिलें असतां तत्काल जप करण्याचें सोडावें. तसेंच शिंक आली असतां, पश्चिम द्वारानें वायु सरकला असतां आणि जांभई आली असतां जप करण्याचें सोडावें.

प्रासावाचम्य चैतेषां प्राणायामं षडंगकम् ॥
कृत्वा सम्यक् जपेच्छेषं यद्वा जिनादिदर्शनम् ॥ २६ ॥

अर्थ— वर जी जप सोडण्याची कारणें सांगितली आहेत, त्यांपैकी कोणतेंही कारण झालें असतां आचमन करून षडंग प्राणायाम करावा. किंवा श्रीजिनेंद्रादिकांच्या प्रतिमांचें दर्शन करावें. आणि मग राहिलेला जप समाप्त करावा.

एवं जपविधिं कृत्वा तत उत्थाय भक्तितः ॥
हस्तौ द्वौ मुकुलीकृत्य पूर्वाभिमुखसंस्थितः ॥ २७ ॥
वन्दनाकर्म सन्ध्याया निवर्त्यालसवर्जितः ॥
उपविशेत्पुनस्तत्र शिष्टामाचरितुं क्रियाम् ॥ २८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें भक्तीनें जपविधि समाप्त करून उठून उभे राहावें. मग पूर्वेकडे तोंड करून दोनी हात जोडून संध्येसंबंधी वंदना नांवाची क्रिया करावी. मग राहिलेली क्रिया करण्याकरितां त्याच आसनावर वसावें

सव्यजानुपुरो दर्भयुक्तहस्तद्वयस्तथा ॥
वामहस्तमधः कृत्वा मुकुलीकृत्य दक्षिणम् ॥ २९ ॥
त्रिरुच्चार्य ततो मंत्रं प्राणायामोदितं पुरा ॥
आचमनं पुनः कुर्यान्मुक्तिमार्गप्रदायकम् ॥ १३० ॥
जिनेन्द्रादिमहर्षीणां दर्भदूर्वोदकैस्तथा ॥

वृषभादिसुपितॄणां तिलमिश्रोदकैः परम् ॥ ३१ ॥
जयादिदेवतानां च तर्पणं चाक्षतोदकैः ॥
एवं विधाय सन्ध्यायाः कर्म सान्ध्यं समापयेत् ॥ ३२ ॥

अर्थ— मग उजव्या मांडीवर डावा हात खालीं आणि उजवा हात वर असा ठेवावा. दोनी हातांच्या गर्भांत दर्भ असावेत. ह्याप्रमाणें झाल्यावर मग प्राणायामाकरितां पूर्वीं जो मंत्र सांगितला आहे, तो मंत्र तीन वेळां ह्मणावा. नंतर आचमन करावें. मग दर्भ, दूर्वा आणि अक्षता ह्यांनीं मिश्र अशा उदकानें जिनेंद्र वगैरे महर्षींचें तर्पण करावें. तिल आणि उदक ह्याच्या योगानें वृषभ वगैरे पितरांचें तर्पण करावें. आणि अक्षता व उदक ह्यांच्या योगानें जयादि देवतांचें तर्पण करावें. ह्याप्रमाणें सर्व कर्म झाल्यावर संध्याकर्माची समाप्ति करावी.

शौचान्ते रोगपीडान्ते मृतकानुगमे तथा ॥
अस्पृश्यस्पर्शने चैव आचमादिक्रियां चरेत् ॥ ३३ ॥

अर्थ— वर सांगितलेल्या आचमन व प्राणायाम ह्या क्रिया–स्नान वगैरे करून शुद्ध झाल्यावर (किंवा मलमूत्र विसर्गानंतर शुद्ध झाल्यावर) शरीरांतील रोगाची पीडा नाहींशी झाल्यावर, प्रेताच्या मागून गेलें असतां आणि स्पर्श करण्यास अयोग्य अशा पदार्थाचा स्पर्श झाला असतां–अवश्य कराव्यात.

स्नानतर्पणके त्यक्त्वा शेषां चापि चरेत्क्रियाम् ॥
सर्वां मध्याह्नसायाह्नसन्ध्ययोर्द्विजसत्तमः ॥ ३४ ॥

अर्थ— मध्यान्हकाल आणि सायंकाल ह्या दोनी वेळी स्नान आणि तर्पण ह्या दोन क्रिया सोडून बाकीच्या वर सांगितलेल्या सर्व क्रिया त्रैवर्णिक श्रावकानें कराव्यात.

सध्येचा काल.

सूर्योदयाच्च प्रागेव प्रातःसन्ध्यां समापयेत् ॥
तारकादर्शनात्पूर्वं सन्ध्यां सायान्हिकीं चरेत् ॥ ३५ ॥
मध्यसन्ध्या तु मध्यान्हे काले कृत्यं फलप्रदम् ॥
अकाले निर्मितं कार्यं स्वल्पं फलति वा न वा ॥ ३६ ॥

अर्थ— प्रातःसंध्या सूर्योदयाच्या पूर्वींच समाप्त करावी. संध्याकाळची संध्या आकाशांत नक्षत्रें दिसूं लागण्याच्या पूर्वीं करावी. आणि मध्यान्हसंध्या मध्यान्हकालीं करावी. कारण योग्यकालीं कर्म केलें असतां तें फल देणारें होतें. आणि अयोग्यकाली केलें असतां त्यापासून फल उत्पन्न होतें किंवा नाही ह्याचा संशयच आहे.

घटिकाद्वितयं कालादतिक्रामति चेत्तदा ॥

न दोषाय भवत्यत्र लोकास्याद्दूषणं स्मृतम् ॥ ३७ ॥

अर्थ— कर्माला जो योग्य काल वर सांगितला, त्यापेक्षां दोन घटिकाच जर अधिक झाल्या तर त्यांत दोष नाहीं. परंतु लोकांच्या मुखानें तसें कर्म करणाऱ्याची निंदा होते. म्हणून तसें करूं नये.

उत्तमा तारकोपेता मध्यमा लुप्ततारका ॥
अधमा सूर्यसंयुक्ता प्रातःसन्ध्या त्रिधा स्मृता ॥ ३८ ॥

अर्थ— जी प्रातःसंध्या पहाटेस नक्षत्रें दिसत असतां होते ती उत्तम [illegible]. जी नक्षत्रें [illegible] झाली असतां केली जाते ती मध्यम, आणि सूर्योदयानंतर जी केली जाते ती [illegible]. [illegible] प्रातःसंध्येचे तीन प्रकार आहेत.

अहो रात्रेश्च यः सन्धिः सूर्यनक्षत्रवर्जितः ॥
सा तु सन्ध्या समाख्याता मुनिभिस्तत्त्वदर्शिभिः ॥ ३९ ॥

अर्थ— सूर्योदय होण्याच्या पूर्वी आणि नक्षत्रें [illegible] [illegible] जोडणीचा काल त्यास संध्या ह्मणावें. असें तत्त्वज्ञानी मुनींनीं [illegible] आहे.

सन्ध्योत्तमा तृतीयांशे पञ्चमांशे [illegible] ॥
मध्याह्निकी तदूर्ध्वं वा पूर्वं स्यात्त्रि[illegible] ॥ ४० ॥

देवाग्निद्विजविद्यानां कार्ये महति सम्भवे ॥
सन्ध्याहीने न दोषोऽस्ति यत्तत्सत्कर्मसाधनात् ॥ ४४ ॥

अर्थ— देव, अग्नि, द्विज आणि विद्या ह्या संबंधाचें कोणतेंही मोठें कार्य व्हावयाचें असल्यामुळें जर संध्या राहिली, तथापि सत्कार्य साधावयाचें असल्यामुळें दोष लागत नाहीं.

॥ अथार्घ्यवितरणमन्त्रः ॥

ॐ ऱ्ही क्ष्वी उपवेशनभूः शुध्यतु स्वाहा ॥ १ ॥ दर्भादिना उपवेशनभूमिं मार्जयेत् ॥

अर्थ— आतां अर्घ्य देण्याचा मंत्र सांगतात— प्रथम "ॐ ऱ्ही" इत्यादि मंत्रानें वसावयाची जागा दर्भानें किंवा दुसऱ्या कशानें तरी लोटून स्वच्छ करावी.

ॐ ऱ्ही अमृते अमृतोद्भवे अमृतवर्षिणि अमृतं स्रावय स्रावय सं सं क्लीं क्लीं ब्लूं ब्लूं द्रां द्रों द्रीं द्रीं द्रावय द्रावय हं क्ष्मं क्ष्वी हं सः अ सि आ उ सा मार्जनं शिर उपरि सेचनं करोमि स्वाहा ॥ २ ॥ मार्जनान्ते शिरःपरिषेचनम् ॥

अर्थ— नंतर "ॐ ऱ्ही अमृते" इत्यादि मंत्रानें मार्जन करावें. आणि मग मस्तकावर पाणी शिंपडावें.

ॐ ऱ्ही लॉ वः पः क्ली क्ष्वी हं सः चुलकोदकधारणं करोमि स्वाहा ॥ ३ ॥

ततः सव्यचुलकेनोदकमुध्दृत्य ॥

**मार्जनं कृत्वा शिरः परिषिच्य षडर्घ्याणि समुद्धरेत ॥**

अर्थ— " ॐ नमोऽर्हते भगवते " इत्यादि मंत्रानें मार्जन करून मस्तकावर पाणी शिंपडून पुढील मंत्रानें सहा अर्घ्यें द्यावीत.

**ॐ ऱ्हीं सर्वभवनेन्द्रार्चितसमस्ताकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ १ ॥**
**ॐ ऱ्हीं व्यन्तरेन्द्रार्चितसमस्ताकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ २ ॥**
**ॐ ऱ्हीं ज्योतिष्केन्द्रार्चितसमस्ताकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ ३ ॥**
**ॐ ऱ्हीं कल्पेन्द्रार्चितसमस्ताकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ ४ ॥**
**ॐ ऱ्हीं सर्वाहमिन्द्रार्चितसमस्ताकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ ५ ॥**
**ॐ ऱ्हीं विश्वेन्द्रार्चितमध्यलोकास्थितसमस्तकृत्रिमाकृत्रिमचैत्यचैत्यालयेभ्यः स्वाहा ॥ ६ ॥ षडर्घ्यमन्त्राः ॥**

अर्थ— हे सहा अर्घ्य देण्याचे मंत्र आहेत. ह्यांतील प्रत्येक मंत्रानें एक एक याप्रमाणें सहा अर्घ्यें द्यावीत.

**अथार्घ्यत्रयमन्त्राः ॥ ॐ ऱ्हीं विश्वचक्षुषे स्वाहा ॥ १ ॥ ॐ ऱ्हीं अनुचराय स्वाहा ॥ २ ॥ ॐ ऱ्हीं ज्योतिर्मतये स्वाहा ॥ ३ ॥ इत्यर्घ्यत्रयमन्त्राः ॥**

अर्थ— आतां तीन अर्घ्यांचे मंत्र सांगतात. " ॐ ऱ्हीं " इत्यादि हे तीन मंत्र आहेत. ह्यांतील

प्रत्येक मंत्रानें एकेक अर्घ्य द्यावें.

णमो अरिहंताणमित्यादिमन्त्रेणाष्टोत्तरशतं तथा चतुःपञ्चाशत्तथा सप्तविंशतिकं जपेत् ॥

अर्थ–मग "णमो अरिहंताणं" इत्यादि मंत्राचा एकशेहे आठ किंवा चोपन्न अथवा सत्तावीस इतका जप करावा.

ततश्च ॥ स्वयम्भूर्भगवानर्हन्परः परमपूरुपः ॥

परमात्मा पवित्रात्मा पवित्रयतु नो मनः ॥ ४५ ॥

देवदेवो महादेवः परात्मा परमेश्वरः ॥

परमः परमब्रह्म स्वयम्भूतः पुनातु नः ॥ ४६ ॥

भूर्भुवःस्वः स्वधा स्वाहा पवित्रं पावनं परम् ॥

पूतं भागवतं ज्योतिः पुनीतान्मम मानसम् ॥ ४७ ॥

इत्युच्चार्य परमात्मानं नमस्कुर्यात् ॥

अर्थ— नंतर " स्वयंभूर्भगवानर्हन् " इत्यादि तीन श्लोक ह्मणून परमात्मा जो श्रीजिनेंद्र त्याला नमस्कार करावा.

ततो जलाञ्जलिं गृहीत्वा झं वं ह्वः पः हः स्वाहा ॥ इति मन्त्रमुच्चारयन् प्रदक्षिणं परिक्रम्य पूर्वस्यां दिशि जलं विसृजेत् ॥

अर्थ— पुढें आपल्या अंजलीत पाणी घेऊन " झं वं " इत्यादि मंत्र ह्मणत आपल्या सभोवती प्रदक्षिणा करावी. आणि तें अंजलीतील उदक पूर्वदिशेकडे तोंड करून खाली सोडावें.

ततोऽपि मुकुलितकरकुड्मलः सन् " ॐ नमोऽर्हते भगवते श्रीशान्तिनाथाय शान्तिकराय सर्वविघ्नप्रणाशनाय सर्वरोगापमृत्युविनाशनाय सर्वपरकृतक्षुद्रोपद्रवविनाशनाय मम सर्वशांतिर्भवतु ॥" इत्युचार्य—

अर्थ— मग हात जोडून " ॐ नमोऽर्हते भगवते " इत्यादि मंत्र ह्मणावा. नंतर पूर्वेकडे तोंड करून " पूर्वस्यां दिशि इन्द्रः प्रसीदतु " असें ह्मणावें. आग्नेयदिशेकडे तोंड करून " आग्नेय्यां दिशि अग्निः प्रसीदतु " असें ह्मणावे. दक्षिणेकडे तोंड करून " दक्षिणस्यां दिशि यमः प्रसीदतु " असें ह्मणावें. नैर्ऋत्यदिशेकडे तोंड करून " नैर्ऋत्यां दिशि निऋतः प्रसीदतु " असें ह्मणावें. पश्चिमेकडे तोंड करून " पश्चिमस्यां दिशि वरुणः प्रसीदतु " असें ह्मणावें. वायव्यदिशेकडे तोंड करून " वायव्यां दिशि वायुः प्रसीदतु " असें ह्मणावें. उत्तरेकडे तोंड करून " उत्तरस्यां दिशि यक्षः प्रसीदतु " असें ह्मणावें. ईशान्यदिशेकडे तोंड करून "ईशान्यां दिशि ईशानः प्रसीदतु" असें ह्मणावें. खालीं तोंड करून "अधरस्यां दिशि धरणेन्द्रः प्रसीदतु" असें ह्मणावें. आणि वरती तोंड करून " ऊर्ध्वायां दिशि चन्द्रः प्रसीदतु " असें ह्मणावें.

इति दशदिक्पालान्प्रसाद्य सन्ध्यावन्दनां निवर्तयेत् ॥

अर्थ— ह्याप्रमाणें दशदिक्पालांना प्रसन्न करून घेऊन संध्यावंदन कर्म समाप्त करावें.

अथोत्तरक्रिया ॥ तदनन्तरमुपविश्य सव्यजान्वग्रे दर्भगर्भं मुकुलीकृत्य करकुड्मलमधरीकृत्य वामहस्तं विन्यस्य प्राणायाममन्त्रं त्रिरुच्चार्य— मोक्षमार्गस्य नेतारं भेत्तारं कर्मभूभृताम् ॥ ज्ञातारं विश्वतत्त्वानां वन्दे तद्गुणलब्धये ॥ १ ॥ सम्यग्दर्शनज्ञानचारित्राणि मोक्षमार्गः ॥ इति वाचनां गृहीत्वा दर्भोदकेन ऋषीणां तर्पणं कुर्यात् ॥ तद्यथा—

अर्थ— आतां पुढची क्रिया सांगतात— संध्यावंदन झाल्यावर आसनावर पर्यंकासनानें बसून उजव्या गुडघ्यावर दोनी हात कमलाच्या कळीप्रमाणें जोडून ठेवावेत. त्यांत डावा हात खालीं आणि उजवा हात वरती असावा. हातांत दर्भ असावेत. मग प्राणायाममंत्राचा तीन वेळां उच्चार करून “ मोक्षमार्गस्य नेतारं ” हा श्लोक आणि “ सम्यग्दर्शन ” इत्यादि ह्मणावें. मग हातांत दर्भ धरून ऋषींचें तर्पण करावें. त्याचे मंत्र पुढें दिलेले आहेत.

ऋषितर्पण.

ॐ ह्रीं अर्हत्परमेष्ठिनस्तर्पयामि । ॐ ह्रीं सिद्धपरमेष्ठिनस्तर्पयामि ॥

ॐ ह्रीं आचार्यपरमेष्ठिनस्तर्पयामि । ॐ ह्रीं उपाध्यायपरमेष्ठिनस्त-

र्पयामि ॥ ॐ ह्रीं सर्वसाधुपरमेष्ठिनस्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं जिनांस्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अवधिजिनांस्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं परमावधिजिनांस्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं सर्वावधिजिनांस्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अनन्तावधिजिनांस्तर्पयामि १० ॥ एवं ११ ॐ ह्रीं कोष्ठबुद्धींस्तर्पयामि ॥ १२ ॐ ह्रीं बीजबुद्धींस्तर्पयामि ॥ १३ ॐ ह्रीं पादानुसारिणस्तर्पयामि ॥ १४ ॐ ह्रीं सम्भिन्नश्रोतॄंस्तर्पयामि ॥ १५ ॐ ह्रीं प्रत्येकबुद्धांस्तर्पयामि ॥ १६ ॐ ह्रीं स्वयम्बुद्धांस्तर्पयामि ॥ १७ ॐ ह्रीं बोधितबुद्धांस्तर्पयामि ॥ १८ ॐ ह्रीं ऋजुमतींस्तर्पयामि ॥ १९ ॐ ह्रीं विपुलमतींस्तर्पयामि ॥ २० ॐ ह्रीं दशपूर्विणस्तर्पयामि ॥ २१ ॐ ह्रीं चतुर्दशपूर्विणस्तर्पयामि ॥ २२ ॐ ह्रीं अष्टाङ्गमहानिमित्तकुशलांस्तर्पयामि ॥ २३ ॐ ह्रीं विक्रियर्द्धिप्रासांस्तर्पयामि ॥ २४ ॐ ह्रीं विद्याधरांस्तर्पयामि ॥ २५ ॐ ह्रीं चारणांस्तर्पयामि ॥ २६ ॐ ह्रीं प्रज्ञाश्रवणांस्तर्पयामि ॥ २७ ॐ ह्रीं आकाशगामिनस्तर्पयामि ॥ २८ ॐ ह्रीं आस्यविषांस्तर्पयामि २९ ॥ ॐ ह्रीं दृष्टिविषांस्तर्पयामि ॥ ३० ॐ ह्रीं उग्रतपस्विनस्तर्पयामि ॥

३१ ॐ ह्रीं दीप्ततपस्विनस्तर्पयामि ॥ ३२ ॐ ह्रीं तप्ततपस्विनस्तर्पयामि ॥ ३३ ॐ ह्रीं महातपसस्तर्पयामि ॥ ३४ ॐ ह्रीं घोरतपसस्तर्पयामि ॥ ३५ ॐ ह्रीं घोरगुणांस्तर्पयामि ॥ ३६ ॐ ह्रीं घोरपराक्रमांस्तर्पयामि ॥ ३७ ॐ ह्रीं घोरब्रह्मचारिणस्तर्पयामि ॥ ३८ ॐ ह्रीं आमर्षौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ३९ ॐ ह्रीं क्ष्वेडौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४० ॐ ह्रीं जल्लौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४१ ॐ ह्रीं विप्रौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४२ ॐ ह्रीं सर्वौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४३ ॐ ह्रीं मनोबलिनस्तर्पयामि ॥ ४४ ॐ ह्रीं वाग्बलिनस्तर्पयामि ॥ ४५ ॐ ह्रीं कायबलिनस्तर्पयामि ॥ ४६ ॐ ह्रीं अमृतस्राविणस्तर्पयामि ॥ ४७ ॐ ह्रीं मधुस्राविणस्तर्पयामि ॥ ४८ ॐ ह्रीं सर्पिस्स्राविणस्तर्पयामि ॥ ४९ ॐ ह्रीं क्षीरस्राविणस्तर्पयामि ॥ ५० ॐ ह्रीं अक्षीणमहानसांस्तर्पयामि ॥ ५१ ॐ ह्रीं अक्षीणमहालयांस्तर्पयामि ॥ ५२ ॐ ह्रीं अर्हं लोके सर्वसिद्धायतनानि तर्पयामि स्वाहा ॥ ५३ ॐ ह्रीं अर्हं भगवतो महतिमहावीरवर्द्धमानबुद्धिऋर्षीस्तर्पयामि ॥ इति ऋषितर्पणमन्त्रा त्रिपञ्चा-

शात् ॥ ततस्तेषां नमस्कारमन्त्रोऽयम्– ॐ ह्रीं अर्हं क्ष्यौं क्ष्यौं नमः ॥

अर्थ— वर तर्पणाचे त्रेपन्न मंत्र सांगितले आहेत. त्यांतील प्रत्येक मंत्रानें तर्पण करावें. ह्या तर्पणास ऋपितर्पण ह्मणतात. हें तर्पण झाल्यावर ज्यांचें तर्पण आपण केलें त्यांना "ॐ ह्रीं अर्हं" इत्यादि मंत्रानें नमस्कार करावा.

पितृतर्पण

अथ पितॄणां तर्पणं कुर्यात्तिलोदकेन— १ ॐ ह्रीं अर्हं श्रीऋषभस्य भगवतः पितरौ तर्पयामि ॥ २ ॐ ह्रीं अर्हं अजितस्य भगवतः पितरौ तर्पयामि ॥ ३ ॐ ह्रीं अर्हं सम्भवस्य भगवतः पितरौ तर्पयामि ॥ ४ ॐ ह्रीं अर्हं भगवतोऽभिनन्दनस्य पितरौ तर्पयामि ॥ ५ ॐ ह्रीं अर्हं इत्यादि वर्धमानपर्यन्तं योज्यम् ॥ २४ ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मत्पितरौ तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तात्पितरौ तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तत्पितरौ तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मद्दीक्षागुरुं तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मद्विद्यागुरुं तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मच्छिक्षागुरुं तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तेषां गुरूणां निमित्तं तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तेषां पितृतात्पितृतात्पितरस्त-

पर्यामि ॥ एवं द्वात्रिंशन्मन्त्राः पितॄणां तर्पणार्थं ॥ तेषां नमस्कार-मन्त्रोऽयम् । ॐ ह्रीं अर्हं नमः ॥

अर्थ— नंतर तीळ आणि उदक ह्यांच्या योगानें पितरांचें तर्पण करावें. त्याचे मंत्र बत्तीस क्रमानें सांगितले आहेत. याप्रमाणें तर्पण झाल्यावर ज्या पितरांचें आपण तर्पण केलें त्यांचा संतोष होण्याकरितां " ॐ ह्रीं अर्हं नमः " ह्या मंत्रानें त्यांना नमस्कार करावा.

देवतातर्पण

अथाक्षतोदकेन देवतानां तर्पणं तन्मन्त्राः ॥ ॐ ह्रीं अर्हं जयाद्यष्टदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं रोहिण्यादिषोडशविद्यादेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं यक्षादिपञ्चदशातिथिदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं सूर्यादिनवग्रहदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं इन्द्रादिदशदिक्पालदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं श्याद्यष्टदिक्कन्यादेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं गोमुखादिचतुर्विंशतियक्षीदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं चक्रेश्वर्यादिचतुर्विंशतियक्षदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं असुरादिदशविधभवनवासिदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं किन्नराद्यष्टविधव्यन्तरदेवता-

स्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं चन्द्रादिपञ्चविधज्योतिष्कदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं सौधर्मादिवैमानिकदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं सर्वाह्मिन्द्रदेवतास्तर्पयामि। इति तर्पणमन्त्राः॥ अतो नमस्कारमन्त्रोऽयम्॥ ॐ ह्रीं अर्हं अ सि आ उ सा ॐ क्रौं नमः ॥ इति प्रातस्सन्ध्योपासनक्रमः ॥ ७ ॥ एवं मध्याह्नसायाह्नयोः स्नानतर्पणान्यपि विहाय आचमनादिशेषाक्रियां सर्वामाचरेत्॥ शिरःपरिषेचनं जलाञ्जल्यर्घ्याणि जाप्यं देवपूजादि सर्वं कर्तव्यम् ॥

अर्थ--- नंतर अक्षता आणि उदक ह्यांच्या योगानें देवतांचें तर्पण करावें. त्याचे मंत्र वर सांगितले आहेत. हें तर्पण झाल्यावर नमस्काराचा जो मंत्र सांगितला आहे त्या मंत्रानें तर्पण केलेल्या सर्व देवतांस नमस्कार करावा. ह्याप्रमाणें प्रातःकालच्या सन्ध्येचा विधि सांगितला. मध्यान्हकाली आणि सायंकालींही ह्याप्रमाणेच विधि करावा. त्यांत फक्त स्नान आणि तर्पण ह्या दोन क्रिया मात्र करण्याची गरज नाहीं. ह्मणून तेवढ्या क्रिया सोडून बाकीच्या सर्व क्रिया (मस्तकावर उदकसेंचन करणें, जलांजलि देणें, अर्घ्य देणें, जप करणें, देवपूजा वगैरे) सर्व कराव्यात.

इत्थं युक्तिविधानतः सुसकलं सन्ध्यादिकोपासनं ।

ये कुर्वन्ति नरोत्तमा भवभयाद्भीताश्च ते दुर्लभाः ॥
संसाराम्बुधिनौसमां शिवकरां भव्यात्मनां प्राणिनां ।
तस्मादादरपूर्विकां बुधजनाः कुर्वन्तु सन्ध्यां सदा ॥ १४८ ॥

अर्थ— अशाप्रकारें वर सांगितलेली संध्योपासनक्रिया, जे कोणी युक्तिप्रयुक्तीनें करतात; ते संसाराला मुळींच भीत नाहींत. म्हणून हे सज्जन हो! भव्यजीवांना संसारसमुद्रांतून तारून नेणारी नौकाच कीं काय! अशी ही संध्योपासनक्रिया तुम्ही मोठ्या भक्तीनें नेहमीं करा!!!

श्रीब्रह्मसूरिद्विजवंशरत्नं । श्रीजैनमार्गप्रविबुद्धतत्त्वः ॥
वाचन्तु तस्यैव विलोक्य शास्त्रं । कृतं विशेषान्मुनिसोमसेनैः ॥ १४९ ॥

अर्थ— त्रैवर्णिकांच्या वंशांत मुकुटमणि आणि ज्यांना श्रीजिनांनीं सांगितलेल्या मार्गाचीं तत्त्वें उत्कृष्ट समजलीं आहेत असे ब्रह्मसूरि नांवाचे पंडित होऊन गेले. त्यांनीं केलेलें शास्त्र पाहून श्रीसोमसेनमुनींनीं हें शास्त्र विस्तारानें रचिलें आहे. तें तुम्हीं भव्यजीवांनीं अवश्य पठन करावें.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपके भट्टारकश्रीसोमसेनविरचिते
स्नानवस्त्राचमनसन्ध्यातर्पणवर्णनो नाम तृतीयोऽध्यायः ॥

श्रीवीतरागाय नम

## ॥ चतुर्थोऽध्यायः ॥

त्रैलोक्ययात्रां चरितुं प्रवीणा। धर्मार्थकामाः प्रभवन्ति यस्याः॥
प्रसादतो वर्तत एव लोके। सरस्वती सा वसतान्मनोऽब्जे ॥ १ ॥

अर्थ— जिच्या कृपेमुळेंच धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ त्रैलोक्यांत संचार करण्यास समर्थ होतात; म्हणजे त्रैलोक्यांत प्रसिध्दीला प्राप्त होतात; आणि जी या जगांत वास करीत आहे, ती सरस्वती देवी माझ्या अंतःकरणरूपी कमलांत वास करो.

शान्तिप्रदं सम्प्रति शान्तिनाथं। देवाधिदेवं वरतत्त्वभाषम् ॥
नत्वा प्रवक्ष्ये गृहधर्ममत्र। यतो भवेत्स्वर्गसुखं सुभोगम् ॥ २ ॥

अर्थ— जैनमतांतील मुख्य तत्वांचें ज्यानें प्रतिपादन केलें आहे आणि जो आपल्या भक्तास शांति देतो असा देवाधिदेव जो शांतिनाथ त्याला नमस्कार करून, ज्याच्यापासून जीवाला स्वर्गसुख सहज भोगावयास मिळेल असा गृहस्थाचा धर्म आतां मी सांगतों.

### अस्पृश्य जीव व पदार्थ.

कृत्वैवं सुजलाशये स मुदितश्चोत्थाय तस्माच्छनै-।

रीर्यायाः पथशोधनं शुचितरं कुर्वन्व्रजेत्स्वं गृहम् ॥
अस्नातान् सकलान् जनान्नहि तदा मार्गे स्पृशेन्नोत्तमान् ।
स्नातान् शूद्रजनान्प्रमादबहुलान् शुद्धानपि नो स्पृशेत् ॥ ३ ॥

अर्थ— पूर्वी सांगितल्याप्रमाणें शुद्ध अशा जलाशयांत स्नान करून तेथून आपल्या गृहाकडे जाण्यास निघावें. त्या वेळीं ईर्यापथशुद्धि ( जावयाच्या मार्गाची शुद्धि ) करून मग चालूं लागावें. ज्यांनीं स्नान केलें नाहीं असे आपल्यापेक्षां वरिष्ठ जरी कोणी मार्गात आढळले तथापि त्यांना स्पर्श करूं नये. त्याचप्रमाणें एखादा शूद्र जरी स्नान केलेला असला तथापि त्याला स्पर्श करूं नये. तसेंच नेहमीं हिंसा करणारे असे जे लोक त्यांनाही स्पर्श करूं नये. असे लोक कोणते हें पुढील श्लोकांत सांगतात.

मद्यविक्रयिणं शूद्रं कुलालं मद्यपायिनम् ॥ नापितं च शिलास्फोटं कुवि-
न्दकमतः परम् ॥४॥ काञ्छिकं मालिकं चैव हिंसकं मुद्गलादिकम् ॥ उच्छि-
ष्टपर्णचर्मास्थिच्युतशृंगनखानपि ॥५॥ रोमकेशखुरान्दन्तान्रक्तविण्मूत्र-
पूयकान् ॥ श्लेष्मनिष्ठीवशूद्रान्नहण्डिकादीन् बहिस्ततः ॥ ६ ॥ काक-
कुर्कुटमार्जारखरोष्ट्रग्रामसूकरान् ॥ कुष्ठिकुर्कुररोगार्तच्छिन्नांगपतिता-
म्बरान् ॥ ७ ॥ कितवान्मत्तमत्तांश्च बन्धनागाररक्षकान् ॥ मलाक्तवस्त्रसं-

विजातिम्लेच्छशूद्राणां गेहाद्दूरं भवेद्गृहम् ॥
काष्ठधूमादिसंसर्गं न कुर्यात्कुड्यमेलनम् ॥ १४ ॥

अर्थ— आतां गृहाचें लक्षण सांगतात— विजातीचे लोक, मुसलमान लोक आणि शूद्र लोक ह्यांच्या घरापासून आपलें घर दूर असावें. त्याच्या घराचे वासे, त्यांच्या घरांतून येणारा धूर इत्यादिकाचा संपर्क आपल्या घराला होऊं देऊं नये. तसेंच त्यांच्या घराच्या भिंतीला आपल्या घराची भिंत देखील लागून असूं नये.

तेषां हि श्रूयते शब्दो हिंसादिदुष्टवाचकः ॥
केशास्थिचर्मदु स्पर्शो न भवेत्त्वं तथा कुरु ॥ १५ ॥

अर्थ— विजातीय लोक वगैरे लोकांच्या घराजवळ जर आपलें घर असेल, तर, त्यांचे हिंसा वगैरे दुष्कृत्याचे वाचक शब्द आपल्यास नेहमीं ऐकावे लागतात. ह्मणून अशा लोकांच्या रहाण्याच्या ठिकाणापासून जैनाचे घर दूर असावें. तसेंच आपल्या घराला केश, हाडें आणि चामडें ह्यांचा स्पर्श न होईल असें घर असावें.

तेषां जलप्रवाहस्य नीचभागं विवर्जयेत् ॥
मानिनां पापशीलानां सक्तानां दुष्टसङ्गतौ ॥ १६ ॥

अर्थ— वर जे विजातीय वगैरे लोक सांगितले आहेत, त्यांच्या घरांतील पाणी ज्या सखल जाग्यात

पञ्चहस्तादृतुमतीं सूतिकां हस्तषट्कतः ॥
चाण्डालचर्मकारादीन् हस्तसप्त परित्यजेत् ॥ ११ ॥

अर्थ— ऋतुमती असलेल्या स्त्रीपासून पांच हात लांब असावें. बाळंतिणीपासून सहा हात लांब असावें. चांडाल आणि चांभार ह्यांपासून सात हात लांब असावें.

मांसभारं सुराकुम्भं युगद्वयं तु वर्जयेत् ॥
नृतिरश्चश्च दुर्गन्धिशवं तु युगपञ्चकम् ॥ १२ ॥
अस्पृश्यगृहजं भस्म धूलीधूमतुषादिकान् ॥
अस्पृशन्निजगेहं स गच्छेज्जीवदयापरः ॥ १३ ॥

अर्थ— मांसाचा ढीग आणि मद्याचें पात्र ह्यापासून आठ हातावर लांब असावें. मनुष्य, पशुपक्षी इत्यादिकांच्या कुजलेल्या प्रेतापासून वीस हात लांब असावें. त्याप्रमाणेंच स्नान करून घराकडे जात असतां, ज्यांना आपण केव्हांच स्पर्श करीत नाही अशा लोकांच्या घरांतून उडून आलेले राख, धुरळा, धूर, कोंडा, वगैरे पदार्थ आपल्या अंगावर येऊं देऊं नयेत. तसेंच वाटेनें चालत असतां कोणत्याही जीवाला त्रास देऊं नये. सर्वांवर दया करावी.

अथ गृहलक्षणम्

विजातिम्लेच्छशूद्राणां गेहाद्दूरं भवेद्गृहम् ॥
काष्ठधूमादिसंसर्गं न कुर्यात्कुड्यमेलनम् ॥ १४ ॥

अर्थ— आतां गृहाचें लक्षण सांगतात– विजातीचे लोक, मुसलमान लोक आणि शूद्र लोक ह्यांच्या घरापासून आपलें घर दूर असावें. त्यांच्या घराचे वासे, त्यांच्या घरांतून येणारा धूर इत्यादिकांचा संपर्क आपल्या घराला होऊं देऊं नये. तसेंच त्यांच्या घराच्या भिंतीला आपल्या घराची भिंत देखील लागून असूं नये.

तेषां हि श्रूयते शब्दो हिंसादिदुष्टवाचकः ॥
केशास्थिचर्मदु स्पर्शो न भवेत्त्वं तथा कुरु ॥ १५ ॥

अर्थ— विजातीय लोक वगैरे लोकांच्या घराजवळ जर आपलें घर असेल, तर, त्यांचे हिंसा वगैरे दुष्कृत्याचे वाचक शब्द आपल्यास नेहमीं ऐकावे लागतात. ह्मणून अशा लोकांच्या रहाण्याच्या ठिकाणापासून जैनाचे घर दूर असावें. तसेंच आपल्या घराला केश, हाडें आणि चामडें ह्यांचा स्पर्श न होईल असें घर असावें.

तेषां जलप्रवाहस्य नीचभागं विवर्जयेत् ॥
मानिनां पापशीलानां सक्तानां दुष्टसङ्गतौ ॥ १६ ॥

अर्थ— वर जे विजातीय वगैरे लोक सांगितले आहेत, त्यांच्या घरांतील पाणी ज्या सखल जाग्यांत

वहात येत असेल, त्या सखल जाग्यांत आपलें घर असूं नये. तसेंच आपल्या घराजवळ अभिमानी, पातकी आणि दुष्टांची संगति करणारे असे लोक असूं नयेत.

नगरस्यान्त्यसम्भागे न कुर्याद्गृहवन्धनम् ॥
भषकसूकरादीनां प्रवेशो न हि सौख्यदः ॥ १७ ॥

अर्थ— आपण ज्या गांवांत रहातो त्या गांवाच्या शेवटाला आपलें घर बांधूं नये. घरांत कुतरें, गांवडुकर, वगैरे पशू शिरले असतां त्या घरांत आपल्यास सुख लागणार नाही असें समजावें.

सङ्कीर्णमार्ग उच्छिष्टमलमूत्रादिदूषितः ॥
वेश्यातस्करव्याघ्रादिसम्बन्धं दूरतस्त्यजेत् ॥ १८ ॥

अर्थ— जेथें सर्वजातीचे लोक जमतात असा रस्ता आपल्या घराजवळ असूं नये. उष्टे पदार्थ, मल, मूत्र इत्यादि पदार्थ टाकण्याची जागा आपल्या घराजवळ असूं नये. वेश्या आणि चोर ह्यांची घरें जवळ असूं नयेत. त्याचप्रमाणें व्याघ्र वगैरे जंगली जनावरांचें ठिकाणही आपल्या घराजवळ असूं नये.

उत्तमस्थानमालोक्य सर्पादिपरिवर्जितम् ॥
रम्यं तत्र गृहं कुर्याद्यथाद्रव्य यथारुचि ॥ १९ ॥

अर्थ— वर सांगितलेले उपद्रव ज्या ठिकाणीं नाहींत आणि सर्पादिकांची पीडा जेथें नाही असे उत्तम

स्थळ पाहून त्या ठिकाणीं आपल्या द्रव्याची अनुकूलता जशी असेल त्या मानानें आपल्या इच्छेप्रमाणें सुशोभित असें घर बांधावें.

रेणुपाषाणनीरान्तं खनयेत्पृथिवीतलम् ॥
शङ्खखर्परचर्मास्थिविण्मूत्रं दूरतस्त्यजेत् ॥ २० ॥

अर्थ— मुरमाचे दगड अथवा पाणी हीं लागेपर्यंत पाया काढावा. शंख, खापऱ्या, चामडें, हाडें, विष्ठा आणि मूत्र हे घराजवळ न टाकतां दूर टाकावेत.

पाषाणैश्चेष्टकामृद्भिश्चूर्णैर्भूर्बध्यते दृढम् ॥
सुदिने सुमुहूर्ते वा जिनपूजापुरस्सरम् ॥ २१ ॥

अर्थ— दगड, विटा, माती आणि चुना ह्यांच्या योगानें भूमि फार बळकट होते; म्हणून हे पदार्थ घालून घरांतील जमीन करावी. घर बांधावयाचें तें चांगला दिवस पाहून सुमुहूर्तावर श्रीजिनेंद्राची पूजा प्रथम करून बांधावयास प्रारंभ करावें.

भुक्तिशालाऽग्निदिक्कोणे नैर्ऋत्यां शयनस्थलम् ॥
वायव्यां स्नानगेहं स्यादीशान्यां जिनमन्दिरम् ॥ २२ ॥
पश्चिमे चित्रशाला तु नानाजनसमाश्रया ॥

दक्षिणे तु जलस्थानं ह्युत्तरे श्रीधनाश्रयः ॥ २३ ॥
पूर्वस्यां निर्गमद्वारं घण्टातोरणभूषितम् ॥
मध्ये नृत्यन्ति नर्तक्यो गीतहास्यविनोदकैः ॥ २४ ॥
सदनस्य बहिर्भागे शाला गोधनसम्भृता ॥
गजाश्वरथपादातैस्तत्रैव स्थीयतेऽन्त्यतः ॥ २५ ॥

अर्थ— त्या घरांत आग्नेयदिशेकडे पाकगृह असावें. नैर्ऋत्यदिशेस निजण्याची जागा असावी. वायव्यदिशेस स्नानाची जागा असावी. ईशान्यदिशेस जिनमंदिर असावें. पश्चिमेकडे पुष्कळ लोकांना बसण्यासारखी चित्रशाळा असावी. दक्षिणेकडे पाण्याचें ठिकाण असावें. उत्तरेकडे द्रव्य ठेवण्याची जागा (जामदारखाना) असावी. आणि पूर्वदिशेकडे घराचा दरवाजा असावा. त्याला तोरण लाविलेलें असावें आणि घांटही बांधलेली असावी. तसेंच मध्यभागी नर्तन करणाऱ्या स्त्रियांच्या नृत्याची जागा असावी. घराच्या बाहेरच्या बगलेस गोठा असावा. ही जागा घराच्या बाहेर असल्यानें, त्यांत हत्ती, घोडे, रथ, चाकर मनुष्यें वगैरे रहावयाची असतात.

एकद्वित्रीणि सप्तान्ता उपर्युपरि संस्थिताः ॥
चूर्णकाचसुवर्णादिलेपनैर्लेपिताः पराः ॥ २६ ॥

अर्थ— एक, दोन, तीन असे सातापर्यंत मजले घराला करावेत. त्यातील भिंतीस चुना किंवा सोनें यांचे गिलावे करावेत. आणि काचेची तावदानें लावावीत.

नानाशृंगैश्च संयुक्तं माल्याचन्द्रोपकादिभिः ॥
पुत्रोत्पत्तिविवाहादिकल्याणपरिपूजितम् ॥ २७ ॥

अर्थ— घराला अनेक शिखरें गच्च्या वगैरे असाव्यात. घरांत पुत्रोत्पत्ति, विवाह वगैरे मंगल कार्यें होत असावीत.

चैत्यस्य वामभागे तु होमशालां समापयेत् ॥
धूमावकाशकस्थानं सल्लकीकदलीयुतम् ॥ २८ ॥

अर्थ— जिनमंदिराच्या डाव्या बाजूस होमशाला करावी. त्यांतून धूर जाण्याला मार्ग असावा. आणि ज्या बाजूला धूर जात असेल तिकडे सळई, केळीं हीं झाडें लावावींत.

पल्यङ्कं कुसुमानि चन्दनरसः कर्पूरकस्तूरिका ।
स्थाळ्यं वनिता स्वरूपसहिता हास्यादिका सत्क्रिया ॥
ताम्बूलं वरभूषणानि तनुजा दानाय सत्सम्पदो ।
गेहे यस्य स एव सन्ति विभवा धन्यश्च पुण्यात्मकः ॥ २९ ॥

अर्थ— निजण्याचा पलंग, सुवासिक फुलें, चंदनाची उटणी, कापूर, कस्तूरी, मधुर अन्न, रूपवती अशी पत्नी, हास्य विनोद वगैरे गमतीचे व्यापार, तांबूल, उंची दागिने, पुत्र, आणि धर्म करण्याकरितां द्रव्य ही संपत्ति ज्याच्या घरांत असेल, तो धन्य होय! आणि तोच पुण्यवान् होय.

चैत्यालयप्रवेश.

गत्वा तत्र जिनागारं शनैः स्थित्वा बहिःस्थले ॥
पादौ प्रक्षाल्य संशोध्य सम्यगीर्यापथं क्रमात् ॥ ३० ॥
त्रिःपरीत्य जिनेन्द्रस्य गेहं चान्तर्विशेद्बुधः ॥
मुखवस्त्रं समुद्घाट्य जिनवक्त्रं विलोकयेत् ॥ ३१ ॥

अर्थ— त्या आपल्या घरांत हळू हळू जाऊन, जिनमंदिराच्या बाहेर उभे राहून, आपले पाय धुवावेत. मग ईर्यापथशुद्धि करून, जिनेंद्राला तीन प्रदक्षिणा करून, मंदिरांत प्रवेश करावा. आणि जिनेंद्राच्या मुखावरील वस्त्र काढून त्याच्या मुखाचें दर्शन करावें. आणि पुढील स्तोत्रानें जिनदर्शनाचें माहात्म्य वर्णन करावें

जिनदर्शनस्तवन.

दर्शनं जिनपतेः शुभावहं । सर्वपापशमनं गुणास्पदम् ॥
स्वर्गसाधनमुशन्ति साधवो । मोक्षकरणमतः परं च किं ॥ ३२ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राचें दर्शन अत्यंत शुभकारक आहे, तें सर्व पातकांचा नाश करणारें व सर्व सद्गुणांचें वसतिस्थान आहे. सज्जन लोक श्रीजिनेंद्राचें दर्शन हेंच स्वर्गाचें मुख्यसाधन आहे असें ह्मणतात. मग मोक्षाचें साधन तरी ह्यापेक्षां निराळें कोणतें असावयाचें आहे?

दर्शनं जिनरवेः प्रतापव- । चित्तपद्मपरमप्रकाशकम् ॥
दुष्कृतैकतिमिरापहं शुभं । विघ्नवारिपरिशोषकं सदा ॥ ३३ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्ररूपी जो सूर्य, त्याचें दर्शन प्रतापशाली असल्यानें तें अंतःकरणरूपी कमलाचा विकास करणारें, पातकरूपी अंधकाराचा नाश करणारें, कल्याणप्रद आणि सर्वदा विघ्नरूपी उदक शोषून टाकणारें असें आहे.

दर्शनं जिननिशापतेः परं । जन्मदाहशमनं प्रशस्यते ॥
पुण्यनिर्मलसुधाप्रवर्षणं । वर्धनं सुखपयोनिधेः सतः ॥ ३४ ॥

अर्थ— श्रीजिनपतिरूपी जो चंद्र त्याचें दर्शन जन्ममरणरूपी उकाड्याचा नाश करणारें आहे; आणि पुण्यरूपी स्वच्छ अमृताचा वर्षाव करणारें असून सत्पुरुषांच्या सुखरूपी समुद्राला भरती आणणारें आहे.

दर्शनं जिनसुकल्पभूरुहः । कल्पितं हि मनसा प्रपूरयेत् ॥
सर्वलोकपरितापनाशनं । पम्फुलीति फलतो महीतले ॥ ३५ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्र हाच जो कल्पवृक्ष त्याचें दर्शन हें मनांत आणलेलें देणारें असें आहे. आणि सर्व लोकांच्या संसारतापाचा नाश करणारें असून ह्या पृथ्वीवर उत्कृष्ट फलांनीं ( दर्शन करणाऱ्याचें कल्याण करणें ह्या फलांनीं ) गजबजून गेलें आहे.

दर्शनं जिनसुकामगोरलं । कामितं भवति यत्प्रसादतः ॥
दोग्धि दुग्धमपि वित्तकाम्यया । शुद्धमेव मन इत्युदाहृतम् ॥ ३६ ॥

अर्थ— मी श्रीजिनेंद्ररूपी जी कामधेनु तिचें दर्शन केलें ह्मणजे पुरे आहे. कारण, माझे सर्व मनोरथ श्रीजिनेंद्ररूपी कामधेनूच्या कृपेनें सफल होणारे आहेत. ही कामधेनु अशी आहे की, भव्यजीवानें द्रव्याच्या इच्छेनें तिची धार काढली असतां ती धार काढणाराचें अंतःकरण शुद्ध करते ह्मणजे त्याची द्रव्यतृष्णा दूर करते.

दर्शनं जिनपयोनिधेर्भृशं । सौख्यमौक्तिकसमूहदायकम् ॥
सद्धनं गुणगभीरमुत्तमं । ज्ञानवारिविपुलप्रवाहकम् ॥ ३७ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्ररूपी समुद्राचें दर्शन हे सौख्यरूपी मौक्तिकांना देणारें आहे. आणि ज्ञानरूपी उदकाची पुष्कळ वृष्टि करणारा असा जो सद्गुणरूपी उत्तम मेघ त्यालाही देणारें आहे.

अद्याभवत्सफलता नयनद्वयस्य । देव त्वदीयचरणाम्बुजवीक्षणेन ॥

अद्य त्रिलोकतिलक प्रतिभासते मे । संसारवारिधिरयं चुलकप्रमाणः ॥ ३८ ॥

अर्थ— हे देवा! आज तुझ्या चरणकमलांच्या दर्शनानें माझ्या दोनी डोळ्यांची सफलता झाली. हे प्रभो! आज मला हा संसारसमुद्र पसाभर पाण्याप्रमाणें भासूं लागला आहे.

किसलयितमनल्पं त्वद्विलोकाभिलापात् ।
कुसुमितमतिसान्द्रं त्वत्समीपप्रयाणात् ॥
मम फलितममन्दं त्वन्मुखेन्दोरिदानीं ।
नयनपथमवासादेव पुण्यद्रुमेण ॥ ३९ ॥

अर्थ— हे देवाधिदेवा! माझ्या पुण्यरूपी वृक्षाला–तुझें दर्शन करण्याची जी मला इच्छा झाली तीमुळें कोमल पानें आल्याप्रमाणें झालें आहे. [ ह्मणजे तुझ्या दर्शनाची मला जी इच्छा झाली ती माझ्या पुण्यरूपी वृक्षाची पालवी होय. ] त्या इच्छेमुळें तुझ्याजवळ माझें येणें झाल्यानें त्या वृक्षाला फुलांचा बहार आल्यासारखें झालें आहे. (तुझ्या चरणाजवळ येणें हें पुण्यवृक्षांचीं फुलें होत. ) आणि तुझा मुखचंद्र ह्या वेळीं माझ्या दृष्टीस पडल्यानें त्या वृक्षाला फलें आल्याप्रमाणें झालें आहे. (तुझ्या मुखचंद्राचें दर्शन हें पुण्य-वृक्षाचें फल होय. )

शर्वरीषु शशिना प्रयोजनं । भास्करेण दिवसे किमीश्वर ॥

त्वन्मुखेन्दुदलिते तमस्तते । भूतलेऽत्र तकयोस्तु का स्तुतिः ॥ ४० ॥

अर्थ— हे प्रभो! अंधकारानें (अज्ञानानें) व्याप्त झालेलें हें भूतल, जर तुझ्या मुखचंद्रानें प्रकाशमान (ज्ञानवान्) होत आहे, तर रात्रीच्यावेळीं चंद्राचें काय प्रयोजन आहे? आणि दिवसा सूर्याचें तरी काय प्रयोजन आहे? कांहीं नाहीं. कारण, त्यांचें कांहीं कार्यच जगांत राहिलें नाहीं. म्हणून, त्यांची स्तुति करण्यांत कांहींच अर्थ नाहीं.

अमितगुणगणानां त्वद्गतानां प्रमाणं । भवति समधिगन्तुं यस्य कस्यापि वाञ्छा ॥
प्रथममपि स तावद्व्योम कत्यङ्गुलं स्या- । दिति च सततसंख्याभ्यासमङ्गीकरोतु ॥ ४१ ॥

अर्थ— हे नाथा! तुझ्या ठिकाणीं असलेल्या असंख्य गुणांचें प्रमाण समजावें अशी जर कोणाला इच्छा होईल; तर, त्यानें प्रथम आकाश किति अंगुलें लांब आहे तें मोजण्याकरितां संख्येचा अभ्यास करावा. तात्पर्य—आकाश किती अंगुलें लांब आहे ह्याची संख्या समजणें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें, तुझ्या गुणांची संख्या समजणेंही शक्य नाहीं.

देव त्वदंघ्रिनखमण्डलदर्पणेऽस्मि- । न्नर्घ्ये निसर्गरुचिरे चिरदृष्टवक्त्रः ॥
श्रीकीर्तिकान्तिधृतिसङ्गमकारणानि । भव्यो न कानि लभते शुभमङ्गलानि ॥ ४१ ॥

अर्थ— हे देवा! स्वभावतःच सुंदर असलेल्या आणि पूज्य अशा ह्या तुझ्या चरणनखरूपी दर्पणांत जो

भव्यजीव फार वेळ आपलें मुख अवलोकन करतो (तुझ्या चरणावर जो फार वेळ नम्र होतो;) तो भव्य-जीव, संपत्ति, कीर्ति, कांति आणि धृति (धैर्य) ह्यांच्या प्राप्तीची कोणती मंगल साधनें मिळवीत नाहीं? सर्व साधनें मिळवितो. ह्मणजे श्रीजिनेंद्राचें दर्शन करणाऱ्या मनुष्याच्याजवळ संपत्ति, कीर्ति, कांति आणि धृति, ह्या प्राप्त होण्याची सर्व साधनें आपोआप चालून येतात.

त्वद्दर्शनं यदि ममास्ति दिने दिनेऽस्मिन् । देव प्रशस्तफलदायि सदा प्रसन्नम् ॥
कल्पद्रुमार्णवसुरग्रहमन्त्रविद्या- । चिन्तामणिप्रभृतिभिर्न हि कार्यमस्ति ॥ ४२ ॥

अर्थ— भगवन्! विपुल फल देणारें आणि सर्वदा आनंदमय असें हें तुझें दर्शन जर मला प्रतिदिवशीं होईल, तर कल्पवृक्ष, समुद्र, देव, ग्रह, मंत्र, विद्या, चिन्तामणि वगैरेच्या योगानें माझें कांहींच काम नाहीं. कल्पवृक्ष वगैरे इच्छितफल देणाऱ्या वस्तूंची मला मुळींच गरज नाहीं.

जिनपूजाक्रम

इति संस्तुत्य देवं तमुपविश्य जिनाग्रतः
भार्यायै याचितं वस्तु पानीयाक्षतचन्दनम् ॥ ४३ ॥
पुष्पं नैवेद्यदीपांश्च धूपं फलमतः परम् ॥
समालोक्य च संशोध्य पूजा कार्या सुबुद्धितः ॥ ४४ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें श्रीजिनेंद्राची स्तुति करून त्याच्या अग्रभागीं बसावें. नंतर आपल्या पत्नीजवळ मागितलेले पाणी, अक्षता, गंध, फुलें, अनेक नैवेद्य, दीप, धूप आणि फल हे पदार्थ जीवजंतु त्यात आहे की काय! हें समजण्याकरितां नीट तपासून पाहून, शुद्धमनानें प्रभूची पूजा करावी.

आव्हानं स्थापनं कृत्वा सन्निधीकरणं तथा ॥
पञ्चोपचारविधितः पूजनं च विसर्जनम् ॥ ४५ ॥

अर्थ— पूजा करतांना प्रथम श्रीजिनेंद्राचे आवाहन (बोलावणें) करावें. नंतर आपल्या पुढें असलेल्या प्रतिमेच्या ठिकाणी श्रीजिनेंद्राचें स्थापन करावें. मग सन्निधीकरण (पूजा होईपर्यंत प्रतिमेच्या ठिकाणीं रहाण्याची प्रार्थना) करावें. मग त्याची पंचोपचारानें पूजा करून विसर्जन करावें.

गर्भागारे जिनेन्द्राणां कृत्वा पूजां महोत्सवैः ॥
स्तुतिं स्तुत्या परं भक्त्या नमस्कारं पुनःपुनः ॥ ४६ ॥
कृत्वा मण्डपमध्येऽत्र वेदिकां च समागमेत् ॥
जिनस्य दक्षिणे भागे दर्भासनमुपाश्रयेत् ॥ ४७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें गर्भागारात श्रीजिनेंद्राची पूजा मोठ्या उत्साहानें करून, आणि अनेक स्तोत्रांनीं त्याची स्तुति करून वारंवार नमस्कार करावेत. नंतर मंडपाच्या मध्यभागी असलेल्या कट्याजवळ यावें, आणि

जिनेंद्राच्या उजव्या बाजूस दर्भासनावर बसावें.

वनिताहस्ततो वाऽन्यशिष्यहस्तात्तथाऽपि च ॥
गृहीत्वा त्वर्चनाद्रव्यं पूजयेज्जिननायकम् ॥ ४८ ॥

अर्थ— नंतर स्वस्त्रीकडून किंवा शिष्याकडून अथवा दुसऱ्या कोणाकडून आणविलेलें पूजाद्रव्य (पूजेचे पदार्थ) घेऊन, त्या ठिकाणीं पुढीलप्रमाणें श्रीजिनेंद्राची पूजा करावी.

पञ्चवर्णैर्महाचूर्णै रङ्गवल्लीं समालिखेत् ॥ कदलीसल्लकीस्तम्भैरिक्षुदण्डैः
सतोरणैः ॥ ४९ ॥ घण्टाचमरसम्भूपैर्भूपयेज्जिनवेदिकाम् ॥ पूर्णकुम्भा-
र्चनाद्रव्यदर्भांश्च वामभागतः ॥ ५० ॥ गन्धकुट्यां जिनेन्द्रस्यं प्रतिमां
च निवेशयेत् ॥ सिद्धचक्रस्य यन्त्रं च पूजयेद्गुरुपादुकाम् ॥ ५१ ॥ सह-
स्रनाम देवस्य पठेत्तावद्विधानतः ॥ सकलीकरणं कृत्वा शोधयेन्निजदे-
हकम् ॥ ५२ ॥ गन्धपुष्पाक्षतैस्तोयैः पूजाद्रव्याणि शोधयेत् ॥ पूजोप-
करणस्तोमं शोधयेच्छुचिभिर्जलैः ॥ ५३ ॥

अर्थ— पांच रंगाच्या निरनिराळ्या चूर्णानें रंगवल्ली काढावी. केळी किंवा सळई ह्यांचे खांब, ऊंस, तोरण, घाट, चवऱ्या आणि अनेक प्रकारचीं भूषणें ह्यांच्या योगानें ती वेदिका (कट्टा) सुशोभित करावी.

पाण्याची घागर, पूजेचे पदार्थ आणि दर्भ हे आपल्या डाव्या हाताकडे ठेवावेत. मग गंधकुटीच्या ठिकाणीं श्रीजिनेंद्राच्या प्रतिमेचें स्थापन करावें. सिद्धचक्राचें यंत्र आणि गुरूच्या पादुका यांची पूजा करावी. श्रीजिनाचें सहस्रनाम स्तोत्र पठण करावें. सकलीकरण करून आपल्या देहाची शुद्धि करावी. गंध, फुलें, अक्षता वगैरे पूजेचे पदार्थ पाण्यानें शुद्ध करावेत. तसेंच आणखी पूजेला लागणारी सामग्रीही पाण्यानें धुवून शुद्ध करावी.

तत ईशानदिग्भागे वास्तुवायुकुमारकान् ॥
मेघाग्निनागदेवांश्च भूमिशुद्धिविधायकान् ॥ ५४ ॥
दर्भाम्बुवन्हिभिः शुद्धैर्भूमिं संशोध्य पूजयेत् ॥
महावाद्यनिनादेन पुष्पांजलीभिरञ्जसा ॥ ५५ ॥
शिष्या विद्यागुरूंश्चात्र सार्घ्यदानेन तर्पयेत् ॥
अग्निकोणे क्षेत्रपालं गुडतैलैश्च पूजयेत् ॥ ५६ ॥

अर्थ— मग ईशान्येकडच्या बाजूस भूमिशुद्धि करणाऱ्या वास्तुदेवता आणि वायुकुमार, मेघकुमार, अग्निकुमार आणि नागकुमार यांची पूजा करावी. पूजा करण्याच्या अगोदर दर्भ, पाणी आणि अग्नि यांच्या योगानें भूमीची शुद्धता करावी. आणि नंतर पूजा करावी. पूजेच्या वेळीं मोठमोठी वाद्यें

वाजवावीत. देवावर पुष्पांजलि घालावी. ह्याच ठिकाणीं आपल्या विद्यागुरूंला अर्घ्य देऊन त्यांची पूजा करावी. नंतर आग्नेयेकडील बाजूस गूळ आणि तेल ह्या द्रव्यांनी क्षेत्रपालाची पूजा करावी.

ईशानदिशि नागाँश्च क्षीरैरञ्जलिपूरितैः ॥
आभिः पुण्याभिरित्यादि श्लोकेन भुवमर्चयेत् ॥ ५७ ॥

अर्थ— ईशान्यदिशेला जी नागकुमारांची पूजा सांगितली ती ओंजळभर पाण्यानें करावी. आणि "आभिः पुण्याभि" इत्यादिश्लोकानें ( हा श्लोक पुढें आहे ) भूमीची पूजा करावी.

आभिः पुण्याभिरद्भिः परिमलबहलेनामुना चन्दनेन ।
श्रीद्धिक्पेयै-(!)-रमीभिः शुचिसदकचयैरुद्गमैरेभिरुद्धैः ॥
हृद्यैरेभिर्निवेद्यैर्मखभवनमिमैर्दीपयद्भिः प्रदीपै- ।
र्धूपैः प्रेयोभिरेभिः पृथुभिरपि फलैरेभिरर्चामि भूमिम् ॥ ५८ ॥

"आभिः पुण्याभि" इत्यादि श्लोकानें भूमीचें पूजन करण्यास वरील श्लोकांत सांगितलें आहे, तो श्लोक हाच होय. हा श्लोक ह्मणून, जल, गंध, पुष्प, अक्षता, नैवेद्य, दीप, धूप आणि फल ह्या पदार्थांच्या योगानें भूमीची पूजा करावी.

ततः श्रुतं गुरुं सिद्धं यक्षान्यक्षीश्च देवताः ॥

पूजयेद्विधिवद्भक्त्या दीर्घया दम्भवर्जितः ॥ ५९ ॥

अर्थ— नंतर शास्त्र, गुरु, सिद्ध, यक्ष आणि यक्षी ह्या देवतांची पूजा यथाविधि मोठ्या भक्तीनें करावी. पूजा करतांना दांभिक वृत्ति असू नये.

आभरणधारण

जिनांघ्रिचन्दनैः स्वस्य शरीरे लेपमाचरेत् ॥
यज्ञोपवीतसूत्रं च कटिमेखलया युतम् ॥ ६० ॥
मुकुटं कुण्डलद्वन्द्वं मुद्रिकां करकङ्कणम् ॥
बाहुबन्धांघ्रिभूपे च वस्त्रयुग्मं च तत्परम् ॥ ६१ ॥
जिनांघ्रिस्पर्शितां मालां निर्मलां कण्ठदेशके ॥
ललाटे तिलकं कार्यं तेनैव चन्दनेन च ॥ ६२ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या चरणावरील गंधानें आपल्या अंगाला लेप करावा. तसेंच यज्ञोपवीत, कमरेची मेखला, मुकुट, कुंडलें, बोटांतील अंगठ्या, हातांतील कडें वगैरे दागिने, दंडांत घालावयाचे दागिने, पायांत घालावयाचे साखळ्या वगैरे दागिने आणि अंगावर घेण्याची वस्त्रें ह्या सर्व पदार्थांना श्रीजिनेंद्राच्या चरणांवरील गंध लावावें. श्रीजिनेंद्राच्या चरणाचा जिला स्पर्श झाला आहे अशी पुष्पमाला आपल्या कंठात धारण

करावी. आणि त्या भगवंताच्या चरणाचा स्पर्श झालेलें गंध आपल्या कपाळास लावावें.

तिलकाचे प्रकार

आतपत्रं तथा चक्रं अर्धचन्द्रं त्रिशूलकम् ॥
मानस्तम्भस्तथा सिंहपीठकं चेति षड्विधम् ॥ ६३ ॥

अर्थ— छत्राकार, चक्राकार, अर्धचंद्राकार, त्रिशूलाकार, मानस्तंभाकार आणि सिंहासनाकार असे गंध लावण्याचे सहा प्रकार आहेत.

छत्रत्रयमिति स्मृत्वा आतपत्रमुदाहृतम् ॥
धर्मचक्रमिति स्मृत्वा चक्राकारं च कारयेत् ॥ ६४ ॥
पाण्डुशिलेति संस्मृत्य अर्धचन्द्रं विनिर्मितम् ॥
रत्नत्रयमिति ज्ञात्वा त्रिदण्डं तिलकं स्थितम् ॥ ६५ ॥
मानस्तम्भाकृति कार्यं मानस्तम्भाभिधानकम् ॥
सिंहासनं जिनेन्द्रस्य संस्मृत्य सिंहविष्टरम् ॥ ६६ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या तीन छत्रांचें स्मरण करून छत्राकार गंध लावावें. धर्मचक्राचें स्मरण करून चक्राकार गंध लावावें. तीर्थकराच्या जन्माभिषेकाच्या वेळीं असलेल्या शुभ्राशिलेचें स्मरण करून अर्धचंद्राकार

गंध लावावें. रत्नत्रयाचें स्मरण करून त्रिशूलाकार गंध लावावें. मानस्तंभाचें स्मरण करून मानस्तंभाकार गंध लावावें. आणि श्रीजिनेंद्राच्या सिंहासनाचें स्मरण करून सिंहासनाकार किंवा पीठाकार गंध लावावें.

तिलकाचीं स्थानें

आतपत्रार्धचन्द्रे वा यदा भाले धृते तदा ॥
वक्षसि भुजयोः कण्ठे त्रिशूलाकृतिमादिशेत् ॥ ६७ ॥

अर्थ— ज्यावेळीं कपाळावर अर्धचंद्राकार किंवा छत्राकार गंध लाविलें असेल, त्यावेळीं ऊर, दोनी बाहू आणि कंठ ह्यांवर त्रिशूलाकार गंध लावावें.

भाले स्तम्भं तथा पीठं भुजादौ स्वस्तिकं तदा ॥
त्रिदण्डमथवा चक्रं तदाकृति तथा भवेत् ॥ ६८ ॥

अर्थ— कपाळावर जेव्हां स्तंभाकार किंवा पीठाकार गंध लाविलें असेल त्या वेळीं बाहू वगैरे ठिकाणीं स्वस्तिकाकार, त्रिशूलाकार अथवा चक्राकार गंध लावावें.

सर्वाङ्गलेपनं प्रोक्तं सर्वेषु तिलकेषु वा ॥
तदुपरि त्रिशूलाद्यानाकारान्परिचिन्तयेत् ॥ ६९ ॥

अर्थ— कपाळास कोणत्याही प्रकारचा तिलक लावावयाचा असला तथापि सर्वांगाला गंध लावून त्यावर

त्रिशूल वगैरे आकाराचें गंध लावावें.

तिलकाच्या आकृति

आतपत्रं त्वर्धचन्द्रं तिर्यग्रेखं प्रकीर्तितम् ॥
त्रिदण्डं मानिकस्तम्भमूर्ध्वरेखमुदाहृतम् ॥ ७० ॥
सिंहपीठं तथा चक्रं वर्तुलं वर्तुलाकृति ॥
स्तम्भश्चैकांगुलव्यासो द्व्यंगुलोऽप्यथवा भवेत् ॥ ७१ ॥

अर्थ— छत्र आणि अर्धचंद्र ह्या आकृति आडव्या रेषेच्या आहेत. त्रिशूल आणि मानस्तंभ ह्या दोन आकृति उभ्या रेषेच्या आहेत. सिंहासन आणि चक्र ह्या दोन आकृति वर्तुलाकार आहेत. स्तंभाकृति ही एक बोट किंवा दोन बोटें रुंद असावी.

अङ्गुलं विष्टरव्यासे चतुरङ्गुलमेव वा ॥
भ्रूकेशयोश्च संव्याप्य विशालं स्तम्भविष्टरम् ॥ ७२ ॥
चक्रं तथैव विज्ञेयं त्रिदण्डं केशसंगतम् ॥
आतपत्रं त्वर्द्धचन्द्रं रागिणां सुखकारणम् ॥ ७३ ॥

अर्थ— सिंहासनाकार लाविलेल्या गंधाचा व्यास एक अंगुल किंवा दोन अंगुलें असावा. आणि स्तंभ

सिंहासन आणि चक्र ह्या आकृतीचें गंध, भुवयांच्या केसावरूनही येईल, इतकें मोठें लावावें. त्रिशूलाकार गंध भुवयांच्या केसावर येऊं देऊं नये. केसाजवळ असावें. छत्र आणि अर्धचंद्र ह्या आकृति, विषयी लोकांना संतोष देणाऱ्या आहेत.

सर्वांगे रचना कार्या विकारपरिवर्जिता ॥
भुजयोर्भालदेशे वा कण्ठे ह्युदरेऽपि च ॥ ७४ ॥

अर्थ— ह्या वर सांगितलेल्या गंधाच्या आकृति सर्वांगावर न विघडूं देता लावाव्यात. म्हणजे दोन भुज, कपाळ, गळा, ऊर आणि पोट ह्या सहा स्थानांवर लावाव्यात.

चतुर्वर्णाचे तिलकभेद.

अर्धचन्द्रातपत्रे तु कुर्वन्ति क्षत्रियाः पराः ॥
स्तम्भं पीठं तथा छत्रं ब्राह्मणानां शुभप्रदम् ॥ ७५ ॥
मानस्तम्भं तथा छत्रं वैश्यानां तु सुखप्रदम् ॥
शूद्राणां तु भवेच्चक्रमितरेषां त्रिदण्डकम् ॥ ७६ ॥

अर्थ— क्षत्रियांनीं अर्धचंद्र आणि छत्र ह्या आकृतीचें गंध लावावें. ब्राह्मणांनी मानस्तंभ, सिंहासन किंवा छत्र ह्या आकृतीचें लावावें. तें त्यांना मंगलकारक आहे. मानस्तंभ आणि छत्र ह्या आकृतीचें गंध

वैश्यांनीं लावावें. शूद्रांनीं चक्राकार गंध लावावें, आणि इतर लोकांनीं त्रिशूलाकार लावावें.

क्षत्रियवैश्यविप्राणां योषितां तिलकं स्मृतं ॥
अर्धचन्द्रस्तथा छत्रं तिर्यग्रेखाचतुष्टयम् ॥ ७७ ॥

अर्थ— क्षत्रिय, वैश्य, ब्राह्मण आणि त्यांच्या स्त्रिया ह्यांनीं तिलक अवश्य लावावा. तो अर्धचंद्राकार किंवा छत्राकार तिलकाच्या आडव्या चार रेघा असाव्यात.

त्रैवर्णिकाचे तिलकाचे पदार्थ.

योषितां सर्वशूद्राणां स्तम्भं पीठं त्रिदण्डकम् ॥
चन्दनकुङ्कुमश्रेष्ठद्रव्यैस्त्रिवर्णके स्मृतम् ॥ ७८ ॥

अर्थ—शूद्र आणि त्यांच्या स्त्रिया ह्यांनीं स्तंभाकार, सिंहासनाकार किंवा त्रिशूलाकार तिलक धारण करावा. त्रैवर्णिकांनीं लावावयाचें गंध चंदन, केशर किंवा दुसरीं उंचीं सुगंध द्रव्यें ह्यांचें असावें.

शूद्राच्या तिलकाचे पदार्थ.

निम्बकाष्ठैर्मृदा वाऽथ शूद्राणां शुभ्रभस्मना ॥
सिन्दूरैर्वा निशाचूर्णैः सर्वासां योषितां वरम् ॥ ७९ ॥

अर्थ— लिंबाचें खोड किंवा मृत्तिका अथवा पांढरी राख ह्यांचा तिलक शूद्रांनीं धारण करावा. सर्व-

वर्णाच्या स्त्रियांनीं सिंदूर किंवा हळदीची पूड यांचा तिलक धारण करावा, हें फार उत्तम आहे.

अक्षतधारण.

सुगन्धलेपनस्योर्ध्वं मध्येभालं धरेद्गृही ॥
अङ्गुलाग्रमिते देशे जिनपादार्चिताक्षतान् ॥ ८० ॥

अर्थ— कपाळाला गंध लावल्यावर, कपाळाच्या मध्यभागीं अंगुलीच्या अग्राइतक्या जाग्यांत जिनपूजनाच्या अक्षता गृहस्थानें धारण कराव्यात.

गंधलेपनाचा महिमा.

ब्रह्मघ्नो वाऽथ गोघ्नो वा तस्करः सर्वपापकृत् ॥
जिनांघ्रिगन्धसम्पर्कान्मुक्तो भवति तत्क्षणात् ॥ ८१ ॥

अर्थ— ब्रह्महत्या, गोहत्या, चोरी अथवा कोणतींही पातकें करणारा असा जरी मनुष्य असला, तथापि त्यानें श्रीजिनेंद्राच्या चरणांचा स्पर्श ज्याला झाला आहे असें गंध आपल्या अंगास लाविलें असतां, तो त्याच क्षणीं सर्वपातकांपासून मुक्त होतो.

गंध लावण्याच्या बोटाचीं फळें.

अङ्गुष्ठः पुष्टिदः प्रोक्तो यशसे मध्यमा भवेत् ॥

अनामिका श्रियं दद्यान्मुक्तिं दद्यात्प्रदेशिनी ॥ ८२ ॥

अर्थ—अंगठा पुष्टी देणारा आहे. मधलें बोट कीर्ति देणारें आहे. अनामिका हें बोट संपत्ति देणारें आहे. आणि अंगठ्याजवळचें बोट मोक्ष देणारें आहे. असें शास्त्रकारांनीं सांगितलें आहे.

श्रीकामः पुष्टिकामो वा यथेष्टं तिलकं चरेत् ॥
अभ्यंगोत्सवकाले तु कस्तूरीचन्दनादिना ॥ ८३ ॥

अर्थ— संपत्तीची किंवा पुष्टीची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें पाहिजे तसा तिलक लावावा. आणि तेल अंगास लावून स्नान केलें असतां किंवा कांहीं उत्सव असतां कस्तूरी, चंदन वगैरे पदार्थाचा तिलक लावावा.

तिलकावाचून न करावयाचीं कृत्यें.

जपो होमस्तथा दानं स्वाध्यायः पितृतर्पणम् ॥
जिनपूजा श्रुताख्यानं न कुर्यात्तिलकं विना ॥ ८४ ॥

अर्थ— जप, होम, दान, स्वाध्याय, पितृतर्पण, जिनपूजा आणि शास्त्राचें व्याख्यान ह्या क्रिया तिलक धारण केल्यावांचून करूं नयेत.

वस्त्रयुग्मं यज्ञसूत्रं कुण्डले मुकुटस्तथा ॥
मुद्रिका कंकणं चेति कुर्याच्चन्दनभूषणम् ॥ ८५ ॥

अर्थ— अंगावरील दोनीं वस्त्रें, यज्ञोपवीत, कुंडलें, मुकुट ( शिरोभूषण ) अंगठ्या, आणि हातांतील कडें ह्या सर्व वस्तु गंध लावून सुशोभित कराव्या.

ब्रह्मग्रन्थिसमायुक्तं दर्भैस्त्रिपञ्चभिः स्मृतम् ॥
मुष्ठ्यग्रं वलयं रम्यं पवित्रमिति धार्यते ॥ ८६ ॥

अर्थ— तीन अथवा पांच दर्भ घेऊन त्यांना ब्रह्मग्रंथि करून त्या ब्रह्मग्रंथीतून बाहेर आलेले दर्भाचे शेंडे चार अंगुलें लांब सोडावेत, ह्याप्रमाणें केलें असतां त्या दर्भाची पुढें वलयामध्यें गांठ आणि खालीं शेंडे अशी आकृति होते. ह्यास पवित्र असें ह्मणतात. हें पवित्र अनामिका ह्या बोटांत धारण करावें.

एवं जिनांघ्रिगन्धैश्च सर्वांगं स्वस्य भूपयेत् ॥
इन्द्रोऽहमिति मत्वाऽत्र जिनपूजा विधीयते ॥ ८७ ॥

अर्थ— याप्रमाणें जिनबिंबाच्या पायावरील गंधानें आपलें सर्व अंग ( ठिकठिकाणच्या अलंकारांच्या ऐवजीं गंधलेपन करून ) भूषित करावें. आणि येथें मी इंद्र उभा आहे अशी भावना करून जिनपूजा करावी.

श्रीपीठस्थापन.

पाण्डुकाख्यां शिलां मत्वा श्रीपीठं स्थापयेत्क्रमात् ॥
मध्ये श्रीकारमालेख्य दर्भाक्षतजलैः शुभैः ॥ ८८ ॥

अर्थ— मेरुपर्वतावर इंद्रानें जेथें जिनेंद्रास जन्माभिषेक केला, ती पांडुक नांवाची शिला हीच होय. अशी भावना करून; श्रीपीठ स्थापन करून त्यामध्यें 'श्री' हें अक्षर लिहावें आणि त्या श्रीकारसहित पीठाची अष्टद्रव्यांनीं पूजा करावी.

प्रतिमास्थापन.

ततो मङ्गलपाठेन प्रतिमां तत्र चानयेत् ॥
सिद्धादीनां च यन्त्राणि स्थापयेन्मन्त्रयुक्तितः ॥ ८९ ॥

अर्थ— त्यानंतर त्या पीठावर मंगलपाठ ( स्तुतिस्तवन ) उच्चारीत जिनप्रतिमा स्थापन करावी आणि त्याचप्रमाणें सिद्धचक्र वगैरे यंत्रांचीहि मंत्रसहित स्थापना करावी.

प्रक्षाल्य जिनबिम्बं तत्सुगन्धैर्वासितैर्जलैः ॥
आव्हानं स्थापनं कृत्वा सन्निधानं तथैव च ॥ ९० ॥
ततः पञ्चगुरुमुद्रां निवृत्य परिदर्शयेत् ॥
ततः पाद्यविधिं कृत्वा जलैराचमयेज्जिनम् ॥ ९१ ॥
ततो नीराजनं कृत्वा पूजयेदष्टधार्चनैः ॥
भस्मोदनशलाकागोमयपिण्डनिराजनां ॥ ९२ ॥

अर्थ— श्रीपीठावर जिनबिंब स्थापन करितांना त्या बिंबास आव्हान स्थापन सांनिधापन वगैरे विधि मंत्रपूर्वक करून; तें बिंब सुगंधयुक्त जलांनीं प्रक्षालित करावें. त्यानंतर आपल्या हस्ताची पंचगुरुमुद्रा करून ती मुद्रा प्रतिमेपुढें तीनवार फिरवून दाखवावी. त्यानंतर प्रतिमेस पाद्य ( कमळाची मुळी, पांढऱ्या मोहऱ्या, दूर्वा आणि अक्षता मिळून अर्पण करणें यास पाद्य ह्मणतात. ) देऊन, जलानें आचमन करवावें ह्मणजे प्रतिमेच्या मुखास तीनवार उदक द्यावें. त्यानंतर नीराजनविधी करून, अष्टद्रव्यांनी पूजा करावी. शुद्धगोमयाचें भस्म, भात, दर्भाच्या कांड्या, गोमय ( अंतराळीं धरलेलें गाईचें शेण ) पिंड ( पंचवर्ण भाताचें पिंड ) इत्यादि द्रव्यांनीं नीराजन करावें. ह्मणजे हीं द्रव्यें देवावरून उतरून टाकावीं.

चतुष्कोणेषु कुम्भांश्च मालाचन्दनचर्चितान् ॥
फलपल्लववक्रस्थान्ससूत्रान्स्थापयेत्क्रमात् ॥ ९३ ॥

अर्थ— श्रीपीठासमोर चौरंगावर च्यारी कोणांत पुष्पमाळा व चंदनातिलक यांनीं युक्त व ज्यांच्या मुखावर फळें आणि पानें ठेविली आहेत असे चार कुंभ क्रमानें स्थापन करावे.

अर्घ्यैः सम्पूज्य कुम्भांस्तांस्ततो दिक्पालकान्दश ॥
अर्घ्यपाद्यादिभिर्यज्ञभागबल्यादिभिर्यजेत् ॥ ९४ ॥

अर्थ— त्या कुंभाची अर्घ्यांनी पूजा करून, नंतर दहा दिक्पाल देवांची अर्घ्य, पाद्य, यज्ञोपवीत, बलि

वगैरे देऊन पूजा करावी.

कलशस्थापन.

ततः पुष्पाञ्जलिं दत्वा वाद्यनिर्घोषनिर्भरैः ॥
उध्दृत्य कलशान्पूर्वांस्तज्जलैः स्नापयेज्जिनम् ॥ ९५ ॥

अर्थ— नंतर पूजेच्या भूमीवर पुष्पांजलि देऊन, अनेक वाद्यांचा घोष चालू असतांना, स्थापन केलेल्या नऊ कलशांपैकीं च्यार कलश सोडून मधले चार कलश उचलून त्यांतल्या जलांनीं जिनबिंबास अभिषेक करावा.

पचामृताभिषेक

इक्षुरसभृतैः कुम्भैस्तथा घृतघटैः परैः ॥
दुग्धकुम्भैस्तथा दध्नः कुम्भैः संस्नापयेत्पुनः ॥ ९६ ॥

अर्थ— त्यानंतर उंसाचा रस भरलेल्या कुंभांनीं, त्यानंतर तूप भरलेल्या कलशांनीं, त्यानंतर दुधाच्या कलशांनी आणि शेवटीं दहीं भरलेल्या कलशांनी अभिषेक करावा, उंसाचा रस मिळत नाही तेव्हां नारळाचा रस किंवा आंब्याचा रस अभिषेकास घेतात.

कोणकलशाभिषेक.

सर्वौषधिरसैश्चापि चोध्दृत्य श्रीजिनेश्वरम् ॥

कोणस्थैः कलशैर्देवं युक्त्या संस्नापयेत्ततः ॥ ९७ ॥

अर्थ— त्यानंतर सर्वौषधींचा रस जिनप्रतिमेच्या सर्वांगास लाऊन; त्यावर, पूर्वी स्थापिलेल्या च्यार कोणांवरील च्यार कलशांतील जलांनीं अभिषेक करावा. ( कंकोळ, मिरे, वेलदोडे, लवंग, श्रीखंड, कर्पूर, केशर, अगरु, तगर, देवदारु, जातिफल वगैरे पदार्थ पिसून पाण्यांत कालवून तयार करणें यास सर्वौषधिरस ह्मणतात. )

जिनपादोदकग्रहण.

गन्धद्रव्यविमिश्रैश्च जलैः संस्नापयेत्पुनः ॥
पादोदकं जिनेन्द्रस्य प्रकुर्यात्स्वस्य मूर्द्धनि ॥ ९८ ॥

अर्थ— त्यानंतर पुनः गंधद्रव्यांनीं मिश्र अशा जलांनीं जिनबिंबास अभिषेक करावा आणि त्या प्रतिमेच्या पायाचें उदक आपल्या मस्तकीं सिंपावें.

अष्टद्रव्यार्चन.

वस्त्राञ्चलैस्तथा शुद्धय संस्थाप्य यन्त्रमध्यतः ॥
पूजयेदष्टधा द्रव्यैर्निर्मलैश्चन्दनादिभिः ॥ ९९ ॥

अर्थ— त्यानंतर ती प्रतिमा वस्त्राच्या पदरांनीं स्वच्छ पुसून पुनः त्या पीठयंत्रावर स्थापना करून निर्मल

अशा जलगंधादि द्रव्यांनीं अष्टप्रकारें पूजा करावी.

सिद्धयत्रादिपूजन.

ततः सिद्धादियन्त्राणि श्रुतं गुरुं च पूजयेत् ॥
यक्षयक्षीसुरान्सर्वान्यथायोग्यमभ्यर्चयेत ॥ १०० ॥

अर्थ— त्यानंतर सिद्धचक्र वगैरे यंत्रें, शास्त्र, गुरु, यक्ष, यक्षी व सर्व देव यांची यथायोग्य पूजा करावी.

शेषधारण

त्रिःपरीत्य जिनाधीशं भक्त्या नत्वा पुनः पुनः ॥
जिनश्रीपादपीठस्थां शेषां शिरसि धारयेत् ॥ १ ॥

अर्थ— नंतर जिनेंद्राला तीन प्रदक्षिणा करून व भक्तीनें पुनः पुनः नमस्कार करून जिनपीठावर असलेले गंध, अक्षता, पुष्प, वगैरे पदार्थ आपल्या मस्तकावर धारण करावेत.

होमाचा विधि

एवमाराधनां कृत्वा होमशालां ततो व्रजेत् ॥
समिधाद्यर्चनाद्रव्यं गृहीत्वा निजभार्यया ॥ २ ॥

अर्थ— आतां होमाचा विधि सांगतों— वर सांगितल्याप्रमाणें पूजा झाल्यावर समिधा वगैरे होमद्रव्य

आपल्या पत्नीच्या हातांत देऊन आपण होमशालेंत जावें.

लक्षणं होमकुण्डानां वक्ष्ये शास्त्रानुसारतः ॥
भट्टारकैकसन्धेश्च दृष्ट्वा निर्मलसंहिताम् ॥ ३ ॥

अर्थ— एकसंधि भट्टारकाची निर्दोष अशी संहिता ( ग्रंथ ) पाहून व शास्त्राला अनुसरून प्रथम होमकुंडांचें लक्षण सांगतों.

होमकुंडस्थान.

संशोधितमहीदेशे जिनस्य वामभागतः ॥
अष्टहस्तसुविस्तारा दीर्घा तथैव वेदिका ॥ ४ ॥
चतुःषष्ठ्यंशकान् कृत्वा चतुष्कोणे समांशकान् ॥
राक्षसांशान् परित्यज्य पश्चिमायां ततो दिशि ॥ ५ ॥
मनुष्यांशेषु तिर्यक्षु वेदिकां कारयेत्पराम् ॥
तत्र श्रीजिननाथानां प्रतिमां स्थापयेत्पराम् ॥ ६ ॥

अर्थ— जिनेंद्राच्या डाव्या बाजूला शुद्ध भूमीवर आठ हात लांबीरुंदीचा एक कट्टा घालावा. त्या कट्ट्यावर ज्यांचे चारी कोपरे सारखे आहेत असे चवसष्ठ भाग करावेत. त्यांपैकीं राक्षसांशाचा भाग टाकून

देऊन पश्चिमेकडील बाजूस आडव्या असलेल्या मनुष्यभागावर एक वेदिका ( लहान कट्टा ) करावी; आणि त्या वेदिकेवर श्रीजिनेंद्राची प्रतिमा स्थापन करावी. [ हे वरील चवसष्ट भाग आणि त्यांतील राक्षसांश वगैरे समजण्यास या ग्रंथाच्या शेवटचीं चित्तें पहावीं. ]

ततोऽग्रदेवभागेषु छत्रत्रयं निवेशयेत् ॥
चक्रत्रयं तथा यक्षयक्षीश्च स्वस्तिकं परम् ॥ ७ ॥

अर्थ— त्या जिनप्रतिमेच्या अग्रभागीं असलेल्या देवभागांवर छत्रत्रय, चक्रत्रय, यक्ष यक्षी आणि स्वस्तिक ह्यांची स्थापना करावी.

ब्रह्मभागांस्ततस्त्यक्त्वा देवमानुषभागयोः ॥
पूर्वे ब्रह्मांशकात्तत्र कुण्डत्रयं तु कारयेत् ॥ ८ ॥
मध्ये कुण्डं वरं तेषां त्रयाणां क्रियते शृणु ॥
अरत्न्यगाधविस्तारं चतुरस्रं त्रिमेखलम् ॥ ९ ॥

अर्थ— त्या पूर्वीच्या मोठ्या वेदिकेवरील ब्रह्मभाग सोडून देव आणि मनुष्य ह्यांच्या भागांत ब्रह्मभागाच्या पूर्वेकडील बाजूस तीन कुंडें करावींत. त्यांपैकीं मधलें कुंड चतुष्कोण असून त्याची लांबी रुंदी आणि खोली एक एक मुंडा हात असावी. आणि त्या कुंडाच्या सभोंवतीं तीन मेखला ( कट्टे ) कराव्यात.

त्रिकोणं दक्षिणे कुण्डं कुर्याद्वर्तुलमुत्तरे ॥
तत्रादिमेखला याश्चाप्यवसेयाश्च पूर्ववत् ॥ ११० ॥
भूताब्धिगुणमात्राः स्युर्मेखलाः प्रथमादयः ॥
मात्रायामं तथैतेषां कुण्डानामन्तरं भवेत् ॥ ११ ॥

अर्थ— त्या मधल्या कुंडाच्या दक्षिणेकडील बाजूला त्रिकोणी कुंड करावें. आणि उत्तरेकडील बाजूला वर्तुलाकार कुंड करावें. त्या दोनी कुंडालाही पहिल्या कुंडाप्रमाणेंच मेखला कराव्यात. त्यांपैकी पहिल्या मेखलेची उंची आणि रुंदी पांच मात्रा असावी. (हाताच्या अंगठ्याच्या पेऱ्यास मात्रा असे ह्मणतात) त्याच्या वरील दुसऱ्या मेखलेची उंची व रुंदी चार मात्रा असावी. आणि त्यावरील तिसऱ्या मेखलेची उंची व रुंदी तीन मात्रा असावी. आणि प्रत्येक दोन कुंडांच्या मध्यें एक मात्रा अंतर असावें.

परितो दिक्षु दिक्पालपीठिकाः कुण्डवेदिकाम् ॥
ततः समर्च्य तत्सर्वं संशोध्य च जलादिभिः ॥ १२ ॥
चतुरस्रं ततः कुण्डं त्रिकोणं तदनन्तरम् ॥
ततो वृत्तमपि प्राचैदम्भोधररसादिभिः ॥ १३ ॥

अर्थ— त्या कुंडांच्या भोवत्यानें अष्ट दिशांना आठ दिक्पालांचीं पीठें करावीत. नंतर जल वगैरेंच्या

योगानें सर्वांची शुद्धता करून सर्वांची पूजा करावी. त्यांत प्रथम चौकानी कुंड नंतर त्रिकोण कुंड आणि नंतर वर्तुल कुंड ह्याप्रमाणें क्रमानें शुद्धता व पूजा करावी.

तीर्थकृद्गणभृच्छेषकेवल्यन्त्यमहोत्सवे ॥
प्राप्य ते पूजनाङ्गत्वं पवित्रत्वमुपागताः ॥ १४ ॥
ते त्रयोऽपि प्रणेतव्याः कुण्डेष्वेषु महानयम् ॥
गार्हपत्याह्वनीयदक्षिणाग्निप्रसिद्धया ॥ १५ ॥

अर्थ–तीर्थंकर, गणधर आणि बाकीचे केवलीमुनि ह्यांच्या निर्वाणमहोत्सवांत पूज्य झालेले आणि त्या योगानें पवित्रेला पावलेले असे तीन अग्नि त्या तीन कुडांत घालावेत. त्यांत पहिलें जें चतुष्कोण कुंड, तें तीर्थंकरकुंड होय. त्यांतील अग्नीस गार्हपत्य असें नांव आहे. दुसरें त्रिकोण गणधरकुंड होय. त्यांतील अग्नीस आहवनीय असें नांव आहे. आणि वर्तुलाकृति जें कुंड असतें, तें केवलींचें कुंड होय. त्यांतील अग्नीस दक्षिणाग्नि ह्मणतात.

चतुष्कोणे चतुस्तम्भाः सल्लकीकदलीयुताः ॥
घण्टातोरणमालाढ्या मुक्तादामविभूषिताः ॥ १६ ॥
चन्द्रोपकयवारैश्च चामरैर्दर्पणैस्तथा ॥
धूपघटैः करतालैः केतुभिः कलशैर्युताः ॥ १७ ॥

अर्थ— मोठ्या वेदिकेच्या चारी बाजूस चार खांब, सळईचीं पानें व केळीचे खांब ह्यांनीं युक्त असे उभे करावेत. त्यांना घंटा, तोरणें व माळा बांधाव्यात. मोत्यांचे घोस सोडून ते खांब सुशोभित करावेत. त्यांच्यावरील चांदव्याला चंद्रोपक (यंत्राचें चित्र) लावावें. त्या खांबांवर यवार (तीळ पांढऱ्या मोहऱ्या, जिरे, गहूं वगैरे मंगल धान्य) ठेवावें. चवऱ्या, दर्पण धूपघट, करताळ, पताका आणि कलश ह्या मंगल वस्तु त्यांच्या जवळ असाव्यात.

एवं होमगृहं गत्वा पश्चिमाभिमुखं तदा ॥
उपविश्य क्रियाः कार्या नमस्कारपुरस्सराः ॥ १८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें होमगृह तयार करून त्यांत पश्चिमेकडे तोंड करून वसावें. आणि नमस्कार करून नंतर पूजा करण्यास आरंभ करावा. (ह्या ठिकाणीं देवाचें मुख ज्या दिशेकडे असेल ती पूर्वदिशा समजावी. अर्थात् आपण देवाकडे तोंड करून वसलों असतां आपलें तोंड पश्चिमेकडे होतें असें समजावें. पूजाविधींत सर्वत्र असेंच समजणेचें आहे.)

तत्रादौ वायुमेघाग्निवास्तुनागांश्च पूजयेत् ॥
क्षेत्रपालं गुरुं पितृन् शेषान्देवान्यथाविधि ॥ १९ ॥
जिनेन्द्रसिद्धसूरींश्च पाठकान् साधुसंयुतान् ॥

श्रुतं सम्पूज्य युक्त्याऽत्र पुण्याहवचनं पठेत् ॥ १२० ॥

अर्थ— त्यांत प्रथम वायुकुमार, मेघकुमार, अग्निकुमार, वास्तुदेवता, नागकुमार ह्यांची पूजा करून, नंतर क्षेत्रपाल, गुरु, पितर आणि बाकीचे देव ह्याची यथाविधि पूजा करावी. श्रीजिनेंद्र, सिद्ध, सूरि, पाठक ( उपाध्याय ) आणि साधु ह्यांची पूजा करून श्रुताची पूजा करावी. मग पुण्याहवाचनाचें पठण करावें.

चक्रत्रयं दक्षिणेऽस्मिन् वामे छत्रत्रयं यजेत् ॥
पूर्णकुम्भं पुरोभागे यक्षयक्ष्यौ च पार्श्वयोः ॥ २१ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या दक्षिणेकडील बाजूला चक्रत्रयाची पूजा करावी. आणि डावेकडील बाजूला छत्रत्रयाची पूजा करावी. अग्रभागीं पूर्णकुंभाची पूजा करून त्याच्या दोहींबाजूस यक्ष आणि यक्षी ह्यांची पूजा करावी.

कुण्डस्य पूर्वभागे तु दर्भासनोऽपरेमुखः ॥
पद्मासनं समाश्रित्य पूजाद्रव्यं तु विन्यसेत् ॥ २२ ॥
होमद्रव्यप्रदानाय शिष्यवर्गं नियोजयेत् ॥
मौनं व्रतं समादाय ध्यायेच्च परमेश्वरम् ॥ २३ ॥

अर्थ— कुंडाच्या पूर्वेकडील बाजूला दर्भाचें आसन घालून त्यावर पश्चिमेकडे तोंड करून पद्मासन करून

वसावें. आणि जवळ पूजेला लागणाऱ्या वस्तु ठेवाव्यात. होमाला लागणारे पदार्थ आपल्या हातांत देण्याकरितां शिष्यांची योजना—संभव असल्यास—करावी. आपण मौनव्रत धारण करून परमेश्वराचें ध्यान करावें.

जिनेंद्रमर्घ्यदानेन परात्मानं च तर्पयेत् ॥
मध्येकुण्डं सुगन्धेन विलिखेदग्निमण्डलम् ॥ २४ ॥
सम्पूज्य होमकुण्डं तमग्निं सन्धुक्षयेत्परम् ॥
नूतनाग्निर्भवेद्योग्यो होमसन्धुक्षणे तदा ॥ २५ ॥

अर्थ— नंतर श्रीजिनेंद्राला अर्घ्यदान करून परमात्म्याचें तर्पण करावें. कुण्डाच्या मध्यभागीं सुगंधद्रव्यानें अग्निमंडल काढावें; आणि कुंडाची पूजा करावी नंतर त्या कुंडांत अग्नि प्रदीप्त करावा. अग्नि ताजा असला ह्मणजे पेटविण्याला योग्य असतो, ह्मणून अग्नि चांगला रसरशीत असावा.

दर्भपूलं पवित्रं तु रक्तवस्त्रेण वेष्टितम् ॥
तेन सञ्ज्वालयेत्कुण्डं स्वमन्त्रेण ससर्पिषा ॥ २६ ॥

अर्थ— शुद्ध अशी दर्भाची जुडी घेऊन तिला तांबडें वस्त्र गुंडाळून त्याच्या योगानें व तुपानें अग्नि प्रज्वलित करावा. त्यावेळी अग्नीचा मंत्र ह्मणावा.

तत आचम्य च प्राणायामं कुर्यात् ततः स्तुतिम् ॥
अग्नेरावाहनं कृत्वा पूजयेदष्टधाऽर्चनैः ॥ २७ ॥

अर्थ— नंतर आचमन करून प्राणायाम करावा. मग अग्नीची स्तुति करून त्याचें आवाहन करावें; आणि त्याचें अष्टधार्चन करावें. (१ जल, २ गंध, ३ अक्षता, ४ पुष्प, ५ चरु, ६ दीप, ७ धूप आणि ८ फल ह्या द्रव्यांनीं पूजन करणें ह्याला अष्टधार्चन ह्मणतात.)

गार्हपत्याग्निमादाय ज्वालयेत्तूत्तरेऽनलम् ॥
उत्तराग्निं तु संगृह्य ज्वालयेद्दक्षिणेऽनलम् ॥ २८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें अग्नीचें पूजन झाल्यावर त्या कुंडांतील थोडासा अग्नि घेऊन उत्तरेकडच्या कुंडांत घालून प्रज्वलित करावा. मग त्या कुंडांतील अग्नि घेऊन दक्षिणेकडील कुंडांत ( वर्तुलाकृति कुंडांत ) घालून प्रज्वलित करावा.

मेखलासु तिथिदेवान् ग्रहानिन्द्रांस्ततः क्रमात् ॥
पूजयेदुपरिष्टात्तु भक्त्या युक्त्या समन्त्रतः ॥ २९ ॥

अर्थ— नंतर कुंडांच्या मेखलांच्या ठिकाणी तिथिदेवता, नवग्रह, इंद्र ह्यांची पूजा क्रमानें भक्तियुक्त अंतःकरणानें युक्तीने मंत्र पठण करीत करावी.

दिक्पालान् परितः कुण्डं वेदिकायां तु तर्पयेत् ॥
कृतेषु लघुपीठेषु यथास्वं स्वदिशास्वपि ॥ १३० ॥
शाल्योदनं घृतं पक्वं नैवेद्यं रसपायसम् ॥
सिञ्चेत्क्षीरैर्घृतैर्मिश्रं दुग्धकेक्षुरसान्वितम् ॥ ३१ ॥

अर्थ— मग कुंडाच्या भोंवती वेदिकेवर अष्टदिक्पालांची पूजा करावी. त्यांचीं लहान लहान पीठें करून त्यांच्या त्यांच्या दिशेकडे त्यांची स्थापना केलेली असावी. तांदळांचा भात, तूप, शिजलेलें अन्न, उसाचा रस, दुधाची खीर ह्यांचा त्यांना नैवेद्य दाखवावा. तसेंच तो भात पाणी, तूप, दूध, उंसाचा रस ह्यांनी मिश्रित करून शिंपडावा.

स्रुक् आणि स्रुवा.

इन्धनं क्षीरवृक्षस्य स्रुक् स्रुवं चन्दनं तथा ॥
अश्वत्थस्याप्यभावेऽस्य तत्पत्रं वा नियोजयेत् ॥ ३२ ॥

अर्थ— आतां स्रुची ( होमद्रव्य ज्यांत घालून अग्नींत टाकतात तें पात्र. ) आणि स्रुवा ( तूप अग्नींत हवन करण्याचें पात्र ह्मणजे पळी. ) ह्यांचें लक्षण सांगतों. वडाच्या लांकडाची स्रुची करावी. आणि चंदनाच्या लांकडाचा स्रुवा करावा. हीं दोनीं काष्ठें मिळत नसल्यास पिंपळाच्या काष्ठाचीं दोनी पात्रें करावीं.

किंवा त्या दोनीं पात्रांबद्दल पिंपळाच्या पानांची योजना करावी.

ततः पलाशपत्रेण क्षीरक्ष्मारुहपत्रतः ॥
स्रुक्स्रुवणोथवास्तु दद्यादादावाज्याहुतिं बुधः ॥ ३३ ॥
गोपुच्छसदृशा स्रुक् च स्रुवाग्रं नासिकासमम् ॥
दैर्घ्यं द्वयोररत्निः स्यान्नाभिदण्डः षडङ्गुलः ॥ ३४ ॥

अर्थ— अथवा वर सांगितलेलें लांकूड मिळत नसल्यास पळसाच्या किंवा वडाच्या पानाची स्रुक् आणि स्रुवा हीं पात्रें तयार करावीत, त्या स्रुचीनें किंवा स्रुव्यानें तूपाची आहुती द्यावी. स्रुक् नांवाचें पात्र गायीच्या शेंपटीच्या आकाराचें–ह्मणजे लांबड तोंडाचें–करावें. आणि स्रुवा नांवाचें पात्र आपल्या नाकाच्या आकाराचें–रुंद्ट तोंडाचें–करावें. त्या पात्रांची तोंडें व मागील दांडा मिळून एक मुंडा हात लांबी असावी. त्यांत दांडा सहा बोटें लांब असावा. हें प्रमाण लाकडाची पात्रें करावयाची असल्यास समजावें.

तद्द्वयं दर्भपूलेन प्रमृज्यासेचयेज्जलैः ॥
काष्ठैः प्रताप्य तद्द्वन्द्वं ताभ्यां घृतं च होमयेत् ॥ ३५ ॥

अर्थ— तीं दोनी पात्रें होमाच्या वेळीं दर्भपूलानें ( दर्भाच्या जुडीनें ) मार्जित करून (पुसून) त्यांच्यावर उदक सिंचन करावें. आणि पात्रें अग्नीवर तापवून त्यांच्या योगानें अग्नींत घृतहोम करावा.

आग्निज्वाला तु महती तथा कुर्यात् घृताहुतिम् ॥
आधिकेऽग्नौ गवां दुग्धैः कुशाग्रैः परिषेचयेत् ॥ ३६ ॥
त्रिषु कुण्डेषु सादृश्यं कुर्याद्धोमसमानताम् ॥
गार्हपत्याहवनीयदक्षिणाग्निं क्रमाद्यजेत् ॥ ३७ ॥

अर्थ— अर्थात तुपाची जी आहुति घालावयाची ती ज्या तऱ्हेनें अग्नीची ज्वाला मोठी होईल तशा तऱ्हेनें घालावी. अग्नीची ज्वाला फारच मोठी झाल्यास त्याच्यावर दर्भाच्या अग्रानें गायीचे दूध शिंपडावें. तीनी कुंडात सारखाच होम करावा. कमीजास्ती करूं नये. त्यांत प्रथम गार्हपत्याग्नीत (चतुष्कोण कुंडांत), नंतर आहवनीय अग्नीत (त्रिकोण कुंडांत) आणि त्यानंतर दक्षिणाग्नीत (वर्तुळ कुंडांत) अशा क्रमानें होम करावा.

तर्पण

तर्पणं पीठिकामन्त्रैः कुसुमाक्षतचन्दनैः ॥
मृष्टाम्बुपूर्णपाणिभ्यां कुर्वन्तु परमेष्ठिनाम् ॥ ३८ ॥

अर्थ— होम झाल्यानंतर करावयाचे तर्पण सांगतात— पीठिकामंत्रांनी (णमो अरिहंताणं वगैरे मंत्रांनी) फुलें, अक्षता, गंध आणि शुद्ध उदक हे पदार्थ अंजलीत घेऊन परमेष्ठींचे तर्पण करावें.

समिधा.

पिप्पलेन पलाशेन शम्या वा द्वादशाङ्गुलम् ॥
आर्द्रेन्धनैर्बुधः कुर्यात्समिधां होममुत्तमम् ॥ ३९ ॥

अर्थ— आतां होमास लागणाऱ्या समिधा सांगतात— पिंपळ, पळस किंवा शमी ह्यांच्या बारा बोटें लांबीच्या ओल्या समिधा घेऊन त्यानें होम करावा.

क्षीरद्रुमैर्वाऽथ पलाशमूरुहैः। सशर्कराक्षीरघृतप्लुतैः पृथक् ॥
होमेऽष्टाविंशद्भिरिमैः (?) समिन्धनै-। र्नमोऽर्हतेत्यादिभिरेव पञ्चभिः ॥ १४० ॥

अर्थ— अथवा वड किंवा पळस ह्यांच्या समिधा काढून त्या साखर, दूध, तूप ह्यांत निरनिराळ्या भिजवून "नमोऽर्हते" वगैरे पांच मंत्रांनी होम करावा. होमाच्या समिधा अठ्ठावीस असाव्यात.

वटिका

काश्मीरागुरुकर्पूरगुडगुग्गुलचन्दनैः ॥
पुष्पाक्षतजलैर्लाजामिलितैरक्षसम्मितैः ॥ ४१ ॥
जयादिदेवतामन्त्रैरग्नेराहुतिमम्बुना ॥
ब्रह्ममायादिहोमान्ते वटिकाहोममाचरेत् ॥ ४२ ॥

अर्थ— आतां होमाच्या वटिका [ गोळ्या ] सांगतात– केशर, काळा चंदन, कापूर, गूळ, गुग्गुळ, पांढरा चंदन, फुलें, अक्षता, पाणी आणि लाह्या इतके पदार्थ मिसळून वेहेड्याच्या फळाएवढ्या वटिका [ गोळ्या ] कराव्यात. आणि जयादि देवतांच्या मंत्रानें अग्नीमध्यें होम करावा. मग ब्रह्म, माया वगैरे देवतांचा जलानें होम केल्यावर वटिकाहोम करावा. ह्या ठिकाणीं जलानें जो होम करावयाचा, तो जलामध्येंच करावयाचा, असें समजावें.

अन्न.

शाल्योदनं क्षीरविचित्रभक्ष्य- । पक्वान्नसर्पिः श्रृतपायसं च ॥
सुस्वादु पक्वं कदलीफलं च । स्रुचाऽक्षमात्रं मिलितं जुहोमि ॥ ४३ ॥

अर्थ— होमाचें अन्न सांगतात— तांदळांचा भात, दूध, अनेकप्रकारचे भक्ष्य पदार्थ, शिजलेलीं अन्नें, तूप, दुधाचा खवा, पिकलेलें आणि मधुर असें केळ हे सर्व पदार्थ मिसळून वेहेड्याच्या फळायेवढें स्रुचीमध्यें घेऊन अग्नींत हवन करावें.

अन्नाभावे जुहुयात्तु तण्डुलानोषधीन् स्रुचा ॥
पयो दधि घृतं चापि शर्करां वा फलानि च ॥ ४४ ॥

अर्थ— अन्न जर नसेल तर तांदूळ, वनस्पति, दूध, दही, तूप आणि साखर हे पदार्थ किंवा फलें

स्रुचीमध्यें घेऊन होम करावा.

उत्तानेन तु हस्तेन त्वङ्गुष्ठाग्रेण पीडिते ( ? ) ॥
संहिताङ्गुलिपाणिस्तु मन्त्रतो जुहुयाद्धविः ॥ ४५ ॥

अर्थ— होम करावयाच्या वेळीं हात उत्ताणा असावा; आणि बोटांवर अंगठा दाबावा, तसेंच हाताचीं बोटें एकमेकांना चिकटलेलीं असवींत. ह्याप्रमाणें करून मंत्र ह्मणून होम करावा.

दिक्पालास कोरान्नाहुति.

प्रस्थप्रमाणचणकाढकमापमुद्ग- । गोधूमशालियवमिश्रितसप्तधान्यैः ॥
होमे पृथग्विधृतमुष्टिभिरग्निकुण्डे । वारांश्च सप्त विषमग्रहदोपशान्त्यै ॥ ४६ ॥

अर्थ— एक शेर हरभरे, आणि उडीद, मूग, गहूं, भात, जव आणि तीळ ( हे श्लोकांत नाहीत. परंतु त्यांवांचून सात धान्यें होत नाहींत, ह्मणून लिहिले आहेत ) हीं सर्व धान्यें मिळून एक पायली, ह्याप्रमाणें सर्व मिसळून, एकेक मूठ निरनिराळीं घेऊन, अग्निकुंडांत—प्रत्येक दिक्पालाबद्दल सात सात वेळ असा—होम केला असतां दिक्पालांची शांति होत्ये. आणि दुष्टस्थानीं असलेल्या ग्रहांच्या उद्देशानें होम केला असतां त्यांपासून होणारी पीडा दूर होते. ह्या होमाला कोरान्नाहुति असें ह्मणतात.

नवग्रह होम

हुत्वा स्वमन्त्रचितमम्बुनि सससस- । मुष्टिप्रमाणतिलशालियवप्रसक्तिम् ॥
नीत्वा घृतप्लुतसमिद्भिरथाग्निकुण्डे । एकादशस्थवदवन्तु सदा ग्रहा वः ॥ ४७ ॥

अर्थ— नवग्रहशांतीचा विशेष प्रकार असा आहे कीं– त्या ग्रहाच्या मंत्रानें भांड्यांत पाणी सांठवून त्यांत तीळ, भात, जव वगैरे धान्याचें प्रत्येक ग्रहाच्या उद्देशानें सात सात वेळां हवन करावें. आणि हीं धान्यें व घृतयुक्त समिधा ह्यांचें हवन अग्निकुंडांत करावें. असें केलें असतां सर्व ग्रह तुम्हाला एकादशस्थानीं असल्याप्रमाणें सुख देतील.

अर्कैः पलाशैः खदिरैर्मयूरै- । र्बोधिद्रुमैः फल्गुशमीसमिद्भिः ॥
दुर्वाकुशाभ्यां क्रमशो ग्रहाणां । सूर्यादिकानां जुहुयात्प्रशान्त्यै ॥ ४९ ॥

अर्थ— रुई, पळस, खदिर, ( खैर, ) अघाडा, पिंपळ, काळा उंबर, शमी, ह्यांच्या समिधा आणि दुर्वा व दर्भ ह्यांच्या योगानें क्रमानें सूर्यादिनवग्रहांचें हवन केलें असतां ( सूर्याच्या शांतीकरितां रुईच्या समिधा, चंद्राच्या शांतीकरितां पळसाच्या समिधा ह्याप्रमाणें क्रमानें त्या त्या ग्रहाच्या शांतीकरितां हवन केलें असतां ) सूर्यादिनवग्रहांची शांति होते.

अर्केण नश्यति व्याधिः पलाशः कामितप्रदः ॥
खदिरश्चार्थलाभश्च अपामार्गोऽरिनाशकः ॥ ५० ॥

अश्वत्थेन हरेद्रोगं दर्भोदुम्बरभाग्यदः ॥
शमी च पापनाशाय दूर्वा चायुःप्रवर्द्धिनी ॥ ५१ ॥

अर्थ— रुईच्या समिधांनी होम केला असतां व्याधीचा नाश होतो. पळसाच्या समिधांनी इष्टप्राप्ति होते. खैरानें द्रव्यलाभ होतो. अघाड्यानें शत्रूचा नाश होतो. पिंपळाच्या समिधांनीं रोगांचें हरण होतें. दर्भ आणि उंबर ह्याच्या समिधांनीं भाग्य येतें. शमीच्या समिधांनीं पातकाचा नाश होतो. आणि दूर्वांच्या हवनानें आयुष्य वाढतें. असें ह्या समिधांचें फळ आहे.

धौतादिवर्णं प्रमुखादिवर्णं । काञ्चीदुकूलं नखच्छिद्रहस्तम् ॥
देवाङ्गवस्त्रोज्वलकुन्दग्रीमं । आच्छादनं यज्ञगृहेषु सर्वम् ॥ ५२ ॥ (?)

यदि कुण्डास्त्रयः सन्ति तदा सर्वं समीहितम् ॥
पृथगष्टशतं होम्यं आज्यान्नकुसुमं समित् ॥ ५३ ॥

अर्थ— जर अग्निकुंडें तीन असतील तर सर्व कर्म यथास्थित होतेंच आहे. त्या कुंडांत तूप, अन्न, फुलें आणि समिधा ह्या प्रत्येक द्रव्याचा एकशेहे आठ वेळ होम करावा.

एकमेव यदा कुण्डं गार्हपत्ये चतुरस्त्रके ॥
सर्वा अप्याहुतीः कुर्यात्पृथगष्टोत्तरं शतम् ॥ ५४ ॥

अर्थ— आणि जर एकच कुंड असेल, तर त्या चतुष्कोण कुंडांत गार्हपत्याग्नींतच सर्व आहुती निरनिराळ्या एकशेंहे आठ वेळां द्याव्यात.

अन्नं समिल्लवङ्गापोऽञ्जलिचतुर्विधेषु च ॥
होमेषु यत्नतः कुर्यान्मध्ये मध्ये घृताहुतिम् ॥ ५५ ॥
कुर्यात्पूर्णाहुतिं चान्त्ये ग्रहस्तोत्रं तथा पठेत् ॥
त्रिःपरीत्य नमस्कारं महावाद्यसमन्वितम् ॥ ५६ ॥
तस्माद्भस्म समादाय पवित्रं पापनाशनम् ॥
धरेद्भालादिदेशेषु तिलकं कारयेद्बुधः ॥ ५७ ॥

अर्थ— अन्न, समिधा, लवंगा, उदक ह्या चार प्रकारच्याही होमांत प्रत्येक द्रव्याचा होम संपल्यावर अग्नीत तुपाची आहुति द्यावी. सर्व होम समाप्त झाल्यावर शेवटीं पूर्णाहुति (तुपाची धार मध्यें न तुटेल अशा रीतीनें अग्नीत सारखी सोडणें) द्यावी. ग्रहांचें स्तोत्र ह्मणावें. मग महावाद्यांचा घोष चालला असतां अग्नीला तीन प्रदक्षिणा कराव्यात. अग्नीतील भस्म पवित्र आणि पापनाशक असतें, ह्मणून तें घेऊन कपाळ वगैरे स्थानाला लावावें.

विशेषविधि.

सत्वचः समिधः कार्या ऋज्व्यः श्लाघ्याः समास्तथा ॥
शस्ता दशाङ्गुलास्ताः स्युर्द्वादशाङ्गुलकाश्च वा ॥ ५८ ॥
षण्मासं स्याच्छमी ग्राह्या खादिरं तु त्रिमासिकम् ॥
मासत्रयं तु पालाशी अश्वत्थोऽहरहस्स्मृतः ॥ ५९ ॥
दिनमेकमपामार्गो ग्राह्यश्चार्कस्तथैव च ॥
वटादयोऽपि ग्राह्याः स्युस्त्रिदिनं स्यादुदुम्बरः ॥ १६० ॥
एतेषामप्यभावे तु कुशा इत्यपरे विदुः ॥
मासमेकं कुशो ग्राह्यो दूर्वा स्यात्सद्य एव च ॥ ६१ ॥

अर्थ— कांहीं विशेष नियम सांगतात– समिधा सालीसह असून त्या सरळ आणि एकसारख्या असाव्यात. त्या दहा अंगुलें किंवा बारा अंगुलें लांबीच्या असाव्यात. शमीच्या समिधा काढलेल्या दिवसापासून सहा महिनेपर्यंत होमाच्या उपयोगीं पडतात. खैराच्या समिधा तीन महिने उपयोगीं पडतात. पळसाच्या समिधा तीन महिने उपयोगीं पडतात. पिंपळाच्या समिधा रोजच्यारोज नव्या असाव्यात. अघाड्याच्या समिधा एक दिवसाच्या असल्यास ग्राह्य होतात. रुईच्या समिधाही त्याचप्रमाणें एक दिवसाच्या शिळ्या असल्यास ग्राह्य होत. वड, उंबर वगैरेच्या समिधा तीन दिवस ग्राह्य होत. ह्या समिधा

जर न मिळतील तर त्यांच्या ऐवजीं दर्भ घ्यावेत, असें दुसरे कित्येक पंडित समजतात. दर्भ काढलेल्या दिवसापासून एक महिनापर्यंत ग्राह्य होत. दूर्वा मात्र त्याच वेळीं काढलेल्या होमास घ्याव्यात.

कोद्रवं चणकं माषं मसूरं च कुलित्थकम् ॥
कांजिपक्कं परान्नं च वैश्वदेवे तु वर्जयेत् ॥ ६२ ॥

अर्थ— कोद्रव ( हरीक नावाचें धान्य ), हरभरे, उडीद, मसूरा, कुळथ्या, कांजींत शिजविलेलें अन्न आणि दुसऱ्याचें अन्न हे पदार्थ वैश्वदेवकर्मांत वर्ज्य करावेत.

प्रतिष्ठादिमहत्कार्ये कुर्यादेवं सविस्तरम् ॥
नित्यकर्मणि संक्षेपात्तत्सर्वं विधिपूर्वकम् ॥ ६३ ॥

अर्थ— बिंबप्रतिष्ठा वगैरे मोठ्या कर्मांत हा सर्व विधि वर सांगितल्याप्रमाणें सविस्तर करावा. आणि नित्यकर्मांत संक्षेपानें सर्व यथाविधि करावे.

होमाचे प्रकार.

होमस्तु त्रिविधो ज्ञेयो गृहिणां शान्तिकारकः ॥
पानीयवालुकाकुण्डभेदाद्रम्यः स्वशक्तितः ॥ ६४ ॥

अर्थ— गृही श्रावकानें करावयाचा शांतिक होम जलहोम, वालुकाहोम आणि कुंडहोम ( अग्निहोम )

असा तीन प्रकारचा आहे. तो त्यानें आपल्या, शक्तीप्रमाणें दिसण्यांत सुंदर दिसेल असा करावा.

जलहोम

यत्सद्वर्तुलकुण्डलक्षणमिदं श्रीवारिहोमे जिनैः ।
प्रोक्तं ताम्रमृदादिवस्तुरचिते कुण्डे समारोपितम् ॥
कुर्याच्छ्रीतिथिदेवता ग्रहसुराः शेपाश्च सन्तर्प्यताम् ।
शान्त्यर्थं जलहोममिष्टममलं दुष्टग्रहाणां बुधः ॥ ६५ ॥

अर्थ— जलहोमाच्या उद्देशानें श्रीजिनेंद्रांनीं कुंडाचें जें हें वर्तुलाकार लक्षण सांगितलें आहे, तें तांबें, माती वगैरेंनीं केलेल्या कुंडाच्या ठिकाणीं जुळवावें. ह्मणजे माती, तांबें, वगैरे वस्तूंचें जलहोमाकरितां वर्तुलाकार कुंड करावें. आणि त्या कुंडांत तिथिदेवता, सूर्यादिग्रह, आणि बाकीचे देव ह्यांच्या संतोषाकरितां जलहोम करावा.

श्रीखण्डतण्डुलस्रग्भिः सम्भूपितमलं वरम् ॥
शुद्धतीर्थोदकैः पूर्णं जलकुण्डं महामहे ॥ ६६ ॥
सन्धौतशोधितव्रीहिपुञ्जे जिनमहोत्सवे ॥
संस्थाप्य पूजकाचार्यो जलहोमं समाचरेत् ॥ ६७ ॥

अर्थ— चंदन, अक्षता, माळा ह्यांनीं अत्यंत सुशोभित आणि पवित्र अशा तीर्थोदकानें परिपूर्ण असें जल-

कुंड यज्ञांत करावें. आणि तें धुतलेल्या साळीच्या भाताच्या पुंजावर ठेवून पूजकाचार्यानें त्यांत जलहोम करावा.

सप्तधान्यैस्तु दिक्पालाँस्त्रिधान्यैस्तु नवग्रहान् ॥
पक्वान्नं नालिकेरं च यथा शक्त्यत्र होमयेत् ॥ ६८ ॥

अर्थ— सप्तधान्यांच्या योगानें दिक्पालांच्या उद्देशानें हवन करावें. आणि त्रिधान्यांच्या योगानें नवग्रहांच्या उद्देशानें होम करावा. अन्न व नारळ ह्यांचाही आपल्या शक्तीप्रमाणें होम करावा. जलहोमाला नारळांतील खोबरें काढून घालतात हें प्रसिद्ध आहे.

आचमं तर्पणं प्राणायाममत्र विधानतः ॥
अपां कुंडे विधिं कुर्यादत्रापि सर्वमञ्जसा ॥ ६९ ॥

अर्थ— आचमन, तर्पण, प्राणायाम वगैरे सर्व कर्मं ह्या जलहोमाच्या वेळीं देखील यथाविधि प्रत्यक्ष केलीं पाहिजेत.

दिक्पालाः प्रतिसेवनाकुलजगद्दोषार्हदण्डोत्कटाः ॥
सद्धर्मप्रणये नियद्धभगवत्सेवानियोगेऽपि च ॥
पूजापात्रकराग्रतःसरमुपेत्योपास्तयत्यर्चनाः ।
प्रत्यूहान्निखिलान्निरस्यत तनुस्नानोत्सवोत्साहिताः ॥ ७० ॥

अर्थ— दिक्पालांची प्रार्थना– हे दिक्पाल हो! कुमार्गानें वागण्यांत गढून गेलेल्या लोकांना त्यांच्या दोषाला योग्य अशा प्रकारचा दंड करण्याला तयार असलेले तुम्ही जिनांच्या प्रतिबिंबांना स्नान घालण्याचा हा मी जो उत्साह केला आहे त्याच्या योगानें आनंदित होऊन, आणि ज्या ज्या वेळीं मी पूजापात्र हातांत घेऊन जिनपूजेकरितां पुढें जाऊं लागेन; त्या त्या वेळीं माझ्या जवळ येऊन तुम्ही बली आणि पूजा ह्यांचें ग्रहण करून, माझ्या सद्धर्माचरणाच्या कृत्यांत आणि मी आरंभिलेल्या श्रीजिनेंद्र-पूजामहोत्सवाच्या कर्मांत येण्याऱ्या विघ्नांचा तुम्ही नाश करा!

वालुकाहोम.

सम्मार्ज्य गोमयैर्भूमिं गन्धोदकैश्च सिञ्चयेत् ॥
तटिनीवालुकास्तत्र प्रसार्य हस्तमात्रतः ॥ ७१ ॥
तदुपर्यश्वत्थैः काष्ठैः शिखराकारसञ्चयम् ॥
कुर्यादन्यैश्च काष्ठैर्वा होमकुण्डे यथा पुरा ॥ ७२ ॥
नवग्रहान् तिथिदेवान् दिक्पालान् शेषदेवकान् ॥
अग्निसन्धुक्षणं कृत्वा पूजयेदग्निनायकम् ॥ ७३ ॥
आचमं तर्पणं जाप्यं समिधा त्वादिहोमकम् ॥

कुर्याच्छेषं विधानं तु संक्षेपादग्निहोमवत् ॥ ७४ ॥

अर्थ— आतां वालुकाहोम सांगतात— गायीच्या शेणानें जमीन सारवून त्याच्यावर गंधोदकाचें सेचन करावें. मग नदीतील वाळू त्यावर एक हात लांबरुंद पसरावी. त्याच्यावर पिंपळाचीं लांकडें अथवा दुसरी लांकडें पूर्वीं होमकुंडांत रचल्याप्रमाणें शिखराच्या आकाराचीं रचावीत. मग नवग्रह, तिथिदेवता, दिक्पाळ आणि बाकीच्या देवता ह्यांचें पूजन करून, तीं लांकडें पेटवून अग्निनायकाचें पूजन करावें. अग्निहोमाप्रमाणेंच आचमन, तर्पण, जप, समिधांनी पूर्वीं करावयाचा होम, वगैरे सर्व विधि संक्षेपानें करावा.

होमाचे प्रसग.

व्रतबन्धे विवाहे वा सूतके पातके तथा ॥
जिनगेहप्रतिष्ठायां नूतनगृहनिर्मितौ ॥ ७५ ॥
ग्रहपीडादिके जाते महारोगोपशान्तिके ॥
गर्भाधानविधाने तु पित्रादिमरणे तथा ॥ ७६ ॥
कुण्डानां लक्षणं प्रोक्तं प्रागेव होमलक्षणे ॥
यथावसरमालोक्य कुर्याद्धोमविधिं बुधः ॥ ७७ ॥

अर्थ— व्रतबंध, विवाह, सूतकसमाप्ति, पातकाचें प्रायश्चित्त, जिनमंदिरप्रतिष्ठा, नवीन गृह बांधणें ह्या कृत्यांत आणि ग्रहांची पीडा होत असतां, महामारी वगैरे मोठ्या रोगांची शांति करावयाची असतां, गर्भाधान करावयाचें असतां, आणि पिता वगैरे मरण पावले असतां, होमकृत्यांत जें कुंडाचें लक्षण सांगितलें आहे त्याप्रमाणें कुंड करून कालाला अनुसरून होमविधि करावा.

होमाचें फळ.

कृते होमविधौ लोके सर्वशान्तिः प्रजायते ॥
वक्ष्येऽधुना परग्रन्थे यजमानस्य लक्षणम् ॥ ७८ ॥

अर्थ— असा होमविधि केला असतां लोकांत सर्वप्रकाराची शांति होते. आतां पुढील ग्रंथांत यजमानाचें लक्षण ( यजमान कोण असावा हें ) सांगतों.

यजमान.

यजमानस्तु मुख्योऽत्र पत्नी पुत्रश्च कन्यका ॥
ऋत्विक् शिष्यो गुरुर्भ्राता भागिनेयः सुतापतिः ॥ ७९ ॥
एतेनैव हुतं यत्तु तद्ध्रुवं स्वयमेव हि ॥
कार्यवशात्स्वयं कर्ता कर्तुं यदि न शक्यते ॥ ८० ॥

अर्थ— पूजादिविधि करणारा मुख्य जो असेल तो यजमान होय. जर कांहीं तशाच अपरिहार्य अड-चणीमुळे तो यजमान तें कृत्य करण्याला समर्थ नसेल, तर त्याच्याकरितां त्याची पत्नी, पुत्र, कन्या, ऋत्विक्, शिष्य, गुरु, बंधु, बहिणीचा मुलगा, जांवई ह्यांपैकीं कोणींतरी करावें. ह्यांनीं आपल्याकरितां जे हवन वगैरे केलें असेल तें आपण–ह्मणजे मुख्यकर्त्यानेंच–केल्याप्रमाणें होतें.

होमाचा काल.

भानौ समुदिते विप्रो जुहुयाद्धवनं तथा ॥
अनुदिते तथा प्रातर्गवां च मोचनेऽपि वा ॥ ८१ ॥
हस्तादूर्ध्वं रविर्यावद्भुवं हित्वा न गच्छति ॥
तावदेव हि कालोऽयं प्रातस्तूदितहोमिनाम् ॥ ८२ ॥

अर्थ— होमाचा काल सांगतात– सूर्य उदय पावल्यावर ब्राह्मणानें हवन करावें. किंवा सूर्योदयाच्या पूर्वीं होम करावा. अथवा गायी रानांत सोडण्याच्या वेळीं होम करावा. जे सूर्य उदय पावल्यावर होम करणारे आहेत त्यांचा काल, प्रातःकाळी सूर्य उदय पावून भूमीपासून एक हात जोंपर्यंत वर आला नाहीं, तोंपर्यंतच असतो.

प्रातर्द्वादश नाड्यस्तु सायं तु नव नाडिकाः ॥

होमकालः समुद्दिष्टो मुनिभिस्तत्त्वदृष्टिभिः ॥ ८३ ॥

अर्थ— वर सांगितलेला होमकाल मुख्यकाल होय. गौणकाल तत्त्वदर्शी मुनींनी प्रातःकालीं सूर्योदयापासून बारा घटका होईतोंपर्यंत आणि सायंकाली सूर्यास्तानंतर नऊ घटकापर्यंत सांगितला आहे.

अग्निहोत्र्याची प्रतिष्ठा.

एवं प्रतिदिनं कुर्वन्नग्नेरुपासनाविधिम् ॥
अग्निहोत्री द्विजः प्रोक्तः स विप्रैर्ब्रह्मवेदिभिः ॥ ८४ ॥
धार्मिको भूमिदेवोऽसावाहिताग्निर्द्विजोत्तमैः ॥
आर्यश्चोपासकः शिष्टः पुण्यात्मेति प्रकीर्तितः ८५ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें प्रतिदिवशीं अग्न्युपासनेचा विधि जो करतो, तो अग्निहोत्र द्विज होय. (ह्या ठिकाणीं 'द्विज' शब्द घातल्यानें अग्निहोत्रविधि त्रैवर्णिकांनीं करतां येतो असें सिद्ध होतें.) असें ब्रह्मवेत्ते विप्र ह्मणतात. असा अग्निहोत्री जो असेल, तोच धार्मिक आणि भूदेव ह्मणजे भूमीवरील देव होय. त्यालाच आहिताग्नि (ज्यानें अग्नि ठेवला आहे असा) ह्मणतात. त्रैवर्णिकामध्यें श्रेष्ठ अशा लोकांनीं ह्यालाच आर्य, उपासक, शिष्ट, पुण्यात्मा असें ह्मटलें आहे.

अग्निहोत्राचें फल.

आहिताग्निर्द्विजश्चैको यत्र ग्रामे वसत्यहो ॥
ससेतयो न तत्र स्युः शाकिनीभूतराक्षसाः ॥ ८६ ॥
व्याघ्रसिंहगजाद्याश्च पीडां कुर्वन्ति नो कदा ॥
अकाले मरणं नास्ति सर्पव्याधिभयं न च ॥ ८७ ॥
प्रजा नृपप्रधानाद्याः सर्वेऽत्र सुखिनो जनाः ॥
धनधान्यैः परिपूर्णा गोधनं तुष्टिपुष्टिदम् ॥ ८८ ॥
बहवः सन्ति ते यत्र अग्निहोत्रद्विजाः पुरे ॥
तस्य देशे क्वचिन्न स्यादाधिव्याधिप्रपीडनम् ॥ ८९ ॥
तेभ्यो दानं नृपैर्देयं यथेष्टं गोकुलादिकम् ॥
ग्रामक्षेत्रगृहामलरत्नाभरणवस्त्रकम् ॥ ९० ॥

अर्थ— आहिताग्नि एक द्विज ज्या गांवांत रहातो, त्या ठिकाणी सातही प्रकारची महाभयाचीं साधनें (अतिवृष्टि, अवर्षण, उंदीर, टोळ, राघू, स्वदेशांतील युद्ध, आणि दुसऱ्या देशांशी युद्ध) उत्पन्न होत नाहीत. शाकिनी, भुतें, राक्षस, व्याघ्र, सिंह, हत्ती वगैरे पशु, हे केव्हांही त्या ठिकाणी पीडा करीत नाहीत. त्या गांवांत कोणालाही अपमृत्यु येत नाही, सर्पाची आणि रोगांची भीति उत्पन्न होत

नाहीं. त्या गांवांतील प्रजा आणि राजा, प्रधान, वगैरे सर्व सुखी असतात. त्या ठिकाणी धन आणि धान्य विपुल असतें, आणि पहाण्यावरोबर संतोष देणाऱ्या व गांवाचें पोषण करणाऱ्या अशा गायी पुष्कळ असतात. आणि ते अग्निहोत्री द्विज पुष्कळ ज्या नगरांत असतात त्या देशांत कोठेंही काळजी आणि रोग ह्यांची पीडा होत नाहीं. असल्या अग्निहोत्री ब्राह्मणांना राजानें गायी, गांवें, क्षेत्रें, घरें, भांडी, रत्नें, अलंकार, वस्त्र ह्या वस्तू वाटतील तितक्या दान कराव्यात.

श्रीजिनपूजा.

जिनबिम्बमथानीय पूर्वं देवगृहे न्यसेत् ॥
सिध्दादीनां तु यन्त्राणि स्वस्वस्थाने निवेशयेत् ॥ ९१ ॥
जिनेन्द्रसदनद्वारे क्षेत्रपालान् समर्चयेत् ॥
मध्यदेशे तु सद्देवान् गन्धर्वांस्तत्र दक्षिणे ॥ ९२ ॥
किन्नरान्वामभागे च भूतप्रेतांश्च दक्षिणे ॥
शेषांश्च बलिदानेन तर्पयेद्वामभागतः ॥ ९३ ॥
ब्रह्मभागे तु ब्रह्माणं अष्टौ दिशाधिपान्बहिः ॥
अर्घ्यपाद्ययज्ञभागैरमृतैः प्राक्प्रतर्पयेत् ॥ ९४ ॥

अर्थ— मग ( अग्न्युपासन झाल्यावर ) जिनबिंब आणून तें प्रथम देवघरांत ठेवावें. सिध्दादिकांची यंत्रें आपापल्या ठिकाणीं ठेवावींत. जिनमंदिराच्या द्वारांत क्षेत्रपालांची पूजा करावी. पूर्वी जे आठ हात लांबीरुंदीच्या भूमीवर आठ भाग करावयास सांगितले आहेत, त्याप्रमाणें केलेल्या भागांतील मध्यभागीं श्रीजिनेंद्राचे पूजन करावें. त्याच्या दक्षिणेकडील बाजूस गंधर्वांची पूजा करावी. आणि डावीकडे किन्नरांची पूजा करावी. भूत, प्रेत, इत्यादिकांची पूजा दक्षिणेकडे करावी. आणि डाव्या अंगाला बाकीच्या देवतांना बलिदान करून त्यांचा संतोष करावा. त्या भूमींतील ब्रह्मभागांत ब्रह्मदेवाची पूजा करावी. आणि त्या भूमीच्या बाहेरच्या बाजूस आठ दिशेला आठ दिक्पालांना अर्घ्य, पाद्य, यज्ञभाग आणि उदक ह्यांच्या योगानें अगोदरच ( पूजेला आरंभ करतांना ) संतुष्ट करावें. तात्पर्य, दिक्पालांची पूजा प्रथम करून नंतर क्षेत्रपाल वगैरे वर सांगितलेल्या देवतांची पूजा करावी.

ग्रहबलि.

गृहाङ्गणे ततो गत्वा मध्यपीठे सुधाशिनाम् ॥
तत्तद्दिनाधिपस्यापि शान्त्यर्थं बलिमर्पयेत् ॥ ९५ ॥

अर्थ— नंतर घराच्या अंगणांत जाऊन अंगणाच्या मध्यभागीं देवांना आणि त्या त्या तिथीच्या देवतेला त्यांची शांति व्हावी ह्मणून बलिदान करावें.

न पश्येद्भूबलिं चिरं दत्वा गृहे बलिं द्विजः ॥
स्वयं नैवोद्धरेन्मोहादुद्धरेच्छ्रीर्विनश्यति ॥ ९६ ॥

अर्थ—हा घरांत जो बलि दिलेला असतो तो आपण फार वेळ पाहूं नये, आणि आपण स्वतः तो बलि काढून टाकूं नये. अविचारानें स्वतः काढून टाकिला असतां लक्ष्मीचा नाश होतो.

चाण्डालपतितेभ्यश्च पितृजातानशेषतः ॥
वायसेभ्यो बलिं रात्रौ नैव दद्यान्महीतले ॥ ९७ ॥
ततोऽपि सर्वभूतेभ्यो जलाञ्जलिं समर्पयेत् ॥
दशदिक्षु च पितृभ्यास्त्रिवर्णैः क्रमतः सदा ॥ ९८ ॥
ये भूताः प्रचरन्तीति पात्रे दद्याद्बलिं सुधीः ॥
इत्थं कुर्यात् द्विजो यज्ञान् दिवा नक्तं च नित्यशः ॥ ९९ ॥

अर्थ— नंतर चांडाल, पतित (भ्रष्ट झालेले जीव) पितर, (मृत झालेले आपले संबंधी) जीव आणि वायस ह्या सर्वांना भूमीवर बलिदान करावें. ह्मणजे त्यांना त्यांना उद्देशून भूमीवर थोडें अन्न टाकावें. वायसांना रात्रि बलि देऊं नये. नंतर दहा दिशांकडे सर्वभूतांच्या उद्देशानें जलांजलि दान कराव्यात. आणि पितरांनाही जलांजलि द्यावी. ह्याप्रमाणें क्रमानें नित्य करावें. मग "ये भूताः प्रचरन्ति" ह्या मंत्रानें

पात्रांत बलिदान करावें. ह्याप्रमाणें त्रैवर्णिकानें रोज दिवसां आणि रात्रीं करावें. ह्याला नित्ययज्ञ ह्मणतात.

स्त्रियाचीं कृत्यें.

गृहस्त्रिया च किं कार्यं गृहकृत्यं तदुच्यते ॥
भर्त्रा तु पूजिते देवे गृहदेवांश्च तर्पयेत् ॥ २०० ॥

अर्थ— आतां घरांत असलेल्या स्त्रीनें कोणतें गृहकृत्य करावयाचें तें सांगतों. पतीनें देवाची पूजा केल्यावर तिनें गृहदेवतांचें पूजन करावें.

चार प्रकारच्या देवता.

देवाश्चतुर्विधा ज्ञेयाः प्रथमाः सत्यदेवताः ॥
कुलदेवाः क्रियादेवाश्चतुर्था वेश्मदेवताः ॥ १ ॥
सत्यदेवाः परे पञ्च जिनेन्द्रसिद्धसूरयः
पाठकसाधुयोगीन्द्राश्चैते मोक्षस्य हेतवः ॥ २ ॥

अर्थ— देवता चार प्रकारच्या आहेत. ते असे– सत्यदेवता, कुलदेवता, क्रियादेवता आणि चवथ्या गृहदेवता ह्या होत. त्यांत जिनेंद्र, सिद्ध, सूरि, पाठक आणि योगींद्र असे साधु, हे पंच परमेष्ठी ह्या सत्यदेवता होत. ह्या देवता मोक्षसाधक आहेत.

क्रियादेवता.

छत्रचक्राग्निभेदाश्च क्रियादेवास्त्रयो मताः॥
सर्वविघ्नहराः पूज्या हव्यपक्वान्नदीपकैः ॥ ३ ॥

अर्थ— क्रियादेवता ह्या छत्र, चक्र आणि अग्नि अशा तीन प्रकारच्या आहेत. त्या सर्वविघ्नांचें हरण करणाऱ्या असल्यानें होमद्रव्य, अन्न, दीप इत्यादिकांच्या योगानें त्यांचें पूजन करावें.

कुलदेवता.

वंशे पुरातनैरिष्टा नित्यसौख्यविधायकाः ॥
चक्रेश्वर्यम्बिकापद्मा इत्यादिकुलदेवताः ॥ ४ ॥

अर्थ— आपल्या वंशांत नेहमी सुख देणाऱ्या ह्मणून पूर्वजांनी ज्यांचें पूजन केलें असेल त्या कुलदेवता समजाव्यात. त्या चक्रेश्वरी, अंबिका, पद्मावती वगैरे होत.

गृहदेवता

विश्वेश्वरीधराधीशश्रीदेवीधनदास्तथा ॥
गृहे लक्ष्मीकरा ज्ञेयाश्चतुर्धा वेश्मदेवताः ॥ ५ ॥

अर्थ— विश्वेश्वरी, धरणेंद्र, श्रीदेवी आणि कुबेर ह्या चार गृहदेवता होत. ह्या देवता घरांत

संपत्ति देणाऱ्या आहेत.

सत्यदेव

साक्षात्पुण्यस्य हेत्वर्थं मुक्त्यर्थं मुक्तिदायकाः ॥
प्रज्याः पूज्यैश्च सम्पूज्याः सत्यदेवा जिनादयः ॥ ६ ॥

अर्थ— साक्षात्पुण्य ( सम्यग्दर्शनज्ञानचारित्र ) त्याला सानीभूत असल्या कारणानें मुक्तिदायक असे आणि पूज्य अशा लोकांनीही ज्यांची पूजा केली आहे असे सत्यदेव जे जिनेंद्र वगैरे देव, ते मोक्ष प्राप्तीकरिता पूजिले पाहिजेत.

सत्क्रियादेवताः पूज्या होमे शान्त्यर्थमीश्वराः ॥
जनन्यः श्रीजिनेन्द्राणां विश्वेश्वर्य इति स्मृताः ॥ २०७ ॥
विश्वेश्वर्यः पराः पूज्याः कुलस्त्रीभिर्निकेतने ॥
अवन्ध्या जायन्ते तासां पूजनात्तु कुलस्त्रियः ॥ २०८ ॥

अर्थ— क्रिया देवता ह्या होमकर्मांत शांतीकरितां अवश्य पूजाव्यांत. कारण, त्या देवता त्या कर्माच्या मुख्य स्वामिणी असतात. जिनेंद्राच्या ज्या माता त्यांना विश्वेश्वरी म्हणतात. कुलीनस्त्रियांनीं ह्या विश्वे-

कुबेरपूजनाद्गेहे लक्ष्मीर्वसति शाश्वती ॥
धरेन्द्रपूजनात्पुत्रप्राप्तिर्भवति चोत्तमा ॥ २०९ ॥

अर्थ—कुबेराच्या पूजनानें घरात निरंतर लक्ष्मी वास करते. आणि धरणेंद्राच्या पूजनानें उत्तमपुत्राची प्राप्ति होते.

श्रीदेवीपूजनाद्गर्भास्थितो बालो न नश्यति ॥
वस्त्रैर्भूषैः फलैश्चान्नैः सम्पूज्या वेश्मदेवताः ॥ २१० ॥

अर्थ— श्रीदेवीच्या पूजनानें गर्भामध्यें असलेलें मूल नाश पावत नाहीं. म्हणून वस्त्र, भूषणें, फलें आणि अनेक प्रकारचीं पक्वान्नें ह्यांच्या योगानें ह्या गृहदेवतांचें पूजन करावें.

ज्वालिनी रोहिणी चक्रेश्वरी पद्मावती तथा ॥
कूष्माण्डिनी महाकाली कालिका च सरस्वती ॥ २११ ॥
गौरी सिध्दायनी चण्डी दुर्गा च कुलदेवताः ॥
पूजनीयाः परं भक्त्या नित्यं कल्याणमीप्सुभिः ॥ २१२ ॥

अर्थ— ज्वालिनी, रोहिणी, चक्रेश्वरी, पद्मावती, कूष्मांडिनी, महाकाली, कालिका, सरस्वती, सिध्दायनी चंडी आणि दुर्गा ह्या कुलदेवता होत. आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा करणाऱ्या मनुष्यानें ह्यांचें पूजन भक्तीनें नित्य उत्कृष्ट रीतीनें करावें.

पूज्याश्चतुर्विधा देवा धर्मार्थकाममीप्सुभिः

ईप्सितार्थप्रदा विघ्नहराश्च भाविसिद्धिदाः ॥ २१३ ॥

अर्थ– वर सांगितलेले चारही प्रकारचे देव धर्म, अर्थ आणि काम ह्या पुरुषार्थांची इच्छा करणाऱ्यांनीं पूजा करण्याला योग्य आहेत. ते देव पूजकाचे मनोरथ पूर्ण करणारे, विघ्नांचा नाश करणारे आणि भावी जी मोक्षसिद्धि तिला देणारे आहेत.

ये पूजयन्ति तान् देवान् तेषां गृहेषु शाश्वती ॥

लक्ष्मीर्वसति गोऽश्वादिमाहिषीसर्वसम्पदः ॥ २१४ ॥

अर्थ— जे ह्या देवांची पूजा करतात त्यांच्या घरांत निरंतर लक्ष्मी वास करते. आणि गायी, घोडे म्हशी वगैरे पशु, ह्या सर्व संपत्ति त्यांच्या घरांत सदोदित राहतात.

इह जन्मनि संक्लेशव्याधयो न कदाचन ॥

भवन्ति तस्य देवानां सामर्थ्यात्पुण्यसद्मनि ॥ १५ ॥

अर्थ— त्याच्या त्या पुण्यकारक घरांत त्या देवतांच्या सामर्थ्यामुळें त्या पूजा करणाऱ्याला ह्या जन्मांत संक्लेश आणि व्याधि ह्यांची पीडा केव्हांही होत नाहीं.

अन्त्ये सन्न्यासमादाय समाधिमरणं भवेत् ॥

स्वर्गमुक्तिप्रदं रम्यमनन्तसुखसागरम् ॥ १६ ॥

अर्थ— आणि त्याला अंतकाली स्वर्ग मोक्ष ह्या दोहोंची प्राप्ति करून देणारें, सर्व सुखांचा समुद्रच कीं काय! असें आणि आनंद देणारें असें सर्वसंगपरित्यागपूर्वक समाधिमरण प्राप्त होतें.

इत्येवं कथितो जिनेन्द्रवचनादाचारधर्मो मया ॥
श्रीभट्टारकसोमसेनगणिना संक्षेपतः सत्क्रियः ॥
देवाराधनहोमनित्यमहसां लक्ष्मीप्रमोदास्पदं ।
ये कुर्वन्ति नरा नरोत्तमगुणास्तेऽहो लभन्ते शिवम् ॥ १७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें मीं श्रीभट्टारक सोमसेन गणधरानें श्रीजिनेंद्राच्या वचनावरून सत्क्रियास्वरूप आचारधर्म संक्षेपानें सांगितला. देवांची उपासना, होम आणि नित्यपूजोत्सव ह्यांच्यापासून उत्पन्न होणारी संपत्ति आणि आनंद ह्यांचें मुख्यस्थान असलेला अशा ह्या धर्माचें जे लोक आचरण करतात, ते सर्वांत श्रेष्ठ असे होत्साते मोक्षाला प्राप्त होतात.

सरस्वत्याः प्रसादेन काव्यं कुर्वन्ति पण्डिताः ॥
ततः सैषा समाराध्या भक्त्या शास्त्रे सरस्वती ॥ १८ ॥

अर्थ— श्रीसरस्वती देवीच्या कृपेनें पंडित काव्य करण्यास समर्थ होत असतात. ह्मणून शास्त्रामध्यें

प्रवेश होण्याकरितां तीचेच आराधन भक्तीनें केलें पाहिजे.

ब्रह्मसूरिसुविप्रेण यदुक्तं जिनधर्मिणाम् ॥
प्रोक्तं महापुराणे वा तदेवात्र प्रकाशितम् ॥ २१९ ॥

अर्थ— ब्रह्मसूरि नांवाच्या विद्वान् आणि सदाचारसंपन्न अशा ब्राह्मणानें जिनधर्मी लोकांना उद्देशून जें सांगितलें आहे आणि महापुराणांत जें सांगितलें आहे तेंच ह्या ग्रंथांत स्पष्ट केलें आहे. अर्थात् निराळें कांहीं सांगितलेलें नाहीं.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारकथने, भट्टारकश्रीसोमसेन-
विरचिते गृहकर्मदेवतापूजानिरूपणीयो नाम
चतुर्थोऽध्यायः समाप्तः ॥ श्रीरस्तु ॥

॥ श्रीवीतरागाय नम ॥

## ॥ पंचमोऽध्यायः ॥

वासुपूज्यं जगत्पूज्यं लोकालोकप्रकाशकम् ॥
नत्वा वक्ष्येऽत्र पूजानां मन्त्रान् पूर्वपुराणतः ॥ १ ॥

अर्थ— लोक आणि अलोक ह्यांचें स्पष्ट ज्ञान करून देणाऱ्या, जगत्पूज्य अशा भगवान् वासुपूज्यजिनेंद्राला वंदन करून पूर्व पुराणाला अनुसरून पूजेचे मंत्र ह्या अध्यायांत सांगतों.

सन्ध्यास्थानात्स्वगेहस्य ईशान्यां प्रविकल्पिते ॥
जिनागारे व्रजेद्धीमानीर्यापथविशुद्धितः ॥ २ ॥
पादौ प्रक्षाल्य गेहस्य कपाटं समुद्धाटयेत् ॥
मुखवस्त्रं परित्यज्य जिनास्यमवलोकयेत् ॥ ३ ॥

अर्थ— श्रावकानें ईर्यापथशुद्धि करून संध्या करीत असलेल्या स्थानापासून निघावें. आणि आपल्या घराच्या ईशान्यदिशेला केलेल्या जिनमंदिरांत जावें. मंदिराजवळ गेल्यावर त्यानें आपले पाय स्वच्छ धुवून मंदिराचें द्वार उघडावें. आणि जिनबिंबाचें मुखवस्त्र काढून टाकून श्रीजिनाचें मुख अवलोकन करावें.

कपाटोद्घाटन

ॐ ह्रॉं अर्हं कपाटमुद्घाटयामि स्वाहा ॥ कपाटोद्घाटनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रॉं' इत्यादि मंत्र ह्मणून मंदिराचें द्वार उघडावें.

द्वारपालानुज्ञापन

ॐ ह्रीं अर्हं द्वारपालमनुज्ञापयामि स्वाहा ॥ द्वारपालानुज्ञापनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रॉं" इत्यादि मंत्रानें द्वारपालाची आज्ञा घ्यावी.

ॐ ह्रॉं अर्हं निःसही ३ रत्नत्रयपुरस्सराय विद्यामण्डलनिवेशनाय समयाय निस्सही जिनालयं प्रविशामि स्वाहा ॥ अन्तःप्रवेशनमन्त्र ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें जिनमंदिरांत प्रवेश करावा.

ईर्यापथशोधन

ईर्यापथे प्रचलताऽद्य मया प्रमादा- । देकेन्द्रियप्रमुखजीवनिकायबाधा ॥
निर्वर्तिता यदि भवेदयुगान्तरेक्षा । मिथ्या तदस्तु दुरितं गुरुभक्तितो मे ॥ ४ ॥
ईर्यापथशोधनम् ॥

अर्थ— 'ईर्यापथे' इत्यादि मंत्र ह्मणून ईर्यापथशोधन करावें. ह्या वरील श्लोकाचा अर्थ असा-

मार्गानें चालत असलेल्या माझ्याकडून आज चुकीनें एकेंद्रिय वगैरे जीवनिकायाला जर पीडा झाली असेल, किंवा एका युगापेक्षां ( चार हातापेक्षां ) अधिक माझी दृष्टी गेली असेल तर तें सर्व माझें पातक पंच गुरूंच्या भक्तीनें मिथ्या होवो!

मुखवस्त्रोद्घाटन

क्वणत्कनकघाण्टिकं विमलचीनपट्टोज्वलं।
बहुप्रकटवर्णकं कुशलशिल्पिभिर्निर्मितम् ॥
जिनेन्द्रचरणाम्बुजद्वयं समर्चनीयं मया ॥
समस्तदुरितापहृद्वदनवस्त्रमुद्धाट्यते ॥ ५ ॥

ॐ ह्रीं मुखवस्त्रमुद्धाटयामि स्वाहा ॥ मुखवस्त्रोद्धाटनम् ॥

अर्थ— ज्यांत असलेल्या सुवर्णाच्या घागऱ्या शब्द करीत आहेत, जें स्वच्छ अशा चीन देशांतील वस्त्रानें सुंदर दिसत आहे, ज्यावरील अनेक वर्ण स्पष्ट दिसत आहेत, जें कुशल अशा कारागिरांनीं तयार केलें आहे आणि जें सर्व पातकांचा नाश करणारें आहे असें श्रीजिनेंद्राचें चरणकमल मला पूजावयाचें आहे; म्हणून त्यावरील वस्त्र काढतों. हा श्लोक म्हणून "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें देवाच्या अंगावरील मुखवस्त्र काढावें.

श्रीमुखावलोकन

श्रीमुखालोकनादेव श्रीमुखालोकनं भवेत् ॥
आलोकनविहीनस्य तत्सुखावाप्तयः कुतः ॥ ६ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राचें मुखावलोकन केलें ह्मणजेच लक्ष्मीचें मुख पहावयास मिळतें, ह्मणजे संपत्ति प्राप्त होतें ह्मणून तें मुखावलोकन ज्यानें केलें नाहीं त्याला त्या सुखाची प्राप्ति कशी होणार? व्हावयाची नाहीं.

ॐ ह्रीँ अर्हं नमोऽर्हत्परमेष्ठिभ्यः श्रीमुखावलोकनेन मम सर्वशान्तिर्भवतु स्वाहा ॥
श्रीमुखावलोकनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें अर्हत्परमेष्ठीचें (प्रतिबिंबाचें) मुखावलोकन करावें.

यागभूमिप्रवेश.

ॐ ह्रीँ अर्हं यागोर्वीं प्रविशामि स्वाहा ॥ यागभूमिप्रवेशनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें यागभूमीत (पूजा करण्याच्या जागेंत) प्रवेश करावा.

पुष्पांजलि

ॐ ह्रीँ क्ष्वीँ भूः स्वाहा ॥ पुष्पाञ्जलिः ॥

अर्थ— ह्या मंत्रानें जिनचरणावर पुष्पांजलि द्यावी.

वाद्यघोष.

ॐ ह्रीँ वाद्यमुद्घोषयामि स्वाहा ॥ तदाप्रभृति बहिर्वाद्यघोषणम् ॥

अर्थ— तेव्हांपासून बाहेर वाद्यें वाजविण्यास आरंभ करावा.

ॐ ह्रीँ अर्हं वास्तुदेवाय इदमर्घ्यं पाद्यं गन्धं पुष्पं दीपं धूपं चरुं बलिं स्वस्तिकमक्षतं यज्ञभागं यजामहे प्रतिगृह्यतां प्रतिगृह्यतां प्रतिगृह्यतामिति स्वाहा ॥

यस्यार्थं क्रियते कर्म स प्रीतो नित्यमस्तु मे ॥
शान्तिकं पौष्टिकं चैव सर्वकार्येषु सिद्धिदः ॥ ७ ॥

अर्थ— "ॐ ह्रीँ अर्हं" ह्या मंत्रानें वास्तुदेवतेला अर्घ्य, पाद्य वगैरे द्यावेत. नंतर "यस्यार्थं" हा श्लोक ह्मणावा. त्याचा अर्थ असा–ज्या देवतेकरितां मी हें शांतिक किंवा पौष्टिक कर्म करीत आहे ती देवता नेहमी माझ्यावर संतुष्ट असो. आणि माझ्या सर्व कर्मांत सिद्धि देवो!

भूमिशोधन

ॐ ह्रीं वायुकुमाराय सर्वविघ्नविनाशनाय महीसम्मार्जनं कुरु कुरु हूं फट् स्वाहा ॥ दर्भपूलेन यागभूमिं परितः सम्मार्जनम् ॥ पूर्वेशान्ययोर्मध्ये वायुकुमारायार्घ्यप्रदानम् ॥ एवमुत्तरत्रापि ॥

अर्थ— " ॐ ह्रीं " इत्यादिमंत्रानें यागभूमीचें संमार्जन करण्याची वायुकुमाराला प्रार्थना करून दर्भाच्या जुडीनें चोहीकडून पूजेची जागा ( जिनमंदिर ) लोटून साफ करावी. नंतर पूर्व आणि ईशान्य ह्या दोन दिशांच्या मध्यभागीं वायुकुमाराला अर्घ्यप्रदान करावें. पुढेंही ह्याप्रमाणेंच करावें.

ॐ ह्रीं मेघकुमाराय ह्रं सं वं मं झं ठं ठं क्षालनं कुरु कुरु अर्हं धरां प्रक्षाल्य भूमिशुद्धिं करोमि स्वाहा ॥ दर्भपूलोपात्तजलेन तदा भूमिं सिञ्चेत् ॥

अर्थ— " ॐ ह्रीं मेघकुमाराय " दर्भाच्या जुडीनें पाणी घेऊन भूमीवर सेचन करावें.

ॐ ह्रीं अर्हं अग्निकुमाराय भूमिं ज्वालय ज्वालय अं हं सं वं ठं यं क्षः फट् स्वाहा ॥ ज्वलद्दर्भपूलानलेन भूमिज्वालनम् ॥

अर्थ— ह्या मंत्राने दर्भाची जुडी पेटवून भूमी जाळावी.

नागसंतर्पण

ॐ ह्रीं क्रौं वौषट् षष्ठिसहस्रसंख्येभ्यो नागेभ्योऽमृताञ्जलिं प्रसिञ्चामि स्वाहा ॥ ऐशान्यां दिशि जलाञ्जलिम् ॥

अर्थ— " ॐ ह्रीं क्रौं " ह्या मंत्रानें नागांना ईशान्यदिशेकडे जलांजलि द्यावी.

क्षेत्रपालार्चन

ॐ ह्रीँ क्रौँ अत्रस्थक्षेत्रपाल आगच्छागच्छ संवौषट् इदमर्घ्यमित्यादि पूर्ववत् ॥

अर्थ— " ॐ ह्रीँ क्रौँ ह्या मंत्राने तेथील क्षेत्रपालाला अर्घ्यप्रदान करावे.

भूम्यर्चन

ॐ नीरजसे नमः । ॐ दर्पमथनाय नमः । ॐ शीलगन्धाय नमः । ॐ अक्षताय नमः । ॐ विमलाय नमः । ॐ परमसिद्धाय नमः । ॐ ज्ञानोद्योताय नमः । ॐ श्रुतधूपाय नमः । ॐ अभीष्टफलदाय नमः ॥ जलैर्गन्धदर्भादिभिश्च भूम्यर्चनम् ॥

अर्थ— ' ॐ नीरजसे नमः ' इत्यादि मंत्रानें जल, गंध, दर्भ इत्यादिकांच्या योगानें भूमीचें पूजन करावें.

यन्त्रोद्धार

कर्णिकामध्येऽर्हदादयोऽष्टौ । ततोऽष्टदले जयाद्यष्टौ । ततः षोडशदलेषु षोडशविद्यादेवताः । चतुर्विंशतिदलेषु चतुर्विंशतियक्षीदेवताः । ततो द्वात्रिंशद्दलेषु शक्राः । ततो वज्राग्रे चतुर्विंशतियक्षदेवताः । ततो दिक्पाला दश । ततो नवग्रहाः । ततोऽनावृतयक्षाः । एवं यन्त्रोद्धारः ॥

अर्थ— आतां यंत्राची रचना सांगतात— हे यंत्र कमलाकार आहे. त्याच्या मध्यभागी असलेल्या कर्णिकेत " अर्हत " वगैरे आठ लिहावेत. त्या कर्णिकेच्या भोवत्याने आठ दले काढून त्यांत जयादि आठ

देवता लिहाव्यात. त्याच्या पुढे सोळा दलें काढून त्यांत सोळा विद्यादेवता लिहाव्यात. त्यांच्या पुढे चोवीस दलें काढून चोवीस यक्षीदेवता त्यांत लिहाव्यात. त्यांच्या पुढे बत्तीस दलें काढून त्यांत बत्तीस इंद्र लिहावेत. त्याच्या पुढे वज्राकृति काढून त्या वज्राच्या अग्रभागी चोवीस यक्षदेवता लिहाव्यात. त्याच्या पुढें दहा दिक्पाल नवग्रह हे लिहून, त्याच्या पुढे अनावृत यक्षदेवता लिहाव्यात. ह्याप्रमाणे यंत्ररचना करावी.

दर्भासन.

तद्दक्षिणभागे— ॐ ह्रीँ अर्हँ क्ष्मौँ ठ ठ दर्भासनं निक्षिपामि स्वाहा ॥ दर्भासनस्थापनम् ॥

अर्थ— त्या यंत्राच्या दक्षिणेकडील बाजूला “ ॐ ह्रीँ ” इत्यादि मंत्रानें दर्भासन घालावें.

ॐ ह्रीँ अर्हँ निस्सही हूं फट् दर्भासने उपविशामि स्वाहा ॥ दर्भासने उपवेशनम् ॥

अर्थ— ‘ ॐ ह्रीँ अर्हँ ’ इत्यादि मंत्रानें त्या दर्भासनावर बसावें.

मौनधारण.

ॐ ह्रीँ अर्हँ ह्रूं मौनस्थितायाहं मौनव्रतं गृह्णामि स्वाहा ॥ मौनग्रहणम् ॥

अर्थ— “ ॐ ह्रीँ ” इत्यादि मंत्रानें मौनग्रहण करावें.

अगशोधन.

ॐ ह्रीं अर्हं भूः प्रतिपद्ये भुवः प्रतिपद्ये चतुर्विंशतितीर्थकृच्चरणशरणं प्रतिपद्ये ममाङ्गानि शोधयामि स्वाहा ॥ वस्त्राञ्चलेन स्वाङ्गस्य शोधनम् ॥

अर्थ— ‘ ॐ ह्रीं ” इत्यादि मंत्राने वस्त्राच्या पदराने आपलें शरीर शुद्ध करावें.

हस्तप्रक्षालन.

ॐ ह्रीं अर्हं असुज्जुरभव तथा हस्तौ प्रक्षालयामि स्वाहा । हस्तद्वयपवित्रीकरणम् ॥

अर्थ— ‘ ॐ ह्रीं ’ इत्यादि मंत्राने दोनी हात धुवून शुद्ध करावेत.

पुजापात्रशुद्धि

ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः नमोऽर्हते भगवते श्रीमते पवित्रजलेन पात्रशुद्धिं करोमि स्वाहा ॥ पात्रेषु पूजांगद्रव्यस्थापनम् ॥

अर्थ— ‘ ॐ ह्रीं ” इत्यादि मंत्रानें सर्व पूजापात्रांवर शुद्ध जलानें प्रोक्षण करून निरनिराळ्या पात्रांतून पूजेला लागणाऱ्या वस्तु निरनिराळ्या ठेवाव्यात.

पूजाद्रव्यशुद्धि

ॐ ह्री अर्हं झ्रौं झ्रौं वं मं हं सं तं पं झ्वीं क्ष्वीं हं सं अ सि आ उ सा

समस्तजलेन शुद्धपात्रे निक्षिप्तपुष्पादिपूजाद्रव्याणि शोधयामि स्वाहा ॥
पूजाद्रव्यशोधनम् ॥

अर्थ— "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें पूजेच्या सामग्रीवर जलप्रोक्षण करावें.

विद्यागुरुपूजन

ॐ ह्रीं अर्हं आग्नेय्यां दिशि अस्मद्विद्यागुरुभ्यो बलिं ददामि स्वाहा ॥
विद्यागुरुपूजनम् ॥

अर्थ— "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्राने विद्यागुरूला बलिदान करावें.

सिद्धार्चन.

ॐ ह्रीं सिद्धपरमेष्ठिभ्योऽर्घ्यं समर्पयामि स्वाहा ॥ सिद्धायार्घ्यनिवेदनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं' इत्यादि मंत्रानें सिद्धपरमेष्ठीना अर्घ्यदान करावें.

॥ सकलीकरणम् ॥

अग्निमण्डलमध्यस्थै रेफैर्ज्वालाशताकुलैः ॥
सर्वाङ्गदेशजैर्ध्यात्वा ध्यानदग्धवपुर्मलम् ॥ १ ॥

दर्भासने स्थित्वा ध्यायन्निदं पठेत् । ॐ ह्रीं अर्हं भगवतो जिनभास्करस्य बोधस-

हस्रकिरणैर्मम कर्मेन्धनस्य द्रव्यं शोषयामि घे घे स्वाहा ॥ इत्युच्चार्य कर्मेन्धनानि शोषयेत् ॥ शोषणम् ॥

अर्थ— अग्निमंडलाच्या मध्यभागी असणारे व शेकडो ज्वालांनीं व्याप्त झालेले जे रेफ, ते आपल्या शरीरापासून उत्पन्न होऊन आपल्या शरीरांत असलेला सर्व मल (पाप) त्यांनी जळला आहे असें ध्यान करावें. दर्भासनावर वसून ह्याप्रमाणें ध्यान करून "ॐ ह्रीँ" इत्यादि मंत्र ह्मणावा. आणि कर्मरूपी इंधन शुष्क करावें.

ॐ ह्रॉं ह्रीँ ह्रूँ ह्रैँ ह्रः ॐ ॐ ॐ ॐ रं रं रं रं ह्म्ल्व्र्य्यूँ सं दह दह कर्ममलं दह दह दुःखे घे घे स्वाहा ॥ इत्युच्चार्य कर्मेन्धनानि दग्धानीति स्मरेत् ॥

अर्थ— ॐ ह्राँ इत्यादि मंत्राचा उच्चार करून कर्मेंधन जळून गेलें असें चिंतन करावें.

ॐ ह्रीँ अर्हं श्रीजिनप्रभुजिनाय कर्मभस्मविधूननं कुरु कुरु स्वाहा ॥ इत्युच्चार्य तद्भस्मानि विधूतानि स्मरेत् ॥

अर्थ— ॐ ह्रीँ इत्यादि मंत्राचा उच्चार करून कर्मेंधनाचें झालेलें भस्म उडून गेलें असें चिंतन करावें.

प्लावनम् । ततः पञ्चगुरुमुद्राग्रे अ सि आ उ सा इत्येतान् तदुपरि झं वं ह्रः पः हः इत्यमृतबीजानि निक्षिप्य तन्मुद्रां शिरस्यधोमुखमुद्धृत्य—ॐ अमृते अमृतोद्भवे

अमृतवर्षिणि अमृतं स्रावय स्रावय सं सं क्लीँ क्लीँ ब्लूँ ब्लूँ द्राँ द्राँ द्रीँ द्रीँ द्रावय द्रावय स्वाहा—इत्युच्चार्य ततः स्रवत्पीयूषधाराभिरात्मानं स्नापयेत् ॥ आभिषवणम् ॥

अर्थ— नंतर पंचगुरुमुद्रा करून त्यावर क्रमाने 'अ सि आ उ सा' हीं पांच अक्षरे ठेवून (ठेविलीं आहेत अशी कल्पना करून) त्या अक्षरांवर क्रमाने "झं वं ह्वः पः हः" ही अमृतबीजे ठेवावीत. (अमृतबीजें ठेविली आहेत अशी कल्पना करावी). मग ती मुद्रा आपल्या मस्तकावर अधोमुख धारण करून "ॐ अमृते" इत्यादि मंत्र ह्मणावा. आणि त्या पंचपरमेष्ठिमुद्रेंतून स्रवणाऱ्या अमृतधारांनी आपल्याला स्नान घातले आहे अशी कल्पना करावी. ह्याला "अभिषवण ह्म० स्नान" म्हणतात.

एवं त्रिधा विशुद्धः सन् करन्यासं विदध्यात् ॥
हस्तद्वयकनीयस्याद्यङ्गुलीनां यथाक्रमम् ॥
मूले रेखात्रयस्योर्ध्वमग्रे च युगपत्सुधीः ॥ १ ॥

इति पञ्चनमस्कारान् विन्यस्य। ॐ ह्रीँ अर्हं वं मं हं सं तं पं अ सि आ उ सा हस्तसम्पुटं करोमि स्वाहा ॥ इति हस्तौ सम्पुटेत् ॥ इति करन्यासः ॥

अर्थ— वर सांगितल्याप्रमाणें अभिषवणविधि तीन वेळां करून शुद्ध होऊन करन्यास (हातावर अर्हतादि देवतांचें स्थापन) करावे. ते असें— दोनी हातांच्या कनिष्ठिका (शेवटचें बोट) वगैरे बोटांच्या मुळांशी

ज्या तीन रेषा असतात (ह्या रेषा तळहात आणि बोट ह्यांच्या संधीत असतात) त्यांवर, त्या रेषांच्या वरती (पहिल्या पेऱ्यावर) आणि बोटांच्या शेंड्याला अशा तीन ठिकाणी (ही ठिकाणें प्रत्येक बोटाची तीन तीन मिळून पंधरा होतात) क्रमानें पंचनमस्कार मंत्राचा न्यास करावा. तो पाचही बोटावर एकदम करावा. ह्मणजे प्रथम पाचही बोटांच्या मुळाशी असलेल्या तीन रेखावर पंचनमस्कार मंत्राचा न्यास करावा. नंतर त्यावरील पेऱ्यावर करावा. आणि नंतर सर्व बोटाच्या अग्रांवर करावा. ह्याप्रमाणे झाल्यावर "ॐ ह्रीं अर्हं" इत्यादि मंत्रानें दोनी हात नमस्कार करतांना आपण जसे जोडतो त्याप्रमाणे जोडावेत. ह्यास "करन्यास" ह्मणतात.

ततोऽङ्गुष्ठयुग्मेनैव स्वाङ्गन्यासं कुर्यात् ॥ ॐ ह्रां णमो अरिहंताणं स्वाहा । इति मन्त्रं हृदि ॥ ॐ ह्रीं णमो सिद्धाण स्वाहा । ललाटे ॥ ॐ ह्रूं णमो आयरियाणं स्वाहा । दक्षिणकर्णे ॥ ॐ ह्रौं णमो उवज्झायाणं स्वाहा । पश्चिमे ॥ ॐ ह्रः णमो लोए सव्वसाहूणं स्वाहा । वामकर्णे ॥ ॐ ह्रां णमो अरिहंताणं स्वाहा ॥ शिरोमध्ये ॥ ॐ ह्रीं णमो सिद्धाणं स्वाहा । शिरोऽग्रयभागे ॥ ॐ ह्रूं णमो आयरियाणं स्वाहा । नैर्ऋत्ये ॥ ॐ ह्रौं णमो उवज्झायाणं स्वाहा । शिरोवायव्याम् ॥ ॐ ह्रः णमो लोए सव्वसाहूणं स्वाहा । शिर ईशान्ये ॥ इति द्वितीयन्यासः ॥

अर्थ— नंतर एकमेकाला जुळलेल्या हातांच्या अंगठ्यांनी पुढील न्यास करावा. तें असें—‘ॐ ऱ्हॉ’ इत्यादि मंत्रानें दोनी अंगठ्यांनी एकदम हृदयाला स्पर्श करावा. (पुढेंही ह्याप्रमाणेच दोनी अंगठ्यांनी स्पर्श करावा.) “ॐ ऱ्हीँ” इत्यादि मंत्राने कपाळाला स्पर्श करावा. “ॐ ऱ्हूँ” इत्यादि मंत्रानें उजव्या कानाला स्पर्श करावा “ॐ ऱ्हौं” इत्यादि मंत्रानें मस्तकाच्या मागील बाजूस स्पर्श करावा. “ॐ ऱ्हः” इत्यादि मंत्राने डाव्या कानाला स्पर्श करावा. हा प्रथम न्यास झाला. पुनः “ॐ ऱ्हां” इत्यादि मंत्रानें मस्तकाच्या मध्यभागी जुळलेल्या दोनी अंगठ्यांनी स्पर्श करावा. “ॐ ऱ्हीं” इत्यादि मंत्रानें मस्तकाच्या आग्नेयभागी स्पर्श करावा. “ॐ ऱ्हूँ” इत्यादि मंत्राने मस्तकाच्या नैर्ऋत्यभागी स्पर्श करावा “ॐ ऱ्हौं” इत्यादि मंत्राने मस्तकाच्या वायव्यभागी स्पर्श करावा. “ॐ ऱ्हः” इत्यादि मंत्राने मस्तकाच्या ईशान्यभागी स्पर्श करावा. हा दुसरा न्यास होय.

ॐ ऱ्हॉ णमो अरिहंताणं स्वाहा ' दक्षिणे भुजे ॥ ॐ ऱ्हीं णमो सिद्धाणं स्वाहा ॥ वामभुजे ॥ ॐ ऱ्हूँ णमो आयरियाणं स्वाहा । नाभौ ॥ ॐ ऱ्हौं णमो उवज्झायाणं स्वाहा । दक्षिण कुक्षौ ॥ ॐ ऱ्हः णमो लोए सव्वसाहूणं स्वाहा । वामकुक्षौ ॥ इति तृतीयोऽङ्गन्यासः ॥ इत्यङ्गन्यासभेदाः ॥

अर्थ— तसेच हात जोडलेले असताना “ॐ ऱ्हॉ” इत्यादि मंत्रानें उजव्या हाताच्या दंडास स्पर्श

करावा. " ॐ ऱ्हीं " इत्यादि मंत्रानें डाव्या हाताच्या दंडास स्पर्श करावा. " ॐ ऱ्हूं " इत्यादि मंत्रानें नाभीला स्पर्श करावा " ॐ ऱ्हौं " इत्यादि मंत्रानें पोटाच्या उजव्या बाजूस स्पर्श करावा. " ॐ ऱ्हः " इत्यादि मंत्राने पोटाच्या डाव्या बाजूस स्पर्श करावा. हा तिसरा न्यास होय. हे अंगन्यासाचे तीन प्रकार सांगितले आहेत.

वामायामथ तर्जन्यां न्यस्यैवं पञ्चमन्त्रकम् ॥
पूर्वादिदिक्षु रक्षार्थं दशस्वपि निवेशयेत् ॥ १ ॥

अर्थ— नंतर डाव्या हाताच्या तर्जनीवर (आंगठ्याजवळच्या बोटावर) पंचनमस्कार मंत्राची योजना एके ठिकाणीच करून ती तर्जनी—भूतप्रेतादिकांपासून आपलें रक्षण होण्याकरिता—दहाही दिशांकडे दाखवावी. त्याचा आरंभ पूर्वदिशेकडून करावा.

ॐ क्षां क्षीं क्षूं क्षे क्षैं क्षों क्षौं क्षं क्षः स्वाहा। इति द्वादश कूटाक्षराणि ॥

ॐ ऱ्हॉं ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हे ऱ्हैं ऱ्हो ऱ्हौं ऱ्हं ऱ्हः स्वाहा। इति द्वितीयद्वादश शून्यबीजानि ॥

इति दशादिशां वन्धः ॥

अर्थ— " ॐ क्षां " इत्यादि बारा अक्षरांना ' कूटाक्षरें ' आणि " ॐ ऱ्हॉं " इत्यादि अक्षरांना " द्वादशशून्यबीजें " ह्मणतात. ह्यांच्या योगानें दिग्बंधन करावें. ह्यापैकी एकेक अक्षराचा एकेक दिशेला न्यास

करावा. ह्याप्रमाणें दहा दिशांना दहा अक्षरांचा न्यास करावा. पुनः पुढील दहा अक्षरांचा ( ॐ ऱ्हों इत्यादि अक्षरांचा ) न्यास करावा. ह्याला 'दिग्बंधन' ह्मणतात.

कवचॉस्तु करन्यासं कुर्यान्मन्त्रेण मन्त्रवित् ॥

अर्थ— मंत्र जाणणाऱ्या मनुष्यानें मागे सांगितल्याप्रमाणे करन्यास करून पुढीलप्रमाणें कवचन्यास करावा.

ॐ हृदयाय नमः । शिरसे स्वाहा ॥ शिखायै वषट् ॥ कवचाय हूं ॥ अस्त्राय फट् ॥

इति शिखाबन्धः ॥

अर्थ— वरील मंत्राने क्रमाने हृदय, मस्तक, ह्यांना स्पर्श करून, शेंडीला स्पर्श करून 'वषट्कार' करावा. ह्मणजे चिटकी वाजवावी. सर्वांगांत कवच धारण केलें आहे अशी भावना करून 'हुंकार' करावा. अस्त्राकरितां 'फट्कार' करावा. ह्मणजे तीन वेळां टाळी वाजवावी. हे झाल्यावर शिखा बांधावी.

अथ परमात्मध्यानम् ॥

ॐ ऱ्हीँ नमो अरिहंताणं अर्हद्भ्यो नमः ॥ २१ वारं ॥

ॐ ऱ्हीँ अर्हं णमो सिद्धाणं सिद्धेभ्यो नमः ॥ २१ वारं ॥ परमात्मध्यानमन्त्रः ॥

अर्थ— हे दोन मंत्र परमात्म्याच्या ध्यानाचे आहेत. ह्याचा प्रत्येकाचा एकवीस वेळां जप करावा.

एवं तु कुर्वतः पुंसो विघ्ना नश्यन्ति कुत्रचित ॥

आधिव्याधिः क्षयं याति पीडयन्ति न दुर्जनाः ॥ १ ॥ इति सकलीकरणम् ॥

अर्थ— ह्याप्रमाणे करणाऱ्या मनुष्याची सर्व विघ्नें नाश पावतात. त्याच्या आधि व्याधि नष्ट होतात. आणि दुर्जन त्याला कोणतीही पीडा करीत नाहीत. हा सकलीकरणाचा विधि सांगितला.

ततः आव्हानस्थापनसन्निधीकरणं कृत्वा जिनश्रुतसूरीन् पूजयेत् ॥

अर्थ— नंतर जिन, श्रुत आणि सूरि ह्या देवतांचें आव्हान, स्थापन आणि सन्निधीकरण करून त्यांची पूजा करावी. त्यांच्या पूजेचे मंत्र पुढें सांगतात.

जिनश्रुतसूरिपूजामंत्र

ॐ ह्रीँ अर्हं श्रीपरब्रह्मणे अनन्तानन्तज्ञानशक्तये जलं निर्वपामि स्वाहा ॥ एवं गन्धादि । अष्टद्रव्यपूजनम् । जिनपूजा ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि श्रीजिनपूजेचा मंत्र आहे. ह्या मंत्रानें जल, गंध वगैरे अष्टद्रव्यांनीं श्रीजिनाची पूजा करावी. तीं पूजाद्रव्यें नवीन असावीत. ही जिनपूजा होय.

ॐ ह्रीँ परमब्रह्ममुखकमलोत्पन्नद्वादशाङ्गश्रुतेभ्यः स्वाहा ॥ श्रुतपूजामन्त्रः ॥

अर्थ— हा श्रुतपूजेचा मंत्र होय. ह्यानें श्रुतपूजा करावी.

ॐ ह्रीँ शिवपदसाधकेभ्य आचार्यपरमेष्ठिभ्यः स्वाहा ॥ आचार्यपूजामन्त्रः ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि सूरिपूजनाचा मंत्र होय. ह्या मंत्राने सूरीचे पूजन करावे.

ततो जिनपादार्पितचन्दनैः स्वाङ्गमलंकुर्यात् ॥

अर्थ— नंतर श्रीजिनेंद्राच्या चरणावर अर्पण केलेल्या गंधानें आपले शरीर अलंकृत करावे.

कलशस्थापन व श्रीपीठस्थापन

ततः– ॐ ह्रीँ स्वस्तये कलशस्थापनं करोमि स्वाहा ॥ यन्त्रात्प्राक्कलशस्थापनम् ॥ ॐ ह्रीँ नेत्राय संवौषट् । कलशार्चनम् ॥ ॐ ह्रीँ स्वस्तये पीठमारोपयामि स्वहा ॥ यन्त्रात्प्रत्यक् पीठारोपणम् ॥ ॐ ह्रीँ अर्हं क्षां ठः ठः श्रीपीठस्थापनं करोमि स्वाहा । श्रीपीठप्रक्षालनम् ॥ ॐ ह्रीँ दर्भमथनाय नमः । पीठदर्भः ॥ ॐ ह्रीँ सम्यग्दर्शनज्ञान-चारित्रेभ्यः स्वाहा पीठार्चनम् ॥ ॐ ह्रीँ श्रीँ श्रीलेखनं करोमि स्वाहा । श्रीकारले-खनम् ॥ ॐ ह्रीँ श्रीं श्रीयन्त्रं पूजयामि स्वाहा । श्रीयन्त्रार्चनम् ॥

अर्थ— नंतर यंत्राच्या पूर्वेकडे कलशस्थापन, कलशपूजन, यंत्राच्या पश्चिमेकडे पीठस्थापन [ पीठ ठेवणें ] पीठाचे प्रक्षालन, त्यावर दर्भ ठेवणे, पीठाचे अर्चन, त्या पीठावर श्रीकार काढणे, आणि त्या श्रीकाराचे पूजन करणे, इतका विधि करावा. त्याचे मंत्र वर सांगितले आहेत; आणि ते समजण्यासारखे आहेत. ते मंत्र ह्मणून मंत्रात सांगितलेला विधि करावा.

जिनप्रतिमास्थापनादिमंत्र

ॐ धात्रे वषट् ॥ सिंहासनस्थजिनं श्रीपादयोः स्पृष्ट्वा प्रतिमामानयेत् ॥

अर्थ— "ॐ धात्रे वषट्" ह्या मंत्रानें सिंहासनावर असलेली जिनप्रतिमा-प्रथम त्या प्रतिमेच्या पायाला स्पर्श करून नंतर— उचलून पूजेच्या ठिकाणी आणावी.

ॐ ह्रीँ श्रीवर्णे प्रतिमास्थापनं करोमि स्वाहा । श्रीवर्णे प्रतिमास्थापनम् ॥

अर्थ— मग "ॐ ह्रीँ" इत्यादि मंत्रानें पीठावर काढलेल्या श्रीवर्णावर त्या प्रतिमेचें स्थापन करावें.

ॐ ह्रीँ अर्हं श्रीपरब्रह्मणे अर्घ्यं निर्वपामि स्वाहा ॥ अर्घ्यदानमन्त्रः ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें त्या प्रतिमेला अर्घ्य द्यावें.

ॐ नमः परब्रह्मणे श्रीपादप्रक्षालनं करोमि स्वाहा ॥ श्रीपादौ प्रक्षाल्य तज्जलैरात्मानं सिञ्चेत ॥पाद्यम् ॥

अर्थ— 'ॐ नमः' इत्यादि मंत्रानें प्रतिमेचे पाय धुवून तें पादोदक आपल्या अंगावर शिंपडावें.

ॐ ह्राँ ह्रीँ ह्रूँ ह्रौँ ह्रः अ सि आ उ सा एहि एहि संवौषट् ॥ आव्हानम् ॥ एवं अत्र तिष्ठ तिष्ठ ठः ठः स्थापनम् ॥ पुनः मम सन्निहितो भव भव वषट् सन्निधीकरणम्

अर्थ— 'ॐ ह्राँ' इत्यादि मंत्रानें त्या प्रतिबिंबाच्या ठिकाणी श्रीजिनेंद्राचें आव्हान करावें. पुढें

'ॐ ह्रॉं- सा' येथपर्यंत ह्मणून 'अत्र' इत्यादि मंत्रानें त्या प्रतिबिंबाच्या ठिकाणीं श्रीजिनेंद्राचें स्थापन करावें. पुनः 'ॐ ह्रॉं- सा' येथपर्यंत म्हणून 'मम' इत्यादि मंत्रानें सन्निधीकरण ( जिनेंद्राला आपल्या जवळ ठेवणें ) करावें.

ॐ ह्रीं अ सि आ उ सा नमः ॥ पंचगुरुमुद्राधारणम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं' इत्यादि मंत्रानें पंचगुरुमुद्रा करावी.

ॐ वृषभाय दिव्यदेहाय सद्योजाताय महाप्राज्ञाय अनन्तचतुष्टयाय परमसुखप्रतिष्ठिताय निर्मलाय स्वयम्भुवे अजरामरपरमपदप्राप्ताय चतुर्मुखपरमेष्ठिने महते त्रैलोक्यनाथाय त्रैलोक्यप्रस्थापनाय अभीष्टदिव्यनागपूजिताय परमपदाय ममात्र सन्निहिताय स्वाहा ॥ अनेन पंचगुरुमुद्रानिर्वर्तनम् ॥ ततोऽपि पाद्यम् ॥

अर्थ— 'ॐ वृषभाय' इत्यादि मंत्रानें पंचगुरुमुद्रा करावी. आणि नंतर पुनः जिनेंद्राला पाद्य द्यावें.

ॐ ह्रीं झ्वीं क्ष्वीं वं मं हं सं तं पं द्रां द्रीं द्रां द्रीं हं सः स्वाहा ॥ जिनस्याचमनम् ॥

अर्थ—'ॐ ह्रीं' इत्यादि मंत्रानें जिनेंद्राला आचमन द्यावें.

ॐ ह्रीं क्रौं समस्तनीराजनद्रव्यैर्नीराजनं करोमि अस्माकं दुरितमपनयतु भवतु भगवते स्वाहा ॥ नीराजनार्चनम् ॥

अर्थ—'ॐ ह्रीँ क्रौँ' इत्यादि मंत्रानें श्रीजिनेंद्राला नीराजनाच्या वस्तूंनीं नीराजन करावें. मूर्तीला कोणाची दृष्ट न लागावी याकरितां त्याच्यावरून वोंवाळून टाकावें.

ॐ ह्रीँ क्रौँ प्रशस्तवर्णसर्वलक्षणसम्पूर्णायुधवाहनयुवतिजनसहिता इन्द्राग्नियमनिर्ऋतिवरुणपवनकुबेरेशानशेषशीतांशवो दश दिग्देवता आगच्छत ॥ इत्यादि दिक्पालार्चनम् ॥

अर्थ—'ॐ ह्रीँ क्रौँ' इत्यादि मंत्रानें दिक्पालाचें पूजन करावें.

ॐ ह्रीँ स्वस्तये कलशोद्धारणं करोमि स्वाहा ॥ कलशोद्धारणम् ॥

अर्थ—'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें यंत्राच्या पुढें पूर्वीं स्थापन केलेला कलश उचलून घ्यावा.

ॐ ह्रीँ श्रीँ क्लीँ ऐं अर्हं वं मं हं सं तं पं वं मं हं सं हं हं सं सं तं तं पं पं झं झं झ्वीँ झ्वीँ क्ष्वीँ क्ष्वीँ द्रीँ द्रीँ द्रां द्रां द्रावय द्रावय नमोऽर्हते भगवते श्रीमते पवित्रतरजलेन जिनमभिषेचयामि स्वाहा ॥ जलस्नपनम् ॥

अर्थ—'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें श्रीजिनाला त्या कलशोदकानें स्नान घालावें.

ॐ ह्रीँ श्रीँ–इत्यादि श्रीमते सर्वरसेषु पवित्रतरनालिकेरग्साम्ररसकदलीपनसेक्षुरसघृतदुग्धदधिभिः जिनमभिषेचयामि स्वाहा ॥

अर्थ—'ॐ ह्रीँ श्रीँ' इत्यादि 'श्रीमते' येथपर्यंत वरील मंत्र ह्मणून त्याच्या पुढें सर्वरसेपु' इत्यादि ह्मणून श्रीजिनाला नारळाचें दूध, आंब्याचा रस, केळी, फणस, उंसाचा रस, तूप, दूध, दही, ह्यांच्या योगानें स्नान घालावें.

ॐ नमोऽर्हते भगवते कङ्कोलैलालवङ्गादिचूर्णैर्जिनाङ्गमुद्वर्तयामि स्वाहा ॥

अर्थ— 'ॐ नमो' इत्यादि मंत्रानें कंकोळ, वेलदोडे, लवंगा, इत्यादिकांच्या चूर्णानें श्रीजिनेंद्राचें अंग चोळावें.

ॐ ह्रीँ श्रीँ क्लीँ इत्यादि श्रीमते पवित्रतरचतुष्कोणकुम्भपरिपूर्णजलेन जिनमभिषेचयामि स्वाहा ॥ कोणकुम्भजलस्नपनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें पीठाच्या चार कोपऱ्याला ठेवलेल्या चार कलशांतील उदकानें श्रीजिनाला स्नान घालावें.

ॐ ह्रीँ निखिललोकपवित्रीकरणगन्धोदकेनाभिषेचयामि जिनम् ॥ गन्धोदकेनोत्तमाङ्गस्य सेचनम् ॥ इति स्नपनविधिः ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें श्रीजिनेंद्राच्या मस्तकावर गंधोदकानें सेचन करावें. हा स्नपनविधि ह्म० स्नानविधि सांगितला.

अष्टद्रव्यार्चनमंत्र

ततस्तत्प्रतिमामानीय यन्त्रमध्य संस्थाप्य सम्पूजयेत ॥ स्नपनाभावे अधिवासनात्मालङ्करणपर्यन्तं विधानमाचर्य यन्त्रे एव प्रतिमाया आ-ह्वानादिकं कृत्वा सम्यक् पूजयेत् ॥ तद्यथा— ॐ ह्राँ ह्रीँ ह्रूँ ह्रौँ ह्रः अ सि आ उ सा जलं गृहाण गृहाण नमः ॥ एवं गन्धाक्षतकुसुम-चरुदीपधूपफलैश्च जिनं पूजयेत् ॥ पूर्णार्घ्यं जाप्यं जपेत् ॥

अर्थ— ह्याप्रमाणें स्नानविधि झाल्यावर प्रतिमा पूर्वी सांगितलेल्या यंत्राच्या मध्यभागीं ठेवून तिची पूजा करावी. जर प्रतिमेला स्नान घालावयाचें नसेल तर आवाहन, स्थापन वगैरे पासून जिनाच्या चरणावरील गंध आपल्या अंगाला लावून घेण्यापर्यंत विधि करून यंत्राच्या ठिकाणीं प्रतिमेचें आवाहन करून पूजा करावी. ती पूजा अशी कीं, 'ॐ ह्रॉं' इत्यादि मंत्रानें जिनेंद्राला जल अर्पण करावें. मग मंत्रांत 'जलं' ह्या ठिकाणीं क्रमानें गंध, अक्षता, कुसुम, चरु, दीप, धूप, फल ह्या शब्दांचा उपयोग करून ते ते पदार्थ जिनाला समर्पण करावेत. ह्याप्रमाणें पूजा झाल्यावर पूर्णार्घ्य देऊन जप करावा.

जयादिदेवतार्चनमंत्र

ततः पञ्चपरमेष्ठिनां पूजां कुर्यात् ॥ इति कर्णिकाभ्यर्चनम् ॥

अर्थ— नंतर पंचपरमेष्ठींची पूजा करावी. हें यंत्रांतील कर्णिकेचें पूजन झालें.

अष्टपत्रेषु— ॐ ऱ्हीँ जये विजये अजिते अपराजिते जम्भे मोहे स्तम्भे स्तम्भिनि सर्वा अप्यायुधवाहनसमेता आयात आयात इदमर्घ्यं चरुममृतमिव स्वस्तिकं यज्ञभागं गृहीत गृहीत स्वाहा॥ इति जयादिदेवीरभ्यर्चयेत् ॥

अर्थ— नंतर त्या यंत्रांतील कर्णिकेच्या सभोवती असलेल्या अष्टदलांत जया, विजया, अजिता, अपराजिता, जंभा, मोहा, स्तंभा आणि स्तंभिनी ह्यांचें पूजन 'ॐ ऱ्हीँ' इत्यादि मंत्रानें करावें. ह्यांनाच जयादि अष्ट देवता असें ह्मणतात.

विद्यादेवतार्चनमंत्र

षोडशपत्रेषु— ॐ ऱ्हीँ रोहिणि प्रज्ञप्ते वज्रशृङ्खले वज्राङ्कुशे अप्रतिचक्रे पुरुषदत्ते कालि महाकालि गान्धारि गौरि ज्वालामालिनि वैराटि अच्युते अपराजिते मानसि महामानसि चेति सर्वा अप्यायुधवाहनसमेता आयात आयातेदमर्घ्यं गृह्णीत गृह्णीत स्वाहा ॥ इति विद्यादेवतार्चनम् ॥

अर्थ— मग त्या अष्टदलाच्या भोवतीं असलेल्या षोडश दलामध्यें रोहिणी, प्रज्ञप्ति, वज्रशृंखला, वज्रांकुशा, अप्रतिचक्रा, पुरुषदत्ता, काली, महाकाली, गांधारी, गौरी, ज्वालामालिनी, वैराटी, अच्युता, अपरा-

जिता, मानसी, महामानसी ह्या सोळा विद्यादेवतांचें " ॐ ह्रीं " इत्यादि मंत्रानें पूजन करावें.

शासनदेवतार्चनमंत्र

चतुर्विंशपत्रेषु- ॐ ह्रीं चक्रेश्वरि रोहिणि प्रज्ञप्ति वज्रशृङ्खले पुरुषदत्ते
मनोवेगे कालि ज्वालामालिनि महाकालि मानवि गौरि गांधारि वैराटि
अनन्तमति मानसि महामानसि जये विजये अपराजिते बहुरूपिणि
चामुण्डे कूष्माण्डिनि पद्मावति सिद्धायिनि सर्वा अप्यायुधवाहनसमेता
आगत आयात इदमर्घ्यं गृह्णीत गृह्णीत स्वाहा ॥ इति शासनदेवतापूजनम् ॥

अर्थ— नंतर षोडशदलांच्या भोंवतीं असलेल्या चोवीस दलामध्यें चक्रेश्वरी, प्रज्ञप्ती, वज्रशृंखला, पुरुषदत्ता, मनोवेगा, काली, ज्वालामालिनी, महाकाली, मानवी, गौरी, गांधारी, वैराटी, अनंतमती, मानसी महामानसी, जया, विजया, अपराजिता, बहुरूपिणी, चामुंडा, कूष्मांडिनी, पद्मावती आणि सिद्धायिनी ह्या चतुर्विंशति शासनदेवतांचें " ॐ ह्रीं " इत्यादि मंत्रानें पूजन करावें.

इंद्रार्चनमंत्र

द्वात्रिंशत्पत्रेषु- ॐ ह्रीं असुरेन्द्र नागेन्द्र सुपर्णेन्द्र द्वीपेन्द्रो दधीन्द्र स्तनि-
तेन्द्र विद्युदिन्द्र दिगिन्द्र अग्नीन्द्र वाय्विन्द्र किन्नरेन्द्र किम्पुरुषेन्द्र महोर-

गेन्द्र गन्धर्वेन्द्र यक्षेन्द्र राक्षसेन्द्र भूतेन्द्र पिशाचेन्द्र चन्द्रादित्य सौधर्मेन्द्र ईशानेन्द्र सनत्कुमारेन्द्र माहेन्द्रेन्द्र ब्रह्मेन्द्र लान्तवेन्द्र शुक्रेन्द्र शतारेन्द्रानतेन्द्र प्राणतेन्द्रारणेन्द्राच्युतेन्द्र सर्वेऽप्यायातायात यानायुधयुवतिजनैः सार्धं भूर्भुवः स्वः स्वधा इदमर्घ्यं चरुममृतमिव स्वस्तिकं यज्ञभागं गृह्णीत गृह्णीत ॥

इतीन्द्राणामभ्यर्चनम् ॥

अर्थ— चतुर्विंशति दलांच्या सभोवतीं असलेल्या बत्तीस दलांमध्यें असुरेंद्र वगैरे बत्तीस इंद्रांची पूजा करावी.

यक्षार्चनमंत्र

अथ वज्राग्रस्थापितचतुर्विंशतियक्षाः। ॐ ह्रीं गोमुख महायक्ष त्रिमुख यक्षेश्वर तुम्बरु पुष्पाक्ष मातङ्ग श्यामजित ब्रह्मेश्वर कुमार चतुर्मुख पाताल किन्नर गरुड गन्धर्व खगेन्द्र कुबेर वरुण भृकुटि गोमेद धरण मातङ्गाः सर्वेऽप्यायुधवाहनयुवतिसहिता आयातायात इदमर्घ्यं गन्धमित्यादि गृह्णीत गृह्णीत स्वाहा ॥ यक्षार्चनम् ॥

अर्थ— त्या बत्तीस दलाच्या भोवती असलेल्या चोवीस वज्राच्या अग्रावर स्थापित केलेल्या गोमुख

वगैरे चोवीस यक्षाची पूजा "ॐ ह्रीँ" इत्यादि मंत्रानें करावी.

दिक्पाल व नवग्रह

अथ दिक्पालाः। ॐ इन्द्राग्नियमनैर्ऋत्यवरुणपवनकुबेरेशानधरणसोमाः सर्वेऽप्यायुधवाहनयुवतिसहिता आयातायात इदमर्घ्यमित्यादि ॥ दिक्पालार्चनम् ॥ ॥ अथ ग्रहाः। आदित्यसोममंगलबुधबृहस्पतिशुक्रशनिराहुकेतवः सर्वेऽप्यायुधवाहनवधूचिन्हसपरिवारा आयातायात इदमर्घ्यं स्वाहा ॥ इति नवग्रहपूजा ॥

अर्थ— नंतर इंद्रादि अष्टदिक्पाल व सूर्यादिनवग्रह ह्यांची पूजा करावी.

अनावृतपूजा.

ॐ ह्रीँ औं क्रौँ हे अनावृत आगच्छागच्छ अनावृताय स्वाहा ॥ इत्यनावृतपूजा ॥

एवं महायन्त्रं समाराध्य मूलविद्यामष्टशतवारान् जपेत् ॥ इति देवताराधनाविधिः॥

अर्थ— मग "ॐ ह्रीँ" इत्यादि मंत्रानें अनावृत देवतेचें पूजन करावें. ह्याप्रमाणे महायंत्राचें आराधन झाल्यावर मूलमंत्राचा एकशे आठ वेळा जप करावा. हा देवताराधनाचा विधि सांगितला.

ॐ ह्राँ ह्रीँ ह्रूँ ह्रौं ह्रः अ सि आ उ सा अस्य देवदत्तस्य सर्वोपद्रवशान्तिं कुरु कुरु स्वाहा ॥ अयं मूलमन्त्रः ॥

अर्थ— ॐ ऱ्हॉ इत्यादि मंत्राला मूलमंत्र ह्मणतात. ह्याचा जप करावा. जप करतांना मंत्रात ज्या ठिकाणी देवदत्तस्य असे आहे, त्या ठिकाणी जप करणाऱ्याने ज्याच्याबद्दल आपण जप करीत आहोत त्याचे नांव घालावे.

शांतिकर्म

ज्वररोगोपशान्त्यर्थं श्वेतवर्णैर्यन्त्रमुद्धार्य सम्पूज्य पश्चिमाभिमुखः सूरिः ज्ञानमुद्रा पद्मासनं श्वेतजापैरष्टोत्तरशतं जपेत् पश्चिमरात्रौ । त्रिपञ्चसप्तदिनाभ्यन्तरे ज्वरो मुञ्चति ॥ एवमन्येषामपि रोगाणामनुष्ठेयम् ॥ इति शान्तिकर्म ॥

अर्थ— ज्वररोगाची शांति करावयाची असल्यास पांढऱ्या रंगानें यंत्र काढून त्याची पूजा मध्यरात्रीच्या पुढें करून पांढऱ्या रंगाच्या मालेनें वरील मंत्राचा एकशे आठ जप करावा. तोंड पश्चिमेकडे करून पद्मासनानें बसावें, आणि ज्ञानमुद्रा करावी. ह्याप्रमाणें केलें असतां तीन, पाच किंवा सात दिवसात ज्वर निघतो. दुसरा कोणताही रोग असल्यास असेंच अनुष्ठान करावे. ह्याला शांतिकर्म ह्मणतात.

पौष्टिककर्म

एवं पौष्टिकेऽपि तथैव । उत्तराभिमुख इति विशेषः ॥ ॐ ऱ्हाँ ऱ्हीँ ऱ्हूँ ऱ्हौँ ऱ्हः अ सि

आ उ सा अस्य देवदत्तनामधेयस्य मनःपुष्टिं कुरु कुरु स्वाहा ॥ पुष्टिकर्म ॥

अर्थ— पौष्टिक कर्मातही वरील प्रमाणेंच सर्व अनुष्ठान करावें. फक्त जप करणाऱ्यानें उत्तरेकडे तोंड करावें, एवढें अधिक आहे. ॐ ऱ्हॉ इत्यादि पौष्टिक कर्मांत जप करण्याचा मंत्र समजावा. हा पुष्टिकर्माचा विधि जाणावा.

वशीकरण.

अथ वश्यकर्मणि रक्तवर्णैर्यन्त्रोद्धारः रक्तपुष्पैः। स्वास्तिकासनपद्ममुद्राङ्कितः पूर्वाह्ले यक्षाभिमुखः— ॐ ऱ्हॉ ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः अ सि आ उ सा अमुं राजानं वश्यं कुरु कुरु वषट्— वामहस्तेन मन्त्रं जपेत् ॥ इति वश्यकर्म ॥

अर्थ— आतां एखाद्या राजाला वश करावयाचें असल्यास तांबड्या रंगानें यंत्र काढून तांबड्या फुलांनीं त्याची पूजा करावी. आणि स्वास्तिकासन करून उत्तरेकडे तोंड करून पूर्वाह्णात— ॐ ऱ्हॉ— इत्यादि मंत्राचा जप करावा. तो जप डाव्या हातानें माळा धरून करावा मंत्रांत अमुं राजानं ह्या ठिकाणीं त्या राजाचें नांव घालावें. ह्याला वश्यकर्म ह्मणतात.

आकर्षण.

अथाकृष्टिकर्मणि। रक्तवर्णैर्यन्त्रोद्धारः पूर्वाभिमुखो दण्डासनाङ्कुशमुद्रायुतः ॐ ऱ्हॉ

ऱ्हीँ ऱ्हूँ ऱ्हौं ऱ्हः अ सि आ उ सा एनां स्त्रियमाकर्षयाकर्षय संवौषट् ॥ एवं भूतप्रेतवृष्टयादीनामप्याकर्षणम् ॥

अर्थ— आकृष्टि ह्मणजे ओढून आणणें, हे कर्म करावयाचें असलयास तांबड्या रंगानें यंत्र काढावे. आणि जप करणाऱ्याने दंडासन करून अंकुशमुद्रा करावी. नंतर 'ॐ ऱ्हाँ' इत्यादि मंत्राचा जप करावा. ह्या जपानें भूत, प्रेत, पर्जन्य इत्यादिकांचेंही आकर्षण होते.

अथ स्तम्भनम्

हरितालादिपीतवर्णैर्यन्त्रोद्धारः । पूजा सर्वा पीता । पीता जपमाला वज्रासनं शंखमुद्रा ॥ ॐ ऱ्हाँ ऱ्हीँ ऱ्हूँ ऱ्हौं ऱ्हः अ सि आ उ सा साधकस्य एतन्नामधेयस्य क्रोधं स्तम्भय स्तम्भय ठः ठः ॥ एवं शार्दूलादीनां क्रोधस्तम्भनम् ॥

अर्थ— स्तंभन करावयाचें असल्यास हरताळ वगैरे पिवळ्या रंगानें यंत्रोद्धार करावा. पूजेची सर्व द्रव्यें पिवळी असावीत. जपाची माळ पिवळी असावी. जप करणाऱ्यानें वज्रासन करून शंखमुद्रा करावी. आणि "ॐ ऱ्हाँ" इत्यादि मंत्राचा जप करावा. ह्या मंत्राने व्याघ्रादिकाच्या क्रोधाचेंही स्तंभन होतें. मंत्रात "एतन्नामधेयस्य" ह्या ठिकाणी ज्याच्या क्रोधाचें स्तंभन करावयाचें असेल त्याचें नांव घालावें.

अतिवृष्टौ सत्यां कर्मणि— ॐ ऱ्हाँ ऱ्हीँ ऱ्हूँ ऱ्हौं ऱ्हः अ सि आ उ सा अत्र एनां

वृष्टिं स्तम्भय ठः ठः ॥ इति स्तम्भनम् ॥

अर्थ— अतिवृष्टि होऊ लागल्यास जप करतांना " ॐ ऱ्हॉ " इत्यादि मंत्राचा जप करावा. हा स्तंभनाचा विधि सांगितला आहे.

उच्चाटनकर्म

अथोच्चाटनकर्मणि कृष्णवर्णैर्यन्त्रोध्दारः। अपराण्हे मरुदिंमुखः कुर्कुटासनः पल्लवमुद्रा नीलजाप्यैर्जप ॐ ऱ्हॉ ऱ्हीँ ऱ्हूँ ऱ्हौँ ऱ्हः अ सि आ उ सा देवदत्तानामधेयं अत उच्चाटय उच्चाटय फट् फट् ॥ इति जपेत् ॥ एवं भूतादीनामप्युच्चाटनम् ॥ इत्युच्चाटनकर्म ॥

अर्थ— उच्चाटन ( हाकून देणें ) करावयाचें असल्यास काळ्या रंगानें यंत्र काढावें. दोन प्रहरानंतर वायव्यदिशेकडें तोंड करून, कुर्कुटासनानें बसून, पल्लवमुद्रा करून काळ्या रंगाच्या मण्यांनी " ॐ ऱ्हॉ " इत्यादि मंत्राचा जप करावा. ह्या मंत्रांत ' देवदत्तनामधेय ' ह्या ठिकाणी ज्याचे उच्चाटन करावयाचे असेल त्याचे नांव घालावें. त्या मंत्रानें भूत वगैरेचेही उच्चाटण होतें.

विद्वेषकर्म

अथ विद्वेषकर्मणि कृष्णवर्णैर्यन्त्रोध्दारः। मध्यान्हे आग्निमुखः। कुर्कुटासनं पल्लव-

मुद्रा कृष्णजाप्यैर्जपः ॥ ॐ ह्रॉं ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा अनयोर्यज्ञदत्त देवदत्तनामधेययोः परस्परमतीव विद्वेषं कुरु कुरु हूं ॥ एवं स्त्रीपुरुषयोर्वा ॥

इति विद्वेषणम् ॥

अर्थ— कोणांमध्ये द्वेष उत्पन्न करावयाचा असल्यास काळ्या रंगानें यंत्र काढावें. मध्यान्हकाली आग्नेयदिशेकडे तोंड करून, कुक्कुटासन व पल्लवमुद्रा करून, काळ्या मण्याच्या मालेने ॐ ह्रॉं इत्यादि मंत्राचा जप करावा. मंत्रांत यज्ञदत्तदेवदत्तयोः ह्या ठिकाणी ज्या दोघांचा द्वेष उत्पन्न करावयायाचा असेल त्याचीं नावें घालावीत. स्त्रीपुरुषांत परस्पर द्वेष उत्पन्न करावयाचा झाला तरी ह्याच मंत्राचा जप करावा.

अभिचारकर्म

अभिचारकर्माणि सर्पविषमिश्रैरुन्मत्तरसमिश्रैः अपराह्णे ईशानादिङ्मुखः कृष्णनक्षो भद्रासनो वज्रमुद्राखदिरमण्यादिकृताक्षमालः। ॐ ह्रॉं ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा अस्य एतन्नामधेयस्य तीव्रज्वरं कुरु कुरु घे घे। इत्युच्चारयेत् । शूलशिरोरोगाणामप्येवं कर्तव्यम्। उच्चाटनादिकर्माणि धर्माधारभूतानां राजादिनामभिलपितानि चेत्तदा विधेयानि ॥

अर्थ— कोणाला पीडा करावयाची असल्यास सर्पाचें विष किंवा मादक द्रव्य ह्यांनीं मिश्र केलेल्या

काळ्या रंगानें यंत्र काढावें. दोन प्रहरानंतर ईशान्येकडे तोंड करून जप करावा. काळें वस्त्र नेसावें. भद्रासन असावें. वज्रमुद्रा, खैराच्या शाईनें रंगविलेल्या मण्याची माळ जपाला असावी. "ॐ ऱ्हॉं" इत्यादि मंत्राचा जप करावा. मंत्रात "एतन्नामधेयस्य" ह्या ठिकाणीं ज्याला पीडा उत्पन्न करावयाची असेल त्याचे नाव घालावें. पोटशूल, मस्तकशूल वगैरे पीडा उत्पन्न करावयाची असल्यासही त्याच मंत्राचा जप करावा. उच्चाटन वगैरे जी कर्मे वर सांगितलेली आहेत; तीं धर्मसंरक्षण करणारे राजे किंवा दुसरे कोणी अधिकारी यांना संमत असल्यास—करावीत नाहीपेक्षा करूं नयेत.

### होमविधि.

इत्याराधनाविधिं समाप्य होमशालायामग्निहोत्रं विदध्यात् ॥ तद्यथा—ॐ ऱ्हॉं क्ष्वीं भूः स्वाहा । पुष्पाञ्जलिः ॥

अर्थ— ह्याप्रमाणें आराधनाविधि संपवून अग्निहोम करण्याकरितां होमशाळेंत जावें. आणि तेथील विधि पुढीलप्रमाणें करावा. "ॐ ऱ्हॉं" ह्या मंत्रानें भूमीवर पुष्पांजलि द्यावी.

ॐ ऱ्हीं अत्रस्थक्षेत्रपालाय स्वाहा ॥ क्षेत्रपालबलिः ॥

अर्थ— 'ॐ ऱ्हीं' इत्यादि मंत्रानें क्षेत्रपालाला बलिदान करावें.

ॐ ऱ्हीं वायुकुमाराय सर्वविघ्नविनाशनाय महीं पूतां कुरु कुरु हूं फट् स्वाहा ॥

भूमिसम्मार्जनम् ॥

अर्थ— "ॐ ह्रीँ वायुकुमाराय" इत्यादि मन्त्रानें भूमीचे समार्जन करावें.

ॐ ह्रीँ मेघकुमाराय धरां प्रक्षालय प्रक्षालय अं हं सं तं पं स्वं झं झं यं क्षः फट् स्वाहा ॥

भूमिसेचनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ मेघकुमाराय' इत्यादि मंत्राने भूमीवर सडा घालावा.

ॐ ह्रीँ अग्निकुमाराय ह्म्ल्व्र्यूँ ज्वल ज्वल तेजःपतये अमिततेजसे स्वाहा ॥

दर्भाग्निप्रज्वालनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ अग्निकुमाराय' इत्यादि मन्त्राने दर्भ त्या भूमीवर पेटवावेत.

ॐ ह्रीँ क्रौं षष्ठिसहस्रसंख्येभ्यो नागेभ्यः स्वाहा । नागतर्पणम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ क्रौँ' इत्यादि मंत्राने नागाची पूजा करावी.

ॐ ह्रीँ भूमिदेवते इदं जलादिकमर्चनं गृहाण गृहाण स्वाहा । भूम्यर्चनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ भूमिदेवते' इत्यादि मंत्राने भूमीचे पूजन करावें.

ॐ ह्रीँ अर्हं क्षं वं व श्रीपीठस्थापनं करोमि स्वाहा ॥ होमकुण्डात्प्रत्यक् पीठस्थापनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ अर्हं' इत्यादि मंत्राने होमकुंडाच्या पश्चिमेकडे पीठस्थापन करावे.

ॐ ह्रीँ सम्यग्दर्शनज्ञानचारित्रेभ्यः स्वाहा ॥ श्रीपीठार्चनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें त्या पीठाचे पूजन करावें.

ॐ ह्रीँ श्रीँ क्लीँ ऐँ अर्हं जगतां सर्वशान्तिं कुर्वन्तु श्रीपीठे प्रतिमास्थापनं करोमि स्वाहा ॥ श्रीपीठे प्रतिमास्थापनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ श्रीँ' इत्यादि मंत्रानें त्या पीठावर जिनप्रतिमा स्थापन करावी.

ॐ ह्रीँ अर्हं नमः परमेष्ठिभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमः परमात्मकेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमोऽनादिनिधनेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमो नृसुरासुरपूजितेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमोऽनन्तज्ञानेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमोऽनन्तदर्शनेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमोऽनन्तवीर्येभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमोऽनन्तसौख्येभ्यः स्वाहा इत्यष्टाभिर्मन्त्रैः प्रतिमार्चनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ अर्हं' इत्यादि आठ मंत्रांनीं त्या प्रतिमेचें पूजन करावें.

ॐ ह्रीँ धर्मचक्रायाप्रतिहततेजसे स्वाहा ॥ चक्रत्रयार्चनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ 'धर्मचक्राय' इत्यादि मंत्रानें चक्रत्रयाचें पूजन करावें.

ॐ ह्रीं श्वेतच्छत्रत्रयश्रियै स्वाहा ॥ छत्रत्रयपूजा ॥

अर्थ— ' ॐ ह्रीं ' इत्यादि मंत्राने छत्रत्रयाचे पूजन करावे.

ॐ ह्रीं श्रीं क्लीं ऐं अर्हं ह्सौं त्रौं सर्वशास्त्रप्रकाशिनि वद वद वाग्वादिनि अवतर अवतर । अत्र तिष्ठ तिष्ठ ठः ठः । संनिहिता भव भव वषट् । ह्रं नमः सरस्वत्यै जलं निर्वपामि स्वाहा ॥ एवं गन्धाक्षतपुष्पचरुदीपधूपफल-वस्त्राभरणादिकम् । प्रतिमाग्रे सारस्वतीपूजा ॥

अर्थ— ' ॐ ह्रीं श्रीं ' इत्यादि मंत्राने प्रतिमेच्या आघाडीस जल, गंध, अक्षता, पुष्प, चरु, दीप, धूप, फल, वस्त्र, अलंकार इत्यादिकांच्या योगाने सरस्वतीची पूजा करावी.

ॐ ह्रीं सम्यग्दर्शनज्ञानचारित्रपवित्रतरगात्रचतुरशीतिलक्षगुणाष्टादश-सहस्रशीलभरगणधरचरणाः आगच्छत आगच्छत संवौषट् ॥ इत्यादि गुरुपादुकापूजा ॥

अर्थ— ' ॐ ह्रीं ' इत्यादि मंत्राने गणधरांच्या पादुकांचे पूजन करावे.

ॐ ह्रीं कलियुगप्रबन्धदुर्मार्गविनाशनपरमसन्मार्गपरिपालन भगवन् यक्षेश्वर जलार्चनं गृहाण गृहाण ॥ इत्यादि जिनस्य दक्षिणे यक्षार्चनम् ॥

अर्थ— " ॐ ह्रीँ कलियुग- " इत्यादि मंत्रानें जिनाच्या उजव्या बाजूस यक्षाचें पूजन करावें.

ॐ ह्रीँ कलियुगप्रबन्धदुर्मार्गनिनाशिनि सन्मार्गप्रवर्तिनि भगवति यक्षीदेवते
जलाद्यर्चनं गृहाण गृहाण । इत्यादि वासे शासनदेवतार्चनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीँ ' इत्यादि मंत्रानें श्रीजिनाच्या डाव्या बाजूस शासनदेवतेचें पूजन करावें.

ॐ ह्रीँ उपवेशनभूः शुध्यतु स्वाहा ॥ होमकुण्डपूर्वभागे दर्भपूलेनोपवेशनभूमि-
शोधनम् ॥

अर्थ— " ॐ ह्रीँ " इत्यादि मंत्रानें दर्भाच्या जुडीनें होमकुंडाच्या पूर्वेकडील बसावयाची भूमि शुद्ध करावी.

ॐ ह्रीँ परब्रह्मणे नमो नमः । ब्रह्मासने अहमुपविशामि स्वाहा ॥ होमकुण्डाग्रे
पश्चिमाभिमुखं होता उपविशेत् ॥

अर्थ— "ॐ ह्रीँ" इत्यादि मंत्रानें होम करणाऱ्यानें कुंडाच्या पूर्वेकडच्या बाजूस पश्चिमेकडे तोंड करून बसावें.

ॐ ह्रीँ स्वस्तये पुण्याहकलशं स्थापयामि स्वाहा ॥ शालिपुञ्जोपरि फलसहितपु-
ण्याहकलशस्थापनम् ॥

अर्थ— " ॐ ह्रीँ स्वस्तये " इत्यादि मंत्रानें तांदळाच्या राशीवर पुण्याहवाचनाच्या कलशाची स्थापना
करावी. ह्या कलशावर नारळ अथवा दुसरें फल असावें.

ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः नमोऽर्हते भगवते पद्ममहापद्मतिगञ्छकेसरिपुण्डरीकमहापुण्डरीकगङ्गासिन्धुरोहिद्रोहितास्याहरिद्धरिकान्तासीतासीतोदानारीनरकान्तासुवर्णरूप्यकूलारक्तारक्तोदापयोधिशुद्धजलसुवर्णघटप्रक्षालितवररत्नगन्धाक्षतपुष्पार्चितमामोदकंपवित्रं कुरु कुरु झं झं झौं झौं वं वं मं मं हं हं सं सं तं तं पं पं द्रां द्रां द्रीं द्रीं हं सः ॥ इति जलेन प्रसिञ्च्य जलपवित्रीकरणम् ॥

अर्थ—"ॐ ह्रां" इत्यादि मंत्राने उदकाने सेंचन करून पूजेकरितां ठेवलेले उदक शुद्ध करावे.

ॐ ह्रीं नेत्राय संवौषट् ॥ कलशार्चनम् ॥

अर्थ—"ॐ ह्रीं" इत्यादि मंत्राने कलशाचे पूजन करावे.

ततो यजमानाचार्यः वामहस्तेन कलशं धृत्वा सव्यहस्तेन पुण्याहवाचनां पठन् भूमिं सिञ्चेत् ॥ पुण्याहं पुण्याहं प्रीयन्तां प्रीयन्तां इत्यादि पुण्याहवाचनां पठित्वा कलशं कुण्डस्य दक्षिणे भागे निवेशयेत् ॥

अर्थ— मग होम करणाऱ्याच्या सूरीने ( उपाध्यायाने ) डाव्या हातात कलश घेऊन उजव्या हाताने—'पुण्याहं पुण्याहं' इत्यादि पुण्याहवाचनाचे पठण करीत—भूमीवर उदक शिंपडावे नंतर तो कलश कुंडाच्या उजव्या अंगाला ठेवावा.

ततः ॐ ह्रीं स्वस्तये मङ्गलकुम्भं स्थापयामि स्वाहा ॥ वामे मङ्गलकलशस्थापनं

तत्र स्थालीपाकप्रोक्षणपात्रपूजाद्रव्यहोमद्रव्यस्थापनम् ॥

अर्थ— नंतर 'ॐ ह्रीं स्वस्तये' इत्यादि मंत्रानें कुंडाच्या डाव्या अंगास मंगलकलश स्थापन करावा. त्या ठिकाणी स्थालीपाक ( गंध, पुष्प, अक्षता, फल इत्यादिकांनी सुशोभित केलेली पांच पंचपात्री ) प्रोक्षणपात्र, पूजेची सामग्री आणि होमाची सामग्री हें सर्व ठेवावें.

ॐ ह्रीं परमेष्ठिभ्यो नमो नमः । इति परमात्मध्यानम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं' इत्यादि मंत्राने परमात्म्याचे ध्यान करावे

ॐ ह्रीं णमो अरिहंताणं ध्यातृभिरभीप्सितफलदेभ्यः स्वाहा ॥

परमपुरुषस्यार्घ्यप्रदानम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं' इत्यादि मंत्रानें परमात्म्याला अर्घ्यदान करावें.

तत इदं यन्त्रं कुण्डमध्ये लिखेत् ॥ ॐ ह्रीं नीरजसे नमः । ॐ दर्पमथनाय नमः । इत्यादि॥

जलैर्दर्भैर्गन्धाक्षतादिभिर्होमकुण्डार्चनम् ॥

अर्थ— नंतर कुंडांत 'नीरजसे नमः' इत्यादि यंत्र लिहावें. जल, दर्भ, गंध, अक्षता वगैरे पदार्थांनी होमकुंडाचें पूजन करावें.

ॐ ॐ ॐ ॐ रं रं रं रं अग्निं स्थापयामि स्वाहा ॥ अग्निस्थापनम् ॥

अर्थ— 'ॐ ॐ' इत्यादि मंत्रानें कुंडांत अग्नीचे स्थापन करावें.

ॐ ॐ ॐ ॐ रं रं रं रं दर्भं निक्षिप्य अग्निसन्धुक्षणं करोमि स्वाहा ॥ अग्निसन्धुक्षणम् ॥

अर्थ— 'ॐ ॐ' इत्यादि मंत्रानें कुंडांत दर्भ टाकून अग्नि प्रज्वलित करावा.

ॐ ह्रीँ क्ष्वीं क्ष्वीं वं मं हं सं तं पं द्रां द्रां हं सः स्वाहा ॥ आचमनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें आचमन करावें.

ॐ भूर्भुवः स्वः अ सि आ उ सा अर्हं प्राणायामं करोमि स्वाहा ॥ त्रिरुच्चार्य प्राणायामः

अर्थ— 'ॐ भूर्भुवः' इत्यादि मंत्र तीन वेळां ह्मणून प्राणायाम करावा.

ॐ नमोऽर्हते भगवते सत्यवचनसन्दर्भाय केवलज्ञानदर्शनप्रज्वलनाय पूर्वोत्तराग्रं दर्भपरिस्तरणमुदुम्बरसमित्परिस्तरणं च करोमि स्वाहा ॥ होमकुण्डस्य चतुर्भुजेषु पञ्चपञ्चदर्भवेष्टितेन परिधिबन्धनम् ॥

अर्थ— ॐ नमोऽर्हते इत्यादि मंत्रानें कुंडाच्या भोवत्यानें-पांच पांच दर्भ एकत्र गुंडाळून त्याचें परिस्तरण करावें. ह्मणजे पांच पांच दर्भांची गुंडाळलेली एकेक जुडी कुंडाच्या एकेका बाजूवर ठेवावी. त्यांत दक्षिण आणि उत्तर ह्या दोन बाजूंवर ठेवलेल्या दर्भांच्या जुडीचे शेंडे पूर्वेकडे असावेत. आणि पूर्व व

पश्चिम या दोन बाजूस ठेवलेल्या दर्भाच्या जुडीचे शेंडे उत्तरेकडे असावेत.

ॐ ॐ ॐ ॐ रं रं रं रं अग्निकुमार देव आगच्छागच्छ इत्यादि । इत्यग्निदेवमाहूय प्रसाद्य तन्मौल्युद्भवस्याग्नेरस्य गार्हपत्यनामधेयमत्र सङ्कल्प्य अर्हद्दिव्यमूर्तिभावनया श्रद्धानरूपदिव्यशक्तिसमन्वितसम्यग्दर्शनभावनया समभ्यर्चनम् ॥

अर्थ— ॐ ॐ इत्यादि मंत्रानें अग्निकुमाराचें आवाहन करून, त्याला प्रसन्न करून (प्रज्वलित करून) त्याच्या शेंड्यान्च्या ज्वालांचें 'गार्हपत्य' असें नांव ठेवावें. आणि त्या ठिकाणीं अर्हतांच्या दिव्यमूर्तीची व श्रद्धानरूपी दिव्यशक्तीनें युक्त असलेल्या सम्यग्दर्शनाची कल्पना करून पूजा करावी. ही त्या अग्नीरूपा ज्वालांवरच करावयाची आहे.

ॐ ह्रीं क्रौं प्रशस्तवर्णसर्वलक्षणसम्पूर्णस्वायुधवाहनवधूचिन्हसपरिवाराः पञ्चदशतिथिदेवताः आगच्छत आगच्छत इत्यादि कुण्डस्य प्रथममेखलायां तिथिदेवतार्चनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं क्रौं' इत्यादि मंत्रानें कुंडाच्या पहिल्या मेखलेवर पंधरा तिथिदेवतांचें आवाहन करून त्यांचें पूजन [illegible]वें. या ठिकाणीं अगदीं खालची जी मेखला ती पहिली समजावी.

ॐ ह्रीं क्रौं [illegible]स्तवर्णसर्वलक्षणसम्पूर्णस्वायुधवाहनवधूचिह्नसपरिवारा नवग्रहदेवता आगच्छतागच्छ[illegible]त्यादि द्वितीयमेखलायां ग्रहपूजा ॥

अर्थ— ॐ ह्रीँ क्रौँ ह्या मंत्राने कुंडाच्या दुसऱ्या मेखलेवर नवग्रहांची पूजा करावी.

ॐ ह्रीँ क्रौँ प्रशस्तवर्णसर्वलक्षणसम्पूर्णस्वायुधवाहनवधूचिन्हसपरिवाराश्चतुर्णिकायेन्द्रदेवता आगच्छतागच्छतेत्यादि । ऊर्ध्वमेखलायां द्वात्रिंशदिन्द्रार्चनम् ॥

अर्थ— ॐ ह्रीँ क्रौँ इत्यादि मंत्राने कुंडाच्या तिसऱ्या मेखलेवर द्वात्रिंशत् ( बत्तीस ) इंद्रांचे पूजन करावे.

ॐ ह्रीँ क्रौँ सुवर्णवर्ण सर्वलक्षणसम्पूर्ण स्वायुधवाहनवधूचिन्ह सपरिवार इन्द्रदेव आगच्छागच्छेत्यादि इन्द्रार्चनम् ॥ एवं लघुपीठेषु दशदिक्पालपूजा ॥

अर्थ— ॐ ह्रीँ क्रौँ इत्यादि मंत्राने इन्द्राचे पूजन करावे. ही इंद्रदेवता दशदिक्पालांपैकी समजावी. त्याप्रमाणे लहान लहान पीठांवर दहा दिक्पालाची पूजा करावी.

ततः ॐ ह्रीँ स्थालीपाकमुपहरामि स्वाहा ॥ पुष्पाक्षतैरुपहार्य स्थालीपाकग्रहणम् ॥

अर्थ— नंतर ॐ ह्रीँ इत्यादि मंत्राने फुले आणि अक्षता ह्यांनी भरून स्थालीपाक ( पूर्वी सांगितलेली पांच पंचपात्री ) आपल्या जवळ ठेवावा.

ॐ ह्रीँ होमद्रव्यमादधामि स्वाहा ॥ होमद्रव्याधानम् ॥

अर्थ— ॐ ह्रीँ इत्यादि मंत्राने अग्नीत हवन करण्याचे पदार्थ जवळ ठेवून घ्यावेत.

ॐ ह्रीँ आज्यपात्रमुपस्थापयामि स्वाहा ॥ आज्यपात्रस्थापनम् ॥

अर्थ—'ॐ ऱ्हीं' इत्यादि मंत्रानें तुपाचें भांडे जवळ ठेवावें.

ॐ ऱ्हीं स्रुचमुपस्करोमि स्वाहा ॥ स्रुचस्तापनं मार्जनं जलसेचनं पुनस्तापनमग्रे निधापनं च ॥

अर्थ — 'ॐ ऱ्हीं' इत्यादि मंत्रानें स्रुची (अर्थात होम करण्याचें द्रव्य ज्यांत घेऊन होम करतात तें लांकडाचें पात्र) त्याला संस्कार करावा. तो असा- प्रथम ती स्रुची अग्नीवर धरून तापवावी. मग तिच्यावर जलानें प्रोक्षण करावें नंतर पुनः तापवावी; आणि मग ती आपल्या पुढें ठेवावी.

ॐ ऱ्हीं स्रुवमुपस्करोमि स्वाहा । स्रुवस्थापनं तथा ॥

अर्थ— 'ॐ ऱ्हीं' या मंत्रानें स्रुवा (तांब्याची किंवा लांकडाची पळी) त्यालाही वरील प्रमाणेंच संस्कार करून आपल्या पुढें ठेवावी.

ॐ ऱ्हीं आज्यमुद्वासयामि स्वाहा ॥ दर्भपिण्डोज्वलेन आज्यस्योद्वासनमुत्पाचनमवेक्षणं च ॥

अर्थ— ॐ ऱ्हीं या मंत्रानें तुपाला संस्कार करावा. दर्भाची जुडी पेटवून ती तुपाचें पात्र उचलून धरून त्याच्या खालीं धरावी. आणि तूप तापवावें. नंतर खालीं ठेवून त्याकडे हवन करणाऱ्यानें पहावें.

ॐ ऱ्हीं पवित्रतरजलेन द्रव्यशुद्धिं करोमि स्वाहा ॥ होमद्रव्यप्रोक्षणम् ॥

अर्थ— 'ॐ ऱ्हीं' इत्यादि मंत्रानें होमाचें द्रव्य शुद्धोदक प्रोक्षण करून शुद्ध करावें.

ॐ ऱ्हीं कुशानादधामि स्वाहा ॥ दर्भैरुपादाय सर्वद्रव्यसंस्पर्शनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीं ' इत्यादि मंत्राने दर्भाची जुडी घेऊन तिच्या योगानें होमद्रव्याला स्पर्श करावा.

ॐ ह्रीं परमपवित्राय स्वाहा ॥ अनामिकांगुल्यां पवित्रधारणम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीं ' इत्यादि मंत्राने उजव्या हाताच्या शेवटच्या बोटाच्या जवळ असलेल्या बोटांत दर्भाचे पवित्र धारण करावे.

ॐ ह्रीं सम्यग्दर्शनज्ञानचारित्राय स्वाहा ॥ यज्ञोपवीतधारणम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीं ' इत्यादि मंत्राने यज्ञोपवीत धारण करावें. [ यज्ञोपवीत धारण करावयाचें त्यासंबंधानें असें आहे की, नित्ययज्ञांत रोज रोज नवीन यज्ञोपवीत धारण करण्याचे कारण नाही. गळ्यांत असलेल्या जुन्या यज्ञोपवीतालाच जल व गंध लावावे. ह्मणजे ते रोज नवें झाल्यासारखेंच होतें. आणि नैमित्तकयज्ञांत मात्र नवीन यज्ञोपवीत धारण केलें पाहिजे. असें समजावें. ]

ॐ ह्रीं अग्निकुमाराय परिषेचनं करोमि स्वाहा ॥ अग्निपर्युक्षणम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीं ' इत्यादि मंत्रानें अग्निकुंडाच्या भोवत्यानें पाणी शिंपडावें.

ततः ॐ ह्रीं अर्हं अर्हत्सिद्धकेवलिभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीं पञ्चदशातिथिदेवेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीं नवग्रहदेवेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीं द्वात्रिंशदिन्द्रेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीं दशलोकपालेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीं अग्नीन्द्राय स्वाहा ॥

षडेतान् मन्त्रानष्टादशकृत्वः पुनरावर्तनेनोच्चारयन् स्रुवेण प्रत्येकमाज्याहुतिं कुर्यादित्याज्याहुतयः १०८ ॥

अर्थ— नंतर 'ॐ ऱ्हीं अर्हं' इत्यादि सहा मंत्रांनी पळीनें तुपाच्या आहुती अग्नींत घालाव्यात. त्या प्रत्येक मंत्राच्या शेवटीं एकेक याप्रमाणें सहा मंत्रांच्या सहा आहुती होतात. आणि हे सहा मंत्र अठरा वेळां ह्मटलें आणि आहुती दिल्या, ह्मणजे एकंदर आहुति एकशेंहे आठ होतात.

ॐ ऱ्हां अर्हत्परमेष्ठिनस्तर्पयामि स्वाहा ॥ ॐ ऱ्हीं सिद्धपरमेष्ठिनस्तर्पयामि स्वाहा ॥ ॐ ऱ्हूं आचार्यपरमेष्ठिनस्तर्पयामि स्वाहा ॥ ॐ ऱ्हौं उपाध्यायपरमेष्ठिनस्तर्पयामि स्वाहा ॥ ॐ ऱ्हः सर्वसाधुपरमेष्ठिनस्तर्पयामि स्वाहा ॥ अवान्तरे पंच तर्पणानि ॥

अर्थ—वरील तुपाच्या आहुती घालून झाल्यावर 'ॐ ऱ्हां' इत्यादि मंत्रानें पांच वेळ तर्पण करावें. हें तर्पण पुढेंही प्रत्येक द्रव्याचें हवन झाल्यावर करावयाचें असतें; ह्मणून याला 'अवांतर तर्पण' (मध्यें करावयाचें तर्पण) असें ह्मणतात

ॐ ऱ्हीं अग्निं परिषेचयामि स्वाहा ॥ क्षीरेणाग्निपर्युक्षणम् ॥

अर्थ— नंतर 'ॐ ऱ्हीं' इत्यादि मंत्रानें कुंडाच्या आंत अग्नीच्या भोंवत्यानें दुधाची धार एक वेळ

तेन वस्त्रेण कुम्भास्यं संच्छाद्य शोधयेज्जलम् ॥
शनैः शनैश्च धाराभिर्यथा नोल्लङ्घयेद्घटम् ॥ १४ ॥

अर्थ— पूर्वी सांगितलेल्या वस्त्राने घागरीचें तोंड झांकून त्यावर पाण्याची धार-ज्या तऱ्हेनें पाणी घागरीच्या तोंडावरून वाहून जाणार नाही,—अशा तऱ्हेनें हळूहळू सोडून पाणी शोधावें.

शेषजलत्याग.

शेषं जलं तु तत्रैव तीर्थे निक्षेपयेत्पुनः ॥
तीर्थादागत्य गेहे तु पुनः संशोधयेज्जलम् ॥ १५ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें पाणी शोधीत असतां घागर भरून जें पाणी उरलें असेल, तें पुनः त्या तीर्थातच टाकून द्यावें. मग घरी येऊन पुनः तें पाणी शोधावें.

घटीद्वये गते चापि पुनरेवं विशोधयेत् ॥
प्रातःकाले तु संशोध्य शेषं पूर्वजले क्षिपेत् ॥ १६ ॥
मुहूर्तं गालितं तोयं प्रासुकं प्रहरद्वयम् ॥
उष्णोदकमहोरात्रमगालितमिवोच्यते ॥ १७ ॥

अर्थ— पुढें दोन घटिका गेल्यावर पुनः तें पाणी शोधावें. ह्याप्रमाणें प्रातःकाली दुसऱ्या वेळीं

केल्यावर राहिलेलें पाणी पूर्वीच्या पाण्यांत टाकावें. ह्याप्रमाणें शोधलेलें पाणी दोन घटकापर्यंत निर्जतुक असतें. वेलदोडे, वाळा, वगैरे पदार्थांचा वास लावलेलें पाणी दोन प्रहरपर्यंत शुद्ध असतें. आणि तापविलेलें पाणी एक अहोरात्रपर्यंत निर्जतुक असतें. त्याच्या पुढें तें न शोधल्यासारखें होतें.

जलसंस्कार

वासयेत्पाटलीपुष्पैर्मूलैरौसीरकैस्तथा ॥
एलाकर्पूरकाभ्यां तु चन्दनादिसुवस्तुना ॥ १८ ॥

अर्थ— पाडळीची फुलें, वाळा, वेलदोडे, कापूर, चंदन वगैरे पदार्थांचा संस्कार त्या पाण्याला करावा. ह्मणजे ह्यांचा वास लावावा.

जलबिंदूतील जीवाचें परिमाण

एकबिन्दूद्भवा जीवाः पारापतसमा यदि ॥
भूत्वा चरन्ति चेज्जम्बूद्वीपोऽपि पूर्यते च तैः ॥ १९ ॥

अर्थ— पाणी शोधण्याचें कारण त्यातील सर्व जंतु निघून जावेत एवढेंच आहे. ते जंतु किती असतात असें जर ह्मणाल, तर त्याचें प्रमाण असें आहे कीं, पाण्याच्या एका थेंबांत असलेले जंतु जर पारव्या एवढे मोठे होऊन हिंडूं लागतील, तर, त्यांच्या योगानें हें सारें जंबूद्वीप भरून जाईल. इतके जंतु पाण्याच्या

एका थेंबांत असतात. ह्यावरून सर्व समजण्यासारखें आहे.

जलगालनाची आवश्यकता.

तस्माद्यत्नः परः कार्यो धर्माय जलशोधने ॥
नूतनं सुदृढं वस्त्रं ग्राह्यं श्रावकधार्मिणा ॥ २० ॥

अर्थ— पाणी न शोधल्यानें अनंतानंत जंतूंचा नाश होतो, ह्मणून पाणी शोधण्याबद्दल फारच खबरदारी घेतली पाहिजे. श्रावकानें पाणी शोधण्यास जें वस्त्र घ्यावयाचें तें नवें असून वळकट असें घ्यावें.

तुच्छवस्त्रनिंदा

पट्टकूलमतिसूक्ष्मं बहुमूल्यं दृढं घनम् ॥
परिधत्ते स्वयं वस्त्रं जलार्थे तु दरिद्रता ॥ २१ ॥

अर्थ— पुष्कळ किमतीचें, वळकट, बारीक, भरीव सुताचें असें उंची वस्त्र आपण नेसावयास घेतों. आणि पाणी गाळण्यास मात्र तसलें वस्त्र मिळूं नये; तेवढ्याकरितां दारिद्र्य यावें; हें अगदीं वाईट!

पेषण ( दळणें )

अथ पेषणं ॥ गोधूमादिसुधान्यानि संशोध्य शुचिभाजने ॥
नूतनानि पवित्राणि पेषयेज्जीवयत्नतः ॥ २२ ॥

अर्थ— आतां स्त्रियांच्या पेषणक्रियेबद्दल सांगतात— नवीं आणि पवित्र अशीं गहूं वगैरे धान्यें शुद्ध अशा भांड्यांत निवडून घेऊन, ती आपल्या शक्तीच्या मानानें जोरानें किंवा हळू दळावींत.

त्याज्य धान्यें.

घुणितं जीर्णितं धान्यं वर्णस्वादविपर्ययम् ॥
पेषयेत्कुट्टयेन्नैव भिक्षुभ्योऽपि न दीयते ॥ २३ ॥

अर्थ— आळ्या झालेलें, जुनें, ज्याचा रंग बदललेला आहे असें, आणि ज्याचा वास वाईट येऊं लागला आहे असें धान्य दळूं नये; आणि कांडूं नये. इतकेंच नव्हें, तर तें धान्य भिक्षेलाही घालूं नये.

किडे झालेलें धान्य उन्हात वगैरे न टाकणें.

घुणितं कीटसंयुक्तं घर्मे मार्गेऽथवा जले ॥
धान्यं प्रसार्यते नैव जीवघातो भवेद्यतः ॥ २४ ॥

अर्थ— आळ्या आणि किडे झालेलें धान्य उन्हांत, रस्त्यावर किंवा पाण्यांत टाकूं नये. कारण त्या योगानेंच त्यांतील जीवांचा नाश होतो.

धान्य पुष्कळ दिवस ठेवण्याचा निषेध.

बहुदिनानि रक्ष्यन्ते न च धान्यानि संग्रहे ॥

उत्पत्तिस्त्रसजीवानां यतः सञ्जायते भुवि ॥ २५ ॥

अर्थ— धान्यें फार दिवस संग्रही ठेऊं नयेत. कारण, फार दिवस ठेविल्यामुळें धान्यांत त्रसजीवांची उत्पत्ति होते.

तण्डुलेषु च चूर्णेषु छिदलेषु च शीघ्रतः ॥
उत्पत्तिस्त्रसजीवानां तस्माद्वेगाद्व्ययो मतः ॥ २६ ॥

अर्थ— तांदुळ, पीठ आणि हरभरे वगैरे डाळीची धान्यें यांत त्रसजीवांची उत्पत्ति फारच जलद होते. म्हणून त्यांचा व्यय लवकर करावा.

पाककर्म

अथाग्निः ॥ स्नात्वा जलेन वा शीर्षं हस्तौ संशोध्य मृत्स्नया ॥
परिधाय पटं धौतं प्रविशेत्स्त्रीर्महानसे ॥ २७ ॥

अर्थ— आतां स्त्रियाची पाकक्रिया सांगतात— स्नान करून, मस्तक आणि हात हे माती लावून स्वच्छ धुवून, आणि धुतलेलें वस्त्र नेसून, स्त्रीयांनी सैपाक करण्याच्या घरांत जावें.

चुल्ल्यां संशोध्य जीवादीन् पूर्वभस्म परित्यजेत् ॥
निर्जन्तूनि सुशुष्काणि चेन्धनानि समानयेत् ॥ २८ ॥

अग्निं सन्धुक्षयेच्चुल्ल्यां प्रक्षाल्य स्थालिकास्ततः ॥
स्वयं पाकविधिः कार्यो नानारससमन्वितः ॥ २९ ॥
घृतपक्क पयःपाकं सूपोदनं सशर्करम् ॥
आपूपव्यञ्जनान्येव भाग्यस्येदं फलं विदुः ॥ ३० ॥

अर्थ— नंतर चुलीत काही जीवजंतु वगैरे आहेत किंवा काय हें नीट पाहून, ज्यांत जीवजंतु नाहीत असें वाळलेले सर्पण आणून तीत घालावें. मग अग्नि पेटवून, व स्वयंपाकाची भांडी धुवून घेऊन, अनेक रसांनीं युक्त असा पाक स्त्रीनें स्वतः करावा. त्यांत आपल्याला जसें वैभव असेल, त्या मानानें तुपांत तळलेले पदार्थ, दुधात शिजविलेले पदार्थ, वरण, भात, साखरेनें युक्त असे पदार्थ, अनरसे वगैरे पदार्थ, तिखट, लोणची वगैरे पदार्थ करावेत. असें पुष्कळ करणें हें भाग्याचें फल आहे.

स्त्रियांचा भोजनकाल

आदौ सन्तर्प्य सत्पात्रं भर्तारं च सुतादिकम् ॥
गृहदेवांश्च सन्तर्प्य ततः स्याद्भोजनं स्त्रियः ॥ ३१ ॥

अर्थ— पाक सिद्ध झाल्यावर प्रथम सत्पात्राला अन्नदान करून, नंतर पति, पुत्र वगैरेंना भोजन घालून, गृहदेवतांना बलिदान करून नंतर स्त्रियांनीं भोजन करावें.

इत्येवं पञ्च कर्माणि कथितानि सुयोषिताम् ॥
नराणां कर्म षष्ठं तु व्यापारः कथ्यतेऽधुना ॥ ३२ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें साध्वी स्त्रियांची पांच कर्मे सांगितलीं. आतां पुरुषांचें सहावें कर्म (व्यापार) सांगतों.

ब्राह्मणाचा उद्योग

ब्राह्मणः सरितं गत्वा वस्त्रं प्रक्षालयेत्ततः ॥ दर्भादि समिधो नीत्वा गृहे संस्थापयेत्ततः ॥ ३३ ॥ सदनं यजमानस्य गत्वा धर्मोपदेशनाम् ॥ तिथिवारं च नक्षत्रं कथयेद्ग्रहशुद्धये ॥ ३४ ॥ श्रीजिनगुणसम्पत्तिं श्रुतस्कधं द्विकावलिम् ॥ मुक्तावलिं तथाऽन्यं च व्रतोद्देशं समादिशेत् ॥ ३५ ॥ चतुर्दश्यष्टमी चाद्य प्रातर्वा व्रतवासरम् ॥ चान्द्रं बलं गृहाचारं कथयेज्जैनशासनात् ॥ ३६ ॥ कथां व्रतविधानस्य पुराणानि जिनेशिनाम् ॥ ग्रहहोमं गृहाचारं कथयेज्जिनशासनात् ॥ ३७ ॥ यजमानेन यद्दत्तं दानं धान्यं धनं तथा ॥ गृह्णीयाद्धर्षभावेन बहुतृष्णाविवर्जितः ॥ ३८ ॥ आशीर्वादं ततो दद्याद्भक्ताचित्तं न दूषयेत् ॥ गृहमागत्य पुत्रादीन् तोषयेन्मधुरोक्तितः ॥ ३९ ॥ गृहचिन्तां ततः कुर्याद्वस्त्रैर्धा-

न्यैश्च पूरयेत् ॥ गोधनैर्दधिदुग्धैश्च तृणकाष्ठैश्च भूषणैः ॥ ४० ॥

अर्थ— ब्राह्मणानें नदीला जाऊन आपलीं वस्त्रें धुवून, दर्भ, समिधा घेऊन आपल्या घरीं आणून ठेवाव्यांत. नंतर यजमानांच्या (श्रावकांच्या) घरीं जाऊन त्यांना धर्मोपदेश करावा. त्यांना तिथि, वार, नक्षत्र वगैरे सांगून त्यांचे इष्टानिष्ट ग्रह सांगावेत. श्रीजिनेंद्राच्या गुणांचें वर्णन करून, श्रुतस्कंध, द्विकावलि, मुक्तावली, तशींच दुसरीं व्रतें वगैरे हें सर्व त्यांनां नीट समजावून सांगावें. चतुर्दशी, अष्टमी त्या दिवशीं असल्यास किंवा दुसरे दिवशीं असल्यास त्यांना सांगावीं. व्रताचा दिवस, गृहस्थांचा आचार, शांतिपूजा वगैरे जिनागमावरून त्यांना सांगावें. व्रताच्या कथा, श्रीजिनेंद्रांचीं पुराणें हीं त्यांना सांगावींत आणि ग्रहहोमाचा विधि जिनशास्त्राला अनुसरून असलेला त्यांना सांगावा. यजमान जें आपल्याला दान देईल, किंवा धान्य अथवा द्रव्य देईल, तें संतोषानें घ्यावें. अधिक आशा करूं नये. मग त्या यजमानाला आशीर्वाद द्यावा. यजमानाच्या मनाला वाईट वाटूं देऊं नये. नंतर घरीं येऊन मधुर भाषणानें पुत्रादिकांचा संतोष करावा मग आपल्या घरांत काय आहे, काय नाहीं, ह्याचा विचार करून, वस्त्र, धान्य, गाय, दहि, दूध, गवत, लाकूडफांटा वगैरे पदार्थांची घरात समृद्धि करावी.

ब्राह्मणांचें लक्षण

ददाति प्रतिगृह्णाति सदानं जिनमर्चति ॥

पठते पाठयत्यन्यानेवं ब्राह्मण उच्यते ॥ ४१ ॥

अर्थ— सद्दान दुसऱ्याला देणें, दुसऱ्यानें दिलेलें आपण घेणें, जिनपूजा करणें, स्वतः स्वाध्याय करणें आणि दुसऱ्याकडून करविणें, ह्या क्रिया करीत असल्यामुळेंच लोक ब्राह्मणाला ब्राह्मण ह्मणतात. ह्मणून ब्राह्मणानें ह्या क्रिया अवश्य केल्या पाहिजेत.

पुत्रपौत्रसुतादीनां लौकिकाचाररक्षणम् ॥
विवाहादिविधानं च कुर्याद्द्रव्यानुसारतः ॥ ४२ ॥
गोऽश्वमहिषीमुख्यानि स्वं स्वं स्थानं निवेशयेत् ॥
सन्ध्यायाः समये सन्ध्यां विप्रः कुर्याच्च पूर्ववत् ॥ ४३ ॥

अर्थ— मुलगा, नातु, मुली ह्यांचे लौकिकाचार संभाळावेत. आणि आपल्याजवळ जसें द्रव्य असेल, त्या मानानें त्यांचीं विवाहादि कार्यें करावींत. प्रत्येक दिवशीं संध्याकाळीं घोडा, गाय, म्हैस, वगैरे जनावरें रानांतून आल्यावर त्यांच्या त्यांच्या ठिकाणावर नेऊन तीं बांधावींत. घोड्याचें ठाण निराळें असावें. संध्याकाळीं ब्राह्मणानें पूर्वी सांगितलेल्या विधीनें संध्या करावी.

क्षत्रियाचा उद्योग.

क्षत्रियाणां विधिं प्रोचे संक्षेपाच्छ्रूयतां त्वहम् ॥ भूत्यो यः क्षत्रियस्तेन गन्तव्यं

राजसद्मनि ॥ ४४ ॥ सभास्थितं महीपालं नत्वाऽग्रे स्थीयते भुवि ॥ सशस्त्रः स्वामिभक्तः सन्करकुड्मलवान्मुदा ॥ ४५ ॥ नृपाज्ञया यथास्थानं तथैवोपविशेत्सुखम् ॥ स्वाम्यर्थं च त्यजेत्प्राणान् स्वाम्यर्थं देहधारणम् ॥ ४६ ॥ एतत्कार्यं प्रकर्तव्यं तच्छ्रुत्वा शीघ्रतः पुनः ॥ तत्कर्तव्यं प्रयत्नेन प्रसन्नः स्याद्यतो नृपः ॥ ४७ ॥ स्वामिद्रोही कृतघ्नश्च यश्च विश्वासघातकः ॥ पशुघाती कृपाहीनः श्वभ्रं याति स निन्दकः ॥ ४८ ॥ नृपाज्ञा यत्र विद्येत स गच्छेत्तत्र वेगतः ॥ सन्ध्यां सामायिकं पात्रदानं तपश्च साधयेत् ॥ ४९ ॥

अर्थ— आतां क्षत्रियांचा आचार थोडक्यांत सांगतों. क्षत्रियांमध्यें जो सेवक असा क्षत्रिय असेल त्यानें राजमंदिरांत जाऊन, सभेंत वसलेल्या राजाला वंदन करून, जमिनीवर उभे राहावें. राजापुढें उभे असतांना आपल्या जवळ शस्त्र असावें. अंतःकरणांत स्वामिभक्ति असावी आणि हात जोडलेले असावेत. मग राजानें वसण्याची आज्ञा केल्यावर तसेंच वसावें. आपल्या स्वामीकरितां प्राण देण्याचा प्रसंग आला तर प्राण द्यावेत. कारण सेवकानें देहधारण करावयाचें तें स्वामीकरितांच करावयाचें आहे. राजानें 'अमुक कार्य कर' अशी आज्ञा केली असतां, तें कार्य मोठ्या प्रयत्नानें त्वरेनें करावें. कारण त्यामुळें स्वामीची आपल्यावर कृपा होते. स्वामिद्रोही, कृतघ्न, विश्वासघातकी, पशु मारणारा, निर्दय आणि स्वामीची

निंदा करणारा असा सेवक नरकांत जातो. ह्मणून अशा गोष्टी करूं नयेत. राजा ज्या ठिकाणी जाण्याची आज्ञा करील, त्या ठिकाणीं त्वरेनें जावें. सेवकानें नेहमीं संध्या, सामायिक, पात्रदान आणि तप ह्या नित्यक्रिया कराव्यात.

राजाचे आचार.

अथ राजा ॥ देवपूजां परां कृत्वा पूर्वोक्तविधिना नृपः ॥
आगत्योपविशेत्स्वस्थः सभायां सिंहविष्टरे ॥ ५० ॥
न्यायमार्गेण सर्वांश्च सुदृष्ट्या प्रतिपालयेत् ॥
प्रजा धर्मसमासक्ता विना प्रजां कुतो नृपः ॥ ५१ ॥
दुष्टानां निग्रहं कुर्याच्छिष्टानां प्रतिपालनम् ॥
जिनेन्द्राणां मुनीन्द्राणां नमनादिक्रियां भजेत् ॥ ५२ ॥
राजानं धर्मिणं दृष्ट्वा धर्मं कुर्वन्ति वै प्रजा ॥
यथा प्रवर्तते राजा तथा प्रजा प्रवर्तते ॥ ५३ ॥

अर्थ— आतां राजा असलेल्या क्षत्रियाचा आचार सागतात– राजानें प्रातःकाली पूर्वी सांगितलेल्या विधीनें पूजा करून, स्वस्थ मनानें सभेंत सिंहासनावर बसावें. आपल्या धर्माप्रमाणें चालणाऱ्या आपल्या

प्रजेचे कृपादृष्टीनें आणि न्यायाला अनुसरून रक्षण करावें. कारण प्रजेवांचून धर्माची वृद्धी होत नाहीं. राजानें दुष्टांना शिक्षा करावी, सज्जनांचें रक्षण करावें, आणि जिनेंद्र व मुनींद्र यांना नमस्कार करावा. राजा धार्मिक असला ह्मणजे त्याला पाहून प्रजा धर्माचरण करूं लागते. कारण, जसा राजा वागेल तशी प्रजा वागूं लागते. ह्मणून राजानें धार्मिक असावें.

राजाचें लक्षण

सप्ताङ्गैश्च भवेद्राराजा भयाष्टकविवर्जितः ॥
शक्तित्रयसमोपेतः सिद्धित्रयविराजितः ॥ ५४ ॥

अर्थ— सात अंगें ज्याच्या राज्याला आहेत, ज्याची आठ प्रकारचीं भयें नष्ट झालीं आहेत, जो तीन प्रकारच्या शक्तींनीं युक्त आहे. आणि ज्याला तीन प्रकारच्या सिद्धि प्राप्त झाल्या आहेत तो राजा होय. तात्पर्य, राजाच्या ठिकाणीं इतके गुण असावयास पाहिजेत.

सात अंगें.

अमात्यसत्सुहृत्कोशदुर्गराष्ट्रबलानि च ॥
स्वामिना सह सप्तैव राज्याङ्गानि सुखाय वै ॥ ५५ ॥

अर्थ— प्रधान, मित्र, कोश, किल्ला, राष्ट्र, सैन्य आणि राजा हीं राज्याचीं सात अंगें होत. हीं

सातही अंगें सुखसाधनें आहेत.

आठ भीति.

अनावृष्ट्यतिवृष्ट्याग्निसस्योपघातमारिकाः ॥
तस्करव्याधिदुर्भिक्षा एता अष्टौ भीतयः स्मृताः ॥ ५६ ॥

अर्थ— अवर्षण, अतिवृष्टि, अग्निमलय, रोगानें धान्याचा नाश, महामारी, दरोडेखोर लोक आणि रोगाची साथ ह्या आठ भीति होत.

शाकिनीभूतवेतालरक्षःपन्नगवृश्चिकाः ॥
मूषकाः शलभाः कीरा इत्यष्टौ भीतिकारकाः ॥ ५७ ॥

अर्थ— शाकिनी, भूतें, वेताळ, राक्षस, सर्प, विंचू, उंदीर, टोळ आणि राघू ह्या आठ वस्तु भीति उत्पन्न करणाऱ्या आहेत.

अमात्यलक्षण

सुपूजायां महीपाले सर्वत्र सुखचिन्तकः ॥
परमनःस्थितं ज्ञानं ज्ञात्वा चरत्यमात्यकः ॥ ५८ ॥

अर्थ— सज्जनांचा सत्कार होण्याबद्दल, आपल्या राजाबद्दल आणि बाकीच्या सर्व कार्याबद्दल जो

संतोषानें विचार करतो आणि दुसऱ्याच्या मनांतील गोष्ट जाणून जो वागतो तो अमात्य होय.

मित्रलक्षण.

अमुत्रात्र हितंकारी धर्मबुद्धिप्रदायकः ॥
गुणवाची परोक्षेऽपि स सुहृत्कथितो बुधैः ॥ ५९ ॥

अर्थ— ह्या लोकीं आणि परलोकीं हित करणारा, धर्माविषयीं बुद्धि उत्पन्न करणारा, मागेंसुद्धां गुणांचेंच वर्णन करणारा असा जो पुरुष, त्याला पंडित लोक मित्र असें ह्मणतात.

कोशलक्षण.

धनधान्यसुवर्णानि वस्त्रशस्त्राणि भेषजम् ॥
रसा रत्नानि भूरीणि सन्ति कोश इति स्मृतः ॥ ६० ॥

अर्थ— द्रव्य, धान्य, सुवर्ण, वस्त्रें, औषधें, रसायनें आणि रत्नें हीं ज्यांत विपुल आहेत, त्याला कोश ( जामदारखाना ) असें ह्मणावें.

दुर्गलक्षण

वैषम्यं वारिणा पूर्णं सर्वधान्यास्त्रसंग्रहः ॥
तृणकाष्ठानि भृत्याश्च पलायनावकाशकम् ॥ ६१ ॥

उपला वह्नियन्त्राणि गुटीगोफणपङ्क्सा: ॥
गूढमार्गाः प्रवर्तन्ते यत्र दुर्गः स उच्यते ॥ ६२ ॥

अर्थ— उंच सखल असे प्रदेश, भरपूर पाणी, सर्व प्रकारचीं धान्यें, गवत, लांकूड, अग्नि, चाकर मनुष्यें, पळण्याच्या वाटा, मोठमोठे दगड, अग्नियंत्रें, गोळे, गोफणी, दूध वगैरे पदार्थ आणि गुप्त मार्ग इतक्या गोष्टी जेथें आहेत त्याला दुर्ग ( किल्ला ) ह्मणावें.

राष्ट्रलक्षण.

पुरनगरसुग्रामाः खेटखर्वटपत्तनाः ॥
द्रोणाख्यं वाहनं यत्र सन्ति राष्ट्रः स उच्यते ॥ ६३ ॥

अर्थ— पुर, नगर, मोठीं गांवें, खेट, खर्वट, पत्तनें, द्रोण आणि वाहन हीं ज्यात आहेत त्याला राष्ट्र असें ह्मणावें.

ग्रामादिकांचें लक्षण.

ग्रामो वृत्त्या वृतः स्यान्नगरमुरुचतुर्गोपुरोद्भासिसालं ।
खेटं नद्यद्रिवेष्टयं परिवृतमभितः खर्वटं पर्वतेन ॥
ग्रामैर्युक्तं परं स्याद्दलितदशशतैः पत्तनं रत्नयोनि ।

द्रोणाख्यं सिन्धुवेलावलयवलयितं वाहनं चाद्रिरूढम् ॥ ६४ ॥

अर्थ— ज्याच्या भोवत्यानें कुंपण असेल त्याला ग्राम किंवा गांव ह्मणावें. ज्या गांवाला मोठमोठ्या चार वेशी असतील त्याला नगर असें ह्मणावें. नदी आणि पर्वत ह्यांनीं वेढलेल्या गांवास खेट ह्मणावें. चोहीकडून पर्वतानें वेढलेल्या गांवास खर्वट ह्मणावें. ज्याच्या खालीं शेंकडो गांवें आहेत त्याला पुर ह्मणावें. ज्या ठिकाणीं रत्नें उत्पन्न होतात त्या गांवास पत्तन ह्मणावें. समुद्रकिनाऱ्यानें वेढलेल्या गांवास द्रोण ह्मणावें. आणि पर्वतावर असलेल्या गांवास वाहन असें ह्मणावें.

चतुरंग सैन्य.

अञ्जनाद्रिसमा नागा वायुवेगास्तुरङ्गमाः ॥
रथाः स्वर्गविमानाभा भीमा भृत्याश्चतुर्बलम् ॥ ६५ ॥

अर्थ— काजळाच्या पर्वतासारखे हत्ती, वायूसारखा वेग असलेले घोडे, स्वर्गातील विमानासारखे सुशोभित रथ आणि भयंकर शिपाई ह्या चारींना बल असें ह्मणतात.

राजगुण

तेजस्वी शान्तरूपश्च त्यागी भोगी दयापरः ॥
बलिष्ठश्च रणे योद्धा प्रोक्तो राजा स पण्डितः ॥ ६६ ॥

अर्थ— राजा तेजस्वी, शांत आकृतीचा, उदार, संपत्तीचा उपभोग घेणारा, दयाळू, शक्तिमान्, रणांत युद्ध करणारा आणि विद्वान् असा असावा.

तीन शक्ति आणि तीन सिद्धि.

तिस्रो मन्त्रप्रभूत्साहशक्तयश्च प्रकीर्तिताः ॥
वाङ्मनोदैवसिध्यन्ता नृपे तिस्रश्च सिद्धयः ॥ ६७ ॥

अर्थ— प्रभुशक्ति ( राजाची शक्ति ), मंत्रशक्ति ( मसलती शक्ति ) आणि उत्साहशक्ति ( हुरूप असल्याची शक्ति ) ह्या तीन शक्ति आहेत. आणि वाणीची सिद्धि, मनाची सिद्धि आणि देवतेची सिद्धि ह्या तीन सिद्धि आहेत.

सहा गुण.

षाड्गुण्यं नृपतौ प्रोक्तं राज्यरक्षणहेतवे ॥
सन्धिविग्रहयानासनाश्रयद्वैधभावनम् ॥ ६८ ॥

अर्थ— तह करणें, युद्ध करणें, शत्रूची तयारी किती आहे हें समजण्याकरितां कांहीं तरी निमित्त काढून शत्रूच्या राज्यांत जाणें, कोठें तरी दबा धरून रहाणें, कोणाचा तरी आश्रय करणें आणि शत्रूच्या सैन्यांत फितुरी करणें हे सहा गुण राजाच्या ठिकाणीं आपल्या राज्याच्या रक्षणाकरितां अवश्य असले पाहिजेत.

चार उपाय व मत्राचे ( मसलतीचे ) भेद.

समतादर्शनं स्वस्य ददेद्दानमरिं प्रति ॥
भेदः शत्रोश्च सेनाया दण्डः शत्रुनिपातनम् ॥ ६९ ॥
सहायाः साधनोपायो देशकालबलाबले ॥
विपत्तेश्च प्रतीकारः पञ्चधा मन्त्र इष्यते ॥ ७० ॥

अर्थ— समता ह्मणजे सर्वत्र समदृष्टी ठेवणें, दान ह्मणजे शत्रूला नजराणा पाठविणें, भेद ह्मणजे शत्रूच्या सैन्यांत फूट करणें, आणि दंड ह्मणजे शत्रूला मारणें हे चार उपाय होत. हे राजानें योग्य वेळीं योजिले पाहिजेत. आपल्याला सहाय कोण आहे? आपल्याजवळ साधन काय? उपाय कोणता योजला पाहिजे? देश आणि काळ हे आपल्याला अनुकूल आहेत किंवा प्रतिकूल आहेत, आणि आलेलें संकट कसें घालवावें ह्या प्रत्येकाचा विचार करणें हा पांच प्रकारचा मंत्र ( मसलत ) होय.

मुकुटबद्ध राजाचें लक्षण

अष्टादशाक्षौहिणीनां स्वामी मुकुटबन्धकः ॥
क्षोणीलक्ष्म ततो वक्ष्ये जिनागमानुसारतः ॥ ७१ ॥

अर्थ-- अठरा अक्षोहिणीचा जो स्वामी तो मुकुटबद्ध राजा होय. अक्षोहिणींचें लक्षण जिनागमाला

अनुसरून पुढें सांगतों.

सैन्याचे आठ भेद

पत्तिः सेना च सेनास्यं गुल्मो वाहिनिपृतने ॥
चमूरनीकिनी चेति चाष्टधा शृणु तद्विधिम् ॥ ७२ ॥

अर्थ— पत्ति, सेना, सेनामुख, गुल्म, वाहिनी, पृतना, चमू आणि अनीकिनी असे सैन्याचे आठ विभाग आहेत. त्यांची रचना पुढीलप्रमाणें आहे.

पत्तीचें लक्षण

एकविंशतिका अश्वाश्चतुरशीतिपादगाः ॥
गजो हस्ती रथश्चैकः पत्तिरित्यभिधीयते ॥ ७३ ॥

अर्थ— एकवीस घोडे, चवऱ्याऐंशी पायदळ, एक हत्ती आणि एक रथ एवढ्या सैन्याला पत्ति असें ह्मणतात.

सेना वगैरे भेदाचीं लक्षणें.

पत्तिस्त्रिगुणिता सेना तिस्रः सेनामुखं च ताः ॥
सेनामुखानि च त्रीणि गुल्ममित्यनुकीर्त्यते ॥ ७४ ॥

वाहिनी त्रीणि गुल्मानि पृतना वाहिनीत्रिकम् ॥
चमूस्त्रिपृतना ज्ञेया चमूत्रयमनीकिनी ॥ ७५ ॥
अनीकिन्यो दश प्रोक्ताः प्राज्ञैरक्षौहिणीति सा ॥
अष्टादशाक्षोहिणीपः प्रभुर्मुकुटवर्द्धनः ॥ ७६ ॥

अर्थ— तीन पत्ति म्हणजे एक सेना. तीन सेना म्हणजे एक सेनामुख. तीन सेनामुखें म्हणजे एक गुल्म, तीन गुल्में म्हणजे एक वाहिनी, तीन वाहिनी म्हणजे एक पृतना, तीन पृतना म्हणजे एक चमू, तीन चमू म्हणजे एक अनीकिनी, आणि दश अनीकिनी म्हणजे एक अक्षौहिणी होय. एका अक्षौहिणींत ४५९२७० घोडे, १८३७०८० पायदळ, २१८७० हत्ती, २१८७० रथ, सर्व मिळून २३४००९० इतकें सैन्य असतें. अशा अठरा अक्षौहिणींचा जो स्वामी तो मुकुटबद्ध राजा होय.

मुकुटबद्धराजाचें दुसरें लक्षण.

अथ मतान्तरम् ॥ एकमण्डलभू राजा श्रेण्यश्चाष्टादशाधिपः ॥
मुकुटबद्ध इत्याख्यः स एव मुनिभिः परः ॥ ७७ ॥

अर्थ— एक मंडलाचा अधिपति जो राजा तो अठरा श्रेणीचा अधिपति असल्यास तोच मुकुटबद्ध नांवाचा राजा समजावा, असें मुनींनी सांगितलें आहे. हें दुसरें मत आहे.

श्रेणींचीं नावें.

सेनापतिर्गणपतिर्वणिजां पतिश्च । सेनाचतुष्कपुररक्षचतुःसुवर्णाः ॥
मन्त्रीस्वमात्यसुपुरोधमहास्वमात्याः । श्रेण्यो दशाष्टसहिता विबुधश्च वैद्यः ॥ ७८ ॥

अर्थ— सेनापति, ज्योतिषी, श्रेष्ठी, चार प्रकारच्या [ हत्ती, घोडे, पायदळ, रथ ] सेना, कोतवाल, ब्राह्मण वगैरे चार वर्ण, मंत्री, अमात्य, पुरोहित, महामात्य, पंडित आणि वैद्य यांना १८ श्रेणी असें म्हणतात.

अधिराजा, महाराजा, अर्धमण्डल, मण्डली, अर्धचक्री आणि चक्री यांचीं लक्षणें.

एतत्पतिर्भवेद्राजा राज्ञां पञ्चशतानि यम् ॥
सेवन्ते सोऽधिराजस्स्यादस्माच्च द्विगुणो भवेत् ॥ ७९ ॥
महाराजस्ततश्चार्धमण्डली मण्डली ततः ॥
महामण्डल्यर्धचक्री ततश्चक्रीत्यनुक्रमात् ॥ ८० ॥

अर्थ— ह्या अठरा श्रेणींचा जो अधिपति तो राजा होय. अशा प्रकारचे पांचशें राजे ज्याची सेवा करितात, तो अधिराजा होय. अधिराजाच्या दुप्पट ज्याचें ऐश्वर्य असेल त्याला महाराजा म्हणावें. त्याच्या दुप्पट असलेल्यास अर्धमंडली म्हणतात. पुढें मंडली, महामण्डली, अर्धचक्री आणि चक्री असे भेद आहेत; ते दुपटी दुपटीचे आहेत असें समजावें.

चक्रवर्तीचें लक्षण आणि त्याची सम्पत्ति.

चतुरशीतिर्लक्षाश्च मातङ्गाश्च रथास्तथा । अष्टादश सुकोट्योऽश्वा
वायुवेगास्तुरङ्गमाः ॥ ८१ ॥ चतुरशीतिः सुकोट्यो यमदूताः पदातयः ॥
षण्णवतिसहस्राणि स्त्रीणां च गुणसम्पदाम् ॥ ८२ ॥ द्वात्रिंशत्सुसह-
स्राणि मुकुटबद्धभूभृताम् ॥ तावन्त्येव सहस्राणि देशानां सुनिवेशि-
नाम् ॥ ८३ ॥ नाटकानां सहस्राणि द्वात्रिंशत्प्रमितानि वै ॥ ग्रामसप्तति-
सहस्राणि पुराणीन्द्रपुरश्रियाम् ॥ ८४ ॥ ग्रामकोट्यश्च विज्ञेया रम्याः
षण्णतिप्रमाः ॥ द्रोणामुखसहस्राणि नवतिर्नव चैव हि ॥८५॥ पत्तनानां
सहस्राणि चत्वारिंशद्यथाष्ट च ॥ षोडशैव सहस्राणि खेटानां गरिमा मता
॥८६ ॥ भवेयुरन्तरद्वीपाः षट्पञ्चाशत्प्रमामिताः ॥ संवाहनसहस्राणि
संख्यातानि चतुर्दश ॥८७॥ स्थालीनां कोटिरेकोक्ता रन्धने या नियो-
जिता ॥ कोटिशतसहस्रं स्याद्धलानां कुलवैः समम् ॥ ८८ ॥
तिस्रोऽपि व्रजकोट्यः स्युर्गोकुलैः शश्वदाकुलाः ॥ कुक्षिवासशतानीह
ससैवोक्तानि कोविदैः ॥ ८९ ॥ दुर्गाटवीसहस्राणि संख्याष्टाविंश-

तिर्मता ॥ म्लेच्छराजसहस्राणि रम्याष्टादशसंख्यया ॥ ९० ॥ कालाख्यश्च महाकालो माणवः पिङ्गलस्तथा ॥ नैसर्प्पः पद्मः पाण्डुश्च शङ्खश्च सर्वरत्नकः ॥ ९१ ॥ ॥ निधयो नव विख्याता वाञ्छितार्थफलप्रदाः ॥ भद्रेण परिणेतव्या देवाधिष्ठितशक्तयः ॥ ९२ ॥ भोग्यं भाण्डं च शस्त्रं च भूषणं देहवस्त्रकम् ॥ धनं वाद्यं बहुरत्नं ददते निधयः क्रमात् ॥ ९३ ॥ चक्रातपत्रदण्डासिमणयश्चर्म काकिणी ॥ चमूगृहपतीभाश्वयोषित्तक्षपुरोधसः ॥ ९४ ॥ रत्नानि निधयो देव्यः पुरं शय्यासने चमूः ॥ भाजनं वाहनं भोज्यं नाट्यं दशाङ्गभोगकाः ॥ ९५ ॥ गणबद्धामराणां तु सहस्राणि च षोडश ॥ इत्यादिविभवैर्युक्तश्चक्रवर्ती भवेद्भुवि ॥ ९६ ॥

अर्थ— आतां चक्रवर्तीची संपत्ति सांगतात— चवऱ्याऐंशी लक्ष हत्ती, तितकेच रथ, अठराकोटी चांगले घोडे, यमदूतासारखें भयंकर असें चवऱ्याऐंशी कोटी पायदळ, शाण्णव हजार सुंदर स्त्रिया, आपल्या ताब्यांत रहाणारे बत्तीस हजार मुकुटबद्ध राजे, चांगले व्यवस्थितरचनेचे बत्तीस हजार देश, बत्तीस हजार नाटकशाळा, अमरावतीप्रमाणे सुशोभित अशी बहात्तर हजार पुरें, शाण्णव कोटी रम्य अशी गावें, नव्याण्णव हजार

द्रोणमुखें ( नौका ), अठ्ठेचाळीस हजार पत्तनें, सोळा हजार खेट, छप्पन्न अंतर्द्वीपें, चवदा हजार वाहनें, नेहमी स्वयंपाकास लागणारी एक कोटी भांडीं, शंभर हजार कोटी नागर आणि कुळव, ज्यांत गायी पुष्कळ आहेत असे तीन कोटी गौळवाडे, सातशेहे कुक्षिवास (?), अठ्ठावीस हजार किल्ले आणि अरण्यें, अठरा हजार म्लेंच्छ राजे; काल, महाकाल, माणव, पिंगल, नैसर्प, पद्म, पांडू, शंख आणि सर्वरत्न ह्या नांवाचे सर्व प्रकारचें इच्छित फल देणारे आणि त्या त्या निधींच्या देवतांनीं युक्त असल्यामुळें महापुण्यानें प्राप्त होणारे नऊ निधि, (ते क्रमानें– भोग्य पदार्थ, भांडीं, शस्त्रें, भूषणें, गृह, वस्त्रें, द्रव्य, वाद्यें आणि अनेकरत्नें– ह्या वस्तु देत असतात) चक्र, छत्र, दंड, खड्ग, रत्न, चर्म, काकिणी गृहपति, हत्ती, सेनापति, स्त्री, सुतार आणि पुरोहित हीं चवदा रत्नें; निधि, पट्टराण्या, पुर, शय्या, आसन, सैन्य, भांडीं, वाहन, भोज्यपदार्थ आणि नाट्य हे दहा प्रकारचे भोगपदार्थ, आणि सोळा हजार गणी असे देव, इतकें ऐश्वर्य ज्याचें असेल तो भूमीवरील चक्रवर्ती होय.

राजधर्म.

न्यायेन पालयेद्राज्यं प्रजां पालयति स्फुटम् ॥
यः स प्राप्नोति धर्मिष्ठः सदा राज्यमनागतम् ॥ ९७ ॥

अर्थ— जो राज्याचें नीतीनें पालन करतो आणि आपल्या प्रजेचें रक्षण करतो तो धार्मिक राजा,

आपलें नसलेलेंही राज्य मिळवितो.

इत्यतो न्यायमार्गेण हिताय स्वपरात्मने ॥
पालनीयं सदा राज्यं त्रिवर्गफलसाधनम् ॥ ९८ ॥

अर्थ— ह्मणून आपल्या आणि दुसऱ्याच्या कल्याणाकरितां धर्म, अर्थ आणि काम या तीन्ही पुरुषार्थांना प्राप्त करून देणारें राज्य राजानें सर्वदा नीतीनें रक्षण करावें.

सन्यासियोगिविप्रादीँस्तोषयेद्दानमात्रतः ॥
प्रतीत्य शपथैः सर्वाः प्रजा ग्रामं निवासयेत् ॥ ९९ ॥

अर्थ— संन्यासी, योगी आणि ब्राह्मण वगैरेंना दान देऊन तुष्ट करावें. आणि शपथेनें सर्वांना विश्वास उत्पन्न करून गांवें वसवावीत.

कर्णेजपान् खलांश्चोरान् परस्त्रीलंपटान्मदान् ॥
देशान्निर्वासयेद्राजा हिंसकान्मद्यपायिनः ॥ १०० ॥

अर्थ— चहाडी करणारे, दुष्ट, चोर, परस्त्रीलंपट, मत्त झालेले, हिंसा करणारे आणि मद्यपान करणारे अशा लोकांना राजानें आपल्या देशांतून हांकून द्यावें.

स्वदेशादागतं वित्तं यथापात्रं समर्पयेत् ॥

खञ्जं भट्टं नटं काणमन्धादीन्प्रतिपालयेत् ॥ १०१ ॥

अर्थ— आपल्या देशांतून वसूलाचें आलेलें द्रव्य राजानें योग्य पात्राला अर्पण करावें. लंगडा, भट्ट नट, काणा, अंधळा वगैरे लोकांचेंही त्या द्रव्यानें पालन करावें.

इत्यादि देशनं कृत्वा सन्ध्यायाः समये ततः ॥
गच्छेज्जिनालयं राजा सन्ध्यादिक क्रियां भजेत् ॥ १०२ ॥

अर्थ— वर सांगितलेल्या लंगडा वगैरे लोकांना रक्षण करण्याविषयीं आपल्या लोकांना देखील आज्ञा करून, संध्या करण्याच्या वेळीं राजानें जिनमंदिरांत जाऊन संध्या वगैरे नित्यक्रिया करावी. ह्याप्रमाणें क्षत्रियांचा आचार सांगितला.

### वैश्याचा आचार

वैश्यस्य सत्क्रियां प्रोचे पुराणस्यानुसारतः ॥
मषी कृषिः पाशुपाल्यं वाणिज्यं वैश्यकर्मणि ॥ १०३ ॥

अर्थ— आतां पुराणाला अनुसरून वैश्याचा सदाचार सांगतों, लिहिणें, शेतकी, पशुरक्षण आणि व्यापार ह्या चार क्रिया वैश्यकर्मांत मुख्य आहेत.

राजसेवां समाश्रित्य कुर्याद्देशस्य लेखनम् ॥

आयव्ययं कुलाचारं दत्तं भुक्तं नृपेण यत् ॥ १०४ ॥

अर्थ— राजाची नोकरी पतकरून वैश्यानें साऱ्या देशासंबंधानें जें लिहावयाचें असेल तें लिहावें. राजाची प्राप्ति ( वसूल ) किती आहे, खर्च किती आहे; राजाचा कुलाचार कसा आहे; राजानें कोणाला काय दिलें; तसेंच स्वतःकरितां काय खर्च केलें; ह्या सर्व गोष्टी वैश्यानें लिहाव्यात.

स्वार्थं तु यदेने स्वस्य वाऽऽदायं वा कतिप्रमम् ॥
द्रविणं कस्य किं दत्तं गृहीतं किं च कस्य वा ॥ १०५ ॥

अर्थ— तसेंच आपल्या घरांतील खर्च किती झाला, मिळकत किती झाली हें लिहावें. आणि आपण कोणाला किती द्रव्य दिलें, कोणापासून किती द्रव्य घेतलें हेंही लिहावें.

कति धान्यं कति द्रव्यं सुवर्णं वाऽथ गोधनम् ॥
भुक्तिभाण्डं च संलेख्यं यतो न संशयो भवेत् ॥ १०६ ॥

अर्थ— आपल्या घरात धान्य किती आहे, द्रव्य किती आहे, सोनें किती आहे, गायी म्हशी किती आहेत, भोजनाची भांडी किती आहेत, हें सर्व वैश्यानें लिहून ठेवावें. म्हणजे त्या योगानें संशय उत्पन्न होत नाहीं.

लञ्चं खुचं न गृण्हीयात् कूटलेखं च वर्जयेत् ॥

मायाशल्यं निदानं च क्रौर्यरागातिलोभताम् १०७ ॥

अर्थ— त्यानें, कोणी दिलेली लांच अथवा खुशाली घेऊं नये. कोणाचा खोटा लेख लिहूं नये; आणि मायाशल्य ( कपट ), निदान ( वाईट इच्छा ), क्रूरपणा, विषयावर प्रेम आणि अतिलोभ हे सोडावेत.

कृषिकर्म

किंकरं तु समाहूय दत्वा च वृषभान् परान् ॥
बीजधान्यं धनं वित्तं संस्कुर्यात् कृषिकर्म च ॥ १०८ ॥

अर्थ— वैश्यानें आपल्या चाकराला बोलावून आणून त्याजवळ चांगले बैल, बियांचें धान्य, कृषिकर्मास लागणारें साहित्य आणि द्रव्य हीं देऊन त्याजकडून शेतकी करवावी.

वैश्यानें स्वत कृषि करण्याचा निषेध

व्रतधारी क्रियाकारी सामायिकी तपोरतः ॥
न कुर्यात् कर्षणं धर्मी भूरिजीवप्रघातकम् ॥ १०० ॥

अर्थ— व्रतें करणारा, नित्यनैमित्तिक क्रिया करणारा, सामायिक करणारा आणि तप करणारा अशा धार्मिक वैश्यानें कृषिकर्म करूं नये. कारण, त्यांत अनंत जीवांची प्राणहानि होते.

पशुपालन— गोमहिषीतुरंगादीन् संगृह्य च व्ययेत्पुनः ॥

दधि दुग्धं घृतं तक्रं भव्यपात्राय दीयते ॥ ११० ॥

घृतस्य विक्रये दोषो नास्ति व्यापारवर्तिनः ॥

शेषं गव्यं न विक्रीन तृणाद्यैस्तर्पयेद्धनम् ॥ १११ ॥

अर्थ— गायी, म्हशी, घोडे वगैरे जनावरांचा संग्रह करून त्याचा विक्रयही करावा. दही, दूध, तूप आणि ताक हे पदार्थ भव्यपात्राला दान करावेत. व्यापार करणाऱ्या वैश्यानें तूप विकलें असता कांहीं दोष नाहीं. बाकीचे पदार्थ मात्र विकूं नयेत. आणि आपल्या गायी वगैरे जनावरांचें गवत वगैरेंच्या योगानें पोषण करावें. हें वैश्याचें पशुपालन कर्म सांगितलें. पुढें वाणिज्य ( व्यापार ) कर्म सांगतात.

वाणिज्याचे तीन प्रकार

वाणिज्यं त्रिविधं प्रोक्तं पण्यं वृषभवाहनम् ॥

आब्धिनावादिकं चेति कुटुम्बपोषणाय वै ॥ ११२ ॥

अर्थ— वाणिज्य तीन प्रकारचें आहे. दुकान घालणें, बैलावरून माल परगांवीं नेणें आणि समुद्रांतून नौकेतून माल नेणें, हें तीनही प्रकारचें वाणिज्य वैश्यानें आपल्या कुटुंबाच्या पोषणाकरितां करावें.

मोजमाप व ताजवा यांत कमीज्यास्त नसणें

गजयन्त्रे समानत्वं न्यूनाधिक्यविवर्जितम् ॥

अल्पलाभेन कर्तव्यं वस्त्रस्य विक्रयं मुदा ॥ ११३ ॥

अर्थ— गज नांवाचें वस्त्रें मोजण्याचें साधन व ताजवा हे अगदी बरोबर असावेत. त्यांत कमी जास्ती अगदी करूं नये. आणि वस्त्रें मात्र थोडासा नफा घेऊन संतोषानें विकावींत.

वर्षाकालांतील व्यवहार

वर्षासु सूक्ष्मवस्त्रेषु जन्तूनां सम्भवो भवेत् ॥
तत्प्रतिलेखनं कार्यं श्रावकैर्धर्महेतवे ॥ ११४ ॥

अर्थ— पर्जन्यकालात बारीक कापडांत जीवजंतू होण्याचा संभव असतो, ह्मणून श्रावकानीं ती वस्त्रें वरचेवर झाडून ठेवावींत. ह्मणजे जीवहिंसा न होऊन धर्मरक्षण होईल.

विकत न घेण्याच्या वस्तु

रोमचर्मभवं वस्त्रं कौशीसं(?) रक्तवर्जितम् ॥
नीचगृहारनालेन संलिप्तं नैव विक्रयेत् ॥ ११५ ॥

अर्थ— लोंकरीचें वस्त्र, चामडीचें वस्त्र, न रंगविलेलें रेशमी वस्त्र आणि नीच मनुष्याच्या घरांतील कांजीची खळ ज्याला लाविली आहे असें वस्त्र ही वस्त्रे वैश्यानें विकूं नयेत.

व्यापाराकरिता घेण्याच्या वस्तु

सूत्रं च पट्टसूत्रं च कार्पासं नैव दोषभाक् ॥
पट्टसूत्राण्डकौशाण्डे श्रावकैर्नैव गृह्यते ॥ ११६ ॥ (?)
सुवर्णं रजतं रत्नं गृह्णीयान्मौक्तिकं तथा ॥
कपटं तत्र नो कार्यं वह्निर्लेपादिसम्भवम् ॥ ११७ ॥

अर्थ— सोनें, रुपें, रत्नें आणि मोती हे पदार्थ आपण विकत घ्यावेत. आणि ते विकतांना त्यांच्यावर दुसरें कांहीं द्रव्य लावून त्यांना नसलेलें तेज आणून अशा रीतीनें लबाडी करून विकूं नयेत.

दुसऱ्याला न फसविणें.

कूटद्रव्यं स्वयं ज्ञात्वाऽज्ञानिनं नैव विक्रयेत् ॥
अतिवृद्धं तथा बालं मुग्धं भद्रं न धूर्तयेत् ॥ ११८ ॥

अर्थ— हा माल खोटा आहे असें आपल्याला समजल्यावर तें ज्याला माहीत नाहीं अशा मनुष्याला तो माल विकूं नये. अतिशय म्हातारा मनुष्य, लहान पोर, वेडा झालेला मनुष्य आणि संभावित मनुष्य ह्यांना केव्हांही फसवूं नये.

अग्राह्य द्रव्य.

चोरद्रव्यं नृपद्रव्यं भूपालद्रोहिणस्तथा ॥

चेटीचेटकयोर्वित्तं न ग्राह्यं साधुभिर्जनैः ॥ ११९ ॥

अर्थ— चोराचे जिन्नस, राजाचे जिन्नस, राजद्रोही मनुष्याचे जिन्नस तसेच दास दासी ह्यांचे जिन्नस चांगल्या मनुष्यांनीं विकत घेऊं नयेत.

विस्मृतं पतितं गुप्तवृत्त्या दत्तं च केनचित् ॥
रक्षणे स्थापितं भूमौ क्षिप्तं वा नच गोपयेत् ॥ १२० ॥

अर्थ— कोणाचें विसरलेलें, कोणीं वाटेनें जात असता पडलेलें, कोणीं एकाद्यानें गुप्तपणें ठेवण्याकरितां दिलेलें, तसेंच आपल्याजवळ कोणीं एखाद्यानें रक्षणाकरितां ठेवलेलें आणि कोणीं एखाद्यानें भूमींत पुरून ठेवलेलें अशा प्रकारचें द्रव्य आपण गुप्तपणानें घेऊं नये.

वजनाचे खरेपणाबद्दल

तुलायां न्यायमार्गेण देशधर्मानुसारतः ॥
प्रस्तरादिषु मानेषु न्यूनाधिक्यं न कारयेत् ॥ १२१ ॥

अर्थ— जिन्नस वजन करण्याची तागडी आणि आपल्या देशांतील वहिवाटीप्रमाणें असलेलीं वजनें ह्यांत कमी जास्ती करूं नये.

न्यूनं दीयेत न क्वापि गृण्हीयान्नाधिकं कदा ॥

घृतं गुडादि तैलं च धान्यं तु न कदाचन ॥ १२२ ॥

अर्थ— तूप, गूळ, तेल वगैरे पदार्थ आपण लोकापासून विकत घेतांना जास्ती घेऊं नयेत. आणि दुसऱ्यांस देतांना कमी देऊं नयेत. तसेंच धान्यांत असा प्रकार केव्हाच करूं नये.

व्यापारास अयोग्य वस्तु

मधु च मधुपुष्पाणि कुसुम्भं धायपुष्पकम् ॥ अहिफेनं विषं क्षारं सूक्ष्मधान्यं तिलादिकम् ॥ १२३ ॥ घुणितं सकलं धान्य लाक्षां लोहं च साबुकम् ॥ लोहशस्त्राणि सर्वाणि जीर्णघृतं सतैलकम् ॥ १२४ ॥ पौस्तं माञ्जिष्ठकं क्षेत्रं कूपं जलप्रवाहजम् ॥ इक्षुयन्त्रं तैलयन्त्रं नावं च चर्मभाजनम् ॥ १२५ ॥ लशुनं शृङ्गबेरं च निशाक्षेत्रं च वालजम् ॥ कन्दं मूलं तथा चान्यदनन्तकायिकं परम् ॥ १२६ ॥ सिक्थं च नवनीतं च वनवाटीक्षुकाण्डकम् ॥ पत्राणि नागवल्याश्च वन्हिबाणस्य भेषजम् ॥ १२७॥ खेचरं रोम चर्मास्थि शृङ्खलं पादुकाद्ययम् ॥ मार्जनी च पदत्राणं हिंसोपकरणं परम् ॥ १२८ ॥ इत्यादिकमयोग्य च पूर्वग्रन्थे निषेधितम् ॥ तन्न ग्राह्यं वणिग्वर्यैर्धर्मरक्षणहेतवे ॥ १२९ ॥

अर्थ— मध, मोहाचीं फुलें, कुसुंबा, धायटीची फुलें, अफू, विषें, क्षार, तीळ वगैरे बारीक धान्यें, भाळ्या झालेलें कोणतेंही धान्य, लाक, लोखंड, साबुदाणे, लोखंडाचीं सर्व तऱ्हेची हत्यारें, जुनें तूप, जुनें तेल, पौस्त, मंजिष्ठाची लागण केलेली जमीन, पाण्याचा आड, रहाटगाडगें, उंसाचा चरक, तेलाचा घाणा, नौका, चामड्याचे बुदले, लसूण, आलें, हळद लाविलेली जमीन, चाळज (?) कंद, मुळें दुसरे अनंतकायिक पदार्थ, मेण, लोणी, बागबगीचा, उंसाची कांडी, नागवेलीची पानें, ज्वालाग्राही पदार्थ, ( उडविण्याची दारू वगैरे ) पारा, लोंकर, चर्म, हाडें, लोखंडाच्या साखळ्या, खडावा, फेरसुणी, जोडे आणि हिंसेचीं दुसरी साधनें तसेंच मागें सांगितलेले निषिद्ध व अयोग्य पदार्थ वैश्यांनीं घेऊं नयेत. हे पदार्थ विकत घेतल्यानें अहिंसाधर्माची हानी होते.

व्यापार करण्याला अयोग्य मनुष्ये

अजाघ्नगोघ्नमत्स्यघ्नाः कल्लालाश्चर्मकारकाः ॥
पापर्धिकः सुरापायी एतैर्वक्तुं न युज्यते ॥ १३० ॥

अर्थ— बकरी, गायी, मासे ह्यांना मरणारे लोक, कलाल, चांभार, पातकी आणि मद्यपान करणारे ह्या लोकांशीं भाषणसुद्धा करणें योग्य नाहीं.

एतान्किमपि नो देयं स्पर्शनीयं कदाऽपि न ॥

न तेषां वस्तुकं ग्राह्यं जनापवाददायकम् ॥ १३१ ॥

अर्थ— या वर सांगितलेल्या लोकांना आपण कांहीं देऊं नये. त्यांना स्पर्श करूं नये. आणि त्यांच्या जवळची कोणतीही वस्तु आपण घेऊं नये. कारण, त्यामुळें लोकांना अपवाद येतो.

रजको रञ्जकश्चैव भाडिभुञ्जातिलन्तुदौ ॥
चक्राग्निभस्मपाषाणचूर्णं न कारयेत्क्रियाम् ॥ १३२ ॥

अर्थ— परीट, रंगारी, भडभुंजे आणि तेली यांना त्यांनीं आपापलीं कामें करण्यास आपण उत्तेजन देऊं नये. गाडीनें चाक करणें, अग्नि पेटविणें, कोणत्याही वस्तूची राख करणें, आणि दगड फोडणें हीं कामें आपण कोणास करण्यास सांगूं नये. कारण, त्यांत फार हिंसा होते.

विप्रक्षत्रियवैश्यैश्च स्पृश्यशूद्रैस्तथा सह ॥
व्यापारकरणं युक्तं नीचैर्नीचत्वमुद्भवेत् ॥ १३३ ॥

अर्थ— ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि स्पर्श करण्याला योग्य असे शूद्र यांच्यांशीं व्यापार करावा. नीच मनुष्यांशीं व्यापार केल्यानें आपल्यालाही नीचपणा येतो.

स्पर्श करण्यास योग्य शूद्र.

काछिकमालिकौ कांस्यकनकलोहकारकाः ॥

सूत्रधारः सूचीधारः कुविन्दः कुम्भकारकः ॥ १३४ ॥
रङ्गकारः कुटुम्बी च भाडभुञ्जास्तिलन्तुदः ॥
ताम्बूली नापितश्चैव स्पृश्यशूद्राः प्रकीर्तिताः ॥ १३५ ॥

अर्थ— काछिक ( गवताच्या वगैरे वुड्या करणारा ), माळी, तांबट, सोनार, लोहार, साळी, शिंपी, कोष्टी, कुंभार, रंगारी, कुणबी, भडभुंजा, तेली, तांबोळी आणि हजाम हे स्पर्श करण्यास योग्य अशा प्रकारचे शूद्र समजावेत.

दुसऱ्या देशांत व्यापार करण्याचा प्रकार

योग्यायोग्यमिदं दृष्ट्वा व्यापारः क्रियते बुधैः ॥
दूरदेशगमार्थं च वृषभं वाहयेन्नरः ॥ १३६ ॥
अल्पभारं परिक्षिप्य शनैः सञ्चालयेद्बुधः ॥
आहारोदकपूरेण यावत्तृप्ति तु पूरयेत् ॥ १३७ ॥
पृष्ठे शोफादिके जाते कृपया परिछेदयेत् ॥
उपशमो न यावन्न तावद्भारं न धारयेत् ॥ १३८ ॥

अर्थ—वरील जातींतही योग्यायोग्य विचार करूनच शहाण्यानें व्यापार करावा. व्यापाराकरिता

जीवदयां तु संरक्ष्य तैश्च कार्यं स्वकर्मकम् ॥ १४१ ॥

अर्थ— शूद्रांमध्यें अनेक प्रकारचें शिल्प करणें ही एक विशेष क्रिया आहे. ती क्रिया त्यांनी जीवदया संभाळून करावी.

व्यापारातील वर्तन

विप्रक्षत्रियविट्शूद्राः प्रोक्ताः क्रियाविशेषतः ॥
जैनधर्मे पराः शक्तास्ते सर्वे बान्धवोपमाः ॥ १४२ ॥
लाभालाभे समं चित्तं रक्षणीयं नरोत्तमैः ॥
अतितृष्णा न कर्तव्या लक्ष्मीर्भाग्यानुसारिणी ॥ १४३ ॥

अर्थ— ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण त्यांच्या त्यांच्या क्रियाभेदामुळें सांगितले आहेत. हे चारी वर्ण जैन धर्म पाळण्याला योग्य असल्यानें त्या नात्यानें ते एकमेकाचे बंधूच आहेत असे समजावें. त्यांनी सर्वांनी लाभ किंवा हानी ह्याविषयीं अंतःकरण सम ठेवावें. आणि त्यांनी फार लोभ करूं नये. कारण, लक्ष्मी ही आपापल्या दैवानुसार प्राप्त होणारी आहे.

उद्यमेषु सदा सक्त आलस्यपरिवर्जितः ॥
सदाचारक्रियायुक्तो धनं प्राप्नोति कोटिशः ॥ १४४ ॥

अर्थ— जो आळस टाकून सर्वदा उद्योग करतो, आणि सदाचारानें युक्त असतो, त्याला कोट्यवधि द्रव्य प्राप्त होते. ही गोष्ट त्यांनीं लक्षांत ठेवावी.

सद्व्यापारे तथा धर्मे आलस्यं न हि सौख्यदम् ॥
उद्योगः शत्रुवन्मित्रमालस्यं मित्रवद्रिपुः ॥ १४५ ॥

अर्थ— सदाचार आणि धर्म ह्यांविषयीं आळस केल्यानें सुखप्राप्ति होत नाही. उद्योग हा शत्रूप्रमाणे भासणारा असा मित्र आहे. आणि आळस हा मित्राप्रमाणें भासणारा शत्रु आहे.

जिनस्मरणाचे विशेष प्रसंग

पीडायामद्भुते जृम्भे स्वेष्टार्थप्रक्रमे क्षुते ॥
शयनोत्थानयोः पादस्खलने संस्मरेज्जिनम् ॥ १४६ ॥

अर्थ— काहीतरी पीडा उत्पन्न झाली असतां, आपल्या इष्ट कार्याला आरंभ करण्याच्या वेळी, शिंक आली असतां, निजणें आणि उठणें ह्या वेळी, पाय अडखळला असतां, किंवा ठेंच लागली असतां, श्रीजिनेंद्रांचें स्मरण करावें.

व्यवहारात वागण्याची पद्धति

अश्रद्धेयमसत्यं च परनिन्दात्मशंसने ॥

मध्येसभं न भाषेत कल्युत्पादवचः सदा ॥ १४७ ॥
अर्थनाशं मनस्तापं गृहदुश्चरितानि च ॥
मानापमानयोर्वाक्यं न वाच्यं धूर्तसन्निधौ ॥ १४८ ॥

अर्थ— दुसरे लोक ज्यावर विश्वास ठेवणार नाहींत असें भाषण, खोटें भाषण, दुसऱ्याची निंदा आणि आपली स्तुति हे प्रकार सभेमध्यें करूं नयेत. तसेंच ज्यायोगानें भांडण उत्पन्न होईल असें भाषणही करूं नये. आपली द्रव्यहानी, मनाची पीडा, घरातील मंडळींचें दुर्वर्तन आणि आपला मान व अपमान ह्या गोष्टी लुच्चा लोकाजवळ सांगूं नयेत.

सम्पत्तौ च विपत्तौ च समचित्तः सदा भवेत् ॥
स्तोकं कालोचितं ब्रूयाद्वचः सर्वहितं प्रियम् ॥ १४९ ॥
न्यायमार्गे सदा रक्तश्चोरबुद्धिविवर्जितः ॥
अन्यस्य चात्मनः शत्रुं भावात्प्रकाशयेन्न हि ॥ १५० ॥

अर्थ— संपत्ति आणि विपत्ति ह्या दोहोंविषयीं सर्वदा सारखी बुद्धि ठेवावी. लोकांत बोलण्याचा प्रसंग आला असता त्या प्रसंगाला योग्य असें थोडें आणि हितकर व प्रिय असें बोलावें. न्यायमार्गा- विषयीं सर्वदा आसक्ति असावी. चोरण्याविषयींची बुद्धि टाकून द्यावी. कोणीही मनुष्य आपला किंवा

दुसऱ्याचा शत्रु आहे असें नुसत्या वाग्व्यापारांनींही दर्शवूं नये.

लोकांशीं वागण्याचा प्रकार

वैराग्यभावनाचित्तो धर्मोदेशवचो वदेत् ॥
लोकाकूतं समालोक्य चरेत्तदनुसारतः ॥ १५१ ॥
सत्त्वे मैत्री गुणे हर्षः समता दुर्जनेतरे ॥
कार्यार्थं गम्यते तस्य गेहं नोचेत्कदा च न ॥ १५२ ॥

अर्थ— अंतःकरणांत वैराग्यभावना करून लोकांना धार्मिक उपदेश करावा. लोकांचा अभिप्राय जाणून त्यांच्या अनुरोधानें वागावें. सर्व जीवांविषयीं मित्रभाव असावा. कोणाचेही ठिकाणीं सद्गुण दिसला असतां आनंद मानावा. चांगल्या किंवा वाईट मनुष्यांविषयीं सारखीच बुद्धि ठेवावी. आपल्या कामाकरितां कोणाच्याही घरीं जावें. काम नसल्यास उगीच जाऊं नये.

हिंसापापकरं वाक्यं शास्त्रं वा नैव जल्पयेत् ॥
द्रोहस्य चिन्तनं क्वापि कस्यापि चिन्तयेन्न हि ॥ १५३ ॥

अर्थ— हिंसेचें पातक घडविणारें भाषण करूं नये. तसेंच शास्त्राची बडबड करूं नये. आणि कोणाचें वाईट होण्याबद्दल मनांत चिंतन केव्हाही करूं नये.

दारिद्र्यशोकरोगार्तांस्तोपयेद्भेपजादिना ॥
स्वस्य यदनिष्टं स्यात्तन्न कुर्यात्परे क्वचित् ॥ १५४ ॥

अर्थ— दारिद्र्य, शोक आणि रोग ह्यांनीं पीडित झालेल्या लोकांना औषध वगैरे देऊन संतुष्ट करावें. जें कृत्य लोकांनीं आपल्याबद्दल केलें असतां आपल्याला वाईट वाटतें, तसलें कृत्य दुसऱ्याबद्दल आपण करूं नये.

वस्त्रानें मुखाचें आच्छादन करण्याचे प्रसंग

समीपोक्तौ हासे श्वासे जृम्भे काशे क्षुते तथा ॥
धूमधूलिप्रवृत्तौ च छादयेद्वाससाऽऽननम् ॥ १५५ ॥

अर्थ— दुसऱ्याच्या जवळ जाऊन बोलावयाच्या वेळीं, हंसतांना, मोठ्यानें श्वास सोडतांना, जांभई देण्याच्या वेळीं, शिंक आली असतां आणि धुरांतून अथवा धुरळ्यांतून जावयाचें असतां, तोंड वस्त्रानें आच्छादित करावें.

निद्रेला अयोग्य स्थलें

कूपकण्ठे च वल्मीके चोरवेश्यासुराशिनाम् ॥
सन्निधौ मार्गमध्ये तु न स्वपेत्तु जलाशये ॥ १५६ ॥

अर्थ— आडाच्या तोंडाजवळ, वारुळाच्या शेजारी, चोर, वेश्या आणि मद्यपी ह्यांच्या शेजारी आणि जाण्यायेण्याच्या रस्त्यावर केव्हाही निजूं नये. तसेंच तळ्याच्या कांठावर निजूं नये.

नैको मार्गे व्रजेन्नैकः स्वपेत्क्षेत्रे शवान्तिके ॥
अविज्ञातोदके नैव प्रविशेद्वा गिरौ न हि ॥ १५७ ॥

अर्थ— एकट्यानें मार्गक्रमण करूं नये. शेतांत किंवा प्रेताच्या जवळ एकट्यानें निजूं नये. ज्या पाण्याची आपल्याला माहिती नाही त्या पाण्यांत एकट्यानें शिरूं नये. आणि पर्वतावर चढताना एकट्यानें चढूं नये.

दातृसेवा आणि शास्त्रचिंतन

दातारं पितृबुध्द्या च सेवेत क्षेमहेतवे ॥
पठितान्यपि शास्त्राणि पुनः पुनः प्रचिन्तयेत् ॥ १५८ ॥

अर्थ— आपला योगक्षेम चालण्याकरितां जो आपल्याला द्रव्य देतो, त्याची पित्याप्रमाणें सेवा करावी. एकनार पढलेल्या शास्त्राचा पुनः पुनः विचार करावा.

सूक्ष्मवस्तु तथा सूर्यं नैकदृष्ट्या विलोकयेत ॥
पादत्राणं विना मार्गे गच्छन्ने हि सुधार्मिकः ॥ १५९ ॥

अर्थ— सूक्ष्मवस्तु आणि सूर्य ह्याच्याकडे सारखी दृष्टी लावून पाहूं नये. पायांत पादत्राण ( जोडा ) घातल्यावांचून धार्मिक मनुष्यानें मार्गावरून चालूं नये.

इतर व्यवहार

मूर्खैः सह वदेन्नैव नोल्लङ्घयेद्गुरोर्वचः ॥
दुर्वाक्यं यदि वा मूर्खैर्दत्तं तन्महेत स्वयम् ॥ १६० ॥

अर्थ— मूर्खाशीं भाषण करूं नये. वडिलांच्या सांगण्याची अमर्यादा करूं नये. आणि दुर्जनांनीं वाईट बोललें असता तें आपण सोसावें.

व्यवहाराद्विवादे वा कालुष्यं नोद्वहेद्धृदि ॥
नाकारण हसेदास्यं नासारन्ध्रं न घर्षयेत् ॥ १६१ ॥

अर्थ— व्यवहारामुळें जर एखादे वेळीं काहीं भांडण झालें तर त्याबद्दल मनांत चुरस धरूं नये. कारणावांचून हासूं नये. आणि वरचेवर तोंडावरून हात फिरविणें, नाकांत बोटें घालणें हे व्यापार करूं नयेत.

ब्रूयात्कार्यं दृढीकृत्य वचनं निर्विकारतः ॥
वृथा तृणादि न छेद्यं नांगुल्याद्यैश्च वादनम् ॥ १६२ ॥

अर्थ— आपल्या कार्याचा मनांत दृढ निश्चय करून मनांत कोप वगैरे विकार न आणितां जें

बोलावयाचें असेल तेंच बोलावें. विनाकारण गवताच्या काड्या मोडणें व बोटांनीं आपल्याच अंगावर वाजविणें हे व्यापार करूं नयेत.

मात्रा पुत्र्या भगिन्या वा नैको रहसि जल्पयेत् ॥
आसने शयने स्थाने याने यत्नपरो भवेत् ॥ १६३ ॥

अर्थ— माता, कन्या अथवा भगिनी ह्यांच्याशीं सुद्धां एकांतीं बोलत बसूं नये. बसण्याची जागा, निजण्याची जागा आणि गाडी वगैरे वाहन ह्यांच्यावर चांगली देखरेख करावी.

जनावर वगैरेवर देखरेख ठेवणे

जीवधनं स्वयं पश्येत् समीपे कारयेत्कृषिम् ॥
वृद्धान् बालाँस्तथा क्षीणान् बान्धवान्परितोषयेत् ॥ १६४ ॥

अर्थ— गायी, बैल वगैरे जें जीवधन असेल तें स्वतः आपण पहावें. शेतकी करावयाची ती गांवाच्या जवळच करावी. आणि त्या योगानें वृद्ध लोक, लहान मुलें, शक्तिहीन झालेले लोक आणि आपले इष्टमित्र ह्यांचें पोषण करावें.

न ओलाडण्याच्या वस्तु.

जिनादिप्रतिमाया वा पूज्यस्यापि ध्वजस्य वा ॥

छायां नोल्लङ्घयेन्नीचच्छायां च स्पर्शयेत्तनुम् ॥ १६५ ॥

अर्थ— जिनादि प्रतिमा, किंवा पूज्य असे ध्वज यांच्या सांवलीचें देखील उल्लंघन करूं नये. आणि नीचलोकांच्या सांवलीचा आपल्या देहाला स्पर्श होऊं देऊं नये.

याचकाशीं व अपकार करणाऱ्याशीं वर्तन.

अदानाक्षेपवैमुख्यमार्थिजनेषु नाचरेत् ॥
अपकारिष्वपि जीवेषु ह्युपकारपरो भवेत् ॥ १६६ ॥

अर्थ— याचना करणाऱ्यांना न देणे, त्यांचा तिरस्कार करणें, किंवा त्यांना विमुख पाठविणें हे व्यवहार करूं नयेत. आपल्यावर अपकार करणाऱ्या जीवावर देखील उपकार करावेत.

सायंकालीं वर्ज करण्याचे व्यवहार

निद्रा स्त्रीभोगभुक्त्यध्वयानं सन्ध्यासु वर्जयेत् ॥
साधुजनैर्विवादं तु मूर्खैः प्रीतिं तु नाचरेत् ॥ १६७ ॥

अर्थ— निद्रा, स्त्रीसमागम, भोजन आणि मार्गक्रमण हे व्यवहार सायंकालच्या वेळीं करूं नयेत. सज्जनाबरोबर कलह करावा, परंतु दुर्जनांशी मैत्री करूं नये.

भोजन न करण्याचीं गृहें

छात्रागारे नृपागारे शत्रुवेश्यागृहे तथा ॥
क्रीतान्नसदने नीचार्चकागारे न भुञ्जयेत ॥ १६८ ॥

अर्थ— शिष्य, राजा, शत्रु, वेश्या ह्यांच्या घरांत आणि जेथें अन्नविक्रय करतात त्या घरांत (खाणावळीत) भोजन करूं नये. तसेंच नीच मनुष्याच्या आणि पूजकाच्या घरांतही भोजन करूं नये.

विश्वास न ठेवण्याच्या वस्तु

नखिनां च नदीनां च शृङ्गिणां शस्त्रपाणिनाम् ॥
वनितानां नृपाणां च चोराणां व्यभिचारिणाम् ॥ १६९ ॥
खलानां निन्दकानां च लोभिनां मद्यपायिनाम् ॥
विश्वासो नैव कर्तव्यो वञ्चकानां च पापिनाम् ॥ १७० ॥

अर्थ— नखांनी प्रहार करणारी जनावरें, नद्या, शिगांनी मारणारी जनावरें, शस्त्र हातांत असलेले लोक, स्त्रिया, राजे, चोर, व्यभिचार करणारे लोक, दुष्ट लोक, निंदा करणारे लोक, लोभी, मद्यप, दुसऱ्यास फसविणारे (भामटे) आणि पातकी ह्यांच्यावर केव्हाही विश्वास ठेवूं नये.

इतर व्यवहार करून बाहेरून घरात येणें

मध्ये न पूज्ययोर्गच्छेन्न पृच्छेदप्रयोजनम् ॥

**बहिर्देशात्समायातः स्नात्वाऽऽचम्य विशेद्गृहम् ॥ १७१ ॥**

अर्थ— दोघे पूज्य गृहस्थ उभे राहिले असता त्यांच्या मधून आपण जाऊं नये. कारणावांचून कोणाला कांही विचारूं नये. बाहेरून आलें असता स्नान आणि आचमन करून नंतर घरांत जावें.

कोणत्याही कृत्याच्या आरंभींचें मंगल

**आरम्भे तु पुराणस्यान्यव्यापारस्य कस्यचित् ॥**
**नमः सिद्धेभ्य इत्युच्चैर्नम्रीभूतो वदेद्वचः ॥ १७२ ॥**

अर्थ— पुराण वाचण्यास प्रारंभ करण्याच्या पूर्वी, किंवा दुसरें कोणतेंही कृत्य आरंभ करण्याच्या पूर्वी नम्र होऊन " नमः सिद्धेभ्यः " असें उच्चारावें.

ऐहिकपारलौकिक दृष्टि

**भुञ्जानोऽप्यैहिकं सौख्यं परलोकं विचिन्तयेत् ॥**
**स्तनमेकं पिबन्बालोऽन्यस्तनं मर्दयेद्भुवि ॥ १७३ ॥**

अर्थ— ह्या लोकींचें सुख भोगीत असतांही मनुष्यानें पारलौकिक सुखाचा अवश्य विचार केला पाहिजे. लहान मूल देखील आईच्या एका स्तनाचें पान करीत असतांही दुसरा स्तन हातानें धरीत असतें; हें आपण पहात नाहीं काय?

कृत्वैवं लौकिकाचारं धर्मं विस्मारयेन्न हि ॥
सन्ध्यादिवन्दनां कुर्याद्दीपं प्रज्वलयेद्गृहे ॥ १७४ ॥

अर्थ— ह्याप्रमाणे लौकिक व्यवहार करीत असताही धार्मिक व्यवहाराचे विस्मरण होऊं नये. संध्या-वंदन वेळच्या वेळीं करावें. घरात दीप लावावेत.

दीप आणि त्याच्या मुखाची दिशा

रवेरस्तं समारभ्य यावत्सूर्योदयो भवेत् ॥
यस्य तिष्ठेद्गृहे दीपस्तस्य नास्ति दरिद्रता ॥ १७५ ॥
आयुष्ये प्राङ्मुखो दीपो धनायोदङ्मुखो मतः ॥
प्रत्यङ्मुखोऽपि दुःखाय हानये दक्षिणामुखः ॥ १७६ ॥

अर्थ— सूर्याचा अस्त झाल्यापासून पुनः सूर्योदय होईपर्यंत ज्याच्या घरांत दीप असतो, त्याला केव्हांही दारिद्र्य येत नाही. दीप पूर्वेकडे तोंड करून ठेविला असतां आयुष्य वाढतें. उत्तरेकडे तोंड करून ठेविला असता द्रव्यप्राप्ति होते. पश्चिमेकडे तोंड करून ठेविला तर दुःख उत्पन्न होतें, आणि दक्षिणेकडे तोंड करून ठेविला असता नाश होतो.

चतुर्दिक्षु तु ते दीपाः स्थापिताः सन्ति चेद्गृहे ॥

शुभदास्तु ततो विश्वे न हि दोपस्तु कश्चन ॥ १७७ ॥

अर्थ— चारी दिशेकडे तोंड करून चार दीप लाविले असता ते शुभकारक होतात. त्यात वर सांगितलेला कसलाही दोप नाही.

इत्येवं कथितास्त्रिवर्णजनितो व्यापारलक्ष्म्यागमो ।
ये कुर्वन्ति नरा नरोत्तमगुणास्तं ते त्रिवर्गार्थिनः ॥
भोगानत्र परत्वजन्मनि सदा सौख्यं लभन्ते पर- ।
मन्ते कर्मरिपुं निहत्य विमलं मोक्षं व्रजन्त्यक्षयम् ॥ १७८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणे त्रैवर्णिकांचा धनप्राप्तीचा आचार सांगितला. धर्म, अर्थ आणि काम ह्या तीन पुरुषार्थांची इच्छा करणारे जे सज्जन हा आचार करतात, ते ह्या लोकी अनेक सुखें भोगून परलोकींही सर्वदा सुख भोगितात. आणि शेवटीं कर्मरिपूचा नाश करून, निर्दोष आणि अविनाशी अशा मोक्षाला गमन करतात.

त्रिवर्णसल्लक्षणलक्षिताङ्गो । योऽभाणि चातुर्यकलानिवासः ॥
व्यापाररूपः स च सप्तमोऽसा- । वध्याय इष्टो मुनिसोमसेनैः ॥ १७९ ॥

अर्थ— त्रैवर्णिकांच्या सदाचारानें भरलेला आणि चातुर्य व कला ह्यांचें वसतिस्थान असा हा सदाचारात्मक सातवा अध्याय सोमसेनमुनींनी निरूपण केला.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारकथने

भट्टारकश्रीसोमसेनविरचिते स्वस्वव्यापारकथनीयो

नाम सप्तमोऽध्यायः समाप्तः ॥

॥ श्रीवीतरागाय नम ॥

## ॥ अष्टमोऽध्यायः ॥

मंगल

हरिवंशोदयपर्वतसूर्योऽजेयप्रतापपरिभाव्यः ॥
जयति सदरिष्टनेमिस्त्रिभुवनराजीवकाल्हादी ॥ १ ॥

अर्थ— हरिवंशरूपी जो उदयपर्वत त्यावरील सूर्यच कीं काय! असा आणि अजिंक्य अशा प्रतापामुळें चिंतनीय असा आणि त्रिभुवनरूपी कमलाला आनंदित करणारा असा जो सत्पुरुष अरिष्टनेमि तो उत्कर्ष पावत आहे.

चन्द्रप्रभं जिनं वन्दे चन्द्राभं चन्द्रलाञ्छनम् ॥
भव्यकुमुदिनीचन्द्रं लोकालोकविकाशकम् ॥ २ ॥

अर्थ— चंद्राप्रमाणें ज्याची कांति आहे, चंद्र हेंच ज्याचें चिन्ह आहे, जो भव्यजीवरूपी कमलिनीला उल्लसित करीत आहे आणि लोकालोकात्मक अशा संपूर्ण विश्वाचें जो प्रकाशन करीत आहे अशा चंद्रप्रभ-जिनेंद्राला मी नमस्कार करतों.

अध्यायातील विषय

गर्भाधानादयो भव्यास्त्रिंशत्सुक्रिया मताः ॥
वक्ष्येऽधुना पुराणे तु याः प्रोक्ता गणिभिः पुरा ॥ ३ ॥

अर्थ-- पूर्वी गणधरांनी पुराणात ज्या श्रावकांच्या तेहेत्तीस क्रिया सांगितल्या आहेत, त्या कल्याणप्रद अशा गर्भाधान वगैरे क्रिया आतां सांगतों.

त्रयस्त्रिंशत्क्रिया

आधानं प्रीतिः सुप्रीतिर्धृतिर्मोदः प्रियोद्भवः ॥
नामकर्म बहिर्यानं निषद्या प्राशनं तथा ॥ ४ ॥
व्युष्टिश्च केशवापश्च लिपिसंस्थानसंग्रहः ॥
उपनीतिर्व्रतचर्या व्रतावतरणं तथा ॥ ५ ॥
विवाहो वर्णलाभश्च कुलचर्या गृहीशिता ॥
प्रशान्तिश्च गृहत्यागो दीक्षाद्य जिनरूपता ॥ ६ ॥
मृतकस्य च संस्कारो निर्वाणं पिण्डदानकम् ॥
श्राद्धं च सूतकद्वैतं प्रायश्चित्तं तथैव च ॥ ७ ॥

तीर्थयात्रेति कथिता द्वात्रिंशत्संख्यया क्रियाः ॥
त्रयस्त्रिंशच्च धर्मस्य देशनाख्या विशेषतः ॥ ८ ॥

अर्थ— १ गर्भाधान, २ प्रीति, ३ सुप्रीति, ४ धृति, ५ मोद, ६ प्रियोद्भव, ७ नामकर्म, ८ बहिर्यान, ९ निषद्या, १० अन्नप्राशन, ११ व्युष्टि, १२ केशवाप ( चूडाकरण ), १३ लिपिसंग्रह, १४ उपनयन, १५ व्रतचर्या, १६ व्रतावतरण, १७ विवाह, १८ वर्णलाभ, १९ कुलचर्या, २० गृहीशिता, २१ प्रशांति, २२ गृहत्याग, २३ दीक्षा, २४ जिनरूपता, २५ मृतसंस्कार, २६ निर्वाण, २७ पिंडदान, २८ श्राद्ध, २९ जननाशौच, ३० मृताशौच, ३१ प्रायश्चित्त आणि ३२ तीर्थयात्रा ह्या बत्तीस क्रिया, आणि ३३ धर्मदेशना ही तेहेत्तीसावी क्रिया होय. ह्या क्रिया पुढें विस्तारानें सांगतात.

### अथ गर्भाधानम्

ऋतुमती स्वहस्ते तु यावद्दिनचतुष्टयम् ॥
मल्लिकादिलतां धृत्वा तिष्ठेदेकान्तसद्मनि ॥ ९ ॥
चतुर्थे वासरे पञ्चगव्यैः संस्नापयेच्च ताम् ॥
हरिद्रादिकसत्कस्तुसुगन्धैरनुचर्चयेत् ॥ १० ॥

अर्थ— प्रथमतः ऋतुमती झालेल्या स्त्रीनें चार दिवसपर्यंत मोगरी वगैरेचा वेल आपल्या हातांत धरून

एकांतस्थळीं बसावें. मग चवथे दिवशीं तिला पंचगव्यानें स्नान घालावें. आणि हळद वगैरे मंगलद्रव्यें व सुगंधद्रव्यें यांचें तिच्या अंगाला लेपन करावें.

प्रथम दिवसींचे कृत्य

प्रथमर्तुमती नारी भवत्यत्र गृहाङ्गणे ॥
ब्रह्मस्थानात्पृथग्भागे कुण्डत्रयं प्रकल्पयेत् ॥ ११ ॥
पूर्ववत्पूजयेत्सूरिः प्रतिमां वेदिकास्थिताम् ॥
चक्रच्छत्रत्रयोपेतां यक्षयक्षीसमन्विताम् ॥ १२ ॥

अर्थ— स्त्री प्रथम ऋतुमती झाली ह्मणजे घरांतील अंगणांत ब्रह्मस्थान सोडून दुसऱ्या जाग्यांत तीन कुंडें घालावींत. आणि उपाध्यायानें चक्रत्रय, छत्रत्रय, यक्ष यक्षिणी यानीं युक्त असलेल्या वेदिकेवरील प्रतिमेचें पूर्वी सांगितल्याप्रमाणें पूजन करावें.

ततः कुण्डस्य प्राग्भागे हस्तमात्रं सुविस्तरम् ॥
चतुरस्रं परं रम्यं संस्कुर्याद्वेदिकाद्वयम् ॥ १३ ॥
पञ्चवर्णैस्ततस्तत्र संलिखेदग्निमण्डलम् ॥
अष्टदिशासु पद्माष्टं मध्ये कर्णिकया युतम् ॥ १४ ॥

अर्थ— मग कुंडाच्या पूर्वेकडे एक हात विस्ताराच्या चतुष्कोण अशा दोन वेदिका ( कट्टे ) कराव्यात. त्या प्रत्येकावर पांच रंगानी अग्निमंडल काढावें आणि त्यांवर अष्ट दिशांना मध्यें कर्णिकेनें युक्त अशी आठ कमलें काढावीत.

चवथ्या दिवशीचें कृत्य आणि गर्भाधानविधि

चतुर्थे वाऽह्नि सुस्नातौ जायापती निवेश्य च ॥
तत्र चालङ्कृतौ वृद्धस्त्रीभिश्च क्रियते क्रिया ॥ १५ ॥
मृदा संलिप्य सद्भूमिं निशाचूर्णैश्च तण्डुलैः ॥
तयोरग्रे लिखेद्यन्त्रं स्वस्तिकाकारमुत्तमम् ॥ १६ ॥
तत्र सपल्लवं कुम्भं मालावस्त्रसुसूत्रितम् ॥
स्थापयेन्मङ्गलार्थं तु सत्तत्रं विधिपूर्वकम् ॥ १७ ॥

अर्थ— मग चवथ्या दिवशी स्नान केलेल्या स्त्रीशी सहवर्तमान तिच्या पतीला वृद्ध सुवासिनी स्त्रियांकडून अलंकृत करवून त्या ठिकाणी आणून बसवावें. त्याच्या पुढच्या बाजूस जमीन मातीनें सारवून त्यावर तांदुळांचें व हळदीचें स्वस्तिकाच्या आकाराचें यंत्र काढून त्याच्यावर पंच पल्लव, माला, वस्त्र आणि सूत्र ह्यांनीं सुशोभित केलेला कलश पूजा करून मंगलाकरितां विधिपूर्वक स्थापन करावा.

आचार्यस्तं करे धृत्वा पुण्याहवचनैर्वरैः ॥
सिञ्चयेद्दम्पती तौ च पुण्यक्षेमार्थचिन्तकः ॥ १८ ॥

अर्थ— मग आचार्यानें तो कलश हातांत घेऊन " त्या दंपत्याचें कल्याण व्हावें, त्यांना पुण्य घडावें, त्यांना द्रव्यप्राप्ति व्हावी " अशा प्रकारचें मनांत चिंतन करून पुण्याहवाचनमंत्रांनी त्या दंपत्यावर कुंभांतील जलानें अभिषेक ( सेंचन ) करावा.

त्रिःपरीत्य ततो वह्निं तत्र चोपविशेत्पुनः ॥
सौभाग्यवनिताभिश्च कुङ्कुमैः परिचर्चयेत् ॥ १९ ॥
नीराजनां ततः कृत्वा वर्धयेच्च जलाक्षतैः ॥
वस्त्रताम्बूलभूषाभिः पूज्यौ तौ ताभिरादरात् ॥ २० ॥

अर्थ— अभिषेक झाल्यावर अग्नीला त्या दंपत्यानें तीन प्रदक्षिणा करून पुनः आपल्या पूर्वीच्या जाग्यावर येऊन बसावें. मग सुवासिनी स्त्रियांनीं त्यांना कुंकू लावावें आणि त्यांना नीराजन (कुरवंडी) करून जलयुक्त अक्षतांनी त्यांची वृद्धी करावी. म्हणजे तुमची दोघाची वृद्धि होवो असें त्यांच्या मस्तकावर अक्षता टाकून म्हणावें. यावेळीं त्या स्त्रियांनीं त्या दंपत्याची वस्त्र तांबूल अलंकार या वस्तूंच्या योगानें प्रेमानें पूजा करावी.

वरवध्वो युवाभ्यां भो अस्मद्वंशोऽस्तु वृद्धिमान् ॥
इत्याशीर्वचनैस्तौ च सन्तोषाद्वा विसर्जयेत् ॥ २१ ॥

अर्थ— आणि हे वधूवरांनो! तुमच्या योगानें आमचा वंश वृद्धीला प्राप्त होवो अशा प्रकारचे आशीर्वाद देऊन त्या दंपत्यास संतोषानें तेथून घरांत पाठवावें.

स्वजातीयाँस्ततः सर्वानन्नदानैश्च तर्पयेत् ॥
सद्गन्धैः पूजयेत्प्रीत्या ताम्बूलाम्बरभूषणैः ॥ २२ ॥

अर्थ— नंतर अन्नदानानें सर्व स्वजातीयांची तृप्ती करावी. आणि सुवासिक गंध, तांबूल वस्त्रें भूषणें इत्यादिकांनी त्यांची संतोषानें पूजा करावी. ह्मणजे सत्कार करावा.

इत्यादिकविधिः कार्यः प्रथमर्तौ स्त्रियो गृहे ॥
ततः सन्तानवृद्धिः स्यात्केवलं धर्महेतुका ॥ २३ ॥

अर्थ— स्त्रीला प्रथम ऋतुदर्शन आपल्या घरीं झालें असतां अशा प्रकारचा विधि करावा. त्या योगानें धार्मिक अशा प्रकारच्या संततीची वृद्धि होते.

अथ स्त्रीसम्भोगः ।

स्वगृहे प्राक् शिरः कुर्याच्छ्वाशुरे दक्षिणामुखः ॥

प्रत्यङ्मुखः प्रवासे च न कदाचिदुदङ्मुखः ॥ २४ ॥

अर्थ— आतां स्त्रीसंभोगासंबंधानें विशेष विधि सांगतात. आपल्या घरीं पूर्वेकडे मस्तक करून शयन करावें. श्वसुराच्या घरी दक्षिणेकडे आणि मार्गांत असतां पश्चिमेकडे मस्तक करून शयन करावें. उत्तरेकडे मस्तक करून केव्हांही निजूं नये.

शयनास अयोग्य स्थलें.

तृणे देवालये चैव पाषाणे चैव पल्लवे ॥
अङ्गणे द्वारदेशे तु मध्यभागे गृहस्य च ॥ २५ ॥
रिक्तभूमौ तथा लोष्टे पार्श्वे चोच्छिष्टसन्निधौ ॥
शून्यालये स्मशाने च वृक्षमूले चतुष्पथे ॥ २६ ॥
भूतस्थानेऽहिगेहे वा परस्त्रीचोरसन्निधौ ॥
कुलाचाररतो नित्यं न स्वपेच्छ्रावकः क्वचित् ॥ २७ ॥

अर्थ— गवतावर, देवालयांत, दगडावर, पाल्यावर, अंगणांत, दारांत, मध्यगृहांत, नुसत्या जमिनीवर, ढेकळावर, उष्ट्याच्या जवळ, ज्या घरांत कोणी नाहीं अशा घरांत, स्मशानांत, झाडाखालीं, चव्हाट्यावर, भूताच्या जाग्यांत, सर्पाच्या घरांत, परस्त्री किंवा चोर यांच्या सन्निध कुलाचार संभाळ-

णाऱ्या श्रावकानें कधींही शयन करूं नये.

स्त्रीसमागमाचा काल

ऋतुमत्यां तु भार्यायां तत्र सङ्गादिकं चरेत् ॥
अनृतुमत्यां भार्यायां न सङ्गमिति केचन ॥ २८ ॥

अर्थ— भार्या ऋतुमती असतांना तिच्याशीं समागम करावा. आणि ऋतुमती नसतांना करूं नये असें कित्येक आचार्यांचें ह्मणणें आहे. स्त्री रजस्वला झाल्यापासून सोळा दिवसपर्यंत तिला ऋतुमती असें ह्मणतात. त्यांत पहिले तीन दिवस टाकून राहिलेल्या तेरा दिवसांत ती ऋतुमती असल्यानें समागमाला योग्य आहे असें समजावें. आणि सोळा दिवसांच्या पुढें मात्र तिच्याशीं समागम करूं नये; असें तात्पर्य आहे.

गर्भाधानांगभूतं यत्कर्म कुर्याद्दिवैव हि ॥
रात्रौ कुर्याद्विधानेन गर्भबीजस्य रोपणम् ॥ २९ ॥

अर्थ— गर्भाधान क्रियेच्या अंगभूत असलेलें कर्म दिवसा पूर्वी सांगितल्याप्रमाणें करावें. आणि मुख्य विधि पुढें सांगितल्याप्रमाणें रात्रीं करावा.

स्त्रीसमागमविधि.

मूत्रादिकं ततः कृत्वा क्षालयेत्रिफलाजलैः ॥
योनिं रात्रौ गते यामे सङ्गच्छेद्रतिमन्दिरम् ॥ ३० ॥

अर्थ— [ आतां ह्या पुढची क्रिया मराठी भाषेनें सांगणें शिष्टाचाराला अनुसरून जरी योग्य नाहीं, तथापि त्यांत कांहीं गोष्टी नेहमी व्यवहारांत उपयोगी पडण्यासारख्या असल्यानें केवल मराठी भाषाच ज्यांना समजते त्यांना त्या समजणें शक्य नसल्यानें, होईल तितक्या प्रकारानें मर्यादा न जाऊं देतां तेवढ्याच गोष्टी मराठींत लिहून बाकीच्या जशाच्या तशाच संस्कृतांत ठेवितों. ज्यांना तो धार्मिक विधि समजण्याची इच्छा असेल त्यानी संस्कृतज्ञाकडून समजून घ्यावा. ]

नंतर एक प्रहर रात्र संपल्यावर दुसऱ्या प्रहरांत स्त्रीनें मूत्रोत्सर्ग करून त्रिफलेच्या ( हिरडा, बेहेडा, अवळकाठी ह्यांना त्रिफला ह्मणतात ) पाण्यानें जननेंद्रिय प्रक्षालन करावें, मग शयनमंदिरांत जावें.

पादौ प्रक्षालयेत्पूर्वं पश्चाच्छय्यां समाचरेत् ॥
मृदुशय्यां स्थितः शेते रिक्तशय्यां परित्यजेत् ॥ ३१ ॥

अर्थ— प्रथम पादप्रक्षालन करून नंतर शय्या करावी. ती शय्या मृदु असावी, खरखरीत असूं नये.

शय्येजवळ असावयाच्या वस्तु

उपानहौ वेणुदण्डमम्बुपात्रं तथैव च ॥

ताम्बूलादिसमस्तानि समीपे स्थापयेद्गृही ॥ ३२ ॥

अर्थ— निजावयाच्या ठिकाणीं पायांतील जोडे, वेळवाची कांठी, पाण्याचें भांडें आणि विड्याचें सामान इतके पदार्थ गृहस्थानें नेहमीं जवळ ठेवावेत.

मंगलवस्तु

कुङ्कुमं चाञ्जनं चैव तथा हारीतसुन्दरम् ॥
धौतवस्त्रं च ताम्बूलं संयोगे च शुभावहम् ॥ ३३ ॥

अर्थ— केशर, काजळ, पिवळें रंगविलेलें सुंदर वस्त्र आणि विड्याचें सामान ह्या वस्तु स्त्रीसमागमकालीं मंगलकारक समजाव्यात.

भर्तुः पादौ नमस्कृत्य पश्चाच्छय्यां समाविशेत् ॥
सा नारी सुखमाप्नोति न भवेद्दुःखभाजनम् ॥ ३४ ॥

अर्थ— स्त्रीनें आपल्या पतीला नमस्कार करून मग शय्येवर जावें. असें करणारी स्त्री सुखी होते. केव्हांही दुःखी होत नाहीं.

स्वपेत् स्त्री प्राक् शिरः कृत्वा प्रत्यक्पादौ प्रसारयेत् ॥
ताम्बूलचर्वणं कृत्वा सकामो भार्यया सह ॥ ३५ ॥

चन्दनं चानुलिप्यांगे धृत्वा पुष्पाणि दम्पती ॥
परस्परं समालिंग्य प्रदीपे मैथुनं चरेत् ॥ ३६ ॥
दीपे नष्टे तु यः सङ्गं करोति मनुजो यदि ॥
यावज्जन्म दरिद्रत्वं लभते नात्र संशयः ॥ ३७ ॥
पादलग्नं तनुश्चैव ह्युच्छिष्टं ताडनं तथा ॥
कोपो रोषश्च निर्भर्त्सः संयोगे न च दोषभाक् ॥ ३८ ॥

अर्थ— तांबूल भक्षण करून स्त्रियेनें पूर्वेकडे मस्तक करून निजावें आणि पुरुषानेंही त्याचप्रमाणें निजावें. त्या दंपत्यानें एकमेकाच्या अंगाला चंदन लावून पुष्पमाला घालाव्यात. रतिकालीं दीप असावा. दीप नसतां स्त्रीसमागम करणारा मनुष्य जन्मभर दरिद्री होतो. रतिकालीं एकमेकास पाय लागला असतां व एकमेकांचें उच्छिष्ट भक्षण करणें, एकमेकांवर रागावणें, एकमेकांचा तिरस्कार करणें ह्यांत दोष नाहीं. इतर कालीं असें करणें दोषास्पद होतें.

ताम्बूलेन मुखं पूर्णं कुंकुमादिसमन्वितम् ॥
प्रीतमाल्हादसंयुक्तं कृत्वा योगं समाचरेत् ॥ ३९ ॥
विना ताम्बूवदनां नग्नामाक्रान्तरोदनाम् ॥

दुर्मुखां च क्षुधा युक्तां संयोगे च परित्यजेत् ॥ ४० ॥
भुक्तवानुपविष्टस्तु शय्यायामभिसम्मुखः ॥
संस्मृत्य परमात्मानं पत्न्या जघे प्रसारयेत् ॥ ४१ ॥
अलोमशां च सद्धुचामनार्द्रां सुमनोहराम् ॥
योनिं स्पृष्ट्वा जपेन्मन्त्रं पवित्रं पुत्रदायकम् ॥ ४२ ॥

अर्थ— स्त्रियेला तांबूल भक्षण करवून केशर वगैरे सुगंधि पदार्थांनी तिला प्रेमयुक्त करावें. जिच्या मुखांत तांबूल नाही अशी, नग्न, आक्रोश करणारी, रोदन करणारी, दुर्मुखलेली आणि क्षुधित झालेली अशी स्त्री समागमाला योग्य नव्हे स्त्रीसमागमाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें आपणही उपोषित असूं नये. स्त्रीसमागमकाली श्लोक ४२ यांत सांगितलेली क्रिया करून पुढील पुत्रदायक मंत्र मुखानें ह्मणावा.

स्त्रीसमागमकालीं पठन करण्याचा मंत्र

ॐ ह्रीं क्लीं ब्लूं योनिस्थदेवते मम सत्पुत्रं जनयस्व अ सि आ उ सा स्वाहा ॥ १ ॥

इति मंत्रेण गोमयगोमूत्रक्षीरदधिसर्पिःकुशोदकैर्योनिं सम्प्रक्षाल्य श्रीगन्धकुंकुमकस्तूरिकाद्यनुलेपनं कुर्यात् ॥

योनिं पश्यन् जपेन्मन्त्रानर्हदादिसमुद्भवान् ॥

मादृशस्तु भवेत्पुत्र इति मत्वा स्मरेज्जिनम् ॥ ४३ ॥

अर्थ— वरील मंत्र म्हणून स्त्रियेच्या वरांगाला प्रक्षालन संस्कार करावा. आणि श्रीजिनेंद्राचें स्मरण करून आपल्यासारखा पुत्र उत्पन्न होईल अशी भावना करावी. तसेंच पंच परमेष्ठीमंत्राचेंही स्मरण करावें.

ॐ ह्रां अर्हद्भ्यो नमः ॥ ॐ ह्रीं सिद्धेभ्यो नमः ॥ ॐ ह्रूं सूरिभ्यो नमः ॥

ओं ह्रौं पाठकेभ्यो नमः ॥ ॐ ह्रः सर्वसाधुभ्यो नमः ॥ इत्यादि स्मरेत् ॥

ॐ ह्रीं श्रीजिनप्रसादात् मम सत्पुत्रो भवतु स्वाहा ॥ इति स्मृत्वा स्त्रियमालिङ्गयेत् ॥

ओष्ठावधरकर्षेयदोष्ठैरन्योन्यमवलोकयेत् ॥

स्तनौ धृत्वा तु पाणिभ्यामन्योन्यं चुम्बयेन्मुखम् ॥ ४४ ॥

नलं देहीति मन्त्रेण योन्यां शिश्नं प्रवेशयेत् ॥

योनेस्तु किंचिदधिकं भवेल्लिङ्गं बलान्वितम् ॥ ४५ ॥

ॐ ह्रीं शरीरस्थायिनो देवता मां बलं ददतु स्वाहा ॥ इति स्मृत्वा सम्बन्धयेत् ॥

सन्तुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च ॥

यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम् ॥ ४६ ॥

इच्छापूर्वं भवेद्यावदुभयोः कामयुक्तयोः ॥

रेतः सिञ्चेत्ततो योन्यां तस्माद्गर्भं बिभर्ति सा ॥ ४७ ॥

अर्थ— वर दोन मंत्र आलेले आहेत. त्यातील पहिल्या मंत्राचा उपयोग आलिंगनकालीं करावा आणि दुसऱ्या (बलं ददतु स्वाहा) ह्या मंत्राचा उपयोग संभोगकाली करावा. संभोगाच्या पूर्वी स्त्रीला हर्षित आणि उत्तेजित करण्याकरितां जेवढे व्यापार करावयाचे असतात ते सर्व श्लोकांत वर्णन केले आहेत. त्या व्यापारांनी तिला उत्तेजित करून तिचा उपभोग केल्यानें तिचा संतोष होतो. ज्या समागमात स्त्रीच्या योगानें पुरुष आणि पुरुषाच्या योगानें स्त्री अशी उभयता संतुष्ट होतात, तो उच्च प्रतीचा समागम होय. असा स्त्रीपुरुषाचा संतोष ज्या कुलांत नेहमी त्या कुलांत सुखाची वृद्धि असते. आणि अशा समागमाच्या अंतीं जो बीजावाप होतो त्या योगानें स्त्री गर्भवती होते.

ऋतुकालीं स्त्रीसमागमानें फल

ऋतुकालोपगामी तु प्राप्नोति परमां गतिम् ॥
सत्कुलः प्रभवेत्पुत्रः पितॄणां स्वर्गदो मतः ॥ ४८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें ऋतुकाली जो स्त्रीसमागम करतो तो उत्तम गतीला प्राप्त होतो. आणि त्याच्यापासून कुलीन आणि आपल्या पितरांना स्वर्गप्राप्ती करून देणारा असा पुत्र उत्पन्न होतो.

ऋतुकालीं स्त्रीसमागम न केल्याचें फल

ऋतुस्नातां तु यो भार्यां सन्निधौ नोपयच्छति ॥
घोरायां भ्रूणहत्यायां पितृभिः सह मज्जति ॥ ४९ ॥

अर्थ— ऋतुस्नात झालेल्या भार्येशीं जो पुरुष समागम करीत नाहीं, तो आपल्या पितरांशीं सह भयंकर अशा भ्रूणहत्या ( बालहत्या किंवा गर्भहत्या ) नामक पातकांत बुडून जातो.

ऋतुकालीं स्त्रीने पुरुषसमागम न केल्यास त्याचे फल

ऋतुस्नाता तु या नारी पतिं नैवोपविन्दति ॥
शुनी वृकी शृगाली स्याच्छूकरी गर्दभी च सा ॥ ५० ॥

अर्थ— जी ऋतुस्नात झालेली स्त्री आपल्या पतीशी समागम करीत नाहीं, ती स्त्री कुत्री, लांडगी, कोल्हीण, डुकरीण किंवा गाढवीण होते.

कामयज्ञमिति प्राहुर्गृहिणां सर्वदैव च ॥
अनेन लभते पुत्रं संसारार्णवतारकम् ॥ ५१ ॥ इति गर्भाधानम् ॥

अर्थ— हा इतका गर्भाधानाचा जो विधि वर्णन केला झाला " गृहस्थांचा हा कामयज्ञ आहे " असें मुनि ह्मणतात. ह्या विधीनें जो पुत्र प्राप्त होतो, तो आपल्या पितरांना संसारसमुद्रांतून तरून नेणारा होतो. हा गर्भाधानाचा विधि सांगितला.

मोदक्रिया.

गर्भे स्थिरेऽथ सञ्जाते मासे तृतीयके ध्रुवम् ॥
प्रमोदेनैव संस्कार्यः क्रियामुख्यः प्रमोदकः ॥ ५२ ॥

अर्थ— स्त्रीच्या उदरांत गर्भ स्थिर झाल्यावर तिसऱ्या महिन्यात त्या गर्भाचा प्रमोद नांवाचा संस्कार करावा. हा प्रमोद संस्कार सर्व संस्कारांत मुख्य आहे.

तृतीये गर्भसंस्कारो मासे पुंसवनं च सः
आद्यगर्भो न विज्ञातः प्रथमे मासि वै यदि ॥ ५३ ॥

अर्थ— प्रथमच गर्भवती झालेल्या स्त्रीचा गर्भ पहिल्या महिन्यांत जर ज्ञात झाला नाहीं, तर तिसऱ्या महिन्यांत त्याचा (गर्भाचा) संस्कार करावा. ह्मणजे त्या संस्कारानें गर्भिणीच्या उदरांतील गर्भ पुरुष चिन्हांनें युक्त होतो.

तैलाभ्यङ्गं जलैरादौ गर्भिणीं स्नापयेच्च ताम् ॥
अलङ्कृत्य च सद्वस्त्रैः करे फलं समर्पयेत् ॥ ५४ ॥
उपलेपं शरीरे तु संस्कुर्याच्चन्दनादिना ॥
पूर्ववद्धोमसत्कार्यं जिनपूजापुरःसरम् ॥ ५५ ॥

वेदिकाग्रे जिनागारे काष्ठनिर्मितपीठयोः ॥
दम्पती तौ च संस्कृत्य भूषणैरुपवेशयेत् ॥ ५६ ॥

अर्थ— प्रथम गर्भिणीला तेल लावून उष्णोदकानें स्नान घालावें. नंतर उत्तमवस्त्र तिला नेसावयास देऊन तिच्या हातांत फल द्यावें. तिच्या शरीराला चंदनादि सुगंधि द्रव्याचें चर्चन करावें. आणि जिनपूजा होम वगैरे विधि पूर्वीप्रमाणें करावा. प्रथम त्या दंपत्याला भूषणादिकांनीं अलंकृत करून जिनमंदिरांत जिनेंद्राच्या समोर पाटावर बसवावें.

अग्रे स्वस्तिकमालेख्यं चन्दनैस्तण्डुलैः पुरः ॥
पूर्ववत्कलशं रम्यं स्थापयेन्मन्त्रपूर्वकम् ॥ ५७ ॥
जिनेन्द्रसिद्धसूरींश्च पूजयेद्भक्तितः परान् ॥
बहुधा धूपदीपैश्च पक्वान्नैः सत्फलैरपि ॥ ५८ ॥
यक्षीयक्षादिदेवानां पूर्णाहुतिमतः परम् ॥
आचार्यः स्वकरे धृत्वा कल्याणकलशं वरम् ॥ ५९ ॥
पुण्याहवाचनैरन्यैर्गर्भिणीं तां प्रसिञ्चयेत् ॥
शान्तिभक्तिं ततश्चोक्त्वा देवान् सर्वान् विसर्जयेत् ॥ ६० ॥

अर्थ— नंतर त्यांच्या अग्रभागीं गंध आणि तांदुळ ह्यांच्या योगानें स्वस्तिक काढून त्यावर पूर्वी सांगितल्याप्रमाणें कलश स्थापन करावा. नंतर भक्तियुक्त अंतःकरणानें अनेक प्रकारचे धूप, दीप, उत्तम अन्नें, चांगलीं फळें ह्यांच्या योगानें जिनेंद्र सिद्ध आणि सूरि ह्यांची पूजा करून, यक्ष यक्षी वगैरे देवतांना पूर्णाहुति द्यावी. नंतर आचार्यानें आपल्या हातांत तो कलश घेऊन, पुण्याहवाचनमंत्रांनीं त्या गर्भिणीला अभिषेक करावा. नंतर शांतिभक्तीचा पाठ करून सर्व देवतांचें विसर्जन करावें.

ततो गन्धोदकै रम्यैर्गर्भिणी स्वोदरं स्पृशेत् ॥
कलिकुण्डादि सद्यन्त्रं रक्षार्थं बन्धयेद्गले ॥ ६१ ॥
सौभाग्यवत्यः सन्नार्यश्चान्नादिना प्रतोषयेत् ॥
सुप्रमोदश्च सर्वेषां जातीनां समुत्पादयेत् ॥ ६२ ॥

ॐ कं ठं व्हः पः अ सि आ उ सा गर्भार्भकं प्रमोदेन परिरक्षत स्वाहा ॥ १ ॥ इति होमान्ते गन्धोदकेन प्रासिञ्च्य स्वपत्न्युदरं स्वयं स्पृशेद्भर्ता ॥ इति मोदः ॥

अर्थ— नंतर गर्भिणीनें आपल्या उदराला गंधोदक लावावें. आणि तिच्या गळ्यांत गर्भाच्या रक्षणाकरितां कलिकुंडादि यंत्र बांधावें. सुवासिनी स्त्रियांना त्या दिवशीं अन्नदान करून संतुष्ट करावें. आपल्या सर्व जातिबांधवानाही आनंदित करावें. “ ॐ कं ठं ” इत्यादि मंत्रानें गर्भिणीच्या पतीनें स्त्रीच्या उदरावर

गंधोदकानें सेचन करून त्याला स्पर्श करावा. हा प्रमोद संस्कार सांगितला.

पुंसवनक्रिया

सद्गर्भस्याथ पुष्ट्यर्थं क्रियां पुंसवनाभिधाम् ॥
कुर्वन्तु पञ्चमे मासि पुमांसः क्षेममिच्छवः ॥ ६३ ॥
शुचिभिः सलिलैः स्नातो धौतवस्त्रसमन्वितः ॥
स्वभार्यायां क्रियाः कुर्यादाचार्योक्तेन आदरात् ॥ ६४ ॥
जिनपूजां च होमं च गृहे कुर्यात्स पूर्ववत् ॥
आचार्यैः कुलवृद्धाभिः स्त्रीभिः सह सुमार्गगः ॥ ६५ ॥
संस्नाप्य गर्भिणीं तां तु भूषयेद्वस्त्रभूषणैः ॥
उपलेपादिकं कुर्याच्चन्दनादिसुवस्तुभिः ॥ ६६ ॥
काष्ठपीठे जिनाग्रे तु रक्तवस्त्रप्रच्छादिते ॥
सिन्दूराञ्जनसंयुक्तां गर्भिणीं तां निवेशयेत् ॥ ६७ ॥
पुण्याहवाचनैः सूरिः सन्मन्त्रैस्तां प्रसिञ्चयेत् ॥
पुरुषेण करे तस्याः पूगीपत्राणि दीयन्ते ॥ ६८ ॥

यवाङ्कुरैस्तथा पुष्पैः पल्लवैर्दर्भसंयुतैः ॥
मालां कृत्वा तु कण्ठेऽस्या अर्पयेद्विधिपूर्वकम् ॥ ७९ ॥
यक्षादीनां तु पूर्णार्घं दत्वा शान्तिं पठेद्बुधः ॥
ताम्बूलादिफलैर्वस्त्रैर्विप्रादींस्तोपयेद्गुरुः ॥ ७० ॥

ॐ झं वं क्ष्वीं क्ष्वीं हं सः कान्तागले यवमालां क्षिपामि झौं स्वाहा ॥ अनेन कण्ठे मालां क्षिपेत् ॥ ॥ ॐ झं वं व्हः पः हः अ सि आ उ सा कान्तापुरतः पायस दध्योदनहरिद्राम्बुकलशान् स्थापयामि स्वाहा ॥ ॥ अनेन तस्या अग्रे पायसदध्योदनहरिद्राम्बुकलशान् स्थाप्य बालिकाकरेण स्पर्शयेत् ॥ तत्र पायसस्पर्शे पुत्रलाभः । दध्योदनस्पर्शे पुत्रीलाभः ॥ हरिद्राम्बुकलशस्पर्शे उभयोरलाभः ॥

ततः प्रभृति गेहे स्वे वाद्यघोषं प्रघोषयेत् ॥
गीतं च नर्तकीनृत्यं दानं कुर्याद्दीन प्रति ॥ ७१ ॥ इति पुंसवनम् ॥

अर्थ— आतां पुंसवनक्रिया सांगतात— पुढें पाचव्या महिन्यांत त्या गर्भाच्या पोषणाकरितां पुंसवन नावाची क्रिया पतीनें करावी. पतीने आपण शुद्ध उदकानें स्नान करून धौतवस्त्र परिधान करावें, आणि आचार्य सांगतील त्याप्रमाणें पुंसवन क्रिया प्रेमानें करावी. ह्या क्रियेंत करण्याची जिनपूजा आणि

होम हे विधि पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच करावेत. आचार्यानें त्या गर्भिणीला सुवासिनी अशा वृध्द स्त्रियांकडून मंगलस्नान घालवून वस्त्रभूषणादिकांच्या योगानें सुशोभित करवून, आणि चंदनादि सुगंधि-द्रव्यांनी तिच्या शरीराला लेपन करवून, तांबड्या वस्त्रानें आच्छादित केलेल्या पाटावर तिला आणून बसवावें. त्या गर्भिणीला सिंदूर आणि काजळ लावलेलें असावें. मग आचार्यानें (उपाध्यायानें) पुण्याहवाचन मंत्रांनीं तिच्या मस्तकावर कुंभजलानें सेचन करावें. आणि पतीकडून तिला तांबूल देववावा. मग जवाचे अंकुर, फुलें, कोंवळीं पानें आणि दर्भ ह्याची माला करवून पतीकडून तिच्या कंठांत घालवावी. नंतर यक्षादिदेवतांना पूर्णार्घ्य देऊन आचार्यानें शांतिपाठ करावा. त्यावेळीं त्या ठिकाणीं असलेल्या ब्राह्मण वगैरे मंडळींना तांबूल, फल, वस्त्र वगैरे देऊन संतुष्ट करावें. "ॐ झं वं" इत्यादि मंत्रानें गर्भिणीच्या कंठांत यवमाला घालावी. नंतर "झं वं ह्नः" इत्यादि मंत्रानें तिच्या अग्रभागी क्षीर, दध्योदन (दहींभात) आणि हरिद्राम्बु (हळदीचें पाणी) ह्या पदार्थांनीं भरलेलीं तीन पात्रें किंवा तीन कळश ठेवावेत. आणि एखाद्या लहान मुलीला त्यांतील कोणत्याही वस्तूस स्पर्श करण्यास सांगावें. त्या मुलीनें जर पायसाला (क्षीरीला) स्पर्श केला तर गर्भिणीला पुत्र होणार असें समजावें. दध्योदनाला स्पर्श केल्यास कन्या होईल असें समजावें. आणि हळदीच्या पाण्याला स्पर्श केल्यास दोनीही होणार नाहींत असें समजावें. म्हणजे अपत्य झाल्यास नपुंसक होईल, किंवा मरून उपजेल, अथवा उपजल्याबरोबर

मरेल असें समजावें. त्या दिवसापासून गर्भिणीच्या पतीनें आपल्या घरात नेहमीं मंगल वांद्यें वाजवावींत गायन करावें, नर्तकी स्त्रियांकडून नृत्य करवावें. आणि दीन अनाथ अशा लोकाना दान करावें. ही पुंसवन क्रिया सांगितली.

सीमन्तविधि.

अथ सप्तमके मासे सीमन्तविधिरुच्यते ॥
केशमध्ये तु गर्भिण्याः सीमा सीमन्तमुच्यते ॥ ७२ ॥
शुभेऽन्हि शुभनक्षत्रे सुवारे शुभयोगके ॥
सुलग्ने सुघटिकायां सीमन्तविधिमाचरेत् ॥ ७३ ॥

अर्थ— आतां सीमंतसंस्कार सागतात— गर्भिणीला सातवा महिना लागला म्हणजे त्यांत सीमंतविधि करावा. गर्भिणीच्या केशांत सीमंत ( भांग ) काढणें याला सीमंतविधि म्हणतात. तो विधि शुभदिवशीं शुभवारीं शुभयोग असतांना शुभलग्नावर आणि शुभमुहूर्तावर करावा.

स्नातां प्रसादितां कान्तामन्तर्वत्नीं च सत्प्रियाम् ॥
प्रत्यगासनगां कृत्वा होमं प्राग्वत्प्रकल्पयेत् ॥ ७४ ॥
पतिपुत्रवती वृद्धा स्वजातीया कुलोद्भवा ॥

गर्भिण्याः केशमध्ये तु सीमन्तं त्रिः समुन्नयेत् ॥ ७५ ॥

अर्थ— स्नान घालून वस्त्रालंकारांनी सुशोभित केलेल्या गर्भिणीला आपल्या जवळ निराळ्या आसनावर बसवून पतीनें जिनपूजा होम वगैरे क्रिया पूर्वीप्रमाणेंच करावी. नंतर सभर्तृक, पुत्रवती आणि कुलीन, अशा स्वजातीतील वृद्धस्त्रियेकडून गर्भिणीच्या केशांच्या मध्यभागी तीन वेळ भांग काढवावा.

साधनं फलवद्गुच्छद्वयदर्भत्रयान्विता ॥
शलाका खादिराऽऽज्याक्ता सीमन्तोन्नयने भवेत् ॥ ७६ ॥
समिद्वा कुड्मलाभाग्रा शमीवृक्षसमुद्भवा ॥
त्रिस्थानधवलाकारा शलली वा तथा भवेत् ॥ ७७ ॥
तेन तैलार्द्रसिन्दूरैः सीमन्तं चोन्नयेच्च सा ॥
यवस्त्वौदुम्बरं चूर्णं क्षिपेत्तन्मूर्ध्नि चोदरे ॥ ७८ ॥
उदुम्बरकृतां मालां सीमन्तिन्या गले गुरुः ॥
क्षिप्त्वा स्विष्टकृताद्यन्यत्सर्वं प्राग्वत्प्रकल्पयेत् ॥ ७९ ॥

अर्थ— गर्भिणीचा जो सीमंत काढावयाचा त्याला साधन फळें असलेल्या दोन डहाळ्या आणि तीन दर्भ एकत्र करून घ्यावेत; आणि त्यानें भांग काढावा. किंवा खैराची काडी तूपात बुडवून तिनें काढावा.

अथवा शमीची समिधा अगर तीन ठिकाणीं पांढरें असलेलें शालिंद्राचें पंख घेऊन त्यानें सीमंत काढावा. सीमंत काढतांना ज्यानें सीमंत काढावयाचा असेल त्याच्या अग्राला तेलात खललेला सिंदूर लावावा. आणि मग तसल्या काडीनें सीमंत काढावा. मग गर्भिणीच्या पतीनें तिच्या मस्तकावर आणि उदरावर उंबराच्या सालीचें चूर्ण टाकावें. आचार्यानें उंबरांच्या फळांची केलेली माला तिच्या गळ्यांत घालावी. नंतर राहिलेला बाकीचा पूजा वगैरे विधि पूर्वीप्रमाणें करावा.

अथ मन्त्रः ॥ पुण्याहवाचनैराचार्यो गर्भिणीं सिञ्चयेत् ॥ ॐ ऱ्हीं श्रीं क्लीं क्रौं अ सि आ उ सा उदुम्बरकृतचूर्णं समस्ते जठरे चेयं झ्वीं क्ष्वीं स्वाहा ॥ अनेनोदरं वा मस्तकं वा उदुम्बरचूर्णेन सेचयेत् ॥

ॐ नमोऽर्हते भगवते उदुम्बरफलाभरणेन बहुपुत्रा भवितुमर्हा स्वाहा ॥

अनेनोदुम्बरफलमालां कण्ठे क्षिपेत पुरुषः ॥ इति सीमन्तविधिः ॥

अर्थ— पुण्याहवाचन मंत्रांनी आचार्यानें गर्भिणीच्या मस्तकावर कुंभजलानें सेचन करावें. नंतर, 'ॐ ऱ्हीं श्रीं' इत्यादि मंत्रानें गर्भिणीच्या पतीनें तिच्या मस्तकावर किंवा उदरावर उंबराच्या सालीचें चूर्ण सिंपडावें. मग 'ॐ नमो' इत्यादि मंत्रानें आचार्यानें तिच्या गळ्यात उंबरांच्या फळाची माला घालावी. हा सीमंतविधि सांगितला.

वरील विधींमवधानें विशेष शास्त्रार्थ

अथ विशेषः ॥ गर्भाधानं प्रमोदश्च सीमन्तः पुंसवं तथा ॥
नवमे मासि चैकत्र कुर्यात्सर्वं तु निर्धनः ॥ ८० ॥
अन्नप्राशनपर्यन्ता गर्भाधानादिकाः क्रियाः ॥
उक्तकाले भवन्त्येता दोषो नाषाढपुष्ययोः ॥ ८१ ॥
मासप्रयुक्तकार्येषु अस्तत्वं गुरुशुक्रयोः ॥
न दोषकृत्तदा मासो रक्षको बलवानिति ॥ ८२ ॥
पुंसवने च सीमन्ते चौलोपनयने तथा ॥
गर्भाधाने प्रमोदे च नान्दीमङ्गलमाचरेत् ॥ ८३ ॥

अर्थ— गर्भाधान, प्रमोद, सीमंत आणि पुंसवन हे संस्कार निरनिराळे करण्यास जर दारिद्र्यामुळें शक्ति नसेल तर नवव्या महिन्यांत एकदमच करावेत. गर्भाधानापासून अन्नप्राशनापर्यंतच्या क्रिया प्राप्त झालेल्या त्या त्या कालीं होत असतात. ह्मणून आषाढ आणि पौष ह्या महिन्यासंबंधी दोष त्यांना लागत नाहींत. ह्मणजे ह्या दोन्ही महिन्यांची अडचण त्या क्रियांना लागू नाहीं. अमक्या महिन्यांत अमकें कृत्य करावें असें ज्या संबंधानें शास्त्रांत सांगितलें आहे, त्या कृत्यांस 'मासप्रयुक्त क्रिया' ह्मणतात. ह्या क्रिया

करावयाच्या प्रसंगीं गुरु किंवा शुक्र यांचा अस्त असला तरी हरकत नाहीं. कारण, त्या क्रिया करण्याला उक्त असलेला महिना हा त्यांचा मुख्य काल आहे. आणि तो मुख्य कालच कोणत्याही क्रियांना अवश्यक असल्यानें तो इतर दोषांचा नाश करतो. पुंसवन, सीमंत, चौल, उपनयन, गर्भाधान आणि प्रमोद या संस्कारांत नांदीमंगल अवश्य करावें.

गर्भिणीचे धर्म

अथ गर्भिणीधर्माः ॥

भूम्यां चैवोच्चनीचायामारोहणविरोहणे ॥
नदीप्रतरणं चैव शकटारोहणं तथा ॥ ८४ ॥
उग्रौषधं तथा क्षारं मैथुनं भारवाहनम् ॥
कृते पुंसवने चैव गर्भिणी परिवर्जयेत् ॥ ८५ ॥

अर्थ— गर्भिणी स्त्रीचे धर्म सांगतात—गर्भिणी स्त्रीनें उंचसखल भूमीवर चढणें उतरणें, नदी तरून जाणें, गाडींत बसणें, जालीम औषध घेणें, खारट पदार्थ खाणें, मैथुन, ओझें वाहणें या गोष्टी पुंसवन संस्कार झाल्यापासून वर्ज्य कराव्यात.

गर्भिणीच्या पतीचे धर्म

अथ पतिधर्माः ॥

पुंसो भार्या गर्भिणी यस्य चासौ । सूनोश्चौलं क्षौरकर्मात्मनश्च ॥
गेहारम्भं स्तम्भसंस्थापनं च । वृद्धिस्थानं दूरयात्रां न कुर्यात् ॥ ८६ ॥

अर्थ — आतां गर्भिणीच्या पतीचे धर्म सांगतात— ज्या पुरुषाची भार्या गर्भवती असेल त्यानें आपलें आणि आपल्या पुत्राचे क्षौर ( हजामत ) करूं नये. नवें घर बांधण्यास प्रारंभ करूं नये. नवा खांब उभा करूं नये. आणि दूर देशांतराला जाऊं नये.

शवस्य वाहनं तस्य दहनं सिन्धुदर्शनम् ॥
पर्वतारोहणं चैव न कुर्याद्गर्भिणीपतिः ॥ ८७ ॥
मासात्तु पञ्चमादूर्ध्वं तस्याः सङ्गं विवर्जयेत् ॥
ऋतुद्वये व्यतीते तु न कुर्यान्मौञ्जीबन्धनम् ॥ ८८ ॥
गर्भिण्यामपि भर्यायां वीर्यपातं विवर्जयेत् ॥
अष्ट मासात्परं चैव न कुर्याच्छ्राद्धभोजनम् ॥ ८९ ॥
क्षौरं चौलं मौञ्जिबन्धं वर्जयेद्गर्भिणीपतिः ॥
भिन्नभार्यासुतस्येह न दोषश्चौलकर्मणि ॥ ९० ॥

अर्थ—तसेंच गर्भिणीपतीने प्रेतवाहन, समुद्रदर्शन आणि पर्वतावर चढणें हे व्यापार करूं नयेत. त्यानें पांचव्या महिन्यापासून तिच्याशीं समागम करू नये. तिला चार महिने झाल्यावर त्यानें आपल्या पुत्राचें उपनयन करूं नये. आपली भार्या गर्भिणी आहे असें समजल्यापासून तिचा समागम वर्ज करावा. तिला आठवा महिना लागल्यावर पतीनें श्राद्धभोजन करूं नये. आपलें क्षौर, मुलांचे चौल व उपनयन हे दोन संस्कार त्यानें करूं नयेत. हे संस्कार जी स्त्री गर्भिणी आहे तिलाच दुसरा मुलगा असल्यास त्याचे करूं नयेत. आणि ज्या पुरुषास दोन भार्या असतील त्यानें जी स्त्री गर्भवती नाहीं तिच्या मुलाचा चौल संस्कार करावयाचा असल्यास तो करण्यास हरकत नाहीं तात्पर्य, ज्या मुलाचा चौल करावयाचा आहे त्याची जननी गर्भवती नसली म्हणजे त्या मुलाचा तो संस्कार बापानें करण्यास हरकत नाहीं.

प्रीति, सुप्रीति आणि प्रियोद्भव

पुत्रजन्मनि सञ्जाते प्रीतिसुप्रीतिके क्रिये ॥
प्रियोद्भवश्च सोत्साहः कर्तव्यो जातकर्मणि ॥ ९१ ॥
सज्जनेषु परा प्रीतिः पुत्रे सुप्रीतिरुच्यते ॥
प्रियोद्भवश्च देवेपूत्साहस्तु क्रियते महान् ॥ ९२ ॥

अर्थ— पुत्राचें जन्म झालें असतां प्रीति, सुप्रीति आणि प्रियोद्भव ह्या क्रिया त्याच्या जातकर्मांत कराव्यात. त्यांत पुत्रजन्म ऐकून सज्जनाविषयीं जो आदर उत्पन्न होतो त्याला प्रीतिक्रिया ह्मणतात. पुत्राविषयीं जी प्रीति ती सुप्रीतिक्रिया होय. आणि पुत्रजन्माच्या निमित्तानें जो देवांचा उत्साह करणें त्याला प्रियोद्भव क्रिया ह्मणतात. [ ह्या ठिकाणीं प्रीति, सुप्रीति आणि प्रियोद्भव ह्या तीन क्रियांचें जें स्वरूप सांगितलें आहे, तें इतरत्र कोठें मिळत नाहीं. उलट श्रीजिनसेनाचार्यांनी महापुराणांत ह्या तीन क्रिया पत्नी गर्भिणी असतांनाच करावयास सांगितल्या आहेत. आणि त्यांचा विधीही अगदीं निराळा आहे. असो, ह्या ठिकाणीं आह्मांस मूलांत जसें आहे, त्याप्रमाणें लिहावयाचें असल्यानें अधिक विचार करण्याचें कारण नाहीं. ]

पुत्रजन्मप्रयुक्तक्रिया व नालच्छेदनविधि

पुत्रे जाते पिता तस्य कुर्यादाचमनं मुदा ॥ प्राणायामं विधायोच्चैराचमं पुनराचरेत् ॥ ९३ ॥ पूजावस्तूनि चादाय मङ्गल कलशं तथा ॥ महावाद्यस्य निर्घोषं व्रजेद्धर्मजिनालये ॥ ९४ ॥ ततः प्रारभ्य ? आहूय सद्विप्रान् जिनालये नियोजयेत् ॥ प्रतिदिनं स पूजार्थं यावन्नालं प्रच्छेदयेत् ॥ ९५ ॥ दानेन तर्पयेत्सर्वान् भट्टान् भिक्षुजनान् पिता ॥ वस्त्रभूषण-

ताम्बूलैः स्वजनात् सकलानपि ॥ ९६ ॥ मुखमालोक्य पुत्रस्य पात्रे क्षीराज्यशर्कराः ॥ सम्मिश्र्य पञ्चकृत्वस्तं प्राशयेत्काञ्चनेन सः ॥ ॥ ९७ ॥ स्त्रीपुत्रयोश्च कर्मैवं कर्तव्यं द्रव्यमात्रकम् ॥ ब्रह्मसूत्रे धृतं नाल तेनावेष्ट्य निकृन्तयेत् ॥ ९८ ॥

अर्थ— पुत्र उत्पन्न झाल्यावरोबर त्याच्या पित्यानें आनंदानें आचमन करून प्राणायाम करावा. आणि पुनः आचमन करावें. नंतर सर्वपूजासाहित्य आणि मंगल कलश घेऊन मंगलवाद्याचा घोष करीत जिनमंदिरांत जावें. मग सदाचारसंपन्न अशा उपाध्यायाना बोलावून आणून श्रीजिनेंद्राची नित्य पूजा करण्याकरितां त्यांची योजना करावी. हा सर्व प्रकार नालच्छेदनाच्या पूर्वी करावा. सर्व ब्राह्मणांना आणि यतींना दानाच्या योगानें सतुष्ट करावें. आणि इतर लोकांना वस्त्रें, अलंकार, तांबूल, ह्यांच्या योगानें संतोपित करावें. नंतर पुत्राचें मुख अवलोकन करून, एका पात्रांत दूध, तूप आणि साखर हे पदार्थ एकत्र मिश्रण करून, ते सुवर्णाच्या लहान पळीनें किंवा सोन्याच्या पात्रानें मुलाच्या मुखांत पांच वेळ घालावेत. हा विधि कन्येलाही करावा. पण त्यात मंत्रपाठ करूं नये. मग त्या मुलाचें नालच्छेदन करावें. तें ब्रह्मसूत्रानें नालास वेष्टन करून करावें.

ततस्तन्नाभिनालं तु शुचिस्थाने निवेशयेत् ॥

रत्नमुक्ताफलद्रव्यैर्युक्तं भूमौ मुदा पिता ॥ ९९ ॥

अर्थ— नंतर ते नाभिनाल त्या कुमाराच्या पित्यानें शुद्ध जाग्यांत मोतीं आणि रत्नें यांशी सहवर्तमान पुरावें.

पुत्रजन्मापासून दहा दिवसातील विधि

प्रसूतौ वनिताऽगारे चतुरङ्गुलमात्रकम् ॥
त्यक्त्वा मृदं मृदा शुच्या गोमयेन तु लेपयेत् ॥ १०० ॥
पञ्चकल्कजलैरुष्णैः सा संस्नायात्सुतान्विता ॥
तौ तृतीये तृतीयेऽन्हि शुचित्वमेवमाचरेताम् ॥ १०१ ॥
वस्त्रभूषणशय्याश्च भोग्यभोजनपालकम् ॥
क्षालयेच्छुचिभिस्तोयैः रजकेन यथाविधि ॥ १०२ ॥
जन्मादिपञ्चमे षष्ठे निशीथे बलिमाहरेत् ॥
अर्चयेदष्टदिक्पालान्गीतवाद्यसशस्त्रकैः ॥ १०३ ॥
कृत्वा जागरणं रात्रौ दीपैश्च शान्तिपाठकैः ॥
द्वारे द्वितीयभागे तु सिन्दूरैश्चापि कज्जलैः ॥ १०४ ॥

अर्थ— भार्या ज्या जागीं प्रसूत झाली असेल त्या जागेवर चार बोटें माती टाकून त्यावर माती आणि शेण ह्यांनीं सारवून घ्यावें. मग पाच प्रकारचें कल्क ज्यांत मिसळलें आहे अशा उष्णोदकानें बाळंतिणीनें त्या मुलासह स्नान करावें. असें स्नान पुढें तीन तीन दिवसांनीं शुद्धीकरितां करावें. बाळंतिणीनीं वस्त्रें, अलंकार, अंथरूण, पांघरूण, जेवणाचीं भांडीं वगैरे सर्व वस्तु शुद्ध जलानें परटाकडून धुववावींत. मुलाचें जन्म झाल्या दिवसापासून पांचव्या आणि सहाव्या दिवशीं रात्रीं अष्टदिक्पाळाची पूजा करून त्यांना बलिदान करावें. गीतवाद्याचा घोष करावा. रात्रीं जागरण करावें, दीप लावावेत. आणि शांतिपाठ करावेत.

जननाशौचाची मर्यादा.

प्रसूतेर्दशमे चाह्नि द्वादशे वा चतुर्दशे ॥
सूतकाशौचशुद्धिः स्याद्विप्रादीनां यथाक्रमम ॥ १०५ ॥
प्रसूतिगृहे मासैकं दायादानां गृहेषु च ॥
दशादिनावधिं यावन्न गच्छेद्भुक्तये यतिः ॥ १०६ ॥

अर्थ— प्रसूतिदिनापासून दहाव्या दिवशीं ब्राह्मणाचें जननाशौच निवृत्त होतें. बाराव्या दिवशीं क्षत्रियाचें आणि चवदाव्या दिवशीं वैश्याचें जननाशौच जातें. ज्या घरांत स्त्री प्रसूत झाली असेल त्या घरांत यतीनें एक महिनापर्यंत भोजन करूं नये. त्याच्या भाईबंदांच्या घरीं दहा दिवस भोजन करूं नये.

पञ्च दिनानि चेटीनां सूतके परिकीर्तितम् ॥
स्वामिगृहे प्रसूताश्चेत्कोदकीनां तथैव च ॥ १०७ ॥
उष्ट्री गौर्महिषी छागी प्रसूता चेद्गृहे यदा ॥
दिनमेकं परित्याज्यं बहिश्चेन्न हि दोषभाक् ॥ १०८ ॥

अर्थ--घरच्याही दासी आपल्या मालकाच्या घरांत, प्रसूत झाली असतां तें घर पांच दिवस अशुद्ध समजावें. त्याप्रमाणें घोडी पाणक्यांची वगैरे उंटीण गाय, म्हैस आणि शेळी हीं जनावरें घरात व्यालीं असतां तें घर एक दिवस अशुद्ध समजावें. आणि बाहेर व्याली असतां अशुद्ध समजण्याचें कारण नाहीं

स्मृत्यंतरी ...

भाजनानि मृदां यानि पुराणानि तु सन्त्यजेत् ॥
धातुभाण्डानि वस्त्राणि क्षालनाच्छुचितां नयेत् ॥ १०९ ॥
दशाहात्तु प्रथमे दानं षष्ठे वा पञ्चमेऽपि वा ॥
दशमे देवपूजा स्यादन्नदानं तथा बलिः ॥ ११० ॥

जातकर्म.

ॐ ऱ्हीं श्रीं क्लीं ऱ्हौं ऱ्हः ऱ्हः नानानुजानुप्रजो भवभव अ सि आ उ सा स्वाहा ॥ १ ॥
अनेन पुत्रमुखमवलोकयेत् ॥

ततश्चैत्यालये पूजाहोमादिकं विधाय तद्गन्धोदकेन स्त्रीपुत्रौ गृहं प्रसिञ्च्य स्वजनान् भोजयेत् ॥ इति जातकर्म ॥

अर्थ— अशौच संपले ह्मणजे अशौचांत स्पर्श केलेलीं मातीचीं जीं जुनीं भांडीं असतील ती टाकून द्यावींत. धातूचीं जी भांडी असतील ती धुवून घ्यावीत. प्रथम दिवशीं, सहाव्या दिवशी आणि पाचव्या दिवशी जननाशौचांत दान करतां येते. दहाव्या दिवशी जननाशौचाची समाप्ति होत असल्यानें त्या दिवशी देवपूजा, अन्नदान व बलिदान करावे. पूर्वी जें पुत्रमुखावलोकन सांगितलें आहे तें "ॐ ऱ्हीं श्रीं" इत्यादि मंत्रानें करावे. अशौच समाप्ति झाल्यावर चैत्यालयात पूजा होम करून त्या गंधोदकानें स्त्रीपुत्राना प्रोक्षण करावें, आणि तें गंधोदक घरांत सिंपडावें. नंतर आपल्या स्वजातीयांना भोजन घालावें. हा जातकर्माचा विधि सांगितला.

नामकर्मविधि

द्वादशे षोडशे विंशे द्वात्रिंशे दिवसेऽपि वा ॥ नामकर्म स्वजातीनां
कर्तव्यं पूर्वमार्गतः ॥ १११ ॥ द्वात्रिंशद्दिवसादूर्ध्वं यावत्संवत्सरं भवेत् ॥

नामकर्म तदा कार्यमिति कैश्चिदुदीरितम् ॥ ११२ ॥ कृत्वा होमं जिनेन्द्रार्चां शुभेऽन्हि श्रीजिनालये ॥ स्वगृहे वा ततो भक्त्या महावाद्यानि घोषयेत् ॥११३॥ सुपीठे दम्पती तौ च ससुतौ भूषणान्वितौ ॥ निवेश्य सेचयेत्सूरिः पुण्याहवचनैः परैः ॥ ११४ ॥ जातके नामके चैव ह्यन्नप्राशनकर्मणि ॥ व्रतरोपे च चौले च पत्नीपुत्रौ स्वदक्षिणे ॥११५ ॥ गर्भाधाने पुंसवने सीमन्तोन्नयने तथा ॥ वधूप्रवेशने शूद्रीपुनर्विवाहमण्डने ॥ ११६ ॥ पूजने कुलदेव्याश्च कन्यादाने तथैव च ॥ कर्मस्वेतेषु वै भार्यां दक्षिणे तूपवेशयेत् ॥ ११७ ॥ कन्यापुत्रविवाहे तु मुनिदानेऽर्चने तथा ॥ आशीर्वादाभिषेके च प्रतिष्ठादिमहोत्सवे ॥ ११८ ॥ वापीकूपतटाकानां वनवाट्याश्च पूजने ॥ शान्तिके पौष्टिके कार्ये पत्नी तूत्तरतो भवेत् ॥ ११९ ॥

अर्थ— आतां नामकर्मविधि सांगतात— पुत्र उत्पन्न झाल्या दिवसापासून बाराव्या सोळाव्या विसाव्या अथवा बत्तीसाव्या दिवशी त्याचें नामकर्म (नाव ठेवणें) आपल्या पूर्वीच्या रूढीस अनुसरून करावें. बत्तीसाव्या दिवसापुढें जर नामकर्म करावयाचें राहिलें तर मुलाला एक वर्ष होईपर्यंत केव्हांही किंवा वर्ष

ज्या दिवशीं पूर्ण होईल त्या दिवशीं नामकर्म करावें; असें कित्येकांचें म्हणणें आहे. "शुभ" दिवशीं जिनालयात किंवा आपल्या घरांत होम, जिनपूजा वगैरे करून मंगलवाद्याचा घोष करवावा. आणि पुत्रांशीं सहवर्तमान त्या दंपत्याला चांगल्या आसनावर बसवून उपाध्यायानें मंगलकलशातील उदकानें त्यांच्यावर पुण्याहवाचन मंत्रानीं सेचन करावें. जातकर्म, नामकर्म, अन्नप्राशन, व्रतग्रहण आणि चौल ह्या कर्मांत पत्नी आणि पुत्र ह्यास कर्त्यांच्या उजव्या अंगास बसवावें. तसेंच, गर्भाधान, पुंसवन, सीमन्तोन्नयन, वधूप्रवेश, शूद्रीचा पुनर्विवाह, कुलदेवतेचें पूजन, कन्यादान ह्या कर्मांतही स्त्रीला पतीच्या उजव्या अंगास बसवावें. कन्या अथवा पुत्र ह्यांच्या विवाहांत, मुनीला दान करतांना, आशीर्वाद ग्रहण करताना, अभिषेकाच्या वेळीं बिंबप्रतिष्ठा वगैरे महोत्सवात; विहीर, आड, तळें ह्यांच्या पूजनाचें समयीं, वनवाटीचे पूजनाचे प्रसंगीं आणि शांतिक पौष्टिक कर्मांत पत्नीनें पतीच्या डाव्या अंगास बसावें.

निश्छिद्रे निस्तुषे ताले शिशोः प्रस्तीर्य तत्पिता ॥

( निस्तुषानक्षतांस्ताले शिशोः प्रस्तीर्य वै पिता । इति पाठः साधुः ॥ )

निजनाम लिखेत्तत्र स्वाभीष्टं जन्मनाम च ॥ १२० ॥ क्षीरसर्पिर्युते पात्रे निधाय भूषणानि वै ॥ तत्ताले पूर्वताले च गन्धपुष्पकुशान् क्षिपेत् ॥ १२१ ॥ मस्तके कर्णयोः कण्ठे भुजयुग्मे च वक्षसि ॥ साज्यं पयः कुशैः सिक्त्वा भूषणैर्भूषये-

च्छिशुम् ॥ १२२ ॥ अष्टोत्तरसहस्रेण नामभिर्यो विराजते ॥ स देवोऽस्मै कुमाराय शुभं नाम प्रयच्छतु ॥ १२३ ॥ इति सम्प्रार्थ्य देवं तं त्रिवारं च द्विजैः सह ॥ यदायाति स तन्नाम घोषयित्वा नमेज्जिनम् ॥ १२४ ॥ पूर्णार्घं यक्षदेवानां दत्वा कर्णौ निशामुखे ॥ संछेद्यान्दोलके रात्रौ बालं प्रीत्या निवेशयेत् ॥ १२५ ॥

अर्थ— मग निस्तुप केलेल्या ( कोंडा काढलेल्या ) अक्षता एका ताटांत पसरून मुलाच्या पित्यानें त्यावर प्रथम आपलें नांव नंतर मुलाला ठेवावयाचें नांव लिहावें. तसेंच दूध आणि तूप मिसळलेलें एका दुसऱ्या ताटांत घालून त्यांत मुलाला घालावयाचे दागिने घालून त्या ताटांत आणि पूर्वीच्या ताटांत गंध फुलें आणि दर्भ टाकावेत. मग मुलाचें मस्तक, दोनी कान, कंठ, दोनी भुजा आणि छाती ह्या ठिकाणीं तें तूप मिसळलेलें दूध दर्भानें लावून त्याला त्या त्या ठिकाणीं घालावयाचे अलंकार घालावेत. मग "अष्टोतरसहस्रेण०" ( जो देव एक हजार आठ नामांच्या योगानें शोभत आहे तो देव ह्या कुमाराला शुभनाम देवो )— ह्या मंत्रानें ब्राह्मणांशीं सहवर्तमान तीन वेळ देवाची प्रार्थना करून, मुलाचें जें नांव ठेवावयाचें असेल त्या नांवाचा मोठ्या स्वरांत उच्चार करून श्रीजिनेंद्राला नमस्कार करावा. आणि नंतर यक्षादिदेवांना पूर्णार्घ्य द्यावेत. ह्याप्रमाणें सर्व विधि करावा. मग त्या दिवशीं सांयकालीं मुलाचे दोनी कान टोंचावेत. आणि रात्रीं त्या मुलाला पाळण्यांत घालावें.

नामकर्म मंत्र

ॐ ऱ्हीं श्रीं क्लीं अर्हं बालकस्य नामकरणं करोमि । अभिनन्दननाम्ना आयुरारोग्यैश्वर्यवान् भव भव । अष्टोत्तरसहस्राभिधानार्हो भव भव झ्रौं झ्रौं अ सि आ उ सा स्वाहा ॥ एवं नामकरणं कुर्यात् ॥

कर्णवेधमंत्र

ॐ ऱ्हीं श्रीं अर्हं बालकस्य ऱ्हः कर्णनासावेधनं करोमि अ सि आ उ सा स्वाहा ॥ अनेन कर्णवेधनं कुर्यात् ॥

आंदोलारोपणमंत्र

ॐ ऱ्हीं झ्रौं झ्रौ क्ष्वीं क्ष्वीं आन्दोलं बालकमारोपयामि तस्य सर्वरक्षा भवतु झ्रौ झ्रौं स्वाहा ॥ इत्यान्दोलारोपणं कुर्यात् ॥ इति नामकर्म ॥

अर्थ— "ॐ ऱ्हीं श्रीं क्लीं" इत्यादि मंत्रानें नामकर्म करावें. त्यात जेथें "अभिनन्दनाम्ना" असें आहे त्या ठिकाणीं मुलाचें नाव उच्चारावें. "ॐ ऱ्हीं श्रीं अर्हं" इत्यादि मंत्रानें बालकाचा कर्णवेध करावा. कन्या असल्यास कर्ण आणि नासिका ह्या दोनींचा वेध करावा. ह्मणजे हीं दोन्हीं टोंचावींत. "ॐ ऱ्हीं झ्रौ" इत्यादि मंत्रानें मुलाला पाळण्यांत घालावें. हा नामकर्मविधि सांगितला.

निष्क्रमणविधि

गृहान्निष्क्रमणं सूनोश्चतुर्थे मासि कारयेत् ॥
जिनार्कदर्शनार्थं च तृतीये प्रथमेऽपि वा ॥ १२६ ॥
शुक्लपक्षे सुनक्षत्रे स्नातं भूषणभूषितम् ॥
पुण्याहवचनैर्बालं सिञ्चयेच्च कुशोदकैः ॥ १२७ ॥
विधाय वक्षसि बाल महावाद्यसमान्वितम् ॥
निष्क्रमेद्बन्धुभिः साकं माता पिताऽथवा गृहात् ॥ १२८ ॥
भक्त्या चैत्यालयं गत्वा त्रिः परीत्य प्रपूज्य च ॥
शिशोः सन्दर्शयेत्प्रीत्या वृद्धये जिनभास्करम् ॥ १२९ ॥
सङ्घं सम्पूज्य सद्वस्त्रैः शेषाँस्ताम्बूलचन्दनैः ॥
शेषाशिषं समादाय पूर्ववच्च व्रजेद्गृहम् ॥ १३० ॥

ॐनमोऽर्हते भगवते जिनभास्कराय तव मुखं बालकं दर्शयामि दीर्घायुष्यं कुरु कुरु स्वाहा ॥ इति बहिर्यानम् ॥

अर्थ— आतां निष्क्रमण क्रिया ( मुलाला घरांतून प्रथमच बाहेर नेणें ) सांगतात— मुलाचें घरांतून

निष्क्रमण जें करावयाचें तें चवथ्या महिन्यात करावें हा विधि मुलाला प्रथम जिनबिंबाचें दर्शन करण्याकरितां करावयाचा आहे. तो पहिल्या किंवा तिसऱ्या महिन्यातही केला असता चालतो. तो विधि शुक्लपक्षांत ज्या दिवशीं शुभ नक्षत्र असेल त्या दिवशीं करावा. त्या दिवशीं मुलाला मंगलस्नान घालून त्याला अलंकार घालून पुण्याहवाचनमंत्रांनी दर्भमिश्रित उदकानें त्याच्या मस्तकावर सेंचन करावें. नंतर त्या मुलाची माता किंवा पिता ह्यापैकी कोणींतरी त्याला आपल्या उराशीं धरून मंगलवाद्याचा घोष करीत आपल्या बंधुवर्गाशीं सह घरांतून बाहेर निघावें. भक्तीनें चैत्यालयांत जाऊन तीन प्रदक्षिणा करून श्रीजिनेंद्राची पूजा करून त्या मुलाच्या वृद्धीकरिता त्याला जिनबिंबाचें दर्शन करवावें. त्या ठिकाणीं असलेल्या संघमुनीना वस्त्रें द्यावींत. आणि बाकीच्या मंडळींना ताम्बूल, गंध वगैरे देऊन सर्वांचा संतोष करून त्यांचे आशीर्वाद घेऊन घरीं यावें. “ ॐ नमोऽर्हते० ” इत्यादि मंत्रानें त्या मुलाला जिनदर्शन करवावें. हा निष्क्रमणाचा विधि सांगितला.

### उपवेशनविधि.

पञ्चमे मासि कर्तव्यं शिशोश्चैवोपवेशनम् ॥ सम्पूज्य श्रीजिनं भूमिं कुमारान्
पञ्च पूजयेत् ॥ व्रीहिश्यामाकगोधूममाषमुद्गतिला यवाः ॥ एभिः संलेख्य रत्नाव-
लीं च वस्त्रं प्रसारयेत् ॥ १३२ ॥ स्नापयित्वा शिशुं सम्यक् भूषणैश्च विभूषयेत् ॥

गृहे पद्मासनस्थाने सुमुहूर्ते निवेशयेत् ॥ १३३ ॥ पूर्वमुखे विधायास्यमधःस्थं वामपादकम् ॥ उपरि दक्षिणाङ्घ्रिः स्यादुपर्यस्य करद्वयम् ॥ १३४॥ नीराजनं ततः कुर्याद्विप्रैराशीर्वचः परम् ॥ तद्दिने सज्जनान् सर्वान् भोजयेत्प्रीतिपूर्वकम् ॥ १३५ ॥

ॐ ऱ्हीं अर्हं अ सि आ उ सा बालकमुपवेशयामि स्वाहा ॥ इत्युपवेशनम् ॥

अर्थ— आतां उपवेशन विधि ( मुलाला वसविण्याची क्रिया ) सांगतात— पांचव्या महिन्यांत मुलाचा उपवेशनाविधि करावा. त्या वेळी श्रीजिनेंद्राची पूजा करून भूमीची आणि पांच मुलांची पूजा करावी. भात गहूं, उडीद, मूग, तीळ आणि जव ह्यांची रांगोळी घालून एक वस्त्र पसरावें. घरांत मुलाला स्नान घालून अलंकारांनीं सुशोभित करून सुमुहूर्तावर त्या वस्त्रावरील पद्मासनावर वसवावें. वसवितांना त्या मुलाचें तोंड पूर्वेकडे करावें. आणि त्याचा डावा पाय खालीं व उजवा पाय वर ठेवून त्यावर दोनी हात ठेवून त्याला वसवावें. मग त्या मुलाला आरती ओंवाळून ब्राह्मणांचे आशीर्वाद घ्यावेत. त्या दिवशीं सर्व सत्पुरुषांना आनंदानें भोजन घालावें. मुलाला वसविण्याच्या प्रसंगीं "ॐ ऱ्हीं अर्ह" इत्यादि मंत्र ह्मणावा. हा उपवेशनाचा विधि सांगितला.

अन्नप्राशनविधि.

तथा च सप्तमे मासे शुभर्क्षे शुभवासरे ॥

अन्नस्य प्राशनं कुर्याद्बालस्य वृद्धये पिता ॥ १३६ ॥
जिनेन्द्रसदने पूजा महावैभवसंयुता ॥
आदौ कार्या ततो गेहे शुद्धान्नं क्रियते बुधैः ॥ १३७ ॥
ततः प्राङ्मुखमासित्वा पिता माताऽथवा सुतम् ॥
दक्षिणाभिमुखं कृत्वा वामोत्सङ्गे निवेशयेत् ॥ १३८ ॥
क्षीरान्नं शर्करायुक्तं घृताक्तं प्राशयेच्छिशुम् ॥
दध्यन्नं च ततः सर्वान्बान्धवानपि भोजयेत् ॥ १३९ ॥

ॐ नमोऽर्हते भगवते भुक्तिशक्तिप्रदायकाय बालकं भोजयामि पुष्टिस्तुष्टिश्चारोग्यं भवतु भवतु झ्वीं क्ष्वीं स्वाहा ॥ इत्यन्नप्राशनम् ॥

अर्थ— आतां अन्नप्राशनाचा विधि सांगतात. सातव्या महिन्यांत शुभवारीं शुभनक्षत्रावर त्या मुलाला त्याच्या वृद्धीकरितां अन्नप्राशन करवावें. त्या दिवशीं प्रथम जिनालयांत श्रीजिनेंद्राची यथाविधि पूजा करावी, आणि घरांत शुद्ध अन्न तयार करावें. मग मुलाचा पिता किंवा माता ह्यापैकीं पूर्वेकडे तोंड करून वसून आपल्या डाव्या मांडीवर दक्षिणेकडे तोंड करून मुलास वसवावें. आणि दूधभात, साखर व तूप ह्यांनी मिश्र करून मुलाला खाऊं घालावा. मग आपल्या सर्व बंधुवर्गास भोजन घालावें.

मुलाला अन्न खाऊं घालतानां " ॐ नमोऽर्हते भगवते " इत्यादि मंत्र ह्मणावा. हा अन्नप्राशनाचा विधि सांगितला.

गमनविधि ( मुलास चालावयास शिकविणें )

अथास्य नवमे मासे गमनं कारयेत्पिता ॥
गमनोचितनक्षत्रे सुवारे शुभयोगके ॥ १४० ॥
पूजां होमं जिनावासे पिता कुर्याच्च पूर्ववत् ॥
पुत्रं संस्नाप्य सद्वस्त्रैर्भूषयेद्भूषणैः परम् ॥ १४१ ॥
पूर्वादिपूर्वपर्यन्तं गुर्वग्निब्राह्मणान्परान् ॥
प्रदक्षिणाक्रमेणैव धौतवस्त्रं प्रसारयेत ॥ १४२ ॥
तस्योपरि स्थितं पुत्रमुदङ्मुखं मुदा पिता ॥
गमयेद्दक्षिणांघ्र्यग्रं भुजौ सन्धृत्य पाणिना ॥ १४३ ॥
सव्यभागेऽग्निकुण्डं तत्सन्त्यज्य त्रिप्रदक्षिणाः ॥
दत्वाऽग्निगुरुवृद्धेभ्यः प्रणतिं कारयेत्पिता ॥ १४४ ॥

ॐ नमोऽर्हते भगवते श्रीमते महावीराय चतुस्त्रिंशदातिशययुक्ताय बालकस्य पाद-

**न्यासं शिक्षयामि तस्य सौख्यं भवतु भवतु झ्वीं क्ष्वीं स्वाहा ॥ इति पादन्यासः ॥**

अर्थ— आतां पादन्यासाचा ( गमनाचा ) विधि सांगतात. नवव्या महिन्यांत गमनाला योग्य नक्षत्र असतांना शुभवारीं शुभयोगावर मुलाच्या पित्यानें जिनपूजा होम वगैरे विधि पूर्ववत् करून, पुत्राचा पादन्यास विधि ( पावलें टाकणें ) करावा. मुलाला स्नान घालून उत्तम वस्त्रालंकारांनीं सुशोभित करावें. नंतर गुरु, अग्नि आणि ब्राह्मण ह्यांच्या भोंवत्यानें धुतलेलें वस्त्र पसरून उत्तरेकडे तोंड करून मुलाला उभें करून त्याच्या हाताला धरून त्याच्या पित्यानें त्याला पूर्वदिशेकडून आरंभ करून चालवावें. चालविण्यास आरंभ करतांना "ॐ नमोऽर्हते" इत्यादि मंत्र ह्मणून प्रथम उजवा पाय पुढें टाकवावा. ह्याप्रमाणें त्या पसरलेल्या वस्त्रावरून त्या मुलाकडून तीन प्रदक्षिणा करवाव्यात. प्रदक्षिणा करतांना अग्निकुंड उजव्या हाताला सोडून प्रदक्षिणा कराव्यात. मग अग्नि, गुरु आणि वृद्धलोक ह्यांना त्या मुलाकडून नमस्कार करवावा. हा पादन्यासविधि सांगितला.

व्युष्टिक्रिया.

ततोऽस्य हायने पूर्णे व्युष्टिर्नाम क्रिया मता ॥
वर्षवर्धनपर्यायशब्दवाच्या यथाश्रुतम् ॥ १४५ ॥
तत्रापि पूर्ववद्दानं जैनी पूजा च पूर्ववत् ॥

इष्टबन्धुसमाव्हानं सन्मानादिश्च लक्ष्यते ॥ १४६ ॥ इति व्युष्टिः ॥

अर्थ— आतां व्युष्टि क्रिया सांगतात— व्युष्टि क्रिया ह्मणजे वर्षवृद्धिसंबंधी क्रिया होय. ही क्रिया ज्या दिवशीं मुलाला वर्ष पूर्ण होईल त्या दिवशी करावी. ह्या क्रियेंतही दान, जिनपूजा वगैरे विधि पूर्वीप्रमाणेंच करावा. आपले इष्टजन व बंधु ह्याना भोजन घालून त्याचा सत्कार करावा. ही व्युष्टिक्रिया सांगितली.

चौलकर्म (मुडन विचार)

मुण्डनं सर्वजातीनां बालकेषु प्रवर्तते ॥
पुष्टिबलप्रदं वक्ष्ये जैनशास्त्रानुमार्गतः ॥ १४७ ॥
तृतीये प्रथमे वाब्दे पञ्चमे सप्तमेऽपि वा ॥
चौलकर्म गृही कुर्यात्कुलधर्मानुसारतः ॥ १४८ ॥
चूलाकर्म शिशोर्मातरि गर्भिण्यां यदि वा भवेत् ॥
गर्भस्थ वा विपत्तिः स्याद्विपत्तिर्वा शिशोरपि ॥ १४९ ॥
शिशोर्मातरि गर्भिण्यां चूलाकर्म न कारयेत ॥
गते तु पञ्चमे वर्षे दोषयेन्न हि गर्भिणी ॥ १५० ॥

आरभ्याधानमाचौलं कर्मातीतं तु यद्भवेत् ॥
आज्यं व्याहृतिभिर्हुत्वा प्रायश्चित्तं समाचरेत् ॥ १५१ ॥

अर्थ-- सर्व जातीच्या मुलांचें मुंडन करण्याची सर्वांची चाल आहे. परंतु जैनशास्त्राला अनुसरून मुलाला पुष्टि आणि बल देणारा असा मुंडनविधि पुढें सांगतों. पहिल्या तिसऱ्या पांचव्या किंवा सातव्या वर्षी आपल्या कुलांत चालत आलेल्या संप्रदायाला अनुसरून मुलाचें चौलकर्म (शेंडी राखण्याचा विधि) करावें. मुलाची माता गर्भिणी असतांना जर मुलाचें चौलकर्म केलें, तर त्या मातेच्या उदारांतील गर्भाचा नाश होतो. किंवा ज्याचें चौलकर्म केले असेल त्या मुलाचा तरी नाश होतो. ह्मणून मुलाची माता गर्भवती असताना चौलकर्म करूं नये. परंतु मुलाला जर पांच वर्षें पूर्ण झालीं असतील, तर मात्र मुलाची आई गर्भिणी जरी असली, तरी सातवे वर्षी त्याचें चौलकर्म अवश्य करावें. ह्यांत गर्भिणीपणाचा दोष उत्पन्न होत नाहीं. चौलकर्म ज्या मुलाचें करावयाचें त्याचे जर गर्भाधानापासून चौलापर्यंतचे मागले संस्कार केलेले नसतील तर प्रथम व्याहृतिमंत्रानें आज्याहुती देऊन प्रायश्चित्त करावें.

चौलार्हं बालकं स्नायात्सुगन्धशुभवारिणा ॥
शुभेऽन्हि शुभनक्षत्रे भूषयेद्वस्त्रभूषणैः ॥ १५२ ॥
पूर्ववद्धोमं पूजां च कृत्वा पुण्याहवाचनैः ॥

उपलेपादिकं कृत्वा शिशुं सिञ्चेत्कुशोदकैः ॥ १५३ ॥
यवमाषतिलव्रीहिशमीपल्लवगोमयैः ॥
शरावान् षट् पृथक्पूर्णान् विन्यस्येदुत्तरादिशि ॥ १५४ ॥
धनुःकन्यायुग्ममत्स्यवृषमेषेषु राशिषु ॥
ततो यवशरावादीन् विन्यस्येत्परितः शिशोः ॥ १५५ ॥
क्षुरं च कर्तरीं कूर्चसप्तकं घर्षणोपलम् ॥
निधाय पूर्णकुम्भाग्रे पुष्पगन्धाक्षतान् क्षिपेत् ॥ १५६ ॥
मात्रङ्कस्थितपुत्रस्य स धौतोऽग्रे स्थितः पिता ॥
शीतोष्णजलयोः पात्रे सिञ्चेच युगपज्जलैः ॥ १५७ ॥
निशामस्तु दधि क्षिप्त्वा तज्जले तैः शिरोरुहान् ॥
सव्यहस्तेन संसेच्य प्रादक्षिण्येन घर्षयेत् ॥ १५८ ॥
नवनीतेन संघर्ष्य क्षालयेदुष्णवारिणा ॥
मङ्गलकुम्भनीरेण गन्धोदकेन सिञ्चयेत् ॥ १५९ ॥

अर्थ— चौलकर्म करण्यास योग्य झालेल्या मुलाला शुभ नक्षत्रानें युक्त असलेल्या शुभदिनीं सुगंध

अशा उदकानें स्नान घालून वस्त्रालंकारांनीं सुशोभित करावें. पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच होम आणि पूजा करून मुलाच्या अंगास गंध लावून पुण्याहवाचनमंत्रांनीं त्याच्या मस्तकावर दर्भानीं सेंचन करावें. जव, उडीद, तीळ, भात, शमीचीं पानें आणि गायीचें शेण ह्यांनीं भरलेले सहा शराव ( मातीच्या झांकण्या ) धनु, कन्या, मिथुन, मीन, वृषभ आणि मेष ह्या लग्नावर उत्तरेकडील बाजूला निरानिराळे स्थापन करावेत. मग ते शराव मुलाच्या जवळ आणून ठेवावेत. नंतर क्षुर ( वस्तरा ), कातरी, दर्भाचे सात कूर्च आणि क्षुर घासण्याचा दगड, हे पदार्थ एका जलपूर्ण कुंभावर ठेवून त्यांच्यावर गंध, पुष्पें अक्षता टाकाव्यात. मग मातेच्या मांडीवर बसलेल्या पुत्राच्या पुढें स्नान करून उभा असलेल्या पित्यानें एका हातानें उष्णोदकाचें भांडें व दुसऱ्या हातानें शीतोदकाचें भांडें घेऊन, त्या दोन्हीं पात्रांतील पाणी दुसऱ्या एक पात्रांत एकदम ओतावें. त्या पाण्यात हळद, दह्यावरील पाणी आणि दही टाकून त्या पाण्यानें मुलाचे मस्तकावरील केंश उजव्या हातानें प्रदक्षिणाकार भिजवावेत. मग केंशांना थोडेंसें लोणी लावून घासून उष्णोदकानें ते केंश धुवावेत. नंतर मगलकुंभातील उदकानें धुवून गंधोदकानें धुवावेत.

ततो दक्षिणकेशेषु स्थानत्रयं विधीयते ॥
प्रथमस्थानके तत्र कर्तनाविधिमाचरेत् ॥ १६० ॥
शालिपात्रं निधायाग्रे खादिरस्य शलाकया ॥

पञ्चदर्भैः सुपुष्पैश्च गन्धद्रव्यैः क्षुरेण च ॥ १६१ ॥
वामकरेण केशानां वर्ति कृत्वा च तत्पिता ॥
अङ्गुष्ठाङ्गुलिभिश्चैतद्धृत्वा हस्तेन कर्तयेत् ॥ १६२ ॥

अर्थ— नंतर मुलाच्या उजव्या बाजूकडील केंशांत तीन जागा कराव्यात. त्यांतील पहिल्या जाग्यांतील केंशांचें कर्तन प्रथम करावें. तें कर्तन करावयाचे वेळीं मुलापुढें भात नांवाचें धान्य घातलेला शराव ठेवून, खदिराची एक समिधा, पांच दर्भ, फुलें, गंध आणि क्षुर हे पदार्थ डाव्या हातांत घेऊन, त्याच हातानें मुलाच्या पित्यानें केंश वळून अंगठा आणि बोटें ह्यांनीं धरावेत. आणि उजव्या हातानें कातरीनें ते केंश कातरावेत.

ॐ नमोऽर्हते भगवते जिनेश्वराय मम पुत्र उपनयनमुण्डमुण्डितो महाभागी भवतु भवतु स्वाहा ॥ ॥ इत्युच्चरन्केशाँसंच्छिद्य शमीपर्णैः सह भार्यायै दद्यात् ॥ साऽपि तथा भवतु इत्युक्त्वा क्षीरघृतमिश्रितान् कृत्वा गोमयशरावे क्षिपेत् ॥

अर्थ— केंश कातरण्याच्या वेळीं "ॐ नमोऽर्हते॰" इत्यादि मंत्र ह्मणून केश कातरावेत. आणि ते कातरलेले केंश मुलाच्या मातेच्या हातांत द्यावेत. तिनें "तथा भवतु" असें ह्मणून त्या केंशांना दूध आणि तूप लाऊन गोमयाच्या शरावात टाकावेत.

द्वितीयस्थाने तिलपात्रमग्रे निधाय पूर्वोक्तशस्त्रशेषैश्च– ॐ नमः सिद्धपरमेष्ठिने मम पुत्रो निर्ग्रन्थमुण्डभागी भवतु स्वाहा ॥ इत्युक्त्वा केशान् प्रच्छिद्य तस्यै दद्यात् ॥ सा तथा करोतु ॥

अर्थ— मग दुसऱ्या स्थानाचे केंश कातरताना तिळांचें पात्र मुलापुढें ठेवून पूर्वी सांगितल्याप्रमाणें शस्त्र व बाकीचे पदार्थ हातात घेऊन "ॐ नमः सिद्धपरमेष्ठिने" इत्यादि मंत्र ह्मणून पूर्वीप्रमाणें केंश कातरून मातेच्या हातांत द्यावेत. तिनें 'तथा भवतु' असें ह्मणून केंशाना दूध आणि तूप लावून ते गोमयशरावात टाकावेत.

तृतीयस्थाने यवशरावमग्रे निधाय पूर्वोक्तशस्त्रशेषैश्च– ॐ ऱ्हीं नम आचार्यपरमेष्ठिने मम पुत्रो निष्क्रान्तिमुण्डभागी भवतु स्वाहा ॥ इत्युक्त्वा केशान् संछिद्य पूर्ववत्कुर्यात् ॥

अर्थ— तिसऱ्या स्थानाचे केश कातरावयाच्या वेळीं पूर्वीप्रमाणेंच शस्त्र वगैरे पदार्थ हातांत घेऊन 'ॐ ऱ्हीं नमः' इत्यादि मंत्र ह्मणून केश कातरून मातेच्या हातांत द्यावेत. तिनें पूर्वीप्रमाणेंच सर्व करावें.

वामभागे केशानां भागद्वयं कृत्वा तत्र प्रथमभागे माषपात्रमग्रे निधाय शस्त्रशेषैश्च– ॐ नम उपाध्यायपरमेष्ठिने मम पुत्र ऐन्द्रभागी भवतु स्वाहा ॥ इत्युच्चार्य पूर्ववत् कुर्यात् ॥

अर्थ— ह्याप्रमाणें उजव्या बाजूचे केंश कातरल्यावर मग डाव्या बाजूचे केंश कातरावेत. डाव्या बाजूला केंश कातरण्याचीं दोन स्थानें करावीत. त्यातील प्रथमभागांतील केंश कातरावयाच्या वेळीं उडिदानें भरलेला शराव मुलाचे पुढें ठेवून, पित्यानें आपल्या हातांत शस्त्र आणि बाकीचे पदार्थ घेऊन ' ॐ नम उपाध्यायपरमेष्ठिने ' इत्यादि मंत्र ह्मणून केंश कातरावेत. आणि पुढील विधि पूर्वीप्रमाणेंच करावा.

द्वितीयस्थाने शमीपल्लवपात्रं निधाय शस्त्रशेषैश्च– ॐ ह्रौं नमः सर्वसाधुपरमेष्ठिने मम पुत्रः परमराज्यकेशभागी भवतु स्वाहा ॥ इत्युक्त्वा पूर्ववत्कुर्यात् ॥

अर्थ— मग डावेकडील दुसऱ्या ठिकाणचे केंश कातरतांना शमीपल्लवांचें पात्र पुढें ठेवून शस्त्र आणि बाकीचे पदार्थ हातांत घेऊन ' ॐ ह्रौ नमः ' इत्यादि मंत्र ह्मणून केंश कातरावेत. पुढील विधि पूर्वीप्रमाणें करावा.

तत्रोष्णोदकेन केशान् प्रक्षाल्य ' ॐ ह्रीं पञ्चपरमेष्ठिप्रसादात् केशान्वय शिरो रक्ष कुशली कुरु नापित ' इत्युक्त्वा नापिताय पिता क्षुरं दद्यात् ॥ नापितोऽपि ' भवदीप्सितार्थो भवतु ' इत्युक्त्वा शिखां परिरक्ष्य शेषकेशान् मुण्डयेत् ॥ ततस्तान् केशान् क्षीरघृतधान्यगोमयपालाणि च महावाद्यविभवेन नद्यां क्षिपेत् ॥ ततः कुमारं स्नापयित्वा वस्त्रभूषणैरलंकृत्य

**गृहमानीय यक्षादीनामर्घ्यं दत्वा पुण्याहवाचनैः पुनः सिंचयित्वा सज्जनान् भोजयेत् ॥ इति चौलकर्म ॥**

अर्थ— मग त्या मुलाचे मस्तकावरील सर्व केश उष्णोदकानें धुवून ' ॐ ऱ्हीं पंचपरमेष्ठि–० ' इत्यादि मंत्र ह्मणून मुलाच्या पित्यानें क्षुर नापिकाकडे ( हजामाकडे ) द्यावा. नापितानेंही ' भवदीप्सितार्थो भवतु ' असें ह्मणून त्या मुलाच्या मस्तकावर शेंडी राखून बाकीचे केंश काढावेत. मग ते पूर्वीचे केंश दूध, तूप, धान्याची पात्रें आणि गोमयाचें पात्र ह्या सर्ववस्तु मंगलवाद्यांचा घोष करीत नदीत, नदी नसल्यास तळावांत अथवा विहीरांत नेऊन टाकावींत. मग तेथें कुमाराला स्नान घालून वस्त्रभूषणांनीं अलंकृत करून तसाच मंगलवाद्यांचा घोष करीत घरीं आणावें. मग यक्षादिदेवतांना अर्घ्यप्रदान करून पुण्याहवाचनमंत्रांनीं मुलाच्या मस्तकावर सेंचन करवावें. ह्याप्रमाणें विधि झाल्यावर सदाचारसंपन्न अशा आपल्या स्वजातीयांना भोजन घालावें. हा चौलाचा विधि सांगितला.

लिपिसंख्यान [ अक्षराभ्यास ]

**द्वितीयजन्मनः पूर्वमक्षराभ्यासमाचरेत् ॥**
**मौञ्जीबन्धनतः पश्चाच्छास्त्रारम्भो विधीयते ॥ १६३ ॥**
**पञ्चमे सप्तमे चाब्दे पूर्वं स्यान्मौञ्जिबन्धनात् ॥**

तत्र चैवाक्षराभ्यासः कर्तव्यस्तूदगयने ॥ १६४ ॥

अर्थ— उपनयन करण्याच्या पूर्वी मुलाला अक्षरें शिकविण्यास प्रारंभ करावा. आणि उपनयन झाल्यावर शास्त्राभ्यास करण्यास प्रारंभ करावा. मौंजीबंधन करण्याच्या पूर्वी ह्मणजे पांचव्या किंवा सातव्या वर्षी मुलाला अक्षरें शिकविण्यास प्रारंभ करावा. तो उत्तरायणांत करावा.

मृगादिपञ्चस्वपि तेषु मूले । हस्तादिके च क्रियतेऽश्विनीषु ॥
पुर्वात्रये च श्रवणत्रये च । विद्यासमारम्भमुशान्ति सिध्यै ॥ १६५ ॥

अर्थ— मृग, आर्द्रा, पुनर्वसू, पुष्य, आश्लेषा, मूल, हस्त, चित्रा, स्वाती, अश्विनी, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, श्रवण, धनिष्ठा, शततारका ह्या नक्षत्रांवर विद्या शिकविण्यास आरंभ करावा. ह्मणजे कार्यसिद्धि होते.

आदित्यादिषु वारेषु विद्यारम्भफलं क्रमात् ॥
आयुर्जाड्यं मृतिर्मेधा सुधीः प्रज्ञा तनुक्षयः ॥ १६६ ॥
अनध्यायाः प्रदोषाश्च षष्ठी रिक्ता तथा तिथिः ॥
वर्जनीया प्रयत्नेन विद्यारम्भेषु सर्वदा ॥ १६७ ॥
विद्यारम्भे शुभा प्रोक्ता जीवज्ञसितवासराः ॥

मध्यमौ सोमसूर्यौ च निन्द्यश्चैव शनिः कुजः ॥ १६८ ॥

उदग्गते भास्वति पञ्चमेऽब्दे । प्रासेऽक्षरस्वीकरणं शिशूनाम् ॥

सरस्वतीं क्षेत्रसुपालकं च । गुडोदनाद्यैरभिपूज्य कुर्यात् ॥ १६९ ॥

अर्थ— रविवारीं विद्यारंभ केला असतां आयुष्य वाढतें, सोमवारीं बुद्धीला जडपणा येतो. मंगळवारीं मृत्यु प्राप्त होतो. बुधवारीं बुद्धीला धारणाशक्ति येते. गुरुवारीं बुध्दि कुशल होते. शुक्रवारीं विद्यारंभ केल्यानें बुध्दीला समजण्याची शक्ति येते. आणि शनिवारीं विद्यारम्भ करणाऱ्याच्या शरीराचा नाश होतो. असें सात वारांचें फल आहे. अनध्यायाच्या तिथि, प्रदोष, षष्ठी आणि रिक्तातिथि ( चतुर्थी नवमी आणि चतुर्दशी ) ह्या तिथींवर विद्यारंभ करूं नये. गुरुवार, बुधवार आणि शुक्रवार हे वार विद्यारंभास शुभ समजावेत. सोमवार आणि रविवार हे मध्यम समजावेत. आणि मंगळवार व शनिवार हे कनिष्ठ समजावेत. मुलाला पांचवें वर्ष लागलें असता उत्तरायणात मुलाचा लिपिग्रहणविधि करावा. त्या वेळीं सरस्वती आणि क्षेत्रपाल ह्यांची गूळभात वगैरे पदार्थांनीं पूजा करावी.

एवं सुनिश्चिते काले विद्यारम्भं तु कारयेत् ॥

विधाय पूजामम्बायाः श्रीगुरोश्च श्रुतस्य च ॥ १७० ॥

पूर्ववद्धोमपूजादि कार्यं कृत्वा जिनालये ॥

पुत्रं संस्नाप्य सद्भूषैरलंकृत्य विलेपनैः ॥ १७१ ॥
विद्यालयं ततो गत्वा जयादिपञ्चदेवताः ॥
सम्पूज्य प्रणमेद्भक्त्या निर्विघ्नग्रन्थसिद्धये ॥ १७२ ॥
वस्त्रैर्भूषैः फलैर्द्रव्यैः सम्पूज्याध्यापकं गुरुम् ॥
हस्तद्वयं च संयोज्य प्रणमेद्भक्तिपूर्वकम् ॥ १७३ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें वर सांगितलेल्या शुभ मुहूर्तांपैकी एखादा मुहूर्त निश्चित करून त्या दिवशीं माता गुरु आणि शास्त्र ह्यांची पूजा करून मुलाचा विद्यारंभ करावा. मुलाला स्नान घालून त्याला वस्त्रालंकारांनी सुशोभित करावें. मग जिनालयात जाऊन होम, पूजा वगैरे विधि पूर्वीप्रमाणेंच करावा. नंतर विद्यालयांत जाऊन त्या ठिकाणीं आरंभलेल्या कार्याची निर्विघ्नपणें सिद्धि होण्याककरितां जया वगैरे पांच देवतांची पूजा करून, त्यांना मुलानें भक्तीनें नमस्कार करावा. नंतर वस्त्रें, भूषणें, फलें व द्रव्य ह्यांच्या योगानें अध्यापकाची ( शिकविणाऱ्या गुरूची ) पूजा करून, हात जोडून त्याला भक्तीनें नमस्कार करावा.

प्रांमुखो गुरुरासीनः पश्चिमाभिमुखः शिशुः ॥
कुर्यादक्षरसंस्कारं धर्मकामार्थसिद्धये ॥ १७४ ॥

विशालफलकादौ तु निस्तुषाखण्डतण्डुलान् ॥
उपाध्यायः प्रसार्याथ विलिखेदक्षराणि च ॥ १७५ ॥
शिष्यहस्ताम्बुजद्वन्द्वधृतपुष्पाक्षतान् सितान् ॥
क्षेपयित्वाऽक्षराभ्यर्णे तत्करेण विलेखयेत् ॥ १७६ ॥
हेमादिपीठके वाऽपि प्रसार्य कुङ्कुमादिकम् ॥
सुवर्णलेखनीकेन लिखेत्तत्राक्षराणि वा ॥ १७७ ॥
नमः सिद्धेभ्य इत्यादौ ततः स्वरादिकं लिखेत ॥
अकारादि हकारान्तं सर्वशास्त्रप्रकाशकम् ॥ १७८ ॥

अर्थ— गुरूनें पूर्वेकडे तोंड करून बसावें आणि शिष्यानें पश्चिमेकडे तोंड करून बसावें. मग त्या शिष्याला धर्म, अर्थ आणि काम ह्या तीन पुरुषार्थांची सिद्धि होण्याकरितां अक्षरें शिकवावींत. तीं अक्षरें एखाद्या मोठ्या फळीवर न मोडलेले तांदूळ पसरून प्रथम अध्यापकानें लिहावींत. मग शिष्याच्या हातांत पांढरीं फुलें पांढऱ्या अक्षता देऊन त्या लिहिलेल्या अक्षरांच्या समीप त्याच्याकडून टाकवून, तीं पूर्वी गुरूनें काढलेलीं अक्षरें त्याच्याकडून काढवावींत. किंवा सोन्याच्या तगडावर कुंकु अथवा केशराचें चूर्ण पसरून त्यावर सोन्याच्या लेखणीनें अक्षरें काढावींत, आणि तीं शिष्याकडून काढवावींत. त्यांत प्रथम ‘ नमः सिद्धेभ्यः ’

असें लिहावें. नंतर अकारादि स्वर, नंतर ककारापासून हकारापर्यंतचीं अक्षरें लिहावींत. आणि तीं त्या मुलाकडून काढवावींत. हीं अक्षरें सर्वशास्त्रांत मुलाचा प्रवेश करून देणारीं आहेत.

ॐ नमोऽर्हते नमः सर्वज्ञाय सर्वभाषाभाषितसकलपदार्थाय बालकमक्षराभ्यासं कारयामि द्वादशाङ्गश्रुतं भवतु भवतु ऐं श्रीं ह्रीं क्लीं स्वाहा ॥ इत्यक्षराभ्यासः ॥

अर्थ— मुलाकडून अक्षरें काढविण्याच्या समयीं "ॐ नमोऽर्हते" इत्यादि मंत्र म्हणावा. हा अक्षराभ्यासविधि सांगितला.

पुस्तकग्रहण ( वाचन ) विधि.

ततश्चाधीत्य सर्वाणि चाक्षराणि गुरोर्मुखात् ॥
सुदिने पुस्तकं ग्राह्यं होमपूजादि पूर्ववत् ॥ १७९ ॥
उपाध्यायं च सम्मान्य वस्त्रभूषैश्च पुस्तकम् ॥
हस्तौ द्वौ मुकुलीकृत्य प्राङ्मुखश्च समाविशेत ॥ १८० ॥
उपाध्यायेन तं शिष्यं पुस्तकं दीयते मुदा ॥
शिष्योऽपि च पठेच्छास्त्रं नान्दीपठनपूर्वकम् ॥ १८१ ॥ इति पुस्तकग्रहणम् ॥

अर्थ— मग त्या शिष्यानें गुरु सांगील त्याप्रमाणें सर्व अक्षरांचा अभ्यास करावा. नंतर शुभ दिवस

पाहून त्या दिवशीं पुस्तक वाचण्यास आरंभ करावा. पुस्तकवाचनारंभ करण्याच्या पूर्वी होम पूजा वगैरे विधि पूर्वीप्रमाणेंच करावा. मग वस्त्रें, भूषणें ह्यांच्या योगानें गुरूचा सत्कार करून मुलानें दोनी हात जोडून पूर्वेकडे तोंड करून बसावें. उपाध्यायानें (गुरूनें) त्या मुलाला संतोषानें शास्त्राचें पुस्तक द्यावें. शिष्यानें मंगलपाठ करून शास्त्र पठण्यास आरंभ करावा. हा पुस्तकग्रहणविधि सांगितला.

गर्भाधानसुमोदपुंसवनकाः सीमन्तजन्माभिधा ।
वाह्येयानसुभोजने च गमनं चौलाक्षराभ्यासनम् ॥
सुप्रीतिः प्रियसद्भवो गुरुमुखाच्छास्त्रस्य संग्राहणं ।
एताः पञ्चदश (?) क्रियाः समुदिता अस्मिन् जिनेन्द्रागमे ॥ १८२ ॥

कुर्वन्ति धन्याः पुरुषाः प्रवीणा । आचारशुद्धिं च शिवं लभन्ते ॥
भुक्त्वेह लक्ष्मीविभवं गुणाढ्याः । श्रीसोमसेनैरुपसंस्तुतास्ते ॥ १८३ ॥

अर्थ— गर्भाधान, मोद, पुंसवन, सीमन्त, जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण, अन्नप्राशन, प्रियोद्भव, ग्रहण, सुप्रीति, पादन्यास, शास्त्रग्रहण वगैरे पंधरा (?) क्रिया जिनागमांत सांगितलेल्या ह्या

ठिकाणीं सांगितल्या आहेत. जे धन्य पुरुष ह्या क्रिया करतात ते शुद्धाचार आणि कल्याण ह्या दोहोंस मिळवितात. आणि त्यामुळें ते सर्वगुणसंपन्न होऊन व संपत्तीचें ऐश्वर्य भोगून श्रीसोमसेनमुनींनीहि स्तुति करण्याला योग्य असे होतात.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारकथने भट्टारकश्रीसोम-
सेनविरचिते गर्भाधानादिपञ्चदशक्रियाप्ररूपणो
नामाष्टमोऽध्यायः समाप्तः ॥
श्रीरस्तु ॥ शुभं भवतु ॥

श्रीवीतरागाय नम ॥

## ॥ त्रैवर्णिकाचारस्य नवमोऽध्यायः ॥

मंगल

वन्दे श्रीसुमहेन्द्रकीर्तिसुगुरुं विद्याब्धिपारप्रदं ।
कालेऽस्यापि तपोनिधिं गुणगणैः पूर्णं पवित्रं स्वयम् ॥
नग्नत्वादिकदुष्टसत्परिषहैर्भग्नो न यो योगिराट् ।
पायान्मां स कुबुद्धिकष्टकुहरात्संसारपाथोनिधेः ॥ १ ॥

अर्थ— ज्ञानसमुद्राचें परतीर दाखविणारा, अनेकगुणांनीं युक्त असलेला, पवित्र, आणि या पंचमकालींहि जो तपोनिधीच आहे असा जो श्रीमहेंद्रकीर्ति सद्गुरु, त्याला मी नमस्कार करतो. जो योगिराज, मी नग्न आहें अशा दुष्टकल्पनांनीं खिन्न झाला नाहीं, तो-दुर्बुद्धीमुळें उत्पन्न होणाऱ्या अनंत दुःखाचा मोठा खड्डाच की काय! अशा—ह्या संसारसमुद्रापासून माझें रक्षण करो!!

अजितं जितकामारिं मुक्तिनारीसुखप्रदम् ॥
यज्ञोपवीतसत्कर्म नत्वा वक्ष्ये गुरुक्रमात् ॥ २ ॥

अर्थ— ज्यानें कामरूपी शत्रु जिंकला आहे आणि जो मुक्तिरूपी स्त्रीला सुख देत आहे अशा श्री-

अजितनाथाला नमस्कार करून, उपनयन नावाची क्रिया गुरुपरंपरेला अनुसरून मी सांगतो.

उपनयनाचा काल

गर्भाष्टमेऽब्दे कुर्वीत ब्राह्मणस्योपनायनम् ॥
गर्भादेकादशे राज्ञो गर्भात्तु द्वादशे विशः ॥ ३ ॥
ब्रह्मवर्चसकामस्य कार्यं विप्रस्य पञ्चमे ॥
राज्ञो बलार्थिनः षष्ठे वैश्यस्येहार्थिनोऽष्टमे ॥ ४ ॥

अर्थ— ब्राह्मणाच्या मुलाचें उपनयन गर्भापासून आठव्या वर्षी करावें. क्षत्रियपुत्राचें गर्भापासून अकराव्या वर्षी करावें. आणि वैश्यपुत्राचें गर्भापासून बाराव्या वर्षी करावें. व्रतचर्या आणि अध्ययन अधिक व्हावें अशी इच्छा करणाऱ्या ब्राह्मणपुत्राचें उपनयन पाचव्या वर्षी करावें. बल वाढावें अशी इच्छा करणाऱ्या क्षत्रियपुत्राचें उपनयन सहाव्या वर्षी करावें. आणि द्रव्य पुष्कळ मिळावें अशी इच्छा करणाऱ्या वैश्यपुत्राचें उपनयन आठव्या वर्षी करावें.

उपनयनाची शेवटची कालमर्यादा

आ षोडशाच्च द्वाविंशाच्चतुर्विंशात्तु वत्सरात् ॥
ब्रह्मक्षत्रविशां कालो ह्युपनयनजः परः ॥ ५ ॥

अत ऊर्ध्वं पतन्त्येते सर्वधर्मबहिष्कृताः ॥
प्रतिष्ठादिषु कार्येषु न योज्या ब्राह्मणोत्तमैः ॥ ६ ॥

अर्थ— सोळा वर्षें, बावीस वर्षें आणि चोवीस वर्षें इतका काल क्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्यांच्या उपनयनाची शेवटची मर्यादा आहे. ह्या कालापर्यंत ज्यांचें उपनयन झालें नाहीं ते सर्वधर्मापासून बहिष्कृत होऊन भ्रष्ट होतात. चांगल्या ब्राह्मणांनीं प्रतिष्ठा वगैरे धर्मकृत्यांत त्यांची योजना करूं नये.

उपनयन करण्यास योग्य आचार्य

अथाचार्यः— पितैवोपनयेत्पूर्वं तदभावे पितुः पिता ॥
तदभावे पितुर्भ्राता सकुल्यो गोत्रजो गुरुः ॥ ७ ॥
व्रतबन्धं कुमारस्य विना पितुरनुज्ञया ॥
यः करोति द्विजो मोहान्नरकं सोऽधिगच्छति ॥ ८ ॥

अर्थ— आता मुलाचें उपनयन कोणीं करावें ह्याबद्दल सांगतात— पुत्राचें उपनयन पित्यानेंच करावें. पिता नसल्यास ( मृत झाला असल्यास ) पितामहानें करावें. तो नसल्यास चुलत्यानें करावें. तो नसल्यास त्या कुलांतील पुरुषानें करावें. तोही नसल्यास त्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या पुरुषानें करावें. मुलाचा उपनयनसंस्कार त्याच्या पित्याच्या आज्ञेवांचून जर दुसऱ्यानें कोणीं अज्ञानानें केला, तर तो करणारा

मनुष्य नरकांत जातो.

पुत्राचे सात प्रकार

पुत्रनिश्चयः ॥ स्वाङ्गजः पुत्रिकापुत्रो दत्तः क्रीतश्च पालितः ॥
भगिनीजः शिष्यश्चेति पुत्राः सप्त प्रकीर्तिताः ॥ ९ ॥

अर्थ— आता पुत्र किती प्रकारचे आहेत ते सागतात— आपल्यापासून उत्पन्न झालेला, मुलीचा मुलगा, दत्तक घेतलेला, विकत घेतलेला, पाळलेला, आपल्या बहिणीचा मुलगा आणि आपला शिष्य असे सात प्रकारचे पुत्र शास्त्रांत सांगितले आहेत.

यज्ञोपवीत

सूत्रं वलं हस्तमानं चत्वारिंशच्छताधिकम् ॥
तत्त्रैगुण्यं बहिर्वृत्त्याऽन्तर्वृत्त्या त्रिगुणं पुनः ॥ १० ॥
गृहभार्या समादाय स्वयं हस्तेन कर्तयेत् ॥
तेन सूत्रेण सत्कार्यं शुभ्रं यज्ञोपवीतकम् ॥ ११ ॥

अर्थ— एकशेहे चाळीस हात लांबीचे वळकट सूत घेऊन ते त्रिगुणित करून त्याला पीळ घालावा. तो बाहेरच्या बगलेने घालावा. पुनः त्याचे त्रिगुणित करून आंतील बाजूनें त्याला पीळ घालावा. हे सूत आपल्या

पत्नीनें स्वहस्तानें काढलेलें असावें. त्या सुतास वरीलप्रमाणें दोन वेळ पीळ घातल्यावर त्याच यज्ञोपवीत करावें. तें शुभ्रवर्ण असावें.

उपनयनादिकाना प्रतिबंध केव्हा असतो आणि केव्हा नसतो

नान्दीश्राद्धे कृते पश्चादुल्कापाताग्निवृष्टिषु ॥
सूतकादिनिमित्तेषु न कुर्यान्मौञ्जीबन्धनम् ॥ १२ ॥
यस्य माङ्गलिकं कार्यं तस्य माता रजस्वला ॥
तदा न तत्प्रकर्तव्यमायुःक्षयकरं हि तत् ॥ १३ ॥
माता सहैव भुञ्जीत ऊर्ध्वं माता रजस्वला ॥
व्रतबन्धः प्रशस्तः स्यादित्याह भगवान्मुनिः ॥ १४ ॥
नान्दीश्राद्धे कृते पश्चात्कन्यामाता रजस्वला ॥
कन्यादानं पिता कुर्यादित्यादि जिनभाषितम् ॥ १५ ॥

अर्थ— नांदीश्राद्ध केल्यानर जर उल्कापात, अग्निप्रवेश, अतिवृष्टि, अशौच वगैरे निमित्तें प्राप्त होतील, तर मुंजीबंधन करूं नये. ज्या मुलाचें मंगलकृत्य करावयाचें त्या मुलाची माता जर रजस्वला झाली, तर त्याचें तें मंगलकृत्य करूं नये; केलें असतां त्याच्या आयुष्याचा नाश होतो. मौंजीबंधाच्या संस्कारांत

मुलानें मातेबरोबर एकत्र बसून भोजन करावें. हें भोजन झाल्यावर जर माता रजस्वला झाली, तर मौंजीबंधन करण्यास हरकत नाहीं; असें भगवान् जिनाचें सांगणें आहे. नांदीश्राद्ध केल्यानंतर जर कन्येची माता रजस्वला होईल तर कन्यादान एकट्या पित्यानेंच करावें; असें श्रीजिनानीं सांगितलें आहे.

उपनयनकाल व विधि.

शुभे ग्रहे शुभे योगे मौञ्जीबन्धोचितं सुतम् ॥
संस्नाप्य भूपयित्वा तं मात्रा सह तु भोजयेत् ॥ १६ ॥
केशानां मुण्डनं कृत्वा शिखाशेषं तु रक्षयेत् ॥
हरिद्राज्यसुसिन्दूरदूर्वादिकं विलेपयेत् ॥ १७ ॥
पुनः संस्नाप्य पुण्याहवारिभिः सिक्त्वा कुशाम्बुभिः ॥
आज्यभागावसानान्तैः सुगन्धिभिर्विलेपयेत् ॥ १८ ॥
नान्दीश्राद्धं च पूजां च होमं च वाद्यघोषणम् ॥
सर्वं कुर्याच्च तस्याग्रे पूर्ववद्गुरुपूजनम् ॥ १९ ॥

अर्थ— सर्व ग्रह शुभस्थानीं असतांना व शुभयोग असतांना मुंजीबंधनाला योग्य झालेल्या पुत्रास स्नान घालून, अलंकारानीं भूषित करून, त्याच्या मातेबरोबर त्यास भोजनास घालावें. नंतर त्याच्या

मस्तकाची शेंडी सोडून बाकीचें मुंडन करावें. मग त्याला हळद, तूप, सिंदूर, दुर्वा वगैरे द्रव्यांचें लेपन करून पुनः स्नान घालावें. त्याच्या मस्तकावर पुण्याहवाचनमंत्रांनीं दर्भमिश्रित उदकानें सेंचन करून, त्याच्या शरीराला सुगंधिद्रव्यानें लेपन करावें. नांदीश्राध्द, पूजा, होम, मंगलवाद्याचा घोष वगैरे सर्व विधि करावा. नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें गुरूचें पूजन करावें.

आसन्ने सुमुहूर्ते तु ग्रहस्तोत्रादिकं पठेत् ॥
परमेष्ठिनमस्कारमन्त्रं च संस्मरेत्सदा ॥ २० ॥
पद्मासनस्थः पुत्रोऽसौ प्रमाद्यमुदगाननः ॥
निर्निमेषं निरीक्षेत पितास्यं जन्मशुद्धये ॥ २१ ॥
पुत्रस्य सन्मुखं स्थित्वा तत्पिता सुमुहूर्तके ॥
पुत्रास्यं दृष्ट्वा गन्धेन ललाटे तिलकं न्यसेत् ॥ २२ ॥

अर्थ— सुमुहूर्त जवळ आला म्हणजे ग्रहांचीं स्तोत्रें वगैरे पठण करावीं. पंचपरमेष्ठींच्या नमस्कारमंत्राचें स्मरण करावें. मग पद्मासनानें बसलेल्या पुत्रानें आपल्या पित्याला संतुष्ट करण्याकरितां उत्तरेकडे तोंड करून आपल्या जन्माच्या शुध्दि ( उपनयनास दुसरा जन्म असें म्हणतात ) करितां डोळे न मिटतां पित्याच्या मुखाकडे पहावें. पित्यानें पुत्राच्या सन्मुख बसून सुमुहूर्तावर पुत्राच्या मुखाकडे पाहून त्याच्या

कपालाला गंधाचा टिळा लावावा.

मौंजीधारण

मुञ्जत्रिवर्तिवलितां मौञ्जीं त्रिगुणितां शुभाम् ॥
कौपीनकटिसूत्रोर्ध्वं कटिलिंगं प्रकल्पयेत् ॥ २३ ॥

ॐ ह्रीं कटिप्रदेशे मौंजीबन्ध प्रकल्पयामि स्वाहा ॥ इत्युक्त्वा कट्यां त्रिलिङ्गसमन्वितां मौंजीं बध्नीयात् ॥

अर्थ— मुंज (मोळ) नांवाच्या गवताची तिपदून केलेली सुरेख दोरी, कौपीन आणि कटिसूत्र ह्याच्या [illegible] म्हणून "ओं ह्रीं कटिप्रदेशे" इत्यादि मंत्राचा उच्चार करून–तीन गांठी देऊन बांधावी.

भगवते तीर्थंकरपरमेश्वराय कटिसूत्रं कौपीनसहितं मौंजीबन्धनं [illegible]बन्धो भवतु अ सि आ उ सा स्वाहा ॥ इति कट्यां मुञ्जीं धृत्वा क्षिपेत् ॥

[illegible]र्हते" इत्यादि मंत्रानें ती मौंजी हातानें धरून तिच्यावर पुष्प अक्षता टाकाव्यात.

यज्ञोपवीत धारण

रत्नत्रयात्मकं सूत्रं यज्ञसूत्रं सुनिर्मलम् ॥

हरिद्रागन्धसाराक्तमुरोलिङ्गं प्रकल्पयेत् ॥ २४ ॥

ॐ नमः परमशान्ताय शांतिकराय पवित्रीकृतार्हं रत्नत्रयस्वरूपं यज्ञोपवीतं दधामि मम गात्रं पवित्रं भवतु अर्हं नमः स्वाहा ॥ इत्यनेन यज्ञोपवीतमुरसि धारयेत् ॥

अर्थ— रत्नत्रयस्वरूपी पवित्र आणि निर्मल असें यज्ञोपवीत हळद आणि चंदन ह्यांनीं चर्चित करून हृदयावरील चिन्ह समजून " ॐ नमः परमशान्ताय " इत्यादि मंत्र ह्मणून धारण करावें.

पुष्पमालादिधारण

जिनराजपदाम्भोजशेषसंसर्गपावनीम् ॥
ब्रह्मग्रन्थिं शिखामेव शिरोलिङ्गं प्रकल्पयेत् ॥ २५ ॥

ॐ नमोऽर्हते भगवते तीर्थंकरपरमेश्वराय कटिसूत्रपरमेष्ठिने ललाटे शेखरं शिखायां पुष्पमालां च दधामि मां परमेष्ठिनः समुद्धरन्तु ॐ श्रीं ऱ्हीं अर्हं नमः स्वाहा ॥ अनेन शिरसि पुष्पमालां धृत्वा तिलकं कृत्वा नवीनवस्त्रोत्तारियपरीधानं कुर्यात् ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या पायांवरील गंध अक्षता ह्या पदार्थांचा स्पर्श ( नमस्काराच्या वेळीं ) होत असल्यानें पवित्र असलेली आणि ब्रह्मग्रंथीनें युक्त अशी जी शिखा तीच शिरोलिंग ( मस्तकावरील चिन्ह ) समजावें. " ॐ नमोऽर्हते " इत्यादि मंत्रानें मस्तकावर पुष्पमाला धारण करून कपालावर तिलक करून पांघरण्याचें

एक आणि नेसण्याचें एक अशीं दोन नवीन वस्त्रें धारण करावीत.

अन्तरीयोत्तरीये द्वे नूत्ने धृत्वा स मानवः ॥
आचम्य तर्पणान्यर्घ्यानपि कृत्वा यथाविधि ॥ २६ ॥
ततोऽञ्जलिं च संयोज्य गन्धाक्षतफलान्वितम् ॥
आचार्यं याचयेत्पुत्रो व्रतानि मुक्तिहेतवे ॥ २७ ॥
तच्छ्रुत्वा श्रावकाचाराद्व्रतानि गुरुरादिशेत् ॥
गृह्णीयात्तानि सम्प्रीत्या बीजमन्त्रं गुरोर्मुखात् ॥ २८ ॥

ॐ ह्रीं श्रीं क्लीं कुमारस्योपनयनं करोमि अयं विप्रोत्तमो भवतु अ सि आ उ सा स्वाहा ॥ इति त्रिरुच्चार्य अघोरं पञ्चनमस्कारमुपादिशेत् ॥

अर्थ— त्या कुमारानें नेसावयाचें आणि पांघरावयाचें अशीं दोन वस्त्रें धारण करून आचमन करून तर्पण आणि अर्घ्यदान यथाविधि करावें. नंतर आपल्या अंजलींत गंध, अक्षता आणि फल हीं घेऊन आपल्यास मोक्षाची प्राप्ति व्हावी ह्या इच्छेनें कुमारानें आपल्यास व्रतें सांगण्याबद्दल आचार्याजवळ प्रार्थना करावी. ती कुमाराची याचना ऐकून आचार्यानें [ उपनयन करणाऱ्यानें ] श्रावकाचारांतून त्याला व्रतांचा उपदेश करावा कुमारानें त्या व्रतांचें आणि बीजमंत्रांचें संतोषानें ग्रहण करावें. कुमाराला व्रतांचा उपदेश कर-

ण्याच्या प्रसंगीं " ॐ ऱ्हीं श्रीं क्लीं " इत्यादि मंत्र आचार्यानें तीन वेळां उच्चारून नंतर त्याला व्रतें आणि पंचनमस्कारमंत्र ह्यांचा उपदेश करावा.

उपनयनांगभूत दण्डधारण वगैरे विधि.

शुद्धं विवाहपर्यन्तं ब्रह्मचर्यं परिव्रजेत् ॥
त्रैवर्ण्याचारसूत्रं च छत्रदण्डसमन्वितम् ॥ २९ ॥
विप्रादीनां तु पालाशखादिरोदुम्बराः क्रमात् ॥
दण्डाः स्वोच्चास्तुरीयांशबद्धहारिद्रकर्पटाः ॥ ३० ॥
अग्नेरुत्तरतः स्थित्वा प्राङ्मुखस्त्रिजलाञ्जलीन् ॥
पुष्पाक्षतान्वितान् कृत्वा बटुस्तिष्ठेन्निजासने ॥ ३१ ॥
होमपूजादिकं कार्यं कृत्वा पूर्णाहुतिं गुरुः ॥
अग्रे यद्यत्तु कर्तव्यं तत्तु तस्मै निवेदयेत् ॥ ३२ ॥

अर्थ— कुमारानें विवाहापर्यंत ब्रह्मचर्यव्रत ग्रहण करावें. नंतर त्रैवर्णिकाचाराचें सूत्र, छत्र आणि दंड ह्यांचें ग्रहण करावें. दंड घ्यावयाचा तो ब्राह्मणानें पळसाचा, क्षत्रियानें खैराचा आणि वैश्यानें उंबराचा घ्यावा. तो दंड आपल्या उंची इतकाच उंच असावा. आणि त्याचा शेवटचा (वरील)

चतुर्थांश हळदीनें रंगविलेल्या कापडानें गुंडाळलेला असावा. मग त्या वटूनें अग्नीच्या उत्तरेकडे उभा राहून पूर्वेकडे तोंड करून, पुष्पें, अक्षता ह्यांनीं युक्त अशा जलाच्या तीन अंजली देऊन, आपल्या आसनावर बसावें. मग गुरूनें होम, पूजा वगैरे करून, पूर्णाहुति देऊन, पुढें जें जें करावयाचें तें सर्व त्या वटूला सांगावें.

निर्गत्य सदनाच्छिष्यस्त्वङ्गणे ह्याचमं परम् ॥
कृत्वा सूर्यं समालोक्य एकमर्घं समुत्तरेत् ॥ ३३ ॥
शमीव्रीह्यक्षतैर्लाजैः क्षीराज्यचरुभिस्तथा ॥
संसिञ्च्य जुहुयादग्नौ शान्त्यर्थं तिस्र आहुतीः ॥ ३४ ॥
संवृतौष्ठद्वयं वक्त्रं धौतं तापितपाणिना ॥
त्रिः समृज्याग्न्युपस्थानं कृत्वाऽग्निं विसृजेत्पुनः ॥ ३५ ॥
आविद्याभ्यसनं चान्ते भिक्षावृत्तिप्रयोजनम् ॥
गुरोरादेशमादाय बहिर्गच्छेत्स पात्रयुक् ॥ ३६ ॥

अर्थ,— मग वटूनें घरांतून निघून अंगणात यावें. आणि आचमन करून सूर्याला अवलोकन करून एक अर्घ्य द्यावें. नंतर अग्नीच्या सभोवतीं परिषेचन करून [ पाणी शिंपडून ] शमी, साळीचें भात, अक्षता,

लाह्या, दूध, तूप आणि चरु ह्याच्या तीन आहुती अग्नीत हवन कराव्यात. नंतर दोनी ओंठ मिटून पाण्यानें मुखप्रक्षालन करून आपले हात अग्नीवर तापवून मुखावरून—वरून खालीं ह्याप्रमाणे तीन वेळ—फिरवावत. ह्मणजे हातांनीं तोंड तीन वेळ पुसावें. मग अग्नीचें उपस्थान (स्तुति) करून अग्नीचें विसर्जन करावें. वटूनें विद्याभ्यास होईपर्यंत भिक्षा मागावयाची असते. ह्मणून गुरूची आज्ञा घेऊन भिक्षेचे पात्र हातांत घेऊन घरांतून बाहेर निघावें.

भिक्षाटनाचा विधि

सव्यपादं विधायाग्रे शनैर्गच्छेद्गृहाद्बहिः ॥
ब्राह्मणानां गृहे गत्वा भिक्षां याचेत शिक्षया ॥ ३७ ॥
भिक्षाकाले तु निःशङ्को भिक्षां देहीति वाग्वदेत् ॥
यथा शृण्वन्ति गेहस्थास्त्रिवर्णाचारसंयुताः ॥ ३८ ॥
प्रथमकरणादी द्वौ चरणद्रव्ययुग्मकम् ॥
अनुयोगाश्च चत्वारः शाखा विप्रमते मताः ॥ ३९ ॥
तासां मध्ये तु या शाखा यस्य वंशे प्रवर्तते ॥
तामुक्त्वा गृहिणी तस्मै सन्दद्यात्तण्डुलाञ्जलिम् ॥ ४० ॥

अर्थ— त्या वटूनें उजवा पाय पुढें करून (प्रथम पुढें टाकून) घरातून हळू हळू बाहेर जावें. त्यानें ब्राह्मणाच्या घरीं जाऊन; गुरूनें शिकविल्याप्रमाणें भिक्षा मागावी. भिक्षा मागावयाच्या वेळीं न लाजतां घरातील मंडळीस ऐकूं जाईल इतक्या मोठ्या स्वरानें "भिक्षां देहि" असें वाक्य उच्चारावें. जैनमतांत प्रथमानुयोग, करणानुयोग, चरणानुयोग, आणि द्रव्यानुयोग अशा ब्राह्मणाच्या चार शाखा आहेत. त्यांपैकीं जी शाखा आपल्या कुळांत परंपरेनें चालू असेल त्या शाखेचें नाव घेऊन घरांतील स्त्रीनें ओंजळभर तादळाची भिक्षा घालावी.

भिक्षायाचनकं दृष्ट्वा बन्धुवर्गो वदेदिदम् ॥
दूरदेशान्तरे पुत्र मा गच्छ त्वं तु बालकः ॥ ४१ ॥
अत्रैव गुरुसान्निध्ये विद्याभ्यासं सदा कुरु ॥
मध्ये कुटुम्बवर्गस्य सर्वेषां सुखदायकः ॥ ४२ ॥
अङ्गीकृत्य वचस्तेषां गच्छेच्चासौ जिनालयम् ॥
क्रियां कुर्यात्तु होमादिसम्भवां जिनपूजनम् ॥ ४३ ॥
ब्राह्मणादींस्ततः सर्वान् भोजयित्वा यथाविधि ॥
वस्त्रभूषणताम्बूलैः पुण्यार्थं परिपूजयेत् ॥ ४४ ॥

अर्थ— त्या कुमारास भिक्षा मागत असलेला पाहून त्याच्यावर प्रेम करणाऱ्या लोकांनी त्याला 'बाळा! तूं लहान आहेस! म्हणून भिक्षा मागण्याकरिता फार लांब जाऊं नको; येथेंच गुरूजवळ राहून विद्याभ्यास कर! आणि कुटुंबांत सर्वांना संतोषित कर!!!' असें सांगावें. त्या त्यांच्या भाषणाचा स्वीकार करून, त्या कुमारानें जिनमंदिरांत जाऊन होम, पूजा वगैरे क्रिया करावी. मग ब्राह्मण वगैरे सर्व मंडळीस भोजन घालून, वस्त्रें, भूषणें आणि तांबूल ह्यांच्या योगानें पुण्यप्राप्तीकरितां त्यांचा सत्कार करावा.

बोधिपूजन ( अश्वत्थपूजन )

चतुर्थवासरे चापि संस्नातः पितृसन्निधौ ॥ संक्षिप्तहोमपूजादि कर्म
कुर्याद्यथोचितम् ॥ ४५ ॥ शुचिस्थानस्थितं तुङ्गं छेददाहादिवर्जितम् ॥
मनोज्ञं पूजितुं गच्छेत्सुयुक्त्याऽश्वत्थभूरुहम् ॥ ४६ ॥ दर्भपुष्पादिमाला-
भिर्हरिद्राक्तसुतन्तुभिः ॥ स्कन्धदेशमलङ्कृत्य मूलं जलैश्च सिंचयेत् ॥
॥ ४७ ॥ वृक्षस्य पूर्वदिग्भागे स्थण्डिलस्थाग्निमण्डले ॥ नव नव समि-
द्भिश्च होमं कुर्याद्घृतादिकैः ॥ ४८ ॥ पूतत्वयज्ञयोग्यत्वबोधित्वाद्या
भवन्तु मे ॥ त्वद्वद्बोधिद्रुमत्वं च मद्वचिन्हधरो भव ॥४९॥ तं वृक्षमिति
सम्प्रार्थ्य सर्वमंगलहेतुकम् ॥ वृक्ष वन्हि त्रिः परीत्य ततो गच्छेद्गृहं

मुदा ॥ ५० ॥ एवं कृते न मिथ्यात्वं लौकिकाचारवर्तनात् ॥ भोजना-
नन्तरं सर्वान् सन्तोष्य निवसेद्गृहे ॥ ५१ ॥ प्रतिमासं क्रियां कुर्या-
द्धोमपूजापुरःसराम् ॥ श्रावणे तु विशेषेण सा क्रियाऽऽवश्यकी मता ॥ ५२ ॥

अर्थ — पूर्वी सांगितल्याप्रमाणे उपनयन झाल्यापासून चवथ्या दिवशी त्या कुमाराने आपल्या पित्याच्या सन्निध (चौकटाणात) स्नान करून; होम, पूजा, वगैरे कृत्य संक्षेपानें यथाविधि करावें. मग शुद्ध जाग्यात असलेला, उंच आणि न जळलेला व न तोडलेला असा एक सुंदर पिपळाचा वृक्ष पाहून त्याची पूजा करण्याकरिता त्या ठिकाणी कुमारानें गमन करावें. दर्भ, पुष्पाच्या माला, हळदीनें रंगविलेलें सूत, ह्यांच्या योगानें त्या पिपळाच्या डहाळीला सुशोभित करून; त्याच्या मुळाला पाणी घालावें. त्या वृक्षाच्या पूर्वेकडील बाजूस स्थंडिल घालून त्यावर अग्नि तयार करावा. आणि त्या अग्नीत तूप वगैरे पदार्थ आणि नऊ नऊ समिधा ह्यांच्या योगानें होम करावा. नंतर "हे महावृक्षा! माझी सर्व चिन्हे मी तुला समर्पण करीत आहें. तुझ्याप्रमाणें माझाही यज्ञकर्मात उपयोग होवो. तुझ्याप्रमाणें माझ्या ठिकाणीही पवित्रत्व असूं दे! आणि तुझ्याप्रमाणे माझ्या ठिकाणी बोधित्व असूं दे. तूंही माझी चिन्हें धारण कर." ह्याप्रमाणे त्या सर्व मंगलाला साधनीभूत असलेल्या वृक्षाची प्रार्थना करून व अग्निसहित त्या वृक्षाला तीन प्रदक्षिणा करून नंतर त्या वटून आनंदाने आपल्या घरीं जावें.

ह्याप्रमाणें हा विधि केला ह्मणजे तो वटु केव्हांही मिथ्यात्वी होत नाहीं. मग लौकिकाचाराला अनुसरून सर्वांना भोजन घातल्यावर त्याचा संतोष करून वटूनें स्वस्थपणें स्वगृहीं रहावें. पुढें प्रत्येक महिन्याला वटूनें ही क्रिया, होम पूजा वगैरे विधिपूर्वक करावी. त्यांत श्रावण महिन्यांत अवश्य करावी.

उपनयन होऊन वर्ष झाल्यानंतरची क्रिया

वर्षेऽतीते त्रिकालेषु सन्ध्यावन्दनसत्क्रियाम् ॥
सदा कुर्यात्स पुण्यात्मा यज्ञोपवीतधारकः ॥ ५३ ॥

अर्थ— पुढें एक वर्ष समाप्त झाल्यावर त्या शुद्ध अंतःकरणाच्या कुमारानें त्रिकालीं संध्यावदन क्रिया करावी.

यज्ञोपवीतसंख्या

उपवीतं वटोरेकं द्वे तथेतरयोः स्मृते ॥
एकमेव महत्पूतं सावधिब्रह्मचारिणाम् ॥ ५४ ॥
यज्ञोपवीते द्वे धार्ये पूजायां दानकर्मणि ॥
तृतीयमुत्तरीयार्थं वस्त्राभावे तदिष्यते ॥ ५५ ॥
स्कन्धादिनाभिपर्यन्तं ब्रह्मसूत्रं पवित्रकम् ॥

न्यूने रोगप्रवृत्तिः स्यादधिके धर्मनाशनम् ॥ ५६ ॥
आयुःकामः सदा कुर्यात् द्वित्रियज्ञोपवीतकम् ॥
पञ्चभिः पुत्रकामः स्याद्धर्मकामस्तथैव च ॥ ५७ ॥
यज्ञोपवीतेनैकेन जपहोमादिकं कृतम् ॥
तत्सर्वं विलयं याति धर्मकार्यं न सिध्यति ॥ ५८ ॥
पतितं त्रुटितं वाऽपि ब्रह्मसूत्रं यदा भवेत् ॥
नूतनं धारयेद्विप्रः स्नानसङ्कल्पपूर्वकम् ॥ ५९ ॥
यज्ञोपवीतमेकैकं प्रतिमन्त्रेण धारयेत् ॥
आचम्य प्रतिसङ्कल्पं धारयेन्मुनिरब्रवीत् ॥ ६० ॥
एकमन्त्रैकसङ्कल्पं धृतं यज्ञोपवीतकम् ॥
एकस्मिंस्त्रुटिते सर्वं त्रुटितं नात्र संशयः ॥ ६१ ॥

अर्थ— आतां यज्ञोपवीताविषयीं सांगतात. वटूनें एक यज्ञोपवीत घालावें. गृहस्थ आणि वानप्रस्थ ह्यांनीं दोन दोन घालावीं. आणि सानाग्निब्रह्मचर्य करणारानेंही पवित्र असें एकच यज्ञोपवीत घालावें. पूजा आणि दानकर्म ह्या क्रिया करताना दोन यज्ञोपवीतें असावीं. आणि तिसरें यज्ञोपवीत उत्तरीय

वस्त्राकरिता असावें. कारण वस्त्र नसल्यास त्याचा उपयोग होतो. यज्ञोपवीत ताळूच्या छिद्रापासून नाभीपर्यंत लांब असावें. त्यापेक्षां न्यून असल्यास रोगोत्पत्ति होते. आणि अधिक असल्यास धर्माचा नाश होतो. आयुष्याची इच्छा करणाऱ्यानें दोन किंवा तीन यज्ञोपवीतें घालावीत. आणि पुत्राची इच्छा करणाऱ्यानें व धार्मिक होण्याची इच्छा करणाऱ्यानें पांच यज्ञोपवीतें घालावींत. एकच यज्ञोपवीत घालून जर जप होम वगैरे कृत्य केलें तर तें कृत्य निष्फळ होतें आणि सत्कृत्याची सिद्धि होत नाहीं. ज्यावेळीं यज्ञोपवीत गळ्यांतून पडेल किंवा तुटेल, त्यावेळीं स्नान करून दुसरें यज्ञोपवीत धारण करावें. दोन किंवा अधिक यज्ञोपवीतें धारण करणाऱ्यांनीं प्रत्येक यज्ञोपवीत धारण करतांना मंत्र आणि संकल्प वेगळा वेगळा म्हणावा, आणि यज्ञोपवीत धारण करावें. असें मुनींनीं सांगितलें आहे. कारण, एकदाच मंत्र म्हणून जर सर्व यज्ञोपवीतें एकदम धारण केलीं तर तीं सर्व एकरूप झाल्यामुळें त्यांतील एक तुटलें असतां तीं सर्व तुटलीं असें समजावें लागेल; ह्यांत संशय नाहीं.

यज्ञोपवीत तुटलें असतां

यज्ञोपवीतं चानन्तं मुञ्जीं दण्डं च धारयेत् ॥
नष्टे भ्रष्टे नवं धृत्वा नष्टं नैव जले क्षिपेत् ॥ ९२ ॥

अर्थ— यज्ञोपवीत, अनंत, मुंजी आणि दंड ह्या वस्तु वटूनें सर्वदा धारण कराव्यात. जरीपकीं यज्ञो-

पवीत, अनंत आणि मुंजी हीं तुटलीं असता किंवा गळ्यातून वगैरे पडलीं असतां नवीन धारण करावीत. आणि तीं जलांत टाकून द्यावीत. त्याचप्रमाणें दंड मोडला असतां नवीन घ्यावा. आणि मोडलेला पाण्यांत टाकून द्यावा.

उत्तरीयवस्त्रधारण

सदोपवीतवत्धार्यं वासः सकलकर्मसु ॥
सह यज्ञोपवीतेन बध्नीयाज्जलकर्मणि ॥ ६३ ॥

अर्थ— यज्ञोपवीताप्रमाणेंच ( डाव्या खांद्यावरून व उजव्या हाताच्या खालून ) उत्तरीय वस्त्रहि सर्व कर्मांत धारण करावें. आणि जलांतील कर्म करावयाचें असताना तें उत्तरीयवस्त्र यज्ञोपवीतावरोबर बांधावें.

वर्णभेदानें यज्ञोपवीतभेद

कार्पासमुपवीतं स्याद्विप्रस्योर्ध्वं त्रिवृत्कृतम् ॥
हेमसूत्रमयं राज्ञो वैश्यस्य पट्टसूत्रकम् ॥ ६४ ॥
उच्छिष्टं नोरण छिन्नं छिद्रितं विनवाकुलम् ॥
भुक्तोत्तरे त्वनन्याये सततन्तु न धारयेत् (?) ॥ ६५ ॥
सूतके पातके म्लाने तैलस्याभ्यङ्गके तथा ॥

कण्ठादुत्तार्य सूत्रं तु कुर्युर्वै क्षालनं द्विजाः ॥ ६६ ॥ इति यज्ञोपवीतकर्म ॥

अर्थ— ब्राह्मणांनी कापसाचें यज्ञोपवीत धारण करावें. क्षत्रियांनीं सुवर्णाचें आणि वैश्यानीं पट्टसूत्राचें यज्ञोपवीत धारण करावें. तोंडात धरलेलें, दोनी हातानीं धरून गळ्यातून वर उचललेलें, तुटलेलें, दोघानीं सूत काढून केलेलें, विधवेनें सूत काढून केलेलें, भोजनानंतर केलेलें, आणि अनध्यायाच्या दिवशीं केलेलें असें सप्ततंतु (यज्ञोपवीत ह्यावरून यज्ञोपवीत सात पदरांचें असावें असें दिसतें) धारण करूं नये. आशौच संपलें असतां, पातक केलें असता, यज्ञोपवीत मलिन झालें असता, अंगांना तेल लावून स्नान करावयाचें असता, त्रैवर्णिकानीं यज्ञोपवीत गळ्यातून बाहेर काढून स्वच्छ धुवावें. ही यज्ञोपवीतक्रिया सांगितली.

व्रतचर्यामहं वक्ष्ये क्रियामस्योपबिभ्रतः ॥
कटयूरुरःशिरोलिङ्गमनूचानव्रतोचितम् । ६७ ॥

अर्थ— गुरुजवळ अध्ययन करणाऱ्या शिष्याला उचित अशा—कंबर, मांड्या, हृदय आणि मस्तक ह्यांचीं—चिन्हें धारण करणाऱ्या त्या कुमाराची व्रतचर्या सांगतो

कटिलिंग

कटिलिङ्गं भवेदस्य मौञ्जीबन्धं त्रिभिर्गुणैः ॥

रत्नत्रयविशुद्ध्यर्थं तद्धि चिन्हं द्विजन्मनाम् ॥ ६८ ॥

अर्थ— तीन रज्जूंनी केलेली मौंजी ही या वटूचें कटिलिंग होय. ही ज्याअर्थी रत्नत्रयाच्या विशुद्धीचें साधन असल्यानें ती त्रैवर्णिकांचें चिन्ह आहे.

ऊरुलिंग

तच्चेष्टमूरुलिंगं च सधौतमितशाटकम् ॥
आर्हतानां कुलं पूतं विशालं चेति सूचने ॥ ६९ ॥

अर्थ— जिनमताचें अनुसरण करणाऱ्यानें कुल पवित्र असून विशाल आहे हें दाखविण्याकरिता त्या वटूला धुतलेलें शुभ्रवर्ण असें नेसण्याचें वस्त्र हें ऊरूंचें ( मांड्यांचें ) चिन्ह अवश्य असलें पाहिजे.

उरोलिंग ( हृदयाचें चिन्ह )

उरोलिङ्गमथास्य स्याद्ग्रथितं सप्तभिर्गुणैः ॥
यज्ञोपवीतकं सप्तपरमस्थानसूचकम् ॥ ७० ॥

अर्थ— सात जीं परमस्थानें त्यांचें सूचक असें सात सूत्रांनीं तयार केलेलें यज्ञोपवीत हें त्या वटूचें हृदयावरील चिन्ह होय.

शिरोलिंग

शिरोलिंगं च तस्येष्टं परं मौण्ड्यमनाविलम् ॥
मौण्ड्यं मनोवचःकायगतमस्योपबृंहितम् ॥ ७१ ॥

अर्थ— मुंडन हें त्या वटूच्या मस्तकाचें चिन्ह अवश्य असलें पाहिजे. त्या योगानें त्याचें मन, वाणी आणि शरीर ह्यांच्या मुंडनाची ( निर्दोषतेची ) वृद्धि होते.

एवम्प्रायेण लिङ्गेन विशुद्धं धारयेद्व्रतम् ॥ ७२ ॥
स्थूलहिंसाविरत्यादि ब्रह्मचर्योपबृंहितम् ॥

अर्थ— अशा प्रकारच्या ह्या चार चिन्हांनीं युक्त असल्यानें शुद्ध अशीं स्थूलहिंसाविरति, ब्रह्मचर्य वगैरे व्रतें त्या वटूनें धारण करावीं.

ब्रह्मचाऱ्याला निषिद्ध आचार

दन्तकाष्ठग्रहो नास्य न ताम्बूलं न चाञ्जनम् ॥
न हरिद्रादिभिः स्नानं शुद्धिस्नानं दिनम्प्रति ॥ ७३ ॥
न खट्वाशयनं तस्य नान्याङ्गपरिघट्टनम् ॥
भूमौ केवलमेकाकी शयीत व्रतशुद्धये ॥ ७४ ॥

अर्थ— ह्या वटूनें दंतधावन करूं नये. तांबूल भक्षण, डोळ्यात काजळ घालणें, हळद लावून स्नान

करणें हे व्यापार करूं नयेत. त्यानें शरीरशुद्धीकरितां मात्र प्रतिदिवशीं स्नान करावें. ह्यानें माच्यावर किंवा पलंगावर निजूं नये. दुसऱ्याच्या अंगाशीं आपलें अंग घासूं नये. एकट्यानें भूमीवर निजावें. म्हणजे शुद्धव्रताचें पालन होतें.

व्रतावतरण

श्रावणे मासि नक्षत्रे श्रवणे पूर्ववत्क्रियाम् ॥
पूर्वहोमादिकं कुर्यान्मौञ्जी कट्याः परित्यजेत् ॥ ७५ ॥
तत आरभ्य वस्त्रादीन् गृह्णीयात्परिधानकम् ॥
शय्यां शयीत ताम्बूलं भक्षयेद्गुरुसाक्षितः ॥ ७६ ॥

अर्थ— पुढें श्रावण महिन्यांतील श्रवणनक्षत्रावर पूर्वीप्रमाणें होमादिक क्रिया करून त्या वटूनें कंबरेची मुंजी सोडून टाकावी. मग त्या दिवसापासून वस्त्रें धारण करावीत. शय्येवर निजावें. आणि तांबूलभक्षणही करावें. ह्या क्रिया गुरूच्या साक्षीनें कराव्यात.

दुसरा पक्ष

अथवा— यावद्विद्यासमाप्तिः स्यात्तावदस्येदृशं व्रतम् ॥
ततोऽप्यूर्ध्वं व्रतं तु स्याद्यन्मूलं गृहमेधिनाम् ॥ ७७ ॥

सूत्रमौपासकं चास्य स्यादध्येयं गुरोर्मुखात् ॥
विनयेन ततोऽन्यच्च शास्त्रमध्यात्मगोचरम् ॥ ७८ ॥

अर्थ— किंवा विद्या समाप्त होईपर्यंत ह्या बटूनें पूर्वी सांगितलेलें व्रत करावें. आणि विद्यासमाप्ति झाल्यानंतर गृहस्थांचीं व्रतें ग्रहण करावीत. त्या बटूनें उपासकसूत्रांचें अध्ययन गुरुमुखापासून करावें. नंतर अध्यात्मशास्त्राचें अध्ययन करावें. तात्पर्य त्या बटूनें पूर्वी सांगितल्याप्रमाणें श्रावणमासीं व्रतत्याग करावा; किंवा विद्याध्ययनाची समाप्ति झाल्यावर करावा.

व्रतावतरणविधीचा मुख्यकाल आणि तदुत्तर व्यवहार

व्रतावतरणं चेदं गुरुसाक्षिकृतार्चनम् ॥
वत्सरात् द्वादशादूर्ध्वमथवा षोडशात्परम् ॥ ७९ ॥
वस्त्राभरणमाल्यादिग्रहणं गुर्वनुज्ञया ॥
शस्त्रोपजीविवर्ग्यश्चेद्धारयेच्छस्त्रमप्यदः ॥ ८० ॥
वैश्यश्चेद्व्यवहारादिव्यापारं कारयेन्मुदा ॥
दोषे जाते त्रयो वर्णाः प्रायश्चित्तं हि कुर्वते ॥ ८१ ॥

अर्थ— ह्या क्रियेस व्रतावतरणक्रिया (व्रतसमाप्ति) असें म्हणतात. ह्यांत गुरूच्या समक्ष पूजा होम

[illegible] सोळा वर्षांनी करावी. ती क्रिया [illegible]
[illegible]
[illegible] व्यापार करावा. [illegible]
आपल्या [illegible] कार्यी दोष झाल्यास पुढे [illegible] करावीत.

दोष आणि प्रायश्चित्त

अथ प्रायश्चित्तम् ॥ मद्यमांसमधु भुंक्ते अज्ञानात्पक्षपक्वकम् ॥
उपवासत्रयं चैकभक्तं द्वादशकं तथा ॥ ८२ ॥
अन्नदानाष्टिकेकाश्च प्रत्येकाष्टोत्तरं स्नानम् ॥
तीर्थयात्राद्वयं पुष्पाक्षतान्दद्यात्स्वशक्तितः ॥ ८३ ॥

अर्थ— मद्य, मांस आणि मध हे पदार्थ जर तीन तोळ्यापर्यंत न समजून भक्षण केले, तर तीन उपवास करून बारा दिवस एकभक्त (एकवार भोजन) करावें. एकशेंहे आठ अन्नदानें आणि तितकींच स्नानें करावीत. दोन वेळ तीर्थयात्रा करावी. आणि पुष्पें आणि अक्षता यांचा व्यय आपल्या शक्तीप्रमाणें करावा.

म्लेच्छ आदिकांच्या घरीं भोजनाचें प्रायश्चित्त

म्लेच्छादीनां च गेहे तु भुक्ते त्रिंशदुपोषणम् ॥
एकभुक्तानि पञ्चाशत्पात्रदानं शतद्वयम् ॥ ८४ ॥
एका गौः पञ्च कुम्भाश्चाभिषेकानां शतद्वयम् ॥
[illegible] तीर्थयात्राद्वयं कुर्यात् [illegible] ॥ ८५ ॥

अर्थ— म्लेच्छ [illegible] घरात त्यांचे अन्न व [illegible] भोजन केले असता, तीस उपोषणे करावीत [illegible] पन्नास दिवस एकभुक्त करणे. दोनशे सत्पात्राला [illegible] करावे. एक गाय आणि पाच कलश दान करावेत. दोनशे स्नाने करावीत. पुष्प आणि [illegible] आपल्या शक्तीप्रमाणे व्यय करावा. आणि दोन वेळ तीर्थयात्रा कराव्यात

विजातीयगृहभोजनप्रायश्चित्त

विजातीयानां गेहे तु भुक्ते चोपोषणं नव ॥
एकभक्ताश्च पञ्चाशदन्नाभिषेकाः स्मृताः ॥ ८६ ॥

अर्थ— विजातीयाच्या घरी भोजन केले असता, नऊ उपोषणे आणि पंधरा दिवस एकभुक्त व पंधरा स्नाने करावीत.

अग्नीत देहत्यागाचे प्रायश्चित्त

मृतेऽग्नौ पातके प्रोक्ताः प्रोषधाः पञ्चविंशतिः ॥
एकभुक्त्यन्नदानाभिषेकपुष्पशतत्रयम् ॥ ८७ ॥

अर्थ— अग्नीमध्यें देह टाकून जर कोणी मृत झाला असेल तर त्याच्या पातकनाशाकरितां त्याचें और्ध्वदेहिक करणाऱ्यानें पचवीस प्रोषधोपवास करावेत. आणि एकभक्त, अन्नदान, स्नान आणि पुष्पें हीं प्रत्येक तीनशेंहे करावीत.

गिरिपतनादिप्रायश्चित्त

गिरेः पातोऽहिदष्टश्च गजादिपतनान्मृतः ॥
प्रोषधाः पञ्च पक्वान्नयात्राभिषेकविंशतिः ॥ ८८ ॥
तीर्थयात्राश्च गोदानं गन्धपुष्पाक्षताद्यः ॥
यथाशक्ति गुरोः पूजा द्रव्यदानं जिनालये ॥ ८९ ॥

अर्थ— डोंगराच्या कड्यावरून पडणें, सर्पदंश, हत्ती वगैरे वरून पडणें ह्या योगानें जर कोणी मृत झाला असेल, तर त्याच्याकरिता और्ध्वदेहिक ( उत्तरक्रिया ) करणाऱ्यानें पाच प्रोषधोपवास करावेत. वीस सत्पात्राना अन्नदान करावें. वीस स्नानें करावीत. आणि तीर्थयात्रा, गोदान, गंध, पुष्प, अक्षता, गुरुपूजा, जिनालयांत द्रव्य देणें हे सर्व आपल्या शक्तीप्रमाणे करावें.

प्रायश्चित्तेषु सर्वेषु शिरोमुण्डं विधीयते ॥
काश्मीरागुरुपुष्पादिद्रव्यदानं स्वशक्तितः ॥ ९० ॥
ग्रहपूजा यथायोग्यं विप्रेभ्यो दानमुत्तमम् ॥
संघपूजा गृहस्थेभ्यो ह्यन्नदानं प्रकीर्तितम् ॥ ९१ ॥

अर्थ-- सर्व प्रकारच्या प्रायश्चित्तात शिरोमुंडन अवश्य केलें पाहिजे केशर, चंदन, पुष्पें वगैरे देणें आणि जिनालयात द्रव्य देणें, हें आपल्या शक्तीप्रमाणें करावें. तसेंच ग्रहपूजा, ब्राह्मणांना गाय वगैरे देणें, संघपूजा आणि गृहस्थांना अन्नदान, हे सर्व विधि प्रायश्चित्तांत अवश्य केले पाहिजेत.

चांडालादिसंसर्गप्रायश्चित्त.

चाण्डालादिकसंसर्गं कुर्वन्ति वनितादिकाः ॥
पञ्चाशत्प्रोषधश्चैकभक्तः पञ्चशतानि च ॥ ९२ ॥
सुपात्रदानं यात्राश्च पञ्चाशत्पुष्पचन्दनम् ॥
सङ्घपूजा च जापं च द्रव्यदानं जिनालये ॥ ९३ ॥

अर्थ— घरांतील स्त्रिया वगैरे चांडालादिकांना स्पर्श करितात, त्याबद्दल पन्नास प्रोपधोपवास ज्यांनीं चांडालादिकांशीं संगर्ग केला असेल, त्यांनीं करावेत. पांचशेहे एकभक्तें करावींत. पन्नास सुपात्रांना

अन्नदान करावें. यात्रा कराव्यात. पुष्प आणि चंदन हीं पन्नास लोकांना द्यावींत. मंत्रपूजा, जप, जिनालयांत द्रव्यदान हे व्यवहार यथाशक्ति करावेत.

शूद्रसंसर्गप्रायश्चित्त

मालिकादिकसंसर्गं कुर्वन्ति वनितादयः ॥
प्रोषधाः पञ्च चैकाशदश पात्राणि विंशतिः ॥ ९४ ॥

अर्थ— माळी वगैरे लोकांशीं स्त्रियादिकांचा संसर्ग होतो त्यास प्रायश्चित्त पांच प्रोषधोपवास, दहा एक भक्त, आणि वीस सुपात्रांना अन्नदान असें करावें.

अशुचिसंसर्गप्रायश्चित्त

सूतके जन्ममृत्योश्च प्रोषधाः पञ्च शक्तितः ॥
एकभक्ता दशैकान्यपात्रदानं च चन्दनम् ॥ ९५ ॥

अर्थ—जन्म मृत्यु संबंधाच्या आशौचात संसर्ग झाला असता आपल्या शक्तीप्रमाणें पांच प्रोषधोपवास करावेत. एकभक्त एकापासून दहापर्यंत. पात्रदान आणि चंदन यांचेंही प्रमाण एकापासून दहापर्यंत करावें.

अग्नि मुखांत गेले असता प्रायश्चित्त

आयाते मुखेऽग्निमण्डे चोपवासास्त्रयो मताः ॥

एकभुक्ताश्च चत्वारो गन्धाक्षताः स्वशक्तितः ॥ ९६ ॥

अर्थ—आपल्या तोंडात कोणत्याही कारणानें अस्थीचा तुकडा आला असतां तीन उपवास करावेत. चार एकभक्तें करावीत. आणि गंध, अक्षता ह्यांचें प्रमाण आपल्या शक्तीप्रमाणें समजावें.

अस्थिस्पर्शप्रायश्चित्त

स्पर्शितेऽस्थिकरे स्वाङ्गे स्नात्वा जपशतत्रयम् ॥
अस्थि यथा तथा चर्मकेशश्लेष्ममलादिकम् ॥ ९७ ॥

अर्थ—अस्थि ज्याच्या हातात आहे असा मनुष्य आपल्या शरीराला स्पर्श करील तर तत्काल स्नान करून तीनशेहे जप करावा. कातडें, केश, थुंकी, मल वगैरेंच्या स्पर्शासंबंधानें हेंच प्रायश्चित्त समजावें.

गर्भपातनप्रायश्चित्त.

गर्भस्य पातने पापे प्रोषधा द्वादश स्मृताः ॥
एकभक्ताश्च पञ्चाशत् पुष्पाक्षताश्च शक्तितः ॥ ९८ ॥

अर्थ—गर्भपाताचें पातक केलें असतां, बारा प्रोषधोपवास करावेत पन्नास एकभक्त आणि अक्षता आणि पुष्पें ( श्रीजिनेंद्रावर चढविणेची ) ह्यांचें प्रमाण आपल्या शक्तीप्रमाणें समजावें.

द्वीन्द्रियादिघातप्रायश्चित्त

अज्ञानाद्वा प्रमादाद्वा विकलत्रयघातने ॥
प्रोषधा त्रिविचत्वारो जपमालास्तथैव च ॥ ९९ ॥

अर्थ— न समजून किंवा चुकीनें द्वीन्द्रिय, त्रींद्रिय आणि चतुरिंद्रिय या जीवांचा नाश आपल्याकडून झाला असतां क्रमानें दोन, तीन, चार प्रोपधोपवास करावेत. आणि जपाच्या माला तितक्याच. ह्मणजे दोन तीन चार कराव्यात. तात्पर्य दोनशेहे, तीनशेहे, चारशेहे जप करावा.

तृणभक्षकपशुघातप्रायश्चित्त

घातिते तृणभुग्जीवे प्रोषधा अष्टाविंशतिः ॥
पात्रदानं च गोदानं पुष्पाक्षताः स्वशक्तितः ॥ १०० ॥

अर्थ—गवत खाणाऱ्या जीवांचा नाश केला असतां अठ्ठावीस प्रोपधोपवास करावेत. पात्रदान, गोदान आणि फुलें व अक्षता चढविणें हें आपल्या शक्तीप्रमाणें करावें.

जलचरस्थलचरमूषकमार्जारादिवधप्रायश्चित्त

जलस्थलचराणां तु पक्षिणां घातकः पुमान् ॥
गृहे मूषकमार्जारश्वादीनां दन्तदोषिणाम् ॥ १०१ ॥
प्रोषधा द्वादशैकान्ताभिषेकाश्चानु षोडश ॥

गोदानं पात्रदानं तु यथाशक्ति गुरोर्मुखात् ॥ १०२ ॥

अर्थ— जलचर, स्थलचर, पक्षी आणि घरांतील उंदीर, मांजर, श्वान वगैरे ज्यांच्या दांतांत विष आहे अशा प्राण्यांचा वध करणाऱ्या मनुष्यानें बारा प्रोपधोपवास करावेत. आणि एकभक्त व स्नानें सोळा सोळा करावींत तसेंच गोप्रदान, पात्रदान हीं गुरु सांगील त्याला अनुसरून आपल्या शक्तीप्रमाणें करावींत.

गवादिवधप्रायश्चित्त

गोमहिषीछागीनां वधकर्ता त्रिविंशतिः ॥
प्रोपधानेकभक्तानां शतं दानं तु शक्तितः ॥ १०३

अर्थ— गाय, हैस, शेळी ह्याचा वध करणाऱ्यानें तेवीस प्रोपधोपवास करावेत. शंभर एकभक्त करावेत आणि पात्रदानें आपल्या शक्तीप्रमाणें करावींत.

मनुष्यवधप्रायश्चित्त

मनुष्यघातिनः प्रोक्ता उपवासाः शतत्रयम् ॥
गोदानं पात्रदानं तु तीर्थयात्राः स्वशक्तितः ॥ १०४ ॥

अर्थ— मनुष्याचा वध करणाऱ्यानें तीनशेहे उपवास करावेत; आणि गोदान, पात्रदान व तीर्थयात्रा

हीं आपल्या शक्तीप्रमाणें करावीत.

आपल्याकरिता मनुष्यवध झाला असता प्रायश्चित्त

यस्योपरि मृतो जीवो विषादिभक्षणादिना ॥
क्षुधादिनाऽथवा भृत्ये गृहदाहे नरः पशुः ॥ १०५ ॥
कूपादिखनने वाऽपि स्वकीयेऽत्र तडागके ॥
स्वद्रव्ये द्रव्यगे भृत्ये मार्गे चौरेण मारिते ॥ १०६ ॥
कुड्यादिपतने चैव रण्डावन्हौ प्रवेशने ॥
जीवघातिमनुष्येण संसर्गे क्रयविक्रये ॥ १०७ ॥
प्रोपधाः पञ्च गोदानमेकभक्ता द्विपञ्चकाः ॥
संघपूजा दयादानं पुष्पं चैव जपादिकम् ॥ १०८ ॥

अर्थ— आपल्याकरितां एखाद्या मनुष्यानें विष भक्षण करून प्राण दिला असतां, किंवा कोणी मनुष्य आपल्याकरितां क्षुधेने मेला असतां, किंवा आपले घर पेटलें असतां त्यांत एखादा नोकर किंवा एखादें जनावर मेलें असतां; आपला आड, विहीर वगैरे खाणीत असतांना कोणी मेलें असतां, आपलें द्रव्य घेऊन येणारा नोकर वाटेंत चोरांनी मारला गेला असता, आपल्या घराची भित पडून कोणी मेलें असता,

एखाद्या विधवेनें आपल्या सांगण्यानें अग्निप्रवेश केला असता ( सती गेली असतां ), जीवांची हिंसा करणाऱ्या मनुष्याशीं आपला संसर्ग झाला किंवा त्याच्याशीं देवघेवीचा व्यापार झाला असतां, पाच प्रोषधोपवास करावेतः आणि एक गोदान करावें. बावन्न एकभक्तें करावींत. संघपूजा, दयादानें, पुष्पें चढविणें आणि जप वगैरे करणें हे सर्व करावें.

आपल्या पात्राना दुसऱ्यानीं स्पर्श केला असता

स्वतोऽन्यैः स्पर्शितं भाण्डं मृण्मयं चेत्परित्यजेत् ॥
ताम्रारलोहभाण्डं चेच्छुध्यते शुद्धभस्मना ॥ १०९ ॥
वन्हिना कांस्यभाण्डं चेत्काष्ठभाण्डं न शुध्यति ॥
कांस्यं ताम्रं च लोहं चेदन्यभुक्तेऽग्निना वरम् ॥ ११० ॥

अर्थ— स्वजातीयावाचून दुसऱ्यानें आपलें मातीचें भांडें शिवलें असतां तें टाकून द्यावें. तांब्याचें पितळेचें किंवा लोखंडाचें भांडें असल्यास शुद्ध राख लावून घासल्यानें शुद्ध होतें. काश्याचें भांडें अग्नीनें शुद्ध होतें. लाकडाचें पात्र कशानें शुद्ध होत नाहीं. काशें, तांबें आणि लोखंड ह्या धातूंचीं भांडीं अग्नीनें शुद्ध केल्यास फार चांगलें.

भांड्यात मद्यादिपदार्थ पडले असता

यद्भाजने सुरामांसविण्मूत्रश्लेष्ममाक्षिकम् ॥
क्षिप्तं ग्राह्यं न तद्भाण्डमन्यायः श्रावकोत्तमैः ॥ ११ ॥

अर्थ— ज्या भांड्यांत मद्य, मांस, मल, मूत्र, कफ, मध हे पदार्थ पडले असतील, तर ते भांडे उत्तम श्रावकाने घेऊं नये. घेतले असतां मोठाच अन्याय होईल.

सूप वगैरेस अन्यस्पर्श झाला असता

चालनी वस्त्रं शूर्पं च मुसलं घट्यन्त्रकम् ॥
स्वतोऽन्यैः स्पर्शितं शुद्धं जायते क्षालनात्परम् ॥ ११२ ॥

अर्थ— चालण, वस्त्र, सूप, मुसळ, रहाट हे पदार्थ आपल्यावांचून इतरांनी ( इतर जातीच्या मनुष्यांनी ) शिवले असता धुवून टाकिल्यानें शुद्ध होतात.

स्वप्नभक्षितवस्तुत्याग

स्वप्ने तु येन यद्भुक्तं तत्त्याज्यं दिवसत्रयम् ॥
मद्यं मांसं यदा भुङ्क्ते तदोपवासकद्वयम् ॥ ११३ ॥

अर्थ— स्वप्नांत जे खाल्ले असें वाटेल तो पदार्थ तीन दिवस खाऊं नये. जर स्वप्नांत मद्य मांस खाल्लें असेल तर दोन उपवास करावेत.

ब्रह्मचर्यभंगप्रायश्चित्त

ब्रह्मचर्यस्य भङ्गे तु निद्रायां परवशतः ॥
सहस्रैकं जपेज्जापमेकभक्तत्रयं भवेत् ॥ ११४ ॥

अर्थ— निद्रेंत पराधीन असल्यामुळें जर ब्रह्मचर्याचा भंग झाला ( स्वप्नावस्थेनें रेतःस्खलन झालें ) तर एक हजार जप करावा. आणि तीन दिवस एकभक्त करावें.

स्वप्नात जनन्यादिकाचा समागम झाला असता

मात्रा तथा भगिन्या च समं संयोग आगते ॥
उपवासद्वयं स्वप्ने सहस्रैकं जपोत्तमम् ॥ ११५ ॥

अर्थ-स्वप्नांत भगिनी किंवा माता ह्याच्याशीं समागम होईल तर दोन उपवास करून एक हजार जप करावा.

रात्रिभोजनादिप्रायश्चित्त

मिथ्यादृशां गृहे रात्रौ भुक्तं वा शूद्रसद्मनि ॥
तदोपवासाः पञ्च स्युर्जाप्यं तु द्विसहस्रकम् ॥ ११६ ॥

अर्थ— मिथ्यादृष्टीच्या घरांत भोजन केलें असतां, रात्री भोजन केले असता अथवा शूद्राच्या घरांत भोजन केले असतां पांच उपवास करावेत. आणि दोन हजार जप करावा.

इत्येवमल्पशः प्रोक्तः प्रायश्चित्तविधिः स्फुटम् ॥
अन्यो विस्तरतो ज्ञेयः शास्त्रेष्वन्येषु भूरिषु ॥ ११७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें प्रायश्चित्ताचा विधि थोडक्यात सांगितला. ह्यापेक्षां अन्यविधि दुसऱ्या अनेक शास्त्रांत विस्तारानें असलेला समजून घ्यावा.

इत्थं मौञ्जीबन्धनं पालनीयं । प्रायश्चित्तं वर्जयेत्को नु पापः ॥
धर्म्यं कर्म प्रायशो रक्षणीयं । पुण्याश्लिष्टैः सोमसेनैर्मुनीन्द्रैः ॥ ११८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणे मौंजीबंधनाचें व्रत रक्षण करावें. त्यांत कोणत्याही पातकी मनुष्यानें प्रायश्चित्ताचा त्याग करणें योग्य होईल काय? कधींही होणार नाहीं. पुण्यसंपादन करणाऱ्या सोमसेनमुनींनी " धर्मकर्माचें अवश्य रक्षण करावें " असें सांगितलें आहे.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपणे भट्टारक-
श्रीसोमसेनविरचिते व्रतस्वरूपकथनीयो नाम
॥ नवमोऽध्यायः समाप्तः ॥

॥ श्रीवीतरागाय नम ॥

## दशमोऽध्यायः

भुवनकमलमित्रः सर्वदा यः पवित्रः । सुकृतकरचरित्रः पालितानेकमित्रः ॥
स जयति जिनदेवः सद्य एवैन्मुदं वः । शिवपदमपि भक्त्या धर्मनाथो जिनेन्द्रः ॥ १ ॥

अर्थ—त्रिभुवनरूपी कमलाचा जो मित्र, जो सर्वदा पवित्र आहे, ज्याचें चरित्र पुण्योत्पादक आहे, आणि ज्यानें आपल्यावर श्रद्धान करणाऱ्या अनेक लोकांचें रक्षण केलें आहे असा श्री जिनदेव उत्कर्ष पावत आहे. जो धर्मसंस्थापक श्रीजिनेंद्र मोक्षाला जाता झाला असूनही तुमच्या भक्तीमुळें तुम्हाला तत्काल आनंद उत्पन्न करीत आहे.

व्रतग्रहणविधि

अथोपवीतान्वित एव शिष्यो । महागुणाढ्यो विभवै रुपेतः ॥
व्रजेज्जिनेन्द्रालयमुन्नताङ्गं । समावृतोऽसौ परितः कुटुम्बैः ॥ २ ॥

अर्थ—नंतर यज्ञोपवीत धारण करणाऱ्या व गुणवान् आणि अनेक ऐश्वर्यांनीं युक्त अशा आणि आपल्या

कुटुंबांतील मनुष्यांनी वेढलेल्या अशा शिष्यानें भव्य अशा जिनेंद्रालयात गमन करावें.

पादौ प्रक्षाल्य जैनेन्द्रं प्रविशेत्सदनं शनैः ॥
पूजां शान्तिं विधायात्र सङ्गच्छेद्गुरुसन्निधौ ॥ ३ ॥

अर्थ—त्या शिष्यानें आपले पाय धुवून त्या जिनमंदिरात हळूहळू गमन करावें. मग त्या ठिकाणी पूजा आणि शांतिपाठ करून गुरुच्या जवळ यावें.

गुरूच्या सन्निध येणें

फलं धृत्वा गुरोरग्रे महाभक्तिसमन्वितः ॥
पञ्चाङ्गं नमनं कुर्यात्करयुग्मशिरःस्थितः ॥ ४ ॥

समाधानं च सम्पृच्छ्योपविशेच्छिनयाद्भुवि ॥
धर्मवृध्यादिना सोऽपि तोपयेच्छिष्यवर्गकम् ॥ ५ ॥

अर्थ—हातामध्यें फल धारण करून गुरूच्या अग्रभागीं शिष्यानें गमन करावें, आणि गुरूला पंचांगनमस्कार करून, आणि हात जोडून मस्तकावर ठेवून, त्याला "आपलें समाधान आहे ना?" असें विचारून बसावें. गुरूनेंही शिष्याला धर्मवृद्धि असल्याबद्दल विचारून त्याचा संतोप करावा.

गुरुप्रार्थना

स्वामिन् ब्रूहि कृपां कृत्वा श्रावकाचारविस्तरम् ॥
तच्छ्रुत्वा श्रीगुरुश्चापि ब्रूयाद्धर्मं तु तम्प्रति ॥ ६ ॥

अर्थ—मग " भगवन् आह्मावर कृपा करून आह्माला श्रावकाचार विस्तारानें सांगा " अशी शिष्यानें गुरुला प्रार्थना करावी. ती प्रार्थना ऐकून त्यानेंही त्या शिष्याला धर्म सांगावा.

धर्मकथन

मिथ्यात्वत्यजनं पूर्वं सम्यक्त्वग्रहणं तथा ॥
द्वादशभेदभिन्नानां व्रतानां परिपालनम् ॥ ७ ॥

अर्थ—तो असा-प्रथम मिथ्यात्वाचा त्याग करून सम्यक्त्व ग्रहण करावें. आणि बारा प्रकारांच्या व्रतांचें रक्षण करावें. ह्मणजे श्रावकाची बारा व्रतें पाळावीत.

मिथ्यात्वत्यागाची आवश्यकता.

उक्तं च—मिच्छत्तं वेदंतो जीवो विवरीयदंसणो होदि ॥
ण य धम्मं रोचिदिह्नो मुहुरं पि जहा जुरिदो ॥ ८ ॥

अर्थ—प्रथम मिथ्यात्वाचा त्याग करण्याचें कारण असें सांगितलें आहे कीं, मिथ्यात्वी जीवाला विपरीत

दर्शन होतें. ज्याप्रमाणें ज्वरिताला मधुर पदार्थही गोड लागत नाहीं, त्याप्रमाणें त्याला सद्धर्म गोड लागत नाहीं. ह्मणजे त्याची सद्धर्मावर प्रीति असत नाहीं. ह्मणून प्रथम मिथ्यात्वाचा त्याग अवश्य करावा.

नरत्वेऽपि पशूयन्ते मिथ्यात्वग्रस्तचेतसः ॥
पशुत्वेऽपि नरायन्ते सम्यक्त्वव्यक्तचेतनाः ॥ ९ ॥

अर्थ— ज्यांचें अंतःकरण मिथ्यात्वानें ग्रासलें आहे ते जीव मनुष्य असूनही पशूप्रमाणें होतात; आणि ज्यांचें मन सम्यक्त्वानें युक्त आहे ते पशूदेखील मनुष्याप्रमाणें होतात.

केपाञ्चिदन्धतमसायते गृहीतं ग्रहायतेऽन्येपाम् ॥
मिथ्यात्वमिह गृहीतं शल्यति सांशयिकं परेषाम् ॥ १० ॥

अर्थ— कित्येकांनी स्वीकारलेलें मिथ्यात्व त्यांना अंधाराप्रमाणें कांहींच दिसूं देत नाहीं. कित्येकांचें मिथ्यात्व एखाद्या पिशाचाप्रमाणें त्यांना सोडीत नाहीं. कित्येकांचें मिथ्यात्व त्यांचें त्यांनाच बाणाप्रमाणें टोचूं लागतें; आणि कित्येकांचें मिथ्यात्व संशय उत्पन्न करतें.

कुधर्मस्थोऽपि सद्धर्मं लघुकर्मतया द्विपन् ॥
भद्रः स देश्यो द्रव्यत्वाभाभद्रस्तद्विपर्ययात् ॥ ११ ॥

अर्थ— जन्मांतरीच्या आपल्या दुष्कर्मामुळें सद्धर्माचा द्वेष करणारा जीव कुधर्मी असून जर भव्य

अर्थ—क्षुधा, तृषा, रोग, भय, विषयप्रीति, रोष, मरण, स्वेद ( घाम ), खेद, अराति ( असंतोष ) चिंता, जन्म, वृद्धपणा, आश्चर्य, मद, निद्रा, विषाद ( दुःख ) आणि मोह हे अठरा दोष ज्याच्यामध्यें नाहींत असा परमकारुणिक असलेला श्रीजिनेंद्र सर्व लोकांचें पातकापासून रक्षण करो. कारण, हाच सर्वजीवाचें मुख्य दैवत ( मुख्य देव ) आहे.

अध्ययन करण्यास योग्य असें शास्त्र

पूर्वापराविरुद्धं यदाप्तोद्दिष्टं सुबुद्धिमत् ॥
यथार्थवाचकं शास्त्रं तदध्येयं शिवाप्तये ॥ १७ ॥

अर्थ—ज्यांत मागें सांगितलेल्यांत आणि पुढें सांगितलेल्यात विरोध नाहीं, जें युक्तीनें भरलेलें आहे, जें आप्तानें ( खरें बोलणाऱ्यानें ) सांगितलें असल्यानें सत्यवस्तूचें प्रतिपादन करतें आहे असें शास्त्र कल्याणाची प्राप्ति होण्याकरितां अवश्य शिकावें.

तपस्व्याचें लक्षण.

विषयाशावशातीतो निरारम्भोऽपरिग्रहः ॥
ज्ञानध्यानतपोरक्तस्तपस्वी स प्रशस्यते ॥ १८ ॥

अर्थः— जो विषयेच्छेच्या ताब्यांत सांपडला नाहीं, जो कांहीं करीत नाहीं, ज्यानें परिग्रह टाळग-

मिथ्याज्ञानाविषयीं अश्रद्धान.

मतेषु विपरीतेषु यदुक्तं दुष्टबुद्धिभिः ॥
अश्रद्धेयं न कदा तत्त्वं हिंसापातकदोषदम् ॥ १४ ॥

अर्थ— विपरीत मतात दुष्ट बुद्धीच्या लोकांनी जें सांगितलें आहे, त्या तत्त्वावर केव्हांही विश्वास ठेवूं नये. कारण, त्यामुळें हिंसादिपातकांचा दोष उत्पन्न होतो.

देव कोणता?

सर्वदर्शी च सर्वज्ञः सिद्ध आप्तो निरञ्जनः ॥
अष्टादशमहादोषै रहितो देव उच्यते ॥ १५ ॥

अर्थ— सर्व पहाणारा, सर्व जाणणारा, सिद्ध, आप्त, अज्ञानरहित आणि अठराप्रकारचे महादोष ज्यांच्यामध्यें नाहींत त्यालाच देव म्हणतात.

क्षुत्तृड्रुग्भयरागरोषमरणस्वेदाश्च खेदारति- ।
चिन्ताजन्मजराश्च विस्मयमदौ निद्रा विषादस्तथा ॥
मोहोऽष्टादशदोषदुष्टरहितः श्रीवीतरागो जिनः ।
पायात्सर्वजनान् दयालुरघतो जन्तो परं दैवतम् ॥ १६ ॥

अर्थ—क्षुधा, तृषा, रोग, भय, विषयप्रीति, रोष, मरण, स्वेद ( घाम ), खेद, अराति ( असंतोष ) चिंता, जन्म, वृद्धपणा, आश्चर्य, मद, निद्रा, विषाद ( दुःख ) आणि मोह हे अठरा दोष ज्याच्यामध्यें नाहींत असा परमकारुणिक असलेला श्रीजिनेंद्र सर्व लोकांचें पातकापासून रक्षण करो. कारण, हाच सर्वजीवांचें मुख्य दैवत ( मुख्य देव ) आहे.

अध्ययन करण्यास योग्य असें शास्त्र.

पूर्वापराविरुद्धं यदाप्तोद्दिष्टं सुबुद्धिमत् ॥
यथार्थवाचकं शास्त्रं तदध्येयं शिवाप्तये ॥ १७ ॥

अर्थ—ज्यांत मागें सांगितलेल्यांत आणि पुढें सांगितलेल्यात विरोध नाहीं, जें युक्तीनें भरलेलें आहे, जें आप्तानें ( खरें बोलणाऱ्यानें ) सांगितलें असल्याने सत्यवस्तूचें प्रतिपादन करतें आहे असें शास्त्र कल्याणाची प्राप्ति होण्याकरितां अवश्य शिकावें.

तपस्व्याचे लक्षण

विषयाशावशातीतो निरारम्भोऽपरिग्रहः ॥
ज्ञानध्यानतपोरक्तस्तपस्वी स प्रशस्यते ॥ १८ ॥

अर्थः— जो विषयेच्छेच्या ताब्यात सापडला नाहीं, जो कांहीं करीत नाहीं, ज्यानें परिग्रह वाळग-

लेला नाहीं आणि जो ज्ञान, ध्यान आणि तपश्चर्या यांत नेहमीं गढून राहिला आहे तोच स्तुत्य तपस्वी होय.

सम्यग्दृष्टीचें लक्षण

एतेषां निश्चयो यस्य निःशङ्कत्वेन वर्तते ॥
सम्यग्दृष्टिः स विज्ञेयः शङ्काद्यष्टकवर्जितः ॥ १९ ॥

अर्थः— देव, शास्त्र आणि तपस्वी ह्यांच्याविषयीं ज्याचा निःशंक असा निश्चय झाला आहे आणि ज्याला शंका वगैरे आठ दोष नाहींत तो सम्यग्दृष्टि समजावा. आतां सम्यक्त्वाचीं अंगें सांगतात.

निःशंकितांग

देवे मन्त्रे गुरौ शास्त्रे क्वचिदनिश्चयो न चेत् ॥
फल्गुदोषान्न कर्तव्यः संशयः शुद्धदृष्टिभिः ॥ २० ॥

अर्थः— आपला देव, आगमांत सांगितलेले मंत्र, आपला गुरु आणि आपलें शास्त्र ह्यांच्याविषयीं तुच्छ दोष मनांत आणून सम्यग्दृष्टीनें संशय घेऊं नये. कारण, परमतांत सांगितलेले देव, मंत्र, गुरु आणि शास्त्र यांत तरी दृष्टिगोचर होण्यासारखें अधिक माहात्म्य आहे कोठें? मुळींच नाहीं.

निष्कांक्षितांग

कर्मपरवशे सान्ते दुःखैरन्तरितोदये ॥
पापबीजे सुखेऽनास्था श्रद्धाऽनाकाङ्क्षणा स्मृता ॥ २१ ॥

अर्थः— पूर्वकर्माच्या आधीन असलेलें, नाश पावणारें, ज्याच्या प्राप्तीकरितां अनेक दुःखें भोगावीं लागतात असें आणि पातकाची उत्पत्ति करणारें असें जें विषयसुख त्याविषयीं इच्छा न करणें ह्याला ‘निष्कांक्षा’ ह्मणतात. हें सम्यक्त्वाचें दुसरें अंग आहे.

निर्विचिकित्साग

स्वभावतोऽशुचौ काये रत्नत्रयपवित्रिते ॥
निर्जुगुप्सा गुणप्रीतिर्मता निर्विचिकित्सता ॥ २२ ॥

अर्थ— स्वभावतः अशुद्ध असून सम्यग्दर्शनज्ञानचारित्र ह्या रत्नत्रयामुळें शुद्ध झालेल्या शरीराची न करतां त्याच्या गुणावर प्रेम करणें ह्यास निर्विचिकित्सांग ह्मणतात.

अमूढदृष्टित्व

कापथे पथि दुःखानां कापथस्थेऽप्यसम्मतिः ॥
असम्पृक्तिरनुत्कीर्तिरमूढा दृष्टिरुच्यते ॥ २३ ॥

अर्थ— दुःखप्रद अशा मिथ्यामार्गाविषयीं आणि त्या दुर्मार्गानें वागणाऱ्या मनुष्याविषयीं आपली

असंमति दाखविणें, त्याची स्तुति न करणें ह्याला अमूढदृष्टि नांवाचें सम्यक्त्वांग ह्मणतात.

उपगूहन.

स्वयंशुद्धस्य मार्गस्य बालाशक्तजनाश्रयाम् ॥
वाच्यतां यत्प्रमार्जन्ति तद्वदन्त्युपगूहनम् ॥ २४ ॥

अर्थ— स्वभावतः शुद्ध असलेल्या अशा धर्ममार्गाची (जैनधर्माची) लहान मुलें किंवा मूर्खलोक व अशक्त लोक ह्यांच्या वर्तनामुळे जी निंदा होते, ती घालविणें ह्याला उपगूहन नांवाचें अंग ह्मणतात.

स्थितीकरण

दर्शनाच्चरणाद्वाऽपि चलतां धर्मवत्सलैः ॥
प्रत्युपस्थापनं प्राज्ञैः स्थितीकरणमुच्यते ॥ २५ ॥

अर्थ— सम्यग्दर्शन आणि सम्यक्चारित्र ह्यापासून भ्रष्ट होत असलेल्या लोकांना धर्माविषयी प्रेम करणाऱ्या शहाण्या लोकांनी ताळ्यावर आणणे ह्याला उपगूहन नांवाचें अंग ह्मणतात.

वात्सल्य

जैनधर्मयुतान् भव्यान् रोगचिन्तादिपीडितान् ॥
वैयावृत्त्यं सदा कुर्यात्तद्वात्सल्यं निगद्यते ॥ २६ ॥

अर्थ— जैनधर्मातील भव्यजीव जर रोग किंवा चिंता ह्यांनी पीडित झाले असतील तर त्यांची सेवा करणें त्यांना मदत करणें ह्याला वात्सल्य नांवाचें सम्यक्त्वाचें अंग ह्मणतात.

प्रभावना

अज्ञानतिमिरव्याप्तिमपाकृत्य यथायथम् ॥
जिनशासनमाहात्म्यप्रकाशः स्यात्प्रभावना ॥ २७ ॥

अर्थ— जीवांचा अज्ञानरूपी अंधकार ( गैरसमजूत ) होईल तितकी घालवून जिनांनी सांगितलेल्या शास्त्राचें महत्व प्रकट करणें ह्याला प्रभावना नांवाचें सम्यक्त्वांग ह्मणतात.

ह्या सम्यक्त्वांगाची आवश्यकता

अष्टाङ्गैः पालितं शुद्धं सम्यक्त्वं शिवदायकम् ॥
न हि मन्त्रोऽक्षरन्यूनो निहन्ति विषवेदनाम् ॥ २८ ॥

अर्थ— वर जीं हीं सम्यक्त्वाचीं आठ अंगें सांगितलीं त्या आठही अंगांनीं युक्त असें सम्यक्त्व पाळिलें असतां तें मोक्षप्रद होतें. त्यांतील एखादें अंग नसणें बरें नाहीं. कारण, सर्पाचें विष दूर करणाऱ्या मंत्रांतील जर एखादें अक्षर कमी असलें तर त्या तसल्या मंत्रानें विषापासून होत असलेली पीडा कमी होत नाहीं.

सम्यक्त्वाचे पचवीस दोष

मूढत्रयं मदाश्चाष्टौ तथाऽनायतनानि षट् ॥
अष्टौ शंकादयो दोषाः सम्यक्त्वे पञ्चविंशतिः ॥ २९ ॥

अर्थ— तीन मूढ, आठ प्रकारचे मद, सहा अनायतने आणि शंका वगैरे आठ दोष हे सम्यक्त्वाचे पंचवीस दोष आहेत. ह्या दोषांचे विवेचन पुढें क्रमाने करतात.

लोकमूढता

गोयोनिं गोमयं मूत्रं चन्द्रसूर्यादिपूजनम् ॥
अग्नौ गिरेः प्रपातश्च विज्ञेया लोकमूढता ॥ ३० ॥

अर्थ— गायीचें जननेंद्रिय, गायीचें शेण, गायीचें मूत्र ह्यांना पवित्र मानणें, चंद्रसूर्य वगैरेचें पूजन करणें, अग्नीत देहत्याग करणें, डोंगराच्या कड्यावरून उडी मारणें ह्याला लोकमूढ नांवाचा दोष ह्मणतात.

देवतामूढ

वरोपलिप्सयाऽऽशावान् रागद्वेषमलीमसाः ॥
देवता यदुपासीत देवतामूढमुच्यते ॥ ३१ ॥

अर्थ— रागद्वेषांनीं ज्याचें अंतःकरण वाईट झालें आहे अशांची ( अशा देवांची ), आपल्याला वराची प्राप्ती होईल अशा इच्छेनें आशाबद्ध झालेला मनुष्य देवाप्रमाणें जें पूजन करतो त्याला देवतामूढ ह्मणतात.

पाखंडमूढता

**सग्रन्थारम्भहिंसानां संसारावर्तवर्तिनाम् ॥**
**पाखण्डिनां पुरस्कारो ज्ञेया पाखण्डमूढता ॥ ३२ ॥**

अर्थ— पुष्कळ परिग्रह बाळगणारे, अनेक दुरुद्योग करणारे आणि हिंसा करणारे असे असल्यामुळें संसाराच्या भोंवऱ्यांत फिरत असलेले जे पाखंडी लोक त्यांना पुढाकार देणें (त्यांचें अनुसरण करणें) ह्याला पाखंडमूढता ह्मणतात.

आठ मद

**ज्ञानं पूजां कुलं जातिं बलमृद्धिं तपो वपुः ॥**
**अष्टावाश्रित्य मानित्वं श्रीयते तन्मदाष्टकम् ॥ ३३ ॥**

अर्थ— ज्ञान, गौरव, कुल, जाति, बल, संपत्ति, तप आणि शरीर ह्या वस्तूंबद्दल जें अभिमान बाळगणें त्याला अष्टमद ह्मणतात.

सहा अनायतनें

**कुदेवस्तस्य भक्तश्च कुशास्त्रं तस्य पाठकः ॥**
**कुगुरुस्तस्य शिष्यश्च षण्णां सङ्गं परित्यजेत् ॥ ३४ ॥**

अर्थ— कुदेव आणि त्याचे भक्त, कुशास्त्र आणि त्याचें अध्ययन करणारे, कुगुरु आणि त्याचे शिष्य ह्या सहांची संगती सोडून द्यावी.

शंकादि आठ दोष

शङ्काऽऽकांक्षा जुगुप्सा च मौढ्यमनुपगूहनम् ॥
अस्थितीकरणं चाप्यवात्सल्यं चाप्रभावना ॥ ३५ ॥
एतेऽष्टौ मिलिता दोषास्त्याज्याः सम्यक्त्वधारिभिः ॥
सदैव गुरुशास्त्राणां भक्तिः कार्या निरन्तरम् ॥ ३६ ॥

अर्थ— शंका (जिनशास्त्राविषयी संशय), आकांक्षा (विषयसुखाची इच्छा) जुगुप्सा (शरीराची निंदा), मौढ्य (तीन प्रकारची मूढता), अनुपगूहन (स्वजातीयाचे दोष उघड करणें), अवात्सल्य (जिनमताने वागणाऱ्याबद्दल कळकळ न वाळगणें) आणि अप्रभावना (जैनशास्त्राची प्रतिष्ठा न करणें) हे आठ दोष सम्यक्त्वी मनुष्याने टाकून द्यावेत. आणि गुरु व शास्त्र ह्यांचे ठिकाणी सर्वदा भक्ति ठेवावी.

तीन प्रकारचे सम्यक्त्व

सम्यक्त्वं त्रिविधं ज्ञेयं क्षायिकं चौपशामिकम् ॥
क्षायोपशामिकं चेति उत्तमाधममध्यमम् ॥ ३७ ॥

अर्थ— क्षायिकसम्यक्त्व (सम्यक्त्वाला प्रतिबंध करणाऱ्या कर्मांचा नाश झाल्यामुळें उत्पन्न होणारें सम्यक्त्व) औपशमिकसम्यक्त्व [प्रतिबंधक कर्मांच्या उपशमामुळें झालेलें सम्यक्त्व] आणि क्षायोपशमिक-सम्यक्त्व [सम्यक्त्वप्रतिबंधककर्मांचा यत्किंचित् अनुदय आणि यत्किंचित् उदय ह्यांपासून उत्पन्न होणारें सम्यक्त्व] असें सम्यक्त्व तीन प्रकारचें आहे. त्यांत पहिलें उत्तम, दुसरें मध्यम आणि तिसरें कनिष्ठ समजावें.

तीन प्रकारचें सम्यक्त्व

मिथ्यासमयमिथ्यात्वसम्यक्प्रकृतयस्त्रयः ॥
आद्यं कषायतुर्यं च चतुःप्रकृतयः पुनः ॥ ३८ ॥
क्षायिकं च क्षयात्तासां शमनाचौपशमिकम् ॥
मिश्रात्तान्मिश्रसम्यक्त्वमिति मोक्षप्रदायकम् ॥ ३९ ॥

अर्थः— मिथ्यात्व, समयमिथ्यात्व, सम्यक्प्रकृति आणि अनंतानुबंधी असे क्रोध, मान, माया, लोभ ह्या सात प्रकृति आहेत. ह्याच्या क्षयापासून क्षायिकसम्यक्त्व उत्पन्न होतें उपशमापासून औप-शमिक सम्यक्त्व उत्पन्न होतें. आणि क्षय व उपशम ह्या दोहोंपासून क्षायोपशमिक किंवा मिश्र सम्यक्त्व होतें. असें हें सम्यक्त्व मुक्तीला कारण आहे.

सम्यक्त्याचे आठ गुण

उक्तं च- संवेउ णिव्वेउ णिंदा गरिहा च उवसमो भत्ती ॥
वच्छल्लं अणुकंपा अट्ठगुणा हुंति सम्मत्ते ॥ ४० ॥

अर्थः— संवेग ( धर्म व धर्मफल ह्याविषयीं प्रीति ), निर्वेग ( वैराग्य ), आपली निंदा आपण करणें, गर्हा ( स्वतःस तुच्छ मानणे ) उपशम ( रागद्वेपरहित होणें ), पंच गुरूंविषयीं भक्ति, वात्सल्य आणि दया हे आठ गुण सम्यक्त्वाच्या ठिकाणीं असतात.

चत्तारि वि खेत्ताइं आउगबंधे ण होइ सम्मत्तं ॥
अणुव्वयमहव्वयाइं ण हवइ देवाउगं मोत्तुं ॥ ४१ ॥
छसु हिट्ठमासु पुढवीसु जोइसवणभवणसव्वइत्थीसु ॥
वारसमिच्छोवाये सम्माइट्ठे ण होदि उववादो ॥ ४२ ॥
पंचसु थावरवियळे असण्णिणिगोयम्मि छकुभोगेसु ॥
सम्मादिट्ठी जीवो उववज्जदि ण णियमेण ॥ ४३ ॥

अर्थ— चारही गतीपैकीं कोणत्याही गतीच्या आयुष्याचा बंध झाल्यानंतरही जीवाला सम्यक्त्व होऊं शकतें. देवगतीच्या आयुष्याचा बंध झाल्यानंतरही अणुव्रतें आणि महाव्रतें होऊं शकतात. बाकीच्या तीन गतींचा बंध झाल्यानंतर अणुव्रतें व महाव्रतें होऊं शकत नाहीत. ४१. प्रथम नरक सोडून बाकीच्या सहा

नरकभूमींत ज्योतिष्क, व्यंतर, भवनवासी आणि तीन प्रकाच्या स्त्रिया; अर्थात् देवांगना, मानुषी आणि तिर्यंची इतक्या ठिकाणीं सम्यग्दृष्टी जीवाची उत्पत्ति होत नाहीं. ४२. पांच स्थावर, विकलत्रय, असंज्ञिपंचेंद्रिय आणि सहा कुभोगभूमी इतक्या ठिकाणीं सम्यग्दृष्टिजीव निश्चयानें उत्पन्न होत नाहीं.

दंसणमोहोदयदो उप्पज्जइ जं पयत्थसद्दहणं ॥
चलमलिणमगाढं तं वेदगसम्मत्तमिदि जाणे ॥ ४४ ॥

अर्थ- दर्शनमोहनीयकर्माच्या उदयानें [सम्यक्त्वाचा एकदेश घात करणाऱ्या कर्माच्या उदयानें] जें पदार्थश्रद्धान उत्पन्न होतें तें वेदकसम्यक्त्व असें समजावें. तें चल, मलिन आणि अगाढ असें तीन प्रकारचें आहे.

दंसणमोहुवसमदो उप्पज्जइ जं पयत्थसद्दहणं ॥
उवसमसम्मत्तमिद पसण्णमळपंकजोपसमं ॥ ४५ ॥

अर्थ—दर्शनमोहनीयकर्माचा उपशम झाला असतांना जें पदार्थश्रद्धान होतें, तें उपशमसम्यक्त्व होय. हें सम्यक्त्व ज्यांतील गाळ तळाला बसला आहे अशा पाण्याप्रमाणें असतें.

खीणे दंसणमोहे जं सद्दहणं सुणिम्मळं होइ ॥
तं खाइयसम्मत्तं णिच्चं कम्मक्खवणहेदुं ॥ ४६ ॥

अर्थ—दर्शनमोहनीयकर्माचा पूर्ण नाश झाला असतांना जें निर्मळ असें पदार्थश्रद्धान होतें, तें क्षायिक-

सम्यक्त्व समजावें. हें क्षायिकसम्यक्त्व नित्य ह्मणजे नाश न पावणारें व कर्मक्षयाला कारण असें असतें.

वयणेहि वि हेदूहिं वि इंदियभयआणयेहि रूवेहिं ॥
वीभच्छजुगुंच्छाहि वि तेलोयेण वि ण चालेज्ज ॥ ४७ ॥

अर्थ— दुर्भाषणानें, भलतींच कारणें दाखविल्यानें, नेत्रादि इंद्रियांना भय वाटेल अशा प्रकारचीं रूपें ( भयंकर रूपें ) दाखविल्यानें, पहाण्यावरोबर चिळस येईल अशा वस्तु दाखविल्यानें, निंदा केल्यानेंही आणि त्रैलोक्य जरी उलटून पडलें तरीही क्षायिकसम्यक्त्व मुळींच चळत नाहीं.

दंसणमोहक्खवणा पट्ठवगो कम्मभूमिजादो जो ॥
मणुजो केवलिमूळे णिट्ठवगो होइ सव्वत्थ ॥ ४८ ॥

अर्थ— कर्मभूमीत जन्मलेला मनुष्य, केवलीच्या पायांजवळ जाऊन दर्शनमोहनीयकर्माचा नाश करण्यास आरंभ करितो; आणि त्याची समाप्ति चार गतीपैकीं कोणत्याही गतीत असतांना त्यास करतां येते.

दंसणमोहक्खविदे सिज्झदि एक्केव विदियतिदियभवे ॥
णो विच्छदि तुरियभवं ण विणस्सादि सेससम्मं व ॥ ४९ ॥

अर्थ— दर्शनमोहाचा पूर्णनाश झाला ह्मणजे जीव एकाच भवांत मुक्त होतो. फारतर दुसऱ्या किंवा तिसऱ्या भवांत सिद्धीस पोंचतो. चवथ्या भवाची अपेक्षा त्यास रहात नाहीं. कारण, क्षायिकसम्यक्त्व

हे औपशमिक आणि मिश्र सम्यक्त्वाप्रमाणें नाश पावणारें नाहीं.

सम्यक्त्वाची योग्यता

व्रताद्भ्रष्टस्य सम्यक्त्व वर्तते यदि चेतसि ॥
आर्द्रः सिध्यति भव्यः स चारित्रधरणक्षणे ॥ ५० ॥

अर्थ— व्रतापासून भ्रष्ट झालेल्या मनुष्याच्या मनांत जर सम्यक्त्व असेल तर कांही आर्द्रता ( ओलावा ) असल्यानें त्यानें चारित्र धारण केल्याबरोबर तो भव्य मोक्षयोग्य होतो.

सम्यक्त्वाची प्रशंसा

विद्यावृत्तस्य सम्भूतिस्थितिवृद्धिफलोदयाः ॥
न सन्त्यसति सम्यक्त्वे बीजाभावे तरोरिव ॥ ५१ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें बीज नसल्यास वृक्षाची उत्पत्ति, स्थिति, वृद्धि आणि फलोद्गम ह्या गोष्टी होत नाहीत, त्याप्रमाणें, सम्यक्त्व जर नसेल तर ज्ञान आणि चारित्र ह्यांची उत्पत्ति, त्यांची स्थिति, त्यांची वृद्धि आणि त्यांच्यापासून फलाची ( मोक्षाची ) उत्पत्ति ह्या गोष्टीही होत नाहीं.

न सम्यक्त्वसमं किञ्चित्त्रैकाल्ये त्रिजगत्यपि ॥
श्रेयोऽश्रेयश्च मिथ्यात्वसमं नान्यत्तनूभृताम् ॥ ५२ ॥

अर्थ— तीन्ही कालांत आणि या त्रिभुवनात सम्यक्त्वासारखें जीवांचें कल्याण करणारें दुसरें कांहीं नाहीं, आणि अकल्याण करणारें मिथ्यात्वासारखें दुसरें नाहीं.

दुर्गतावायुषो बन्धात्सम्यक्त्वं यस्य जायते ॥
गतिच्छेदो न तस्यास्ति तथाऽप्यल्पतरा स्थितिः ॥ ५३ ॥

अर्थ— आयुष्याचा बंध झाल्यामुळें जीवाला दुर्गति प्राप्त झाली असतां ज्याला सम्यक्त्व उत्पन्न झालें आहे, त्याच्या त्या दुर्गतीचा जरी नाश होत नाहीं, तथापि त्या दुर्गतीत त्याची फारच थोडी स्थिति होते.

सम्यग्दर्शनाचा महिमा

सम्यग्दर्शनशुद्धा नारकतिर्यङ्नपुंसकस्त्रीत्वानि ॥
दुष्कुलविकृताल्पायुर्दरिद्रतां च व्रजन्ति नाप्यव्रतिकाः ॥ ५४ ॥

अर्थ— सम्यग्दर्शनानें शुद्ध झालेले जीव जरी अव्रतिक असले, तथापि ते नरकगतींत आणि तिर्यग्गतींत जन्म पावत नाहींत. ते नपुंसक किंवा स्त्री होत नाहींत. ते दुष्कुलांत जन्म पावत नाहींत. ते अंगविकल होऊन जन्माला येत नाहींत, आणि ते अल्पायु किंवा दरिद्री होत नाहींत.

ओजस्तेजोविद्यावीर्ययशोवृद्धिविजयविभवसनाथाः ॥
उत्तमकुला महार्था मानवतिलका भवन्ति दर्शनपूताः ॥ ५५ ॥

अर्थ— सम्यग्दर्शनानें पवित्र झालेले जीव बल, कांति, विद्या, आतिशय उत्साह, कीर्ति, वृद्धि (शरीराची वाढ), विजय आणि ऐश्वर्य ह्यांनी युक्त होतात. ते उत्तम कुलांत जन्म पावतात. त्यांची संपत्ति मोठी असते, आणि ते सर्वांत श्रेष्ठ होतात.

अष्टगुणपुष्टितुष्टा दृष्टिविशिष्टाः प्रकृष्टसन्तुष्टाः ॥
अप्सरसां परिषदि चिरं रमन्ते जिनेन्द्रभक्ताः स्वर्गे ॥ ५६ ॥
अणिमा महिमा लघिमा गरिमाऽन्तर्धानकामरूपित्वम् ॥
प्राप्तिः प्राकाम्यवशित्वेशित्वाप्रतिहतत्वमिति वैक्रियकाः ॥ ५७ ॥

अर्थ— आठ गुणांच्या वृद्धीमुळें संतुष्ट झालेले सम्यग्दर्शनयुक्त जीव अत्यंत संतुष्ट होऊन जिनेंद्राची भक्ती करणारे असे होत्साते स्वर्गात अप्सराच्या सभेंत चिरकाल रममाण होतात. अणिमा (लहान होणें) महिमा (मोठें होणें) लघिमा (हलकें होणें) गरिमा (जड होणें) अंतर्धान (गुप्त होणें) कामरूपित्व (पाहिजे तसलें स्वरूप घेणें) प्राप्ति (पाहिजे ती वस्तु मिळविणें) प्राकाम्य (इच्छेचा भंग न होणें) वशित्व (स्वतंत्रपणा असणें) ईशित्व (सर्व स्थावरजंगमावर हुकूम चालणें) अप्रतिहतत्व (कोठेंही प्रतिबंध न होणें) ह्या अकरा वैक्रियकसिद्धि आहेत.

नवनिधिसप्तद्वयरत्नाधीशाः सर्वभूमिपतयश्चक्रम् ॥

वर्तयितुं प्रभवन्ति स्पष्टदृशः क्षत्रमौलिशेखरचरणाः ॥ ५८ ॥

अर्थ— जे सम्यग्दृष्टि असतात ते जीव, नऊ निधि आणि चतुर्दश रत्नें ह्यांचे स्वामी होऊन संपूर्ण क्षत्रिय ज्यांच्या चरणावर आपली मस्तकें नम्र करीत आहेत असे होत्साते संपूर्ण पृथ्वीचे पति ( सार्वभौम राजे ) होऊन चक्ररत्नाची प्रवृत्ति करण्यास समर्थ होतात. हे सम्यग्दर्शनाचें वर्णन केलें. आतां सम्यग्ज्ञानाचें स्वरूप सागतात.

सम्यग्ज्ञानाचे लक्षण

अन्यूनमनतिरिक्तं याथातथ्यं विना च विपरीतात् ॥
निःसन्देहं वेत्ति यदाहुस्तज्ज्ञानमागमिनः ॥ ५९ ॥

अर्थ— कोणत्याही वस्तूच्या स्वरूपांत कमीजास्ती न होतां व भलतेंच न भासतां वस्तूचें स्वरूप जसें असेल तसेच जे निःसंशय जाणणे त्याला आगमज्ञ मुनि सम्यग्ज्ञान असे ह्मणतात.

सम्यग्ज्ञानाचे कार्य

प्रथमानुयोगमर्थाख्यानं चरितं पुराणमपि पुण्यम् ॥
बोधिसमाधिनिधानं बोधति बोधः समीचीनः ॥ ६०

अर्थ— तें सम्यग्ज्ञान— चतुर्विध पुरुपार्थाचे व्याख्यान, महापुरुपांची चरित्रें, पुण्यकारक पुराणे

ह्या रूपाचा, आणि ज्ञान व समाधि ह्यांचें भांडारच की काय! असा जो प्रथमानुयोग [ त्या नावाचे शास्त्र ] त्याला जाणतें.

लोकालोकविभक्तेर्युगपरिवृत्तेश्चतुर्गतीनां च ॥
आदर्शमिव तथा मतिरवैति करणानुयोगं च ॥ ६१ ॥

अर्थ— तें सम्यग्ज्ञान—लोकाकाश आणि अलोकाकाश ह्यांचा विभाग, युगांचे फेरे, आणि जीवाच्या चार गति ह्यांचा आरसाच कीं काय असें जें करणानुयोग नावाचें शास्त्र त्याला जाणतें.

गृहमेध्यनगाराणां चारित्रोत्पत्तिवृद्धिरक्षाङ्गम् ॥
चरणानुयोगसमयं सम्यग्ज्ञानं विजानाति ॥ ६२ ॥

अर्थ— गृहस्थ आणि यति ह्यांच्या चारित्राची उत्पत्ति, वृद्धि आणि रक्षण ह्यांचें साधनीभूत असलेलें जें चरणानुयोग नांवाचें शास्त्र, त्यालाही सम्यग्ज्ञान जाणतें.

द्रव्यानुयोगातील विषय

जीवाजीवसुतत्त्वे पुण्यापुण्ये च बन्धमोक्षौ च ॥
द्रव्यानुयोगदीपः श्रुतविद्यालोकमातनुते ॥ ६३ ॥

अर्थ— जीव, अजीव, पुण्य, पाप, बंध मोक्ष इत्यादि वस्तूवर द्रव्यानुयोगरूपी दीप ( द्रव्यानुयोग

नांवाचे जे शास्त्र तोच कोणीएक दीप) श्रुतज्ञानरूप प्रकाश पसरतो. (सम्यग्ज्ञान असलें ह्मणजे, द्रव्यानुयोगशास्त्रांत प्रतिपादन केलेली जीवादितत्वें समजतात). तात्पर्य, सम्यग्ज्ञानाने प्रथमानुयोग, करणानुयोग, चरणानुयोग णाणि द्रव्यानुयोग ह्या चारही प्रकारच्या शास्त्रांचें ज्ञान होतें. आणि जर सम्यग्ज्ञान नसेल तर तें शास्त्रज्ञान होत नाही. हे सम्यग्ज्ञानाचें वर्णन झालें. आतां सम्यक्चारित्राचें वर्णन करितात—

सम्यक्चारित्र.

अथ चारित्रम्- हिंसानृतचौर्येभ्यो मैथुनसेवापरिग्रहाभ्यां च ॥
पापप्रणालिकाभ्यो विरतिः सञ्ज्ञस्य चारित्रम् ॥ ६४ ॥

अर्थ-- हिंसा, खोटे भाषण, चोरी, स्त्रीसेवन आणि परिग्रह हीं जीं पातकाला जीवप्रदेशांत सहज प्रवेश करतां येण्याची साधनें त्यांपासून निवृत्त होणें हें सम्यग्ज्ञानी मनुष्याचें चारित्र होत.

चारित्राचे दोन विभाग.

सकलं विकलं चरणं तत्सकलं सर्वसङ्गविरतानाम् ॥
अनगाराणां विकलं सागाराणां ससङ्गानाम् ॥ ६५ ॥

अर्थ— ते चारित्र सकल [संपूर्ण] आणि विकल [असंपूर्ण) असें दोन प्रकारचें आहे. त्यांत

सर्वसंग परित्याग करून जे मुनि झाले त्यांचें चारित्र सकल होय, आणि जे गृहस्थ असतात त्यांचें जें चारित्र तें विकल होय.

(१२) सागाराचे लक्षण

**अनाद्यविद्यादोषोत्थचतुःसञ्ज्ञाज्वरातुराः ॥**
**शश्वत्सज्ज्ञानविमुखाः सागारा विषयोन्मुखाः ॥ ६६ ॥**

अनादिकालापासून प्राप्त झालेल्या अज्ञानापासून उत्पन्न झालेला जो
अर्थ— सागार [ गृहस्थ ] हे चतु:संज्ञारूपी ज्वर [ आहार, भय, मैथुन आणि परिग्रह या चार संज्ञा होत ] त्यानें पीडित झालेले असतात.
सम्यग्ज्ञान प्राप्त करून घेण्याविषयीं नेहमीं विमुख असतात, आणि विषयसेवनाविषयीं अत्यंत उत्सुक असतात, ह्मणून असे जे असतात त्यानाच सागार ह्मणतात.

**गृहस्थो मोक्षमार्गस्थो निर्मोहो नैव मोहवान् ॥**
**अनगारो गृही श्रेयान् निर्मोहो मोहिनो मुनेः ॥ ६७ ॥**

अर्थ— कोणी गृहस्थ मोक्षमार्गप्रवृत्त असून मोहरहित असा जर असेल तर तो देखील अनगारच होय, आणि ज्यानें घर सोडलें आहे परंतु मोह सुटला नाहीं, तो अनगार नव्हे. ह्मणून मोहयुक्त असलेल्या मुनीपेक्षां मोहरहित असलेला गृहस्थ फार चांगला.

सम्यग्दृष्टिजीवाचें लक्षण.

अष्टमूलगुणाधारो सप्तव्यसनदूरगः ॥
सद्गुरुवचनासक्तः सम्यग्दृष्टिः स उच्यते ॥ ६८ ॥

अर्थ— श्रावकाचे आठ मूलगुण धारण करणारा, सप्तव्यसनांपासून दूर असलेला, आणि गुरूच्या भाषणावर विश्वास ठेवणारा जो श्रावक, त्याला सम्यग्दृष्टि म्हणतात.

गृहस्थाचे मूलगुणाष्टक

मद्यादौ श्रद्धधज्जैनीमाज्ञां हिंसामपासितुम् ॥
मद्यमांसमधून्युज्झेत्पञ्चक्षीरफलानि च ॥ ६९ ॥

अर्थ— श्रावकानें सम्यक्त्वी व्हावयानें असल्यास श्रीजिनेंद्रांनीं सांगितलेल्या शास्त्रावर विश्वास ठेवून हिंसात्याग करण्याकरितां मद्य, मांस, मधु आणि पंचोदुंबर यांचा त्याग अवश्य करावा. हेच श्रावकाचे आठ मूलगुण होत.

दुसरीं मतें

अष्टैतान् गृहिणां मूलगुणान् स्थूलवधादि वा ॥
फलस्थाने स्मरेत् द्यूतं मधुस्थान इहैव च ॥ ७० ॥

अर्थ— किंवा स्थूलहिंसाविरति, स्थूलासत्यविरति, स्थूलचौर्यविरति, स्थूलाब्रह्मचर्यविरति आणि स्थूलपरिग्रहविरति हे पांच; मद्यत्याग, मांसत्याग आणि द्यूतत्याग हे तीन, मिळून आठ होतात. हेही आठ मूलगुण समजावेत.

मद्यपलमधुनिशाशनपञ्चफलीविरतिपञ्चकाप्तनुती ॥
जीवदया जलगालनमिति च क्वचिदष्टमूलगुणाः ॥ ७१ ॥

अर्थ— मद्यत्याग, मधुत्याग, मांसत्याग, रात्रिभोजनत्याग, पंचोदुंबरत्याग, पंचपरमेष्ठिनमस्कार, जीवदया आणि जलगालन हे श्रावकाचे आठ मूल गुण होत; असें कित्येकांचें मत आहे.

गृहस्थाच्या चारित्राचे तीन भेद

गृहिणां त्रेधा तिष्ठत्यणुगुणशिक्षाव्रतात्मकं चरणम् ॥
पञ्चत्रिचतुर्भेदं त्रयं यथासंख्यमाख्यातम् ॥ ७२ ॥

अर्थ— गृहस्थांचें चारित्र अणुव्रत, गुणव्रत आणि शिक्षाव्रत असें तीन प्रकारचें आहे. त्यांत अणुव्रताचे पांच भेद आहेत, गुणव्रताचे तीन आणि शिक्षाव्रताचे चार असे भेद आहेत.

अणुव्रताचें लक्षण

प्राणातिपातवितथव्याहारस्तेयकाममूर्च्छाभ्यः ॥

स्थूलेभ्यः पापेभ्यो व्युपरमणमणुव्रतं भवति ॥ ७३ ॥

अर्थ— स्थूलहिंसा, स्थूलानृत, स्थूलचौर्य, स्थूलाब्रह्मचर्य आणि स्थूलपरिग्रह यांपासून निवृत्त होणें यास अणुव्रत ह्मणतात.

हिंसात्यागाचें प्रयोजन.

स्वयमेवात्मनाऽऽत्मानं हिनस्त्यात्मा कषायवान् ॥
पूर्वं प्राण्यन्तराणां तु पश्चात्स्याद्वा न वा वधः ॥ ७४ ॥

अर्थ— रागद्वेषादि कषायांनीं युक्त झालेला आत्मा हा कषायवान् झाल्यामुळें प्रथम आपण आपल्याला मारतो. मग दुसऱ्या प्राण्याचा वध होवो किंवा न होवो.

स्थूलहिंसात्यागाचें लक्षण.

सङ्कल्पात्कृतकारितमननाद्योगत्रयस्य चरसत्वान् ॥
न हिनस्ति यत्तदाहुः स्थूलवधाद्विरमणं निपुणाः ॥ ७५ ॥

अर्थ— मन, वाणी आणि शरीर या तिहींच्या योगानें त्रसजीवाची हिंसा स्वतः न करणें, दुसऱ्याकडून न करविणें आणि करीत असलेल्या किंवा करणाऱ्या अशा कोणाला आपली संमति न दाखविणें यास 'स्थूलहिंसाविरति किंवा अहिंसाणुव्रत' असें शास्त्रज्ञ ह्मणतात.

अहिंसाणुव्रताचे अतीचार.

छेदनबन्धनपीडनमतिभारारोपणं व्यतीचाराः ॥
आहारवारणाऽपि च स्थूलवधाद्व्युपरतेः पञ्च ॥ ७६ ॥

अर्थ— कोणाला तरी कापणें, बांधून घालणें, पीडा देणें, अतिशय ओझें घालणें आणि आहार न देणें हे अहिंसाणुव्रताचे पांच अतीचार आहेत. ते अहिंसाणुव्रत करणाऱ्यानें करूं नयेत.

सत्याणुव्रताचें स्वरूप.

स्थूलमलीकं न वदति न परान्वादयति सत्यमपि विपदे ॥
यत्तद्वदन्ति सन्तः स्थूलमृषावादवैरमणम् ॥ ७७ ॥

अर्थ— मोठें खोटें न बोलणें ( लोकांस हें बोलणें खोटें असें जें सहज समजण्यासारखें आहे, तसलें आपण आपण स्वतः न बोलणें ) दुसऱ्याकडून न बोलविणें आणि दुसऱ्याला ज्यामुळें त्रास भोगावा लागेल असें खरें आपणही स्वतः न करणें, व दुसऱ्याकडून न करविणें, ह्यास स्थूलासत्यविरति किंवा सत्याणुव्रत असें विद्वान् लोक ह्मणतात.

सत्याणुव्रताचे अतीचार

परिवादरहोभ्याख्यापैशुन्यं कूटलेखकरणं च ॥

न्यासापहारिताऽपि च व्यतिक्रमाः पञ्च सत्यस्य ॥ ७८ ॥

अर्थ— दुसऱ्याची निंदा करणे, गुप्त गोष्ट सांगणे, चहाडी करणे, खोटा लेख लिहिणें आणि दुसऱ्याची ठेव घेणे हे पांच सत्याणुव्रताचे अतीचार आहेत. ते करूं नयेत.

अचौर्याणुव्रताचे स्वरूप

निहितं वा पतितं वा सुविस्मृतं वा परस्वमविसृष्टम् ॥
न हरति यन्न च दत्ते तदकृशचौर्यादुपारमणम् ॥ ७९ ॥

अर्थ— ठेवलेली, पडलेली, किंवा विसरलेली अशी दुसऱ्याची वस्तु त्यानें दिल्यावांचून आपण न घेणे, व दुसऱ्यास न देणें ह्यास स्थूलचौर्यविरति किंवा अचौर्याणुव्रत ह्मणतात.

अचौर्याणुव्रताचे अतीचार

चौरप्रयोगचौरार्थादानविलोपसदृशसम्मिश्राः ॥
हीनाधिकविनिमानं पञ्चास्तेये व्यतीपाताः ॥ ८० ॥

अर्थ— चोरीचा उपाय सांगणें, दुसऱ्यानें चोरलेले पदार्थ घेणे, राजाची आज्ञा मोडणे, अधिक किमतीच्या पदार्थात कमी किमतीचा पदार्थ मिसळणें आणि माप कमीजास्ती करणे हे अचौर्यव्रताचे पांच अतीचार आहेत.

परदारनिवृत्ति अणुव्रताचें स्वरूप.

न च परदारान् गच्छति न परान् गमयति च पापभीतेर्यत् ॥
सा परदारनिवृत्तिः स्वदारसन्तोषनामापि ॥ ८१ ॥

अर्थ— पापाच्या भीतीमुळें परस्त्रीशी आपण समागम न करणें आणि दुसऱ्याकडून न करविणें, आणि स्वस्त्रीविषयीं संतुष्ट असणें, ह्याला परदारविरति नावाचें अणुव्रत ह्मणतात.

परदारनिवृत्त्यणुव्रताचे अतीचार.

अन्यविवाहकरणानङ्गक्रीडाविटत्वविपुलतृषः ॥
इत्वरिकागमनं चास्मरस्य पञ्च व्यतीचाराः ॥ ८२ ॥

अर्थ— दुसऱ्याचें लग्न जुळविणें किंवा करणें, भलत्याच इंद्रियाचे ठिकाणीं कामलीला करणें, कामोत्पादक भाषण बोलणें, स्वस्त्रीविषयीं अत्यंत आसक्ति करणें आणि वेश्येकडे कामसेवनाकरितां जाणें हे पांच परदारविरतिव्रताचे अतीचार आहेत, ते करूं नयेत.

परिग्रहपरिमाणाणुव्रताचें स्वरूप

धनधान्यादिग्रन्थं परिमाय ततोऽधिकेषु निस्पृहता ॥
परिमितपरिग्रहः स्यादिच्छापरिमाणनामाऽपि ॥ ८३ ॥

अर्थ— धन, धान्य वगैरे जो परिग्रह, त्याचें परिमाण करून ( अमुक इतके द्रव्य मी सांठवीन; अमुक इतकें धान्य सांठवीन असें परिमाण ठरवून ) त्यापेक्षा अधिकाची इच्छा न करणे; ह्याला परिग्रहपरिमिति किंवा इच्छापरिमाण असें ह्मणतात.

परिग्रहपरिमाणव्रताचे अतीचार

अतिवाहनातिसंग्रहविस्मयलोभातिभारवहनानि ॥
परिमितपरिग्रहस्य च विक्षेपाः पञ्च लक्ष्यन्ते ॥ ८४ ॥

अर्थ— घोडे, गाड्या वगैरे वाहनें अधिक वाळगणें, गरज नसलेल्या वस्तूचा पुष्कळ संग्रह करणे, दुसऱ्याची संपत्ति पाहून आश्चर्य मानणें, लोभ असणें आणि आपल्याला न जाईल असें ओझें घेणें हे पांच परिग्रहपरिमाणाचे अतीचार आहेत.

सहा अणुव्रते,

वधादसत्याच्चौर्याच्च कामाद्ग्रन्थान्निवर्तनम् ॥
पञ्चकाणुव्रतं रात्रिभुक्तिः षष्ठमणुव्रतम् ॥ ८५ ॥

अर्थ— हिंसा, असत्य, चौर्य, स्त्रीसंग आणि परिग्रह ह्या प्रत्येकापासून निवृत्त होणें ही पांच अणुव्रतें आहेत. आणि रात्रिभोजनाचा त्याग करणें हें सहावें अणुव्रत आहे.

रात्रिभोजनत्याग करणाऱ्याचा भोजनकाळ

अन्हो मुखेऽवसाने च यो द्वे द्वे घटिके त्यजेत् ॥
निशाभोजनदोषज्ञोऽश्नात्यसौ पुण्यभोजनम् ॥ ८६ ॥

अर्थ— प्रातःकाळीच्या आरंभीच्या दोन घटिका टाकून, आणि सायंकाळच्या शेवटच्या दोन घटिका टाकून जो भोजन करतो, तो श्रावक रात्रिभोजनाचा दोष जाणणारा असल्यानें पुण्यकारक भोजन करतो, असें समजावें.

अणुव्रतें पाळल्याचें फळ.

पञ्चाणुव्रतनिधयो निरतिक्रमणाः फलन्ति सुरलोकम् ॥
यत्रावधिरष्टगुणा विद्यन्ते कामदा नित्यम् ॥ ८७ ॥

अर्थ— पांच अणुव्रतें पाळणारें आणि अतीचार न होऊं देणारे असें जे जीव असतात ते-ज्या ठिकाणीं इच्छित फल देणारें अवधिदर्शन आणि आठ मूल गुण नेहमीं असतात- अशा स्वर्गाची प्राप्ति करून घेतात.

गुणव्रतें

दिग्व्रतमनर्थदण्डव्रतं च भोगोपभोगपरिमाणम् ॥
अनुबृंहणाद्गुणानामाख्यन्ते गुणव्रतान्यार्याः ॥ ८८ ॥

अर्थ— दिग्व्रत, अनर्थदंडव्रत आणि भोगोपभोगपरिमाण हीं तीन व्रतें गुणांना वाढविणारीं असल्यानें त्यांना गुणव्रतें असें ह्मणतात.

दिग्व्रताचें स्वरूप.

दिग्वलयं परिगणितं कृत्वाऽतोऽहं बहिर्न यास्यामि ॥
इति सङ्कल्पो दिग्व्रतमामृत्यनुपापनिवृत्त्यै ॥ ८९ ॥

अर्थ— दहाही दिशांच्या बाजूस मोजून मर्यादा करून, त्या मर्यादेच्या बाहेर मी जाणार नाहीं, असा मरणापर्यंतचा संकल्प पापनिवृत्तीकरितां करणें; त्याला दिग्व्रत ह्मणतात

मकराकरसरिदटवीगिरिजनपदयोजनानि मर्यादाम् ॥
प्राहुर्दिशां दशानां प्रतिसंहारे प्रसिद्धानि ॥ ९० ॥

अर्थ— समुद्र, नद्या, अरण्य, पर्वत आणि देश (गावें) ह्यांच्या दहा दिशांच्या बाजून मर्यादा कराव्यात. किंवा 'अमुक योजनें पर्यंत' अशी मर्यादा करावी; आणि त्याच्या बाहेर जाऊं नये.

दिग्व्रताचे अतीचार.

ऊर्ध्वाधस्तिर्यग्व्यतिपाताः क्षेत्रवृद्धिरवधीनाम् ॥
विस्मरणं दिग्विरतेरत्याशाः पञ्च मन्यन्ते ॥ ९१ ॥

अर्थ— ऊर्ध्वभागांत पूर्वी केलेल्या मर्यादेचें उल्लंघन करणें, खालच्या भागात मर्यादेचें उल्लंघन करणें, बाजूच्या मर्यादेचें उल्लंघन करणें, पूर्वी ठरविलेल्या क्षेत्रापेक्षा अधिक क्षेत्र वाढविणें आणि पूर्वी केलेली मर्यादा विसरणें हे पांच दिग्विरतिव्रताचे अतीचार आहेत.

अनर्थदंडव्रताचें स्वरूप.

**अभ्यन्तरं दिगवधेरपार्थकेभ्यः सपापयोगेभ्यः ॥**
**विरमणमनर्थदण्डव्रतं विदुर्व्रतधराग्रण्यः ॥ ९२ ॥**

अर्थ— आपण जी देशमर्यादा केली असेल त्या मर्यादेंत कारणावांचून घडणारीं जीं पातकें, त्यापासून निवृत्त होणें, यास व्रती पुरुष अनर्थदंडविरतिव्रत समजतात.

अनर्थदंडव्रताचे अतीचार

**पापोपदेशहिंसादानापध्यानदुःश्रुतीः पञ्च ॥**
**प्राहुः प्रमादचर्यामनर्थदण्डानदण्डधराः ९३ ॥**

अर्थ— दंडाला ( अशुभमन, अशुभवचन अशुभकाय यांना ) न धारण करणारे जे गणधर ते पापोपदेश हिंसादान, अपध्यान, दुःश्रुति आणि प्रमादचर्या असे पांच प्रकारचे अनर्थदंड आहेत असे म्हणतात. किंवा या पांचासही अनर्थदंड असें म्हणतात.

पापोपदेश

तिर्यक्क्लेशवाणिज्याहिंसारम्भप्रलम्भनादीनाम् ॥
कथाप्रसङ्गप्रसवः स्मर्तव्यः पाप उपदेशः ॥ ९४ ॥

अर्थ— पशुपक्षी इत्यादि तिर्यक् जीवांना पीडा करणें, व्यापार करणें, हिंसा करणें, शेतकी, लोकांना फसविणें, वगैरेंच्या संबंधानें गोष्टी बोलण्याचा प्रसंग आणणें, हा पापोपदेश समजावा.

हिंसादान

परशुकृपाणखनित्रज्वलनायुधशृङ्गशृङ्खलादीनाम् ॥
वधहेतूनां दानं हिंसादानं ब्रुवन्ति बुधाः ॥ ९५ ॥

अर्थ— हिंसेला साधनीभूत असलेल्या ज्या-कुऱ्हाड, तरवार, कुदळ अग्नि, शस्त्र, शिंग, साखळी वगैरे-वस्तू, त्या देणें, यांस हिंसादान म्हणतात.

अपध्यान.

वधबन्धच्छेदादेर्द्वेषाद्रागाच्च परकलत्रादेः ॥
आध्यानमपध्यानं शासति जिनशासने विशदाः ॥ ९६ ॥

अर्थ— एखाद्याच्या द्वेषामुळें त्याचा वध करावा, त्याला बांधून घालावें, त्याचा एखादा अवयव

कांपावा असा विचार करणें, आणि प्रेमानें परस्त्रीचें चिंतन करणें, ह्याला जैनशास्त्रांत प्रवीण असलेले पंडित अपध्यान असें ह्मणतात.

दु श्रुति

आरम्भसङ्गसाहसमिथ्यात्वद्वेषरागमदमदनैः ॥
चेतः कलुषयतां श्रुतिरपाधियां दुःश्रुतिर्भवति ॥ ९७ ॥

अर्थ— हिंसा घडविणारा उद्योग, परिग्रह, धाडस, मिथ्यात्व, द्वेष, राग, गर्व आणि कामेच्छा ह्यांच्या योगानें अंतःकरण विघडविणारीं जीं दुष्टांचीं भाषणें, त्यांचें श्रवण करणें, ह्याला दुःश्रुति असें ह्मणतात.

प्रमादचर्या

क्षितिसलिलदहनपवनारम्भं विफलं वनस्पतिच्छेदम् ॥
सरणं सारणमपि च प्रमादचर्यां प्रभाषन्ते ॥ ९८ ॥

अर्थ— कारणावांचून व्यर्थ जमीन खणणें, पाण्यावर कांठीनें मारणें, कारणावांचून अग्नि पेटविणें, वायूवर आघात करणें, विनाकारण झाडें तोडणें, उगींच हिंडणें आणि दुसऱ्यास हिंडावयास लावणें यांला प्रमादचर्या असें ह्मणतात.

अनर्थदंडविरतीचे अतीचार.

कन्दर्पं कौत्कुच्यं मौखर्यमतिसाधनं पञ्च ॥
असमीक्ष्य चाधिकरणं व्यतीतयोऽनर्थदण्डकृद्विरतेः ॥ ९९ ॥

अर्थ— स्त्रीसंभोगाची इच्छा व्यक्त होईल अशीं थट्टेनें भाषणें करणें, त्या प्रकारच्याच अंगचेष्टा करणें, व्यर्थ बडबड करणें, भोगोपभोगाची सामग्री विनाकारण वाढविणें, आणि विचार केल्यावांचून कारणापेक्षा अधिक कांहींतरी करणें, हे पांच अनर्थदंडविरतिव्रताचे अतीचार आहेत.

भोगोपभोगपरिमाणव्रत.

अक्षार्थानां परिसंख्यानं भोगोपभोगपरिमाणम् ॥
अर्थवतामप्यवधौ रागरतीनां तनूकृतये ॥ १०० ॥

अर्थ— ज्याचें अवश्य कारण आहे अशा-इंद्रियसेव्य-विषयांची मर्यादा ठरविणें, त्याला भोगोपभोगपरिमाणव्रत म्हणतात. हें व्रत रागादि मनोविकार कमी करण्याकरितां अवश्य करावें.

भोग आणि उपभोग ह्यांचें लक्षण.

भुक्त्वा परिहातव्यो भोगो भुक्त्वा पुनश्च भोक्तव्यः ॥
उपभोगोऽशनवसनप्रभृतिः पाञ्चेन्द्रियो विषयः ॥ १०१ ॥

अर्थ— एकवार अनुभवल्यानें त्याज्य होणारा 'म्हणजे दुसऱ्या वेळीं अनुभव करतां न येणारा' असा

जो पंचेंद्रियांचा विषय असलेला पदार्थ त्यास भोग ह्मणतात. जसें खाण्याचे पदार्थ. आणि ज्याचा पुनः पुनः अनुभव करता येतो असा जो पंचेंद्रियाचा विषय त्यास उपभोग ह्मणतात. जसें वस्त्र वगैरे पदार्थ. हा भोग आणि उपभोग ह्या शब्दांचा अर्थ सांगितला आहे.

मधुमासमद्यवर्जन.

त्रसहतिपरिहारार्थं क्षौद्रं पिशितं प्रमादपरिहृतये ॥
मद्यं च वर्जनीयं जिनचरणौ शरणमुपयातैः ॥ १०२ ॥

अर्थ— जिनचरणाची भक्ति करणाऱ्या श्रावकानें त्रस जीवांची हिंसा होऊं नये ह्मणून, मध आणि मांस वर्ज्य करावें. आणि आपल्या हातून प्रमाद होऊं नये ह्मणून मद्य वर्ज्य करावें.

व्रतिकानीं त्याज्य पदार्थ

अल्पफलबहुविघातान्मूलकमार्द्राणि शृङ्गवेराणि ॥
नवनीतनिम्बकुसुमं कैतकमित्येवमवहेयम् ॥ १०३ ॥

अर्थ— ज्यापासून फल थोडें, परंतु पुष्कळ त्रस जीवाचा नाश मात्र होतो असें असल्यामुळें, मुळा, आलें लोणी, निंबाचें फूल, केवडा ह्या पदार्थांचा त्याग करावा.

उदुंबरत्यागाचें कारण

सूक्ष्माः स्थूलास्तथा जीवाः सन्त्युदुम्बरमध्यगाः ॥
तन्निमित्तं जिनोद्दिष्टं पञ्चोदुम्बरवर्जनम् ॥ १०४ ॥

अर्थ— सूक्ष्म आणि स्थूल असे दोनी प्रकारचे जीव उदुंबरांत असतात. म्हणून श्रीजिनांनीं पंचोदुंबरांचा त्याग करण्यास सांगितलें आहे.

फलभक्षणत्याग.

रससम्पृक्तफलं यो दशति त्रसतनुरसैश्च सम्मिश्रम् ॥
तस्य च मांसनिवृत्तिर्विफला खलु भवति पुरुषस्य ॥ १०५ ॥

अर्थ— त्रसजीवांच्या शरीररसानें युक्त असलेलें असें रसभरित फल जो भक्षण करतो, त्या पुरुषानें मांसत्याग केलेला व्यर्थ आहे; असें समजावें.

गालितजल वगैरेंत जंतु होण्याचा काल.

गालितं शुद्धमप्यम्बु सम्मूर्च्छति मुहूर्ततः ॥
अहोरात्रात्तदुष्णं स्यात्काञ्जिकं दूरवन्हिकम् ॥ १०६ ॥

अर्थ— गाळलेलें असें शुद्ध पाणीही दोन घटिकांनीं जीवयुक्त होतें. तेंच ( गाळलेलें ) पाणी तापविलें तर एक दिवसानें त्यांत जीव उत्पन्न होतात, आणि कांजींत तीं थंड झाल्याबरोबर जीव उत्पन्न होतात.

तिलतण्डुलतोयं च प्रासुकं भ्रामरीगृहे ॥
न पानीयं मतं तस्मान्मुखशुद्धिर्न जायते ॥ १०७ ॥

अर्थ— भिक्षेकरितां गेलेल्या घरांतील तीळ तांदुळ ह्यांनीं मिश्र केलेलें पाणी शुद्ध समजावें. परंतु तें वास्तविक पाणी नसल्यानें, तें तोंड धुण्याच्या वगैरे उपयोगीं नाहीं.

जल निर्जंतुक होण्यास उपाय

एलालवङ्गतिलतण्डुलचन्दनाद्यैः । कर्पूरकुंकुमतमालसुपल्लवैश्च ॥
सुप्रासुकं भवति खादिरभस्मचूर्णैः । पानीयमग्निपचितं त्रिफलाकषायैः ॥ १०८ ॥

अर्थ— वेलदोडे, लवंगा, तीळ, तांदुळ, चंदन, कापूर, केशर, ताडाचीं कोवळीं पानें, खैराची राख, अग्नि आणि त्रिफलेचा ( हिरडा, वेहेडा, आवळकाठी ह्यांचा ) काढा ह्यांतील कशाचाही योग पाण्यास केला असतां पाणी निर्जंतुक होतें.

चम्मगदे जलणेहे उपज्जइ वियलतियं पंचिदियं ॥
संधाने पुण भुत्ते सीइजुए मंसवए अइचारी ॥ १०९ ॥

अर्थ— चामड्याच्या बुदल्यांतील पाणी किंवा तेल ह्यांत विकलेंद्रिय आणि पंचेंद्रिय ( ? ) जीव उत्पन्न होतात, ह्मणून तें त्याज्य आहे. आंबलेला पदार्थ भक्षण केल्यानें मांसत्यागव्रताचा अतीचार होतो.

[ चामड्याच्या बुदल्यांतील पाणी वगैरेंत पंचेंद्रिय जीव कसे उत्पन्न होतात? ही शंका आहे. ]

शिक्षाव्रताचे भेद.

देशावकाशिकं वा सामयिकं प्रोषधोपवासो वा ॥
वैयावृत्त्यं शिक्षाव्रतानि चत्वारि शिष्टानि ॥ ११० ॥

अर्थ— देशावकाशिक, सामयिक, प्रोषधोपवास आणि वैयावृत्त्य हीं चार शिक्षाव्रतें आहेत.

देशावकाशिकाची मर्यादा

गृहदारग्रामाणां क्षेत्रनदीदावयोजनानां च ॥
देशावकाशिकस्य स्मरन्ति सीम्नां तपोवृद्धाः ॥ १११ ॥

अर्थ— घर, दार, गांव, शेत, नदी, अरण्य किंवा योजन ह्या देशावकाशिकव्रताच्या मर्यादा होत. असें मुनि मानतात.

सामयिकव्रत

आसमयमुक्ति मुक्तं पञ्चाघानामशेषभावेन ॥
सर्वत्र च सामयिकाः सामयिकं नाम शंसन्ति ॥ ११२ ॥

अर्थ— कांहीं एका नियमित कालापर्यंत हिंसादि पांच प्रकारच्या पातकाचा सर्वप्रकारे त्याग करणें

ह्याला सामायिक शिक्षाव्रत ह्मणतात.

प्रोषधोपवास.

**पर्वण्यष्टम्यां च ज्ञातव्यः प्रोषधोपवासस्तु ॥**
**चतुरभ्यवहार्याणां प्रत्याख्यानं सदेच्छाभिः ॥ ११३ ॥**

अर्थ— चतुर्दशी आणि अष्टमी ह्या दिवशी व्रत करण्याच्या इच्छेनें चारही प्रकारच्या आहाराचा दिवसभर त्याग करणें, ह्याला प्रोषधोपवासव्रत ह्मणतात.

वैयावृत्य.

**दानं वैयावृत्यं धर्माय तपोधनाय गुणनिधये ॥**
**अनपेक्षितोपचारोपक्रियमगृहाय विभवेन ॥ ११४ ॥**

अर्थ— सम्यक्त्वादि गुणांचा समुद्र अशा अनगार तपस्व्याला ( यतीला ) धर्माच्या बुद्धीनें–त्यानें आपली स्तुति करावी, किंवा कांहीं तरी प्रत्युपकार करावा अशी इच्छा न करता–दान करणें; ह्याला वैयावृत्य नावाचें शिक्षाव्रत ह्मणतात.

**व्यापत्तेर्व्यपनोदः पदयोः संवाहनं च गुणरागात् ॥**
**वैयावृत्यं यावानुपग्रहोऽन्योऽपि संयमिनाम् ॥ ११५ ॥**

अर्थ— संयमी मुनीचे-सद्गुणाविषयींच्या प्रेमामुळें-क्लेश घालविणें, त्याचे पाय रगडणें, आणि दुसऱ्याही शक्य तितका त्याचा उपयोग करणें, ह्याला देखील वैयावृत्य शिक्षाव्रतच ह्मणतात.

दानविधि.

नवपुण्यैः प्रतिपत्तिः सप्तगुणसमाहितेन शुद्धेन ॥
अपसूनारम्भाणामार्याणामिष्यते दानम् ॥ ११६ ॥

अर्थ— सप्तगुणांनीं युक्त असलेल्या शुद्धभावाच्या योगें करून नऊ प्रकारच्या पुण्यकर्मांनीं यतीचा सत्कार करुन पापनिवृत्त झालेल्या श्रावकांनीं त्याना दान करणें योग्य आहे.

नऊ पुण्यकर्मे.

स्थापनमुच्चैःस्थानं पादोदकमर्चनं प्रणामश्च ॥
वाक्कायहृदयैषणशुद्धय इति नवविधं पुण्यम् ॥ ११७ ॥

अर्थः—यतीला आदरपूर्वक बसविणें, उच्चस्थान देणें, पाय धुण्यास पाणी देणें, पूजा करणें, नमस्कार, वाणीची शुद्धि, शरीराची शुद्धि, आणि एषणाशुद्धि, ( पाहून अन्न देणें ) हीं नऊ पुण्यकर्मे समजावींत.

दात्याचे सात गुण

श्रद्धा भक्तिस्तुष्टिर्विज्ञानमलुब्धता क्षमा सत्त्वम् ॥

यत्रैते सप्तगुणास्तं दातारं प्रशंसन्ति ॥ ११८ ॥

अर्थ— श्रद्धा, भक्ति, संतोष, ज्ञान, निर्लोभपणा, क्षमा आणि धैर्य हे सात गुण ज्याच्या ठिकाणीं असतील त्या दात्याची सर्व लोक स्तुति करतात.

श्रावकाच्या एकादश प्रतिमा.

अथैकादश प्रतिमाः ॥ दंसण वय सामाइय पोसह सचित्त राइभत्तेय ॥
बंभारंभपरिग्गह अणुमणुमुद्दिट्ठ देशविरदेदे ॥ ११९ ॥

अर्थ— आता श्रावकाच्या अकरा प्रतिमा सांगतात–दर्शन, व्रत, सामायिक, प्रोषध, सचित्तविरति, रात्रिभोजनत्याग, ब्रह्मचर्य, आरंभत्याग, परिग्रहत्याग, अनुमतित्याग आणि उद्दिष्टत्याग ह्या श्रावकाच्या अकरा प्रतिमा आहेत. ह्या प्रतिमा धारण करणारे श्रावक पांचव्या गुणस्थानातील होत.

सचित्तविरतिव्रत

दर्शनव्रतसामायिकप्रोषधोपवासकाः ॥
प्रोक्ताःप्रागेव प्रोच्चेऽथ सचित्तव्रतलक्षणम् ॥ १२० ॥
मूलफलशाकशाखाकरीरकन्दप्रसूनबीजानि ॥
नामानि योऽत्ति सोऽयं सचित्तविरतो दयामूर्तिः ॥ १२१ ॥

अन्नं पानं खाद्यं लेह्यं नाश्नाति यो विभावर्याम् ॥
स च रात्रिभुक्तविरतः सत्त्वेष्वनुकम्पमानमनाः ॥ १२४ ॥

अर्थ— अन्न, पान, खाद्य आणि लेह्य असा चार प्रकारचा आहार ज्या दयालु श्रावकानें रात्रीं वर्ज्य केला, तो रात्रिभुक्तविरत समजावा.

रात्रिभुक्तविरताची प्रशंसा.

यो निशि भुक्तिं मुञ्चति तेनानशनं कृतं च षण्मासम् ॥
संवत्सरस्य मध्ये निर्दिष्टं मुनिवरेणेति ॥ १२५ ॥

अर्थ— ज्यानें रात्रिभोजनाचा त्याग केला त्यानें एका संवत्सरांत सहा महिने उपवास केल्यासारखें होतें, असें मुनिवरानें सांगितलें आहे.

रात्रिभुक्तव्रताचें दुसरें स्वरूप.

मणवयणकायकदिकारिदाणुमोदेहिं मेहुणम् ॥
णवधा दिवसम्मिजो विवज्जादिगुणम्मि सावओ छट्ठो ॥ १२६ ॥

अर्थ— मन, वचन आणि काय यांतील प्रत्येकानें करणें, करविणें आणि अनुमोदन देणें अशा नऊ प्रकारांनीं दिवसा मैथुनाचा त्याग करणें यालाही रात्रिभुक्तव्रतच म्हणतात.

गृहस्थधर्मशक्तश्चोपनयब्रह्मचारिकः ॥ १३० ॥

अर्थ— ब्रह्मचारी, गृहस्थ वानप्रस्थ आणि भिक्षु असे चार आश्रम–ज्याप्रमाणें क्रियाभेदामुळें ब्राह्मणादि चार वर्ण भिन्न आहेत, त्याप्रमाणें क्रियाभेदामुळें भिन्न असलेले जसे–सातव्या अध्यायांत सांगितले आहेत. त्यांत श्रावकाध्ययनसूत्राचा विचार करून गृहस्थधर्म आचरण्यास समर्थ असा जो श्रावक, त्यास उपनय ब्रह्मचारी ह्मणावें.

अवलंबब्रह्मचाऱ्याचें लक्षण.

स्थित्वा क्षुल्लकरूपेण कृत्वाऽभ्यासं सदाऽऽगमे ॥
कुर्याद्विवाहक सोऽत्रावलम्बब्रह्मचारिकः ॥ १३१ ॥

अर्थ—गरीबीनें वागून व सर्वदा आगमाचा अभ्यास करून, जो विवाह करतो तो अवलंबब्रह्मचारी श्रावक समजावा.

अदीक्षाब्रह्मचाऱ्याचें लक्षण

विना दीक्षां व्रतासक्तः शास्त्राध्ययनतत्परः ॥
पठित्वोद्वाहं यः कुर्यात्सोऽदीक्षाब्रह्मचारिकः ॥ १३२ ॥

अर्थ— दीक्षा ग्रहण केल्यावाचून व्रत करण्याविषयीं तत्पर असलेला आणि शास्त्राध्ययन करण्यांत

गळून गेलेला, व शास्त्राध्ययन समाप्त करून विवाह करणारा असा जो श्रावक तो अदीक्षाब्रह्मचारी समजवा.

गूढब्रह्मचाऱ्याचे लक्षण

आ बाल्याच्छास्त्रसत्प्रीतः पित्रादीनां हठात्पुनः ॥
पठित्वोद्वाहं यः कुर्यात्स गूढब्रह्मचारिकः ॥ १३३ ॥

अर्थ— लहानपणापासून शास्त्राभ्यास करण्यांत रत झालेला व शास्त्राभ्यास संपल्यावर पिता वगैरे वडील मनुष्यांच्या बलात्कारामुळें ज्यानें विवाह केला आहे असा जो श्रावक तो गूढब्रह्मचारी समजावा.

नैष्ठिकब्रह्मचाऱ्याचे लक्षण

यावज्जीवं तु सर्वस्त्रीसङ्गं करोति नो कदा ॥
नैष्ठिको ब्रह्मचारी स एकवस्त्रपरिग्रहः ॥ १३४ ॥

अर्थ— जो यावज्जीव कोणत्याही स्त्रीचा समागम न करील व ज्यानें एका वस्त्रावांचून अन्य परिग्रह बाळगलेला नाहीं तो नैष्ठिकब्रह्मचारी समजावा.

गृहस्थाचे लक्षण

सन्ध्याध्ययनपूजादिकर्मसु तत्परो महान् ॥
त्यागी भोगी दयालुश्च सद्गृहस्थः प्रकीर्तितः ॥ १३५ ॥

अर्थः— संध्या, अध्ययन ( स्वाध्याय ) पूजा वगैरे कर्मे करण्याविषयीं तत्पर असून, दान करणारा उपभोग घेणारा व जीवदया करणारा असा जो असेल तो उत्तम गृहस्थ समजावा.

वानप्रस्थलक्षण.

प्रतिमैकादशधारी ध्यानाध्ययनतत्परः ॥
प्राक्कषायाद्विदूरस्थो वानप्रस्थः प्रशस्यते ॥ १३६ ॥

अर्थ— अकराही प्रतिमा धारण करणारा, ध्यान आणि अध्ययन ह्यांविषयीं तत्पर असलेला व सर्व कषायांचा ज्यानें त्याग केला आहे असा जो असेल तो वानप्रस्थ समजावा.

भिक्षुलक्षण.

सर्वसङ्गपरित्यक्तो धर्मध्यानपरायणः ।
ध्यानी मौनी तपोनिष्ठः स ज्ञानी भिक्षुरुच्यते ॥ १३७ ॥

अर्थ— ज्यानें सर्वसंगपरित्याग केला आहे, व जो धर्मध्यानांत आसक्त असून मौन धारण करून तपश्चर्या करीत असेल तो भिक्षु समजावा. पुढें आठवी प्रतिमा सांगतात.

आरंभनिवृत्ति.

सेवाकृषिवाणिज्यप्रमुखारम्भतो व्युपरातिः ॥

प्राणातिपातहेतोर्याऽसावारम्भविनिवृत्तिः ॥ १३८ ॥

अर्थ— ज्यापासून प्राणनाश होईल अशा सेवा, कृषि अथवा वाणिज्य वगैरे कर्माचा त्याग करणें ह्याला आरंभनिवृत्तिप्रतिमा ह्मणतात.

नववी प्रतिमा.

मोत्तूण वत्थमेत्तं परिग्गहं जो विवज्जदे सेस ॥
तत्थ वि मुच्छं ण करेदि वियाण सो साववो णवमो ॥ १३९ ॥

अर्थ— एक वस्त्र सोडून (एका वस्त्रावांचून) बाकीच्या सर्वपरिग्रहाचा जो त्याग करतो, आणि असलेल्या वस्त्राविषयींही जो ममता ठेवीत नाहीं, तो नववी प्रतिमा धारण करणारा श्रावक समजावा.

बाह्यपरिग्रहाचे प्रकार.

क्षेत्रं वास्तु धनं धान्यं दासी दासश्चतुष्पदम् ॥
यानं शय्यासनं कुप्यं भाण्डं चेति बहिर्दश ॥ १४० ॥

अर्थ— शेत, घर, द्रव्य, धान्य, दास, दासी, जनावरें, वाहनें, शय्या, आसन, तांबे, पितळ वगैरे धातु आणि भांडीं हे दहा बाह्यपरिग्रह समजावेत.

अंतरंगपरिग्रहाचे प्रकार

मिथ्यात्ववेदहास्यादिषट्कषायचतुष्टयम् ॥
रागद्वेषौ च सङ्गाः स्युरन्तरङ्गाश्चतुर्दश ॥ १४१ ॥

अर्थ— मिथ्यात्व, तीन वेद ( स्त्रीवेद, पुवेद आणि नपुंसकवेद ), हास्य वगैरे सह, चार कषाय हे चवदा रंगपरिग्रह समजावेत.

बाह्यग्रन्थविहीना दरिद्रमनुजास्तु पापतः सन्ति ॥
पुनरभ्यन्तरसङ्गत्यागी लोकेऽतिदुर्लभो जीवः ॥ १४२ ॥

अर्थ— पूर्वीच्या पापकर्मामुळें दरिद्री झालेले असे पुष्कळ लोक बाह्यग्रंथ रहित असतात. परंतु अंतरंगाचा त्याग करणारा जीव या लोकात अत्यंत दुर्लभ आहे.

दहावी प्रतिमा.

पुट्ठो वा पुट्ठो वा णियगेहपरेहिं सगिहकज्जे ॥
अणुमणणं जो ण कुणदि वियाण सो सावयो दसमो ॥ १४३ ॥

अर्थ-- प्रपचाच्या कोणत्याही कार्याबद्दल घरातील मनुष्यांनी कांही विचारिलें असतां किंवा नसतां आपण अनुमति जो देत नाही तो दहावी प्रतिमा धारण करणारा श्रावक समजावा.

एकादशके स्थाने सूत्कृष्टः श्रावको भवेत् द्विविधः ॥
वस्त्रैकधरः प्रथमः कौपीनपरिग्रहोऽन्यस्तु ॥ १४४ ॥

अर्थ— उद्दिष्टविरति नावाची जी अकरावी प्रतिमा त्यांतील उत्कृष्ट श्रावक दोन प्रकारचा असतो. त्यांत पहिला एकवस्त्र धारण करणारा आणि दुसरा फक्त कौपीन धारण करणारा होय.

गृहतो मुनिर्वनमित्वा गुरूपकण्ठे व्रतानि परिगृह्य ॥
भिक्षाशनस्तपस्यन्नुत्कृष्टश्चेलखण्डधरः ॥ १४५ ॥

अर्थ— तो अकराव्या प्रतिमेतील श्रावक गृह वगैरे परिग्रहाचा त्याग करून वनांत जाऊन गुरूजवळ व्रतें घेऊन भिक्षा मागून निर्वाह करणारा व वस्त्राचा एक तुकडा अंगावर धारण करणारा असा असतो.

अकरावी प्रतिमा धारण करणाऱ्याचा आचार

अथाशाधरः- स्वयं समुपविष्टोऽद्यात्पाणिपात्रेऽथ भाजने ॥
स श्रावकगृहं गत्वा पाणिपात्रस्तदङ्गणे ॥ १४६ ॥
स्थित्वा भिक्षां धर्मलाभं भणित्वा प्रार्थयेत वा ॥
मौनेन दर्शयित्वाऽङ्गं लाभालाभे समोऽचिरात् ॥ १४७ ॥
निर्गत्यान्यगृहं गच्छेद्भिक्षोद्युक्तश्च केनाचित् ॥

भोजनायार्थितोऽद्यात्तद्भुक्त्वा यद्भिक्षितं मनाक् ॥ १४८ ॥
प्रार्थयेतान्यथा भिक्षां यावत्स्वोदरपूरणीम् ॥
लभेत प्रासुपात्रान्तस्तत्र संशोध्य तां चरेत् ॥ १४९ ॥

अर्थ— आतां अकराव्या प्रतिमेला धारण करणाऱ्या श्रावकाचा आचार आशाधर पंडितांनीं सांगितलेला येथें सांगतात. अकराव्या प्रतिमेला धारण करणाऱ्यानें आपण खालीं बसून हातांत किंवा भांड्यात अन्न घेऊन भोजन करावें. त्यानें भिक्षेकरितां श्रावकांच्या घरीं जाऊन अंगणांत उभें राहून 'धर्मलाभ होवो,' असें ह्मणून आपल्या हातांतच भिक्षेविषयीं याचना करावी. किंवा मौन धारण करून हातानें भिक्षेची खूण करावी. भिक्षा घातल्यास आनंद मानूं नये; व न घातल्यास खेदही मानूं नये. तेथें फार वेळ उभें राहूं नये. थोडा वेळ भिक्षेची वाट पाहून लागलीच दुसऱ्या घरीं जावें. कोणीं 'आपण आज येथेंच भोजन करा' अशी प्रार्थना केल्यास त्या घरीं आपण भिक्षा मागून आणलेलें अन्न भक्षण करावें. तें थोडें असल्यास आपलें पोट भरेपर्यंत लागेल तितकें अन्न मागून घ्यावें. अन्न प्रासुक अशा पात्रांत ठेवून नीट पाहून भक्षण करावें.

कौपीनोऽसौ रात्रिप्रतिमायोगं करोति नियमेन ॥
लोचं पिच्छं धृत्वा भुङ्क्ते ह्युपविश्य पाणिपुटे ॥ १५० ॥

अर्थ— कौपीन धारण करणाऱ्यानें रात्रीं नियमानें प्रतिमायोग करावा. केशलुंचन करावें, पिच्छधारण करावें. आणि बसून पाणिपात्रांत भोजन करावें.

देशविरतांनीं न करण्याचीं कर्मे

वीरचर्या च सूर्यप्रतिमा त्रैकाल्ययोगनियमश्च ॥
सिद्धान्तरहस्यादावध्ययनं नास्ति देशविरतानाम् ॥ १५१ ॥

अर्थ— वीरचर्या, सूर्यप्रतिमा, तिन्हीं कालीं योग करण्याचा नियम आणि सिद्धांतरहस्यादिकांचें अध्ययन हीं कर्मे देशविरतांनीं करूं नयेत.

अकरा प्रतिमातील उत्तम, मध्यम, अधम विभाग.

आद्याः स्युः षट् जघन्याः स्युर्मध्यमास्तदनु त्रयः ॥
शेषौ द्वावुत्तमावुक्तौ जैनेषु जिनशासने ॥ १५२ ॥

अर्थ— ह्या वर सांगितलेल्या अकरा प्रतिमांपैकीं पहिल्या सहा प्रतिमा धारण करणारे जैन कनिष्ठ, त्या पुढच्या तीन प्रतिमा धारण करणारे मध्यम आणि शेवटच्या दोन प्रतिमा धारण करणारे उत्तम होत, असें जैनशास्त्रांत सांगितलें आहे.

गुरूपदेशश्रवणानतरचें कृत्य.

सद्व्रतानि गुरूक्तानि चेति श्रुत्वोपनीतवान् ॥
गृह्णीयाच्च यथाशक्ति अमुत्रात्र सुखावहम् ॥ १५३ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें गुरूनीं सांगितलेलीं सद्व्रतें श्रवण करून शिष्यानें आपल्या शक्तीप्रमाणें सुखकर होतील अशीं व्रतें ग्रहण करावीत.

वाद्यादिविभवैर्युक्तो गृहं गत्वा स धर्मधीः ॥
ताम्बूलैः स्वजनान् सर्वान्मानयेद्धर्महेतवे ॥ १५४ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें व्रतग्रहण झाल्यानंतर त्यानें मंगलवाद्यें वाजत असतां समारंभानें आपल्या घरीं येऊन, आपल्या सजातीयाचा तांबूलादि देऊन धर्मवृद्धीकरितां सत्कार करावा.

यज्ञोपवीतं कथितं मुनीन्द्रै- । रत्नत्रयं वा व्यवहाररूपम् ॥
त्रिवर्गपुम्भिर्ध्रियते मनोज्ञं । धर्मार्थकामाभिमुखैः सुखाय ॥ १५५ ॥

अर्थ— यज्ञोपवीत हें बाह्य रत्नत्रय आहे असें मुनींद्रांनीं सांगितलें आहे. म्हणून धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ प्राप्त करून घेण्याची इच्छा करणाऱ्या त्रैवर्णिकश्रावकांनीं तें सुंदर असें यज्ञोपवीत सुखप्राप्तीकरितां धारण केलें जातें.

विद्याभ्यासः सदा कार्यः सतां मध्ये सुभूषणम् ॥

सत्पूरुषैस्त्विदं प्रोक्तं सोमसेनैः शिवासये ॥ १५६ ॥

अर्थ— चांगल्या लोकांत भूषण प्राप्त होण्याकरितां विद्याभ्यास सर्वदा करावा; असें सत्पुरुष जे सोमसेन मुनी त्यांनी सर्वांच्या कल्याणाकरितां सांगितलें आहे.

इत्येवं कथितानि जैनसमये सारव्रतानि क्षितौ ।
ये कुर्वन्ति सुधर्मसाञ्चितधियो धन्यास्तु ते मानवाः ॥
संसाराम्बुधिपारगाः शिवसुखं प्राप्ता इव प्रस्तुता ।
देवेन्द्रादिसुरैर्नराधिपगणैः श्रीसोमदेवैः पुनः ॥ १५७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें जैनशास्त्रांत सांगितलेली जी ही मुख्य व्रतें, ती जे धार्मिक लोक करितात, ते धन्य समजावेत. ते ह्या संसारसमुद्रांतून पार होऊन, मुक्त झालेले असेच कीं काय! इंद्रादि देवांनी स्तुति केले जातात. तसेंच त्यांची नृपति स्तुति करतात आणि सोमसेनमुनीही त्यांची स्तुति करीत आहेत.

इतिश्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपणे भट्टारक-
श्रीसोमसेनाविरचिते व्रतस्वरूपकथनियो
नाम दशमोऽध्यायः समाप्तः ॥

---

॥ श्रीवीतरागाय नम ॥

## ॥ एकादशोऽध्यायः ॥

वन्दे त्वा जिनवर्द्धमानमनघं धर्मद्रुसद्बीजकं ।
कर्मारातितमोदिवाकरसमं नानागुणालंकृतम् ॥
स्याद्वादोदयपर्वताश्रिततरं सामन्तभद्रं वचः ।
पायान्नः शिवकोटिराजमहितं न्यायैकपात्रं सदा ॥ १ ॥

अर्थ— हे श्रीवर्द्धमानजिना! धर्मरूपी वृक्षाचें सद्बीज, कर्मरूपी जे शत्रु, तोच जो अंधकार, त्याचा नाश करण्यास सूर्यासारखा आणि अनेक सद्गुणांनीं सुशोभित असा जो तूं, त्या तुजप्रत मी नमस्कार करतो!! स्याद्वादरूपी पर्वताच्या शिखरावर चढलेलें, शिवकोटी नांवाच्या राजानें ज्याची फारच प्रतिष्ठा केली आहे असें, आणि न्यायानें ( युक्तींनीं ) भरलेलें पात्रच कीं काय असें, जें श्रीसमंतभद्राचार्यांचें शास्त्ररूपी वचन तें आमचें सर्वांचें सर्वदा रक्षण करो!!

जिनसेनमुनिं नत्वा वैवाहविधिमुत्सवम् ॥
वक्ष्ये पुराणमार्गेण लौकिकाचारसिद्धये ॥ २ ॥

अर्थ— श्रीजिनसेनमुनीला नमस्कार करून लौकिक आचार चालण्याकरितां प्राचीनपद्धतीनें विवाहवि-

धिरूपी महोत्सवाचें निरूपण करतो.

निवाह करण्याला योग्य कन्या

अन्यगोत्रभवां कन्यामनातङ्कां सुलक्षणाम् ॥
आयुष्मतीं गुणाढ्यां च पितृदत्तां वरेद्वरः ॥ ३ ॥

अर्थ— दुसऱ्या गोत्रांत उत्पन्न झालेली, रोगरहित, सुलक्षणांनीं युक्त, दीर्घायु, गुणवती अशी कन्या; तिच्या पित्यानें दिली असतां तिच्याशीं विवाह करावा.

वराचें लक्षण.

वरोऽपि गुणवान् श्रेष्ठो दीर्घायुर्व्याधिवर्जितः ॥
सुकुली तु सदाचारो गृह्यतेऽसौ सुरूपकः ॥ ४ ॥

अर्थ— वर देखील गुणवान्, मुलीपेक्षां मोठा, दीर्घायु, निरोगी, कुलीन, सदाचारसंपन्न आणि सुरूप असा असावा.

वराचे गुण

सत्यं शौचं क्षमा त्यागः प्रज्ञौजः करुणा दमः ॥
प्रशमो विनयश्चेति गुणाः सत्त्वानुवर्तिणः ॥ ५ ॥

अर्थ— सत्य, शुद्धता, क्षमा, औदार्य, बुद्धि, बल, करुणा, इंद्रियनिग्रह, शांति आणि विनय हे गुण जीवद्रव्याचे आहेत. हे वराचे ठिकाणीं असावेत.

वपुः कान्तिश्च दीप्तिश्च लावण्यं प्रियवाक्यता ॥
कलाकुशलता चेति शरीरान्वयिनो गुणाः ॥ ६ ॥
कुलजातिवयोविद्याकुटुम्बरूपसम्पदः ॥
चारित्रं पौरुषं चेति शरीरान्वयिनो गुणाः ॥ ७ ॥

अर्थ— बळकट शरीर, कांति, तेज, सौंदर्य, गोड बोलणें, कलेंत कुशलपणा हे शरीरासंबंधी गुण समजावेत. किंवा उत्तम कुल, जाति, वय, विद्या, परिवार, सुरूपणा, संपत्ति, सदाचार, पराक्रम हे गुण शरीरासंबंधी असें समजावें. हे गुण वराचे ठिकाणीं असावेत.

पूर्वमायुः परीक्षेत पश्चाल्लक्षणमेव च ॥
आयुर्हीनजनानां च लक्षणैः किं प्रयोजनम् ॥ ८ ॥

अर्थ— प्रथम वराच्या आयुष्याची परीक्षा करावी. कारण, ज्यांना आयुष्य कमी आहे त्यांच्यामध्यें पुष्कळ गुण असून काय उपयोग आहे?

तथा विज्ञाय यत्नेन शुभाशुभमिति स्थितम् ॥

लक्षणं शुभकन्यायां शुभकन्यां वरेद्वरः ॥ ९ ॥

अर्थ— त्याचप्रमाणें सुंदर अशा कन्येच्या ठायींही शुभाशुभ लक्षणें पहावीत. आणि नंतर वरानें त्या कन्येशीं विवाह करावा.

दुर्लक्षणकन्येचें फल

मातरं पितरं चापि भ्रातरं देवर तथा ॥
पतिं विनाशयेन्नारी लक्षणैः परिवर्जिता ॥ १० ॥

अर्थ— शुभलक्षणांनी रहित असलेली कन्या, आई, बाप, भाऊ, दीर, पति ह्यांचा नाश करते.

कन्यापरीक्षेचे अवयव

हस्तौ पादौ परीक्षेत अङ्गुलीश्च नखांस्तथा ॥
पाणिरेखाश्च जङ्घे च कटिं नाभिं तथैव च ॥ ११ ॥
ऊरुश्चोदरमध्यं च स्तनौ कर्णौ भुजावुभौ ॥
वक्षःस्थलं ललाटं च शिरः केशांस्तथैव च ॥ १२ ॥
रोमराजिं स्वरं वर्णं ग्रीवां नासादयस्तथा ॥
एतत्सर्वं परीक्षेत सामुद्रिकविदार्यकः ॥ १३ ॥

अर्थ— हात, पाय, बोटें, नखें, हातावरील रेखा, पायाच्या पोटऱ्या, कंबर, नाभि, मांड्या, पोटाचा भाग, स्तन, कान, दोनी भुजा, वक्षस्थल, कपाळ, मस्तक, केश, अंगावरील केश, स्वर, वर्ण, कंठदेश, नाक, वगैरे सर्व अवयवांची सामुद्रिक शास्त्रज्ञाकडून नीट परीक्षा करवावी.

कन्येचीं शुभाशुभलक्षणें

पादौ समाङ्गुली स्निग्धौ भूम्यां यदि प्रतिष्ठितौ ॥
कोमलौ चैव रक्तौ च सा कन्या गृहमण्डिनी ॥ १४ ॥

अर्थ— पाय सरळ बोटें असलेले असून तुळतुळीत, व भूमीवर साफ रहाणारे, मृदु आणि रक्तवर्ण जर असतील तर ती कन्या घराला शोभा आणणारी होईल.

अङ्गुष्ठेनातिरक्तेन भर्तारं चैव मन्यते ॥
अल्पवृत्तः पतिं हन्याद्बहुवृत्तः पतिव्रता ॥ १५ ॥

अर्थ— पायाचा अंगठा जर अतिशय रक्तवर्ण असेल तर ती पतीला मान्य होते. थोडासा वर्तुलाकृति ( लांबट वर्तुलाकृति ) असल्यास ती पतीचा नाश करणारी होते. आणि चांगला वर्तुलाकृति असेल तर ती कन्या पतिव्रता होते.

उन्नतैश्चन्द्रवत्सौख्यं मुसलैश्च तथैव च ॥

सूचितैः पद्मपत्रैश्च पुत्रवत्यः स्त्रियो मताः ॥ १६ ॥

अर्थ— पायांचीं बोटें चंद्राकार असून उंच असतील तर सुख होईल. मुसलाप्रमाणें सरळ सुंदर आणि कमलाच्या पानाप्राणें रक्तवर्ण असतील तर ती स्त्री पुत्रवती होईल.

चक्रं पद्मं ध्वजश्छत्रं स्वस्तिकं वर्द्धमानकम् ॥
यासां पादेषु दृश्यन्ते ज्ञेयास्ता राजयोषितः ॥ १७ ॥

अर्थ— चक्र, पद्म, ध्वज, छत्र, स्वस्तिक आणि वर्धमानक हीं चिन्हें ज्यांच्या पायांवर असतील त्या मुली राजस्त्रिया होणार असें समजावें.

यस्याः प्रदेशिनी चापि अङ्गुष्ठादधिका भवेत् ॥
दुष्करं कुरुते नित्यं विधवा वा भविष्यति ॥ १८ ॥

अर्थ— जिच्या पायाच्या अंगठ्याजवळचें बोट अंगठ्यापेक्षां लांब असेल ती स्त्री नेहमी दुष्कृत्य करणारी होईल. किंवा विधवा होईल.

यस्याः पादतले रेखा तर्जनीसुप्रकाशिनी ॥
भर्तारं लभते शीघ्रं भर्तुः प्राणप्रिया भवेत् ॥ १९ ॥

अर्थ— जिच्या पायाच्या तळव्यावर अंगठ्याजवळच्या बोटापाशी स्पष्ट दिसणारी रेघ असेल तिचा

विवाह लवकर होईल. आणि ती पतीला प्राणप्रिय होईल.

पादेऽपि मध्यमा यस्याःक्षितिं न स्पृशति यदि ॥
द्वौ पुरुषावतिक्रम्य सा तृतीये न गच्छति ॥ २० ॥

अर्थ— जिच्या पायांच्या बोटांतील मधलें बोट जमिनीवर टेकत नाहीं ती स्त्री दोन पुरुष सोडून तिसऱ्याशीं समागम करणार नाहीं. ( पति आणि जार हे दोन पुरुष )

अङ्गुल्यश्चाप्यतिक्रम्य यस्याः पादप्रदेशिनी ॥
कुमारी रमते जारैर्यौवने चैव का कथा ॥ २१ ॥

अर्थ— जिच्या पायांतील अंगठ्याजवळचें बोट बाकीच्या सर्व बोटांपेक्षां अधिक लांब असेल ती कुमारी असतानांच जाराशीं रममाण होते. मग तरुणी झाल्यावर तिची गोष्ट काय सांगावयाची आहे?

पादे मध्यमिका चैव उन्नता चाधिगच्छति ॥
वामहस्ते धरेज्जारं दक्षिणे तु पतिं पुनः ॥ २२ ॥

अर्थ— जिच्या पायांतील मधलें बोट उंच असेल ती डाव्या हातांत जार आणि उजव्या हातांत पति धारण करील. ह्मणजे स्पष्टपणें व्यभिचार करील.

पादेऽप्यनामिका यस्या महीं न स्पृशति यदि ॥

दुःशीला दुर्भगा चैव तां कन्यां परिवर्जयेत् ॥ २३ ॥

अर्थ— जिच्या पायाच्या बोटांपैकीं अनामिका नांवाचें बोट ( चवथें बोट ) जमिनीवर टेकत नाहीं, ती स्त्री दुस्स्वभावाची आणि दुर्दैवी होईल. ती वर्ज्य करावी.

यस्यास्त्वनामिका ऱ्हस्वा तां विदुः कलहप्रियाम् ॥
भूमिं न स्पृशते यस्याः खादते सा पतिद्वयम् ॥ २४ ॥

अर्थ— जिची पायाची अनामिका आंखूड असेल ती नेहमीं भांडण करणारी होईल. आणि ती अनामिका आंखूड असून जर जमिनीवर टेकत नसेल तर ती स्त्री दोन पतींना मारणारी होईल.

पादे कनिष्ठिका यस्या भूमिं न स्पृशते यदि ॥
कुमारी रमते जारे यौवने का विचारणा ॥ २५ ॥

अर्थ— जिच्या पायाचें शेवटचें बोट जमिनीवर टेकत नाहीं ती मुलगी असतानांच जाराशीं रममाण होईल. मग तिची तारुण्यांतील गोष्ट काय सांगावी?

उन्नता पार्ष्णिर्दुःशीला महापार्ष्णिर्दरिद्रता ॥
दीर्घपार्ष्णिरतिक्लिष्टा समपार्ष्णिः सुशोभना ॥ २६ ॥

अर्थ— पायाची टाच उंच असल्यास ती स्त्री दुःशीला निघते. मोठी असल्यास दरिद्री होते. लांबट

असल्यास क्लेश भोगणारी होते, आणि सारखी असल्यास स्त्री चांगली निघते.

अङ्गुष्ठैर्महिषाकारैर्बन्धनं कलहप्रिया ॥
निर्गूढगुल्फैर्या नारी सा नारी सुखमेधते ॥ २७ ॥

अर्थ— जिचे आंगठे रेड्याच्या आकाराचे असतात ती स्त्री नेहमीं कलहप्रिय असते, आणि ती पतीला बंधनाप्रमाणें जखडून टाकिते. जिच्या पायाचे घोटे बाहेर आलेले अगदीं दिसत नाहींत ती फार सुखी होते.

कूर्मपृष्ठं भगं यस्याः कृष्णं स्निग्धं सुशोभनम् ॥
धनधान्यवती चैव पुत्रान् सूते न संशयः ॥ २८ ॥

अर्थ— जिचें गुह्येंद्रिय कासवाच्या पाठीसारखें असून, तुळतुळीत, कृष्णवर्ण आणि सुशोभित असतें ती स्त्री धनधान्यसमृद्धीनें युक्त होते. व पुत्र प्रसवणारी होते.

गम्भीरनाभिर्या नारी सा नारी सुखमेधते ॥
रोमभिः स्वर्णवर्णैश्च निर्वृत्ता त्रिवलीयुता ॥ २९ ॥

अर्थ— जिची नाभी खोल असते, आणि जिच्या अंगावरील केश सोन्याच्या रंगाचे असतात व जिच्या उदरावर तीन वळ्या असतात ती स्त्री फार सुखी होते.

रक्तजिव्हा सुखा नारी मुसला च धनक्षया ॥

श्वेता च जनयेन्मृत्युं कृष्णा च कलहप्रिया ॥ ३० ॥

अर्थ— जिची जिव्हा रक्तवर्ण असते ती स्त्री सुख देणारी होते. मुसलासारखी जिव्हा असल्यास धनाचा नाश होतो. पांढरी असल्यास पतीला मृत्यु येतो, आणि काळी असल्यास स्त्री कलह करणारी होते.

श्वेतेन तालुना दासी दुःशीला कृष्णतालुना ॥
हरितेन महापीडा रक्ततालुः शुभांगना ॥ ३१ ॥

अर्थ— जिच्या टाळूचा रंग पांढरा असतो ती स्त्री दासी होते, काळा असल्यास दुःशीला होते. हिरवा असल्यास फार पीडा देणारी होते, आणि तांबडा असल्यास ती स्त्री सुलक्षणा निघते.

ललाटं त्र्यङ्गुलं यस्याः शिरोरोमविवर्जितम् ॥
निर्मलं च समं दीर्घमायुर्लक्ष्मीसुखप्रदम् ॥ ३२ ॥

अर्थ— जिचे कपाळ तीन बोटे रुंद असून केशरहित, स्वच्छ, सरळ आणि दीर्घ असते ती स्त्री दीर्घायु, संपत्तियुक्त आणि सुखी असते.

अतिप्रचण्डा प्रबला कपालिनी । विवादकर्त्री स्वयमर्थचोरिणी ॥
आक्रन्दिनी सत्तगृहप्रवेशिनी । त्यजच्च भार्यां दशपुत्रपुत्रिणीम् ॥ ३३ ॥

अर्थ— शरीराने ओबडधोबड असलेली, जिच्यामध्ये शक्ति फार आहे अशी, कपाळ फारच मोठें अस-

लेली, पतीशी वाद करणारी, स्वतः घरातील द्रव्य चोरणारी, मोठ्यानें ओरडणारी आणि रोज सात घरात हिंडणारी अशी भार्या-तिला दहा पुत्र होणारे असले तथापि- सोडून द्यावी.

पिङ्गाक्षी कूपगल्ला परपुरुषरता श्यामले चोष्ठजिह्वे ।
लम्बोष्ठी लम्बदन्ता प्रविरलदशना स्थूलजङ्घोर्ध्वकेशी ॥
गृध्राक्षी वृत्तपृष्ठिर्गुरुपृथुजठरा रोमशा सर्वगात्रे ।
सा कन्या वर्जनीया सुखधनरहिता निन्द्यशीला प्रदिष्टा ॥ ३४ ॥

अर्थ— डोळे पिंगट असणें, गालावर खळगे असणें, परकीय पुरुषावर प्रेम करणें, ओठ आणि जीभ काळी असणें, ओठ लांब असणें, दात लांब अथवा विरळ असणे, पायाच्या पिंढऱ्या मोठ्या असणें डोकीचे केश वर उभारलेले असणें, गिधाडाप्रमाणें डोळे असणें, पाठीला कुबड असणें, पोट मोठें आणि विस्तृत ( लांब ) असणें, सर्वांगावर केश असणें ही स्त्रियांची दुर्लक्षणें आहेत. ह्यांपैकीं कोणत्याही लक्षणानें युक्त असलेली कन्या वर्ज करावी. कारण, तशा प्रकारची कन्या सुख आणि संपत्ति ह्यांनीं रहित असते; आणि दुःशीला होते; असें आचार्यांनीं सांगितलें आहे.

विवाह करण्यास योग्य कन्या.

इत्थं लक्षणसंयुक्तां षडष्टराशिवर्जिताम् ॥

वर्णाविरुद्धसन्त्यक्तां सुभगां कन्यकां वरेत् ॥ ३५ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें वर जी सुलक्षणें सांगितलीं आहेत त्यांनी युक्त, पतीच्या जन्मराशीपासून जिची जन्म राश सहावी किंवा आठवी पडत नाही, जिचा वर्ण पतीच्या वर्णाशी विरुद्ध नाही अशा कन्येशीं विवाह करावा.

रूपवती स्वजातीया स्वतो लघ्वन्यगोत्रजा ॥
भोक्तुं भोजयितुं योग्या कन्या बहुकुटुम्बिनी ॥ ३६ ॥

अर्थ— रूपवती असून आपल्या जातींत उत्पन्न झालेली, आपल्यापेक्षां वयानें व शरीरानें लहान, भिन्नगोत्रांत उत्पन्न झालेली आणि जिचा परिवार पुष्कळ आहे अशी कन्या विवाह करण्यास योग्य होय असें समजावें.

सुतां पितृष्वसुश्चैव निजमातुलकन्यकाम् ॥
स्वसारं निजभार्यायाः परिणेता न पापभाक् ॥ ३७ ॥

अर्थ— बापाच्या बहिणीची मुलगी, आपल्या मावळ्याची मुलगी, आणि आपल्या बायकोची बहीण ह्या मुलींशी विवाह करणारा पातकी होत नाहीं. (ह्या कन्या विवाहाला योग्य होत)

अविवाह्यकन्या

पुत्री मातृभगिन्याश्च स्वगोत्रजनिताऽपि वा ॥
श्वश्रूस्वसा तथैतासां वरीता पातकी स्मृतः ॥ ३८ ॥

अर्थ— आपल्या आईच्या बहिणीची मुलगी, आपल्या गोत्रांत उत्पन्न झालेली मुलगी, आणि आपल्या सासूची वहीण ह्या मुलींशीं विवाह करणारा वर पातकी समजावा.

यस्यास्तु न भवेद्भ्राता न विज्ञायेत वा पिता ॥
नोपयच्छेत तां प्राज्ञः पुत्रिकां धर्मशङ्कया ॥ ३९ ॥

अर्थ— जिला बंधु नाहीं, जिचा पिता कोण? हे माहिती नाहीं त्या मुलीशीं- धर्महानी होईल ह्मणून- विवाह करूं नये.

स्ववयसोऽधिकां वर्षैरुन्नतां वा शरीरतः ॥
गुरुपुत्रीं वरेन्नैव मातृवत्परिकीर्तिता ॥ ४० ॥

अर्थ— आपल्या पेक्षां वयानें अधिक, किंवा शरीरानें उंच अशी कन्या, आणि आपल्या गुरूची कन्या ह्यांच्याशीं विवाह करूं नये. कारण, त्या मातृसम आहेत.

विवाहकर्मांतील पाच अंगें.

वाग्दानं च प्रदानं च वरणं पाणिपीडनम् ॥

सप्तपदीति पञ्चाङ्गो विवाहः परिकीर्तितः ॥ ४१ ॥

अर्थ-- वाग्दान, प्रदान, ( मुलीला वस्त्रालंकार देणें ) वरण ( लग्नास सर्वांनीं संमति देणें ) पाणिपीडन ( वरानें वधूचें पाणिग्रहण करणें ) आणि सप्तपदी हीं विवाहाचीं पांच अंगें आहेत.

वाग्दान.

वाग्दानम्—विवाहमासतः पूर्वं वाग्दानं क्रियते बुधैः ॥
कलशेन समायुक्तं सम्पूज्य गणनायकम् ॥ ४२ ॥
"सान्निधौ द्विजदेवानां कन्या माम सुताय ते ॥
त्वयाऽद्य क्रियतामद्य सुरूपा दीयते मया ॥ ४३ ॥
पुत्रमित्रसुहृद्वर्गैः समवेतेन निश्चितम् ॥
कायेन मनसा वाचा सम्प्रीत्या धर्मवृद्धये ॥ ४४ ॥"

अर्थ— विवाह ज्या महिन्यांत व्हावयाचा असेल त्या महिन्याच्या पूर्वी कन्येच्या पित्यानें वाग्दान करावें. वाग्दान करावयाच्या वेळीं कलश आणि गणधर ह्यांची पूजा करावी. नंतर मुलीच्या पित्यानें वरपित्यास उद्देशून "सान्निधौ द्विजदेवानां" इत्यादि दोन श्लोक म्हणून त्याची प्रार्थना करावी. त्या श्लोकांचें तात्पर्य असें—पुत्र, मित्र आणि माझ्यावर प्रेम करणारी इतर मंडळी ह्यांच्याशीं सहवर्तमान असलेला मी

आज देव आणि द्विज ह्यांच्या सान्निध रूपवती असलेली अशी माझी कन्या सद्धर्माची वृद्धि होण्याकारितां कायावाचामनें करून तुझ्या पुत्राला संतोषानें देत आहे. हा माझा निश्चय झालेला आहे. तूं आपल्या पुत्राकरितां माझ्या मुलीचा स्वीकार कर!

कन्या ते मम पुत्राय स्वीकृतेयं मयाऽद्य वै ॥
एतेषां सन्निधावेव मम वंशाभिवृद्धये ॥ ४५ ॥

अर्थ— मग वराच्या पित्यानें "कन्या ते" इत्यादि श्लोक ह्मणावा. त्याचें तात्पर्य—तुझी ही कन्या माझ्या पुत्राकरिता माझ्या वंशाची वृद्धि होण्याच्या हेतूनें ह्या सर्वांसमक्ष मी स्वीकारिली आहे.

सम्बन्धगोत्रमुच्चार्य दद्याद्वै कन्यकां पिता ॥
हस्ते पितुर्वरस्याथ ताम्बूलं साक्षतं फलम् ॥ ४६ ॥
दास्येऽहं तेऽद्य पुत्राय सुरूपां मम कन्यकाम् ॥
आसाद्य विवाहार्थं द्रव्यमाङ्गलिकानि च ॥ ४७ ॥
स्वीकृता मम पुत्राय मयाऽद्य तव पुत्रिका ॥
सफल साक्षतं दद्याद्यथाचारं परस्परम् ॥ ४८ ॥

अर्थ— नंतर कन्येच्या पित्यानें संबंध आणि गोत्र ह्यांचा उच्चार करून अक्षता तांबूल व फल ह्यांच्याशी

सहवर्तमान ती कन्या वरपित्याच्या हातीं द्यावी. आणि "दास्येऽहं" इत्यादि श्लोक म्हणावा. ( माझी ही रूपवती कन्या आज तुझ्या पुत्राला मी देतो. विवाहाकरितां तूं मंगलद्रव्यें संपादन कर! ) मग वरपित्यानें "स्वीकृता मम ( तुझी कन्या आज मी माझ्या पुत्राकरितां स्वीकारिली. " ) असें म्हणावें. नंतर जसा आचार असेल त्याप्रमाणें फल, अक्षता, तांबूल वगैरे एकमेकांनीं एकमेकास द्यावें. हा वाग्दानविधि सांगितला.

प्रदानविधि

अथ प्रदानम् ॥ कन्याया वरणात्पूर्वं प्रदानं चैव कारयेत् ॥
सम्पूज्य कन्यकां दद्याद्वस्त्रालङ्कारभूषिताम् ॥ ४९ ॥
प्रदानं पट्टकूलादि कर्णकण्ठादिभूषणम् ॥
लब्ध्वाऽऽशिषोऽथ विप्रेभ्यस्तेभ्यो दद्यात्फलानि च ॥ ५० ॥

अर्थ— कन्यावरणविधि होण्याच्या पूर्वी प्रदानविधि करावा. हा विधि वरपित्यानें करावा. त्यानें वस्त्रालंकारानें भूषित असलेल्या कन्येचें पूजन करून तिला पट्टवस्त्र ( पैठणी वगैरे उंची वस्त्र ), गळ्यांत कानांत वगैरे घालण्याचे अलंकार द्यावेत. नंतर ब्राह्मणांपासून आशीर्वाद ग्रहण करून, त्यांना तांबूल फल वगैरे द्यावें.

वरणविधि

अथ वरणम्– प्रार्थयेद्गुणसम्पूर्णान् मधुपर्केण पूजितः ॥
मदर्थं वृणीध्वं कन्यामिति दत्वा च दक्षिणाम् ॥ ५१ ॥
गोत्रोद्भवस्य गोत्रस्य सम्बन्धस्यामुकस्य च ॥
नप्त्रे पौत्राय पुत्राय ह्यमुकाय वराय वै ॥ ५२ ॥
कन्याया अपि गोत्रस्य यथापूर्वमुदुच्चरेत् ॥
नप्त्रीमथ च पौत्रीं च पुत्रीं कन्यां यथाविधि ॥ ५३ ॥
कन्यासमीपमागत्य ब्राह्मणैः सह वै पिता ॥
इत्युक्त्वा भो द्विजा यूयं वृणीध्वं कन्यकामिमाम् ॥ ५४ ॥
प्रत्यूचुः सज्जनाः सर्वे वयं चैनां वृणीमहे ॥
सुप्रयुक्तेति सूक्तं वै जपेयुः सज्जनास्ततः ॥ ५५ ॥

अर्थ— मग कन्यावरणविधि करावा. मधुपर्कानें ज्याची पूजा केली आहे अशा वरानें सदाचार संपन्न असलेल्या ब्राह्मणाना दक्षिणा देऊन "मदर्थं कन्यां वृणीध्वं," ह्मणजे माझ्याकरितां ह्या कन्येला तुह्मी कबूल करा अशी प्रार्थना करावी. मग कन्येच्या पित्यानें कन्येजवळ येऊन "अमुकगोत्रांत उत्पन्न झालेला, अमुक नांवांच्या मनुष्याचा पणतु, अमुक नांवाच्याचा नातु, अमुक नांवाच्याचा पुत्र,

अमुक्या नांवाचा हा जो वर त्याच्या करितां; अमक्या गोतांत उत्पन्न झालेली, अमक्याची पणती अमक्याची नात, अमक्याची मुलगी, अमुक नांवाची जी ही कन्या तिला, हे ब्राह्मण हो! तुह्मी कबूल करा!! " असें ह्मणावें. नंतर सर्वांनीं " वृणीमहे ह्मणजे आह्मी कबूल करतो " असें ह्मणावें. मग त्यांनीं 'सुमयुक्त' हें सूक्त पठण करावें. हा कन्यावरणाविधि सांगिला. ( ह्यांत 'अमुक' शब्दाचे ठिकाणीं त्यांचीं त्यांचीं नांवें घ्यावींत. )

पाणिपीडनविधि

धर्मे चार्थे च कामे च युक्तेति वरिता त्वया ॥
इयं गृण्हाति पाणिभ्यां पाणीति पाणिपीडनम् ॥ ५६ ॥

अर्थ—धर्म, अर्थ आणि काम ह्या तिन्ही पुरुषार्थांच्या ठिकाणीं ही योजली आहे असें समजून तूं वरलेली ही तुझी पत्नी, आपल्या हातांनी तुझे हात धरित आहे, असें वरास सांगावें हा पाणिपीडनविधि सांगितला.

सप्तपदीविधि

अभ्युक्तामयतीशान्यां वधूं सप्तपदानि तु ॥
साऽभ्युक्ता समयेत्पूर्वं दक्षिणं पादमात्मनः ॥ ५७ ॥
इति प्रसज्ञातपञ्चांगविवाहः सम्प्रदर्शितः ॥

अर्थ— भोजन न केलेल्या वधूला पतीनें ईशान्यदिशेकडे सात पावलें नेणें आणि तिनें आपला उजवा पाय प्रथम पुढें टाकून सात पावलें जाणें ह्यास सप्तपदीविधि ह्मणतात. ह्याप्रमाणें प्रसंगानें पंचांगयुक्तविवाह कसा होतो तें सक्षेपानें सांगितलें. आतां पुढें विस्तारानें सांगतों.

विशेषविधि अंकुरारोपण

विवाहस्याथ पूर्वेद्युराचार्यो बन्धुसंयुतः ॥ संस्नातो धौतवस्त्राढ्यो ग्रहयज्ञं प्रकल्पयेत् ॥ ५८ ॥ विवाहाहस्तु पूर्वाह्णे वरं संस्नाप्य भूषणैः ॥ वस्त्रैश्च भूषयेद्रम्यैर्निशाचूर्णाद्यलङ्कृतम् ॥५९॥ सौभाग्यवनिताभिश्च सह माता वरस्य वा ॥ घटद्वयं स्वयं धृत्वा वाद्यैर्गच्छेज्जलाशयम् ॥ ६० ॥ फलगन्धाक्षतैः पुष्पैः सम्पूज्य जलदेवताः ॥ घटान् भृत्वा जलैर्धृत्वा मूर्ध्नि गच्छेज्जिनालयम् ॥ ६१ ॥ तथाऽऽनीतमृत्तिकायां वपेद्बीजानि मङ्गलैः ॥ घटं संस्थाप्य वेद्यग्रे शुभद्रव्यैः समर्चयेत् ॥ ६२ ॥ वेद्यां गृहाधिदेवं संस्थाप्य दीपं प्रज्वालयेत् ॥ साश्मानं दृपदं न्यस्येत्तत्पुरस्तन्तुभिर्वृताम् ॥ ६३ । गुडजीरकसामुद्रहरिद्राक्षतपुञ्जकान् ॥ पृथक्पञ्च तथा कन्या गृहेऽप्येष विधिर्भवेत् ॥ ६४ ॥ इत्यङ्कुरविधानम् ॥

अर्थ— विवाह करण्याचा मुहूर्त ज्या दिवशीं निश्चित झाला असेल त्याच्या पूर्वदिवशीं गृहस्थाचार्यानें

स्नान करून शुद्ध वस्त्रें धारण करून, ब्राह्मणांशीं सह ग्रहयज्ञ करावा. त्या दिवशी प्रातःकाली वराला हळद लावून मंगल स्नान घालून वस्त्रालंकारांनी सुभोभित करावें. वराच्या मातेनें सुवासिनी स्त्रिया आपल्या बरोबर घेऊन, स्वतः दोन कलश घेऊन वाजतगाजत एका जलाशयावर जावें. आणि त्या ठिकाणीं फल, गंध, अक्षता, फुलें ह्यांच्या योगानें जलदेवतांचें पूजन करून ते दोनी कलश पाण्यानें भरून आपल्या मस्तकावर घेऊन जिनालयांत गमन करावें. येतानां बरोबर थोडी शुद्ध मृत्तिका आणलेली असावी. त्या मृत्तिकेंत धान्याचे बीज पेरावें. आणि एका कलशांतील पाणी त्या मृत्तिकेवर घालून दुसरा कलश वेदीच्या आग्रभागी ठेवून त्याचे मंगलद्रव्यांनीं पूजन करावें वेदीवर आपल्या कुलदेवतेची स्थापना करून तिच्यापुढे दीप लावून ठेवावा. दगडाचा पाटा आणि वरवंडा ह्या दोनीला सुतानें गुंडाळून ते वेदीच्या आग्रभागी ठेवावेत. आणि त्यांच्यावर गूळ, जिरे, मीठ, हळद आणि तांदूळ ह्यांचे पांच निरानिराळे पुंज घालावेत. ह्या सर्व विधीस अंकुरविधान ह्मणतात. हा विधि कन्येच्या घरीही करावा.

त्या दिवशींचें वराचे कृत्य

वरः स्नानादियुक् पश्चात्स्वस्तिवाचनपूर्वकम् ॥
होमं विधाय भुञ्जीत पित्राचार्यादिसंयुतः ॥ ६५ ॥

अर्थ— नंतर स्नान वगैरे करून बसलेल्या वरानें त्याच दिवशी पुण्याहवाचन करून ग्रहयज्ञ करावा.

आणि आपला पिता, आचार्य वगैरे मंडळींशीं भोजन करावें.

वराचें वधूगृहीं गमन

अपरेद्युः कृतस्नानो धौतवस्त्रधरो वरः ॥
स्वलङ्कृतः सितच्छत्रपदातिजातिबान्धवैः ॥ ६६ ॥
धृतो वधूगृहं गच्छेद्वाद्यवैभवगर्जितः ॥
नीयमानो नरैः प्रीत्या तत्रस्थैः कन्यकाश्रितैः ॥ ६७ ॥
तण्डुलादिभिराकीर्णे चन्द्रोपकादिभूपिते ॥
पवित्रे श्वशुरावासे सज्जनैर्निवसेद्वरः ॥ ६८ ॥
गमागमाक्रिया सर्वा विधेया वनितादिभिः
देशकुलानुसारेण वृद्धस्त्रीभिर्निरूपिता ॥ ६९ ॥

अर्थ— दुसऱ्या दिवशीं ( विवाहाच्या दिवशीं ) वरानें स्नान करून शुद्धवस्त्रें व अलंकार धारण करून, शुभ्रवर्ण छत्र धारण करून आपल्या जातिबांधवांसहवर्तमान मंगलवाद्याचा घोष पुढें सुरू करून वधूच्या घरीं जावें. त्यावेळीं वधूच्या घरच्या मंडळींनीं त्याला सामोरे येऊन घेऊन जावें. तंडुलादि मंगलद्रव्यें ज्यांत पसरलीं आहेत व जें शुभ्रवर्ण छत देऊन सुशोभित केलें आहे अशा आपल्या श्वशुराच्या

घरांत वरानें प्रतिष्ठित लोकांशीं सह प्रवेश करून बसावें. ह्या जाण्यायेण्याच्या कामांत स्त्रियाही असव्यात. आणि तो व्यवहार वृद्धस्त्रिया सांगतील त्याप्रमाणें देशाचार आणि कुलाचार ह्याला अनुसरून करावा.

विवाहाचे आठ प्रकार

विवाहभेदाः— ब्राह्मो दैवस्तथा चार्षः प्राजापत्यस्तथाऽऽसुरः ॥
गान्धर्वो राक्षसश्चैव पैशाचश्चाष्टमोऽधमः ॥ ७० ॥

अर्थ— ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस आणि पैशाच असे विवाहाचे आठ भेद आहेत. त्यांचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें जाणावें.

ब्राह्मविवाह.

आच्छाद्य चार्हयित्वा च व्रतशीलवते स्वयम् ॥
आहूय दानं कन्याया ब्राह्मो धर्मः प्रकीर्तितः ॥ ७१ ॥

अर्थ— व्रतें आणि शील ह्यांनीं युक्त असलेल्या वराला आपण आपल्या घरीं बोलावून आणून त्याला वस्त्रें देऊन व त्याची पूजा करून जें कन्यादान केलें जातें त्यास ब्राह्मविवाह ह्मणतात.

दैवविवाह.

यज्ञे तु वितते सम्यक् जिनार्चाकर्म कुर्वते ॥

अलंकृत्य सुतादानं दैवो धर्मः प्रचक्ष्यते ॥ ७२ ॥

अर्थ— मोठ्या यज्ञात यथाविधि जिनपूजा करणाऱ्याला अलंकार घालून कन्यादान करणें ह्याला दैवविवाह ह्मणतात.

आर्षविवाह

एकं वस्त्रयुगं द्वे वा वरादादाय धर्मतः ॥
कन्याप्रदानं विधिवदार्षो धर्मः स उच्यते ॥ ७३ ॥

अर्थ— वरापासून एक किंवा दोन वस्त्रयुग्में ( धोतरजोडे ) घेऊन त्याला धर्माप्रमाणें यथाविधि कन्यादान करणे ह्याला आर्षविवाह ह्मणतात.

प्राजापत्यविवाह.

सहोभौ चरतां धर्ममिति त चानुभाष्य तु ॥
कन्याप्रदानमभ्यर्च्य प्रजापत्यो विधिः स्मृतः ॥ ७४ ॥

अर्थ— ‘तुह्मी दोघे एकमेकाबरोबर धर्माचरण करा!’ असे वराला सांगून त्याची पूजा करून जें कन्यादान केलें जातें, त्याला प्राजापत्यविवाह ह्मणतात.

आसुरविवाह

ज्ञातिभ्यो द्रविणं दत्वा कन्यायै चैव शक्तितः ॥
कन्यादानं यत्क्रियते चासुरो धर्म उच्यते ॥ ७५ ॥

अर्थ— मुलीच्या आप्तांना व मुलीला द्रव्य देऊन जें मुलीशीं विवाह करणें त्याला आसुरविवाह ह्मणतात.

गांधर्वविवाह.

स्वेच्छयाऽन्योन्यसंयोगः कन्यायाश्च वरस्यच ॥
गान्धर्वः स तु विज्ञेयो मैथुन्यः कामसम्भवः ॥ ७६ ॥

अर्थ— वर आणि वधू ह्यांचा एकमेकांच्या इच्छेनें जो समागम होतो त्याला गांधर्वविवाह ह्मणतात. हा विवाह कन्येच्या इच्छेनें होत असतो.

राक्षसविवाह.

हत्वा भित्वा च छित्वा च क्रोशन्तीं रुदतीं गृहात् ॥
प्रसह्य कन्याहरणं राक्षसो विधिरुच्यते ॥ ७७ ॥

अर्थ— मारामारी करून, एकमेकांची डोकी फोडून, हातपाय तोडून, रडत ओरडत असलेल्या कन्येला बलात्कारानें ओढून नेऊन विवाह करणें ह्याला राक्षसविवाह ह्मणतात.

पैशाचविवाह.

**सुप्तां मत्तां प्रमत्तां वा रहो यत्रोपगच्छति ॥**

**स पापिष्ठो विवाहानां पैशाचः कथितोऽष्टमः ॥ ७८ ॥ इत्यष्टौ विवाहाः ॥**

अर्थ— निजलेली, किंवा कैफानें धुंद झालेली अथवा वेडी झालेली अशा कन्येशीं कोणी नसतानां एकांतीं समागमकरणें ह्याला पैशाच विवाह ह्मणतात. हा विवाह अत्यंत निंद्य असल्यानें पातकी आहे. असें आठ विवाह सांगितले.

पहिल्या चार प्रकारच्या विवाहातील विशेषविधि

**कन्यादानं निशीथे चेद्वरायोपोषिताय च ॥**

**उपोषितः सुतां दद्यात् ब्राह्मादिषु चतुर्ष्वपि ॥ ७९ ॥**

अर्थ— कन्यादान जर रात्री करावयाचें असेल तर वरानें व कन्येच्या पित्यानें उपोषित असावें. कारण ब्राह्म, दैव, आर्ष, आणि प्राजापत्य ह्या चार प्रकारच्या विवाहांत कन्यादान करणाऱ्यानें उपोषित राहून उपोषित असलेल्या वरालाच कन्यादान करावें असें शास्त्रानें सांगितलें आहे.

दुसरें मत

**अन्यमतम्— कन्यदानं निशीथे चेद्दिवा भोजनमाचरेत् ॥**

**पुनः स्नात्वा जपेन्मन्त्रं पिता कन्यां प्रयच्छतु ॥ ८० ॥**

अर्थ— आता ह्याबद्दल दुसरें मत असे आहे की, कन्यादान जर रात्री व्हावयाचें असेल, तर कन्येच्या पित्यानें दिवसा भोजन करून कन्यादानाच्या वेळीं स्नान करून मंत्रजप करावा. आणि कन्यादान करावें.

भुक्त्वा समुद्वहेत्कन्यां सावित्रीग्रहणं तथा ॥
गान्धर्वासुरयोरेव विधिरेष उदाहृतः ॥ ८१ ॥

अर्थ— वरानें भोजन करून वधूशीं विवाह करावा; असें जें मत आहे, तो विधि गांधर्वविवाह आणि आसुरविवाह ह्यासंबंधाचा आहे असें समजावें.

कन्येचे बांधव.

पिता पितामहो भ्राता पितृव्यो गोत्रिणो गुरुः ॥
मातामहो मातुलो वा कन्याया बान्धवाः क्रमात् ॥ ८२ ॥

अर्थ— पिता, पितामह, भ्राता, चुलता, गोत्रजपुरुष, गुरु, मातामह, आणि मातुल हे कन्येचे बांधव क्रमानें समजावेत. हे कन्येचें दान करण्यास अधिकारी आहेत.

कन्यादान करणारा कोणी नसल्यास.

पित्रादिदात्रभावे तु कन्या कुर्यात्स्वयंवरम् ॥

इत्येवं केचिदाचार्याः प्राहुर्महति सङ्कटे ॥ ८३ ॥

अर्थ— पिता वगैरे वर सांगितलले जे कन्यादानाचे अधिकारी त्यापैकीं कोणीही नसल्यास कन्येनें आपला विवाह आपणच करावा असें कित्येक आचार्यांचें मत आहे. परंतु तें अतिसंकटसमयीं ग्राह्य समजावें.

विवाहविधि

अथ विवाहकर्म— कन्यायाः सदनं गच्छेत् मण्डपे तोरणान्विते ॥
कन्याया जननी वेगादागत्य पूजयेद्वरम् ॥ ८४ ॥

अर्थ— वराने वधूच्या घरीं गमन करावें. नंतर तोरणांनीं युक्त असलेल्या मंडपांत वधूच्या मातेनें येऊन वराची पूजा करावी.

कन्यापित्रादिभिर्दत्ते चोदुम्बरादिवृक्षकैः ॥
निर्मिते चासने सम्यक् सुदृष्ट्योपविशेद्वरः ॥ ८५ ॥

अर्थ— औदुंबर वगैरे वृक्षाच्या लाकडाचें केलेलें आणि वधूच्या पित्यानें दिलेलें जें आसन त्यावर वरानें नीट निरखून पाहून बसावें.

वरपूजन

ततः प्रक्षालयेत्पादौ वरस्यार्घ्यं विधाय च ॥

यज्ञोपवीतं मुद्रादिभूपा एवार्पयेद्वरे ॥ ८६ ॥

अर्थ— नंतर वधूच्या पित्यानें वराचे पाय धुवावेत. त्याला अर्घ्य, यज्ञोपवीत, मुद्रा (अंगठ्या) वगैरे अलंकार द्यावेत.

वधूपूजन

ततः पाद्यं समादाय कन्यकां सेचयेच्छनैः ॥
अर्घ्यदानं ततो दत्वा कन्यकामपि पूजयेत् ॥ ८७ ॥

अर्थ— नंतर पाद्य घेऊन (पाय धुण्याचे पाणी घेऊन) वधूच्या पायावर घालावे आणि तिला अर्घ्य द्यावें. त्याप्रमाणें वधूचीही पूजा करावी.

अर्घ्यदान

तद्वरोऽपि प्रदत्तार्घ्यमञ्जल्या (?)ऽऽदाय सादरम् ॥
निरीक्ष्याङ्गुलिरन्ध्रैस्तत्स्रावयेद्भाजने शनैः ॥ ८८ ॥

अर्थ— तें वधूच्या पित्यानें दिलेलें अर्घ्य वरानें आपल्या ओंजळींत आदरानें घेऊन, अवलोकन करून बोटांच्या संधीतून हळूहळू खाली भांड्यांत सोडावें.

आचमन

सन्नालपात्रसम्पूर्णपूतशीतलवारिणा ॥
तद्वन्निवेश्य दत्तेन कुर्यादाचमनं ततः ॥ ८९ ॥

अर्थ— नंतर वधूच्या पित्यानें- स्वच्छ अशा नालपात्रांत (गिंडी नांवाच्या भांड्यांत) भरून ठेवलेलें शुद्ध असें शीतोदक-त्यांत जीव आहेत कीं काय, हें नीट पाहून वराच्या हातावर आचमनाकरितां द्यावें, आणि वरानें त्या उदकानें आचमन करावें.

मधुपर्क.

कांस्यतालास्थितं त्यक्तकांस्यपात्रपिधानकम् ॥
प्राशयेन्मधुपर्कार्घं दधि तद्वत्समन्त्रकम् ॥ ९० ॥

अर्थ— नंतर काशाच्या पात्रात असलेलें व ज्यावरील काशाचें आच्छादनपात्र काढून टाकिलें आहे असें मधुपर्काचें दहिं वरानें समंत्रक प्राशन करावें.

ॐ ह्रीं भगवतो महापुरुषस्य पुरुषवरपुण्डरीकस्य परमेण तेजसा व्याप्तलोकस्य लोकोत्तरमङ्गलस्य मङ्गलस्वरूपस्य संस्कृत्य पादावर्घेनाभिजनेनानुकृत्याय उदवासितचत्वरेऽभ्यागतायाभियोगवयोमधुपर्काय समदत्तिसमन्वितायार्घ्यस्य पाद्यस्य विधिमासाद्य दध्यमृतं विश्राण्यते जामात्रे अमुष्मै

ॐ ॥ इति मन्त्रयेत् ॥

अर्थ— "ॐ ह्रीं भगवतो" इत्यादि मंत्रानें मधुपर्काचें अभिमंत्रण करावें.

ॐ नमोऽर्हते भगवते मुख्यमङ्गलाय प्रासामृताय कुमारं दध्यमृतं प्राशयामि झं वं ह्वः पः हः अ सि आ उ सा स्वाहा ॥ इति मधुपर्कमन्त्रः । त्रिः प्राशयेत् ॥

अर्थ— "ॐ नमोऽर्हते" इत्यादि मंत्रानें तीन वेळ मधुपर्काचें प्राशन करवावें.

वराला वस्त्रालंकारदान

मालाभरणवस्त्राद्यैरलङ्कृत्य वरं ततः ॥
कन्यापात्रे प्रदद्यात्तद्वस्त्रं तेन धृतं पुरा ॥ ९१ ॥

अर्थ— नंतर वधूच्या पित्यानें माला, अलंकार वस्त्रें वगैरेंनीं वराला अलंकृत करावें. आणि त्या वरानें पूर्वी धारण केलेलें वस्त्र वधूच्या भावाला द्यावें.

वधूला वस्त्रालंकारदान

वरानीतैस्तु सद्वस्त्रैर्भूषणैश्च स्रगादिभिः ॥
स्नातामभोजनां कन्यां पिताऽलङ्कारयेत्ततः ॥ ९२ ॥

अर्थ— तसेंच वरानें आणलेल्या वस्त्रें, भूषणें, माला वगैरे पदार्थांनीं स्नान केलेल्या आणि भोजन

न केलेल्या वधूस तिच्या पित्यानें अलंकृत करावी.

यज्ञोपवीतग्रहण

पुनराचमनं कृत्वा ताम्बूलाक्षतचन्दनैः ॥
यज्ञोपवीतवस्त्राणि स्वीकुर्याच्च वरोत्तमः ॥ ॥ ९३ ॥

अर्थ— वरानें नंतर आचमन करून वधूच्या पित्यानें दिलेल्या तांबूल, अक्षता, चंदन, यज्ञोपवीत वस्त्र ह्या वस्तूंचा स्वीकार करावा.

वस्त्रदानाचा मंत्र

भूयात्सुपद्मनिधिसम्भवसारवस्त्रं । भूयाच्च कल्पकुजकल्पितदिव्यवस्त्रम् ॥
भूयात्सुरेश्वरसमर्पितसारवस्त्रं । भूयान्मयाऽर्पितमिदं च सुखाय वस्त्रम् ॥९४॥ वस्त्रप्रदानमन्त्रः

अर्थ— ' भूयात्सुपद्मनिधि ' इत्यादि मंत्र वरास वस्त्र देणेचा आहे.

कन्याया मातुलस्तस्माद्वरं धृत्वा करेण वै ॥
गृहस्याभ्यन्तरं प्राप्य (?) कन्यामप्यानयेत्ततः ॥ ९५ ॥

अर्थ— नंतर वधूच्या मामानें वराच्या हाताला धरून वेदिकेच्या [ बहुलयाच्या ] जवळ न्यावें. नंतर कन्येलाही त्या ठिकाणीं त्यानेंच आणावी.

वेदिकाग्रे ततः कुर्यात्स्वस्तिकं स्थण्डिलान्वितम् ॥
पूर्वापरदिशो रम्यं तण्डुलपुञ्जकद्वयम् ॥ ९६ ॥

अर्थ— मग त्या वेदिकेच्या पुढल्या बाजूस स्थंडिलानें युक्त असें स्वस्तिक करावें, आणि त्यावर पूर्वेकडे एक आणि पश्चिमेकडे एक अशा दोन तांदुळांच्या राशि कराव्यात.

बहुल्यानें लक्षण

वेदीलक्षणम्— विस्तारितां हस्तचतुष्टयेन । हस्तोच्छ्रितां मन्दिरवामभागे ॥
स्तम्भैश्चतुर्भिः कृतनिर्मितांगां । वेदीं विवाहे प्रवदन्ति सन्तः ॥ ९७॥

अर्थ— आतां प्रसंगानें वेदीचें प्रमाण वगैरे सांगतात— विवाहांतील वेदी चार हात लांब, चार हात रुंद आणि एक हात उंच असावी. ती घराच्या डाव्या बाजूस असावी, आणि तिच्या चारी कोपऱ्यांवर चार खांब उभे केलेले असावेत.

अन्यमतं— कन्याहस्तैः पञ्चभिः सप्तभिर्वा । वेदीं कुर्यात्कूर्मपृष्ठोन्नताङ्गाम् ॥
रम्ये हर्म्ये कारयेद्वामभागे । जायापत्योराशिषो वाचयित्वा ॥ ९८ ॥

अर्थ— कन्येच्या हातानें पाच हात किंवा सात हात वेदी करावी. ती कांसवाच्या पाठीप्रमाणें मध्यभागीं उंच असावी, आणि घराच्या डाव्या हाताला असावी. असें दुसऱ्या आचार्यांचें मत आहे.

उपनयनातील वेदीचे लक्षण

व्रतबन्धवेदी- प्राक्पश्चिमोर्ध्वपदषट्कयुक्त- । मुदीच्ययाम्यानि पदानि पञ्च ॥
एवंविधा ज्योतिपरत्ननिर्मिता । बटोः शतायुर्भवतीह वेदिका ॥ ९९ ॥

अर्थ— आतां उपनयनाच्या वेदीचें प्रमाण सांगतात. उपनयनाची वेदी पूर्वपश्चिम सहा पावलें लांब असावी. आणि दक्षिणोत्तर पांच पावलें रुंद असावी. अशा प्रकारची ज्योतिषशास्त्रात सांगितल्याप्रमाणें वेदी केली असतां वटू शतायु होतो.

अन्यमतं- आचार्यस्य पदैः षड्भिः पंचभिर्वाऽथ सप्तभिः ॥
विस्तृता चतुरस्रा च बटोर्वेदी करोन्नता ॥ १०० ॥

अर्थ— उपनयनाच्या वेदीबद्दल दुसऱ्या आचार्यांचें मत असें आहे की, वेदी आचार्याच्या पावलानें सहा पांच किंवा सात पावलें लांबरुंद आणि वटूच्या हातानें एक हात उंच अशी चतुष्कोणी असावी.

लम्बा भित्तिर्द्विहस्ता च ह्युन्नता त्रिंशदङ्गुला ॥
प्रत्यक् वेद्या विवाहे च विस्तृता द्वादशांगुलम् ॥ १०१ ॥
अष्टावष्टौ प्रकुर्वीत सोपानान्यथ पार्श्वयोः ॥
तदग्रे कलशाकारामिति पूजाविदां मतम् ॥ १०२ ॥

अर्थः— त्या वेदीच्या पश्चिमेच्या अंगास एक भिंत दोन हात लांब, तीस बोटें उंच आणि बारा अंगुलें रुंद अशी घालावी. त्या भिंतीच्या दोही बाजूस आठ आठ पायऱ्या कराव्यात, आणि त्या भिंतीच्या शेवटास एक कलशाकार कळस करावा. असें पूजाशास्त्र जाणणाऱ्यांचें मत आहे.

पीठाचें ( पाटाचें ) प्रमाण

अथ पीठं- अष्टत्रिंशांगुलं दीर्घमुन्नतं स्यात्षडंगुलम् ॥
अष्टांगुलं च विस्तारं कुर्यादौदुम्बरादिना ॥ १०३ ॥

अर्थ— आता पीठाचें ( पाटाचें ) प्रमाण सांगतात. पीठ अडतीस अंगुलें लांब, सहा अंगुलें उंच आणि आठ अंगुलें रुंद असें उंबराच्या वगैरे काष्ठाचें करावें.

विवाहः स्याद्दिने यस्मिन्दिवा वा यदि वा निशि ॥
होमस्तत्रैव कर्तव्यो यथानुक्रमणेन तु ॥ १०४ ॥

अर्थ— विवाह दिवसा किंवा रात्रीं ज्या दिवशीं असेल त्याच दिवशीं अनुक्रमानें जशा प्राप्त होतील, त्याप्रमाणें क्रिया करून, होम त्याच दिवशीं करावा.

विवाहांत सप्तपदीची आवश्यकता

तावद्विवाहो नैव स्याद्यावत्सप्तपदी भवेत् ॥

तस्मात्सप्तपदी कार्या विवाहे मुनिभिः स्मृता ॥ १०५ ॥

अर्थ— सप्तपदी होईपर्यंत विवाह झाला असें होत नाहीं. म्हणून विवाहांत सप्तपदीचा विधि अवश्य केला पाहिजे; असें मुनींचें मत आहे.

विवाहहोमाच्या वेळीं कन्या ऋतुमती झाली असता.

विवाहहोमे प्रक्रान्ते कन्या यदि रजस्वला ॥
त्रिरात्रं दम्पती स्यातां पृथक्शय्यासनाशनौ ॥ १०६ ॥

अर्थ— विवाहहोम सुरूं झाल्यावर जर कन्या रजस्वला होईल, तर त्या वधूवरानें तीन दिवस शयन, आसन, भोजन हे व्यापार पृथक् पृथक् करावेत.

चतुर्थेऽहनि संस्नाता तस्मिन्नग्नौ यथाविधि ॥
विवाहहोमं कुर्यात्तु कन्यादानादिकं तथा ॥ १०७ ॥

अर्थ— चवथ्या दिवशीं तिनें स्नान केल्यावर पूर्वीच्या त्या अग्नीवर विवाहहोम यथाविधि करावा. आणि कन्यादान वगैरे जे विधि राहिले असतील तेही करावेत.

विवाहदिवसापासून चार दिवसात कन्या ऋतुमती झाली असता

चतुर्थी मध्ये कन्या चेद्भवेद्यदि रजस्वला ॥

त्रिरात्रमशुचिस्त्वेषा चतुर्थेऽह्नि शुध्यति ॥ १०८ ॥
पूजां न होमं कुर्वीत प्रायश्चित्त विधीयते ॥
जिन सम्पूजयेद्भक्त्या पुनर्होमो विधीयते ॥ १०९ ॥ इति प्रसंगाच्छेदिकादिलक्षणम् ॥

अर्थ— विवाह दिवसापासून चार दिवसात जर वधू रजस्वला होईल, तर ती तीन दिवस अशुद्ध असते, व चवथ्या दिवशी शुद्ध होते. म्हणून पूजा होमादिक विधि करूं नये. ती कन्या शुद्ध झाल्यावर प्रायश्चित्त केलें पाहिजे. त्याकरितां भक्तीनें जिनपूजा प्रथम करून मग विवाहहोम पुनः करावा असें दुसरें एक मत आहे.

उभयोः पार्श्वयोः काण्डसंयुक्त पुञ्जपञ्चकम् ॥
शाल्यादिपञ्चधान्यानां याचारकस्य सन्निधौ ॥ ११० ॥

अर्थ— वधूवरांच्या दोनी बाजूस काडाशीं सहवर्तमान भात वगैरे पांच धान्यांचे पांच ढीग घालावेत.

पूर्वोक्तराश्योर्मध्ये च तथोपरि सुवस्त्रकम् ॥
पटं प्रसार्य ते तत्र चानयेद्वरकन्यके ॥ १११ ॥

अर्थ— नंतर पूर्वी सांगितलेल्या ज्या तांदळांच्या दोन राशि, त्यांच्या मध्यभागीं चांगलें वस्त्र उभें पसरून ( अंतःपट धरून ) त्या ठिकाणीं त्या वधूवरांना आणावें.

अंतःपट धरल्यावर वधूवरांनीं उभें रहाणें वगैरे

पूर्वदिक्ताण्डुलिराशौ प्रत्यङ्मुखा हि कन्यका ॥
प्राङ्मुखः पश्चिमे राशाववतिष्ठति सद्वरः ॥ ११२ ॥
गुर्वादिसज्जनैः स्तोत्रं पठनीयं जिनस्य वै ॥
मङ्गलाष्टकमित्यादि कल्याणसुखदायकम् ॥ ११३ ॥
कन्याया वदनं पश्येद्वरो वरं च कन्यका ॥
शुभे लग्ने सतां मध्ये सुखप्रीतिप्रवृद्धये ॥ ११४ ॥
सगुडान् जीरकानास्ये ललाटे चन्दनाक्षतान् ॥
कण्ठे मालां क्षिपेत्तस्याः साऽपि तस्य तदा तथा ॥ ११५ ॥

अर्थ— मग पूर्वेकडील तांदळाच्या राशीवर पश्चिमेकडे तोंड करून वधूस व पश्चिमेकडील तांदळाच्या राशीवर पूर्वेकडे तोंड करून वरास उभें करावें. नंतर गुरु वगैरे सद्गृहस्थांनी जिनस्तोत्र मंगलाष्टक वगैरे पठण करावें. हीं स्तोत्रें व मंगलाष्टकें वधूवराना कल्याण आणि सुख ह्यांची प्राप्ति करून देणारी असतात. हें झाल्यावर शुभ मुहूर्तावर अंतःपट काढून वधूवरांनीं परस्परांचें सुख आणि प्रीति ह्यांच्या वृद्धीकरितां एकमेकांचें मुखावलोकन करावें. मग वरानें वधूच्या मुखांत गूळ आणि जिरे घालावेत. तिच्या कपाळाला गंध आणि अक्षता लावाव्यात. आणि तिच्या गळ्यांत फुलांची माळ घालावी. वधूनेंही वरास त्याप्रमाणेंच सर्व करावें.

कन्यावरण व कन्यादानविधि.

एतद्गोत्रे प्रजातस्यैवैतन्नाम्नः प्रपौत्रकः ॥ अस्य पौत्रोऽस्य पुत्रश्चाप्येतदाख्योऽहमित्यथ ॥ ११६ ॥ एतद्गोत्रे प्रजातस्यैवैतन्नाम्नः प्रपौत्रिकाम् ॥ पौत्रीमस्यास्य पुत्रीमप्येतदाख्यामिमां वृणे ॥ ११७ ॥ इति रूप्याचतुर्थी च प्रपौत्रादिपदे स्वके ॥ प्रयोज्य प्रददेत्कन्यां वरणे समये वरः ॥ ११८ ॥ स्वपक्षं पूर्वमुक्त्वैवमपरं च वदन्वदेत् ॥ त्वं वृणीष्वेति वा तुभ्यं प्रयच्छामीति मातुलम् ॥ ११९ ॥ दक्षिणं पाणिमेतस्याः ससुवर्णाक्षतोदकम् ॥ पित्रा समन्त्रकं दत्तं गृह्णीयात्स प्रयत्नतः ॥ १२० ॥ धर्मेण पालयेत्यादि कन्यापितरि वक्तरि ॥ धर्मेणार्थेन कामेन पालयामीत्यसौ वदेत् १२१

अर्थ— आतां कन्यावरणाचा व कन्यादानाचा विधि सांगतात. कन्यावरणाच्या वेळीं वरानें प्रथम— " अमक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमक्याचा पणतु, आमक्याचा नातु अमक्याचा पुत्र, अमुक नांवाचा मी; अमक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमक्याची पणती, आमक्याची नात, अमक्याची कन्या, अशा अमुक नांवाच्या ह्या कन्येस वरतों—असें ह्मणावें. मग वधूच्या पित्यानें " त्वं वृणीष्व " ह्मणजे तूं वर, किंवा " तुभ्यं प्रयच्छामि ह्मणजे तुला देतों " असें ह्मणावें. नंतर वरपक्षाकडील मातुल वगैरे मंडळींनीं—अमक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमुक पुरुषाचा पणतु, आमक्याचा नातु, अमक्याचा पुत्र, अमुक नांवाचा हा

जो वर त्याच्याकरितां; अमक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमक्याची पणती, अमक्याची नात, अमक्याची कन्या, अमुक नांवाची जी ही वधू तिला आम्ही वरतों—असें ह्मणावें. त्यास वधूपक्षाच्या मंडळींनीं "वरा" असें उत्तर द्यावें. ह्याप्रमाणें तीन वेळ करावें. नंतर वधूपक्षाकडील मंडळींनीं पुढें सांगितल्याप्रमाणें अमक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमक्याची पणती, अमक्याची नात, अमक्याची कन्या, अमुक नांवाची जी ही वधू तिला तुह्मीं वरा असें ह्मणावें. त्याला वराकडील मंडळींनें 'वरतों' असें उत्तर द्यावें. ह्याप्रमाणें तीन वेळ करावें. मग, वधूच्या पित्यानें सुवर्ण अक्षता आणि उदक ह्यासह वधूचा उजवा हात वराच्या हातात देऊन कन्यादान करावें. नंतर त्यानें वरास "ह्या वधूचें धर्मानें, अर्थाच्या योगानें आणि कामाच्या योगानें (इच्छित पूर्ण करण्यानें) तूं पालन कर" अशी प्रार्थना करावी. वरानें "मी धर्मानें, अर्थानें व कामानें हिचें रक्षण करतों" असें प्रतिवचन द्यावें.

कन्यावरण मंत्र.

ॐ एकेन प्रकाश्येन पूर्वेण पुरुषेण श्रीवत्सेन ऋषिणा प्रतीते श्रीवत्स-
गोत्रे प्रजाताय तस्य प्रपौत्राय तस्य पौत्राय तस्य पुत्राय देवदत्तनाम-
धेयाय अस्मै कुमाराय भवतः कन्यां वृणीमहे इति वरसम्बन्धिभिस्त्रिः
प्रार्थनीयम् ॥ तदा कन्यासम्बन्धिभिर्वृणीध्वमिति त्रिः प्रतिवक्तव्यम् ॥

ततः एकेन प्रकारेण पूर्वेण पुरुषेण काश्यपेन ऋषिणा प्रतीते काश्यपगोत्रे प्रजातां तस्य प्रपौत्रीं तस्य पौत्रीं तस्य पुत्रीं देवदत्तानामधेयां इमां कन्यां वृणीध्वं इति कन्यास्वामिभिस्त्रिर्वक्तव्यम् ॥ तदा वरस्वामिभिर्वृणीमहे इति प्रतिवक्तव्यम् ॥ इति कन्यावरणमन्त्रः ॥

अर्थ— "ॐ एकेन" इत्यादि कन्यावरणाचे मंत्र आहेत. त्यांत प्रथम वरपक्षाच्या मंडळींनीं "ॐ एकेन" येथपासून "वृणीमहे" येथपर्यंत म्हणावें. त्याला वधूपक्षाच्या मंडळींनीं तुम्ही "वृणीध्वं" असें उत्तर द्यावें. याप्रमाणें तीन वेळ करावें. नंतर वधूपक्षाच्या मंडळींनीं "ॐ एकेन" येथपासून "वृणीध्वं" येथपर्यंत म्हणावें. नंतर वरपक्षाच्या मंडळींनीं तुम्ही "वृणीमहे" असें उत्तर द्यावें. यास कन्यावरणविधि म्हणतात.

कन्याप्रदानमंत्र

ततश्च कन्यापिता— ॐ नमोऽर्हते भगवते श्रीमते वर्द्धमानाय श्रीबलायुरारोग्यसन्तानाभिवर्धनं भवतु । इमां कन्याममुष्मै कुमाराय ददामि क्ष्वीं क्ष्वीं क्ष्वीं हं सः स्वाहा ॥ इत्यनेन गन्धोदकधारापूर्वकं कन्याप्रदानं कुर्यात् ॥

अर्थ— नंतर वधूच्या पित्यानें "ॐ नमोऽर्हते" इत्यादि मंत्र ह्मणून पूर्वी सांगितल्याप्रमाणें सुवर्ण, अक्षता आणि उदक ह्यांसहवर्तमान कन्येचा उजवा हात वराच्या उजव्या हातांत देऊन वराच्या हातावर गंधोदकाची धार सोडून कन्यादान करावें. कन्यादान विधि.

वर्धापनविधि.

ततश्च कुलवानिता दम्पतीपरस्परहस्तपूर्णाक्षतपुञ्जं मस्तके त्रिवारं क्षेपयेत् । मन्त्राः । ॐ ह्रीं सम्यग्दर्शनाय स्वाहा ॥ ॐ ह्रीं सम्यग्ज्ञानाय स्वाहा ॥ ॐ ह्रीं सम्यक्चारित्राय स्वाहा ॥ इति वर्धापयेत् ॥

अर्थ— नंतर कोणीतरी कुलीन सुवासिनीनें त्या दंपत्याच्या एकमेकांच्या हातांतील अक्षता परस्परांच्या मस्तकावर तीन तीन वेळ टाकवाव्यात. त्याचे मंत्र वर सांगितले आहेत. ह्यास वर्धापन ह्मणतात. ह्याचा विधि पुढें लिहिल्याप्रमाणें करावा.

वर्धापनविधींतील कर्म.

साज्यदुग्धार्द्रपाणिभ्यां वरस्तत्कन्यकाञ्जलिम् ॥
द्विरुन्मृज्य ततस्तत्र द्विः क्षिप्त्वा धवलाक्षतान् ॥ १२२ ॥
साक्षतं स्वाञ्जलिं तत्र कन्यापित्रा निषेचितम् ॥

शान्त्याशीर्भिरिदं तु स्यात्पित्रा मूर्ध्नि च वाचना ॥ १२३ ॥

मूर्ध्नि तण्डुलनिक्षेपः स्याद्रत्नत्रयमन्त्रतः ॥

कन्याऽप्येवं द्विस्त्रिरुच्य मूर्ध्नि क्षेपान्तमाचरेत् ॥ १२४ ॥

अर्थ—प्रथम वरानें आपल्या दोनी हातांस तूप व दूर लावून ते हात दोन वेळा वधूच्या ओंजळीस पुसावेत. नंतर त्या ओंजळींत स्वच्छ पांढऱ्या अक्षता घालाव्यात. नंतर वधूच्या पित्यानें वराच्या ओंजळीस तूप, दूर लावून त्यांत दोन वेळां अक्षता घालाव्यात. याप्रमाणें झाल्यावर शांतिमंत्रानें किंवा आशीर्वादमंत्रानें वरानें वधूच्या मस्तकावर आपल्या ओंजळींतील अक्षता टाकाव्यात. नंतर वधूनें आपल्या ओंजळीतील अक्षता वराच्या मस्तकावर टाकाव्यात. याप्रमाणें तीन वेळ वरानें केल्यावर वधूनें प्रथम वराच्या ओंजळीस दूर तूप लावून त्यांत अक्षता घालाव्यात. नंतर वधूच्या पित्यानें वधूच्या ओंजळीस दूर तूप लावून त्यात अक्षता घालाव्यात. मग वधूनें शांतिमंत्रानें किंवा आशीर्वादमंत्रानें प्रथम वराच्या मस्तकावर अक्षता टाकाव्यात. नंतर वरानें वधूच्या मस्तकावर अक्षता टाकाव्यात. याप्रमाणें तीन वेळ करावें. या क्रियेंत शांतिमंत्र किंवा आशीर्वादमंत्र याची योजना करणेस वर सांगितलेंच आहे; तसें करावें. किंवा रत्नत्रयमंत्राची योजना करावी. ते मंत्र वर दिलेलेच आहेत. हा वर्धापनविधि सांगितला.

कंकणबंध.

अथ कंकणम्— त्रिस्त्रिरावेष्टितं सूत्रं नाभिदघ्नेऽनयोः पृथक् ॥
ऊर्ध्वं चाधः समादाय कृत्वा पञ्चगुणं ततः ॥ १२५ ॥
हरिद्राकल्कमालिप्य वलित्वा तत्करेऽर्पयेत् ॥
मदनफलमन्यं वा मणिं सूत्रेण योजयेत् ॥ १२६ ॥
वाद्यैर्मन्त्रैः समायुक्तं सौवर्णं राजतं पिता ॥
ताभ्यां तौ कंकणं हस्ते बध्नीयातां मिथः क्रमात् ॥ १२७ ॥

अर्थ— आतां कंकणाचा विधि सांगतात– वधूवराच्या नाभिप्रदेशाजवळ त्यांच्या दोघांच्या भोंवतीं सुताचे तीन तीन वेढ्याचे दोन फेर करावेत. त्यांत वरील फेर खालीं आणि खालचा फेर वरतीं घेऊन, खालीं घेतलेला फेरे पायांखालून काढून घ्यावा, व वर घेतलेला फेर त्याच्या मस्तकांवरून काढून घ्यावा. नंतर तो प्रत्येक फेर पंचगुण ( पाच पदरी ) करावा. ( ह्यांतील एकेक पदरांत सुताचे दोरे सहा सहा येतात. ह्मणून त्या एकंदर पंचगुण केलेल्या दोऱ्यांत सुताचे पदर तीस येतात. ही गोष्ट लक्षांत आणावी ) नंतर त्या सुताला पाण्यात कालविलेली हळद लाऊन तें वळून त्या वधूवरांच्या हातांत द्यावें, आणि त्यांच्याकडून त्या सुतात गेळफळ किंवा एखादा सोन्याचा अथवा रुप्याचा मणि बांधवून तें एकमेकांकडून

एकमेकांच्या हातात बांधावें. त्यांत प्रथम वधूनें वराच्या हातांत कंकण बांधावें, आणि नंतर वरानें वधूच्या हातांत बांधावें.

कंकणबंधन मंत्र

अथ मन्त्रः । ॐ जायापत्योरेनयोर्गृहीतपाण्योरेतस्मात्परमा चतुर्थदिवसादाहोस्विद्वा सप्तमाद्दिज्यापरमस्य पुरुषस्य गुरूणामुपास्तिर्देवतानामर्थेनाऽग्निहोत्रं सत्कारोऽभ्यागतानां विश्राणनं वनीपकानामित्येवं विधातुं प्रतिज्ञायाः स्थलकंकणं सूत्रव्यपदेशभाक् रजनीसूत्रं मिथो मणिबन्धे प्रणह्यते॥ कंकणसूत्रबन्धनमन्त्रः

अर्थ— " ॐ जायापत्योरेतयोः " या मंत्रानें वधूवरांनी एकमेकांच्या मनगटांत कंकण सूत्र बांधावें. [ वर्णापनविधि आणि कंकणबंधनविधि यासंबंधानें कित्येक पुस्तकांत प्रथम कंकणबंधन करून नंतर वर्णापन करावें असाही पाठ आहे. तथापि ज्या देशांत जशी रूढी असेल त्याप्रमाणें त्यांनी करावें. ]

विवाहहोमविधि

यज्ञवस्त्रान्वितौ तौ च वीक्ष्य पूर्णघटद्वयम् ॥ कुण्डात्प्रत्यग्दिशयागत्यो-
पविशेतां समासने ॥ १२८ ॥ नूतनौदुम्बरे पीठे धौतवस्त्रप्रसारिते ॥
वामदक्षिणयोः प्रत्यक् प्राङ्मुखौ तौ सुदम्पती ॥ १२९ ॥ उपाध्याय-

स्ततः कुर्याद्धोमं सन्मन्त्रपूर्वकम् ॥ महावाद्यनिनादेन मङ्गलाष्टकपा-
ठतः ॥ १३० ॥ कन्याया दक्षिणं पाणिं सांगुष्ठं सव्यपाणिना ॥ गृहीत्वा
चाथ वामस्थां कृत्वाऽथाहुतीर्हुनेत् ॥ १३१ ॥ पुरस्ताद्वरवध्वोश्च स्थापनां
कुरु पत्रिकी (?) ॥ ततश्च होमकुण्डाग्रे सङ्कल्पः सूरिणोच्यते ॥ १३२ ॥

अर्थ— नंतर ज्यांच्या एकमेकांच्या वस्त्रांना गांठीं मारल्या आहेत अशा त्या दंपत्यानें पूर्वी स्थापन केलेल्या दोन पूर्णकलशांचें दर्शन करून अग्निकुंडाच्या पश्चिमेकडे येऊन पीठावर वसावें हें पीठ उंबराच्या लांकडाचें नवें केलेलें असावें, व त्याच्यावर धुतलेलें वस्त्र पसरलेलें असावें. त्या पीठावर वधूच्या डाव्या अंगास वरानें व वराच्या उजव्या अंगास वधूनें पूर्वेकडे तोंड करून बसावें. मग उपाध्यायानें होमविधीस मंत्रपूर्वक आरंभ करावा. मग मंगलवाद्यांचा घोष होत असतां व मंगलाष्टकांचें पठन चाललें असतां वरानें वधूचा उजवा हात अंगठा न सोडतां धरून तिला आपल्या डाव्या बाजूस बसवून अग्नींत चरूच्या आहुती द्याव्यात. मग उपाध्यायानें होमकुण्डाजवळ बसून पुण्याहवाचनाचा संकल्प करावा.

पुढील विधीचा क्रम.

पुण्याहवाचनां पश्चात्पञ्चमण्डलपूजनम् ॥ नवानां देवतानां च पूजनं च
यथाविधि ॥ १३३ ॥ तथैवाघोरमन्त्रेण होमश्च समिधाहुतिम् ॥ लाजा-

हुतिं वधूहस्तद्वयेन च वरेण च ॥ १३४ ॥ वरस्य वामपार्श्वे तु कन्याया उपवेशनम् ॥ शिला स्थाप्या तयोरग्रे मण्डले लोष्टसंयुता ॥१३५॥ शिलाग्रे स्थापिताः सप्त पुञ्जा अक्षतसम्भवाः ॥ एतेषां पुरतोऽत्यर्थं दम्पत्योः स्थापनं मतम् ॥ १३६ ॥ ततो दक्षिणपादस्य योऽङ्गुष्ठो यावरञ्जितः ॥ गृहीतव्यो वरेणैव सप्तकृत्वो मुहुर्मुदा ॥ १३७ ॥ स्थानानां परमाणां च सप्तानां गुणवत्तया ॥ सङ्कल्पेन क्रमेणैव स्प्रष्टव्याः सप्तपुंजकाः ॥ १३८ ॥ शिलायाः स्पर्शनं पश्चात्कर्तव्यं तेन यत्नतः ॥ अग्नेः प्रदक्षिणं कर्म स्पर्शनं तृणजं पुनः ॥ १३९ ॥ पूर्णाहुतिस्ततः कार्या समन्तादुपवेशनम् ॥ नीराजनावलोके च तथाऽऽकर्णनमाशिषः ॥ १४० ॥

अर्थ— मग पुण्याहवाचन, पंचमंडलपूजन, नवग्रहपूजन, अघोरमंत्रानें होम आणि समिधाहोम हीं कर्में करावींत. नंतर वधूवराच्या उभयतांच्या हातानें लाजाहोम करावा. यावेळीं वधू वराच्या डाव्या बाजूस असावी. मग अग्निकुंडाच्या पुढल्या बाजूस ( किंवा अग्निकुंडाच्या उत्तरेच्या बाजूस ) मंडलावर लहान दगडानें युक्त अशी मोठी शिला ( पाटा वरवंटा ) ठेवावी. त्या शिलेवर तांदळाच्या सात राशी घालाव्यात; आणि त्याच्या ( शिलेच्या ) पलीकडे दंपत्याला नेऊन उभें करावें. मग अळित्यानें रंगविलेला

वधूचा उजवा पाय वरानें आपल्या हातानें धरून सात परमस्थानांचें मनांत स्मरण करून, प्रत्येक परमस्थानाच्या संकल्पानें एकेका राशीला तिच्या पायाचा स्पर्श करवावा. मग अग्नीला प्रदक्षिणा करून पूर्णाहुति द्यावी. नंतर जवळच कोठें तरी बसून आरती ओवाळून घेऊन वधूवरानें आशीर्वाद मंत्रांचें श्रवण करावें. हा विवाहविधींतील मुख्यक्रियांचा क्रम सांगितला आहे. येथून पुढें पुण्याहवाचनाचा संकल्प वगैरे सांगतात.

पुण्याहवाचनाचा संकल्प

अथ वेदिकादिग्भागे दम्पती उपवेश्य भूमिशुद्धिं विधाय पुण्याहवाचनां पठेत् ॥ ॐ अद्य भगवतो महापुरुषस्य पुरुषवरपुण्डरीकस्य परमेण तेजसा व्यासलोकालोकोत्तममङ्गलस्य मङ्गलस्वरूपस्य गर्भाधानाद्युपनयनपर्यन्तक्रियासंस्कृतस्यास्य देवदत्तनाम्नः कुमारस्योपनीतिव्रतसमाप्तौ शास्त्रसमभ्यसनसमाप्तौ समावर्तनान्ते ब्रह्मचर्याश्रमेनेतरे गृहस्थाश्रमस्वीकारार्थं आग्निसाक्षिकं देवतासाक्षिकं बन्धुसाक्षिकं ब्राह्मणसाक्षिकं पाणिग्रहणपुरःसरं कलत्रे गृहीते साति अनयोर्दम्पत्योः सर्वपुष्टिसम्पादनार्थं विधीयमानस्य होमकर्मणो नान्दीमुखे पुण्याहवाचनां करिष्ये ॥ इति मंत्रेण पुन्याहवाचनां कृत्वा साज्यसमिधो होमयेत् ॥ ततो व्रीहिलाजान्नहोमं कुर्यात् ॥

अर्थ— वेदिकेच्या जवळ त्या दंपत्याला बसवून उपाध्यायानें भूमिशुद्धि करून पुण्याहवाचनाचें पठण करावें. त्यांत प्रथम " ॐ अद्य भगवतो " येथपासून " पुण्याहवाचनां करिष्ये " येथपर्यंत पुण्याहवाचनाचा संकल्प करून पुण्याहवाचन करावें. मग घृतयुक्त समिधांनें हवन करावें. नंतर व्रीहि, लाजा आणि चरु यांचा होम करावा.

सप्तपदीमंत्र.

ततः शिलाग्रस्थापितसप्ताक्षतपुञ्जाग्रे करेण कन्यांगुष्ठस्पर्शनम् । ॐ सज्जातये स्वाहा ॥ ॐ सद्गार्हस्थ्याय स्वाहा ॥ ॐ परमसाम्राज्याय स्वाहा ॥ ॐ परमपारिव्राज्याय स्वाहा ॥ ॐ परमसुरेन्द्राय स्वाहा ॥ ॐ परमार्हन्त्याय स्वाहा ॥ ॐ परमनिर्वाणाय स्वाहा ॥ इति कन्यांगुष्ठेन सप्तपरमस्थानस्पर्शनमन्त्रः ॥

अर्थ— नंतर शिलेवर घातलेल्या तांदळाच्या सात राशीस वरानें वधूचा उजवा पाय हातानें धरून पायाच्या अंगठ्यानें स्पर्श करवावा. " ॐ सज्जातये स्वाहा " वगैरे सात मंत्र म्हणावेत. यालाच सप्तपदीविधि म्हणतात.

ततः पश्चात्पूर्णाहुतिं अन्ते पुण्याहं निगद्य प्रदक्षिणां कारयेत् । शांतिधारा पुष्पाञ्जलिप्रणामौ भक्त्या क्षमापना आशिषो भस्मप्रदानम् ॥ तद्यथा—

भस्मग्रहण मंत्र.

ॐ भगवतां महापुरुषाणां तीर्थंकराणां तद्देशानां गणधराणां शेषकेवलिनां पाश्चात्यकेवलिनां भवनवासिनामिंद्रा व्यन्तरज्योतिष्का इन्द्राः कल्पाधिपा इन्द्राः सम्भूय सर्वेऽप्यागताः अग्निकुंडके चतुरस्रत्रिकोणवर्तुलके वा अग्नीन्द्रस्य मौलेरुद्धतं दिव्यमग्निं तत्र प्रणीतेन्द्रादीनां तेषां गार्हपत्याहवनीयौ दक्षिणाग्निरिति नामानि त्रिधा विकल्प्य हि श्रीखण्डदेवदार्वाद्यैस्तरां प्रज्वाल्य तानर्हदादिमूर्तीन् रत्नत्रयरूपान्विचित्योत्सवेन महता सम्पूज्य प्रदक्षिणीकृत्य ततो दिव्यं भस्मादाय ललाटे दोःकण्ठे हृदये समालभ्य प्रमोदेरन् तद्वदिदानीं तानग्नीन् हुत्वा दिव्यैर्द्रव्यैस्तस्मात्पुण्यं भस्म समाहृतमनयोर्दम्पत्योश्च ( एताभ्यां दम्पतीभ्यां ) भव्येभ्यः सर्वेभ्यो दीयते ततः श्रेयो विधेयात्। कल्याणं क्रियात्। सर्वाण्यपि भद्राणि प्रदेयात्। सद्धर्मश्रीबलायुरारोग्यैश्वर्याभिवृद्धिरस्तु ॥ भस्मप्रदानमन्त्रोऽयम् ॥

अर्थ— नंतर उपाध्यायानें पूर्णाहुति, अंतीं पुण्याहवाचन, प्रदक्षिणा, शांतिधारा, पुष्पांजलि, प्रणाम,

[illegible]

मंत्रानें सर्वांस यावें.

आशीर्वाद मंत्र.

मनोरथाः सन्तु मनोज्ञसम्पदः । सत्कीर्तयः सम्प्रति सम्भवन्तु वः ॥
व्रजन्तु विघ्ना निधनं बलिष्ठा । जिनेश्वरश्रीपदपूजनाद्वः ॥ १४१ ॥
शान्तिः शिरोधृतजिनेश्वरशासनानां । शान्तिर्निरन्तरतपोभरभावितानाम् ॥
शान्तिः कषायजयजृम्भितवैभवानां । शान्तिः स्वभावमहिमानमुपागतानाम् ॥ १४२ ॥
जीवन्तु संयमसुधारसपानतृप्ता । नन्दन्तु शुद्धसहजोदयसुप्रसन्नाः ॥
सिध्यन्तु सिद्धसुखसङ्गकृताभियोगा- । स्तीव्रास्तपन्तु जगतां त्रितये जिनाज्ञाः ॥१४३॥
श्रीशान्तिरस्तु शिवमस्तु जयोऽस्तु नित्य- । मारोग्यमस्तु तव पुष्टिसमृद्धिरस्तु ॥
कल्याणमस्त्वभिसुखस्य च वृद्धिरस्तु । दीर्घायुरस्तु कुलगोत्रधनं सदाऽस्तु ॥ १४४ ॥
इत्याशीर्दानमाचार्येण कार्यम् ॥

अर्थ— नंतर गृहस्थाचार्यानें " मनोरथाः सन्तु " इत्यादि मंत्रांनीं आशीर्वाद द्यावेत.

पुढील चार दिसांचे कृत्य

शिरस्यक्षतपुञ्जस्य धारणं शुद्धमानसम् ॥
नमस्कारोऽग्निदेवस्य मूर्ध्नो प्रणमनं परम् ॥ १४५ ॥
सभायाः पूजनं वस्त्रैस्ताम्बूलाद्यैर्विशेषतः ॥
सदा गुणवता चापि ध्रुवतारानिरीक्षणम् ॥ १४६ ॥
गृहस्याभ्यन्तरे घण्टाद्वयस्याप्यवलोकनम् ॥
तथा बन्धुजनैः सार्धं पयः प्रभृतिभोजनम् ॥ १४७ ॥

अर्थ— वरील आशीर्वाद मंत्र झाल्यानंतर उपाध्यायांनी दिलेल्या अक्षता वधूवरांनीं मस्तकावर धारण कराव्यात; व त्यांना नमस्कार करावा. अंतःकरण शुद्ध ठेवावें. अग्निदेवतेला मस्तक नम्र करून प्रणाम करावा. सभेंतील लोकांचे वस्त्र, तांबूल इत्यादिकांनी पूजन करावें. नंतर वधूवरांनी आकाशांतील ध्रुवाची चांदणी अवलोकन करावी. घरांत बांधलेल्या दोन घाटी पहाव्यात. नंतर आपल्या आप्तइष्टांसह दूध वगैरे सात्विक पदार्थांनीं भोजन करावें.

ततः प्रभृति नित्यं च प्रभाते पौष्टिकं मतम् ॥
निशीथे शान्तिहोमेऽन्हि चतुर्थे नागतर्पणम् ॥ १४८ ॥
तदग्रे च प्रभाते च गृहमण्डपयोः पृथक् ॥

सम्मार्जनं च कर्तव्यं मृत्स्ना गोमयलेपनम् ॥ १४९ ॥
पौष्टिकहोमान्तरके सकलैः सह बन्धुभिश्च्युतोष्णीषैः ॥
कार्यं हि पंक्तिभोजनमप्यन गच्चात्र ताम्बूलम् ॥ १५० ॥

अर्थ— वधूवरानें त्या दिवसापासून प्रतिदिवशी प्रातःकालीं पौष्टिककर्म करावें, आणि रात्रीं शांतिहोम करावा. चवथ्या दिवशीं नागतर्पण करावें. त्याच्या दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं घर आणि मंडप झाडून काढून माती आणि शेण यांनीं दोन्हीं सारवावींत. प्रतिदिवशीं पौष्टिकहोम झाल्यानंतर आपल्या आप्त इष्टासह वधूवरांनीं भोजन करावें. त्यावेळीं डोक्याला पागोटें वगैरे कोणीं घालूं नये. नंतर सर्वांना विडे द्यावेत.

विशाले मनोज्ञे समे भूमिभागे। विवाहस्य सन्मण्डपे शोभमाने ॥
बृहत्कर्णिकं चाष्टपत्रं सुपद्मं। सरःसंयुतं वा चतुर्द्वारमुक्तम् ॥ १५१ ॥
चतुर्भिस्तथाऽस्त्ररूपेतं विशेषा–। द्वरैः पञ्चचूर्णैर्विरच्यैव साधु ॥
दधन्मण्डयन्पञ्च वा कर्णिकान्तः। स्थितः पालिकामूर्ध्नि तस्या विचित्रम् ॥ १५२॥
नवीनं घटं पंचभिश्चाक्षतै–। स्तथा ससभिर्धान्यकैः पूर्यमाणम् ॥
सदर्भं सदूर्वं विधानेन युक्तं। विचित्रेण संस्थापयेच्चारु पत्नी ॥ १५३ ॥

अर्थ— विस्तृत अशा सुंदर आणि समपृष्ठ असलेल्या मंडपांतील भूमीवर ज्याची कर्णिका मोठी आहे

असें अष्टदलांचें कमल काढावें. त्याच्या पलीकडे चार द्वारांचा चतुष्कोण काढावा. ह्या कमलाच्या दलांत आणि त्याच्या बाहेरच्या चतुष्कोणांत पांच प्रकारचे उत्तम रंग भरावेत. कमलाच्या कर्णिकेच्या आंत पांच मंडलें काढावींत; आणि त्यांतील मधल्या मंडलावर चित्रविचित्र रंगविलेला असा नवीन कलश पंचरत्नें आणि सप्तधान्ये ह्यांनीं भरून व त्यांत दर्भ आणि दूर्वा घालून व वरती आंकण ठेवून वधूनें ठेवावा.

दलेष्वष्टसु प्राक्प्रभृत्याह्वयेषु । लिखेदष्टनागान् स्वमन्त्रैः प्रसिद्धान् ॥
अलंकृत्य साक्षाद्बहिर्मण्डलेभ्यः । सदीशानकोणादिषु प्रायेशोऽमी ॥ १५४ ॥
घटाः स्थापनीयाश्चतुःसंख्ययाऽतो । मुखेष्वप्यमीषां नवाः पल्लवाश्च ॥
प्रसूनैस्तथा मालया चारुवस्त्रैः । सहादर्शकैः शोभमानान् विशेषात् ॥ १५५ ॥

अर्थ— त्या कमलाच्या पूर्वेकडील दलांपासून आठ नागांची नावें व ते आठ नाग रंगानें काढावेंत. कमलाच्या बाहेर जो चतुष्कोण काढलेला असतो, त्या चतुष्कोणाच्या ईशान्येच्या कोपऱ्यापासून चारी कोपऱ्यास चार कलश ठेवावेत. त्या कलशांच्या तोंडावर नवीन कोमल पल्लव, फुलें, माला वस्त्र आणि आरसा ह्या वस्तु ठेवून कलशांस सुशोभित करावें.

बहिः प्राक्सुपूर्वेभ्य एतेभ्य एव । स्वयं द्वारकेभ्यो गजो लेखनीयः ॥
सुचूर्णैर्हयो वा गजस्तद्वदुक्षा । सपुच्छः सशृङ्गः सलिङ्गः सकर्णः ॥ १५६ ॥

अर्थ— त्या चतुष्कोणाचीं जीं चार द्वारें त्यांच्या बाहेर पूर्वेकडे गज, दक्षिणेकडील द्वाराच्या बाहेर अश्व, पश्चिमेकडील द्वाराच्या बाहेर पुनः गज आणि उत्तरेकडील द्वाराच्या बाहेर वृषभ अशीं चार चित्रें रंगानें काढावीत. वृषभाचें पुच्छ, शिंगें, लिंग, कर्ण वगैरे अवयव स्पष्ट काढावेत.

तथा नैर्ऋते कन्यकापितृभिर्गृह-। प्रजापादि गोत्रं तथाऽग्रेऽदिशीह ॥
ककुभ्याग्रुगस्यैव गोत्रं वरस्य। प्रजापादि लेख्यं तथेशानकोणे ॥ १५७ ॥
सदित्येवमेतन्महामण्डलं वे-। शपूजार्हनागोगनद्रव्यपूर्णम् ॥
अमत्रैस्तथैवांकुराणां शुभाना-। मलंकृत्य चाचार्यसाधूपदेशात् ॥ १५८ ॥
मरागेऽपि मन्ध्याभिधाने हशीह् । वरस्यापि कन्याः शुभे स्नानके वा ॥
दढं चासनं युज्यते चादरेण। सुमाङ्गल्यवादित्रगीतादिपूर्वम् ॥ १५९ ॥
क्रिया नापितस्यैव तैलावमर्दों। जलस्थानमेतद्धि पश्चाद्विधेयम् ॥
अलंकारशोभा सुवस्त्रैः सुमाल्यै-स्ततः स्थापनं पीठयुग्मं पृथक् वै ॥ १६० ॥

अर्थ— त्या चतुष्कोणांत नैर्ऋत्यदिशेला कन्येच्या पित्याचें गोत्र, कुळ, नांव वगैरे लिहावें. त्याच प्रमाणें वायव्य आणि ईशान्य दिशेला वराच्या पित्याचें गोत्र, कुळ, नाव वगैरे लिहावें. त्या मंडलाच्या आंत जिनेंद्राच्या पूजेचे पदार्थ ठेवावेत, आणि अंकुरांचीं पात्रें सभोंवतीं ठेवून त्या मंडलाला सुशोभित

करावें. मग सन्ध्याकालचा रक्तवर्ण दिसू लागला म्हणजे, वधूवरांच्या मंगलस्नानाकरितां चांगले दोन पाट मंडपांत मांडावेत. स्नानाच्या वेळीं मंगलवाद्यें वाजवावींत. ह्यावेळीं नापिताकडून वराच्या अंगाला तेल लाववावें. तें स्नान घालण्याच्या ठिकाणींच लावावें. त्या ठिकाणीं वधूवरांना स्नानास बसण्याकरितां दोन पाट निरनिराळे घालावेत. स्नानानंतर त्यांना वस्त्रभूषणें, माला वगैरेंच्या योगानें सुशोभित करावें.

गंधाक्षत देण्याचा मंत्र

अथ मन्त्रः । ॐ सद्दिव्यगात्रस्य गन्धधारादिक्चक्रं सुगन्धं योभवीति सुगन्धोऽपि निजेन गन्धेन सुरादयः सर्वे भृशं जायन्ते गन्धिलाः यस्य पुनस्तंतन्यते ह्यनन्तं ज्ञानं दर्शनं वीर्यं सुखं च सोऽयं जिनेन्द्रो भगवान् सर्वज्ञो वीतरागः परा देवता तत्पदोरार्चितप्रार्चितप्रतिलब्धा अमी गन्धा भाले भुजयोः कण्ठे हृत्प्रदेशे त्रिपुण्ड्रादिरूपेण भाक्तिकैः प्रश्रयेण सन्धार्यन्ते ते भवन्तु सर्वस्मा अपि श्रेयसे लाभे ( भाले ) सन्धारिता अक्षता अप्येवं भवन्तु ॥ इति गन्धाक्षतप्रदानमन्त्रः ॥

अर्थ— हा मंत्र गंधाक्षता देण्याचा आहे ह्या मंत्रानें वराला व इतरांना गंधाक्षता द्याव्यात.

ताली बंध विधि.

रात्रौ ध्रुवतारादर्शनानन्तरे विद्वद्विशिष्टबन्धुजनैश्च सभापूजा ॥ चतुर्थीदिने वधूवरयोरपि महास्नानानि च स्नपनार्चनाहोमादिकं कृत्वा तालीबन्धनं कुर्यात् ॥

अर्थ— रात्रीं ध्रुवाची चांदणी वधूवरांनीं अवलोकन केल्यानंतर विद्वान्, शिष्ट आणि आप्त इष्ट ह्या मंडळीचा सत्कार करावा. विवाह झालेल्या दिवसापासून चवथ्या दिवशीं वधूवराला महास्नान ( चौक न्हाण) घालावें. मग जिनेंद्राचें स्नपन, अर्चन, होम वगैरे कर्में संपल्यावर तालीबंधन ( मंगलसूत्रबंधन ) करावें.

तद्यथा— वरेण दत्ता सौवर्णी हरिद्रासूत्रग्रन्थिता ॥
ताली करोतु जायाया अवतंसश्रियं सदा ॥ १६१ ॥

ॐ एतस्याः पाणिगृहीत्यास्तालीं बध्नामि इयं नित्यमवतंसलक्ष्मीं निदध्यात् ॥

इति कन्याकण्ठे तालीबन्धमन्त्रः ॥

अर्थ— तें असें— वरानें दिलेली, पिवळ्या सुतात गांठविलेली ही सोन्याची ताली ह्या वधूचा मुख्यालंकार होवो. “ ॐ एतस्याः ” इत्यादि मंत्रानें वरानें वधूच्या कंठांत ताली बांधावी. हें तालीबंधन विवाह झाल्या दिवसापासून चवथ्या दिवशीं करावें.

आशीर्वादमंत्र.

ततः— ॐ इन्द्रस्य शच्या सम्बन्धो यथा रत्या वरस्य च ॥
सम्बन्धमाला सम्बन्धं दम्पत्योस्तनुतात्तथा ॥ १६२ ॥

ॐ पुलोमजापत्न्या सार्धं यथा पाकशासनस्य रोहिण्या देव्या जैवातृकस्यैव यथा कन्दर्पदेवस्य साकं रत्या देव्या सम्बन्धस्तथा कल्याणसम्प्रासयोर्वधूवरयोरनयोः करोतु सम्बन्धं बन्धमाला तनोतु भाग्यं सौभाग्यं च शान्तिं कान्तिं दीर्घमायुष्यमपत्यानां बहूनां लब्धिं चापि दद्यात् ॥

अर्थ— " इंद्रस्य शच्या संबंधो " इत्यादि मंत्रानें—तालीबंधन केल्यावर उपाध्यानें—वधूवराला आशीर्वाद करावा.

मालाबंधनमंत्र

ॐ भार्यापत्योरेतयोः परिणतिं प्राप्तयोस्तुरीये घस्रे नक्तं वेलायां त्रैतासपर्यायाश्च तौ सम्बध्येते सम्बन्धमाला अतो लब्धिर्बहुपत्यानां द्राघीय आयुश्चापि भूयात् ॥ अनेन कन्यावरयोः कण्ठे मालारोपणम् ॥ इति मालामन्त्रः ॥

अर्थ— " ॐ भार्यापत्योरेतयोः " ह्या मंत्रानें चवथ्या दिवशीं रात्रीं वधूवरांनी एकमेकांच्या कंठांत माला घालाव्यात.

सुहोमावलोकः पुनरंजलीयं । सम्पूर्णं क्रमाद्वन्धयेत्कण्ठदेशे ॥
स्वसम्बन्धमालापरीवेष्टनं च । सुकर्पूरगोशीर्षयोर्लेपनं च ॥ १६३ ॥

अर्थ— ह्या ठिकाणीं प्रथम होम करून नंतर तालीबंध करून मग माळा घालाव्यात. नंतर वधूवरांच्या अंगाला कापूर आणि गोरोचना यांची उटी लावावी.

वधूभिर्युपात्तार्घपात्राभिराभिः । प्रवेशो वरस्यैव तद्वच्च वध्वाः ॥
शुभे मण्डपे दक्षिणीकृत्य तं वै । प्रदायाशु नागस्य साक्षाद्बलिं च ॥ १६४ ॥

अर्थ— मग हातात आरत्या घेतलेल्या सुवासिनी स्त्रियांसह वधूवरांनीं ( ज्या ठिकाणीं वर सांगितलेलें नागमंडल काढलें असेल तेथें) प्रवेश करावा, आणि त्या मंडपाला प्रदक्षिणा करून नागांना बलिदान करावें.

स्वपितृगोत्रसुचिन्हितमण्डले द्रुपसमीपे वधूमपि दर्शयेत् ॥ स्वपितृ-
गोत्रसुचिन्हितमण्डले द्रुपसमीपे वरस्य मता स्थितिः ॥

अर्थ— नागबलीच्या वेळीं वधूला तिच्या पित्याचें गोत्र वगैरे जिकडे लिहीलें असेल तिकडे उभी करावी आणि वराला त्याच्या पित्याचें गोत्र जिकडे लिहीलें असेल तिकडे उभा करावा.

उपाध्यायवाग्भिः समीपे समेत्य । स्वके मंचके चोपविश्यैव साधु ॥
सताम्बूलसत्तण्डुलैः प्रीत एव । च्युतं कंकणं स्थापयेत्सूत्रकं च ॥ १६५ ॥

समित्समारोपणपूर्वकं तथा । हुताशपूजाग्वसरार्चनं मुदा ॥
गृहीतवीटी च वरो वधूयुतो । विलोकनार्हं स्वपुरं व्रजेत्प्रभोः ॥ १६६ ॥
ततः शेषहोमं कृत्वा पूर्णाहुतिं कुर्यात् ॥
ॐ रत्नत्रयार्चनमयोत्तमहोमभूति- । र्युष्माकमावहतु पावनदिव्यभूतिम् ॥
षट्खण्डभूमिविजयप्रभवां विभूतिं । त्रैलोक्यराज्यविषयां परमां विभूतिम् १६७
इति भस्मप्रदानमन्त्रः ॥

अर्थ— मग उपाध्यायाने सांगितल्यावर वधूवरांनी एकमेकांच्या जवळ यावें; आणि एका मंचकावर वसावें, आणि पुढील सर्व क्रिया झाल्यावर सोडलेलें कंकण आणि सूत ही दोन्हीं तांबूल आणि तांदूळ ह्यांसह ठेवावींत. मग समिधेच्या ठिकाणी अग्नीचा समारोप करून अग्नीची पूजा करावी. नंतर सर्व मंडळींचा सत्कार करून वरानें विडा घेऊन आपल्या पत्नीसह आपल्या नगरीस गमन करावें. असा विधि करावयाचा आहे. त्यांत प्रथम राहिलेला होम समाप्त करून अग्नीत पूर्णाहुति घालून " ॐ रत्नत्रयार्चनमयोत्तम " इत्यादि मंत्राने अग्नीतील भस्म ग्रहण करावें.

सुवर्णप्रदानमत्र

हिरण्यगर्भस्य हिरण्यतेजसो । हिरण्यवत्सर्वसुखावहस्य ॥

प्रसादतस्तेऽस्तु हिरण्यगर्भता । हिरण्यदानेन सुखी भव त्वम् ॥ १६८ ॥
सुवर्णविश्राणनमेव चाद्य । सुवर्णलाभं च हिरण्यकान्तिम् ॥
स्वर्णार्थसौख्यं परिणायमेत- । द्वधूवराभ्यां नियतं ददातु ॥ १६९ ॥
हिरण्यविश्राणनमेव चाद्य । हिरण्यलाभं च हिरण्यकान्तिम् ॥
हिरण्यगर्भोपमपुत्रजातं । वधूवराभ्यां नियतं ददातु ॥ १७० ॥
इतिस्वर्णदानमन्त्रः ॥

अर्थ— वरील मंत्र वधूच्या पित्यानें वधूवराला सुवर्णदान केल्यावर अशीर्वाद देण्याचा आहे. ह्या मंत्रानें उपाध्यायानें अशीर्वाद द्यावा.

तदनन्तरं कंकणमोचनं कृत्वा महाशोभया ग्रामं प्रदक्षिणीकृत्य
पयःपानानिधुवनादिकं सुखेन कुर्यात् ॥ स्वग्रामं गच्छेत् ॥

अर्थ— सुवर्णदान केल्यानंतर वधूवरांचे कंकण सोडावें. मग मोठ्या समारंभाने नगराला प्रदक्षिणा करावी. त्या रात्री वधूवरांनी दुध प्यावें. व प्रिय वाटल्यास वरानें स्त्रीसमागमही करावा. नंतर वराने आपल्या ग्रामाला गमन करावें.

अर्थः— विवाहकर्म समाप्त झाल्यावर वरानें आपल्या पत्नीसह आपल्या घरीं गमन करावें. घर जर दुसऱ्या गांवीं असेल, तर कांहीं तरी वाहनावरून तेथें जावें.

गृहप्रवेश.

विवाहमारभ्य वधूप्रवेशो ॥ युग्मे दिने षोडशवासरावधि ॥
न चासमाने यदि पञ्चमेऽह्नि । शस्तस्तदूर्ध्वं न दिवा प्रशस्तः ॥ १७ ॥

अर्थ— वराच्या घरांत वधूचा प्रवेश विवाह झाल्यापासून सोळा दिवसांच्या आत कोणत्याही दिवशीं करावा. विषमदिनीं करूं नये. विषमदिवशींच जर करण्याचा प्रसंग आला तर पांचव्या दिवशीं करावा. त्याच्या पुढें कोणत्याही विषमदिवशीं करूं नये. तसें दिवसां वधूप्रवेश करूं नये.

वधूप्रवेशनं कार्यं पञ्चमे सप्तमेऽपि वा ॥
नवमे वा शुभे वर्षे सुलग्ने शशिनो बले ॥ १७८ ॥

अर्थ— वधूप्रवेश पांचव्या, सातव्या किंवा नवव्या वर्षीं शुभ लग्नावर चंद्रबल असतांना करावा.

उद्वाहे चतुरष्टषड्दशादिने शस्तं वधूवेशनं ।
मासे तु द्विचतुःषडष्टदशसु श्रीपञ्चमायुःप्रदम् ॥
वर्षे तु द्विचतुःषडष्टमशुभं पञ्चाष्टमुख्या परैः (?) ।

पूर्णः पुण्यमनोरथो विभवदो वध्वाः प्रवेशो भवेत् ॥ १७९ ॥

अर्थ— विवाहांत चार, आठ, सहा आणि दहा या दिवशीं वधूप्रवेश होणें फार चांगलें आहे. या कालांत न झाल्यास दुसरा, चवथा, सहावा, आठवा किंवा दहावा या महिन्यांत करावा. पांचव्या महिन्यांत केला असतां तो संपत्ति आणि आयुष्य देणारा होतो. दोन, चार, सहा आणि आठ या वर्षांत वधूचा गृहप्रवेश अशुभ समजावा.

अथ देवोत्थापनम्.

समे च दिवसे कुर्याद्देवतोत्थापनं बुधः ॥
पष्ठे च विषमे नेष्टं त्यक्त्वा पञ्चमसप्तमौ ॥ १८० ॥

अर्थ— समदिवशीं देवोत्थापन करावें त्यांत सहावा दिवस वर्ज्य समजावा. आणि पांच व सात हे दोन दिवस सोडून बाकीचे विषम दिवस वर्ज्य समजावेत.

प्रतिष्ठादिनमारभ्य षोडशाह्नाच्च मध्यतः ॥
मण्डपोद्वासनं कुर्यादुद्वाहे चेव्रतेदृशम् (?) ॥ १८१ ॥

अर्थ— विवाहकार्यात मंडपप्रतिष्ठा ज्या दिवशीं केली असेल त्या दिवसापासून सोळा दिवसांचे आंत मंडपाचें उद्वासन ( काढून टाकणें ) करावें.

॥ अथ विशेषः ॥

विवाहे दम्पती स्यातां त्रिरात्रं ब्रह्मचारिणौ ॥
अलंकृता वधूश्चैव सहशय्यासनाशनौ ॥ १७१ ॥
वध्वा सहैव कुर्वीत निवासं श्वशुरालये ॥
चतुर्थदिनमत्रैव केचिदेवं वदन्ति हि ॥ १७२ ॥

अर्थ—त्या वधूवरांनी विवाह झाल्यापासून तीन रात्रि होईपर्यंत ब्रह्मचर्यानें असावें. वधूच्या अंगावर अलंकार असावेत. त्यांनीं एका शय्येवर शयन करावें, एका आसनावर बसावें; आणि एकाच पात्रांत भोजन करावें. तसेंच वधूसह वरानें आपल्या श्वशुराच्याच घरांत रहावें. कित्येक ग्रंथकार "चवथ्या दिवशीं श्वशुराच्या घरीच वरानें रहावें" असें ह्मणतात.

चतुर्थीमध्ये ज्ञायन्ते दोषा यदि वरस्य चेत् ॥
दत्तामपि पुनर्दद्यात्पिताऽन्यस्मै विदुर्बुधाः ॥ १७३ ॥
प्रवरैक्यादिदोषाः स्युः पतिसङ्गादधो यदि ॥
दत्तामपि हरेद्दद्यादन्यस्मा इति केचन ॥ १७४ ॥

अर्थः— विवाह झाल्यापासून चवथ्या दिवशींचें कृत्य होण्याच्या पूर्वींच जर वराचे दोष समजतील

तर त्या वधूचें दान जरी झालें आहे, तथापि तिला पित्यानें पुनः दुसऱ्या वराला द्यावी; असें धर्मज्ञ मुनि मानतात. कित्येक धर्मज्ञाचें असें मत आहे, कीं, तिला पतिसमागम होण्याच्या पूर्वी जर तिच्या पित्याला जामाताचें आणि आपलें प्रवर किंवा गोत्र एक असल्याचें ज्ञान होईल, तर त्यानें दान केलेली अशीही कन्या परत घेऊन दुसऱ्या वराला द्यावी.

कलौ तु पुनरुद्वाहं वर्जयेदिति गालवः ॥
कस्मिंश्चिद्देशे इच्छन्ति न तु सर्वत्र केचन ॥ १७५ ॥

अर्थः— कलियुगांत पुनर्विवाह करूं नये असें गालवमुनीचें मत आहे. परंतु, कित्येक देशांतील कितीएक लोक पुनर्विवाह करावा असें ह्मणतात. तथापि सर्वत्र असें मत नाहीं.

वरे देशान्तरं प्राप्ते वर्षत्रीन् सम्प्रतीक्षते ॥
कन्याऽन्यस्मै प्रदातव्या वाग्दाने च कृते सति ॥ १७६ ॥

अर्थः— कन्येचें वाग्दान झाल्यानंतर जर वर देशांतरीं गेला तर त्याची तीन वर्षे वाट पहावी. नंतर वाग्दान जरी झालें आहे तथापि ती कन्या दुसऱ्या वराला द्यावी.

विवाहानन्तरं गच्छेत्सभार्यः स्वस्य मन्दिरम् ॥
यदि ग्रामान्तरे तत्स्यात्तत्र यानेन गम्यते ॥ १७७ ॥

विवाहात्प्रथमे पौषे त्वाषाढे चाधिमासके ॥
न च भर्तुर्गृहे वासश्चैत्रे तातगृहे तथा ॥ १८२ ॥

अर्थ— विवाह झाल्यानंतर पहिल्यानें येणारा पौष, आषाढ आणि अधिकमास या महिन्यांत वधूनें पतिगृहीं राहूं नये. आणि चैत्र महिन्यांत पित्याच्या घरीं राहूं नये.

विवाहाच्या अडचणी

लग्नप्रतिघातः ॥ कृते वाग्भिश्च सम्बन्धे पश्चान्मृत्युश्च गोत्रिणाम् ॥
यदा न मङ्गलं कार्यं नारीवैधव्यदं ध्रुवम् ॥ १८३ ॥

अर्थ— कन्येचें वाग्दान केल्यानंतर जर आपला एखादा गोत्रज मृत्यु पावला तर विवाह करूं नये. कारण, तसा विवाह केला असता कन्येला खचित वैधव्य प्राप्त होतें.

वरवध्वोः पिता माता पितृव्यश्च सहोदरः ॥
एतेषां मरणे मध्ये विवाहः क्रियते न हि ॥ १८४ ॥

अर्थ— विवाहनिश्चय झाल्यावर वर अथवा वधू यांपैकीं कोणाचेही पिता, माता, चुलता आणि भ्राता ह्यांपैकीं कोणी मृत झाले असतां विवाह करूं नये.

पितुर्मातुश्च पत्न्याश्च वर्षमर्धं तदर्धकम् ॥

स्नोर्भ्रातुश्च मासार्धमन्येषां मासमात्रितम् ॥ १८५ ॥
तदन्ते शान्तिकं कृत्वा यथोक्तविधिना ततः ॥
पुनश्चोद्वाहेऽथ वाग्दानं कृत्वा लग्नं विधीयते ॥ १८६ ॥

अर्थ— पिता मृत झाला असतां एक वर्ष थांबावें. मातेला सहा महिने, पत्नीला तीन महिने, पुत्र आणि बंधु ह्यांना अर्धा महिना असा काल थांबून नंतर यथोक्त विधीनें शांतिकर्म करून पुनः वाग्दान वगैरे विधि करून विवाह करावा.

विवाहानंतर वर्ज्य कृत्ये

स्नानं सतैलं तिलमिश्रकर्म । प्रेतानुयानं करकप्रदानम् ॥
अपूर्वतीर्थामरदर्शनं च । विवर्जयेन्मङ्गलतोऽब्दमेकम् ॥ १८७ ॥

अर्थ— तेल लावून स्नान करणें, ज्या कर्मांत तिळांचा उपयोग होतो तें कर्म करणें, प्रेताच्या मागून [जा]णें, मातीची घागर दान करणें, पूर्वी न पाहिलेलें तीर्थ अथवा देव ह्यांचें दर्शन घेणें हीं कृत्यें विवाह[ानंत]र एक वर्ष वर्ज्य करावींत.

ऊर्ध्वं विवाहात्तनयस्य नै[व] । कार्यो विवाहो दुहितुः समार्धम् ॥
अप्राप्य कन्यां श्वशुरालयं च । वधूप्रवेशश्च गृहे न चादौ ॥ १८८ ॥

अर्थ— पुत्राच्या विवाहानंतर सहा महिन्याच्या आंत कन्येचा विवाह करूं नये. आणि कन्येला श्वशुर-गृहीं पाठविल्यावांचून स्नुषेला आपल्या घरीं आणूं नये. म्हणजे कन्येचा विवाह केल्यावांचून सहा महिन्याच्या आंत पुत्राचा विवाह करूं नये.

एकोदरप्रसूतानामेकस्मिन्नेव वत्सरे ॥
न कुर्याच्चौलकर्माणि विवाहं चोपनायनम् ॥ १८९ ॥

अर्थ— एका मातेच्या उदरांतून उत्पन्न झालेल्या दोघां बंधूंचीं चौलादि कर्मे व विवाह आणि उपनयन हीं कर्मे एकाच वर्षांत करूं नयेत.

न पुंविवाहोर्ध्वमृतुत्रयेऽपि । विवाहकार्यं दुहितुश्च कुर्यात् ॥
न मण्डनाचापि हि मुण्डनं च । गोत्रैकतायां यदि नाब्दमेकम् ॥ १९० ॥

अर्थ— पुरुषविवाहानंतर सहा महिन्यांच्या आंत कन्याविवाह करूं नये. तसेंच विवाह केल्यावर चौल, उपनयन वगैरे मुंडनकर्मे एक वर्षाच्या आंत करूं नये.

वरील निषेधाचा अपवाद

फाल्गुने चेद्विवाहः स्याच्चैत्रे चैवोपनायनम् ॥
अब्दभेदाच्च कुर्वीत नर्तुत्रयविलम्बनम् ॥ १९१ ॥

अर्थ— जर फाल्गुन महिन्यांत विवाह झाला असेल तर त्या पुढें येणाऱ्या चैत्रांत संवत्सर बदलेल असल्यानें उपनयन करावें. अशा प्रसंगीं सहा महिने घालविण्याचें कारण नाहीं.

एकमातृप्रसूतानां पुत्रीणां परिवेदने ॥
दोषः स्यात्सर्ववर्णेषु न दोषो भिन्नमातृषु ॥ १९२ ॥

अर्थ— एकमातेपासून उत्पन्न झालेल्या कन्यांमध्यें जर वडील मुलीचा विवाह करण्याच्या अगोदर कनिष्ठ मुलीचा विवाह केला तर दोष होतो. हा दोष कोणत्याही वर्णांत होतो. परंतु त्या कन्या जर भिन्नोदर ( दोनी मातांपासून उत्पन्न झालेल्या ) असतील तर मात्र दोष नाहीं.

॥ अथ कन्यारजोदोषः ॥

विवाहाच्या पूर्वी कन्या ऋतुमती झाली असता

असंस्कृता तु या कन्या रजसा चेत्परिप्लुता ॥
भ्रातरः पितरस्तस्याः पतिता नरकालये ॥ १९३ ॥

अर्थ— विवाह संस्कार होण्याच्या पूर्वी जी कन्या रजस्वला होईल तिचे मातापितर आणि बंधु नरकांत जातील.

पितुर्गेहे तु या कन्या रजः पश्येदसंस्कृता ॥

सा कन्या वृषली ज्ञेया तत्पतिर्वृषलीपतिः ॥ १९४ ॥

अर्थ— विवाहसंस्कार न झालेली कन्या जर पित्याच्या घरांत ऋतुमती होईल तर शूद्री होते, आणि तिच्याशीं जो कोणी विवाह करील तोही शूद्रीचा पति होतो. म्हणजे शूद्रासारखा होतो.

अथ द्वितीयविवाहः ॥

दुसऱ्या विवाहाबद्दल

अप्रजां दशमे वर्षे सप्रजां द्वादशे त्यजेत् ॥
मृतप्रजां पञ्चदशे सद्यस्त्वप्रियवादिनीम् ॥ १९५ ॥

अर्थ— जिला मुळींच संतति होत नाहीं ती ऋतुमती झाल्यापासून दहाव्या वर्षांच तिचा त्याग करावा. कन्यासंततीच होते तिचा बाराव्या वर्षीं त्याग करावा. जिची संतति उत्पन्न होऊन मरते तिचा पंधराव्या वर्षीं त्याग करावा, आणि अप्रिय भाषण करणाऱ्या स्त्रीचा तत्काल त्याग करावा.

दुसरें मत

व्याधिता स्त्रीप्रजा वन्ध्या ह्युन्मत्ता विगतार्तवा ॥
अदुष्टा लभते त्याग तीर्थतो न तु धर्मतः ॥ १९६ ॥

अर्थ— अनिवार्य अशा व्याधीनें युक्त झालेली, जिला कन्यासंततीच होत आहे अशी, आपल्यापेक्षा

उत्तम कुलांत उत्पन्न झालेली, जिचा विटाळ बंद झाला आहे अशी आणि जिच्यामध्यें कोणताही दोष— अर्थात् पुत्रसंतति न होणें ह्यावांचून कोणताही दोष— नाहीं अशी स्त्री फक्त शास्त्रानें त्याज्य होते. धर्मकृत्यांत तिचा त्याग केला पाहिजे असें नाहीं.

सुरूपां सुप्रजां चैव सुभगामात्मनः प्रियाम् ॥
धर्मानुचारिणीं भार्यां न त्यजेद्गृहसत्त्वती ॥ १९७ ॥

अर्थ— सुरूप, जिला प्रजा चांगली होते आहे अशी, भाग्यशालिनी, आपल्याला प्रिय असलेली आणि धर्माचरण करणारी अशी जी स्त्री तिचा सद्गृहस्थानें केव्हांच त्याग करूं नये.

भार्या मृत झाल्यास विवाहाचा काल.

प्रमदामृतवत्सरादितः । पुनरुद्वाहविधिर्यदा भवेत् ॥
विषमे परिवत्सरे शुभः । समवर्षे तु मृतिप्रदो भवेत् ॥ १९८ ॥

अर्थ— पत्नी मृत झाल्यापासून दुसरा विवाह ज्यावेळीं होईल, त्यावेळीं तो विषम संवत्सरांत झाला असतां शुभ समजावा. आणि सम संवत्सरांत झाला असतां मृत्युदायक होतो.

दुसरें मत.

मतान्तरम्— पत्नीवियोगे प्रथमे च वर्षे । नो चेद्द्विवर्षे पुनरुद्वहेत्सः ॥

अयुग्ममासे तु शुभप्रदं स्यात्। श्रीगौतमाद्या मुनयो वदन्ति ॥ १९९ ॥

अर्थ— पत्नी मृत झाली असतां पहिल्या वर्षी किंवा दुसऱ्या वर्षी त्यानें पुनः विवाह करावा. तो विषम महिन्यांत केला असतां शुभकारक होतो; असें गौतमादि मुनिवर्यांचें मत आहे.

अपुत्रिणी मृता भार्या तस्य भर्तुर्विवाहकम् ॥
युग्माब्दे युग्ममासे वा विवाहाहः शुभो मतः ॥ २०० ॥

अर्थः— ज्याची पत्नी पुत्रवती नसून मृत झाली असेल त्यानें सम वर्षांत व सममासांत जरी विवाह केला तरी त्याला तो विवाह शुभकर होतो.

प्रजावत्यां तु भार्यायां मृतायां वैश्यविप्रयोः ॥
प्रथमेऽब्दे न कर्तव्यो विवाहोऽशुभदो भवेत् ॥ २०१ ॥

अर्थः—पत्नी पुत्रवती असून जर मृत झाली असेल तर वैश्य आणि ब्राह्मण ह्यांनीं पहिल्या संवत्सरांत विवाह करूं नये. कारण तो विवाह त्याला कल्याणप्रद होत नाहीं.

तृतीयविवाह.

अथ तृतीयभार्या—अकृत्वाऽर्कविवाहं तु तृतीयां यदि चोद्वहेत् ॥
विधवा सा भवेत्कन्या तस्मात्कार्या विचक्षणा ॥ २०२ ॥

अर्थः—अर्कविवाह ( रुईच्या झाडाशीं विवाह ) केल्यावांचून जर कोणी मनुष्य तिसऱ्या भार्येशीं विवाह करील, तर ती कन्या विधवा होईल. म्हणून तिसऱ्या विवाहासंबंधानें फार विचार करावा.

अर्कविवाहविधी

अर्कसान्निध्यमागत्य कुर्यात्स्वस्त्यादिवाचनाम् ॥
अर्कस्याराधनां कृत्वा सूर्यं सम्प्रार्थ्य चोद्वहेत् ॥ २०३ ॥

अर्थः—रुईच्या झाडाजवळ येऊन स्वस्तिवाचन वगैरे विधि करून त्या अर्कवृक्षाची पूजा करावी. नंतर सूर्याची प्रार्थना करून त्या अर्कवृक्षाशीं विवाह करावा.

विवाहयुक्तिः कथिता समस्ता । संक्षेपतः श्रावकधर्ममार्गात् ॥
श्रीब्रह्मसूत्रप्रथितं पुराण- । मालोक्य भट्टारकसोमसेनैः २०४ ॥

अर्थः— भट्टारक सोमसेनमुनींनीं ब्रह्मसूत्र नांवानें प्रसिद्ध असलेलें पुराण अवलोकन करून श्रावकांच्या धर्ममार्गाला अनुसरून सर्व विवाहपद्धति संक्षेपानें सांगितली आहे.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपणे भट्टारकसोमसेनाविरचिते
विवाहविधिवर्णनो नाम एकादशोऽध्यायः ॥ समाप्तः ॥

---

॥ श्रीवीतरागाय नम ॥

## द्वादशोऽध्यायः ॥

अथ नत्वा क्रियावन्तं कर्मातीतं जिनेश्वरम् ॥
क्रियाविशेष एतर्हि वच्म्यहं शास्त्रतोऽर्थतः ॥ १ ॥

अर्थ-- आतां क्रियावान् असूनही कर्मापासून मुक्त झालेल्या श्रीजिनेश्वराला नमस्कार करून श्रावकाची वर्णलाभ वगैरे क्रिया शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें मी सांगतों.

यस्य वर्णः सुवर्णाभो वर्णा येन विवर्णिताः ॥
स कुन्थुनाथनामा च सार्वभौमास्थितोऽर्च्यते ॥ २ ॥

अर्थ- सुवर्णाप्रमाणें ज्याच्या शरीराचा वर्ण आहे व ज्यानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण ( जाति ) सांगितले आहेत. अशा आणि सार्वभौम ह्या पदवीवर असलेल्या श्रीकुंथुनाथाची मी पूजा करतो.

वर्णलाभ

इत्थं विवाहमुचितं समुपाश्रितस्य । गार्हस्थ्यमेकमनुतिष्ठत एव पुंसः ॥
स्वीयस्य धर्मगुणसद्भावविवृद्धयेऽहं । वक्ष्ये विधानत इतो भुवि वर्णलाभम् ॥ ३ ॥

अर्थ— पूर्वी सांगितल्याप्रमाणें योग्य प्रकार विवाहविधि करून गृहस्थधर्माचें आचरण करणाऱ्या जैनश्रावकच्या धर्म, सद्गुण आणि संघ ह्यांची वृद्धी होण्याकरितां मी येथून पुढें त्याची वर्णलाभ नांवाची क्रिया यथाविधि सागतों.

स ऊढभार्योऽप्यकथीह ताव- । त्पुमान् पितुः सद्मनि चास्वतन्त्रः ॥
गार्हस्थ्यसिद्ध्यर्थमतो ह्यमुष्य । विधीयते सम्प्रति वर्णलाभः ॥ ४ ॥

अर्थ— पुरुषानें भार्याग्रहण केल्यावरही आपल्या पित्याच्या घरीं त्याच्या परतंत्रतेनेंच असावें असें शास्त्रांत सांगितलें आहे. परंतु अशानें त्याच्या गृहस्थधर्माची सिद्धि होत नाहीं; ती व्हावी ह्मणून शास्त्रानेंच त्याची वर्णलाभ नांवाची क्रिया सांगितली आहे.

वर्णलाभाचे स्वरूप.

अनुज्ञया द्रव्यभृतः पितुः प्रभोः । सुखं परिप्राप्तधनान्नसम्पदः ॥
पृथक्कृतस्यात्र गृहस्थ वर्तनं । स्वशक्तिभाजोऽकथि वर्णलाभकः ॥ ५ ॥

अर्थ— घरांतील सर्वसंपत्ति ज्याच्या ताब्यांत आहे अशा पित्याच्या आज्ञेनें धन, धान्य वगैरे संपत्ति ज्याला मिळाली आहे, व पित्यानें ज्याला विभक्त केले आहे अशा स्वतः समर्थ झालेल्या पुरुषाचा जो गृहस्थधर्माचा आचार त्याला वर्णलाभ असें ह्मणतात.

विधाय सिद्धप्रतिमार्चनं च । क्रमेण कृत्वा परमानुपासकान् ॥
पिताऽस्य पुत्रस्य धनं समर्पये- । द्यथर्द्धि साक्षीकृतमुख्यसज्जनः ॥ ६ ॥

अर्थ— पित्यानें सिद्धप्रतिमेचें पूजन करून उपासकांचा यथायोग्य सत्कार करून गांवातील संभावित गृहस्थाच्या साक्षीनें आपली संपत्ति ज्या मानानें असेल त्या मानानें विभाग करून त्या पुत्राच्या हिश्शाला येणारें द्रव्य त्याच्या ( पुत्राच्या ) स्वाधीन करावें.

धनं ह्युपादाय समस्तमेत- । त्स्थित्वा गृहे स्वस्य पृथग्यथास्वम् ॥
कार्यस्त्वया दानपुरस्सरोऽङ्ग । सुखाय साक्षात् गृहिधर्म एव ॥ ७ ॥
यथाऽस्मकाभिः सद्धर्ममर्जितं । यशोऽमलं स्वस्य धनेन यत्नतः ॥
श्रियेऽथवाऽस्मत्पितृदत्तकेन वै । तथा यशो धर्ममुपार्जय त्वकम् ॥ ८ ॥
इत्येवमेतर्ह्यनुशिष्य चैनं । नियोजयेदुत्तमवर्णलाभे ॥
स चाप्यनुष्ठातुमिहार्हति स्वं । धर्मं सदाचारतयेति पूर्णम् ॥९॥ इति वर्णलाभः ॥

अर्थ— तें द्रव्य पुत्राच्या स्वाधीन करावयाच्या वेळीं पित्यानें पुत्राला पुढीलप्रमाणें उपदेश करावा. "बाबारे! हें द्रव्य घेऊन तूं आपल्या घरांत निराळें स्वतंत्रपणें राहून पारलौकिक सुखाच्या प्राप्तीकरितां दान करून, गृहस्थाचा धर्मच चालवावा; आणि ज्याप्रमाणें आह्मी आमच्या पित्यानें दिलेल्या द्रव्याच्या

योगानें धर्म आणि निर्दोष कीर्ति संपादन केली, त्याप्रमाणें तूंही ह्या द्रव्याच्या योगानें धर्म आणि कीर्ति संपादन कर!! ” ह्याप्रमाणें मुलाला उपदेश करून तें द्रव्य त्याच्या स्वाधीन करून वर्णलाभक्रियेकडे त्याची योजना करावी, आणि त्यानें आपला गृहस्थधर्म सदाचारानें पाळावा. ही वर्णलाभक्रिया सांगितली.

कुलचर्या.

पूजा श्रीजिननायकस्य च गुरोः सेवाऽथवा पाठके(?)।
द्वेधा संयम एव सत्तप इतो दानं चतुर्धा परम् ॥
कर्माण्येव षडत्र तस्य विधिवत्सद्वर्णलाभं शुभं ।
प्राप्तस्यैवमुशन्ति साधुकुलचर्यां साधवः सर्वतः ॥ १० ॥

अर्थ— आतां वर सांगितल्याप्रमाणें ज्याची वर्णलाभक्रिया झालेली आहे त्याची कुलचर्या नांवाची क्रिया सांगतात. विधीप्रमाणें ज्याला वर्णलाभ झाला आहे त्या श्रावकानें श्रीजिनपूजा, गुरूची सेवा, स्वाध्याय, दोन प्रकारचा संयम, तप आणि चार प्रकारचे दान हीं षट्कर्मे यथाविधि करणें, ह्याला कुलचर्या असें ह्मणतात.

गृहेशिता

धर्मे दार्ढ्यमथोद्वहन् स्वकुलचर्यां प्राप्तवानञ्जसा ।

शास्त्रेण क्रियया विवाहविधिना वृत्त्या च मन्त्रैः शुभैः ॥
स्वीकुर्याद्धि गृहेशितां स्वमनघं चौन्नत्यमेकं नयन् ।
नानाकाव्यकृतेन शुद्धयशसा लिप्सुर्यशः सुन्दरम् ॥११॥

अर्थ— आपल्या कुलांत चाललेले आचार चालविणारा व धर्माचे ठिकाणीं स्थिर बुद्धि ठेवून उत्तम कीर्ति होण्याची इच्छा करणारा असा जो हा श्रावक त्यानें शास्त्राभ्यास, विहितक्रिया, सदाचार आणि मंत्रपाठ इत्यादिकांच्या योगानें आपल्या घरांतील मंडळीमध्यें आपली निर्दोष अशी उन्नति संपादन करावी; त्यानें अनेक काव्यग्रंथ रचून शुद्ध यश संपादन करावें. यालाच गृहेशिता ह्मणतात.

प्रशांति

अथ प्रशान्तिः । लब्ध्वा सूनुमतोऽनुरूपमुचितं सोऽयं गुणानां गृहं ।
साक्षादात्मभरक्षमं शुभतया देदीप्यमानं सदा ॥
तत्रारोपितसद्गृहस्थपदवीभारः प्रशान्तिप्रियः ।
संसाराङ्गसुभोगनिःस्पृहमतिः स्वाध्यायदीपात्तपः ॥ १२ ॥

अर्थ— आतां प्रशांति नांवाची क्रिया सांगतात. श्रावकानें गृहेशितेचा लाभ करून घेतल्यावर आपल्याला शोभेल असा गुणवान् व शुभलक्षणांनीं सुशोभित असा पुत्र आपलें संसाराचें ओझें घेण्यास

समर्थ झाला म्हणजे त्याला आपली गार्हस्थ्यपदवी देऊन ( संसाराचें कृत्य त्याजकडे सोंपवून ) शास्त्राच्या विचारानें अंतःकरणास शांतीचें प्रेम उत्पन्न करून, संसारसुखाविषयीं निरिच्छ होणें ह्याला प्रशांति म्हणतात.

गृहत्याग

अथ गृहत्यागः । गृहाश्रमे स्वं बहुमन्यमानः । कृतार्थमेवोद्यतबुद्धिरास्ते ॥
त्यागे गृहस्यैष विधिः क्रियायाः । सिद्धार्थकानां पुरतो विधेयः ॥ १३ ॥
आहूय सर्वानपि सम्मतांश्च । तत्साक्षि पुत्राय निवेद्य सर्वम् ॥
गृहे न्यसेच्चापि कुलक्रमोऽयं । पाल्यस्त्वयाऽस्मत्कपरोक्षतोऽङ्ग ॥ १४ ॥
त्रिधा कृतं द्रव्यमिहेत्थमेत- । दस्माकमत्यर्थमतो नियोज्यम् ॥
धर्मस्य कार्याय तथांश एको । देयो द्वितीयः स्वगृहव्ययाय ॥ १५ ॥
परस्तृतीयः सहजन्मनां वा । समं विभागाय विचारणीयः ॥
पुनः समस्तस्य च संविभागे । पुत्रैः समस्त्वं सहसैवमुक्त्वा ॥ १६ ॥
ज्येष्ठः स्वयं सन्ततिमेकरूपा- । मस्माकमप्याददतूपनीय ॥
श्रुतस्य वृत्तेरथवा क्रियाया । मन्त्रस्य न्यासादिभिविस्त्वतन्द्रः ॥ १७ ॥
कुलस्य चाम्नाय इहानुपाल्यो । गुरुश्च देवोऽपि सदाऽर्चनीयः ॥

इत्येवमग्र्यं ह्यनुशिष्य पुत्रं । ज्येष्ठं त्यजेन्मोहकृतं विकारम् ॥ १८ ॥
दीक्षामुपादातुमतो जनोऽसौ । गृहं स्वकीयं स्वयमुत्सृजेच्च ॥
कामार्थचित्तं परिहाय धर्म- । ध्यानेन तिष्ठेत्कतिचिद्दिनानि ॥ १९ ॥

अर्थ— गृहस्थाश्रमांत आपण कृतार्थ झालों आहोंत अशी आपली प्रौढी ज्याला वास्तविक भासत असेल त्या श्रावकानें गृहाच्या त्यागाचा पुढील विधि सिद्धप्रतिमेच्या अग्रभागीं करावा. आपल्याला मान्य असलेल्या गांवांतील शिष्टमंडळींना बोलावून आणून त्यांच्या समक्ष आपल्या पुत्राला आपल्या घरांतील सर्व संपत्ति दाखवून घरांतच ठेवावी. आणि त्याला सांगावें कीं, बाबारे! ही आमची कुलपरंपरेची वहिवाट आमच्या मागें देखील तूं चालवावी. ह्या सर्व द्रव्याचे तीन विभाग केलेले आहेत. त्यांतील एका विभागाची योजना धर्मकृत्याकडे कर; एक विभाग संसाराकडे खर्च कर म्हणजे त्या विभागांतून तुझ्या बंधुभगिनींचें पोषण व त्यांचीं उपनयन विवाह वगैरे कृत्यें कर. आणि एक विभाग हा तुझ्या बंधूशीं सह तूं सारखा वाटून घे. तूं माझा ज्येष्ठपुत्र आहेस; म्हणून तुझ्याशीं एकोप्यानें असलेल्या ह्या माझ्या संततीचें तूं रक्षण कर. तुला शास्त्र, उपजीविकेचें साधन, धर्मक्रिया आणि मंत्र हे सर्व मीं शिकविले असल्यानें तूं विधि समजणारा व उद्योगी आहेस; म्हणून आमचा हा कुलाचार असाच पुढें चालीव. गुरु आणि देव ह्यांची पूजा कर! ह्याप्रमाणें ज्येष्ठपुत्राला उपदेश करून श्रावकानें आपल्या अंतःकरणांतील मोह

सोडून द्यावा. आणि दीक्षा घेण्याकरितां त्यानें आपलें घर सोडून अर्थ काम ह्यांचें चिंतन न करतां धर्मध्यानांत कांहीं दिवस घालवावेत. हा गृहत्यागाचा विधि सांगितला.

दीक्षाविधि.

अथ दीक्षा। किञ्चित्समालोक्य सुकारणं त- । द्वैराग्यभावेन गृहान्निसृत्य ॥
गुरोः समीपं भवतारकस्य । व्रजेच्छिवाशाकृतचित्त एकः ॥ २० ॥
नत्वा गुरुं भावविशुद्धबुध्या । प्रयाय दीक्षां जिनमार्गगां सः ॥
पूजां विधायात्र गुरोर्मुखाच्च । कुर्याद्व्रतानि प्रथितानि यानि ॥ २१ ॥

अर्थ— वैराग्याला कांहींतरी कारण दिसल्याबरोबर विरक्त होऊन गृहत्याग केलेल्या श्रावकानें एकट्यानेंच मोक्षाबद्दल इच्छा धरून संसारांतून तारून नेणाऱ्या गुरूकडे गमन करावें. नंतर त्या गुरूला शुद्धभावनेनें नमस्कार करून त्याच्याकडून श्रीजिनांनीं सांगितलेली दीक्षा घ्यावी. मग गुरूची पूजा करून त्याच्या मुखांतून व्रतें श्रवण करून तीं करावींत.

दीक्षा घेतल्यानंतरचीं कर्तव्यें.

महाव्रतानि पञ्चैव तथा समितयः शुभाः ॥
गुप्तयस्तिस्र इत्येवं चारित्रं तु त्रयोदश ॥ २२ ॥

हिंसासत्याङ्गनासङ्गस्तेयपरिग्रहाच्च्युतः ॥
व्रतानि पञ्चसंख्यानि साक्षान्मोक्षसुखासये ॥ २३ ॥
ईर्याभाषैषणादाननिक्षेपमलमोचनाः ॥
पञ्च समितयः प्रोक्ता व्रतानां मलशोधिकाः ॥ २४ ॥

अर्थः— पांच महा व्रतें, पांच समिति आणि तीन गुप्ति अशा प्रकारें चारित्र तेरा प्रकारचें आहे. त्यांत अहिंसा, सत्य, ब्रह्मचर्य, अचौर्य आणि परिग्रहत्याग हीं पांच महाव्रतें होत. हीं व्रतें साक्षात् मोक्षसुख देणारीं असल्यानें अवश्य केलीं पाहिजेत. तसेंच ईर्यासमिति, भाषासमिति, एषणासमिति, आदाननिक्षेपसमिति आणि उत्सर्गसमिति अशा पांच समिति आहेत

युगान्तरदृष्टितोऽग्रे गच्छेदीर्यापथे प्रभुः ॥
भाषा विचार्य वक्तव्या वस्तु ग्राह्यं निरीक्ष्य च ॥ २५ ॥
प्रासुका भुज्यते भुक्तिर्निर्जन्तौ मुच्यते मलः ॥
समितयश्च पञ्चैता यतीनां व्रतशुद्धये ॥ २६ ॥

अर्थ— चालतांना पुढें चार हातापर्यंतच नजर देऊन चालणें ह्याला ईर्यासमिति म्हणतात. विचार करून बोलणें ह्याला भाषासमिति म्हणतात. कोणतीही वस्तु नीट पाहून घेणें व ठेवणें ह्याला आदाननिक्षेप-

समिति ह्मणतात. प्रासुक भोजन करणें ह्याला एषणासमिति ह्मणतात. आणि जंतु नसलेल्या प्रदेशांत मलोत्सर्ग करणे ह्याला उत्सर्गसमिति ह्मणतात. ह्या पांचही समिति यतीच्या व्रताच्या शुद्धीला साधनीभूत आहेत. ह्मणून यतीनें समितीचें रक्षण अवश्य केलेच पाहिजे.

गुप्ति आणि तप ह्याचे प्रकार.

यत्नेन परिरक्षेत मनोवाक्कायगुप्तयः ॥
द्वादशधा तपः प्रोक्तं कर्मशत्रुविनाशकम् ॥ २७ ॥
अनशनावमोदर्यं तृतीयं वस्तुसंख्यकम् ॥
रसत्यागं पृथक्शय्याऽऽसनं भवति पञ्चमम् ॥ २८ ॥
कायक्लेशं भवेच्छष्ठं षोढा बाह्यतपः स्मृतम् ॥
विनयः प्रायश्चित्ताख्यं वैयावृत्यं तृतीयकम् ॥ २९ ॥
कायोत्सर्गं तथा ध्यानं षष्ठं स्वाध्यायनामकम् ॥
अभ्यन्तरमिति ज्ञेयमेवं द्वादशधा तपः ॥ ३० ॥

अर्थः— मनोगुप्ति, कायगुप्ति आणि वचनगुप्ति अशी गुप्ति तीन प्रकारची आहे. तिचें रक्षणही यतीनें फार प्रयत्नाने करावे. तप बारा प्रकारचें आहे. त्यात अनशन, अवमोदर्य, वस्तुसंख्या, रसत्याग, पृथ-

कशय्यासन आणि कायक्लेश हें सहा प्रकारचें बाह्यतप आहे आणि विनय, प्रायश्चित्त, वैयावृत्य, कायोत्सर्ग, ध्यान आणि स्वाध्याय असे सहा प्रकारचें आंतरतप आहे. हे तप कर्मशत्रूंचा नाश करणारें आहे.

वृद्ध्यर्थं तपसां साध्याः क्षुधादिकपरीषहाः ॥
क्षुत्तृट्शीतोष्णदंशाश्च रत्यरती च नग्नता ॥ ३१ ॥
नारी चर्या निषद्या च शय्याक्रोशवधास्तथा ॥
याच्ञालाभतृणस्पर्शौ मलरोगाविति द्वयम् ॥ ३२ ॥
सत्कारश्च पुरस्कारः प्रज्ञा ज्ञानमदर्शनम् ॥
एते द्वाविंशतिर्ज्ञेयाः परीषहा अघच्छिदः ॥ ३ ॥

अर्थ--- तपाच्या वृद्धीकरितां परीषह जिंकले पाहिजेत. ते परीषह क्षुधा, तृषा, शीत, उष्ण, दंश, अरति, नग्नता, स्त्री, चर्या, निषद्या, शय्या, आक्रोश, वध, याचना, अलाभ, तृणस्पर्श, मल, रोग, सत्कार-पुरस्कार, प्रज्ञा, अज्ञान आणि अदर्शन असे बावीस आहेत. त्यांचा जय केल्यानें पातकाचा नाश होतो.

यतीचे मूलगुण.

अष्टाविंशतिसंख्याता मूलगुणाश्च योगिनः ॥
व्रतसमितीन्द्रियनिरोधाः पृथक् ते पञ्चपञ्चधा ॥ ३४ ॥

षडावश्यककाः लोचोऽदन्तवणमचेलता ॥
स्थितिभोजनं भूशय्या अस्नानमेकभोजनम् ॥ ३५ ॥

अर्थ— यतीचे मूलगुण अठ्ठावीस आहेत. ते असे— व्रतें पांच, समिति पांच, इंद्रियनिग्रह पांच, आवश्यक सहा, लोच, अदंतधावन, अचेलता ( वस्त्र नसणें ), स्थितिभोजन उभे राहून जेवणें, भूमीवर निजणें, अस्नान आणि एकभोजन.

षडावश्यके.

सामयिकं तनूत्सर्गः स्तवनं वन्दनास्तुतिः ॥
प्रतिक्रमश्च स्वाध्यायः षडावश्यकमुच्यते ॥ ३६ ॥

अर्थ— सामयिक, कायोत्सर्ग, स्तवन, वंदनास्तुति, प्रतिक्रमण आणि स्वाध्याय ही सहा आवश्यके ( अवश्य करण्याची कर्मे ) होत.

यतीचा व्यवहार

सर्वैः सह क्षमा कार्या दुर्जनैः सज्जनैरपि ॥
मृदुत्वं सर्वजीवेषु मार्दव कृपयान्वितम् ॥ ३७ ॥
कपटो न हि कर्तव्यः शत्रुमित्रजनादिषु ॥

दयाहेतुवचो वाच्यं सत्यरूपं यथार्थकम् ॥ ३८ ॥

अर्थः— यतीनें सज्जन किंवा दुर्जन ह्यांच्यावर सर्वदा क्षमा करावी. सर्व जीवांशी दयेनें मृदु वर्तन ठेवावें. शत्रु आणि मित्र ह्या दोघांबद्दलही कपट करूं नये. कोणाशीं बोलावयाचें झाल्यास दयेनें जें खरें असेल तेंच बोलावें.

यतीचा दहा प्रकारचा धर्म

देवपूजादिकार्यार्थं विधेयं शौचमुत्तमम् ॥
पञ्चेन्द्रियनिरोधो यो दयाधर्मस्तु संयमः ॥ ३९ ॥
द्वादशभेदभिन्नं हि शरीरशोषकं तपः
विद्यादिदानं पात्रेभ्यो दत्तं चेत्त्याग उच्यते ॥ ४० ॥
बाह्यान्तर्भेदसंयुक्तं परिग्रहं परित्यजेत् ॥
सर्वस्त्री जननीतुल्या ब्रह्मचर्यं भवेदिति ॥ ४१ ॥
दशलक्षणधर्मोऽयं मुनीनां मुक्तिदायकः ॥
निश्चयव्यवहाराभ्यां द्विविधोऽपि जिनागमे ॥ ४२ ॥

अर्थः— देवपूजादि कर्माकरितां उत्कृष्ट शुद्धता ठेवणें, पांचही इंद्रियांचा निग्रह करणें, सर्वांवर दया

करणे, संयम पाळणे, शरीराला शुष्क करणारे असें बारा प्रकारचें तप करणें, विद्या शिकविणे, सत्पात्राला दान करणें, अंतःपरिग्रहाचा त्याग करणें, बाह्यपरिग्रहाचा त्याग करणें, आणि सर्व स्त्रियांना मातेप्रमाणें समजणें ह्मणजे ब्रह्मचर्य पाळणें ह्या दहा लक्षणांनी युक्त असलेला आणि जिनागमात निश्चयनय व व्यवहारनय ह्या दोन नयांच्या अपेक्षेनें सांगितलेला जो धर्म, तो यतींनां मोक्षप्राप्ति करून देणारा आहे.

पाच आचार आणि आचार्यांचे छत्तीस गुण

सम्यक्त्वं निर्मलं यत्र दर्शनाचार उच्यते ॥
द्वादशाङ्गश्रुताभ्यासो ज्ञानाचारः प्रकीर्तितः ॥ ४३ ॥
सुनिर्मलं तपो यत्र तपआचार एव सः ॥
तपस्सु क्रियते शक्तिर्वीर्याचार इति स्मृतः ॥ ४४ ॥
चारित्रं निर्मलं यत्र चारित्राचार उत्तमः ॥
पञ्चाचार इति प्रोक्तो मुनीनां नायकैः परः ॥ ४५ ॥
द्वादशधा तपोभेदा आवश्यकाः परे हि षट् ॥
पञ्चाचारा दश धर्मास्तिस्रः शुद्धाश्च गुप्तयः ॥ ४६ ॥
आचार्याणां गुणाः प्रोक्ताः षट्त्रिंशच्छिवदायकाः ॥

द्वात्रिंशदन्तरायाः स्युर्मुनीनां भोजने मताः ॥ ४७ ॥

अर्थ— दर्शनाचार, ज्ञानाचार, तपआचार, वीर्याचार आणि चारित्राचार असा पांच प्रकारचा आचार आहे. निर्दोष अशा सम्यक्त्वास दर्शनाचार ह्मणतात. द्वादशांग श्रुताच्या अभ्यासाला ज्ञानाचार ह्मणतात. निर्मल तपाला तपाचार ह्मणतात. तप करण्याविषयीं जी शक्ति तिला वीर्याचार ह्मणतात. आणि निर्दोष अशा चारित्राला चारित्राचार ह्मणतात. बारा तपश्चर्या, सहा आवश्यक, पांच आचार, दहा धर्म, आणि तीन शुद्ध अशा गुप्ति हे छत्तीस आचार्यांचे गुण समजावेत. पुढें मुनीच्या भोजनाचे बत्तीस अंतराय सांगतात.

यतींचे भोजनांतराय.

मौनत्यागे शिरस्ताडे मार्गे हि पतिते स्वयम् ॥ मांसामेध्यास्थिरक्ता-
दिसंस्पृष्टे शवदर्शने ॥ ४८ ॥ ग्रामदाहे महायुद्धे शुना दष्टे त्विदं पथि
॥ सचित्तोदे करे क्षिप्ते शङ्कायां मलमूत्रयोः ॥ ४९ ॥ शोणितमांसच-
र्मास्थिरोमविट्पूयमूत्रके ॥ दलनं कुट्टनं छर्दिर्दीपप्रध्वंसदर्शने ॥ ५० ॥
ओतौ स्पृष्टे च नग्नस्त्रीदर्शने मृतजन्तुके ॥ अस्पृश्यस्य ध्वनौ मृत्युवाद्ये
दुष्टविरोदने ॥ ५१ ॥ कर्कशाक्रन्ददुःशद्वे शुनकस्य ध्वनौ श्रुते ॥ हस्त-

मुक्ते व्रते भग्ने भाजने पतितेऽथवा ॥ ५२ ॥ पादयोश्च गते मध्ये मार्जा-
रमूषकादिके ॥ अस्थ्यादिमलमिश्रान्ने सचित्तवस्तुभोजने ॥ ५३ ॥
आर्तरौद्रादिदुर्ध्याने कामचेष्टोद्भवेऽपिच ॥ उपविष्टे पद्ग्लानात्पतने
स्वस्य मूर्च्छया ॥ ५४ ॥ हस्ताच्च्युते तथा ग्रासेऽव्रतिनःस्पर्शने सति ॥
इदं मांसेति सङ्कल्पेऽन्तरायाश्च मुनेः परे ॥ ५५ ॥

अर्थ— मस्तकावर कसलाही प्रहार झाल्यामुळे मौन सोडणें, आपण रस्त्यांत अडखळून पडणें; मांस, अपवित्र वस्तु, हाड किंवा रक्त ह्यांचा स्पर्श होणें; प्रेत दिसणें, गांवात आग लागणें, भयंकर युद्ध होणे, मार्गात कुतऱ्यानें आपल्याला दंश करणें, न गाळलेल्या पाण्याचा स्पर्श होणें, भोजनकाली आपल्याला मलमूत्राचा संशय उत्पन्न होणें; रक्त, मांस, चर्म, अस्थि, केश, विष्ठा, पू, मूत्र ह्या पदार्थांचा स्पर्श होणें; ज्या घरांत भोजन करावयाचें त्या घरांत भोजनाच्या वेळी कोणी दळूं लागणें किंवा कांडूं लागणें, आपल्यास ओकारी येणें किंवा दुसरें कोणी ओकत असलेलें दिसणें, भोजन करताना दिवा विझणें, मांजराचा स्पर्श होणें, नग्नस्त्री दिसणें, कोणी जीवजंतु मरणें, अस्पृश्य मनुष्याचा शब्द कानावर पडणें, मृत्युवाद्याचा शब्द ऐकणें, कोणी रडलेलें ऐकूं येणें, कर्कश ओरडणे किंवा दुष्ट शब्द ऐकूं येणें, कुतऱ्याचा शब्द ऐकणें, हात सुटणें, व्रतभंग होणें, भाडें पडणें, मांजर उंदीर वगैरे जीव पायांमधून जाणें, अन्नांत अस्थि किंवा केर असणें, सचित्तवस्तु

( न वाळलेले भाजी वगैरे पदार्थ ) भोजनात असणें, आर्त किंवा रौद्र अशा प्रकारचें चिंतन होणें, कामचेष्टा उत्पन्न होणें, एकाएकी अशक्तपणा आल्यामुळें खालीं बसणें किंवा मूर्च्छा येऊन पडणें, हातांतून घास गळणें, अव्रती मनुष्याचा स्पर्श होणें, हें मांस असावें असें आपल्यास वाटणें, हे बत्तीस-मुनीच्या भोजनाचे-अंतराय आहेत. ह्यापैकीं कोणताही अंतराय झाला असता मुनीनें भोजनाचा त्याग करावा.

ह्याविषयीं दुसरें मत.

मतान्तरम् ॥ विण्मूत्राजिनरक्तमांसमदिरापूयास्थिवान्तीक्षणा- ॥
दस्पृश्यान्त्यजभाषणश्रवणतास्वग्रामदाहेक्षणात् ॥
प्रत्याख्याननिषेवणात्परिहरेद्भव्यो व्रती भोजनेऽ ।
प्याहारं मृतजन्तुकेशकलितं जैनागमोक्तक्रमम् ॥ ५६ ॥

अर्थ— आता ह्या भोजनांतरायाविषयीं दुसरें मत सांगतात. विष्ठा, मूत्र, चर्म, रक्त, मांस, मद्य, पू, अस्थि आणि वांति ह्यापैकीं कोणताही जिन्नस भोजनाच्या जागीं दिसणें, अंत्यजादिकांचा शब्द ऐकूं येणें, आपण ज्या गांवात रहातो त्या गांवाला आग लागणें, ज्या पदार्थाचा त्याग केला आहे ते पदार्थ भोजनांत असणें, आणि अन्नात मेलेला जीव किंवा केश सांपडणें हे यतीच्या भोजनाचे अंतराय समजावेत. ह्यापैकीं कोणतीही गोष्ट घडली असता यतीनें भोजनाचा त्याग करावा.

तिसरे मत.

अन्यत्— कागा मेज्झा छद्दी रोहण रुहिरं च अंसुपादं च ॥
जण्हू हेठा परिसं जण्हूवरिवादिक्कमो चेव ॥ ५७ ॥

अर्थ— दुसऱ्यांचे मत सांगतात. यति भोजनाच्या निमित्ताने निघाला असतां त्याच्या मस्तकावर कावळा वगैरे पक्ष्यानें हगणें हा काकांतराय होय. यतीच्या पायाला अशुद्ध पदार्थाचा स्पर्श होणे हा अमेध्यांतराय होय. यतीला ओकारी येणे हा छर्दि नांवाचा अंतराय होय. यतीला मार्गांत कोणी अडविणे हा रोधनांतराय होय. आपल्या अंगांतून अथवा दुसऱ्याच्या अंगांतून रक्त आलेलें दृष्टी पडणें हा रुधिरांतराय होय. आपल्या नेत्रांतून अश्रु येणे किंवा दुसऱ्याच्या नेत्रांतून आलेले पाहणे हा अश्रुपातांतराय होय. यतीच्या गुडघ्याच्या खाली स्पर्श होणें हा जान्वधःपरामर्श नांवाचा अंतराय होय. गुडघ्यांच्या वर स्पर्श होणें हा जानूपरिव्यातिक्रम नावाचा अंतराय होय.

णाहिअहोणिग्गमणं पच्चक्खिदसेवणा य जंतुवहो ॥
कागादिपिंडहरणं पाणीदो पिंडयडणं च ॥ ५८ ॥

अर्थ— यतीने श्रावकाच्या घरांत प्रवेश करतांना दार लहान असल्यामुळें नाभीच्या खाली डोकें जाईल इतके वाकून प्रवेश करणें हा नाभ्यधोनिर्गमन नावाचा अंतराय होय. ज्या वस्तूचा

त्याग केला असेल ती वस्तु खाण्यात येणें हा स्वप्रत्याख्यातसेवन नावाचा अंतराय होय. आपल्या समक्ष एखाद्या जीवाचा वध होणें हा जीववध नांवाचा अंतराय होय. कावळा वगैरे पक्ष्यानें हातांतून घास घेऊन जाणें हा काकादिपिंडहरण नामक अंतराय होय. भोजन करीत असतां यतीच्या हातांतून घास गळून पडणें हा पिंडपतन नांवाचा अंतराय होय.

पाणिम्मि जंतुवहे मंसादिदंसणे य उवसग्गे ॥
पादंतरपंचिंदिय संपादो भायणाणं पि ॥ ५९ ॥

अर्थ— भोजन करीत असतां यतीच्या हातांत एखाद्या जंतूचा वध होणें, हा पाणिजंतुवध नावाचा अंतराय होय. मांस वगैरे पदार्थ दिसणें हा मांसादिदर्शनांतराय होय. यतीला देवमनुष्यादिकांपासून पीडा होणें हा उपसर्गनामक अंतराय होय. यतीच्या दोनी पायांच्या मधून एखादा पंचेंद्रियजीव ( उंदिर मांजर वगैरे ) जाणें हा पंचेंद्रियगमन नांवाचा अंतराय होय. भोजन देत असलेल्या श्रावकाच्या हातांतून भोजनपात्र पडणें हा भाजनसंपातांतराय होय.

उच्चारं पस्सवणं अभोज्जगिहपवेसणं तहा पडणं ॥
उववेसणं च दंसो भूमीसंफासु णिट्ठिवणं ॥ ६० ॥

अर्थ— भोजन चाललें असतां रोगादिकांमुळें यतीला शौचास होणें हा उच्चार नांवाचा अंतराय होय.

लघ्वी होणें हा प्रस्रवणांतराय होय. ज्याच्या घरांत भोजन करावयाचें नाहीं त्याच्या घरांत न समजून यतीनें जाणें हा अभोज्यगेहप्रवेश नामक अंतराय होय. यतीनें मूर्छा येऊन पडणें हा पतनांतराय होय. यतीनें भोजन करतांनां बसणें हा उपवेशन नामक अंतराय होय. त्याला श्वानादिकांचा दंश होणें हा दंश नामक अंतराय होय. सिद्धभक्ति झाल्यानंतर यतीचा हात भूमीला लागणे हा भूमिस्पर्श नामक अंतराय होय. यतीनें कफ, किंवा थुंकी भोजन करताना थुंकणें हा निष्ठीवनांतराय होय.

उदरकिमिणिग्गमणं अदत्तगहणं पहार गामदाहो य ॥
पादेण किंचिगहणं करेण किंचि वा भूमीदो ॥ ६१ ॥

अर्थ— भोजन करतांना यतीच्या उदरांतून एखादा कृमि निघणे हा क्रिमिनिर्गमन नांवाचा अंतराय होय. न दिलेला पदार्थ यतीनें खावयास घेणें हा अदत्तग्रहण नांवाचा अंतराय होय. यतीला शस्त्रादिकांचा प्रहार होणें हा शस्त्रप्रहार नांवाचा अंतराय होय. गावांत आग लागणें हा ग्रामदाह नांवाचा अंतराय होय. यतीनें पायानें भूमीवरील एखाद्या वस्तूचें ग्रहण करणें हा पादग्रहण नांवाचा अंतराय होय. हातानें भूमीवरील एखाद्या वस्तूचें ग्रहण करणें हा हस्तग्रहण नांवाचा अंतराय होय. असे हे बत्तीस अंतराय सांगितले.

चवदा मल

णहरोमजंतुअत्थिकणकुंडयपूयरुहिरमंसचम्माणि ॥

फुलकंदमूलबीया छिण्णमला चोद्दसा होंति ॥ ६२ ॥

अर्थ— आतां अन्नांतील चवदा मल सांगतात. नखें, केश, जंतु, हाडें, कोंडा, मोड, पू, रक्त, मांस, चर्म, फूल, कंद, मूल आणि बिया हे चवदा मल आहेत.

इत्येवं मिलित्वा सर्वे षट्चत्वारिंशदात्मकाः ॥
अन्तराया मुने रम्याः सर्वजीवदयावहाः ॥ ६३ ॥

अर्थ— हे सर्व मिळून शेचाळीस अंतराय होतात. हे अंतराय यतीनें सर्वजीवांवर दया उत्पन्न करणारे असल्यानें अवश्य पाळावेत.

भोजनांतरायाची उपेक्षा करणाऱ्याची निंदा

अन्तराया मता येषां न सन्ति ते तपस्विनः ॥
ज्ञेया भ्रष्टा दयातीताः श्वभ्रावासनिवासिनः ॥ ६४ ॥
येषां न सन्ति मूढानामन्तराया दुरात्मनाम् ॥
क्व धर्मः क्व दया तेषां क्व पावित्र्यं क्व शुद्धता ॥ ६५ ॥

अर्थ— ज्यांना अंतराय मान्य नाहींत ते तपस्वी भ्रष्ट निर्दय आणि नरकांत पडणारे समजावेत. ज्या दुष्ट आणि मूर्ख यतींना अंतराया पाळावयाचे नाहीत, त्यांना धर्म, दया, पवित्रता आणि शुद्धता कोठून असणार?

शौचमूलो भवेद्धर्मः सर्वजीवदयाप्रदः ॥
पवित्रत्वदयाभ्यां तु मोक्षमार्गः प्रवर्तते ॥ ६६ ॥

अर्थ— शुद्धता हे ज्याचें मूळ आहे असा धर्म, सर्वजीवांविषयीं दया उत्पन्न करणारा होतो. ह्मणून शुद्धता आणि दया ह्या दोहोंच्या योगानें मोक्षमार्ग प्रवृत्त झाला आहे.

यतीचें भोजन

यथालब्धं तु मध्याह्ने प्रासुकं निर्मलं परम् ॥
भोक्तव्यं भोजनं देहधारणाय न भुक्तये ॥ ६७ ॥

अर्थ— मध्यान्हाच्या वेळी निर्जंतुक आणि अतिशय निर्मळ असें अन्न जसलें मिळेल तसलें यतीनें देहधारण होण्याकरितां भक्षण करावें. भोजन करावयाचें ह्मणून नव्हे. तात्पर्य, यतीनें अन्नाची रुचि पहात बसूं नयें.

मनोवचनकायैश्च कृतकारितसम्मतैः ॥
नवधा दोषसंयुक्तं भोक्तुं योग्यं न सन्मुनेः ॥ ६८ ॥

अर्थ— मन, वचन आणि शरीर व त्या प्रत्येकाचें कृत, कारित, अनुमोदन ह्या नऊ प्रकारच्या दोषांनीं युक्त असलेलें अन्न चांगल्या यतीनें भक्षण करूं नये.

भिक्षावृत्ति.

मध्याह्नसमये योगे कृत्वा सामयिकं मुदा ॥
पूर्वस्यां तु जिनं नत्वा ह्याहारार्थं व्रजेच्छनैः ॥ ६९ ॥
पिच्छं कमण्डलुं वामहस्ते स्कन्धे तु दक्षिणम् ॥
हस्तं निधाय सन्दृष्ट्या स व्रजेच्छ्रावकालयम् ॥ ७० ॥
गत्वा गृहाङ्गणे तस्य तिष्ठेच्च मुनिरुत्तमः ॥
नमस्कारपदान्पंच नववारं जपेच्छुचिः ॥ ७१ ॥

अर्थ— मध्यान्हाचा समय प्राप्त झाला असतां संतोषानें सामायिक करून, पूर्व दिशेकडे श्रीजिनाला नमस्कार करून यतीनें आहाराकरितां हळू हळू निघावें. त्यानें पिंछि आणि कमंडलु डाव्या हातांत घेऊन उजवा हात खांद्यावर ठेवावा; आणि रस्त्यानें नीट पाहात श्रावकाच्या घरीं जावें. तेथें अंगणांत उभा राहून पंचनमस्कारपदांचा नऊ वेळ जप करावा. म्हणजे नऊ वेळा जप होईपर्यंत उभें रहावें.

भिक्षादानविधि.

तं दृष्ट्वा शीघ्रतो भक्त्या प्रतिगृह्णाति भाक्तिकः ॥
प्रासुकेन जलेनाङ्घ्री प्रक्षाल्य परिपूजयेत् ॥ ७२ ॥

अर्थ—त्या मुनीला पाहून भक्तिमान् श्रावकानें त्वरेनें येऊन निर्जंतुक अशा उदकानें यतीचे पाय धुवून त्याची पूजा करावी.

षट्चत्वारिंशद्दोषैश्च रहितं प्रासुकं वरम् ॥
गृह्णीयाद्भोजनं गात्रधारणं तपसेऽपि च ॥ ७३ ॥
दोषान् संक्षेपतो वक्ष्ये यथाम्नायं गुरोर्मुखात् ॥
दाता स्वर्गं व्रजेद्धोक्ता शिवसौख्याभिलाषुकः ॥ ७४ ॥

अर्थ— मग यतीनें शेचाळीस दोष ज्यांत नाहींत असें देहधारण करणारें अन्न तपश्चर्या होण्याकरितां भक्षण करावें. हे शेचाळीस दोष शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें व गुरूच्या मुखांतून ऐकिल्याप्रमाणें मी सांगतों. कारण, हे दोष समजल्यानें अन्नदान करणाऱ्याच्या हातून ते घडणार नाहींत. आणि त्यामुळें त्याला स्वर्गप्राप्ति होईल.

अन्नाचे दोष

उद्देशं साधिकं पूति मिश्रं प्राभृतिकं बलिम् ॥
न्यस्तं प्रादुष्कृतं क्रीतं प्रामित्यं परिवर्तनम् ॥ ७५ ॥
निषिद्धाभिहितोद्भिन्ना आच्छाद्यं मालरोहणम् ॥

धात्रीभृत्यनिमित्तं च वन्याजीवातिक (?) तथा ॥ ७६ ॥
क्रोधो लोभः स्तुतिपूर्वं स्तुतिपश्चाच्च वैद्यकम् ॥
मानं माया तथा विद्या मन्त्रचूर्णं वशीकरम् ॥ ७७ ॥
शङ्कापिहितसंक्षिप्ता निक्षिप्तस्राविकौ तथा ॥
परिणतसाधारणदायकलिप्तामिश्रकाः ॥ ७८ ॥
अङ्गारधूमसंयोज्या अप्रमाणास्तथा त्विमे ॥
पञ्चत्वारिंशद्दोषास्तु ह्येषणाशुद्धिघातकाः ॥ ७९ ॥

अर्थ— १ उद्देश, २ साधिक, ३ पूति, ४ मिश्र, ५ प्राभृतिक, ६ बलि, ७ न्यस्त, ८ प्रादुष्कृत, ९ क्रीत, १० प्रामित्य, ११ परिवर्तन, १२ निषिद्ध, १३ अभिहित, १४ उद्भिन्न, १५ आच्छाद्य, १६ मालारोहण, १७ वार्ता, १८ भृत्य, १९ निमित्त २० वनीपक, २१ जीवनक २२ क्रोधपूर्व २३ लोभपूर्व, २४ स्तुतिपूर्व २५ स्तुतिपश्चात्, २६ वैद्यक, २७ मान, २८ माया, २९ विद्या, ३० मंत्र ३१ चूर्ण, ३२ वशीकरण, ३३ शंका, ३४ पिहित, ३५ संक्षिप्त, ३६ निक्षिप्त, ३७ स्राविक, ३८ अपरिणत, ३९ साधारण, ४० दायक, ४१ लिप्त, ४२ मिश्रक, ४३ अंगार, ४४ धूम, ४५ संयोज्य आणि ४६ अप्रमाण हे शेचाळीस दोष एषणाशुद्धीचा नाश करणारे आहेत. ह्या दोषांचे विवेचन क्रमाने करतात—

राहिलेलें अन्न देणें हा बलिदोष समजावा.

न्यस्तदोष.

सत्पात्रभाजनादन्नं स्थापितं चान्यभाजने ॥
न्यस्तदोषोऽयमुद्दिष्टः सद्भिरागमपारगैः ॥ ८६ ॥

अर्थ— ज्या भांड्यातील अन्न सत्पात्राला ( यतीला ) देण्याला योग्य असते अशा शुद्ध भांड्यांतून तें अन्न काढून दुसऱ्या भांड्यांत ठेवणें, हा न्यस्तदोष होय; असें आगमज्ञांनी सांगितलें आहे.

प्रादुष्किकदोष.

आहारभाजनादीनामन्यस्माच प्रदेशतः ॥
अन्यत्र नयनं दीपप्रज्वालनमतोऽपि च ॥ ८७ ॥
प्रादुष्किको मतो दोषो वर्जनीयः शुभार्थिभिः ॥

अर्थ— भोजनाचीं पात्रें ज्या जागीं मांडली असतील त्या जाग्यांतून तीं पात्रें दुसऱ्या जाग्यांत उचलून नेणें आणि चागलें दिसण्याकरिता दिवा लावणें ह्याला प्रादुष्किक दोष ह्मणतात. कल्याणाची इच्छा करणाऱ्या दात्यानें हा दोष करूं नये.

क्रीतदोष.

स्वान्यद्रव्येण यद्भोज्यं सद्गृहीतं यदा भवेत् ॥ ८८ ॥
विद्यामन्त्रेण वा दत्तं तत्क्रीतं दोष इत्यसौ ॥

अर्थ— दुसऱ्याच्या द्रव्यानें ( दुसऱ्याकडून पैसे घेऊन खानावळी प्रमाणें ) जें अन्न तयार केलेलें असतें, किंवा विद्येच्या प्रभावानें अथवा मंत्रप्रभावानें जें अन्न तयार केलेलें असतें तें अन्न क्रीत दोषानें युक्त असें समजावें.

प्रामित्यदोष.

स्वकीयं परकीयं चेद्द्रव्यं यच्चेतनेतरत् ॥ ८९ ॥
दत्वाऽऽनयनं पात्रे प्रामित्यं दोष एव सः ॥

अर्थ— आपला किंवा दुसऱ्याचा कोणताही अचेतन पदार्थ तो देऊन अन्न आणणें आणि यतीला देणें हा प्रामित्यदोष समजावा.

परिवर्तनदोष.

स्वान्नं दत्वाऽन्यगेहाद्वा यदानीयोत्तमं शुभम् ॥ ९० ॥
अन्नं ह्यादीयतेऽत्यर्थं परिवर्तनमुच्यते ॥

अर्थ— आपल्या घरात तयार केलेलें अन्न देऊन दुसऱ्याच्या घरांतील चांगलें आणि पवित्र अन्न

आणणें ह्याला परिवर्तन दोप ह्मणतात.

निषिद्धदोष

मध्ये केनापि गृहिणा निषिद्धं भोजनादिकम् ॥ ९१ ॥
दातव्यं न मुनिभ्यश्च तथापि खलु गृह्यते ॥
स निषिद्धो महादोषः परिपाट्या प्रकीर्तितः ॥ ९२ ॥

अर्थ— मुनीला अन्नदान करण्याची इच्छा झाली असतां मध्येंच कोणीतरी गृहस्थानें " हें अन्न मुनीला देऊं नका " असा निषेध केल्यावरही तेंच अन्न मुनीला देण्याकरितां ठेवणें हा निषिद्ध नांवाचा महादोष आहे; असें परंपरेनें सांगत आले आहेत.

अभिहितदोष

यस्मात्कस्माद्विना पंक्त्या गृहादष्टमतः परम् ॥
आनीतं गृह्यते चान्नं तदेवाभिहितं मतम् ॥ ९३ ॥

अर्थ— यतीनें ह्या घरातून त्या घरांत अशा क्रमानें, नियमित घरें भिक्षा मागावयाची असतां मध्येंच क्रम सोडून नियमित घरांच्या पलीकडच्या घरीं ( आठ घरांच्या पुढच्या घरी ) जाऊन भिक्षा आणणें आणि तें अन्न भक्षण करणें, हा अभिहित नांवाचा दोष समजावा.

उद्भिन्नदोष.

घृतादिभोजनं सारं मुद्रितं कर्दमादिना ॥
उद्भिद्य दीयते दोष उद्भिन्नः परिपठ्यते ॥ ९४ ॥

अर्थ— तूप वगैरे भोजनांतील मुख्य पदार्थ, केरकचऱ्यानें मिश्रित झाले असतां त्यांतील केरकचरा काढून तें अन्न देणें, हा उद्भिन्न दोष होय.

आच्छाद्यदोष.

संयतान्परमान्दृष्ट्वा राजचोरादिभीतितः ॥
दानं ददाति स प्रोक्तो दोष आच्छाद्यनामकः ॥ ९५ ॥

अर्थ— उत्तम संयमी मुनींला पाहून राजा, चोर वगैरेंच्या भीतीनें दान देणें, कोणाला न समजेल अशा प्रकारें दान देणें हा आच्छाद्य नामक दोष होय.

मालारोहणदोष.

निःश्रेण्यादिकमारुह्य द्वितीयगृहभूमितः ॥
आदाय दीयते ह्यन्नं तन्मालारोहणं मतम् ॥ ९६ ॥

—शिडी वगैरेवर उभा राहून दुसऱ्या मजल्यांतून अन्न घेऊन यतीला देणें हा मालारोहण नांवाचा दोष होय.

धात्रीदोष.

गृहिणीमेव चोद्दिश्य यदुत्पादितमन्नकम् ॥
तद्धात्रीदोष इत्येषः कीर्तनीयो मनीषिभिः ॥ ९७ ॥

अर्थ— घरच्या मालकाच्या बायकोकरितां ह्मणून जें अन्न तयार केलेलें आहे, तें यतीला देण्यास घेतलें असतां धात्रीदोष होतो.

भृत्यदोष

स्वपरग्रामदेशादेरादेशं च निवेद्य च ॥
गृह्णाति किञ्चिदाहारं दोषस्तद्भृत्यसंज्ञकः ॥ ९८ ॥

अर्थ— यतीनें आपल्या गावांतील किंवा दुसऱ्या गांवांतील निरोप सांगून अन्न घेणें हा भृत्यदोष समजावा.

निमित्तदोष.

व्यञ्जनाङ्गस्वरच्छिन्नभौमान्तारिक्षलक्षणम् ॥
स्वप्नं चेत्यष्टानिमित्तं करोति तन्निमित्तकम् ॥ ९९ ॥

अर्थ— यतीनें व्यंजन, अंग, स्वर, छिन्न, भौम, अंतरिक्ष आणि स्वप्न हीं आठ निमित्तें पाहून त्यांचीं फलें सांगून अन्न मिळविणें ह्यास निमित्तदोष ह्मणतात.

वनीपकदोष

पाखण्डिकृपणादीनामतिथीनां तु दानतः ॥
पुण्यं भवेदिति प्रोच्य अद्याद्वनीपकम् ॥ १०० ॥

अर्थ— पाखंडी आणि कृपण अशा अतिथींना दान करण्यानें पुण्य होतें असें सांगून अन्न मिळविणें हा वनीपक दोष असें ह्मणतात.

जीवनकदोष

जातिः कुलं तपः शिल्पकर्म निर्दिश्य चात्मनः ॥
जीवनं कुरुतेऽत्यर्थं दोषो जीवनसञ्ज्ञकः ॥ १०१ ॥

अर्थ— यतीनें आपली जाति, कुल, तपश्चर्या आणि कसब लोकांना सांगून त्या महत्त्वावर अन्न मिळविणें ह्याला जीवनदोष ह्मणतात.

क्रोधदोष व लोभदोष.

क्रोधं कृत्वाऽशनं ग्राह्यं क्रोधदोषस्ततो मतः ॥
कांचिल्लोभं प्रदर्श्यात्ति लोभदोषः स कथ्यते ॥ १०२ ॥

अर्थ— आपल्याला कोप आला आहे असें यतीनें लोकांना दाखवून त्याच्याकडून अन्न घेणें ह्याला

क्रोधदोष ह्मणतात. आणि लोकांना ‘ अमुक काम करून देतो ’ असा लोभ दाखवून भोजन मिळविणें ह्याला लोभ दोष ह्मणतात.

स्तुतिपूर्वदोष व स्तुतिपश्चाद्दोष

त्वमिन्द्र चन्द्र इत्युक्त्वा भुक्तेऽन्नं स्तुतिदोषभाक् ॥
पूर्वं भुङ्क्ते स्तुयात्पश्चात्स्तुतिपश्चान्मलो मतः ॥ १०३ ॥

अर्थ--अन्नदान करणाऱ्याची ‘ तूं इंद्र चंद्र आहेस ” वगैरे स्तुति करून भोजन करणें ह्याला स्तुतिपूर्व-दोष ह्मणतात. आणि भोजन झाल्यावर दान करणाराची स्तुति करणें ह्याला स्तुतिपश्चात् दोष ह्मणतात.

वैद्यदोष, मानदोष व मायादोष

कृत्वा भेषजमत्यन्नं वैद्यदोषः स उच्यते ॥
आत्मपूजादिकं लोकान् प्रतिपाद्यातियत्नतः ॥ १०४ ॥
उदरं पूरयत्येव मानदोषो विधीयते ॥
मायां कृत्वाऽन्नमादत्ते मायादोषः प्रकीर्तितः ॥ १०५ ॥

अर्थ--औषध देऊन भोजन करणें ह्याला वैद्यदोष ह्मणतात. आपली पूजा केली पाहिजे असें लोकांना सांगून त्यांच्याकडून तसें करवून पोट भरणें ह्याला मानदोष ह्मणतात. कांहीं जादू वगैरे

करून यतीनें लोकाना भुलवून अन्न मिळविणे हा मायादोष होय.

विद्यादोष व मंत्रदोष.

कृत्वा विद्याचमत्कारं योऽत्ति विद्याख्यदोषकः ॥
मंत्रयन्त्रादिकं कृत्वा योऽत्ति वै मन्त्रदोषकः ॥ १०६ ॥

अर्थ— कांहीं विद्येचा चमत्कार दाखवून (बालग्रहावर तोडगा करून देणे वगैरे) भोजन करणे ह्याला विद्यादोष ह्मणतात. आणि मंत्र, यंत्र वगैरे करून भोजन मिळविणें ह्याला मंत्रदोष असें ह्मणतात.

चूर्णदोष व वशीकरणदोष

दत्वा चूर्णादिकं योऽत्ति चूर्णदोषः स इष्यते ॥
वशीकरणकं कृत्वा वशीकरणदोषकः ॥ १०७ ॥

अर्थ— लोकांना चूर्ण वगैरे (अंगारा वगैरे) देऊन भोजन करणें ह्याला चूर्णदोष ह्मणतात. वशीकरण करून देऊन भोजन करणें हा वशीकरण दोष होय.

शङ्कादोष व पिहितदोष.

अस्मदर्थं कृतं चान्नं न वा शङ्काख्यदोषकः ॥
सचित्तेनावृतं योत्ति पिहितो दोष उच्यते ॥ १०८ ॥

अर्थ— हें अन्न माझ्याकरितां केलें आहे किंवा नाहीं? अशा शंकेनें भोजन करणें हा शंकादोष होय. सचित्तवस्तूनें युक्त असलेलें अन्न भक्षण करणें हा पिहितदोष होय.

सक्षितदोष

स्निग्धेन वा स्वहस्तेन देयं वा भाजनेन वा ॥
संक्षिप्तदोषो निर्दिष्टो वर्जनीयो मनीषिभिः ॥ १०९ ॥

अर्थ— तैलादिकानें चिकट झालेल्या हातानें अथवा पात्रानें यतीला आहार देणे हा संक्षिप्त दोष होय. बुद्धिमान् लोकांनी ह्या दोषाचा त्याग करावा.

निक्षिप्तदोष.

सचित्तवारिभिर्यद्धि प्रसिच्यान्नं तु दीयते ॥
निक्षिप्तदोष इत्युक्तः सर्वथाऽऽगमवर्जितः ॥ ११० ॥

अर्थ— न गाळलेलें पाणी अन्नावर सिंपडून अन्न देणें हा निक्षिप्तदोष होय. हा दोष आगमांत त्याज्य म्हणून सांगितला आहे.

स्रावितदोष.

घृततक्रादिकं चैव स्रवत्येवान्नकं बहु ॥

तदन्नं गृह्यतेऽत्यर्थं स्रावितो दोष उच्यते ॥ १११ ॥

अर्थ— ज्या अन्नांतून तूप, ताक वगैरे पुष्कळ गळत आहे तसलें अन्न फार भक्षण करणें हा स्रावित नांवाचा दोष होय.

अपरिणतदोष.

त्रिफलादिरजोभिश्च रसैश्चैव रसायनैः ॥
गृह्णात्यपरिणतं वै दोषोऽपरिणतः स्मृतः ॥ ११२ ॥

अर्थ— त्रिफला वगैरेंच्या चूर्णांनीं किंवा रसानीं अथवा रसायनांनीं युक्त असलेलें अन्न भक्षण करणें हा अपरिणत नांवाचा दोष होय. कारण, ह्यातील त्रिफलाचूर्ण वगैरे पदार्थ शिजलेले नसतात.

साधारणदोष.

गीतनृत्यादिकं मार्गे कुर्वन्नानीय चान्नकम् ॥
गृहे यद्दीयते दोषः स साधारणसञ्ज्ञकः ॥ ११३ ॥

अर्थ— मार्गांत गायन, नृत्य इत्यादिक व्यापार करून अन्न मिळवून घरीं आणून तें अन्न यतीला देणें हा साधारण नांवाचा दोष होय.

दायकदोष.

रोगी नपुंसकः कुष्ठी उच्चार मूत्रलिप्तकः ॥
गर्भिणी ऋतुमत्येव स्त्री ददात्यन्नमुत्तमम् ॥ ११४ ॥
आशौचाचारसंलीनः स दोषो दायकस्य वै ॥

अर्थ— रोगी, नपुंसक, कोड भरलेला, शौचास किंवा लघ्वीस जाऊन शुद्ध न होतां तसाच आलेला पुरुष, अथवा वरील लक्षणाची व गर्भिणी, रजस्वला अशी स्त्री, ह्यांनीं यतीला अन्न देणें, ह्यांत अशुचित्व गुप्त असल्यानें हा दायक नांवाचा अन्नदान करणाऱ्याचा दोष आहे.

लिप्तदोष.

अप्रासुकेन लिप्तेन हस्तेनैव विशेषतः ॥ ११५ ॥
भाजनेन ददात्यन्नं लिप्तदोषः स कीर्तितः ॥

अर्थ— निर्जंतुक नव्हे अशा पदार्थानें लिप्त असलेल्या हातानें किंवा भांड्यानें अन्न देणें हा लिप्त दोष होय.

मिश्रदोष

आमपात्रादिके पात्रे सचित्तेनार्द्रं मिश्रितम् ॥ ११६ ॥
ददात्याहारकं भक्त्या मिश्रदोषः प्रकीर्तितः ॥

अर्थ— मातीच्या कच्या ( न भाजलेल्या ) पात्रातून सचित्त आणि आर्द्र ( सजीव आणि ओल्या )

अशा पदार्थानीं मिसळलेलें अन्न यतीला देणें हा मिश्र दोष होय.

अंगारदोष.

गृध्या यो मूर्च्छितं ह्यन्नं भुङ्क्ते चाङ्गारदोषकः ॥ ११७ ॥

अर्थ— फार क्षुधा लागल्यामुळें जीवजंतूंनीं मिश्र झालेलें किंवा आंबलेलें असें अन्न भक्षण करणें हा अंगारदोष ( उदरातील अग्नीचा दोष ) होय.

धूमदोष व सयोज्यदोष

भोज्याद्यलाभे दातारं निन्दन्नत्ति स धूमकः ॥
शीतमुष्णेन संयुक्तं दोषः संयोजनः स्मृतः ॥ ११८ ॥

अर्थ—आपणास आवडणारें अन्न न मिळाल्यामुळें दान करणाऱ्याची निंदा करीत भोजन करणें हा धूमक नांवाचा दोष होय, शीत व उष्ण असें अन्न मिसळून खाणें हा संयोजन नांवाचा दोष होय.

अप्रमाणकदोष.

प्रमाणतोऽन्नमत्यत्ति दोषश्चैषोऽप्रमाणकः ॥
इत्येवं कथिता दोषाः षट्चत्वारिंशदुक्तितः ॥ ११९ ॥
इत्येवं कथितो धर्मो मुनीनां मुक्तिसाधकः ॥

संक्षेपतो मया ग्रन्थे वर्णाचारप्रसङ्गतः ॥ १२० ॥

अर्थ— प्रमाणापेक्षा अधिक अन्न भक्षण करणें हा अप्रमाणक नांवाचा दोष होय. ह्याप्रमाणें हे शेचाळीस दोष सांगितले. अशाप्रकारें मुक्तिसाधक असा मुनींचा धर्म, त्रैवर्णिकांच्या आचारांत संक्षेपानें सांगितला.

आदौ श्रीवर्णलाभ. सुखकरकुलचर्या गृहाधीशता च ।
सर्वेभ्यश्च प्रशान्तिर्मनसि कृतगृहत्यागता वा सुदीक्षा ॥
अध्यायेऽस्मिन्गरिष्ठाः शिवसुखफलदा वर्णिता धर्मभेदा ।
ये कुर्वन्तीह भव्याः सुरनरपतिभिस्ते लभन्ते सुपूजाम् ॥ १२१ ॥

अर्थ— ह्या अध्यायांत प्रथम गृही श्रावकाची वर्णलाभ क्रिया सांगून नंतर कुलचर्या, गृहीशिता, सर्व-परिग्रहापासून अंतःकरणांत प्रशांति, गृहत्याग आणि दीक्षा ह्या भुक्तिमुक्ति देणाऱ्या श्रेष्ठ क्रिया सांगितल्या आहेत. ह्या क्रिया जे भव्यजीव करतात, ते स्वर्गांतील इंद्र आणि पृथ्वीवरील सार्वभौम राजे ह्यांनीं देखील पूजा करण्याला योग्य असे होतात.

धर्मोपदेशं प्रवदन्ति सन्तो । धन्यास्तु ते ये सुचरन्ति भव्याः ॥
पूज्याः सुरैर्भूपतिभिश्च नित्यं । तेषां गुणान्वाञ्छति सोमसेनः ॥ १२२ ॥

अर्थ— साधु लोक धर्माचा उपदेश करतात. जे भव्यजीव त्या धर्माचें आचरण करतात ते देव आणि नृपति ह्यांनी निरंतर पूज्य असे होतात. ह्मणून श्रीसोमसेनमुनि त्या भव्यजीवांचे सद्गुण आपल्याला प्राप्त व्हावेत अशी इच्छा करीत आहे.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपणे भट्टारकश्रीसोमसेन

विरचिते वर्णलाभादिपञ्चक्रियावर्णनो नाम

द्वादशोऽध्यायः समाप्तः

॥ श्रीवीतरागाय नम. ॥

## ॥ त्रयोदशोऽध्यायः ॥

वन्दे तं शान्तिनाथं शिवसुखविधिदं सेवितं भव्यलोकै- ।
रादौ चक्रेण राज्यं सकलभरतजं साधितं येन पुण्यात् ॥
पश्चाद्दीक्षां समादाय तु कलिलमलं छिन्नकं ध्यानचक्रैः ।
शुद्धज्ञानेन भव्याः सुसमवसरणे बोधिता मोक्षहेतोः ॥ १ ॥

अर्थ— पूर्वार्जित पुण्यकर्मामुळे ज्यानें चक्ररत्नाच्या सहाय्यानें प्रथम सर्व भरतखंडाचे राज्य मिळविलें. नंतर दीक्षा घेऊन शुक्लध्यानरूपी चक्रानें ज्यानें संपूर्ण पातकांचा नाश केला, नंतर समवसरणसभेंत मोक्षप्राप्तीकरितां सर्व भव्यजीवांना ज्यानें शुद्धज्ञानाच्या योगानें उपदेश केला, तो भुक्तिमुक्ति आणि सदाचार देणारा व भव्यजीवांनी सेविलेला जो शांतिनाथ तीर्थंकर, त्याला मी नमस्कार करतों.

कर्मकलंकविमुक्तं मुक्तिश्रीवल्लभं गुणैर्युक्तम् ॥
सिद्धं नत्वा वक्ष्ये द्विधा स्फुटं सूतकाध्यायम् ॥ २ ॥

अर्थ— कर्मकलंकापासून मुक्त झालेल्या व मुक्तिलक्ष्मीचा प्रियपति आणि सद्गुणांनी युक्त असलेल्या श्रीसिद्धाला नमस्कार करून, मी सूतकाध्याय सांगतों.

क्षत्रियवैश्यविप्राणां सूतकाचरणं विना ॥
देवपूजादिकं कार्यं न स्यान्मोक्षप्रदायकम् ॥ ३ ॥

अर्थ— क्षत्रिय, वैश्य आणि ब्राह्मण ह्या त्रैवर्णिकांनीं आशौच पाळल्यावांचून त्यांचो देवपूजादि धर्मकृत्यें त्यांना मोक्षप्रद होत नाहीत.

आशौचाचे प्रकार

सूतकं स्याच्चतुर्भेदमार्तवं सौतिकं तथा ॥
मार्तं तत्संगजं चेति तत्रार्तवं निगद्यते ॥ ४ ॥

अर्थ— आशौच हें ऋतुसंबधी, प्रसूतिसंबंधी, मृत्युसंबंधी आणि अशुचि असलेल्या मनुष्याच्या संसर्गासंबंधी असें चार प्रकारचें आहे. त्यांत ऋतुसंबंधी आशौच प्रथम सांगतों.

ऋतूचे प्रकार.

रजः पुष्पं ऋतुश्चेति नामान्यस्यैव लोकतः ॥
द्विविधं तत्तु नारीणां प्राकृतं विकृतं भवेत् ॥ ५ ॥

प्राकृतं जायते स्त्रीणां मासे मासे स्वभावतः ॥
अकाले द्रव्यरोगाद्युद्रेकात्तु विकृतं मतम् ॥ ६ ॥

अर्थ— रज, पुष्प आणि ऋतु ही तीन स्त्रियांच्या विटाळाची नांवें लोकप्रसिद्ध आहेत. हा स्त्रियांचा ऋतु स्वाभाविक आणि विकृत ( शरीरप्रकृतीत विघाड झाल्यामुळें उत्पन्न होणारा ) असा दोन प्रकारचा आहे. त्यांत महिन्यामहिन्यास स्वाभाविकपणें उत्पन्न होणारा ऋतु प्राकृत किंवा स्वाभाविक समजावा. आणि ऋतुकाली स्त्रियांच्या शरीरांतून जाणारें द्रव्य किंवा रोग ह्यांच्या आधिक्यामुळें उत्पन्न जो ऋतु तो विकृत समजावा.

अकालीं ऋतुस्राव

अकाले यदि चेत् स्त्रीणां तद्रजो नैव दुष्यति ॥
पञ्चाशद्वर्षादूर्ध्वं तु अकाल इति भाषितः ॥ ७ ॥

अर्थ— अकाली जर स्त्रीला रजोदर्शन होईल तर त्यांत कांहीं दोष ( आशौच ) नाहीं. पन्नास वर्षांच्या पुढे स्त्रियांचा अकाल समजावा; असें मुनींनी सांगितले आहे.

आशौच धरण्याचा प्रकार.

रजसो दर्शनात्स्त्रीणामाशौचं दिवसत्रयम् ॥

कालजे चार्धरात्राच्चेत्पूर्वं तत्कस्यचिन्मतम् ॥ ८ ॥
रात्रावेव समुत्पन्ने मृत्यौ रजसि सूतके ॥
पूर्वमेव दिनं ग्राह्यं यावन्नोदेति वै रविः ॥ ९ ॥
रात्रेः कुर्यात्त्रिभागं तु द्वौ भागौ पूर्ववासरे ॥
ऋतौ सूते मृते चैव ज्ञेयोऽन्त्यांशः परेऽहनि ॥ १० ॥

अर्थ— स्त्रियांना रजोदर्शन झाल्या दिवसापासून तीन दिवस अशुद्धपणा असतो. हें योग्य कालीं उत्पन्न होणाऱ्या ऋतुसंबधानें समजावें. रजोदर्शन जर मध्यरात्रीच्या पूर्वीं होईल तर पूर्वींचा दिवस धरावा असें एक मत आहे. मृत्यु, ऋतु आणि प्रसूति ह्या गोष्टी रात्री सूर्योदय होईपर्यंत केव्हांही झाल्यास पूर्वींचाच दिवस धरावा असें दुसरें एक मत आहे. आणि रात्रीचे तीन भाग करून पहिले दोन भाग पूर्व दिवसांत धरावेत आणि तिसरा भाग पुढच्या दिवसांत धरावा असेंही एक मत आहे. ह्यांत ज्या देशांत जशी रूढी असेल तसें त्यांनीं ग्रहण करावें. तीनही प्रकार शास्त्रोक्त असल्यानें कोणताही स्वीकारल्यास दोष नाहीं.

योग्यकालावाचून मध्येच स्त्री ऋतुमती झाल्यास.

ऋतुकाले व्यतीते तु यदि नारी रजस्वला ॥

तत्र स्नानेन शुद्धिः स्यादष्टादशादिनात्पुरा ॥ ११ ॥

अर्थ— योग्यकाळीं स्त्री ऋतुमती होऊन तो काल गेल्यावर पुढें अठरा दिवसांच्या आंत पुनः ऋतुमती झाल्यास ती नुसत्या स्नानानें शुद्ध होते. तीन दिवस अशुद्ध रहाण्याचें कारण नाहीं.

दिनाचेत् षोडशादर्वाङ्नारी या चातियौवना ॥
पुना रजस्वलाऽपि स्याच्छुद्धिः स्नानेन केचन ॥ १२ ॥

अर्थ— तारुण्य उत्कट असल्यामुळें जर स्त्री सोळा दिवसांच्या आंत पुनः ऋतुमती झाली तर ती फक्त स्नान करून शुद्ध होते. असें कित्येकांचें म्हणणें आहे.

रजस्वलायाः पुनरेव चेद्रजः । प्राग्दृश्यतेऽष्टादशवासराच्छुचिः
अष्टादशाहे यदि चेद्दिनद्वया- । देकोनविंशे त्रिदिनात्ततः परम् ॥ १३ ॥

अर्थ— रजस्वला झालेली स्त्री पुनः जर अठराव्या दिवसाच्या पूर्वी रजस्वला होईल तर ती शुद्धच समजावी. अठराव्या दिवशीं झाल्यास दोन दिवस अशुद्ध समजावी, आणि एकोणिसाव्या दिवशीं झाल्यास तीन दिवस अशुद्ध समजावी. असें एक मत आहे.

रजोयुताऽष्टादशवासरे पुनः । प्रायेण या यौवनशालिनी वधूः ॥
त्र्यहेण सा शुध्यति द्व्येपिन्ययो । रजोनिवृत्त्याशुचिमानसेव मन्ति ॥ १४ ॥

अर्थ— रजस्वला झालेली स्त्री तारुण्य अधिक असल्यामुळें अठरा दिवसांत पुनः रजस्वला होईल तर ती तीन दिवसानींच दैविक व पैतृककर्माला योग्य होते. कारण, तिच्या ठिकाणी ऋतुस्राव होत असल्यामुळे अशुद्धता असते. असें एक मत आहे.

रजस्वला यदि स्नाता पुनरेव रजस्वला ॥
अष्टादशदिनादर्वाक् शुचित्वं न निगमते ॥ १५ ॥

अर्थ— रजस्वला स्त्री चवथ्या दिवशी स्नान केल्यानंतर ऋतुमती झाल्यापासून अठरा दिवसांच्या आंत जर पुनः ऋतुमती होईल तर ती शुद्ध म्हणवीत नाही असें एक मत आहे.

ऋतुमती स्त्रीचा आचार.

काले ऋतुमती नारी कुशासने स्वपेत्सती ॥
एकांतस्थानके स्वस्था जनस्पर्शनवर्जिता ॥ १६ ॥
मौनयुक्ताऽथवा देवधर्मवार्ताविवर्जिता ॥
मालतीमाधवीवल्लीकुन्दादिलतिकाकरा ॥ १७ ॥
रक्षेच्छीलं दिनत्रयं [illegible] ॥
अञ्जनाभ्यङ्गस्रग्गन्धलेपनमण्डनोज्झिता ॥ १८ ॥

देवं गुरुं नृपं स्वस्य रूपं च दर्पणेऽपि वा ॥
न च पश्येत्कुदेवं च नैव भाषेत तैः समम् ॥ १९ ॥
वृक्षमूले स्वपेन्नैव खट्वाशय्यासने दिने ॥
मन्त्रपञ्चनमस्कार जिनस्मृतिं स्मरेध्हृदि ॥ २० ॥
अञ्जलावश्नीयात्पर्णपात्रे ताम्रे च पैत्तले ॥
भुक्तं चेत्कांस्यजे पात्रे तत्तु शुध्यति वन्हिना ॥ २१ ॥

अर्थ— योग्यकाली ऋतुमती झालेल्या स्त्रीनें दर्भ अंथरून त्यांवर शयन करावें. स्वस्थमनानें एकांतीं वसावें. कोणास स्पर्श करूं नये. तिनें तीन दिवस मौन धारण करावें. किंवा देवाधर्माच्या गोष्टी बोलूं नयेत. मालतीची वेल, मोगरीची वेल किंवा कुंदाची वेल तिनें तीन दिवस हातांत धरावी. आपलें शील रक्षण करावें. तीन दिवस दही, दूध वगैरे गोरसावांचून एक वेळ भोजन करावें. तिनें डोळ्यांत अंजन घालूं नये. अंगाला तेल लावूं नये. माळा व अलंकार घालूं नयेत. तिनें देव, गुरु, राजा आणि कुलदेवता ह्यांचें दर्शन करूं नये. गुरु वगैरे ह्यांच्याशी भाषण करूं नये. दर्पणांत आपलें मुख पाहूं नये. झाडाखाली व माचा किंवा बाजलें ह्यांच्यावर; व अंथरुणावर निजूं नये. दिवसां निजूं नये. पंचनमस्कार मंत्र आणि जिनदेव ह्यांचें मनात स्मरण करावें. तिनें तीन दिवस आपल्या ओंजळींत किंवा पानावर,

अथवा तांब्याच्या पितळेच्या भांड्यात अन्न घेऊन भोजन करावें. काश्याच्या पात्रांत भोजन केले असतां तें अग्नीतून भाजून काढिलें ह्मणजे शुद्ध होतें.

रजस्वलेची शुद्धि.

चतुर्थे दिवसे स्नायात्प्रातर्गोसर्गतः पुरा ॥
पूर्वाह्णे घटिकाषट्कं गोसर्ग इति भाषितः ॥ २२ ॥
शुद्धा भर्तुश्चतुर्थेऽह्नि भोजने रन्धनेऽपि वा ॥
देवपूजागुरूपास्तिहोमसेवासु पञ्चमे ॥ २३ ॥

अर्थ— मग चवथ्या दिवशी प्रातःकाली तिनें गाई रानात सोडण्याचा काल होण्याच्या पूर्वी स्नान करावें. प्रातःकालच्या सहा घटिका नंतर गाई सोडण्याचा काल समजावा. ती स्त्री चवथ्या दिवशीं फक्त आपल्या पतीला अन्न शिजवून घालण्याला शुद्ध समजावी. बाकी देवपूजा, गुरुसेवा, होम वगैरे कृत्याला पांचव्या दिवशीं शुद्ध समजावी.

दोघी ऋतुमतींनीं एकमेकींशी भाषण वगैरे केल्यास प्रायश्चित्त

अस्नाते यदि संलापं कुरुतश्चोभयोस्तयोः ॥
अतिमात्रमघं तस्माद्वर्ज्यं सम्भाषणादिकम् ॥ २४ ॥

अर्थ– ऋतुमती स्त्रिया स्नान केल्यावाचून जर एकमेकींशी भाषण करितील तर त्या दोघींसही मोठें पातक लागतें. ह्मणून ऋतुमतीशी बोलणे वगैरे त्याज्य समजावे.

संलापे तु तयोः शुद्धिं कुर्यादेकोपवासतः ॥
तद्द्वयात्सहसंवासे तत्त्रयात्पंक्तिभोजने ॥ २५ ॥

अर्थ— ऋतुमतींनी एकमेकींशी फक्त भाषणच केले तर त्या दोघींकडून एकादिवस उपवास करवून त्यांना शुद्ध करून घ्यावें. त्यांनी सहवास (एका जाग्यांत रहाणे) केला असतां दोन उपवास करवावेत. त्या दोघींनी एकमेकींच्या पंक्तीला भोजन केले असतां दोघींकडूनही तीन उपवास करवावेत.

विजातीय ऋतुमतींच्या वरील व्यवहाराचे प्रायश्चित्त

ऋतुमत्योर्विजात्योस्तु संलापादि भवेद्यदि ॥
तदाऽधिकायाः शुद्धिः प्रागुक्तादेवाधिकाद्भवेत् ॥ २६ ॥

अर्थ— निरनिराळ्या जातींच्या दोन ऋतुमती स्त्रिया जर एकमेकींशी भाषण करतील तर त्यांत उच्च जातीची जी स्त्री असेल तिची शुद्धता पूर्वी सांगितल्यापेक्षा अधिक प्रायश्चित्त केल्यानें ह्मणजे द्विगुणप्रायश्चित्त केल्यानें होते.

अन्यस्यास्तु विशुद्धिः स्यात्पूर्वोक्तादानतोऽपि वा ॥

यदि समं तयोर्गोत्रं तदा शुद्धिस्तु पूर्ववत् ॥ २७ ॥

अर्थ— नीच जातीची जी स्त्री असेल तिची शुद्धता पूर्वी सांगितलेल्या प्रकारानें होते, आणि जर दोघा ऋतुमतींचे एकच कुल असेल तर त्या दोघींचीही शुद्धि पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रायश्चित्त केल्यानें होते.

सूतकं प्रेतकं वाऽथमन्त्यस्पर्शनमेव वा ॥
मध्ये रजसि जातं चेत्स्नात्वा भुञ्जीत पुष्पिणी ॥ २८ ॥

अर्थ— स्त्री रजस्वला असतांना मध्यें जननाशौच किंवा मृताशौच प्राप्त झालें असतां किंवा अंत्यजादिकांचा स्पर्श झाला असतां रजस्वलेनें तत्काल स्नान करून भोजन करावें.

आर्तवं भुक्तिकाले चेदन्नं त्यक्त्वाऽऽस्यगं च तत् ॥
स्नात्वा भुञ्जीत शङ्का चेत्परं स्नानेन शुध्यति ॥ २९ ॥
मध्ये स्नानं तु कार्यं चेत्तद्भवेदुध्दृतैर्जलैः ॥
नावगाहनमेतस्यास्तडागादौ जले तदा ॥ ३० ॥

अर्थ— भोजन करीत असतां जर स्त्री रजस्वला होईल तर तिनें तोंडांतील घास टाकून स्नान करून भोजन करावें, आणि उगीच शंका आली असें असल्यासही स्नानानेंच शुद्ध होते. तात्पर्य, भोजन करीत आसतां ऋतूची शंका आली असतांही स्नान केलेंच पाहिजे. हे जें स्त्रियांनी मध्येंच स्नान करावयाचें असतें,

तें जलाशयांतून पाणी वर काढून घेऊन स्नान करावें. जलाशयात शिरून त्यांत बुडी मारूं नये,

आशौचात प्रथमऋतुदर्शन झाल्यास.

सूतके प्रेतकाशौचे पुष्पं चेत् सिञ्चयेज्जलम् ॥
शिरस्यमृतमन्त्रेण पूतं द्विजकरच्युतम् ॥ ३१ ॥

अर्थ— जननाशौच आणि मृताशौच असतांना जर स्त्री ऋतुमती ( प्रथमऋतुमती ) होईल तर अमृतमंत्रानें ब्राह्मणाकडून तिच्या मस्तकावर उदक सेंचन करावें. कारण ब्राह्मणाच्या हातून पडलेलें उदक शुद्ध असल्यानें ती शुद्ध होते. ह्याचें तात्पर्य– ती स्त्री त्या आशौचांतून मुक्त होते असें नसून फक्त आशौचामध्यें प्रथम ऋतुमती झाल्याचा जो तिचा दोष असतो तेवढा जातो. बाकीचें पूर्वी प्राप्त झालेलें आशौच तिला आहेच.

कुर्याद्दानं च पात्राय मध्यमाय यथोचितम् ॥
कुर्यादेकत्र भुक्त्यादि पुष्पिणी तत्र तत्र च ॥ ३२ ॥

अर्थ— वरील विधि करून मध्यमपात्राला योग्य असें दान करावें; आणि त्या ऋतुमतीनें आपला भोजनादि व्यवहार एकाच ठिकाणीं करावा. ह्मणजे ऋतुमतीनें जसें वागण्यास पूर्वी सांगितलें आहे त्याप्रमाणें वागावें.

ऋतुमतीनें अज्ञानानें कोठे स्पर्श केल्यास.

अज्ञानादस्त्रगे पुष्पे स्पृष्टं यद्यत्तया तदा ॥
हस्तादर्वाक् स्थितं चापि तत्सर्वं दूषितं भवेत् ॥ ३३ ॥

अर्थ— ज्या स्त्रीला ऋतु म्हणजे काय? याचें ज्ञान नाहीं, ती स्त्री ऋतुमती होऊन जर स्पर्श करील, तर, तिनें स्पर्श केलेले पदार्थ, व तिच्यापासून एक हात लांबीच्या आंत असलेले पदार्थ अशुद्ध होतात.

ऋतुमतीनें स्पर्श केलेलें अन्न अज्ञानानें भक्षिल्यास

अज्ञानाद्दुर्ज्ञानतो वाऽपि तत्पाणिदत्तमोदनम् ॥
अन्यथा योऽत्ति नाश्नीयादसावेकद्विवासरम् ॥ ३४ ॥

अर्थ— न समजल्यामुळें किंवा भलतीच समजूत झाल्यामुळें जर कोणी ऋतुमतीच्या हातांतील अन्न भक्षण करील तर त्यानें एक दिवस किंवा दोन दिवस उपवास करावेत.

ऋतुमतीच्या सान्निध्याचा दोष

यामादर्वाक्तदभ्यर्णे पल्यङ्कासनवस्त्रके ॥
कुड्यादिसंयुते पंक्त्यासने स्नायात्सचेलकम् ॥ ३५ ॥

अर्थ— ऋतुमती झालेल्या स्त्रीच्या नजीकच्या जाग्यांत माचा, जाजम, वस्त्र ह्या वस्तु एक प्रहरापेक्षा कमी वेळ जरी असल्या तथापि त्या अशुद्ध होतात. तसेंच ती ज्या भिंतीला टेकून बसली असेल त्या

भिंतीला टेकून तिच्याच ओलीला बसले असतां अंगावरील वस्त्रांसह स्नान केलें पाहिजे.

रजस्युपरते नस्य क्षालनं स्नानमेव वा ॥
रजः प्रवर्तने यावत्तावदाशौचमेव हि ॥ ३५ ॥

अर्थ— मग त्या स्त्रीला तीन दिवस झाल्यावर चवथ्या दिवशीं वर सांगितलेले तिच्या जवळ असलेले पदार्थ धुवून टाकावेत. आणि त्या वस्तु धुणारानें स्नान करावें. स्त्री ऋतुमती झाली ह्मणजे तीन दिवस आशौच हें सामान्यतः प्राप्त होतें. पण पुढेंही जर ऋतु अंगावर जात असेल तर ऋतु जाण्याचा बंद होईपर्यंत ती अशुद्धच समजावी.

ऋतुमती बसत असलेल्या स्थलाची शुद्धि

ऋतुमत्या कृता यत्र भुक्तिः सुप्तिः स्थितिश्चिरम् ॥
निषद्या च तदुद्देशं मृज्याद्भिर्गोमयैर्जलैः ॥ ३७ ॥

अर्थ— ऋतुमतीनें ज्या ठिकाणीं भोजन, शयन, उभें राहणें, बसणें हे व्यापार केले असतील त्या जागा शेण आणि पाणी ह्यांनीं दोन वेळ सारवाव्यात.

तिला स्पर्श करणाऱ्या मुलाची शुद्धि.

तया सह तद्बालस्तु स्पृष्टः स्नानेन शुध्यति ॥

तां स्पृशन्स्तनपायी चेत्प्रोक्षणेनैव शुध्यति ॥ ३८ ॥

अर्थ— तिच्या जवळ असणारा तिचा मुलगा सोळा वर्षापर्यंतच्या वयाचा असल्यास तो स्नानानें शुद्ध होतो. आणि स्तनपान करणारा असा असल्यास ( अगदींच लहान असल्यास ) अभिमंत्रण केलेल्या उदकानें प्रोक्षण केले ह्मणजे शुद्ध होतो.

तिने भोजन केलेल्या पात्रात शुद्ध केल्यावाचून भोजन केल्यास.

तद्भुक्तपात्रे भुञ्जानोऽन्नमथाज्ञादसंस्कृते ॥
उपवासद्वयं कुर्यात्सचेलस्नानपूर्वकम् ॥ ३९ ॥

अर्थ— त्या ऋतुमती स्त्रीनें ज्या पात्रात भोजन केलें असेल तें पात्र शुद्ध केल्यावांचून त्यांत भोजन करणाऱ्यानें सचेल स्नान करून दोन उपवास करावेत. ह्मणजे शुद्ध होतो.

यदि स्पृशति तत्पात्रं तद्वस्त्रं तत्प्रदेशकम् ॥
तदा स्नात्वा जपेदष्टशतकृत्वोऽपराजितम् ॥ ४० ॥

अर्थ— ऋतुमतीचें भांडें, तिचें वस्त्र, तिची जागा याला जर कोणी शुद्ध केल्यावांचून स्पर्श करील, तर त्यानें स्नान करून अपराजित मंत्राचा एकशेहे आठ वेळां जप करावा.

अनुक्तं यद्यदत्रैव तज्ज्ञेयं लोकवर्तनात् ॥

सूतकं प्रेतकाशौचं मिश्रं वाऽथ निरूप्यते ॥ ४१ ॥

अर्थ— ह्या ठिकाणीं ऋतुमतीच्या संबंधानें जें जें सांगितलेलें नसेल तें सर्व लोकाचारावरून समजावें. आतां जननाशौच, मृताशौच आणि त्यांचें मिश्रण ह्या संबंधानें निरूपण करूं.

जननाशौच आणि मृताशौच ह्यांचा शास्त्रार्थ.

जातकं मृतकं चेति सूतकं द्विविधं स्मृतम् ॥
स्रावः पातः प्रसूतिश्च त्रिविधं जातकस्य च ॥ ४२ ॥

अर्थ— लौकिकांत मृताशौचाला सूतक ह्मणण्याची वहिवाट पडली आहे. परंतु शास्त्रांत सूतक हा सामान्यशब्द मानिला आहे. त्याचे जातक ( उत्पत्तिसंबंधी आशौच ) आणि मृतक ( मृत्युसंबंधी आशौच) असे दोन प्रकार आहेत. त्यांत जातकाचे स्राव, पात आणि प्रसूति असे तीन प्रकार आहेत.

स्राव, पात आणि प्रसव ह्यांचा काल

मासत्रये चतुर्थे च गर्भस्य स्राव उच्यते ॥
पातः स्यात्पञ्चमे षष्ठे प्रसूतिः सप्तमादिषु ॥ ४३ ॥

अर्थ— गर्भ धारण झाल्यापासून चार महिने संपेपर्यंत मध्येंच जर तो उदरांतून बाहेर आला तर त्याला स्राव ह्मणतात. पांचव्या किंवा सहाव्या महिन्यांत आला असतां पात ह्मणतात. आणि सातव्या

महिन्यांत किंवा त्याच्या पुढें आला असतां प्रसूति ह्मणतात.

गर्भस्रावाचें आशौच.

माससंख्यादिनं मातुः स्रावे सूतकमिष्यते ॥
स्नानेनैव तु शुध्यन्ति सपिण्डाश्चैव वै पिता ॥ ४४ ॥

अर्थ— स्राव झाला असतां ज्या महिन्यात स्राव झाला असेल तितके दिवस आईला आशौच समजावें, आणि सपिंड ( भाईबंद ) व पिता हे स्नानानें शुद्ध होतात.

गर्भपाताचें आशौच

पाते मातुर्यथामासं तावदेव दिनं भवेत् ॥
सूतकं तु सपिण्डानां पितुश्चैकदिन भवेत् ॥ ४५ ॥

अर्थ— पात झाला असता ज्या महिन्यात पात झाला असेल तितके दिवस मातेला आशौच असतें, आणि सपिंड व पिता ह्यांना एक दिवस आशौच असतें.

जननाशौच

प्रसूतौ चैव निर्दोषं दशाहं सूतक भवेत् ॥
क्षत्रस्य द्वादशाहं सच्छूद्रस्य पक्षमात्रकम् ॥ ४६ ॥

अर्थ— प्रसूति झाली असता आई बाप व सपिंड या सर्वांस दहा दिवस जननाशौच असते. हे आशौच क्षत्रियाना बारा दिवस असतें, आणि शूद्रांना पंधरा दिवस असतें.

त्रिदिनं यत्र विप्राणां वैश्यानां स्याच्चतुर्दिनम् ॥
क्षत्रियाणां पञ्चदिनं शूद्राणां च दिनाष्टकम् ॥ ४७ ॥

अर्थ— जेव्हां ब्राह्मणाला तीन दिवस आशौच असते त्या ठिकाणीं वैश्याला चार दिवस, क्षत्रियांना पांच दिवस, आणि शूद्रांना आठ दिवस आशौच समजावें.

नालच्छेदनाच्या पूर्वी मूल मृत झालें असता.

नाभिच्छेदनतः पूर्वं जीवन् यातो मृतो यदि ॥
मातुः पूर्णमतोऽन्येषां पितुश्च त्रिदिनं मतम् ॥ ४८ ॥

अर्थ— जीवंत उपजलेलें मूल नालच्छेदनाच्या पूर्वीच जर मृत झालें, तर मातेला दहा दिवस आशौच असतें, आणि सपिंडांना व पित्याला तीन दिवस जननाशौच असतें.

उदरात मृत झालेलें मूल जन्मलें असता

मृतस्य प्रसवे चैव नाभिच्छेदनतः परम् ॥
मातुः पितुश्च सर्वेषां जातीनां पूर्णसूतकम् ॥ ४९ ॥

अर्थ— मेलेले मूल उपजलें असता किंवा उपजलेलें मूल नालच्छेदन केल्यानंतर मृत झालें असतां ाप वगैरे सर्वास जननाशौच दहा दिवस परिपूर्ण समजावें.

दहा दिवसाच्या आत मूल मेलें असता.

**अनतीतदशाहस्य बालस्य मरणे सति ॥**
**पित्रोर्दशाहमाशौचं तदपैति च सूतकात् ॥ ५० ॥**

अर्थ— ज्या मुलाला दहा दिवस झाले नाहीत असें मूल मेलें असता आईबापाला दहा दिवस आशौच असते पण ते जननाशौचाची समाप्ति झाली म्हणजे समाप्त होतें.

दहाव्या दिवशीं किंवा अकराव्या दिवशीं मूल मृत झालें असता.

**दशाहस्यान्तदिवसे मृतादूर्ध्वं दिनद्वयम् ॥**
**अघं ततः प्रभाते तु दिवसत्रितयं पुनः ॥ ५१ ॥**

अर्थ— दहाव्या दिवशीं मूल मेलें असतां पुढें दोन दिवस मृताशौच असतें. आणि अकराव्या दिवशी मेलें असतां पुढें तीन दिवस मृताशौच असतें.

नामकरणाच्या पूर्वी मूल मृत झालें असता आशौचविधि.

**नाम्नः प्राक् प्रस्थिते बाले कर्तव्य स्नानमेव च ॥**

तिलोदनं तदर्थं तु तत्पिण्डश्च व्रतात्परम् ॥ ५२ ॥
संस्कारः स्यान्निखननं नाम्नः प्राक् बालकस्य तु ॥
तदूर्ध्वमशनादर्वाग्भवेत्तद्दहनं च वा ॥ ५३ ॥
निखनने विधातव्ये संस्थितं बालकं तदा ॥
वस्त्राद्यैर्भूषितं कृत्वा निक्षिपेत्काष्ठवद्भुवि ॥ ५४ ॥

अर्थ— नामकरण संस्कार होण्याच्या पूर्वी मूल मृत झाले असतां सर्वांनी स्नान करावें. मृताच्या उद्देशाने तिलोदन व पिंडदान वगैरे क्रिया त्याचे उपनयन झाले असल्यास करावयाच्या असतात. ह्मणून ह्या मुलाच्या त्या क्रिया करावयाच्या नाहीत नामकरणाच्या पूर्वी मृत झालेल्या मुलास निखनन [ पुरणे ] हा संस्कार करावा. नामकरणाच्या पुढे अन्नप्राशनक्रिया होण्याच्या आंत निखनन किंवा दाह करावा. त्यांत निखनन करावयाचें असता मृत मुलाला वस्त्रादिकांनी भूषित करून भूमीत काष्ठाप्रमाणे पुरावें.

दंतोत्पत्ति झाल्यावर मूल मृत झाले असता आशौच व विधि

दन्तादुपरि बालस्य दहनं संस्कृतिर्भवेत् ॥
तयोरन्यतर वाऽऽह्नर्नाम्नोऽयमयनान्तरैः (?) ॥ ५५ ॥

अर्थ— मुलाला दंतोत्पत्ति झाल्यानंतर तें मृत झाल्यास त्याचा दाहसंस्कार करावा; किंवा खनन केलें तरी हरकत नाहीं. आणि सहा महिन्याच्या पुढें नामकरण करावयाचें असल्यास मात्र हाच ह्मणजे दाहसंस्कारच केला पाहिजे.

जातदन्तशिशोर्नाशे पित्रोर्भ्रातुर्दशाहकम् ॥
प्रत्यासन्नसपिण्डानामेकरात्रमथ भवेत् ॥ ५६ ॥
अप्रत्यासन्नबन्धूनां स्नानमेव तदोदितम् ॥
आचतुर्थाः समासन्ना अनासन्नास्ततः परे ॥ ५७ ॥
स्थापने भूषणे वाहे दहने चापि संस्थितम् ॥
संस्पृशेयुः समासन्ना नत्वनासन्नबान्धवः ॥ ५८ ॥

अर्थ— ज्याला दांत उत्पन्न झाले आहेत अशा मुलाचा मृत्यु झाला असतां आईबाप आणि त्या मुलाचे बंधु (सहोदर) ह्यांना दहा दिवस मृताशौच असतें. आणि जवळच्या भाऊबंदांना एक दिवस आशौच असते. दूरच्या भाऊबंदांनीं स्नान केलें ह्मणजे त्यांची शुद्धि होते. ह्या ठिकाणीं चवथ्या पुरुषापर्यंतचे पुरुष जवळचे भाऊबंद आणि चवथ्या पुरुषाच्या पुढचे पुरुष दूरचे भाऊबंद समजावेत. प्रेताला स्नान घालणें, भूषणें घालणें, त्याला वाहून नेणें, दहन करणें वगैरे संबंधानें प्रेताला स्पर्श करण्याचा प्रसंग

असल्यास जवळच्या भाऊबंदानींच स्पर्श करावा. दूरच्या भाऊबंदांनी करूं नये.

चौलसंस्कार झालेल्या मुलाचें आशौच

कृतचौलस्य बालस्य पितुर्भ्रातुश्च पूर्ववत् ॥
आसन्नेतरबन्धूनां पञ्चाहैकाहमिष्यते ॥ ५९ ॥

अर्थ— ज्याचें चौलकर्म केलें आहे अशा मुलाचें मरण झाले असतां आईबाप व बंधु ह्यांना दहा दिवस आशौच असतें आणि जवळच्या व दूरच्या भाऊबंदांस क्रमानें पांच दिवस आणि एक दिवस आशौच असतें.

उपनयन झाल्यावर कुमार मृत झाला असता.

मरणे चोपनीतस्य पित्रादीनां तु पूर्ववत् ॥
आसन्नानां तु सर्वेषां पूर्ववत्सूतकं मतम् ॥ ६० ॥
पञ्चमानां तु षड्रात्रं षष्ठानां तु चतुर्दिनम् ॥
सप्तमानां त्रिरात्रं स्यात्तदूर्ध्वं न प्लवं मतम् ॥ ६१ ॥

अर्थ— उपनयन झालेला मुलगा मरण पावला असतां आईबाप, बंधु व जवळचे भाऊबंद ह्यांना दहा दिवस आशौच असतें, आणि दूरच्या भाऊबंदांपैकी पांचव्या पुरुपास सहा दिवस, सहाव्यास चार दिवस

आणि सातव्यास तीन दिवस आशौच असतें. सातव्या पुरुषाच्या पुढील पुरुषांस आशौच नाहीं. त्यांनीं फक्त स्नानमात्र केलें पाहिजे.

जननाशौचांत पि यानें दान करण्याचा विधि.

जननेऽप्येवमेवाघं मात्रादीनां तु सूतकम् ॥
तदा नाघं पितुर्भ्रातुर्नाभिकर्तनतः परम् ॥ ६२ ॥
पिता दद्यात्तदा स्वर्णताम्बूलवसनादिकम् ॥
अशुचिनस्तु नैव स्युर्जनास्तत्र परिग्रहे ॥ ६३ ॥
तदात्व एव दानस्यानुपपत्तिर्भवेद्यदि ॥
तदह्नः सर्वमप्यत्र दानयोग्यमिति स्मृतम् ॥ ६४ ॥

अर्थ— जननाशौचही वरील प्रमाणेंच समजावें. त्यांत एवढा मात्र विशेष आहे. तो हा कीं, मुलाचें नालच्छेदन केल्यानंतर त्या मुलाच्या बापास व बंधूस आशौच नसतें. ह्मणून त्यांनीं नालच्छेदन केल्यानंतर सुवर्ण, तांबूल, वस्त्र, वगैरे दान करावें. तें दान घेणारे लोकही अशुद्ध होत नाहींत. नालच्छेदन केल्याबरोबर दान करण्यास सवड नसल्यास तो सर्व दिवस संपेपर्यंत दान करावें. तेवढा एक दिवस त्यांना जननाशौच नसतें. तें दुसऱ्या दिवसापासून पुनः सुरूं होतें.

मातेला जननाशौच

तदा पुम्प्रसवे मातुर्दशाहमनिरीक्षणम् ॥
अघं विंशतिरात्रं स्यादनाधिकारलक्षणम् ॥ ६५ ॥
स्त्रीसूतौ तु तदेव स्यादनिरीक्षणलक्षणम् ॥
पश्चादनधिकाराघं स्यात्त्रिंशद्दिवस भवेत् ॥ ६६ ॥

अर्थ-- पुत्र झाला असतां त्याच्या आईला दहा दिवस अनिरीक्षणस्वरूप आशौच (तिचें मुखावलोकन दहा दिवस कोणीं न करणें हें आशौच) असतें. आणि पुढें वीस दिवस कर्मानधिकारलक्षण आशौच (कर्म करण्यास अधिकार नसणें हें आशौच) असतें. आणि कन्या झाली असतां मातेला दहा दिवस अनिरीक्षण आशौच असतें. व पुढें तीस दिवसपर्यंत तिला कर्मानाधिकाररूपी आशौच असतें.

वाळंतिणीशीं सहवासाचे आशौच

तस्याः सहैकवासादिसंसर्गे पितुरप्यघम् ॥
अनिरीक्षाद्यसंसर्गे त्वस्पृश्याद्यशनाद्भवेत् (?) ॥ ६७ ॥

अर्थ— वाळंतिणीच्या जवळ तिला स्पर्श करून बसणें वगैरे व्यवहार मुलाच्या पित्यानें केला असतां त्याला देखील दहा दिवस अनिरीक्षणरूप आशौच असतें.

कोणतें अशौच कोणत्या आशौचात जातें त्याविषयीं.

मृतकं मृतकेनैव सूतकं सूतकेन च ॥
शावेन शुध्यते सूतिः शावं सूत्या न शुध्यति ॥ ६८ ॥

अर्थ— एक मृताशौच प्राप्त झाल्यानंतर जर दुसरें मृताशौच प्राप्त झालें, तर पहिलें आशौच समाप्त झाल्यानें दुसरें आशौच समाप्त होतें. तसेंच एक जननाशौच प्राप्त झाल्यानंतर जर दुसरें जननाशौच प्राप्त झालें तर पहिल्याच्या समाप्तीनें दुसऱ्याची समाप्ति होतें, आणि मृताशौच प्राप्त झाल्यावर जर जननाशौच प्राप्त झालें तर मृताशौची समाप्ति झाल्यानें जननाशौचाची समाप्ति होते, परंतु जननाशौज प्राप्त झाल्यानंतर जर मृताशौच प्राप्त झालें, तर जननाशौचाच्या समाप्तीनें मृताशौचाची समाप्ति होत नाहीं असें समजावें.

देशान्तराचें लक्षण

महानद्यन्तरे यत्र गिरिर्वा व्यवधायकः ॥
वाचो यत्र विभिद्यन्ते तद्देशान्तरमुच्यते ॥ ६९ ॥
त्रिंशद्योजनदूरं वा प्रत्येकं देशभेदतः ॥
प्रोक्तं मुनिभिराशौचं सपिण्डानामिदं भवेत् ॥ ७० ॥

अर्थ— आतां देशातराचें लक्षण सागतात. मधून महानदी ( स्वतः समुद्राला मिळणारी नदी )

गेली असल्यास त्या नदीच्या दोनी तीरांवरील दोन निरनिराळे देश समजावेत. मधून एखादा पर्वत गेला असल्यास त्या पर्वताच्या दोहोंकडील बाजूंच्या देशाना देशांतर (निराळे देश) समजावे, आणि भाषाभेद असला ह्मणजे त्याला देशांतर समजावें. किंवा तीस योजनांच्या पलीकडच्या देशाला देशांतर समजावें. पूर्वी जे अशौचाचे प्रकार सांगितले आहेत ते जवळच्या भाऊबंदाला देशांतरीं देखील मान्य होतात असें मुनींनी सांगितलें आहे.

देशांतरीं असलेल्या पुत्राला देशांतरीं मृत झालेल्या मातापितराचे आशौच

पितरौ चेन्मृतौ स्यातां दूरस्थोऽपि हि पुत्रकः ॥
श्रुत्वा तद्दिनमारभ्य पुत्राणां दशरात्रकम् ॥ ७१ ॥

अर्थ— आता पुत्राविषयीं विशेष सांगतात. दूरदेशीं असलेल्या पुत्राचे आई किंवा बाप हे मेले असतां ज्या दिवशीं ते मेल्याचें समजेल त्या दिवसापासून पुढें दहा दिवस त्यानें आशौच धरावें.

पत्नी व पति ह्यांच्याविषयीं विशेष

पत्न्या अपि तथाऽऽशौचं भवेदेव विनिश्चितम् ॥
पत्न्याशौचं भवेद्भर्तुरित्येवं मुनिरब्रवीत् ॥ ७२ ॥
दूरस्था निधनं भर्तुर्दशाहात् श्रूयते यदि ॥

भार्या कुर्यादघं पूर्णं पत्न्या अपि पतिस्तथा ॥ ७३ ॥

अर्थ— पत्नी मृत झाल्यानें पतीला प्राप्त होणारें आशौच आणि पति मृत झाल्यानें पत्नीला प्राप्त होणारें आशौच हीं दोन्हीं वरीलप्रमाणेंच समजावीत. दूर देशीं असलेल्या पत्नीनें जर पतीचें मरण दहा दिवसांचे पुढें ऐकिलें तर तिनें ऐकिल्या दिवसापासून दहा दिवस आशौच धरावें. पत्नीचें आशौचही पतीनें त्या-प्रमाणेंच धरावें. असें मुनींनीं सांगितलें आहे.

मातापित्रोर्यथाऽऽशौचं दशाहं क्रियते सुतैः ॥
अनेकेऽब्देऽपि दम्पत्योस्तथैव स्यात्परस्परम् ॥ ७४ ॥

अर्थ— पुत्र मातापित्यांचें आशौच वत्सरांतरींही जसें दहा दिवस धरतात, त्याप्रमाणेंच पति आणि पत्नी ह्यांनींही एकमेकांचें आशौच केव्हांही दहा दिवस धरलें पाहिजे.

पित्याच्या दशाहाशौचात माता मृत झाल्यास

पितुर्दशाहमध्ये चेन्माता यदि मृता तदा ॥
दहेन्मन्त्राग्निना प्रेतं न कुर्यादुदकक्रियाम् ॥ ७५ ॥

अर्थ— पित्याच्या दशाह आशौचामध्यें जर माता मृत झाली तर तिच्या प्रेताच्या मंत्राग्नीनें दाह करावा. आणि पुढील क्रिया करूं नये.

पैतृकादूर्ध्वमेव स्यान्मात्राशौचं तु पक्षिणी ॥
विधायोदकधारादि कुर्यान्मातुः क्रियां ततः ॥ ७६ ॥

अर्थ--- पित्याचे दहा दिवस झाल्यावर मातेचें आशौच पक्षिणी [ दीड दिवस ] धरून नंतर तिची उदकदानादि क्रिया करावी.

मातेच्या दशाहाशौचात पिता मृत झाल्यास

मातुर्दशाहमध्ये तु मृतः स्याद्यदि वै पिता ॥
पितुर्मरणमारभ्य दशाहं शावकं भवेत् ॥ ७७ ॥
एकमेव पितु श्राद्धं कुर्याद्देशे दशाहनि ॥
ततो वै मातृकं श्राद्धं कुर्यादाद्यादि षोडश ॥ ७८ ॥

अर्थ--- मातेच्या दहा दिवसाच्या आशौचांत जर पिता मृत होईल तर पुत्रानें पित्याच्या मरणादिवसापासून पुढें दहा दिवस आशौच धरावें. नंतर प्रथम पित्याचें एकच श्राद्ध दहावे दिवशीं करून मग मातेचीं पहिल्या श्राद्धापासून सर्व षोडश श्राद्धें करावींत. नंतर पित्याचीं सर्व श्राद्धें करावींत.

दोघेही एकाच दिवशीं मृत झाल्यास

एकस्मिन्नेव काले चेन्मरणं श्रूयते तयोः ॥

दूरगोऽप्याचरेत्पुत्रो त्वाशौचमुभयोः समम् ॥ ७९ ॥

अर्थ— आणि माता व पिता हे दोघे जर एका दिवशींच मृत झाले, किंवा दोघांच्या मरणांची वार्ता पुत्राला एकदमच कळली तर त्यानें दोघांचेंही आशौच एकदमच धरावें.

दूरदेशीं गेलेल्या मनुष्याचें वर्तमान न कळल्यास व तो पुन आल्यास.

दूरदेशं गते वार्ता दूरतः श्रूयते न चेत् ॥
यदि पूर्ववयस्कस्य यावत्स्यादष्टविंशतिः ॥८०॥
तथा मध्यवयस्कस्य अब्दाः पञ्चदशैव तत ॥
तथाऽपूर्ववयस्कस्य स्यात् द्वादशवत्सरम् ॥८१॥
अत ऊर्ध्वं प्रेतकर्म कार्यं तस्य विधानतः ॥
श्राद्धं कृत्वा षडब्दं तु प्रायश्चित्तं स्वशक्तितः ॥८२॥
प्रेतकार्ये कृते तस्य यदि चेत्पुनरागतः ॥
घृतकुम्भेन संस्नाप्य सर्वौषधिभिरप्यथ ॥८३॥
संस्कारान्सकलान्कृत्वा मौञ्जीबन्धनमाचरेत् ॥
पूर्वपत्न्या सहैवास्य विवाहः कार्य एव हि ॥८४॥

अर्थ- रजस्वला स्त्री मृत झाली असतां तिला पंचगव्यानें स्नान घालून दुसरें वस्त्र नेसवून विधिपूर्वक दहन करावें.

बाळंतीण मृत झाली असता.

सूतिकायां मृतायां तु कथं कुर्वन्ति याज्ञिकाः ॥
कुम्भे सलिलमादाय पंचगव्यं तथैव च ॥ ९० ॥
पुण्याहवाचनैर्मन्त्रैः सिक्त्वा शुद्धिं लभेत्तु सा ॥
तेनापि स्नापयित्वा तु दाहं कुर्याद्यथाविधि ॥ ९१ ॥

अर्थ— प्रसूत झालेली स्त्री दहा दिवसांच्या आंत मृत झाली असतां कसें करतात? ह्याचें उत्तर असें कीं, अभिमंत्रण केलेल्या कलशांतील उदक आणि पंचगव्य ह्यांच्या योगानें पुण्याहवाचनाच्या मंत्रांनी तिला सेंचन करून, कलशोदकानें स्नान घालावें, ह्मणजे ती शुद्ध होते. मग तिचा यथाविधि दाह करावा.

दुसरे मत

दशाहाभ्यन्तरे चैव म्रियते चेत्प्रसूतिका ॥
कथं तस्या भवेच्छुद्धिर्दाहकर्म कथं भवेत् ॥ ९२ ॥
शूर्पेण स्नापयेद्देहीं दशवारं ततो जलैः ॥
पञ्चपल्लवसंकल्पैः पञ्चगव्यैः कुशोदकैः ॥ ९३ ॥

कारयित्वा ततः स्नानमभिषिञ्चेत्कुशोदकैः ॥
दाहयित्वा विधानेन मन्त्रवत्पैतृमेधिकम् ॥ ९४ ॥

अर्थ— प्रसूत झालेली स्त्री दहा दिवसांच्या आत मरण पावली असता तिची शुद्धता कशी करावी? आणि तिचें दहन कसें करावें? ह्या प्रश्नाचें उत्तर असें कीं, तिच्या अंगावर दहा वेळां सुपानें पाणी घालावें. मग नुसत्या जलानें तिला स्नान घालावें. नंतर पंचपल्लवमिश्रित उदक, पंचगव्य, कुशोदक ह्यांनी क्रमानें स्नान घालावें. ह्याप्रमाणें केल्यावर तिचें विधिपूर्वक दहन करून तिची उत्तरक्रिया करावी.

गर्भिणी स्त्री मृत झाल्यास.

प्रवक्ष्यामि क्रमेणैव शौचं हि गृहमेधिनाम् ॥ गर्भिण्यां तु मृतायां तु कथं कुर्वन्ति मानवाः ॥ ९५ ॥ गर्भिण्या मरणे प्राप्ते षण्मासाभ्यन्तरे यदि ॥ सदैव दहनं कुर्याद्गर्भच्छेदं न कारयेत् ॥ ९६ ॥ प्रेतां स्मशानं नीत्वाऽथ भर्ता पुत्रः पिताऽपि वा ॥ छेदयेदूर्ध्वं षण्मासाज्ज्येष्ठभ्राताऽपि वोदरम् ॥ ९७ ॥ नाभेरधो वामभागे गर्भच्छेदो विधीयते ॥ ततः पुण्याहमन्त्रेण सेचयेद्बालकान्विताम् ॥ ९८ ॥ जीवन्तं बालकं नीत्वा पोषणाय प्रदापयेत् ॥ उदरं चाव्रणं कृत्वा पृषदाज्येन पूरयेत् ॥

अर्थ- रजस्वला स्त्री मृत झाली असतां तिला पंचगव्यानें स्नान घालून दुसरें वस्त्र नेसवून विधिपूर्वक दहन करावें.

बाळंतीण मृत झाली असता.

सूतिकायां मृतायां तु कथं कुर्वन्ति याज्ञिकाः ॥
कुम्भे सलिलमादाय पंचगव्यं तथैव च ॥ ९० ॥
पुण्याहवाचनैर्मन्त्रैः सिक्त्वा शुद्धिं लभेत्तु सा ॥
तेनापि स्नापयित्वा तु दाहं कुर्याद्यथाविधि ॥ ९१ ॥

अर्थ— प्रसूत झालेली स्त्री दहा दिवसांच्या आंत मृत झाली असतां कसें करतात? ह्याचें उत्तर असें कीं, अभिमंत्रण केलेल्या कलशांतील उदक आणि पंचगव्य ह्यांच्या योगानें पुण्याहवाचनाच्या मंत्रांनी तिला सेंचन करून, कलशोदकानें स्नान घालावें, ह्मणजे ती शुध्द होते. मग तिचा यथाविधि दाह करावा.

दुसरे मत

दशाहाभ्यन्तरे चैव म्रियते चेत्प्रसूतिका ॥
कथं तस्या भवेच्छुद्धिर्दाहकर्म कथं भवेत् ॥ ९२ ॥
शूर्पेण स्नापयेद्देही दशवारं ततो जलैः ॥
पञ्चपल्लवसंकल्पैः पञ्चगव्यैः कुशोदकैः ॥ ९३ ॥

कारयित्वा ततः स्नानमभिषिञ्चेत्कुशोदकैः ॥
दाहयित्वा विधानेन मन्त्रवत्पैतृमेधिकम् ॥ ९४ ॥

अर्थ— प्रसूत झालेली स्त्री दहा दिवसांच्या आत मरण पावली असतां तिची शुद्धता कशी करावी? आणि तिचें दहन कसें करावें? या प्रश्नाचें उत्तर असें कीं, तिच्या अंगावर दहा वेळां सुपानें पाणी घालावें. मग तुसत्या जलानें तिला स्नान घालावें. नंतर पंचपल्लवमिश्रित उदक, पंचगव्य, कुशोदक यांनीं क्रमानें स्नान घालावें. याप्रमाणें केल्यावर तिचें विधिपूर्वक दहन करून तिची उत्तरक्रिया करावी.

गर्भिणी स्त्री मृत झाल्यास.

प्रवक्ष्यामि क्रमेणैव शौचं हि गृहमेधिनाम् ॥ गर्भिण्यां तु मृतायां तु कथं कुर्वन्ति मानवाः ॥ ९५ ॥ गर्भिण्या मरणे प्राप्ते षण्मासाभ्यन्तरे यदि ॥ सद्यैव दहनं कुर्याद्गर्भच्छेदं न कारयेत् ॥ ९६ ॥ प्रेतां स्मशानं नीत्वाऽथ भर्ता पुत्रः पिताऽपि वा ॥ छेदयेदूर्ध्वं षण्मासाज्ज्येष्ठभ्राताऽपि चोदरम् ॥ ९७ ॥ नाभेरधो वामभागे गर्भच्छेदो विधीयते ॥ ततः पुण्याहमन्त्रेण सेचयेद्बालकान्विताम् ॥ ९८ ॥ जीवन्तं बालकं नीत्वा पोषणाय प्रदापयेत् ॥ उदरं चाव्रणं कृत्वा पृषदाज्येन पूरयेत् ॥

॥ ९९ ॥ मृद्भस्मकुशगन्धोदैः पंचगव्यैः सुमन्त्रितैः ॥ स्नापयित्वा पिधा-
यान्यवस्त्रं तत्राथ तां दहेत् ॥ १०० ॥

अर्थ— आतां गृहस्थांची आशौचापासून शुद्धि क्रमानें सांगतो. त्यांत गर्भिणी स्त्री मृत झाली असतां लोक कसें करतात? हे सांगतो. गर्भिणी स्त्री जर सहा महिने होण्याच्या पूर्वी मरण पावली तर तिला स्मशानांत नेऊन त्या गर्भांशी सहवर्तमान तिचें दहन करावें. गर्भच्छेद करूं नये. आणि सहा महिन्यापेक्षा अधिक दिवस झाले असतील तर तिला स्मशानांत नेऊन तिचा पति, पुत्र, किंवा ज्येष्ठभ्राता ह्यांपैकीं कोणीही तिचें उदर नाभीच्या खालीं डाव्या बाजूला कापावें आणि आंतील मूल बाहेर काढावें मग पुण्याह-वाचनाच्या मंत्रांनीं त्या बालकासह तिला सेचन करावें. बालक जीवंत असल्यास तो पोषणाकरितां कोणाच्यातरी स्वाधीन करावा. उदराच्या छेदांत दही आणि तूप भरून तो छेद बुजवून टाकावा. मग अभिमंत्रण केलेल्या मृत्तिका, भस्म, दर्भ, चंदन ह्यांनीं मिश्रित अशा उदकानें व पंचगव्यानें तिला स्नान घालून, दुसऱ्या वस्त्रानें तिला आच्छादन करून तिचें यथाविधि दहन करावें.

पतीच्या दशाहाशौचांत पत्नी प्रसूत झाल्यास

मृते पत्यौ दशाहे स्त्री सूयते च रजस्वला ॥
सूत्वा शुद्धा यथाकालं स्नात्वा चाभरणं त्यजेत् ॥ १०१ ॥

अर्थ— पति मृत झाल्यावर त्याला दहा दिवस होण्याच्या आंतच जर त्याची स्त्री प्रसूत झाली तर ती पुढें ऋतुमती होऊन तिनें योग्यकाळीं [ चवथ्या दिवशीं ] स्नान केलें ह्मणजे शुद्ध होते. मग तिनें अलंकार वगैरे सौभाग्यवस्तूंचा त्याग करावा.

दुष्ट मृत्यु.

विद्युत्तोयाग्निचाण्डालसर्पपाशद्विजादपि ॥
वृक्षव्याघ्रपशुभ्यश्च मरणं पापकर्मणाम् ॥ १०२ ॥

अर्थ— आता दुर्मरण सांगतात— वीज, पाणी, अग्नि, चाण्डाळ, सर्प, फास, पक्षी, वृक्ष, वाघ आणि अन्यपशु यांच्यापासून पातकी मनुष्याला मरण प्राप्त होतें.

आत्मघात केल्यास.

आत्मानं घातयेद्यस्तु विषशस्त्राग्निना यदि ॥
स्वेच्छया मृत्युमाप्नोति स याति नरकं ध्रुवम् ॥ १०३ ॥
देशकालभयाद्राज्ञाऽपि संस्कर्तुं नैव शक्यते ॥
नृपाद्याज्ञां समादाय कर्तव्या प्रेतसत्क्रिया ॥ १०४ ॥
वर्षादूर्ध्वं भवेत्तस्य प्रायश्चित्तं विधानतः ॥

शान्तिकादिविधिं कृत्वा प्रोषधादिकसत्तपः ॥ १०५ ॥
मृतस्यानिच्छया सद्यः कर्तव्या प्रेतसत्क्रिया ॥
प्रायश्चित्तविधिं कृत्वा नैव कुर्यान्मृतस्य तु ॥ १०६ ॥
शस्त्रादिना हते सप्तदिनादर्वाक् मृतो यदि ॥
भवेद्दुर्मरणं प्राहुरित्येवं पूर्वसूरयः ॥ १०७ ॥

अर्थ—विष, शस्त्र किंवा अग्नि ह्यांच्या योगानें जो मनुष्य आपला घात करून घेईल तो स्वेच्छेने मृत्यु पावल्यामुळें नरकाला प्राप्त होतो. असा मृत्यु झाला असता देशकालादिकांच्या भीतीमुळे त्यांची दहनादि क्रिया करणें शक्य नसते. ह्मणून राजाची आज्ञा घेऊन त्याच्या प्रेताचें दहन करावे. नंतर एक वर्ष पूर्ण झाल्यावर प्रायश्चित्त, शांतिविधि, प्रोपधोपवास वगैरे करावेत. आणि आपली इच्छा नसतां वरील प्रकारानें जो मरण पावला असेल त्याचा प्रेतसंस्कार तत्काल करावा. प्रायश्चित्तविधि करण्याची गरज नाही. ज्याला शस्त्रादिकांचा प्रहार झाला आहे असा मनुष्य सात दिवसांच्या आंत जर मृत होईल तर ते दुर्मरण समजावे. असें प्राचीन विद्वानांचें ह्मणणें आहे.

कन्येचें आशौच.

अथ पुत्रीप्रसङ्गः। कन्यानां मरणे चौलात्प्राग्बन्धोः स्नानमिष्यते ॥

व्रतावागघमेकाहं विवाहात्प्राग्दिनत्रयम् ॥ १०८ ॥
ऊढानां मरणे पित्रोराशौचं पक्षिणी मतम् ॥
ज्ञातीनां वाःप्लवो भर्तुः पूर्णं पक्षस्य चोदितम् ॥ १०९ ॥

अर्थ— आतां कन्येविषयीं सांगतात— चौलसंस्कार करण्याच्या पूर्वी जर कन्या मृत झाली तर तिच्या आईबाप वगैरे बंधुगणानें फक्त स्नान करावें. चौलानंतर व्रतबंध होण्याच्या पूर्वी मृत झाली असतां एक दिवस आशौच धरावें. व्रतबंधानंतर विवाह होण्याच्या पूर्वी मृत झाल्यास तीन दिवस आशौच धरावें. कन्येचा विवाह झाल्यावर जर ती मृत होईल तर तिच्या मातापितरानी पक्षिणी आशौच धरावें. बंधु वगैरेंनीं स्नान करावें. आणि पति व त्याचे भाऊबंद ह्यांनी दहा दिवस पूर्ण आशौच धरावें.

पक्षिणी वगैरेचें लक्षण.

पक्षिणीलक्षणं— द्विदिवा रात्रिरेका च पक्षिणीत्यभिधीयते ॥
अहोरात्रमिति प्रोक्तं नैशिकीत्यभिधीयते ॥ ११० ॥
आसायमहरेव स्यात्सद्यस्तत्काल उच्यते ॥
एवं विचार्य निर्णीतमाशौचे तु मनीषिभिः ॥ १११ ॥

अर्थ— आता पक्षिणीचें लक्षण सांगतात— सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत असे दोन दिवस, आणि

त्या दोन दिवसाच्या मधली रात्र, ह्या कालाला पक्षिणी असें ह्मणतात. एका अहोरात्राला नैशिकी ह्मणतात. (?) अहोरात्राला एकाह अशी संज्ञा असावी. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतच्या कालाला एकाह ( एक दिवस ) ह्मणतात. आणि 'सद्यः' ह्याचा अर्थ 'तत्काल' ह्मणजे त्याच वेळी, असा आहे. असे अर्थ आशौचाच्या प्रकारणांत पंडित लोकांनी ठरविलेले आहेत. ह्यावरून पक्षिणी वगैरे शब्दाचे अर्थ जाणावेत.

प्रसूतास्वथवा तासु मृतासु पितृसद्मनि ॥
मात्रादीनां त्रिरात्रं स्यात्तत्पक्षस्यैकवासरम् ॥ ११२ ॥

अर्थः— आपल्या बापाच्या घरांत कन्या प्रसूत झाली असतां अथवा मृत झाली असतां तिच्या मातापितरांना जननाशौच आणि मृताशौच ही दोन्हीं अशौचे तीन तीन दिवस समजावीत. आणि त्या मुलीचे बंधु वगैरे मंडळींना एक दिवस आशौच समजावें.

कन्येला मातापितराचें आशौच.

पुत्रीगृहेऽथवाऽन्यत्र प्रमृतौ पितरौ यदि ॥
दशाहाभ्यन्तरे पुत्र्यास्त्रिरात्रं शावसूतकम् ॥ ११३ ॥

अर्थ— कन्येचे आईबाप कन्येच्या घरांत अथवा दुसऱ्या कोठेंही मृत झाले असतां दहा दिवसांच्या आंत केंव्हाही कन्येला समजल्यास तिनें तीन दिवस आशौच धरावें.

भ्रात्याला भगिनीचें व भगिनीला भ्रात्याचे अशौच

स्वसुर्गृहे मृतो भ्राता भ्रातुर्वाऽथ गृहे स्वसा ॥
अशौचं त्रिदिनं तत्र पक्षिण्यौ वा परत्र तु ॥ ११४ ॥

अर्थ— बहिणीच्या घरात भाऊ आणि भावाच्या घरात बहीण मृत झाली असता एकमेकांनीं एकमेकांचें आशौच तीन दिवस धरावें. ते जर दुसऱ्या ठिकाणीं मृत झाले तर परस्परांनीं परस्परांचें पक्षिणी आशौच धरावें.

भगिनीसूतकं चैव भ्रातुश्चैवाऽथ सूतकम् ॥
नैव स्याद्भ्रातृपत्न्याश्च तथा च भगिनीपतेः ॥ ११५ ॥

अर्थ— भगिनीचें सूतक भावाच्या बायकोला असत नाहीं. आणि भावाचें सूतक बहिणीच्या नवऱ्याला असत नाहीं.

परस्परं श्रुते मृत्यौ स्वस्वभ्रात्रोस्तदा तयोः ॥
पत्न्याः पत्युर्भवेत्स्नानं कुटुम्बिनामपि स्मृतम् ॥ ११६ ॥

अर्थ— बहिणीच्या नवऱ्यानें आपल्या बायकोचा बंधु मृत झालेल्याचें ऐकलें म्हणजे फक्त स्नान करावें. तसेंच भावाच्या बायकोनें आपल्या नवऱ्याची बहीण मेल्याचें ऐकलें म्हणजे स्नान करावें.

मातामहादिकाचें आशौच.

मातामहो मातुलश्च म्रियते वाऽथ तत्स्त्रियः ॥
दौहित्रो भागिनेयश्च पित्रोर्वै म्रियते स्वसा ॥ ११७ ॥
स्वगृहे त्र्यहमाशौचं परत्र स्यात्तु पक्षिणी ॥
श्रुतं बहिर्दशाहाच्चेत्स्नानेनैव च शुध्यति ॥ ११९ ॥

अर्थ— आईचा बाप, मावळा, आईची आई, मामाची बायको, मुलीचा मुलगा, बहिणीचा मुलगा, बापाची बहीण, आईची बहीण ह्यापैकीं कोणीही आपल्या घरांत आशौच ज्याला धरावयाचें आहे त्याच्या घरांत मृत झाले असतां त्यानें तीन दिवस आशौच धरावें. बाहेर दुसरीकडे मृत झाले असतां पक्षिणी; आणि दहा दिवस होऊन गेल्यावर समजल्यास फक्त स्नान केल्यानें शुद्धि होते.

ज्याचें आशौच धरण्याचें कारण नाहीं ते

व्याधितस्य कदर्यस्य ऋणग्रस्तस्य सर्वदा ॥
क्रियाहीनस्य मूर्खस्य स्त्रीजितस्य विशेषतः ॥ ११९ ॥
व्यसनासक्तचित्तस्य पराधीनस्य नित्यशः ॥
श्राद्धत्यागविहीनस्य पण्ढपाखण्डपापिनाम् ॥ १२० ॥

पतितस्य च कुष्टस्य भस्मान्तं सूतकं भवेत् ॥
यदि दग्धं शरीरं चेत्सूतकं तु दिनत्रयम् ॥ १२१ ॥

अर्थ— महाव्याधीनें ग्रासलेला, कृपण, ऋणानें गांजलेला, क्रियाहीन, मूर्ख, स्त्रीच्या इच्छेप्रमाणे वागणारा, व्यसनात गढलेला, नेहमी दुसऱ्याच्या ताब्यांत वागणारा, मातापितरांची श्राद्धे न करणारा, यतीला अन्नदान न करणारा, नपुंसक, पाखंडी, भ्रष्ट झालेला आणि दुष्ट असलेला अशा लोकांचे आशौच त्याच्या शरीराची रक्षा होईपर्यंतच समजावें. जर कदाचित् आपल्याला समजण्याच्या पूर्वीच त्याच्या देहाचें दहन झालेलें असेल तर तीन दिवस आशौच धरावें.

व्रत करणारे वगैरेंनीं आशौच न धरण्याविषयीं

व्रतिनां दीक्षितानां च याज्ञिकब्रह्मचारिणाम् ॥
नैवाशौचं भवेत्तेषां पितुश्च मरण विना ॥ १२२ ॥

अर्थ— व्रत करणारे, दीक्षा घेतलेले, यज्ञ करणारे आणि ब्रह्मचारी ह्यांना कोणाचे आशौच धरावें लागत नाहीं. फक्त पिता मृत झाला असतां मात्र ह्यांनीं आशौच धरलें पाहिजे.

श्रोत्रियादिकाचे आशौच.

श्रोत्रियाचार्यशिष्यर्षिशास्त्राध्यायाश्च वै गुरुः ॥

मित्रं धर्मी सहाध्यायी मरणे स्नानमादिशेत् ॥ १२३ ॥

अर्थ— श्रोत्रिय, आचार्य, शिष्य, ऋषि, शास्त्राध्यापक, गुरु, मित्र, धार्मिक मनुष्य आणि सहाध्यायी ह्यांचा मृत्यु झाला असतां स्नान करावें.

यज्ञादिकर्म आरंभ केले असता.

समारब्धेषु वा यज्ञमहान्यासादिकर्मसु ॥
बहुद्रव्यविनाशे तु सद्यः शौचं विधीयते ॥ १२३ ॥

अर्थ— यज्ञ, महान्यास वगैरे कर्मं आरंभिलीं असतां मध्येच आशौच प्राप्त झाल्यास तत्काल शुद्धि होते असें समजावें. तसेंच आपला मोठा द्रव्यनाश होण्याचा प्रसंग आला असतांही तत्काल शुद्धि होते. असें शास्त्रानें ठरविलें आहे.

प्रेताच्या संस्काराचा अग्नि

सन्न्यासविधिना धीमान् मृतश्चेद्धार्मिकस्तदा ॥
ब्रह्मचारी गृहस्थश्च देहसंस्कार इष्यते ॥ १२४ ॥
कायमाने गृहाद्बाह्ये शवं प्रक्षाल्य नूतनैः ॥
वसनैर्गन्धपुष्पाद्यैरलंकुर्याद्यथोचितम् ॥ १२५ ॥

अथ संस्कृतये तस्य लौकिकाग्निं यथाविधि ॥
आदाय प्रयते देशे कुर्यादौपासनानलम् ॥ १२६ ॥
विद्वच्छिष्टपुरुषशवसंस्करणाय वै ॥
एष औपासनोऽग्निः स्यादन्येषां लौकिको भवेत् ॥ १२७ ॥

अर्थ— कोणी धार्मिक मनुष्य गृहस्थ अथवा ब्रह्मचारी संन्यासविधीनें मरण पावला असतां त्याच्या देहाला संस्कार करणें इष्ट आहे. ह्मणून तो मृत झाल्यावर त्याचा देह घरांतून बाहेर आणून तें प्रेत धुवावें. नंतर नवीन वस्त्रें आणि गंध, फुलें इत्यादिक वस्तूंनीं त्या प्रेताला सुशोभित करावें, मग त्या प्रेताच्या संस्काराकरितां शुद्ध स्थलीं लौकिक अग्नि ( चुलींतील अग्नि ) आणून त्याचा यथाविधि औपासनाग्नि तयार करावा हा औपासनाग्नि ज्ञानवान् आणि धार्मिक अशा मनुष्याच्या प्रेताचा दहनविधि करावयाचा असेल, तरच तयार करावा. बाकीच्या लोकांच्या प्रेताचा लौकिकाग्नीनेंच दाह करावा.

संतापाग्नि वगैरे अग्नींच्या ग्रहणाचे प्रसंग

कन्याया विधवायाश्च सन्तापाग्निरिहेष्यते ॥
अन्यासां वनितानां स्यादन्वग्निरिह कर्मणि ॥ १२८ ॥

अर्थ— विवाह न झालेली मुलगी किंवा विधवा स्त्री ह्यांच्या दहनाला संतापाग्नि असणें योग्य आहे.

आणि इतर स्त्रियांच्या दहनाला अन्वग्नि असावा.

लौकिकाग्नीचे ग्रहण व लौकिकाग्नीचे लक्षण

द्विजातिव्यतिरिक्तानां सर्वेषां लौकिको भवेत् ॥
गृहे पाकादिकार्यार्थं प्रयुक्तो लौकिकोऽनलः ॥ १२९ ॥

अर्थ— त्रैवर्णिकावांचून बाकीच्या सर्व जातींतील मनुष्यांच्या प्रेतक्रियेस लौकिका अग्निसावा. घरात स्वयंपाक वगैरे करण्याकरितां तयार केलेला जो अग्नि तो लौकिकाग्नि होय.

औपासनाग्नीचे लक्षण.

योग्यप्रदेशे संस्थाप्य द्रव्यैस्तैः शास्त्रचोदितैः ॥
हुत्वा संस्कृत्य बाह्याग्निरौपासन इति स्मृतः ॥ १३० ॥

अर्थ— योग्यप्रदेशी (स्थंडिल किंवा कुंड ह्यांत) लौकिकाग्नीची स्थापना करून शास्त्रांत सांगितलेल्या द्रव्यानी हवन करून संस्कार करून तयार केलेला जो अग्नि तो औपासनाग्नि होय.

सतापाग्नीचें लक्षण.

दर्भैर्दर्भैरिति पञ्चकृत्वः सन्तापयेत्ततः ॥
काष्ठौघैर्बोधितो वन्हिः सन्तापाग्निरितीरितः ॥ १३१ ॥

अर्थ— पांच वेळ दर्भ पेटवून उत्पन्न केलेल्या अग्नीस लाकडाच्या योगानें प्रज्वलित केला म्हणजे त्याला संतापाग्नि म्हणतात.

अन्वग्नीचें लक्षण.

चुल्यामग्निं समुज्वाल्य न्यस्य स्थालीं तदूर्ध्वतः ॥
तत्र स्थितैः करीषाद्यैर्बोधितोऽन्वग्निरिष्यते ॥ १३२ ॥

अर्थ— चुलींत अग्नि पेटवून त्याच्यावर पात्र ठेवून त्यांत वाळलेल्या शेणी वगैरे इंधन टाकून प्रज्वलित केलेल्या अग्नीस अन्वग्नि म्हणतात.

तत्तच्छरीरसंस्कारे यस्तु योग्य इतीष्यते ॥
अग्निं तमेव काष्ठाद्यैरुखायां प्रतिबोधयेत् ॥ १३३ ॥

अर्थ— त्या त्या शरीराच्या दाहक्रियेला जो योग्य अग्नि असेल तो अग्नि काष्ठादिकाच्या योगानें शेगडींत किंवा गाडग्यांत प्रज्वलित करावा.

प्रेतवहनादिकाविषयीं.

वोढारश्चाथ चत्वारः कल्पनीयाः सजातयः ॥
त एव योज्या भूपायां वाहे दाहे शवस्य हि ॥ १३४ ॥

अर्थ— प्रेत वाहणारे चार असामी आपल्या जातीचेच असावेत. आणि त्यांनीं प्रेताला भूषित करणें, वाहणें, दाह करणे ह्या क्रिया कराव्यात.

शोभमाने विमाने च शाययित्वा शवं दृढम् ॥
मुखाद्यङ्गं समाच्छाद्य वस्त्रैः स्रग्भिस्तदूर्ध्वतः ॥ १३५ ॥
तद्विमानं समाधृत्य शनैर्ग्रामाभिमस्तकः ॥
वोढारस्ते नयेयुस्तं नयेदेक उखानलम् ॥ १३६ ॥

अर्थ— सुशोभित विमान करून त्यांत तें प्रेत न हालेल अशा प्रकारें निजवावें. मग वस्त्रानें त्याचें मुख वगैरे सर्व शरीर झाकावें; आणि त्याच्यावर फुलांच्या माळा घालाव्यात. मग तें विमान उचलून चार असामींनीं त्या प्रेताचें मस्तक गांवाकडे होईल अशा रीतीनें खांद्यावर घेऊन हळू हळू न्यावें. आणि एका मनुष्यानें तो अग्नि बरोबर न्यावा.

अर्धमार्गांतील क्रिया

विमानमवरोप्याथ मार्गस्यार्धे निवेश्य च ॥
विधृत्य तन्मुखं स्वीयो मुहुस्तोयैस्तु सिञ्चयेत् ॥ १३७ ॥
विमानस्य पुरोदेशे गच्छेयुर्जातयस्ततः ॥

शवानुगमनं कुर्युः शेषा मार्गे स्त्रियोऽपि च ॥ १३८ ॥

अर्थ— स्मशानाच्या अर्ध्या वाटेवर गेल्यानंतर तें विमान खालीं ठेवावें. मग त्या मृताच्या जवळच्या मनुष्यानें (पुत्र वगैरेनें) त्याच्या तोंडावरील आच्छादन काढून त्याच्या तोंडांत थोडेंसे पाणी त्याचेवर घालावें. विमानाच्या पुढें त्या मृत झालेल्या मनुष्याच्या नातलगांनीं गमन करावें आणि बाकीच्या मंडळींनीं व स्त्रियांनी मागून गमन करावें.

चितेवरील प्रेतसंस्कार.

प्रमादपरिहारार्थं परीक्ष्यैवं प्रयत्नतः ॥
स्मशानाभिमुखं पश्चान्नीत्वा तत्रावरोप्य च ॥ १३९ ॥
ततः संस्थितमुद्धृत्य चितायां पूर्वदिङ्मुखम् ॥
उपवेश्योत्तरास्यं वा मुखरन्ध्रेषु सप्तसु ॥ १४० ॥
सुवर्णेनोद्धृतं सर्पिर्दधि च स्पर्शयेत्ततः ॥
अक्षतांश्च तिलांश्चापि मस्तके प्रक्षिपेदनु ॥ १४१ ॥

अर्थ— चुकी न व्हावी म्हणून अशा तऱ्हेनें परीक्षा करून मग तें प्रेत स्मशानाकडे नेऊन तेथें ठेवावें. मग पूर्वेकडे अथवा उत्तरेकडे मस्तक करून त्या प्रेताला चितेवर ठेवावें. नंतर तूप आणि

दही सोन्याच्या तुकड्यानें घेऊन त्या प्रेताचें तोंड, नाकाची दोन छिद्रे, दोन डोळे आणि दोन कान ह्या सात ठिकाणीं घालावें. अक्षता आणि तीळ त्याच्या मस्तकावर टाकावेत.

एकवारं जलं सव्यधारया पातयेत्ततः ॥
द्विवारमपसव्येन शवनालकसेचकः ॥ १४२ ॥
ततोऽपि सर्वबन्धूनां पर्ययास्तु त्रयो मताः ॥
पूर्वान्त्यौ सव्यवृत्त्यैव मध्यमस्त्वपसव्यतः ॥ १४३ ॥
मुक्तकेशाः कनिष्ठा ये प्रलम्बितकरद्वयाः ॥
पर्ययद्वितयं कुर्युस्तृतीय वृद्धपूर्वकम् ॥ १४४ ॥

अर्थ— त्या प्रेताच्या मुखात प्रथम ज्यानें पाणी घातलें असेल त्यानें चितेवरील प्रेताच्या मुखांत एकवार सरळें पाणी द्यावें. आणि नंतर दोन वेळा अंगठ्याकडून पाणी द्यावें. मग बाकीच्या सर्व मंडळींनीं तीन पर्यय (क्रम) करावेत. त्यात पहिल्या आणि तिसऱ्या पर्ययांत प्रेताच्या मुखांत पाणी सव्यानें घालावें. आणि मधल्या दुसऱ्या पर्ययांत अपसव्यानें घालावें. त्यांत पहिला आणि तिसरा पयय मृत झालेल्या मनुष्यापेक्षां जे लहान असतील त्यांनीं केश मोकळे सोडून सरळ हातानें पाणी देऊन

प्रारंभ करावा. आणि मधला पर्यय मृत झालेल्या मनुष्यापेक्षां वृद्ध असलेल्या आप्तस्त्रीयांनी अपसव्यानें प्रारंभ करावा.

ततः प्रदक्षिणीकुर्याच्चितापार्श्वे परिस्तरम् ॥
खादिरैरिन्धनैरन्यैरथवा हस्तविस्तृतम् ॥ १४५ ॥

अर्थ— नंतर त्या चितेला प्रदक्षिणा करावी. मग चितेवर एका बाजूस खैराच्या किंवा दुसऱ्या लाकडाचें एकहात विस्ताराचें परिस्तर (? स्थंडिल असा अर्थ असावा) करावें.

उखावह्निं समुद्दीप्य सकृदाज्यं प्रयोज्य च ॥
पर्युक्ष्य निक्षिपेत्पश्चाच्छनैस्तत्र परिस्तरे ॥ १४६ ॥
ततः समन्तात्तस्योर्ध्वं निदध्यात्काष्ठसञ्चयम् ॥
सर्वतोऽग्निं समुज्वाल्य सम्प्लुष्यात्तत्कलेवरम् ॥ १४७ ॥

अर्थ— मग त्या शेगडीतील किंवा गाडग्यांतील पूर्वी आणलेला अग्नि प्रज्वलित करून त्यावर एक तुपाची आहुति घालून त्या अग्नीच्या भोवत्यानें उदकानें सेचन करून, तो अग्नि त्या परिस्तरावर टाकावा. नंतर त्या परिस्तरावर चोहीकडून लाकडांचा ढीग घालून, त्या चितेवर तो अग्नि चोहीकडून पेटवावा, आणि ते मृताचें शरीर दहन करावें.

चिता रचणे वगैरेचे मंत्र व विधि

ॐ ह्रीं ह्रः काष्ठसञ्चयं करोमि स्वाहा ॥ १ ॥ ॐ ह्रीं ह्रौं झौं अ सि आ उ सा काष्ठे शवं स्थापयामि स्वाहा ॥ २ ॥ इति मंत्रेण पञ्चामृतैरभिषिञ्च्य तत्पुत्रादयो वा त्रिःप्रदक्षिणां कृत्वा काष्ठे शवं स्थापयेयुः ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं ह्रः' इत्यादि मंत्रानें लांकडे गोळा करावीत, नंतर 'ॐ ह्रीं ह्रौं' इत्यादि मंत्रानें त्या काष्ठांवर ते प्रेत ठेवावें. ते मृताच्या पुत्रानें किंवा दुसऱ्या कोणीतरी पंचामृतानें अभिषेक करून त्याला तीन प्रदक्षिणा घालून ठेवावें.

ॐ ॐ ॐ ॐ रं रं रं रं अग्निसन्धुक्षणं करोमि स्वाहा ॥ अनेनाग्निं सन्धुक्ष्य सर्पिरादिना प्रसिञ्च्य प्रज्वाल्य जलाशयं गत्वा स्नानं कुर्यात् ॥

अर्थ— नंतर 'ॐ ॐ' इत्यादि मंत्रानें अग्नि वाढवून त्यावर तूप वगैरे घालून प्रज्वलित करून मग जलाशयांत जाऊन स्नान करावें.

अथोदकान्तमायान्तु सर्वे ते ज्ञातिभिः सह ॥
वोढारस्तत्र कर्ता च यान्तु कृत्वा प्रदक्षिणम् ॥ १४८ ॥

अर्थ— मग वाहक, कर्ता वगैरे सर्व मंडळींनी त्या चितेला प्रदक्षिणा करून पाण्याच्या सन्निध मात्र व्हावें.

दुर्योगावर मरण झाले असता प्रेतसंस्कार करणाऱ्याला प्रायश्चित्त

तिथिवारर्क्षयोगेषु दुष्टेषु मरणं यदि ॥ मृतस्योत्थापनं चैव दीर्घकालादभूद्यदि ॥ १४९ ॥ तद्दोषपरिहारार्थं कर्ता कृत्वा प्रदक्षिणम् ॥ प्रांजलिः प्रार्थ्य गृण्हीयात्प्रायश्चित्तं विपश्चितः ॥ १५० ॥ यथाशक्ति जिनेज्या च महायन्त्रस्य पूजनम् ॥ शान्तिहोमयुतो जाप्यो महामन्त्रस्य तस्य वै ॥ १५१ ॥ आहारस्य प्रदानं च धार्मिकाणां शतस्य वा ॥ तदर्धस्याथ वा पंचविंशतेः प्रविधीयते ॥ १५२ ॥ तीर्थस्नानानि वन्द्यानि नव वा सप्त पंच वा ॥ दुष्टतिथ्यादिमरणे प्रायश्चित्तमिदं भवेत् ॥ १५३ ॥

अर्थ—तिथि, वार, नक्षत्र आणि योग हे मरणकाली वाईट असले तर अथवा मृत मनुष्य पुष्कळ वेळानें ( स्मशानात नेल्यावर ) उठून बसल्यास त्या दोषाच्या निवारणाकरितां कर्त्यानें ( प्रेतसंस्कार करणाऱ्यानें ] प्रायश्चित्त करावें. त्यानें पंडितांना प्रदक्षिणा करून ह्या दोषाला प्रायश्चित्त सांगण्याबद्दल त्यांची प्रार्थना करावी, आणि प्रायश्चित्त करावें. ते असें—आपल्या शक्तीप्रमाणें जिनपूजा करावी. महायंत्राचें पूजन करावें. शंभर, पन्नास किंवा पंचवीस धार्मिकांना आहारदान करावें. शांतिहोमयुक्त असा मूलमंत्राचा

जप करावा. नऊ, सात किंवा पांच तीर्थस्नानें करावीत. ह्याप्रमाणे दुष्टतिथ्यादिकांचे ठिकाणी मरण झालें असतां प्रायश्चित्त करावें.

दुष्काळ वगैरेसंबधाने मरण झालें असता

अतिदुर्भिक्षशस्त्राग्निजलयातादिना मृते ॥
प्रायश्चित्तं तु पुत्रादेस्तदानीमिदमिष्यते ॥ १५४ ॥
महायन्त्रं समाराध्य शान्तिहोमौ विधाय च ॥
अष्टोत्तरसहस्रेण घटैरष्टशतेन वा ॥ १५५ ॥
जिनस्य स्नपनं कार्यं पूजा च महती तदा ॥
दश तीर्थानि वन्द्यानि नव वा सप्त पञ्च वा ॥ १५६
गोदानं क्षेत्रदानं च तीर्थस्य विदुषामपि ॥
पञ्चानां मिथुनानां तु अन्नदानं सुधर्मिणाम् ॥ १५७ ॥
अब्दादर्वाग्विधायैवं पूजनीयो जिनोत्तमः ॥
एवं कृते तु बन्धूनां स दोष उपशाम्यति ॥ १५८ ॥

अर्थः—अतिशय दुष्काळ, शस्त्र, अग्नि, जलपर्यटन ह्या योगानें जर कोणी मृत झाला, तर त्या वेळी

त्याच्या पुत्रादिकांनीं प्रायश्चित्त करावें.' महायंत्राचें पूजन करून शांतिपाठ आणि होम करावा. अष्टोत्तरसहस्र किंवा अष्टोत्तरशत कलशांनीं श्रीजिनाला अभिषेक करून महापूजा करावी. दहा, नऊ, सात किंवा पाच तीर्थस्नानें करावीत. 'तीर्थक्षेत्रांतील' विद्वान् ब्राह्मणांना गोप्रदान भूमिदान करावें. धार्मिक अशा पांच दंपत्यांना भोजन घालावें. हा प्रायश्चित्तविधि मृताला एक वर्ष पूर्ण होण्याच्या आंत करावा. नंतर श्रीजिनाचें पूजन करावें. ह्याप्रमाणें प्रायश्चित्त केलें म्हणजे मृत झालेल्याच्या बंधुवर्गाचा तो दोष शांत होतो,

प्रायश्चित्त कोणी सांगावें?

विद्वद्भिशिष्टपुरुषैः प्रायश्चित्तमिदं तदा ॥
वक्तव्यं प्रकटं कृत्वा ग्राह्यं कर्त्रा यथाबलम् ॥ १५९ ॥

अर्थ— विद्वान् लोकांनीं प्रायश्चित्त हें सांगावें, आणि कर्त्यानें तें प्रायश्चित्त आपल्या शक्तीप्रमाणें करावें.

क्षौरविधि.

ततः कपालदहने जाते कर्ता च दाहकः ॥
ज्ञातयश्च यथायोग्यं विदध्युर्वपनं तदा ॥ १६० ॥
मातुः पितुः पितृव्यस्य मातुलस्याग्रजस्य च ॥

श्वशुराचार्ययोरेषां पत्नीनां च पितृष्वसुः ॥ १६१ ॥
मातृष्वसुर्भगिन्याश्च ज्येष्ठाया मरणे सति ॥
दृष्टे तदानीं वपनं श्रुते प्राङ्मासतो भवेत् ॥ १६२ ॥
मातरं पितरं ज्येष्ठमाचार्यं श्वशुरं विना ॥
न कार्यं वपनं कन्यामृतौ गर्भवतीं तदा (?) ॥ १६३ ॥

अर्थ—नंतर त्या प्रेताचें मस्तक दहन झाल्यावर कर्ता (पुत्र वगैरे मृताच्या अंत्यकर्माचा अधिकारी) किंवा दहन करणारा आणि मृताचा बंधुवर्ग ह्यांपैकीं ज्यांना अधिकार असेल त्यांनी यथाशास्त्र वपन (क्षौर) करावें. आईबाप मृत झाले असतां पुत्रानें वपन करावें. मातुल, ज्येष्ठभ्राता, श्वशुर, आचार्य आणि ह्यांच्या स्त्रिया, आईची वहीण, बापाची वहीण आणि आपली वडील वहीण ह्यांपैकीं कोणीही मृत्यु पावले असतां वपन करावें. आईबाप किंवा आपल्यापेक्षां वडील असे कोणी मृत झाल्यास व आचार्य, श्वशुर हे मृत झाल्यास वपन करावें. हा वपनविधि मृताच्या मरणकालीं पुत्रादिक तेथें असल्यास त्यांनीं तत्काल करावा. आणि ते जर देशांतरीं असतील तर त्यांनी मृताला एक महिना होण्याच्या आंत मरण कळल्यास करावा. नाहींतर करूं नये. कन्या मृत झाली असतां वपन करूं नये.

ततोऽवगाह्य सलिले कटिद्घ्ने सचेलकम् ॥
निमज्ज्योत्थाय वारांस्त्रीन् स्नानं कुर्याद्यथाविधि ॥ १६४ ॥
जलान्निर्गत्य तत्तीरे वस्त्रं निष्पीड्य तत्पुनः ॥
धृत्वाऽऽचम्य ततः प्राणायामं कुर्यात्समन्त्रकम् ॥ १६५ ॥

अर्थ— वपन झाल्यावर कंबरेइतक्या पाण्यांत जाऊन, तीन वेळ नेसलेल्या आणि पांघरलेल्या वस्त्रासह बुड्या मारून यथाविधि स्नान करावें. नंतर पाण्यांतून तीरावर येऊन अंगावरचें वस्त्र पिळून नेसावें. आणि आचमन प्राणायम मंत्रपूर्वक करावेत.

शिलास्थापन व ग्रामप्रवेशविधि.

ततो मृतस्य तस्यास्य रत्नत्रयसमाश्रयम् ॥
देहं विनष्टं सन्न्याससमाधिमृतिसाधनम् ॥ १६६ ॥
उत्कृष्टपरलोकस्य सम्प्राप्तेरपि कारणम् ॥
मत्वेति धर्मवात्सल्याद्बन्धुवात्सल्यतोऽपि च ॥ १६७ ॥
तद्देहप्रतिबिम्बार्थं मण्डपे तद्विनाऽपि वा ॥
स्थापयेदेकमश्मानं तीरे पिण्डादिदत्तये ॥ १६८ ॥

पिण्डं तिलोदकं चापि कर्ता दद्याच्छिलाग्रतः ॥
सर्वे पि बन्धवो दद्युः स्नात्वा तत्र तिलोदकम् ॥ १६९ ॥
ततोऽपि स्नानमाचार्यो निमज्जनसमन्वितम् ॥
ततः कनिष्ठं कृत्वाऽग्रे सर्वे ग्रामं प्रयान्तु वै ॥ १७० ॥

अर्थः— नंतर-रत्नत्रयाला आश्रय, संन्यास किंवा समाधि ह्यांच्या योगानें मृत्यु येण्याचें साधन, उत्कृष्ट अशा परलोकांच्या प्राप्तीचें बीज असा जो मृत झालेल्या त्या जीवाचा देह तो नष्ट झाला! असें मानून-धर्मप्रेमानें व मृत झालेल्या जीवाविषयींच्या प्रेमानें त्याच्या शरीराची प्रतिकृति (प्रतिमा) असें समजून एक पाषाण, जलाशयाच्या तीरावर मंडप करून त्यात किंवा मंडप न घालतां स्थापन करावी. नंतर मृताची उत्तरक्रिया करणाऱ्यानें त्या शिलेपुढें पिंडदान करावें, व तिलोदकदान करावें. मग बाकीच्या बंधुवर्गानेंही स्नान करून त्या शिलेच्या अग्रभागीं तिलोदक द्यावें. नंतर क्रिया सांगणाऱ्या आचार्यानें स्नान केल्यावर त्या ठिकाणीं आलेल्या मंडळींत जो सर्वांत लहान असेल त्याला पुढें करून त्याच्यापेक्षां मोठ्याला त्याच्या पाठीमागें ह्या क्रमानें सर्वांनीं गांवांत जावें.

दुसऱ्या दिवसापासून करण्याची क्रिया.

परेद्युरपि पूर्वाह्णे योषितो ज्ञातयोऽपि वा ॥

गत्वा स्मशानं तत्राग्नौ विदध्युः क्षीरसेचनम् ॥ १७१ ॥
तृतीये दिवसे कुर्यादग्निनिर्वापनं प्रगे ॥
अस्थिसञ्चयनं तुर्ये पञ्चमे वेदिनिर्मितिम् ॥ १७२ ॥
तत्र पुष्पाजंलिं षष्ठे सप्तमे बलिकर्म च ॥
वृक्षस्य स्थापनं पश्चान्नवमे भस्मसंस्कृतम् ॥ १७३ ॥
दशमे तु गृहामत्रवासःशुद्धिं विधाय च ॥
स्नात्वा च स्नापयित्वा च दाहकं भोजयेद्गृहे ॥ १७४ ॥
एवं दशाहपर्यन्तमेतत्कर्म विधीयते ॥
पिण्डं तिलोदकं चापि कर्ता दद्यात्तदाऽन्वहम् ॥ १७५ ॥

अर्थ— दुसऱ्या दिवशी प्रातःकाली स्त्रिया किंवा मृताच्या बंधुगणापैकीं कोणी तरी स्मशानात चितेवरील अग्नीवर दूध शिंपडावें. तिसऱ्या दिवशी सकाळी अग्नि शांत करावा. चवथ्या दिवशी सकाळी मृताच्या अस्थि गोळा कराव्यात. पांचव्या दिवशीं वेदिनिर्माण ( प्रेत दहन केलेल्या जागीं वेदि ह्मणजे, कट्टा ) करावें. सहाव्या दिवशीं त्यावर पुष्पांजलि द्यावी. सातव्या दिवशी बलिदान करावें. आठव्या दिवशीं वृक्षस्थापना करावी. नवव्या दिवशीं भस्मसंस्कार करावा, आणि दहाव्या दिवशी घर, भांडीं

वगैरे वगैरे वस्तु शुद्ध करून सर्वांनी स्नान करून व प्रेत दहन करणाऱ्यास स्नान घालून त्याला आपल्या घरी भोजन घालावें. याप्रमाणें दहा दिवसपर्यंत सर्व क्रिया करावी. या दहा दिवसांत उत्तरकर्म करणाऱ्यानें प्रतिदिवशीं पिंड आणि तिलोदक यांचें दान मृताच्या उद्देशानें करावें.

पिण्डप्रदानतः पूर्वमन्ते च स्नानमिष्यते ॥
पिण्डः कपित्थमात्रश्च स च शाल्यन्धसा कृतः ॥ १७६ ॥
तत्पाकश्च बहिः कार्यस्तत्पात्रं च शिलाऽपि च ॥
कर्तुः संव्यानकं चापि बहिः स्थाप्यानि गोपिते ॥ १७७ ॥

अर्थ— पिंडदान करण्याच्या पूर्वी आणि पिंडदान केल्यानंतर असें दोन वेळ कर्त्यानें स्नान करावें. पिंड तांदुळ शिजवून त्याच्या भाताचा कवठा एवढा मोठा करावा. पिंडाकरितां जे तांदूळ शिजवावयाचे ते घरांत शिजवूं नयेत, बाहेर शिजवावेत, आणि भाताचें भांडें, शिळा आणि पिंडदान करतांना असलेलें नेसावयाचें व पांघरावयाचें अशीं दोन वस्त्रें बाहेरच कोठेतरी गुप्त ठिकाणीं ठेवावीत; घरांत आणूं नयेत.

[illegible]

कर्तुः प्रेतादिपर्यन्तं न देवादिगृहाश्रमः ॥
नाधीत्यध्यापनादीनि न ताम्बूलं न चन्दनम् ॥ १७८ ॥

न खट्वाशयनं चापि न सदस्युपवेशनम् ॥
न क्षौरं न द्विभुक्तिश्च न क्षीरघृतसेवनम् ॥ १७९ ॥
न देशान्तरयानं च नोत्सवागारभोजनम् ॥
न योपासेवनं चापि नाभ्यङ्गस्नानमेव च ॥ १८० ॥
न मृष्टभक्ष्यसेवा च नाक्षादिक्रीडनं तथा ॥
नोष्णीषधारणं चैषां प्रेतदीक्षा भवेदिह ॥ १८१ ॥

अर्थ— मृताची उत्तरक्रिया करणाऱ्यानें ती क्रिया समाप्त होईपर्यंत देवपूजा वगैरे गृहस्थाश्रमाच्या क्रिया करूं नयेत. अध्ययन अध्यापन करूं नये. तांबूल भक्षण, चंदन धारण करूं नये. पलंगावर शयन करूं नये. सभेत बसूं नये. क्षौर करूं नये. दोन वेळ भोजन, दूध, तूप ह्यांचें सेवन करूं नये स्त्रीसमागम करूं नये. तेल लाऊन स्नान करूं नये देशांतरी गमन करूं नये. ज्याच्या घरांत उत्सव असेल तेथें भोजन करूं नये. गोड अन्न भक्षण करूं नये. फासे सोंगट्या वगैरेंनी खेळूं नये. डोकीला पागोटें वगैरे घालूं नये. ह्याप्रमाणें ही प्रेतदीक्षा समजावी.

यावन्न क्रियते शेषक्रिया तावादिदं व्रतम् ॥
आचार्यकर्तुरेकस्य ज्ञातीनां द्वादशाहतः ॥ १८२ ॥ (?)

अर्थ— आचार्य आणि कर्ता या दोघांनी हें दशील व्रत सर्वक्रिया समाप्त होईपर्यंत ( चवदा दिवस ) करावें. आणि इतर भाऊबंदांनी हें व्रत बारा दिवस करावें.

कर्तृनिर्णय व इतर गोत्रार्थ.

कर्ता पुत्रश्च पौत्रश्च प्रपौत्रः सहजोऽथवा ॥
तत्सन्तानः सपिण्डानां सन्तानो वा भवेदिह ॥ १८३ ॥
सर्वेषामप्यभावे तु भर्ता भार्या परस्परम् ॥
तत्राप्यन्यतराभावे भवेदेकः सजातिकः ॥ १८४ ॥
उपनीतिविहीनोऽपि भवेत्कर्ता कथञ्चन ॥
स चाचार्योक्तमन्त्रान्ते स्वाहाकारं प्रयोजयेत ॥ १८५ ॥
प्रेतकार्यस्य पाश्चात्यक्रिया शेषक्रिया भवेत् ॥
तस्याप्यघस्य संशुद्धिर्दशमे दिवसे भवेत् ॥ १८६ ॥
तदैव पिण्डं पाषाणमुद्धृत्य सलिले क्षिपेत् ॥
तदूर्ध्वं द्वादशाहं तु भवेच्छेषक्रियाक्रमः ॥ १८७ ॥

अर्थ— मृताची क्रिया करण्याचा अधिकार पुत्र, नातु, पणतु, बंधु त्याचे मुलगे आणि दहा दिवस

आशौच धरणारे भाऊबंद इतक्यांना आहे. त्यांत पुत्र नसल्यास क्रमानें पुढच्यापैकीं जो असेल त्याला अधिकार समजावा. हे वर सांगितलेले जे पुरुष त्यांपैकीं जर कोणीच नसेल तर पत्नीला अधिकार आहे. आणि पत्नीचें प्रेतकर्म करण्यास पतीला अधिकार आहे. वर जे अधिकारी सांगितले आहेत त्यांतील जो प्रेतकर्म करण्याला योग्य असेल त्याचें उपनयन झालें नसलें तरी कांहीं हरकत नाहीं. त्यानें आचार्यानें मंत्र म्हटल्यावर फक्त स्वाहाकार म्हणावा. प्रेतदहन केल्यानंतरची जी क्रिया तिला शेषक्रिया म्हणतात. ती सर्व क्रिया संपेपर्यंत ( दहा दिवसपर्यंत ) कर्ता अशुचि समजावा. दहा दिवसांनंतर तो शुद्ध होतो. कर्त्यानें दहावे दिवशीं पिंड आणि पाषाण पाण्यांत टाकून न्हावेत. मग पुढें बाराव्या दिवसापर्यंत शेषक्रिया क्रमानें करावयाची असते ती करावी.

अस्थिसंचय.

तदाऽस्थिसञ्चयश्चापि कुजवारे निषिध्यते ॥
तथैव मन्दवारे च भार्गवादित्ययोरपि ॥ १८८ ॥
अस्थीनि तानि स्थाप्यानि पर्वतादिशिलाबिले ॥
प्रकृत्यवधिखातोर्व्यामथवा पौरुषावटे ॥ १८९ ॥

अर्थ— मृताच्या अस्थि गोळा करणें तें मंगळवार, शनिवार, शुक्रवार आणि रविवार या वारीं करूं

नये. अस्थि काढून पर्वताच्या गुहेंत ठेवाव्यात. किंवा जमिनींत पुरुषभर ( पांच हात ) किंवा साडेतीन हात खड्डा काढून त्यांत पुरून ठेवाव्यात.

एकादशाहकृत्य.

एकादशेऽह्नि दहनभूषावहनकारकान् ॥
इति षट्पुरुषान् स्नानभोजनैः परितर्पयेत् ॥ १०० ॥

अर्थ— अकराव्या दिवशीं-प्रेतास दहन करणारा एक, प्रेताला सुशोभित करणारा एक आणि चार वाहक या सहा असामींना-स्नान व भोजन घालून संतुष्ट करावें.

द्वादशाहकृत्य.

द्वादशे दिवसे श्रीमज्जिनपूजापुरस्सरम् ॥
मुनीनां पात्रयानां च श्राद्धं कुर्यात्समाहितः ॥ १०१ ॥
श्रद्धयाऽन्नप्रदानं तु सद्भ्यः श्राद्धमितीष्यते ॥
मासे मासे भवेच्छ्राद्धं तद्दिने वत्सरावधि ॥ १०२ ॥
अत ऊर्ध्वं भवेदब्दश्राद्धं तु प्रतिवत्सरम् ॥
आद्वादशाब्दमेवैतत्क्रियते प्रेतगोचरम् ॥ १०३ ॥

अर्थ— बाराव्या दिवशीं श्रीजिनाची पूजा करून मुनी आणि बांधव ह्यांना श्राद्ध घालावें. भक्तीनें सज्जनांना अन्न देणें ह्याला श्राद्ध असें ह्मणतात. हें श्राद्ध एक वर्षपर्यंत प्रत्येक महिन्यांतील मृततिथीला करावें. एक वर्षाच्या पुढें प्रतिवर्षी वर्षश्राद्ध बारा वर्षेपर्यंत मृताच्या उद्देशानें करावें.

मृताची बिंबस्थापना

सुप्रसिध्दे मृते पुंसि संन्यासध्यानयोगतः ॥
तद्बिम्बं स्थापयेत् पुण्यप्रदेशे मण्डपादिके ॥ १९४ ॥

अर्थ— एखादा सुप्रसिद्ध पुरुष जर संन्यासविधी करून किंवा ध्यानसमाधीनें मृत्यु पावला असेल तर त्याचें बिंब-शुद्ध भूमीवर मंडप वगैरे करून-करावें.

वैधव्यदीक्षा.

मृते भर्तरि तज्जाया द्वादशाह्नि जलाशये ॥
स्नात्वा वधूभ्यः पञ्चभ्यस्तत्र दद्यादुपायनम् ॥ १९५ ॥
भक्ष्यभोज्यफलैर्गन्धवस्त्रपुष्पपर्णैस्तथा ॥
ताम्बूलैरवतंसैश्च तदा कल्प्यमुपायनम् ॥ १९६ ॥
विधवायास्ततो नार्या जिनदीक्षासमाश्रयः ॥

अथानुतास्विद्वैधव्यदीक्षा वा गृह्यते तदा ॥ १९७ ॥

अर्थ— पति मृत्यु पावला असतां त्याच्या स्त्रीनें बाराव्या दिवशीं जलाशयांत स्नान करून पांच सुवासिनी स्त्रियांना वायनें द्यावीत. त्या वायनांत भक्ष्यभोज्य पदार्थ, फलें, गंध, वस्त्र, पुष्पें, द्रव्य, तांबूल आणि फुलांचे तुरे हे पदार्थ असावेत. हे वायन दिल्यावर त्या विधवा स्त्रीनें जिनदीक्षा घ्यावी हें फार उत्तम; नाहींपेक्षां वैधव्यदीक्षा घ्यावी.

तत्र वैधव्यदीक्षायां देशव्रतपरिग्रहः ॥
कण्ठसूत्रपरित्यागः कर्णभूषणवर्जनम् ॥ १९८ ॥
शेषभूषानिवृत्तिश्च वस्त्रखण्डान्तरीयकम् ॥
उत्तरीयेण वस्त्रेण मस्तकाच्छादनं तथा ॥ ११९ ॥
खट्वाशय्याञ्जनालेपहारिद्रप्लववर्जनम् ॥
शोकाक्रन्दनिवृत्तिश्च विकथानां विवर्जनम् ॥ २०० ॥
प्रातःस्नानं तथा नित्यं जोषमाचमनं तथा ॥
प्राणायामस्तर्पणार्घप्रदानं च यथोचितम् ॥ २०१ ॥
त्रिसन्ध्यं देवतास्तोत्र जपः शास्त्रश्रुतिः स्मृतिः ॥

भावना चानुप्रेक्षाणां तथात्मप्रतिभावना ॥ २०२ ॥

पात्रदानं यथाशक्ति चैकभक्तमगृद्धितः ॥
ताम्बूलवर्जनं चैव सर्वमेतद्विधीयते ॥ २०३ ॥

यद्दिने वर्तते श्राद्धं तद्दिने तर्पणं जपः ॥
पूर्वोक्तविधिना सर्वं कार्यं मन्त्रादिसंयुतम् ॥ २०४ ॥

अर्थ— जर वैधव्यदीक्षा ग्रहण केली तर त्या स्त्रीनें पुढीलप्रमाणें वागावें. तिनें देशविरतिव्रत ग्रहण करावें. मंगलसूत्र, कानातील अलंकार, आणि बाकीचे दागिने ह्यांचा त्याग करावा. एक वस्त्राचा तुकडा नेसावा. अंगावर घ्यावयाच्या दुसऱ्या वस्त्रानें मस्तकावर आच्छादन करावें. पलंगावर शयन करणें, डोळ्यांत काजळ घालणें, अंगाला हळद लावून स्नान करणें ह्यांचा त्याग करावा. पतीबद्दल शोक करून रडूं नये. वाईट गोष्टी बोलूं नयेत. प्रत्येक दिवशीं प्रातःकालीं स्नान करून नुसतें ( मंत्र न ह्मणतां ) आचमन करून प्राणायाम, तर्पण, अर्घ्यप्रदान ह्या क्रिया कराव्यात. त्रिकाल जिनस्तोत्र ह्मणावें, शास्त्र श्रवण आणि त्याचें चिंतन करावें. द्वादशानुप्रेक्षांची भावना करावी, व आत्मभावना करावी. आपल्या शक्तीप्रमाणें सत्पात्राला दान करावें, एकवेळ भोजन करावें, तेंही फार खाऊं नये, तांबूल भक्षण करूं नये.

श्रेयानुतस्विद्वैधव्यदीक्षा वा गृह्यते तदा ॥ १९७ ॥

अर्थ— पति मृत्यु पावला असतां त्याच्या स्त्रीनें बाराव्या दिवशीं जलाशयांत स्नान करून पांच सुवासिनी स्त्रियांना वायनें द्यावींत. त्या वायनांत भक्ष्यभोज्य पदार्थ, फळें, गंध, वस्त्र, पुष्पें, द्रव्य, तांबूल आणि फुलांचे तुरे हे पदार्थ असावेत. हें वायन दिल्यावर त्या विधवा स्त्रीनें जिनदीक्षा घ्यावी हें फार उत्तम; नाहींपेक्षां वैधव्यदीक्षा घ्यावी.

तत्र वैधव्यदीक्षायां देशव्रतपरिग्रहः ॥
कण्ठसूत्रपरित्यागः कर्णभूषणवर्जनम् ॥ १९८ ॥
शेषभूषानिवृत्तिश्च वस्त्रखण्डान्तरीयकम् ॥
उत्तरीयेण वस्त्रेण मस्तकाच्छादनं तथा ॥ ११९ ॥
खट्वाशय्याञ्जनालेपहारिद्रप्लववर्जनम् ॥
शोकाक्रन्दनिवृत्तिश्च विकथानां विवर्जनम् ॥ २०० ॥
प्रातःस्नानं तथा नित्यं जोपमाचमनं तथा ॥
प्राणायामस्तर्पणार्घप्रदानं च यथोचितम् ॥ २०१
त्रिसन्ध्यं देवतास्तोत्र जपः शास्त्रश्रुतिः स्मृतिः ॥

आशौच धरणारे भाऊबंद इतक्यांना आहे. त्यात पुत्र नसल्यास क्रमानें पुढच्यापैकीं जो असेल त्याला अधिकार समजावा. हे वर सांगितलेले जे पुरुष त्यापैकीं जर कोणीच नसेल तर पत्नीला अधिकार आहे. आणि पत्नीचें प्रेतकर्म करण्यास पतीला अधिकार आहे. वर जे अधिकारी सांगितले आहेत त्यांतील जो प्रेत-कर्म करण्याला योग्य असेल त्याचें उपनयन झालें नसलें तरी कांही हरकत नाहीं. त्यानें आचार्यानें मंत्र म्हटल्यावर फक्त स्वाहाकार म्हणावा. प्रेतदहन केल्यानंतरची जी क्रिया तिला शेषक्रिया म्हणतात. ती सर्व क्रिया संपेपर्यंत ( दहा दिवसपर्यंत ) कर्ता अशुचि समजावा. दहा दिवसांनंतर तो शुद्ध होतो. कर्त्यानें दहावे दिवशीं पिंड आणि पाषाण पाण्यांत टाकून द्यावेत. मग पुढें बाराव्या दिवसापर्यंत शेषक्रिया क्रमानें करावयाची असते ती करावी.

अस्थिसंचय.

तदाऽस्थिसञ्चयश्चापि कुजवारे निषिध्यते ॥
तथैव मन्दवारे च भार्गवादित्ययोरपि ॥ १८८ ॥
अस्थीनि तानि स्थाप्यानि पर्वतादिशिलाबिले ॥
प्रकृत्यवधिस्वातोर्व्यामथवा पौरुषावटे ॥ १८९ ॥

अर्थ— मृताच्या अस्थि गोळा करणें तें मंगळवार, शनिवार, शुक्रवार आणि रविवार ह्या वारीं करूं

अर्थ— वा भव्यजीवा! धर्माच्या प्रभावानें संपत्ति प्राप्त होतात. धर्माच्या योगानें मोक्षाचीं सुखें प्राप्त होतात. धर्मामुळेंच युद्धांत मनुष्यें जगतात; ह्मणून तूं सर्वदा धर्मरूपी साधनाची प्राप्ति करून घे!!

विमलधर्मबलेन सुवस्तुकं । सकलजीवहितं सुखदायकम् ॥
परममोक्षपदं भवनाशनं । भवति राज्यपदं सुरसेवितम् ॥ २०९ ॥

अर्थ— शुद्ध अशा धर्माच्या सामर्थ्यानें संपूर्ण जीवांचें कल्याण करणारें व सुख देणारें असें आणि सद्वस्तूंनीं भरलेलें व संसाराचा नाश करणारें असें मोक्षपद प्राप्त होतें; आणि देव देखील सेवा करीत आहेत असें राज्यपदही प्राप्त होतें. तात्पर्य, धर्मानें भोग आणि मोक्ष हे दोनीही प्राप्त होतात.

धर्मः प्राणिहितं करोति सततं धर्मो जनैर्गृह्यतां ।
धर्मेण प्रभवन्ति राज्यविभवा धर्माय तस्मै नमः ॥
धर्मान्नश्यति पापसन्ततिकुलं धर्मस्य सौख्यं फलं ।
धर्मे देहि मनः प्रभौ वृषकरे भो धर्म मां रक्षय ॥ २१० ॥

अर्थ— धर्म हा जीवाचें सर्वदा हित करणारा आहे; ह्मणून सर्वलोकांनीं तो अवश्य स्वीकारावा. धर्मानें राज्यवैभव प्राप्त होतें, धर्मापासून पातकांच्या समूहाचा नाश होतो; धर्माचें सुख हेंच फल आहे, ह्मणून त्या धर्माला माझा नमस्कार असो! वा भव्य जीवा! असा समर्थ असलेला आणि पुण्य संपादन

करून देणारा जो धर्म त्याचे ठिकाणी तूं आसक्ति ठेव आणि त्याला 'हे धर्मा तू माझें रक्षण कर' अशी प्रार्थना कर!!!

संसारार्णवतारणाय सततं धर्मो जिनैर्भाषितो ।
धर्मो जीवसमूहरक्षणतया जायेत भव्यात्मनाम् ॥
धर्माद्राज्यपदं परत्र लभते स्वर्गोऽपि धर्माद्भवे- ।
द्धर्मं भो भज जीव मोक्षपददं जैनं सदा निर्मलम् ॥ २११ ॥

अर्थ— धर्म हा संसारसमुद्रातून तरण्याकरिता श्रीजिनांनी सांगितला आहे. ह्मणून तो संपूर्णजीवसमूहाचें रक्षण करतो. भव्यजीवाना धर्मापासून ह्या लोकात राज्यपद आणि परलोकीं स्वर्ग प्राप्त होतो. ह्मणून हे जीवा! श्रीजिनानीं सांगितलेल्या निर्दोष आणि मोक्षप्राप्ति करून देणाऱ्या धर्माचें तूं सेवन कर!!!

ग्रंथकाराची प्रार्थना.

श्रीमूलसङ्घे वरपुष्कराख्ये । गच्छे सुजातो गुणभद्रसूरिः ॥
तस्यात्र पट्टे मुनिसोमसेनो । भट्टारकोऽभूद्विदुषां वरेण्यः ॥ २१२ ॥

अर्थ— श्रीमूलसंघांतील पुष्कर नावाच्या गच्छात श्रीगुणभद्र नांवाचे महापंडित होऊन गेले त्याच्या पट्टावर विद्वच्छ्रेष्ठ असा श्रीसोमसेनमुनि भट्टारक असता झाला.

धर्मार्थकामाय कृतं सुशास्त्रं । श्रीसोमसेनेन शिवार्थिनाऽपि ॥

गृहस्थधर्मेषु सदा रता ये। कुर्वन्तु तेऽभ्यासमहो सुभव्याः ॥ २१३ ॥

अर्थ— स्वतः मोक्षाची इच्छा करणारा असा असूनही त्या श्रीसोमसेनमुनीनें सर्वलोकांना धर्म, अर्थ, काम ह्या तीन पुरुषार्थांची प्राप्ति होण्याकरितां हें शास्त्र केलें आहे. जे भव्यजीव गृहस्थाश्रमांत गढलेले असतील, त्यांनीं ह्या शास्त्राचा अभ्यास करावा.

छन्दांसि जानामि न काव्यचातुरीं। शब्दार्थशास्त्राणि न नाटकादिकम् ॥
तथापि शास्त्रं रचितं मया हि य-। द्धास्यं न कुर्याद्विबुधोत्तमोऽत्र मे ॥२१४ ॥

अर्थ— मला छंद समजत नाहींत; काव्य करण्याचे चातुर्य माझ्यामध्यें नाहीं, व्याकरणशास्त्र, न्यायशास्त्र आणि साहित्यशास्त्र हीं शास्त्रें मला येत नाहींत. तथापि हें शास्त्र मीं अल्प बुद्धीनें रचलें आहे, ह्याबद्दल विद्वान् लोकांनीं मला हंसूं नये.

यद्यस्ति शास्त्रे मम शब्ददूषणं। भव्योत्तमाः शोधनतां सुबुद्धिकाः ॥
कुर्वन्तु धर्माय कृता महीतले। धात्रा सुबुध्यात्र परोपकारिणः ॥ २१५ ॥

अर्थ— ह्या माझ्या शास्त्रांत जर शब्ददोष असले तर सुबुद्धि अशा श्रेष्ठ भव्यपुरुषांनीं धर्माकरितां शुद्ध करावा. कारण, ब्रह्मदेवानें परोपकारी जीव सद्बुद्धीनें उत्पन्न केले आहेत. तात्पर्य, परोपकारी जीव दुसऱ्यावर उपकार करण्याच्या हेतूनेंच उत्पन्न केले असल्यानें उपकार करणें हें त्यांचें कर्तव्य आहे.

अब्दे तत्त्वरसर्तुचन्द्रकलिते श्रीविक्रमादित्यजे ।
मासे कार्तिकनामनीह धवले पक्षे शरत्सम्भवे ॥
वारे भास्वति सिद्धनामनि तथा योगे सुपूर्णातिथौ ।
नक्षत्रेऽश्विनिनाम्नि धर्मरसिको ग्रन्थश्च पूर्णीकृतः ॥ २१६ ॥

अर्थ— श्रीविक्रमादित्याच्या सोळाशेंहे सदुसष्टाव्या १६६७ वर्षातील शरदृतूंतील कार्तिक महिन्याच्या शुक्लपक्षांतील रविवारीं पौर्णिमातिथि असतांना, सिद्धनामयोग व अश्विनी नक्षत्र असतांना त्या दिवशीं हा धर्मरसिकनामक ग्रंथ पूर्ण केला.

श्लोका येऽत्र पुरातना विलिखिता अस्माभिरन्वर्थत- ।
स्ते दीपा इव सत्सु काव्यरचनामुद्दीपयन्ते परम् ॥
नानाशास्त्रमतान्तरं यदि नवं प्रायोऽकरिष्यं त्वहं ।
काशाऽमाऽस्य महो तदेति सुधियः केचित्प्रयोगंवदाः ॥ २१७ ॥

अर्थ— ह्या ग्रंथांत आम्हीं जे प्राचीन (अन्यग्रंथांतले) श्लोक प्रकृत अर्थाला अनुसरून लिहिले आहेत ते सज्जनांच्या पुढें केवळ दीपाप्रमाणें आमच्या काव्यरचनेला प्रकाशित करणारे आहेत ह्मणजे आमच्या काव्याचा अर्थ विशेष स्पष्ट करणारे आहेत. जर मीं अन्यशास्त्रांतील नवीन भिन्न मतें घेऊन विस्तृत शास्त्र

३१ ॐ ह्रीं दीप्ततपस्विनस्तर्पयामि ॥ ३२ ॐ ह्रीं तप्ततपस्विनस्तर्पयामि ॥ ३३ ॐ ह्रीं महातपसस्तर्पयामि ॥ ३४ ॐ ह्रीं घोरतपसस्तर्पयामि ॥ ३५ ॐ ह्रीं घोरगुणांस्तर्पयामि ॥ ३६ ॐ ह्रीं घोरपराक्रमांस्तर्पयामि ॥ ३७ ॐ ह्रीं घोरब्रह्मचारिणस्तर्पयामि ॥ ३८ ॐ ह्रीं आमर्षौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ३९ ॐ ह्रीं क्ष्वेडौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४० ॐ ह्रीं जल्लौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४१ ॐ ह्रीं विप्रौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४२ ॐ ह्रीं सर्वौषधिप्राप्तांस्तर्पयामि ॥ ४३ ॐ ह्रीं मनोबलिनस्तर्पयामि ॥ ४४ ॐ ह्रीं वाग्बलिनस्तर्पयामि ॥ ४५ ॐ ह्रीं कायबलिनस्तर्पयामि ॥ ४६ ॐ ह्रीं अमृतस्राविणस्तर्पयामि ॥ ४७ ॐ ह्रीं मधुस्राविणस्तर्पयामि ॥ ४८ ॐ ह्रीं सर्पिस्स्राविणस्तर्पयामि ॥ ४९ ॐ ह्रीं क्षीरस्राविणस्तर्पयामि ॥ ५० ॐ ह्रीं अक्षीणमहानसांस्तर्पयामि ॥ ५१ ॐ ह्रीं अक्षीणमहालयांस्तर्पयामि ॥ ५२ ॐ ह्रीं अर्हं लोके सर्वसिद्धायतनानि तर्पयामि स्वाहा ॥ ५३ ॐ ह्रीं अर्हं भगवतो महतिमहावीरवर्द्धमानबुद्धिऋर्षीस्तर्पयामि ॥ इति ऋषितर्पणमन्त्रा त्रिपञ्चा-

शत् ॥ ततस्तेषां नमस्कारमन्त्रोऽयम्— ॐ ह्रीं अर्हं क्ष्व्यौं क्ष्व्यौं नमः ॥

अर्थ— वर तर्पणाचे त्रेपन्न मंत्र सांगितले आहेत. त्यांतील प्रत्येक मंत्रानें तर्पण करावें. ह्या तर्पणास ऋषितर्पण ह्मणतात. हें तर्पण झाल्यावर ज्यांचें तर्पण आपण केलें त्यांना "ॐ ह्रीं अर्हं" इत्यादि मंत्रानें नमस्कार करावा.

पितृतर्पण

अथ पितॄणां तर्पणं कुर्यात्तिलोदकेन— १ ॐ ह्रीं अर्हं श्रीऋषभस्य भगवतः पितरौ तर्पयामि ॥ २ ॐ ह्रीं अर्हं अजितस्य भगवतः पितरौ तर्पयामि ॥ ३ ॐ ह्रीं अर्हं सम्भवस्य भगवतः पितरौ तर्पयामि ॥ ४ ॐ ह्रीं अर्हं भगवतोऽभिनन्दनस्य पितरौ तर्पयामि ॥ ५ ॐ ह्रीं अर्हं इत्यादि वर्धमानपर्यन्तं योज्यम् ॥ २४ ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मत्पितरौ तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तात्पितरौ तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तत्पितरौ तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मद्दीक्षागुरुं तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मद्विद्यागुरुं तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं अस्मच्छिक्षागुरुं तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तेषां पितॄन् तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं तेषां पितृतात्पितृतात्पितरस्त-

पर्यामि ॥ एवं द्वात्रिंशन्मन्त्राः पितॄणां तर्पणार्थं ॥ तेषां नमस्कार-
मन्त्रोऽयम् । ॐ ह्रीं अर्हं नमः ॥

अर्थ— नंतर तीळ आणि उदक ह्यांच्या योगानें पितरांचें तर्पण करावें. त्याचे मंत्र बत्तीस क्रमानें सांगितले आहेत. याप्रमाणें तर्पण झाल्यावर ज्या पितरांचे आपण तर्पण केलें त्यांचा संतोष होण्याकरितां " ॐ ह्रीं अर्हं नमः " ह्या मंत्रानें त्यांना नमस्कार करावा.

देवतातर्पण

अथाक्षतोदकेन देवतानां तर्पणं तन्मन्त्राः ॥ ॐ ह्रीं अर्हं जयाद्यष्टदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं रोहिण्यादिषोडशविद्यादेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं यक्षादिपञ्चदशातिथिदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं सूर्यादिनवग्रहदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं इन्द्रादिदशदिक्पालदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं श्याद्यष्टदिक्कन्यादेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं गोमुखादिचतुर्विंशतियक्षदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं चक्रेश्वर्यादिचतुर्विंशतियक्षीदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं असुरादिदशविधभवनवासिदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं किन्नराद्यष्टविधव्यन्तरदेवता-

स्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं चन्द्रादिपञ्चविधज्योतिष्कदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं सौधर्मादिवैमानिकदेवतास्तर्पयामि ॥ ॐ ह्रीं अर्हं सर्वाह्मिन्द्रदेवतास्तर्पयामि। इति तर्पणमन्त्राः॥ अतो नमस्कारमन्त्रोऽयम्॥ ॐ ह्रीं अर्हं अ सि आ उ सा ॐ क्रौं नमः ॥ इति प्रातस्सन्ध्योपासनक्रमः ॥ ५ ॥ एवं मध्याह्नसायाह्नयोः स्नानतर्पणान्यपि विहाय आचमनादिशेषाक्रियां सर्वामाचरेत्॥ शिरःपरिषेचनं जलाञ्जल्यर्घ्याणि जाप्यं देवपूजादि सर्वं कर्तव्यम् ॥

अर्थ--- नंतर अक्षता आणि उदक ह्यांच्या योगानें देवतांचें तर्पण करावें. त्याचे मंत्र वर सांगितले आहेत. हें तर्पण झाल्यावर नमस्काराचा जो मंत्र सांगितला आहे त्या मंत्रानें तर्पण केलेल्या सर्व देवतांस नमस्कार करावा. ह्याप्रमाणें प्रातःकालच्या सन्ध्येचा विधि सांगितला. मध्यान्हकाली आणि सायंकालींही ह्याप्रमाणेच विधि करावा. त्यांत फक्त स्नान आणि तर्पण ह्या दोन क्रिया मात्र करण्याची गरज नाहीं. ह्मणून तेवढ्या क्रिया सोडून बाकीच्या सर्व क्रिया (मस्तकावर उदकसेंचन करणें, जलांजलि देणें, अर्घ्य देणें, जप करणें, देवपूजा वगैरे) सर्व कराव्यात.

इत्थं युक्तिविधानतः सुसकलं सन्ध्यादिकोपासनं ।

ये कुर्वन्ति नरोत्तमा भवभयाद्भीताश्च ते दुर्लभाः ॥
संसाराम्बुधिनौसमां शिवकरां भव्यात्मनां प्राणिनां ।
तस्मादादरपूर्विकां बुधजनाः कुर्वन्तु सन्ध्यां सदा ॥ १४८ ॥

अर्थ— अशाप्रकारें वर सांगितलेली संध्योपासनक्रिया, जे कोणी युक्तिप्रयुक्तीनें करतात; ते संसाराला मुळींच भीत नाहींत. ह्मणून हे सज्जन हो! भव्यजीवांना संसारसमुद्रांतून तारून नेणारी नौकाच ही काय! अशी ही संध्योपासनक्रिया तुह्मी मोठ्या भक्तीनें नेहमीं करा !!!

श्रीब्रह्मसूरिद्विजवंशरत्नं । श्रीजैनमार्गप्रविबुद्धतत्त्वः ॥
वाचन्तु तस्यैव विलोक्य शास्त्रं । कृतं विशेषान्मुनिसोमसेनैः ॥ १४९ ॥

अर्थ— त्रैवर्णिकांच्या वंशांत मुकुटमणि आणि ज्यांना श्रीजिनांनीं सांगितलेल्या मार्गाचीं तत्त्वें उत्कृष्ट समजलीं आहेत असे ब्रह्मसूरि नांवाचे पंडित होऊन गेले. त्यांनीं केलेलें शास्त्र पाहून श्रीसोमसेनमुनींनीं हें शास्त्र विस्तारानें रचिलें आहे. तें तुह्मीं भव्यजीवांनीं अवश्य पठन करावें.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपके भट्टारकश्रीसोमसेनविरचिते
स्नानवस्त्राचमनसन्ध्यातर्पणवर्णनो नाम तृतीयोऽध्यायः ॥

श्रीवीतरागाय नम

## ॥ चतुर्थोऽध्यायः ॥

त्रैलोक्ययात्रां चरितुं प्रवीणा । धर्मार्थकामाः प्रभवन्ति यस्याः ॥
प्रसादतो वर्तत एव लोके । सरस्वती सा वसतान्मनोऽब्जे ॥ १ ॥

अर्थ— जिच्या कृपेमुळेंच धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ त्रैलोक्यांत संचार करण्यास समर्थ होतात; ह्मणजे त्रैलोक्यांत प्रसिध्दीला प्राप्त होतात; आणि जी या जगांत वास करीत आहे, ती सरस्वती देवी माझ्या अंतःकरणरूपी कमलांत वास करो.

शान्तिप्रदं सम्प्रति शान्तिनाथं । देवाधिदेवं वरतत्त्वभाषम् ॥
नत्वा प्रवक्ष्ये गृहधर्ममत्र । यतो भवेत्स्वर्गसुखं सुभोगम् ॥ २ ॥

अर्थ— जैनमतांतील मुख्य तत्वांचें ज्यानें प्रतिपादन केलें आहे आणि जो आपल्या भक्तास शांति देतो असा देवाधिदेव जो शांतिनाथ त्याला नमस्कार करून, ज्याच्यापासून जीवाला स्वर्गसुख सहज भोगावयास मिळेल असा गृहस्थाचा धर्म आतां मी सांगतों.

अस्पृश्य जीव व पदार्थ.

कृत्वैवं सुजलाशये स मुदितश्चोत्थाय तस्माच्छनैः ।

रीर्यायाः पथशोधनं शुचितरं कुर्वन्व्रजेत्स्वं गृहम् ॥
अस्नातान् सकलान् जनान्नहि तदा मार्गे स्पृशेन्नोत्तमान् ।
स्नातान् शूद्रजनान्प्रमादबहुलान् शुद्धानपि नो स्पृशेत् ॥ ३ ॥

अर्थ— पूर्वी सांगितल्याप्रमाणें शुद्ध अशा जलाशयांत स्नान करून तेथून आपल्या गृहाकडे जाण्यास निघावें. त्या वेळीं ईर्यापथशुद्धि ( जावयाच्या मार्गाची शुद्धि ) करून मग चालूं लागावें. ज्यांनीं स्नान केलें नाहीं असे आपल्यापेक्षां वरिष्ठ जरी कोणी मार्गांत आढळले तथापि त्यांना स्पर्श करूं नये. त्याचप्रमाणें एखादा शूद्र जरी स्नान केलेला असला तथापि त्याला स्पर्श करूं नये. तसेंच नेहमीं हिंसा करणारे असे जे लोक त्यांनाही स्पर्श करूं नये. असे लोक कोणते हें पुढील श्लोकांत सांगतात.

मद्यविक्रायिणं शूद्रं कुलालं मद्यपायिनम् ॥ नापितं च शिलास्फोटं कुवि-
न्दकमतः परम् ॥४॥ काञ्छिकं मालिकं चैव हिंसकं मुद्गलादिकम् ॥ उच्छि-
ष्टपर्णचर्मास्थिच्युतशृंगनखानपि ॥५॥ रोमकेशखुरान्दन्तान्रक्तविण्मूत्र-
पूयकान् ॥ श्लेष्मनिष्ठीवशूद्रान्नहण्डिकादीन् बहिस्ततः ॥ ६ ॥ काक-
कुर्कुटमार्जारखरोष्ट्रग्रामसूकरान् ॥ कुष्ठिकुर्कुररोगार्तच्छिन्नांगपतिता-
भरान् ॥ ७ ॥ कितवान्मत्तमत्तांश्च बन्धनागाररक्षकान् ॥ मलाक्तवस्त्रसं-

विजातिम्लेच्छशूद्राणां गेहाद्दूरं भवेद्गृहम् ॥
काष्ठधूमादिसंसर्गं न कुर्यात्कुड्यमेलनम् ॥ १४ ॥

अर्थ— आतां गृहाचें लक्षण सांगतात— विजातीचे लोक, मुसलमान लोक आणि शूद्र लोक ह्यांच्या घरापासून आपलें घर दूर असावें. त्यांच्या घराचे वासे, त्यांच्या घरांतून येणारा धूर इत्यादिकाचा संपर्क आपल्या घराला होऊं देऊं नये. तसेंच त्यांच्या घराच्या भिंतीला आपल्या घराची भिंत देखील लागून असूं नये.

तेषां हि श्रूयते शब्दो हिंसादिदुष्टवाचकः ॥
केशास्थिचर्मदु स्पर्शो न भवेत्त्वं तथा कुरु ॥ १५ ॥

अर्थ— विजातीय लोक वगैरे लोकांच्या घराजवळ जर आपलें घर असेल, तर, त्यांचे हिंसा वगैरे दुष्कृत्याचे वाचक शब्द आपल्यास नेहमीं ऐकावे लागतात. ह्मणून अशा लोकांच्या रहाण्याच्या ठिकाणापासून जैनाचे घर दूर असावें. तसेंच आपल्या घराला केश, हाडें आणि चामडें ह्यांचा स्पर्श न होईल असें घर असावें.

तेषां जलप्रवाहस्य नीचभागं विवर्जयेत् ॥
मानिनां पापशीलानां सक्तानां दुष्टसङ्गतौ ॥ १६ ॥

अर्थ— वर जे विजातीय वगैरे लोक सांगितले आहेत, त्यांच्या घरांतील पाणी ज्या सखल जाग्यात

पञ्चहस्तादृतुमतीं सूतिकां हस्तषट्कतः ॥
चाण्डालचर्मकारादीन् हस्तसप्त परित्यजेत् ॥ ११ ॥

अर्थ— ऋतुमती असलेल्या स्त्रीपासून पांच हात लांब असावें. बाळंतिणीपासून सहा हात लांब असावें. चांडाल आणि चांभार ह्यांपासून सात हात लांब असावें.

मांसभारं सुराकुम्भं युगद्वयं तु वर्जयेत् ॥
नृतिरश्चश्च दुर्गन्धिशवं तु युगपञ्चकम् ॥ १२ ॥
अस्पृश्यगृहजं भस्म धूलीधूमतुषादिकान् ॥
अस्पृशन्निजगेहं स गच्छेज्जीवदयापरः ॥ १३ ॥

अर्थ— मांसाचा ढीग आणि मद्याचें पात्र ह्यापासून आठ हातावर लांब असावें. मनुष्य, पशुपक्षी इत्यादिकांच्या कुजलेल्या प्रेतापासून वीस हात लांब असावें. त्याप्रमाणेंच स्नान करून घराकडे जात असतां, ज्यांना आपण केव्हांच स्पर्श करीत नाहीं अशा लोकांच्या घरांतून उडून आलेले राख, धुरळा, धूर, कोंडा, वगैरे पदार्थ आपल्या अंगावर येऊं देऊं नयेत. तसेंच वाटेनें चालत असतां कोणत्याही जीवाला त्रास देऊं नये. सर्वावर दया करावी.

## अथ गृहलक्षणम्

विजातिम्लेच्छशूद्राणां गेहाद्दूरं भवेद्गृहम् ॥
काष्ठधूमादिसंसर्गं न कुर्यात्कुड्यमेलनम् ॥ १४ ॥

अर्थ— आतां गृहाचें लक्षण सांगतात– विजातीचे लोक, मुसलमान लोक आणि शूद्र लोक ह्यांच्या घरापासून आपलें घर दूर असावें. त्यांच्या घराचे वासे, त्यांच्या घरांतून येणारा धूर इत्यादिकांचा संपर्क आपल्या घराला होऊं देऊं नये. तसेंच त्यांच्या घराच्या भिंतीला आपल्या घराची भिंत देखील लागून असूं नये.

तेषां हि श्रूयते शब्दो हिंसादिदुष्टवाचकः ॥
केशास्थिचर्मदु स्पर्शो न भवेत्त्वं तथा कुरु ॥ १५ ॥

अर्थ— विजातीय लोक वगैरे लोकांच्या घराजवळ जर आपलें घर असेल, तर, त्यांचे हिंसा वगैरे दुष्कृत्याचे वाचक शब्द आपल्यास नेहमीं ऐकावे लागतात. ह्मणून अशा लोकांच्या रहाण्याच्या ठिकाणापासून जैनाचे घर दूर असावें. तसेंच आपल्या घराला केश, हाडें आणि चामडें ह्यांचा स्पर्श न होईल असें घर असावें.

तेषां जलप्रवाहस्य नीचभागं विवर्जयेत् ॥
मानिनां पापशीलानां सक्तानां दुष्टसङ्गतौ ॥ १६ ॥

अर्थ— वर जे विजातीय वगैरे लोक सांगितले आहेत, त्यांच्या घरांतील पाणी ज्या सखल जाग्यांत

वहात येत असेल, त्या सखल जाग्यांत आपलें घर असूं नये. तसेंच आपल्या घराजवळ अभिमानी, पातकी आणि दुष्टांची संगति करणारे असे लोक असूं नयेत.

नगरस्यान्त्यसम्भागे न कुर्याद्गृहबन्धनम् ॥
भषकसूकरादीनां प्रवेशो न हि सौख्यदः ॥ १७ ॥

अर्थ— आपण ज्या गांवांत रहातो त्या गांवाच्या शेवटाला आपलें घर बांधूं नये. घरांत कुत्रें, गांवडुकर, वगैरे पशू शिरले असतां त्या घरांत आपल्यास सुख लागणार नाही असें समजावें.

सङ्कीर्णमार्ग उच्छिष्टमलमूत्रादिदूषितः ॥
वेश्यातस्करव्याघ्रादिसम्बन्धं दूरतस्त्यजेत् ॥ १८ ॥

अर्थ— जेथें सर्वजातीचे लोक जमतात असा रस्ता आपल्या घराजवळ असूं नये. उष्टे पदार्थ, मल, मूत्र इत्यादि पदार्थ टाकण्याची जागा आपल्या घराजवळ असूं नये. वेश्या आणि चोर ह्यांची घरें जवळ असूं नयेत. त्याचप्रमाणें व्याघ्र वगैरे जंगली जनावरांचें ठिकाणही आपल्या घराजवळ असूं नये.

उत्तमस्थानमालोक्य सर्पादिपरिवर्जितम् ॥
रम्यं तत्र गृहं कुर्याद्यथाद्रव्य यथारुचि ॥ १९ ॥

अर्थ— वर सांगितलेले उपद्रव ज्या ठिकाणीं नाहींत आणि सर्पादिकांची पीडा जेथें नाही असे उत्तम

स्थळ पाहून त्या ठिकाणीं आपल्या द्रव्याची अनुकूलता जशी असेल त्या मानानें आपल्या इच्छेप्रमाणें सुशोभित असें घर बांधावें.

रेणुपाषाणनीरान्तं खनयेत्पृथिवीतलम् ॥
शङ्खखर्परचर्मास्थिविण्मूत्रं दूरतस्त्यजेत् ॥ २० ॥

अर्थ— मुरमाचे दगड अथवा पाणी हीं लागेपर्यंत पाया काढावा. शंख, खापऱ्या, चामडें, हाडें, विष्ठा आणि मूत्र हे घराजवळ न टाकतां दूर टाकावेत.

पाषाणैश्चेष्टकाभिश्च मृद्भिश्चूर्णैर्भूर्बध्यते दृढम् ॥
सुदिने सुमुहूर्ते वा जिनपूजापुरस्सरम् ॥ २१ ॥

अर्थ— दगड, विटा, माती आणि चुना ह्यांच्या योगानें भूमि फार बळकट होते; म्हणून हे पदार्थ घालून घरांतील जमीन करावी. घर बांधावयाचें तें चांगला दिवस पाहून सुमुहूर्तावर श्रीजिनेंद्राची पूजा प्रथम करून बांधावयास प्रारंभ करावें.

भुक्तिशालाऽग्निदिक्कोणे नैर्ऋत्यां शयनस्थलम् ॥
वायव्यां स्नानगेहं स्यादीशान्यां जिनमन्दिरम् ॥ २२ ॥
पश्चिमे चित्रशाला तु नानाजनसमाश्रया ॥

दक्षिणे तु जलस्थानं ह्युत्तरे श्रीधनाश्रयः ॥ २३ ॥
पूर्वस्यां निर्गमद्वारं घण्टातोरणभूषितम् ॥
मध्ये नृत्यन्ति नर्तक्यो गीतहास्यविनोदकैः ॥ २४ ॥
सदनस्य बहिर्भागे शाला गोधनसम्भृता ॥
गजाश्वरथपादातैस्तत्रैव स्थीयतेऽन्त्यतः ॥ २५ ॥

अर्थ— त्या घरांत आग्नेयदिशेकडे पाकगृह असावें. नैर्ऋत्यदिशेस निजण्याची जागा असावी. वायव्यदिशेस स्नानाची जागा असावी. ईशान्यदिशेस जिनमंदिर असावें. पश्चिमेकडे पुष्कळ लोकांना बसण्यासारखी चित्रशाळा असावी. दक्षिणेकडे पाण्याचें ठिकाण असावें. उत्तरेकडे द्रव्य ठेवण्याची जागा (जामदारखाना) असावी. आणि पूर्वदिशेकडे घराचा दरवाजा असावा. त्याला तोरण लाविलेलें असावें आणि घांटही बांधलेली असावी. तसेंच मध्यभागीं नर्तन करणाऱ्या स्त्रियांच्या नृत्याची जागा असावी. घराच्या बाहेरच्या बगलेस गोठा असावा. ही जागा घराच्या बाहेर असल्यानें, त्यांत हत्ती, घोडे, रथ, चाकर मनुष्यें वगैरे रहावयाची असतात.

एकद्वित्रीणि सप्तान्ता उपर्युपरि संस्थिताः ॥
चूर्णकाचसुवर्णादिलेपनैर्लेपिताः पराः ॥ २६ ॥

अर्थ— एक, दोन, तीन असे सातापर्यंत मजले घराला करावेत. त्यातील भिंतीस चुना किंवा सोनें यांचे गिलावे करावेत. आणि काचेची तावदानें लावावीत.

नानाशृंगैश्च संयुक्तं माल्लाचन्द्रोपकादिभिः ॥
पुत्रोत्पत्तिविवाहादिकल्याणपरिपूजितम् ॥ २७ ॥

अर्थ— घराला अनेक शिखरें गच्च्या वगैरे असाव्यात. घरांत पुत्रोत्पत्ति, विवाह वगैरे मंगल कार्यें होत असावींत.

चैत्यस्य वामभागे तु होमशालां समापयेत् ॥
धूमावकाशकस्थानं सल्लकीकदलीयुतम् ॥ २८ ॥

अर्थ— जिनमंदिराच्या डाव्या बाजूस होमशाला करावी. त्यांतून धूर जाण्याला मार्ग असावा. आणि ज्या बाजूला धूर जात असेल तिकडे सळई, केळीं हीं झाडें लावावींत.

पल्यङ्कं कुसुमानि चन्दनरसः कर्पूरकस्तूरिका ।
स्याद्रत्नं वनिता स्वरूपसहिता हास्यादिका सत्क्रिया ॥
ताम्बूलं वरभूषणानि तनुजा दानाय सत्सम्पदो ।
गेहे यस्य स एव सन्ति विभवा धन्यश्च पुण्यात्मकः ॥ २९ ॥

अर्थ— निजण्याचा पलंग, सुवासिक फुलें, चंदनाची उटणी, कापूर, कस्तूरी, मधुर अन्न, रूपवती अशी पत्नी, हास्य विनोद वगैरे गमतीचे व्यापार, तांबूल, उंची दागिने, पुत्र, आणि धर्म करण्याकरितां द्रव्य ही संपत्ति ज्याच्या घरांत असेल, तो धन्य होय! आणि तोच पुण्यवान् होय.

चैत्यालयप्रवेश.

गत्वा तत्र जिनागारं शनैः स्थित्वा बहिःस्थले ॥
पादौ प्रक्षाल्य संशोध्य सम्यगीर्यापथं क्रमात् ॥ ३० ॥
त्रिःपरीत्य जिनेन्द्रस्य गेहं चान्तर्विशेद्बुधः ॥
मुखवस्त्रं समुद्धाट्य जिनवक्त्रं विलोकयेत् ॥ ३१ ॥

अर्थ— त्या आपल्या घरांत हळू हळू जाऊन, जिनमंदिराच्या बाहेर उभे राहून, आपले पाय धुवावेत. मग ईर्यापथशुद्धि करून, जिनेंद्राला तीन प्रदक्षिणा करून, मंदिरांत प्रवेश करावा. आणि जिनेंद्राच्या मुखावरील वस्त्र काढून त्याच्या मुखाचें दर्शन करावें. आणि पुढील स्तोत्रानें जिनदर्शनाचें माहात्म्य वर्णन करावें

जिनदर्शनस्तवन.

दर्शनं जिनपतेः शुभावहं । सर्वपापशमनं गुणास्पदम् ॥
स्वर्गसाधनमुशन्ति साधवो । मोक्षकरणमतः परं च किं ॥ ३२ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राचें दर्शन अत्यंत शुभकारक आहे, तें सर्व पातकांचा नाश करणारें व सर्व सद्गुणांचें वसतिस्थान आहे. सज्जन लोक श्रीजिनेंद्राचें दर्शन हेंच स्वर्गाचें मुख्यसाधन आहे असें ह्मणतात. मग मोक्षाचें साधन तरी ह्यापेक्षां निराळें कोणतें असावयाचें आहे?

दर्शनं जिनरवेः प्रतापव- । च्चित्तपद्मपरमप्रकाशकम् ॥
दुष्कृतैकतिमिरापहं शुभं । विघ्नवारिपरिशोषकं सदा ॥ ३३ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्ररूपी जो सूर्य, त्याचें दर्शन प्रतापशाली असल्यानें तें अंतःकरणरूपी कमलाचा विकास करणारें, पातकरूपी अंधकाराचा नाश करणारें, कल्याणप्रद आणि सर्वदा विघ्नरूपी उदक शोषून टाकणारें असें आहे.

दर्शनं जिननिशापतेः परं । जन्मदाहशमनं प्रशस्यते ॥
पुण्यनिर्मलसुधाप्रवर्षणं । वर्धनं सुखपयोनिधेः सतः ॥ ३४ ॥

अर्थ— श्रीजिनपतिरूपी जो चंद्र त्याचें दर्शन जन्ममरणरूपी उकाड्याचा नाश करणारें आहे; आणि पुण्यरूपी स्वच्छ अमृताचा वर्षाव करणारें असून सत्पुरुषांच्या सुखरूपी समुद्राला भरती आणणारें आहे.

दर्शनं जिनसुकल्पभूरुहः । कल्पितं हि मनसा प्रपूरयेत् ॥
सर्वलोकपरितापनाशनं । पम्फुलीति फलतो महीतले ॥ ३५ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्र हाच जो कल्पवृक्ष त्याचें दर्शन हें मनांत आणलेलें देणारें असें आहे. आणि सर्व लोकांच्या संसारतापाचा नाश करणारें असून ह्या पृथ्वीवर उत्कृष्ट फलांनीं ( दर्शन करणाऱ्याचें कल्याण करणें ह्या फलांनीं ) गजबजून गेलें आहे.

दर्शनं जिनसुकामगोरलं । कामितं भवति यत्प्रसादतः ॥
दोग्धि दुग्धमपि वित्तकाम्यया । शुद्धमेव मन इत्युदाहृतम् ॥ ३६ ॥

अर्थ— मी श्रीजिनेंद्ररूपी जी कामधेनु तिचें दर्शन केलें ह्मणजे पुरे आहे. कारण, माझे सर्व मनोरथ श्रीजिनेंद्ररूपी कामधेनूच्या कृपेनें सफल होणारे आहेत. ही कामधेनु अशी आहे की, भव्यजीवानें द्रव्याच्या इच्छेनें तिची धार काढली असतां ती धार काढणाराचें अंतःकरण शुद्ध करते ह्मणजे त्याची द्रव्यतृष्णा दूर करते.

दर्शनं जिनपयोनिधेर्भृशं । सौख्यमौक्तिकसमूहदायकम् ॥
सद्धनं गुणगभीरसुत्तमं । ज्ञानवारिविपुलप्रवाहकम् ॥ ३७ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्ररूपी समुद्राचें दर्शन हे सौख्यरूपी मौक्तिकांना देणारें आहे. आणि ज्ञानरूपी उदकाची पुष्कळ वृष्टि करणारा असा जो सद्गुणरूपी उत्तम मेघ त्यालाही देणारें आहे.

अद्याभवत्सफलता नयनद्वयस्य । देव त्वदीयचरणाम्बुजवीक्षणेन ॥

अद्य त्रिलोकतिलक प्रतिभासते मे । संसारवारिधिरयं चुलकप्रमाणः ॥ ३८ ॥

अर्थ— हे देवा! आज तुझ्या चरणकमलांच्या दर्शनानें माझ्या दोनी डोळ्यांची सफलता झाली. हे प्रभो! आज मला हा संसारसमुद्र पसाभर पाण्याप्रमाणें भासूं लागला आहे.

किसलयितमनल्पं त्वद्विलोकाभिलाषात् ।
कुसुमितमतिसान्द्रं त्वत्समीपप्रयाणात् ॥
मम फलितममन्दं त्वन्मुखेन्दोरिदानीं ।
नयनपथमवासादेव पुण्यद्रुमेण ॥ ३९ ॥

अर्थ— हे देवाधिदेवा! माझ्या पुण्यरूपी वृक्षाला–तुझें दर्शन करण्याची जी मला इच्छा झाली तीमुळें कोमल पानें आल्याप्रमाणें झालें आहे. [ ह्मणजे तुझ्या दर्शनाची मला जी इच्छा झाली ती माझ्या पुण्यरूपी वृक्षाची पालवी होय. ] त्या इच्छेमुळें तुझ्याजवळ माझें येणें झाल्यानें त्या वृक्षाला फुलांचा बहार आल्यासारखें झालें आहे. (तुझ्या चरणाजवळ येणें हें पुण्यवृक्षांचीं फुलें होत.) आणि तुझा मुखचंद्र ह्या वेळीं माझ्या दृष्टीस पडल्यानें त्या वृक्षाला फलें आल्याप्रमाणें झालें आहे. (तुझ्या मुखचंद्राचें दर्शन हें पुण्यवृक्षाचें फल होय.)

शर्वरीषु शशिना प्रयोजनं । भास्करेण दिवसे किमीश्वर ॥

त्वन्मुखेन्दुदलिते तमस्तते। भूतलेऽत्र तकयोस्तु का स्तुतिः॥ ४०॥

अर्थ— हे प्रभो! अंधकारानें (अज्ञानानें) व्याप्त झालेलें हें भूतल, जर तुझ्या मुखचंद्रानें प्रकाशमान (ज्ञानवान्) होत आहे, तर रात्रीच्यावेळीं चंद्राचें काय प्रयोजन आहे? आणि दिवसा सूर्याचें तरी काय प्रयोजन आहे? कांहीं नाहीं. कारण, त्यांचें कांहीं कार्यच जगांत राहिलें नाहीं. ह्मणून, त्यांची स्तुति करण्यांत कांहींच अर्थ नाहीं.

अमितगुणगणानां त्वद्गतानां प्रमाणं। भवति समधिगन्तुं यस्य कस्यापि वाञ्छा॥
प्रथममपि स तावद्व्योम कत्यङ्गुलं स्या-। दिति च सततसंख्याभ्यासमङ्गीकरोतु॥ ४१॥

अर्थ— हे नाथा! तुझ्या ठिकाणी असलेल्या असंख्य गुणांचें प्रमाण समजावें अशी जर कोणाला इच्छा होईल; तर, त्यानें प्रथम आकाश किति अंगुलें लांब आहे तें मोजण्याकरितां संख्येचा अभ्यास करावा. तात्पर्य—आकाश किती अंगुलें लांब आहे ह्याची संख्या समजणें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें, तुझ्या गुणांची संख्या समजणेंही शक्य नाहीं.

देव त्वदंघ्रिनखमण्डलदर्पणेऽस्मि-। न्नर्घ्ये निसर्गरुचिरे चिरदृष्टवक्त्रः॥
श्रीकीर्तिकान्तिधृतिसङ्गमकारणानि। भव्यो न कानि लभते शुभमङ्गलानि॥ ४१॥

अर्थ— हे देवा! स्वभावतःच सुंदर असलेल्या आणि पूज्य अशा ह्या तुझ्या चरणनखरूपी दर्पणांत जो

भव्यजीव फार वेळ आपलें मुख अवलोकन करतो (तुझ्या चरणावर जो फार वेळ नम्र होतो;) तो भव्यजीव, संपत्ति, कीर्ति, कांति आणि धृति (धैर्य) ह्यांच्या प्राप्तीची कोणती मंगल साधनें मिळवीत नाहीं? सर्व साधनें मिळवितो. ह्मणजे श्रीजिनेंद्राचें दर्शन करणाऱ्या मनुष्याच्याजवळ संपत्ति, कीर्ति, कांति आणि धृति, ह्या प्राप्त होण्याची सर्व साधनें आपोआप चालून येतात.

त्वद्दर्शनं यदि ममास्ति दिने दिनेऽस्मिन् । देव प्रशस्तफलदायि सदा प्रसन्नम् ॥
कल्पद्रुमार्णवसुरग्रहमन्त्रविद्या- । चिन्तामणिप्रभृतिभिर्न हि कार्यमस्ति ॥ ४२ ॥

अर्थ— भगवन्! विपुल फल देणारें आणि सर्वदा आनंदमय असें हें तुझें दर्शन जर मला प्रतिदिवशीं होईल, तर कल्पवृक्ष, समुद्र, देव, ग्रह, मंत्र, विद्या, चिन्तामणि वगैरेच्या योगानें माझें कांहींच काम नाहीं. कल्पवृक्ष वगैरे इच्छितफल देणाऱ्या वस्तूंची मला मुळींच गरज नाहीं.

जिनपूजाक्रम

इति संस्तुत्य देवं तमुपविश्य जिनाग्रतः
भार्यायै याचितं वस्तु पानीयाक्षतचन्दनम् ॥ ४३ ॥
पुष्पं नैवेद्यदीपांश्च धूपं फलमतः परम् ॥
समालोक्य च संशोध्य पूजा कार्या सुबुद्धितः ॥ ४४ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें श्रीजिनेंद्राची स्तुति करून त्याच्या अग्रभागीं बसावें. नंतर आपल्या पत्नीजवळ मागितलेले पाणी, अक्षता, गंध, फुलें, अनेक नैवेद्य, दीप, धूप आणि फल हे पदार्थ जीवजंतु त्यात आहे की काय! हें समजण्याकरितां नीट तपासून पाहून, शुद्धमनानें प्रभूची पूजा करावी.

आव्हानं स्थापनं कृत्वा सन्निधीकरणं तथा ॥
पञ्चोपचारविधितः पूजनं च विसर्जनम् ॥ ४५ ॥

अर्थ— पूजा करतांना प्रथम श्रीजिनेंद्राचे आवाहन (बोलावणें) करावें. नंतर आपल्या पुढें असलेल्या प्रतिमेच्या ठिकाणीं श्रीजिनेंद्राचें स्थापन करावें. मग सन्निधीकरण (पूजा होईपर्यंत प्रतिमेच्या ठिकाणीं रहाण्याची प्रार्थना) करावें. मग त्याची पंचोपचारानें पूजा करून विसर्जन करावें.

गर्भागारे जिनेन्द्राणां कृत्वा पूजां महोत्सवैः ॥
स्तुतिं स्तुत्या परं भक्त्या नमस्कारं पुनःपुनः ॥ ४६ ॥
कृत्वा मण्डपमध्येऽत्र वेदिकां च समागमेत् ॥
जिनस्य दक्षिणे भागे दर्भासनमुपाश्रयेत् ॥ ४७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें गर्भागारात श्रीजिनेंद्राची पूजा मोठ्या उत्साहानें करून, आणि अनेक स्तोत्रांनीं त्याची स्तुति करून वारंवार नमस्कार करावेत. नंतर मंडपाच्या मध्यभागी असलेल्या कट्याजवळ यावें, आणि

जिनेंद्राच्या उजव्या बाजूस दर्भासनावर बसावें.

वनिताहस्ततो वाऽन्यशिष्यहस्तात्तथाऽपि च ॥
गृहीत्वा त्वर्चनाद्रव्यं पूजयेज्जिननायकम् ॥ ४८ ॥

अर्थ— नंतर स्वस्त्रीकडून किंवा शिष्याकडून अथवा दुसऱ्या कोणाकडून आणविलेलें पूजाद्रव्य (पूजेचे पदार्थ) घेऊन, त्या ठिकाणीं पुढीलप्रमाणें श्रीजिनेंद्राची पूजा करावी.

पञ्चवर्णैर्महाचूर्णै रङ्गवल्लीं समालिखेत् ॥ कदलीसल्लकीस्तम्भैरिक्षुदण्डैः सतोरणैः ॥ ४९ ॥ घण्टाचमरसम्भूपैर्भूषयेज्जिनवेदिकाम् ॥ पूर्णकुम्भार्चनाद्रव्यदर्भांश्च वामभागतः ॥ ५० ॥ गन्धकुट्यां जिनेन्द्रस्य प्रतिमां च निवेशयेत् ॥ सिद्धचक्रस्य यन्त्रं च पूजयेद्गुरुपादुकाम् ॥ ५१ ॥ सहस्रनाम देवस्य पठेत्तावद्विधानतः ॥ सकलीकरणं कृत्वा शोधयेन्निजदेहकम् ॥ ५२ ॥ गन्धपुष्पाक्षतैस्तोयैः पूजाद्रव्याणि शोधयेत् ॥ पूजोपकरणस्तोमं शोधयेच्छुचिभिर्जलैः ॥ ५३ ॥

अर्थ— पांच रंगाच्या निरनिराळ्या चूर्णानें रंगवल्ली काढावी. केळी किंवा सळई ह्यांचे खांब, ऊंस, तोरण, घाट, चवऱ्या आणि अनेक प्रकारचीं भूषणें ह्यांच्या योगानें ती वेदिका (कट्टा) सुशोभित करावी.

पाण्याची घागर, पूजेचे पदार्थ आणि दर्भ हे आपल्या डाव्या हाताकडे ठेवावेत. मग गंधकुटीच्या ठिकाणीं श्रीजिनेंद्राच्या प्रतिमेचें स्थापन करावें. सिद्धचक्राचें यंत्र आणि गुरूच्या पादुका ह्यांची पूजा करावी. श्रीजिनाचें सहस्रनाम स्तोत्र पठण करावें. सकलीकरण करून आपल्या देहाची शुद्धि करावी. गंध, फुलें, अक्षता वगैरे पूजेचे पदार्थ पाण्यानें शुद्ध करावेत. तसेंच आणखी पूजेला लागणारी सामग्रीही पाण्यानें धुवून शुद्ध करावी.

तत ईशानदिग्भागे वास्तुवायुकुमारकान् ॥
मेघाग्निनागदेवांश्च भूमिशुद्धिविधायकान् ॥ ५४ ॥
दर्भाम्बुवन्हिभिः शुद्धैर्भूमिं संशोध्य पूजयेत् ॥
महावाद्यनिनादेन पुष्पांजलीभिरञ्जसा ॥ ५५ ॥
शिष्या विद्यागुरूंश्चात्र सार्घ्यदानेन तर्पयेत् ॥
अग्निकोणे क्षेत्रपालं गुडतैलैश्च पूजयेत् ॥ ५६ ॥

अर्थ— मग ईशान्येकडच्या बाजूस भूमिशुद्धि करणाऱ्या वास्तुदेवता आणि वायुकुमार, मेघकुमार, अग्निकुमार आणि नागकुमार ह्यांची पूजा करावी. पूजा करण्याच्या अगोदर दर्भ, पाणी आणि अग्नि ह्यांच्या योगानें भूमीची शुद्धता करावी. आणि नंतर पूजा करावी. पूजेच्या वेळीं मोठमोठी वाद्यें

वाजवावीत. देवावर पुष्पांजलि घालावी. ह्याच ठिकाणीं आपल्या विद्यागुरूंला अर्घ्य देऊन त्यांची पूजा करावी. नंतर आग्नेयेकडील बाजूस गूळ आणि तेल ह्या द्रव्यांनी क्षेत्रपालाची पूजा करावी.

ईशानदिशि नागाँश्च क्षीरैरञ्जलिपूरितैः ॥
आभिः पुण्याभिरित्यादि श्लोकेन भुवमर्चयेत् ॥ ५७ ॥

अर्थ— ईशान्यदिशेला जी नागकुमारांची पूजा सांगितली ती ओंजळभर पाण्यानें करावी. आणि "आभिः पुण्याभि" इत्यादिश्लोकानें ( हा श्लोक पुढें आहे ) भूमीची पूजा करावी.

आभिः पुण्याभिरद्भिः परिमलबहलेनामुना चन्दनेन ।
श्रीह्रिक्पेयै-(!)-रमीभिः शुचिसदकचयैरुद्गमैरेभिरुद्धैः ॥
हृद्यैरेभिर्निवेद्यैर्मखभवनमिमैर्दीपयद्भिः प्रदीपै- ।
र्धूपैः प्रेयोभिरेभिः पृथुभिरपि फलैरेभिरर्चामि भूमिम् ॥ ५८ ॥

"आभिः पुण्याभि" इत्यादि श्लोकाने भूमीचें पूजन करण्यास वरील श्लोकांत सांगितलें आहे, तो श्लोक हाच होय. हा श्लोक म्हणून, जल, गंध, पुष्प, अक्षता, नैवेद्य, दीप, धूप आणि फल ह्या पदार्थांच्या योगानें भूमीची पूजा करावी.

ततः श्रुतं गुरुं सिद्धं यक्षान्यक्षीश्च देवताः ॥

पूजयेद्विधिवद्भक्त्या दीर्घया दम्भवर्जितः ॥ ५९ ॥

अर्थ— नंतर शास्त्र, गुरु, सिद्ध, यक्ष आणि यक्षी ह्या देवतांची पूजा यथाविधि मोठ्या भक्तीनें करावी. पूजा करतांना दांभिक वृत्ति असू नये.

आभरणधारण

जिनांघ्रिचन्दनैः स्वस्य शरीरे लेपमाचरेत् ॥
यज्ञोपवीतसूत्रं च कटिमेखलया युतम् ॥ ६० ॥
मुकुटं कुण्डलद्वन्द्वं मुद्रिकां करकङ्कणम् ॥
बाहुबन्धांघ्रिभूपे च वस्त्रयुग्मं च तत्परम् ॥ ६१ ॥
जिनांघ्रिस्पर्शितां मालां निर्मलां कण्ठदेशके ॥
ललाटे तिलकं कार्यं तेनैव चन्दनेन च ॥ ६२ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या चरणावरील गंधानें आपल्या अंगाला लेप करावा. तसेंच यज्ञोपवीत, कमरेची मेखला, मुकुट, कुंडलें, बोटांतील अगठ्या, हातांतील कडें वगैरे दागिने, दंडांत घालावयाचे दागिने, पायांत घालावयाचे साखळ्या वगैरे दागिने आणि अंगांवर घेण्याची वस्त्रें ह्या सर्व पदार्थांना श्रीजिनेंद्राच्या चरणांवरील गंध लावावें. श्रीजिनेंद्राच्या चरणाचा जिला स्पर्श झाला आहे अशी पुष्पमाला आपल्या कंठात धारण

करावी. आणि त्या भगवंताच्या चरणाचा स्पर्श झालेलें गंध आपल्या कपाळास लावावें.

तिलकाचे प्रकार

आतपत्रं तथा चक्रं अर्धचन्द्रं त्रिशूलकम् ॥
मानस्तम्भस्तथा सिंहपीठकं चेति षड्विधम् ॥ ६३ ॥

अर्थ— छत्राकार, चक्राकार, अर्धचंद्राकार, त्रिशूलाकार, मानस्तंभाकार आणि सिंहासनाकार असे गंध लावण्याचे सहा प्रकार आहेत.

छत्रत्रयमिति स्मृत्वा आतपत्रमुदाहृतम् ॥
धर्मचक्रमिति स्मृत्वा चक्राकारं च कारयेत् ॥ ६४ ॥
पाण्डुशिलेति संस्मृत्य अर्धचन्द्रं विनिर्मितम् ॥
रत्नत्रयमिति ज्ञात्वा त्रिदण्डं तिलकं स्थितम् ॥ ६५ ॥
मानस्तम्भाकृति कार्यं मानस्तम्भाभिधानकम् ॥
सिंहासनं जिनेन्द्रस्य संस्मृत्य सिंहविष्टरम् ॥ ६६ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या तीन छत्रांचें स्मरण करून छत्राकार गंध लावावें. धर्मचक्राचें स्मरण करून चक्राकार गंध लावावें. तीर्थकराच्या जन्माभिषेकाच्या वेळीं असलेल्या शुभ्राशिलेचें स्मरण करून अर्धचंद्राकार

गंध लावावें. रत्नत्रयाचें स्मरण करून त्रिशूलाकार गंध लावावें. मानस्तंभाचें स्मरण करून मानस्तंभाकार गंध लावावें. आणि श्रीजिनेंद्राच्या सिंहासनाचें स्मरण करून सिंहासनाकार किंवा पीठाकार गंध लावावें.

तिलकाचीं स्थानें

आतपत्रार्धचन्द्रे वा यदा भाले धृते तदा ॥
वक्षसि भुजयोः कण्ठे त्रिशूलाकृतिमादिशेत् ॥ ९७ ॥

अर्थ— ज्यावेळीं कपाळावर अर्धचंद्राकार किंवा छत्राकार गंध लाविलें असेल, त्यावेळीं ऊर, दोनी बाहू आणि कंठ ह्यांवर त्रिशूलाकार गंध लावावें.

भाले स्तम्भं तथा पीठं भुजादौ स्वस्तिकं तदा ॥
त्रिदण्डमथवा चक्रं तदाकृति तथा भवेत् ॥ ९८ ॥

अर्थ— कपाळावर जेव्हां स्तंभाकार किंवा पीठाकार गंध लाविलें असेल त्या वेळीं बाहू वगैरे ठिकाणीं स्वस्तिकाकार, त्रिशूलाकार अथवा चक्राकार गंध लावावें.

सर्वाङ्गलेपनं प्रोक्तं सर्वेषु तिलकेषु वा ॥
तदुपरि त्रिशूलाद्यानाकारान्परिचिन्तयेत् ॥ ९९ ॥

अर्थ— कपाळास कोणत्याही प्रकारचा तिलक लावावयाचा असला तथापि सर्वांगाला गंध लावून त्यावर

त्रिशूल वगैरे आकाराचें गंध लावावें.

तिलकाच्या आकृति

आतपत्रं त्वर्धचन्द्रं तिर्यग्रेखं प्रकीर्तितम् ॥
त्रिदण्डं मानिकस्तम्भमूर्ध्वरेखमुदाहृतम् ॥ ७० ॥
सिंहपीठं तथा चक्रं वर्तुलं वर्तुलाकृति ॥
स्तम्भश्चैकांगुलव्यासो द्व्यंगुलोऽप्यथवा भवेत् ॥ ७१ ॥

अर्थ— छत्र आणि अर्धचंद्र ह्या आकृति आडव्या रेषेच्या आहेत. त्रिशूल आणि मानस्तंभ ह्या दोन आकृति उभ्या रेषेच्या आहेत. सिंहासन आणि चक्र ह्या दोन आकृति वर्तुलाकार आहेत. स्तंभाकृति ही एक बोट किंवा दोन बोटें रुंद असावी.

अङ्गुलं विष्टरव्यासे चतुरङ्गुलमेव वा ॥
भ्रूकेशयोश्च संव्याप्य विशालं स्तम्भविष्टरम् ॥ ७२ ॥
चक्रं तथैव विज्ञेयं त्रिदण्डं केशसंगतम् ॥
आतपत्रं त्वर्द्धचन्द्रं रागिणां सुखकारणम् ॥ ७३ ॥

अर्थ— सिंहासनाकार लाविलेल्या गंधाचा व्यास एक अंगुल किंवा दोन अंगुलें असावा. आणि स्तंभ

सिंहासन आणि चक्र ह्या आकृतींचें गंध, भुवयांच्या केसावरूनही येईल, इतकें मोठें लावावें. त्रिशूलाकार गंध भुवयांच्या केसावर येऊं देऊं नये. केसाजवळ असावें. छत्र आणि अर्धचंद्र ह्या आकृति, विषयी लोकांना संतोष देणाऱ्या आहेत.

सर्वांगे रचना कार्या विकारपरिवर्जिता ॥
भुजयोर्भालदेशे वा कण्ठे ह्युदरेऽपि च ॥ ७४ ॥

अर्थ— ह्या वर सांगितलेल्या गंधाच्या आकृति सर्वांगावर न बिघडूं देता लावाव्यात. ह्मणजे दोन भुज, कपाळ, गळा, ऊर आणि पोट ह्या सहा स्थानांवर लावाव्यात.

चतुर्वर्णाचे तिलकभेद.

अर्धचन्द्रातपत्रे तु कुर्वन्ति क्षत्रियाः पराः ॥
स्तम्भं पीठं तथा छत्रं ब्राह्मणानां शुभप्रदम् ॥ ७५ ॥
मानस्तम्भं तथा छत्रं वैश्यानां तु सुखप्रदम् ॥
शूद्राणां तु भवेच्चक्रमितरेषां त्रिदण्डकम् ॥ ७६ ॥

अर्थ— क्षत्रियांनीं अर्धचंद्र आणि छत्र ह्या आकृतीचें गंध लावावें. ब्राह्मणांनी मानस्तंभ, सिंहासन किंवा छत्र ह्या आकृतीचें लावावें. तें त्यांना मंगलकारक आहे. मानस्तंभ आणि छत्र ह्या आकृतीचें गंध

वैश्यांनीं लावावें. शूद्रांनीं चक्राकार गंध लावावें, आणि इतर लोकांनीं त्रिशूलाकार लावावें.

क्षत्रियवैश्यविप्राणां योषितां तिलकं स्मृतं ॥
अर्धचन्द्रस्तथा छत्रं तिर्यग्रेखाचतुष्टयम् ॥ ७७ ॥

अर्थ— क्षत्रिय, वैश्य, ब्राह्मण आणि त्यांच्या स्त्रिया ह्यांनीं तिलक अवश्य लावावा. तो अर्धचंद्राकार किंवा छत्राकार तिलकाच्या आडव्या चार रेघा असाव्यात.

त्रैवर्णिकाचे तिलकाचे पदार्थ.

योषितां सर्वशूद्राणां स्तम्भं पीठं त्रिदण्डकम् ॥
चन्दनकुङ्कुमश्रेष्ठद्रव्यैस्त्रिवर्णके स्मृतम् ॥ ७८ ॥

अर्थ— शूद्र आणि त्यांच्या स्त्रिया ह्यांनीं स्तंभाकार, सिंहासनाकार किंवा त्रिशूलाकार तिलक धारण करावा. त्रैवर्णिकांनीं लावावयाचें गंध चंदन, केशर किंवा दुसरीं उंचीं सुगंध द्रव्यें ह्यांचें असावें.

शूद्राच्या तिलकाचे पदार्थ.

निम्बकाष्ठैर्मृदा वाऽथ शूद्राणां शुभ्रभस्मना ॥
सिन्दूरैर्वा निशाचूर्णैः सर्वासां योषितां वरम् ॥ ७९ ॥

अर्थ— लिंबाचें खोड किंवा मृत्तिका अथवा पांढरी राख ह्यांचा तिलक शूद्रांनीं धारण करावा. सर्व-

वर्णाच्या स्त्रियांनीं सिंदूर किंवा हळदीची पूड यांचा तिलक धारण करावा, हें फार उत्तम आहे.

अक्षतधारण.

सुगन्धलेपनस्योर्ध्वं मध्येभालं धरेद्गृही ॥
अङ्गुलाग्रमिते देशे जिनपादार्चिताक्षतान् ॥ ८० ॥

अर्थ— कपाळाला गंध लावल्यावर, कपाळाच्या मध्यभागीं अंगुलीच्या अग्राइतक्या जाग्यांत जिनपूजनाच्या अक्षता गृहस्थानें धारण कराव्यात.

गंधलेपनाचा महिमा.

ब्रह्मघ्नो वाऽथ गोघ्नो वा तस्करः सर्वपापकृत् ॥
जिनांघ्रिगन्धसम्पर्कान्मुक्तो भवति तत्क्षणात् ॥ ८१ ॥

अर्थ— ब्रह्महत्या, गोहत्या, चोरी अथवा कोणतींही पातकें करणारा असा जरी मनुष्य असला, तथापि त्यानें श्रीजिनेंद्राच्या चरणांचा स्पर्श ज्याला झाला आहे असें गंध आपल्या अंगास लाविलें असतां, तो त्याच क्षणीं सर्वपातकांपासून मुक्त होतो.

गंध लावण्याच्या बोटाचीं फळें.

अङ्गुष्ठः पुष्टिदः प्रोक्तो यशसे मध्यमा भवेत् ॥

अनामिका श्रियं दद्यान्मुक्तिं दद्यात्प्रदेशिनी ॥ ८२ ॥

अर्थ—अंगठा पुष्टी देणारा आहे. मधलें बोट कीर्ति देणारें आहे. अनामिका हें बोट संपत्ति देणारें आहे. आणि अंगठ्याजवळचें बोट मोक्ष देणारें आहे. असें शास्त्रकारांनीं सांगितलें आहे.

श्रीकामः पुष्टिकामो वा यथेष्टं तिलकं चरेत् ॥
अभ्यंगोत्सवकाले तु कस्तूरीचन्दनादिना ॥ ८३ ॥

अर्थ— संपत्तीची किंवा पुष्टीची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें पाहिजे तसा तिलक लावावा. आणि तेल अंगास लावून स्नान केलें असतां किंवा कांहीं उत्सव असतां कस्तूरी, चंदन वगैरे पदार्थांचा तिलक लावावा.

तिलकावाचून न करावयाचीं कृत्यें.

जपो होमस्तथा दानं स्वाध्यायः पितृतर्पणम् ॥
जिनपूजा श्रुताख्यानं न कुर्यात्तिलकं विना ॥ ८४ ॥

अर्थ— जप, होम, दान, स्वाध्याय, पितृतर्पण, जिनपूजा आणि शास्त्राचें व्याख्यान ह्या क्रिया तिलक धारण केल्यावांचून करूं नयेत.

वस्त्रयुग्मं यज्ञसूत्रं कुण्डले मुकुटस्तथा ॥
मुद्रिका कंकणं चेति कुर्याच्चन्दनभूषणम् ॥ ८५ ॥

अर्थ— अंगावरील दोनीं वस्त्रें, यज्ञोपवीत, कुंडलें, मुकुट ( शिरोभूषण ) अंगठ्या, आणि हातांतील कडें ह्या सर्व वस्तु गंध लावून सुशोभित कराव्या.

ब्रह्मग्रन्थिसमायुक्तं दर्भैस्त्रिपञ्चभिः स्मृतम् ॥
मुष्ट्यग्रं वलयं रम्यं पवित्रमिति धार्यते ॥ ८६ ॥

अर्थ— तीन अथवा पांच दर्भ घेऊन त्यांना ब्रह्मग्रंथि करून त्या ब्रह्मग्रंथीतून बाहेर आलेले दर्भाचे शेंडे चार अंगुलें लांब सोडावेत, ह्याप्रमाणें केलें असतां त्या दर्भाची पुढें वलयामध्यें गांठ आणि खालीं शेंडे अशी आकृति होते. ह्यास पवित्र असें ह्मणतात. हें पवित्र अनामिका ह्या बोटांत धारण करावें.

एवं जिनांघ्रिगन्धैश्च सर्वांगं स्वस्य भूषयेत् ॥
इन्द्रोऽहमिति मत्वाऽत्र जिनपूजा विधीयते ॥ ८७ ॥

अर्थ— याप्रमाणें जिनबिंबाच्या पायावरील गंधानें आपलें सर्व अंग ( ठिकठिकाणच्या अलंकारांच्या ऐवजीं गंधलेपन करून ) भूषित करावें. आणि येथें मी इंद्र उभा आहे अशी भावना करून जिनपूजा करावी.

श्रीपीठस्थापन.

पाण्डुकाख्यां शिलां मत्वा श्रीपीठं स्थापयेत्क्रमात् ॥
मध्ये श्रीकारमालेख्य दर्भाक्षतजलैः शुभैः ॥ ८८ ॥

अर्थ— मेरुपर्वतावर इंद्रानें जेथें जिनेंद्रास जन्माभिषेक केला, ती पांडुक नांवाची शिला हीच होय. अशी भावना करून; श्रीपीठ स्थापन करून त्यामध्यें 'श्री' हें अक्षर लिहावें आणि त्या श्रीकारसहित पीठाची अष्टद्रव्यांनीं पूजा करावी.

प्रतिमास्थापन.

ततो मङ्गलपाठेन प्रतिमां तत्र चानयेत् ॥
सिद्धादीनां च यन्त्राणि स्थापयेन्मन्त्रयुक्तितः ॥ ८९ ॥

अर्थ— त्यानंतर त्या पीठावर मंगलपाठ ( स्तुतिस्तवन ) उच्चारीत जिनप्रतिमा स्थापन करावी आणि त्याचप्रमाणें सिद्धचक्र वगैरे यंत्रांचीहि मंत्रसहित स्थापना करावी.

प्रक्षाल्य जिनबिम्बं तत्सुगन्धैर्वासितैर्जलैः ॥
आव्हानं स्थापनं कृत्वा सन्निधानं तथैव च ॥ ९० ॥
ततः पञ्चगुरुमुद्रां निवृत्य परिदर्शयेत् ॥
ततः पाद्यविधिं कृत्वा जलैराचमयेज्जिनम् ॥ ९१ ॥
ततो नीराजनं कृत्वा पूजयेदष्टधार्चनैः ॥
भस्मोदनशलाकागोमयपिण्डनिराजनां ॥ ९२ ॥

अर्थ— श्रीपीठावर जिनबिंब स्थापन करितांना त्या बिंबास आव्हान स्थापन सांनिधापन वगैरे विधि मंत्रपूर्वक करून; तें बिंब सुगंधयुक्त जलांनीं प्रक्षालित करावें. त्यानंतर आपल्या हस्ताची पंचगुरुमुद्रा करून ती मुद्रा प्रतिमेपुढें तीनवार फिरवून दाखवावी. त्यानंतर प्रतिमेस पाद्य ( कमळाची मुळी, पांढऱ्या मोहऱ्या, दूर्वा आणि अक्षता मिळून अर्पण करणें यास पाद्य ह्मणतात. ) देऊन, जलानें आचमन करवावें ह्मणजे प्रतिमेच्या मुखास तीनवार उदक द्यावें. त्यानंतर नीराजनविधी करून, अष्टद्रव्यांनी पूजा करावी. शुद्धगोमयाचें भस्म, भात, दर्भाच्या कांड्या, गोमय ( अंतराळीं धरलेलें गाईचें शेण ) पिंड ( पंचवर्ण भाताचें पिंड ) इत्यादि द्रव्यांनीं नीराजन करावें. ह्मणजे ही द्रव्यें देवावरून उतरून टाकावीं.

चतुष्कोणेषु कुम्भांश्च मालाचन्दनचर्चितान् ॥
फलपल्लववक्रस्थान्ससूत्रान्स्थापयेत्क्रमात् ॥ ९३ ॥

अर्थ— श्रीपीठासमोर चौरंगावर च्यारी कोणांत पुष्पमाळा व चंदनातिलक यांनीं युक्त व ज्यांच्या मुखावर फळें आणि पानें ठेविली आहेत असे चार कुंभ क्रमानें स्थापन करावे.

अर्घ्यैः सम्पूज्य कुम्भांस्तांस्ततो दिक्पालकान्दश ॥
अर्घ्यपाद्यादिभिर्यज्ञभागबल्यादिभिर्यजेत् ॥ ९४ ॥

अर्थ— त्या कुंभाची अर्घ्यांनी पूजा करून, नंतर दहा दिक्पाल देवांची अर्घ्य, पाद्य, यज्ञोपवीत, बलि

वगैरे देऊन पूजा करावी.

कलशस्थापन.

ततः पुष्पाञ्जलिं दत्वा वाद्यनिर्घोषनिर्भरैः ॥
उध्दृत्य कलशान्पूर्वांस्तज्जलैः स्नापयेज्जिनम् ॥ ९५ ॥

अर्थ— नंतर पूजेच्या भूमीवर पुष्पांजलि देऊन, अनेक वाद्यांचा घोष चालू असतांना, स्थापन केलेल्या नऊ कलशांपैकीं च्यार कलश सोडून मधले चार कलश उचलून त्यांतल्या जलांनीं जिनबिंबास अभिषेक करावा.

पचामृताभिषेक

इक्षुरसभृतैः कुम्भैस्तथा घृतघटैः परैः ॥
दुग्धकुम्भैस्तथा दध्नः कुम्भैः संस्नापयेत्पुनः ॥ ९६ ॥

अर्थ— त्यानंतर उंसाचा रस भरलेल्या कुंभांनीं, त्यानंतर तूप भरलेल्या कलशांनीं, त्यानंतर दुधाच्या कलशांनी आणि शेवटीं दहीं भरलेल्या कलशांनी अभिषेक करावा, उंसाचा रस मिळत नाही तेंव्हां नारळाचा रस किंवा आंब्याचा रस अभिषेकास घेतात.

कोणकलशाभिषेक.

सर्वौषधिरसैश्चापि चोध्दृत्य श्रीजिनेश्वरम् ॥

कोणस्थैः कलशैर्देवं युक्त्या संस्नापयेत्ततः ॥ ९७ ॥

अर्थ— त्यानंतर सर्वौषधींचा रस जिनप्रतिमेच्या सर्वांगास लाऊन; त्यावर, पूर्वी स्थापिलेल्या च्यार कोणांवरील च्यार कलशांतील जलांनीं अभिषेक करावा. ( कंकोळ, मिरे, वेलदोडे, लवंग, श्रीखंड, कर्पूर, केशर, अगरु, तगर, देवदारु, जातिफल वगैरे पदार्थ पिसून पाण्यांत कालवून तयार करणें यास सर्वौषधिरस ह्मणतात. )

जिनपादोदकग्रहण.

गन्धद्रव्यविमिश्रैश्च जलैः संस्नापयेत्पुनः ॥
पादोदकं जिनेन्द्रस्य प्रकुर्यात्स्वस्य मूर्द्धनि ॥ ९८ ॥

अर्थ— त्यानंतर पुनः गंधद्रव्यांनीं मिश्र अशा जलांनीं जिनबिंबास अभिषेक करावा आणि त्या प्रतिमेच्या पायाचें उदक आपल्या मस्तकीं सिंपावें.

अष्टद्रव्यार्चन.

वस्त्राञ्चलैस्तथाप्रोञ्छ्य संस्थाप्य यन्त्रमध्यतः ॥
पूजयेदष्टधा द्रव्यैर्निर्मलैश्चन्दनादिभिः ॥ ९९ ॥

अर्थ— त्यानंतर ती प्रतिमा वस्त्राच्या पदरांनीं स्वच्छ पुसून पुनः त्या पीठयंत्रावर स्थापना करून निर्मल

अशा जलगंधादि द्रव्यांनीं अष्टप्रकारें पूजा करावी.

सिद्धयंत्रादिपूजन.

ततः सिद्धादियन्त्राणि श्रुतं गुरुं च पूजयेत् ॥
यक्षयक्षीसुरान्सर्वान्यथायोग्यमभ्यर्चयेत ॥ १०० ॥

अर्थ— त्यानंतर सिद्धचक्र वगैरे यंत्रें, शास्त्र, गुरु, यक्ष, यक्षी व सर्व देव यांची यथायोग्य पूजा करावी.

शेषधारण

त्रिःपरीत्य जिनाधीशं भक्त्या नत्वा पुनः पुनः ॥
जिनश्रीपादपीठस्थां शेषां शिरसि धारयेत् ॥ १ ॥

अर्थ— नंतर जिनेंद्राला तीन प्रदक्षिणा करून व भक्तीनें पुनः पुनः नमस्कार करून जिनपीठावर असलेले गंध, अक्षता, पुष्प, वगैरे पदार्थ आपल्या मस्तकावर धारण करावेत.

होमाचा विधि

एवमाराधनां कृत्वा होमशालां ततो व्रजेत् ॥
समिधाद्यर्चनाद्रव्यं गृहीत्वा निजभार्यया ॥ २ ॥

अर्थ— आतां होमाचा विधि सांगतों— वर सांगितल्याप्रमाणें पूजा झाल्यावर समिधा वगैरे होमद्रव्य

आपल्या पत्नीच्या हातांत देऊन आपण होमशालेंत जावें.

लक्षणं होमकुण्डानां वक्ष्ये शास्त्रानुसारतः ॥
भट्टारकैकसन्धेश्च दृष्ट्वा निर्मलसंहिताम् ॥ ३ ॥

अर्थ— एकसंधि भट्टारकाची निर्दोष अशी संहिता (ग्रंथ) पाहून व शास्त्राला अनुसरून प्रथम होमकुंडांचें लक्षण सांगतों.

होमकुंडस्थान.

संशोधितमहीदेशे जिनस्य वामभागतः ॥
अष्टहस्तसुविस्तारा दीर्घा तथैव वेदिका ॥ ४ ॥
चतुःषष्ट्यंशकान् कृत्वा चतुष्कोणे समांशकान् ॥
राक्षसांशान् परित्यज्य पश्चिमायां ततो दिशि ॥ ५ ॥
मनुष्यांशेषु तिर्यक्षु वेदिकां कारयेत्पराम् ॥
तत्र श्रीजिननाथानां प्रतिमां स्थापयेत्पराम् ॥ ६ ॥

अर्थ— जिनेंद्राच्या डाव्या बाजूला शुद्ध भूमीवर आठ हात लांबीरुंदीचा एक कट्टा घालावा. त्या कट्ट्यावर ज्यांचे चारी कोपरे सारखे आहेत असे चवसष्ट भाग करावेत. त्यांपैकीं राक्षसांशाचा भाग टाकून

देऊन पश्चिमेकडील बाजूस आडव्या असलेल्या मनुष्यभागावर एक वेदिका ( लहान कट्टा ) करावी; आणि त्या वेदिकेवर श्रीजिनेंद्राची प्रतिमा स्थापन करावी. [ हे वरील चवसष्ट भाग आणि त्यांतील राक्षसांश वगैरे समजण्यास या ग्रंथाच्या शेवटचीं चित्रें पहावीं. ]

ततोऽग्रदेवभागेषु छत्रत्रयं निवेशयेत् ॥
चक्रत्रयं तथा यक्षयक्षीश्च स्वस्तिकं परम् ॥ ७ ॥

अर्थ— त्या जिनप्रतिमेच्या अग्रभागीं असलेल्या देवभागांवर छत्रत्रय, चक्रत्रय, यक्ष यक्षी आणि स्वस्तिक ह्यांची स्थापना करावी.

ब्रह्मभागांस्ततस्त्यक्त्वा देवमानुषभागयोः ॥
पूर्वे ब्रह्मांशकात्तत्र कुण्डत्रयं तु कारयेत् ॥ ८ ॥
मध्ये कुण्डं वरं तेषां त्रयाणां क्रियते शृणु ॥
अरत्न्यगाधविस्तारं चतुरस्रं त्रिमेखलम् ॥ ९ ॥

अर्थ— त्या पूर्वीच्या मोठ्या वेदिकेवरील ब्रह्मभाग सोडून देव आणि मनुष्य ह्यांच्या भागांत ब्रह्मभागाच्या पूर्वेकडील बाजूस तीन कुंडें करावींत. त्यांपैकीं मधलें कुंड चतुष्कोण असून त्याची लांबी रुंदी आणि खोली एक एक मुंडा हात असावी. आणि त्या कुंडाच्या सभोंवतीं तीन मेखला ( कट्टे ) कराव्यात.

त्रिकोणं दक्षिणे कुण्डं कुर्याद्वर्तुलमुत्तरे ॥
तत्रादिमेखला याश्चाप्यवसेयाश्च पूर्ववत् ॥११०॥
भूताब्धिगुणमात्राः स्युर्मेखलाः प्रथमादयः ॥
मात्रायामं तथैतेषां कुण्डानामन्तरं भवेत् ॥ ११ ॥

अर्थ— त्या मधल्या कुंडाच्या दक्षिणेकडील बाजूला त्रिकोणी कुंड करावें. आणि उत्तरेकडील बाजूला वर्तुलाकार कुंड करावें. त्या दोनी कुंडालाही पहिल्या कुंडाप्रमाणेंच मेखला कराव्यात. त्यांपैकी पहिल्या मेखलेची उंची आणि रुंदी पांच मात्रा असावी. (हाताच्या अंगठ्याच्या पेऱ्यास मात्रा असे ह्मणतात) त्याच्या वरील दुसऱ्या मेखलेची उंची व रुंदी चार मात्रा असावी. आणि त्यावरील तिसऱ्या मेखलेची उंची व रुंदी तीन मात्रा असावी. आणि प्रत्येक दोन कुंडांच्या मध्यें एक मात्रा अंतर असावें.

परितो दिक्षु दिक्पालपीठिकाः कुण्डवेदिकाम् ॥
ततः समर्च्य तत्सर्वं संशोध्य च जलादिभिः ॥ १२ ॥
चतुरस्रं ततः कुण्डं त्रिकोणं तदनन्तरम् ॥
ततो वृत्तमपि प्राचैदम्भोधररसादिभिः ॥ १३ ॥

अर्थ— त्या कुंडांच्या भोवत्यानें अष्ट दिशांना आठ दिक्पालांची पीठें करावीत. नंतर जल वगैरेंच्या

योगानें सर्वांची शुद्धता करून सर्वांची पूजा करावी. त्यांत प्रथम चौकानी कुंड नंतर त्रिकोण कुंड आणि नंतर वर्तुल कुंड ह्याप्रमाणें क्रमानें शुद्धता व पूजा करावी.

तीर्थकृद्गणभृच्छेषकेवल्यन्त्यमहोत्सवे ॥
प्राप्य ते पूजनाङ्गत्वं पवित्रत्वमुपागताः ॥ १४ ॥
ते त्रयोऽपि प्रणेतव्याः कुण्डेष्वेषु महानयम् ॥
गार्हपत्याहवनीयदक्षिणाग्निप्रसिद्धया ॥ १५ ॥

अर्थ—तीर्थकर, गणधर आणि बाकीचे केवलीमुनि ह्यांच्या निर्वाणमहोत्सवांत पूज्य झालेले आणि त्या योगानें पवित्रेला पावलेले असे तीन अग्नि त्या तीन कुडांत घालावेत. त्यांत पहिलें जें चतुष्कोण कुंड, तें तीर्थकरकुंड होय. त्यांतील अग्नीस गार्हपत्य असें नांव आहे. दुसरें त्रिकोण गणधरकुंड होय. त्यांतील अग्नीस आहवनीय असें नांव आहे. आणि वर्तुलाकृति जें कुंड असतें, तें केवलींचें कुंड होय. त्यांतील अग्नीस दक्षिणाग्नि ह्मणतात.

चतुष्कोणे चतुस्तम्भाः सल्लकीकदलीयुताः ॥
घण्टातोरणमालाढ्या मुक्तादामविभूषिताः ॥ १६ ॥
चन्द्रोपकयवारैश्च चामरैर्दर्पणैस्तथा ॥
धूपघटैः करतालैः केतुभिः कलशैर्युताः ॥ १७ ॥

अर्थ— मोठ्या वेदिकेच्या चारी बाजूस चार खांब, सळईचीं पानें व केळीचे खांब ह्यांनीं युक्त असे उभे करावेत. त्यांना घंटा, तोरणें व माळा बांधाव्यात. मोत्यांचे घोस सोडून ते खांब सुशोभित करावेत. त्यांच्यावरील चांदव्याला चंद्रोपक (यंत्राचें चित्र) लावावें. त्या खांबांवर यवार (तीळ पांढऱ्या मोहऱ्या, जिरे, गहूं वगैरे मंगल धान्य) ठेवावें. चवऱ्या, दर्पण धूपघट, करताळ, पताका आणि कलश ह्या मंगल वस्तु त्यांच्या जवळ असाव्यात.

एवं होमगृहं गत्वा पश्चिमाभिमुखं तदा ॥
उपविश्य क्रियाः कार्या नमस्कारपुरस्सराः ॥ १८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें होमगृह तयार करून त्यांत पश्चिमेकडे तोंड करून बसावें. आणि नमस्कार करून नंतर पूजा करण्यास आरंभ करावा. (ह्या ठिकाणीं देवाचें मुख ज्या दिशेकडे असेल ती पूर्वदिशा समजावी. अर्थात् आपण देवाकडे तोंड करून बसलों असतां आपलें तोंड पश्चिमेकडे होतें असें समजावें. पूजाविधींत सर्वत्र असेंच समजणेचें आहे.)

तत्रादौ वायुमेघाग्निवास्तुनागाँश्च पूजयेत् ॥
क्षेत्रपालं गुरुं पितॄन् शेषान्देवान्यथाविधि ॥ १९ ॥
जिनेन्द्रसिद्धसूरीँश्च पाठकान् साधुसंयुतान् ॥

श्रुतं सम्पूज्य युक्त्याऽत्र पुण्याहवचनं पठेत् ॥ १२० ॥

अर्थ— त्यांत प्रथम वायुकुमार, मेघकुमार, अग्निकुमार, वास्तुदेवता, नागकुमार ह्यांची पूजा करून, नंतर क्षेत्रपाल, गुरु, पितर आणि बाकीचे देव ह्याची यथाविधि पूजा करावी. श्रीजिनेंद्र, सिद्ध, सूरि, पाठक ( उपाध्याय ) आणि साधु ह्यांची पूजा करून श्रुताची पूजा करावी. मग पुण्याहवाचनाचें पठण करावें.

चक्रत्रयं दक्षिणेऽस्मिन् वामे छत्रत्रयं यजेत् ॥
पूर्णकुम्भं पुरोभागे यक्षयक्ष्यौ च पार्श्वयोः ॥ २१ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या दक्षिणेकडील बाजूला चक्रत्रयाची पूजा करावी. आणि डावेकडील बाजूला छत्रत्रयाची पूजा करावी. अग्रभागीं पूर्णकुंभाची पूजा करून त्याच्या दोहींबाजूस यक्ष आणि यक्षी ह्यांची पूजा करावी.

कुण्डस्य पूर्वभागे तु दर्भासनोऽवरेमुखः ॥
पद्मासनं समाश्रित्य पूजाद्रव्यं तु विन्यसेत् ॥ २२ ॥
होमद्रव्यप्रदानाय शिष्यवर्गं नियोजयेत् ॥
मौनं व्रतं समादाय ध्यायेच्च परमेश्वरम् ॥ २३ ॥

अर्थ— कुंडाच्या पूर्वेकडील बाजूला दर्भाचें आसन घालून त्यावर पश्चिमेकडे तोंड करून पद्मासन करून

वसावें. आणि जवळ पूजेला लागणाऱ्या वस्तु ठेवाव्यात. होमाला लागणारे पदार्थ आपल्या हातांत देण्याकरितां शिष्यांची योजना—संभव असल्यास—करावी. आपण मौनव्रत धारण करून परमेश्वराचें ध्यान करावें.

जिनेंद्रमर्घ्यदानेन परात्मानं च तर्पयेत् ॥
मध्येकुण्डं सुगन्धेन विलिखेदग्निमण्डलम् ॥ २४ ॥
सम्पूज्य होमकुण्डं तमग्निं सन्धुक्षयेत्परम् ॥
नूतनाग्निर्भवेद्योग्यो होमसन्धुक्षणे तदा ॥ २५ ॥

अर्थ— नंतर श्रीजिनेंद्राला अर्घ्यदान करून परमात्म्याचें तर्पण करावें. कुण्डाच्या मध्यभागी सुगंधद्रव्यानें अग्निमंडल काढावें; आणि कुंडाची पूजा करावी नंतर त्या कुंडांत अग्नि प्रदीप्त करावा. अग्नि ताजा असला ह्मणजे पेटविण्याला योग्य असतो, ह्मणून अग्नि चांगला रसरशीत असावा.

दर्भपूलं पवित्रं तु रक्तवस्त्रेण वेष्टितम् ॥
तेन सञ्ज्वालयेत्कुण्डं स्वमन्त्रेण ससर्पिषा ॥ २६ ॥

अर्थ— शुद्ध अशी दर्भाची जुडी घेऊन तिला तांबडें वस्त्र गुंडाळून त्याच्या योगानें व तुपानें अग्नि प्रज्वलित करावा. त्यावेळी अग्नीचा मंत्र ह्मणावा.

तत आचम्य च प्राणायामं कुर्यात् ततः स्तुतिम् ॥
अग्नेरावाहनं कृत्वा पूजयेदष्टधाऽर्चनैः ॥ २७ ॥

अर्थ— नंतर आचमन करून प्राणायाम करावा. मग अग्नीची स्तुति करून त्याचें आवाहन करावें; आणि त्याचें अष्टधार्चन करावें. (१ जल, २ गंध, ३ अक्षता, ४ पुष्प, ५ चरु, ६ दीप, ७ धूप आणि ८ फल ह्या द्रव्यांनीं पूजन करणें ह्याला अष्टधार्चन ह्मणतात.)

गार्हपत्याग्निमादाय ज्वालयेत्तूत्तरेऽनलम् ॥
उत्तराग्निं तु संगृह्य ज्वालयेद्दक्षिणेऽनलम् ॥ २८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें अग्नीचें पूजन झाल्यावर त्या कुंडांतील थोडासा अग्नि घेऊन उत्तरेकडच्या कुंडांत घालून प्रज्वलित करावा. मग त्या कुंडांतील अग्नि घेऊन दक्षिणेकडील कुंडांत ( वर्तुलाकृति कुंडांत ) घालून प्रज्वलित करावा.

मेखलासु तिथिदेवान् ग्रहानिन्द्रांस्ततः क्रमात् ॥
पूजयेदुपरिष्टात्तु भक्त्या युक्त्या समन्त्रतः ॥ २९ ॥

अर्थ— नंतर कुंडांच्या मेखलांच्या ठिकाणी तिथिदेवता, नवग्रह, इंद्र ह्यांची पूजा क्रमानें भक्तियुक्त अंतःकरणानें युक्तीने मंत्र पठण करीत करावी.

दिक्पालान् परितः कुण्डं वेदिकायां तु तर्पयेत् ॥
कृतेषु लघुपीठेषु यथास्वं स्वदिशास्वपि ॥ १३० ॥
शाल्योदनं घृतं पक्वं नैवेद्यं रसपायसम् ॥
सिञ्चेत्क्षीरैर्घृतैर्मिश्रं दुग्धकेक्षुरसान्वितम् ॥ ३१ ॥

अर्थ— मग कुंडाच्या भोंवती वेदिकेवर अष्टदिक्पालांची पूजा करावी. त्यांचीं लहान लहान पीठें करून त्यांच्या त्यांच्या दिशेकडे त्यांची स्थापना केलेली असावी. तांदळांचा भात, तूप, शिजलेलें अन्न, उसाचा रस, दुधाची खीर ह्यांचा त्यांना नैवेद्य दाखवावा. तसेंच तो भात पाणी, तूप, दूध, उंसाचा रस ह्यांनी मिश्रित करून शिंपडावा.

### स्रुक् आणि स्रुवा.

इन्धनं क्षीरवृक्षस्य स्रुक् स्रुवं चन्दनं तथा ॥
अश्वत्थस्याप्यभावेऽस्य तत्पत्रं वा नियोजयेत् ॥ ३२ ॥

अर्थ— आतां स्रुची ( होमद्रव्य ज्यांत घालून अग्नींत टाकतात तें पात्र. ) आणि स्रुवा ( तूप अग्नीत हवन करण्याचें पात्र ह्मणजे पळी. ) ह्यांचें लक्षण सांगतों. वडाच्या लांकडाची स्रुची करावी. आणि चंदनाच्या लांकडाचा स्रुवा करावा. हीं दोनीं काष्ठें मिळत नसल्यास पिंपळाच्या काष्ठाचीं दोनी पात्रें करावी.

किंवा त्या दोनीं पात्रांबद्दल पिंपळाच्या पानांची योजना करावी.

ततः पलाशपत्रेण क्षीरक्ष्मारुहपत्रतः ॥
स्रुक्स्रुवणोथवास्तु दद्यादादावाज्याहुतिं बुधः ॥ ३३ ॥
गोपुच्छसदृशा स्रुक् च स्रुवाग्रं नासिकासमम् ॥
दैर्घ्यं द्वयोररत्निः स्यान्नाभिदण्डः षडङ्गुलः ॥ ३४ ॥

अर्थ— अथवा वर सांगितलेलें लांकूड मिळत नसल्यास पळसाच्या किंवा वडाच्या पानाची स्रुक् आणि स्रुवा ही पात्रें तयार करावीत, त्या स्रुचीनें किंवा स्रुव्यानें तूपाची आहुती द्यावी. स्रुक् नांवाचें पात्र गायीच्या शेंपटीच्या आकाराचें—म्हणजे लांबड तोंडाचें—करावें. आणि स्रुवा नांवाचें पात्र आपल्या नाकाच्या आकाराचें—रुंदट तोंडाचें—करावें. त्या पात्रांची तोंडें व मागील दांडा मिळून एक मुंडा हात लांबी असावी. त्यांत दांडा सहा बोटें लांब असावा. हें प्रमाण लाकडाची पात्रें करावयाची असल्यास समजावें.

तद्द्वयं दर्भपूलेन प्रमृज्यासेचयेज्जलैः ॥
काष्ठैः प्रताप्य तद्द्वन्द्वं ताभ्यां घृतं च होमयेत् ॥ ३५ ॥

अर्थ— तीं दोनी पात्रें होमाच्या वेळीं दर्भपूलानें ( दर्भाच्या जुडीनें ) मार्जित करून (पुसून) त्यांच्यावर उदक सिंचन करावें. आणि पात्रें अग्नीवर तापवून त्यांच्या योगानें अग्नीत घृतहोम करावा.

आग्निज्वाला तु महती तथा कुर्यात् घृताहुतिम् ॥
आधिकेऽग्नौ गवां दुग्धैः कुशाग्रैः परिषेचयेत् ॥ ३६ ॥
त्रिषु कुण्डेषु सादृश्यं कुर्याद्धोमसमानताम् ॥
गार्हपत्याहवनीयदक्षिणाग्निं क्रमाद्यजेत् ॥ ३७ ॥

अर्थ— अर्थात तुपाची जी आहुति घालावयाची ती ज्या तऱ्हेनें अग्नीची ज्वाला मोठी होईल तशा तऱ्हेनें घालावी. अग्नीची ज्वाला फारच मोठी झाल्यास त्याच्यावर दर्भाच्या अग्राने गायीचे दूध शिंपडावें. तीनी कुंडात सारखाच होम करावा. कमीजास्ती करूं नये. त्यांत प्रथम गार्हपत्याग्नीत (चतुष्कोण कुंडांत), नंतर आहवनीय अग्नीत (त्रिकोण कुंडांत) आणि त्यानंतर दक्षिणाग्नीत (वर्तुल कुंडांत) अशा क्रमानें होम करावा.

तर्पण

तर्पणं पीठिकामन्त्रैः कुसुमाक्षतचन्दनैः ॥
मृष्टाम्बुपूर्णपाणिभ्यां कुर्वन्तु परमेष्ठिनाम् ॥ ३८ ॥

अर्थ— होम झाल्यानंतर करावयाचें तर्पण सांगतात— पीठिकामंत्रांनी (णमो अरिहंताणं वगैरे मंत्रांनी) फुलें, अक्षता, गंध आणि शुद्ध उदक हे पदार्थ अंजलीत घेऊन परमेष्ठींचे तर्पण करावें.

समिधा.

पिप्पलेन पलाशेन शम्या वा द्वादशाङ्गुलम् ॥
आर्द्रेन्धनैर्बुधः कुर्यात्समिधां होममुत्तमम् ॥ ३९ ॥

अर्थ— आतां होमास लागणाऱ्या समिधा सांगतात— पिंपळ, पळस किंवा शमी ह्यांच्या बारा बोटें लांबीच्या ओल्या समिधा घेऊन त्यानें होम करावा.

क्षीरद्रुमैर्वाऽथ पलाशमूरुहैः । सशर्कराक्षीरघृतप्लुतैः पृथक् ॥
होमेऽष्टाविंशद्भिरिमैः (?) समिन्धनै- । र्नमोऽर्हतेत्यादिभिरेव पञ्चभिः ॥ १४० ॥

अर्थ— अथवा वड किंवा पळस ह्यांच्या समिधा काढून त्या साखर, दूध, तूप ह्यांत निरनिराळ्या भिजवून " नमोऽर्हते " वगैरे पांच मंत्रांनी होम करावा. होमाच्या समिधा अठ्ठावीस असाव्यात.

वटिका

काश्मीरागुरुकर्पूरगुडगुग्गुलचन्दनैः ॥
पुष्पाक्षतजलैर्लाजामिलितैरक्षसम्मितैः ॥ ४१ ॥
जयादिदेवतामन्त्रैरग्नेराहुतिमम्बुना ॥
ब्रह्ममायादिहोमान्ते वटिकाहोममाचरेत् ॥ ४२ ॥

अर्थ— आतां होमाच्या वटिका [ गोळया ] सांगतात— केशर, काळा चंदन, कापूर, गूळ, गुग्गुळ, पांढरा चंदन, फुलें, अक्षता, पाणी आणि लाह्या इतके पदार्थ मिसळून वेहेड्याच्या फळाएवढ्या वटिका [ गोळया ] कराव्यात. आणि जयादि देवतांच्या मंत्रानें अग्नीमध्यें होम करावा. मग ब्रह्म, माया वगैरे देवतांचा जलानें होम केल्यावर वटिकाहोम करावा. ह्या ठिकाणीं जलानें जो होम करावयाचा, तो जलामध्येंच करावयाचा, असें समजावें.

अन्न.

शाल्योदनं क्षीरविचित्रभक्ष्य- । पक्वान्नसर्पिः श्रृतपायसं च ॥
सुस्वादु पक्वं कदलीफलं च । स्रुचाऽक्षमात्रं मिलितं जुहोमि ॥ ४३ ॥

अर्थ— होमाचें अन्न सांगतात— तांदळांचा भात, दूध, अनेकप्रकारचे भक्ष्य पदार्थ, शिजलेलीं अन्नें, तूप, दुधाचा खवा, पिकलेलें आणि मधुर असें केळ हे सर्व पदार्थ मिसळून वेहेड्याच्या फळायेवढें स्रुचीमध्यें घेऊन अग्नींत हवन करावें.

अन्नाभावे जुहुयात्तु तण्डुलानोषधीन् स्रुचा ॥
पयो दधि घृतं चापि शर्करां वा फलानि च ॥ ४४ ॥

अर्थ— अन्न जर नसेल तर तांदूळ, वनस्पति, दूध, दही, तूप आणि साखर हे पदार्थ किंवा फलें

स्रुचीमध्यें घेऊन होम करावा.

उत्तानेन तु हस्तेन त्वङ्गुष्ठाग्रेण पीडिते ( ? ) ॥
संहिताङ्गुलिपाणिस्तु मन्त्रतो जुहुयाद्धविः ॥ ४५ ॥

अर्थ— होम करावयाच्या वेळीं हात उत्ताणा असावा; आणि बोटांवर अंगठा दाबावा, तसेंच हाताचीं बोटें एकमेकांना चिकटलेलीं असवींत. ह्याप्रमाणें करून मंत्र ह्मणून होम करावा.

दिक्पालास कोरान्नाहुति.

प्रस्थप्रमाणचणकाढकमाषमुद्ग- । गोधूमशालियवमिश्रितसप्तधान्यैः ॥
होमे पृथग्विधृतमुष्टिभिरग्निकुण्डे । वारांश्च सप्त विषमग्रहदोपशान्त्यै ॥ ४६ ॥

अर्थ— एक शेर हरभरे, आणि उडीद, मूग, गहूं, भात, जव आणि तीळ ( हे श्लोकांत नाहीत. परंतु त्यांवांचून सात धान्यें होत नाहींत, ह्मणून लिहिले आहेत ) हीं सर्व धान्यें मिळून एक पायली, ह्याप्रमाणें सर्व मिसळून, एकेक मूठ निरनिराळीं घेऊन, अग्निकुंडांत—प्रत्येक दिक्पालाबद्दल सात सात वेळ असा—होम केला असतां दिक्पालांची शांति होत्ये. आणि दुष्टस्थानीं असलेल्या ग्रहांच्या उद्देशानें होम केला असतां त्यांपासून होणारी पीडा दूर होते. ह्या होमाला कोरान्नाहुति असें ह्मणतात.

नवग्रह होम

हुत्वा स्वमन्त्रचितमम्बुनि ससस- । मुष्टिप्रमाणतिलशालियवप्रसक्तिम् ॥
नीत्वा घृतप्लुतसमिद्भिरथाग्निकुण्डे । एकादशस्थवदवन्तु सदा ग्रहा वः ॥ ४७ ॥

अर्थ— नवग्रहशांतीचा विशेष प्रकार असा आहे कीं– त्या ग्रहाच्या मंत्रानें भांड्यांत पाणी सांठवून त्यांत तीळ, भात, जव वगैरे धान्याचें प्रत्येक ग्रहाच्या उद्देशानें सात सात वेळां हवन करावें. आणि हीं धान्यें व घृतयुक्त समिधा ह्यांचें हवन अग्निकुंडांत करावें. असें केलें असतां सर्व ग्रह तुम्हाला एकादशस्थानीं असल्याप्रमाणें सुख देतील.

अर्कैः पलाशैः खदिरैर्मयूरै- । र्बोधिद्रुमैः फल्गुशमीसमिद्भिः ॥
दुर्वाकुशाभ्यां क्रमशो ग्रहाणां । सूर्यादिकानां जुहुयात्प्रशान्त्यै ॥ ४९ ॥

अर्थ— रुई, पळस, खदिर, ( खैर, ) अघाडा, पिंपळ, काळा उंबर, शमी, ह्यांच्या समिधा आणि दुर्वा व दर्भ ह्यांच्या योगानें क्रमानें सूर्यादिनवग्रहांचें हवन केलें असतां ( सूर्याच्या शांतीकरितां रुईच्या समिधा, चंद्राच्या शांतीकरितां पळसाच्या समिधा ह्याप्रमाणें क्रमानें त्या त्या ग्रहाच्या शांतीकरितां हवन केलें असतां ) सूर्यादिनवग्रहांची शांति होते.

अर्केण नश्यति व्याधिः पलाशः कामितप्रदः ॥
खदिरश्चार्थलाभश्च अपामार्गोऽरिनाशकः ॥ ५० ॥

अश्वत्थेन हरेद्रोगं दर्भोदुम्बरभाग्यदः ॥
शमी च पापनाशाय दूर्वा चायुःप्रवर्द्धिनी ॥ ५१ ॥

अर्थ— रुईच्या समिधांनी होम केला असतां व्याधीचा नाश होतो. पळसाच्या समिधांनी इष्टप्राप्ति होते. खैरानें द्रव्यलाभ होतो. अघाड्यानें शत्रूचा नाश होतो. पिंपळाच्या समिधांनीं रोगांचें हरण होतें. दर्भ आणि उंबर ह्यान्या समिधांनीं भाग्य येतें. शमीच्या समिधांनीं पातकाचा नाश होतो. आणि दूर्वांच्या हवनानें आयुष्य वाढतें. असें ह्या समिधांचें फळ आहे.

धौतादिवर्णं प्रमुखादिवर्णं । काञ्चीदुकूलं नखच्छिद्रहस्तम् ॥
देवाङ्गवस्त्रोज्वलकुन्दप्रीप्रं । आच्छादनं यज्ञगृहेषु सर्वम् ॥ ५२ ॥ (?)
यदि कुण्डास्त्रयः सन्ति तदा सर्वं समीहितम् ॥
पृथगष्टशतं होम्यं आज्यान्नकुसुमं समित् ॥ ५३ ॥

अर्थ— जर अग्निकुंडें तीन असतील तर सर्व कर्म यथास्थित होतेंच आहे. त्या कुंडांत तूप, अन्न, फुलें आणि समिधा ह्या प्रत्येक द्रव्याचा एकशेहे आठ वेळ होम करावा.

एकमेव यदा कुण्डं गार्हपत्ये चतुरस्रके ॥
सर्वा अप्याहुतीः कुर्यात्पृथगष्टोत्तरं शतम् ॥ ५४ ॥

अर्थ— आणि जर एकच कुंड असेल, तर त्या चतुष्कोण कुंडांत गार्हपत्याग्नींतच सर्व आहुती निरनिराळ्या एकशेहे आठ वेळां द्याव्यात.

अन्नं समिल्लवङ्गापोऽञ्जलिचतुर्विधेषु च ॥
होमेषु यत्नतः कुर्यान्मध्ये मध्ये घृताहुतिम् ॥ ५५ ॥
कुर्यात्पूर्णाहुतिं चान्त्ये ग्रहस्तोत्रं तथा पठेत् ॥
त्रिःपरीत्य नमस्कारं महावाद्यसमन्वितम् ॥ ५६ ॥
तस्माद्भस्म समादाय पवित्रं पापनाशनम् ॥
धरेद्भालादिदेशेषु तिलकं कारयेद्बुधः ॥ ५७ ॥

अर्थ— अन्न, समिधा, लवंगा, उदक ह्या चार प्रकारच्याही होमांत प्रत्येक द्रव्याचा होम संपल्यावर अग्नीत तुपाची आहुति द्यावी. सर्व होम समाप्त झाल्यावर शेवटीं पूर्णाहुति (तुपाची धार मध्यें न तुटेल अशा रीतीनें अग्नीत सारखी सोडणें) द्यावी. ग्रहांचें स्तोत्र ह्मणावें. मग महावाद्यांचा घोष चालला असतां अग्नीला तीन प्रदक्षिणा कराव्यात. अग्नीतील भस्म पवित्र आणि पापनाशक असतें, ह्मणून तें घेऊन कपाळ वगैरे स्थानाला लावावें.

विशेषविधि.

सत्वचः समिधः कार्या ऋज्व्यः श्लाघ्याः समास्तथा ॥
शस्ता दशाङ्गुलास्ताः स्युर्द्वादशाङ्गुलकाश्च वा ॥ ५८ ॥
षण्मासं स्याच्छमी ग्राह्या खादिरं तु त्रिमासिकम् ॥
मासत्रयं तु पालाशी अश्वत्थोऽहरहस्स्मृतः ॥ ५९ ॥
दिनमेकमपामार्गो ग्राह्यश्चार्कस्तथैव च ॥
वटादयोऽपि ग्राह्याः स्युस्त्रिदिनं स्यादुदुम्बरः ॥ १६० ॥
एतेषामप्यभावे तु कुशा इत्यपरे विदुः ॥
मासमेकं कुशो ग्राह्यो दूर्वा स्यात्सद्य एव च ॥ ६१ ॥

अर्थ— कांहीं विशेष नियम सांगतात— समिधा सालीसह असून त्या सरळ आणि एकसारख्या असाव्यात. त्या दहा अंगुलें किंवा बारा अंगुलें लांबीच्या असाव्यात. शमीच्या समिधा काढलेल्या दिवसापासून सहा महिनेपर्यंत होमाच्या उपयोगीं पडतात. खैराच्या समिधा तीन महिने उपयोगीं पडतात. पळसाच्या समिधा तीन महिने उपयोगीं पडतात. पिंपळाच्या समिधा रोजच्यारोज नव्या असाव्यात. अघाड्याच्या समिधा एक दिवसाच्या असल्यास ग्राह्य होतात. रुईच्या समिधाही त्याचप्रमाणें एक दिवसाच्या शिळ्या असल्यास ग्राह्य होत. वड, उंबर वगैरेच्या समिधा तीन दिवस ग्राह्य होत. ह्या समिधा

जर न मिळतील तर त्यांच्या ऐवजीं दर्भ घ्यावेत, असें दुसरे कित्येक पंडित समजतात. दर्भ काढलेल्या दिवसापासून एक महिनापर्यंत ग्राह्य होत. दूर्वा मात्र त्याच वेळीं काढलेल्या होमास घ्याव्यात.

कोद्रवं चणकं माषं मसूरं च कुलित्थकम् ॥
कांजिपक्वं परान्नं च वैश्वदेवे तु वर्जयेत् ॥ ६२ ॥

अर्थ— कोद्रव ( हरीक नावाचें धान्य ), हरभरे, उडीद, मसूरा, कुळथ्या, कांजींत शिजविलेलें अन्न आणि दुसऱ्याचें अन्न हे पदार्थ वैश्वदेवकर्मांत वर्ज्य करावेत.

प्रतिष्ठादिमहत्कार्ये कुर्यादेवं सविस्तरम् ॥
नित्यकर्मणि संक्षेपात्तत्सर्वं विधिपूर्वकम् ॥ ६३ ॥

अर्थ— बिंबप्रतिष्ठा वगैरे मोठ्या कर्मांत हा सर्व विधि वर सांगितल्याप्रमाणें सविस्तर करावा. आणि नित्यकर्मांत संक्षेपानें सर्व यथाविधि करावे.

होमाचे प्रकार.

होमस्तु त्रिविधो ज्ञेयो गृहिणां शान्तिकारकः ॥
पानीयवालुकाकुण्डभेदाद्रम्यः स्वशक्तितः ॥ ६४ ॥

अर्थ— गृही श्रावकानें करावयाचा शांतिक होम जलहोम, वालुकाहोम आणि कुंडहोम ( अग्निहोम )

असा तीन प्रकारचा आहे. तो त्यानें आपल्या, शक्तीप्रमाणें दिसण्यांत सुंदर दिसेल असा करावा.

जलहोम

यत्सद्वर्तुलकुण्डलक्षणमिदं श्रीवारिहोमे जिनैः ।
प्रोक्तं ताम्रमृदादिवस्तुरचिते कुण्डे समारोपितम् ॥
कुर्याच्छ्रीतिथिदेवता ग्रहसुराः शेपाश्च सन्तर्प्यताम् ।
शान्त्यर्थं जलहोममिष्टममलं दुष्टग्रहाणां बुधः ॥ ६५ ॥

अर्थ— जलहोमाच्या उद्देशानें श्रीजिनेंद्रांनीं कुंडाचें जें हें वर्तुलाकार लक्षण सांगितलें आहे, तें तांबें, माती वगैरेंनीं केलेल्या कुंडाच्या ठिकाणीं जुळवावें. ह्मणजे माती, तांबें, वगैरे वस्तूंचें जलहोमाकरितां वर्तुलाकार कुंड करावें. आणि त्या कुंडांत तिथिदेवता, सूर्यादिग्रह, आणि बाकीचे देव ह्यांच्या संतोषाकरितां जलहोम करावा.

श्रीखण्डतण्डुलस्रग्भिः सम्भूपितमलं वरम् ॥
शुद्धतीर्थोदकैः पूर्णं जलकुण्डं महामहे ॥ ६६ ॥
सन्धौतशोधितव्रीहिपुञ्जे जिनमहोत्सवे ॥
संस्थाप्य पूजकाचार्यो जलहोमं समाचरेत् ॥ ६७ ॥

अर्थ— चंदन, अक्षता, माळा ह्यांनीं अत्यंत सुशोभित आणि पवित्र अशा तीर्थोदकानें परिपूर्ण असें जल-

कुंड यज्ञांत करावें. आणि तें धुतलेल्या साळीच्या भाताच्या पुंजावर ठेवून पूजकाचार्यानें त्यांत जलहोम करावा.

सप्तधान्यैस्तु दिक्पालाँस्त्रिधान्यैस्तु नवग्रहान् ॥
पक्वान्नं नालिकेरं च यथा शक्त्यत्र होमयेत् ॥ ६८ ॥

अर्थ— सप्तधान्यांच्या योगानें दिक्पालांच्या उद्देशानें हवन करावें. आणि त्रिधान्यांच्या योगानें नवग्रहांच्या उद्देशानें होम करावा. अन्न व नारळ ह्यांचाही आपल्या शक्तीप्रमाणें होम करावा. जलहोमाला नारळांतील खोबरें काढून घालतात हें प्रसिद्ध आहे.

आचमं तर्पणं प्राणायाममत्र विधानतः ॥
अपां कुंडे विधिं कुर्यादत्रापि सर्वमञ्जसा ॥ ६९ ॥

अर्थ— आचमन, तर्पण, प्राणायाम वगैरे सर्व कर्मे ह्या जलहोमाच्या वेळीं देखील यथाविधि प्रत्यक्ष केलीं पाहिजेत.

दिक्पालाः प्रतिसेवनाकुलजगद्दोषार्हदण्डोत्कटाः ॥
सद्धर्मप्रणये निबद्धभगवत्सेवानियोगेऽपि च ॥
पूजापात्रकराग्रतःसरमुपेत्योपास्तयत्यर्चनाः ।
प्रत्यूहान्निखिलान्निरस्यत तनुस्नानोत्सवोत्साहिताः ॥ ७० ॥

अर्थ— दिक्पालांची प्रार्थना– हे दिक्पाल हो! कुमार्गानें वागण्यांत गढून गेलेल्या लोकांना त्यांच्या दोषाला योग्य अशा प्रकारचा दंड करण्याला तयार असलेले तुम्ही जिनांच्या प्रतिबिंबांना स्नान घालण्याचा हा मी जो उत्साह केला आहे त्याच्या योगानें आनंदित होऊन, आणि ज्या ज्या वेळीं मी पूजापात्र हातांत घेऊन जिनपूजेकरितां पुढें जाऊं लागेन; त्या त्या वेळीं माझ्या जवळ येऊन तुम्ही बली आणि पूजा ह्यांचें ग्रहण करून, माझ्या सद्धर्माचरणाच्या कृत्यांत अणि मी आरंभिलेल्या श्रीजिनेंद्र-पूजामहोत्सवाच्या कर्मांत येण्याऱ्या विघ्नांचा तुम्ही नाश करा!

वालुकाहोम.

सम्मार्ज्य गोमयैर्भूमिं गन्धोदकैश्च सिञ्चयेत् ॥
तटिनीवालुकास्तत्र प्रसार्य हस्तमात्रतः ॥ ७१ ॥
तदुपर्यश्वत्थैः काष्ठैः शिखराकारसञ्चयम् ॥
कुर्यादन्यैश्च काष्ठैर्वा होमकुण्डे यथा पुरा ॥ ७२ ॥
नवग्रहान् तिथिदेवान् दिक्पालान् शेषदेवकान् ॥
अग्निसन्धुक्षणं कृत्वा पूजयेदग्निनायकम् ॥ ७३ ॥
आचमं तर्पणं जाप्यं समिधा त्वादिहोमकम् ॥

कुर्याच्छेषं विधानं तु संक्षेपादग्निहोमवत् ॥ ७४ ॥

अर्थ— आतां वालुकाहोम सांगतात— गायीच्या शेणानें जमीन सारवून त्याच्यावर गंधोदकाचें सेचन करावें. मग नदीतील वाळू त्यावर एक हात लांबरुंद पसरावी. त्याच्यावर पिंपळाचीं लांकडें अथवा दुसरी लांकडें पूर्वीं होमकुंडांत रचल्याप्रमाणें शिखराच्या आकाराचीं रचावीत. मग नवग्रह, तिथिदेवता, दिक्पाळ आणि बाकीच्या देवता ह्यांचें पूजन करून, तीं लांकडें पेटवून अग्निनायकाचें पूजन करावें. अग्निहोमाप्रमाणेंच आचमन, तर्पण, जप, समिधांनी पूर्वीं करावयाचा होम, वगैरे सर्व विधि संक्षेपानें करावा.

होमाचे प्रसग.

व्रतबन्धे विवाहे वा सूतके पातके तथा ॥
जिनगेहप्रतिष्ठायां नूतनगृहनिर्मितौ ॥ ७५ ॥
ग्रहपीडादिके जाते महारोगोपशान्तिके ॥
गर्भाधानविधाने तु पित्रादिमरणे तथा ॥ ७६ ॥
कुण्डानां लक्षणं प्रोक्तं प्रागेव होमलक्षणे ॥
यथावसरमालोक्य कुर्याद्धोमविधिं बुधः ॥ ७७ ॥

अर्थ— व्रतबंध, विवाह, सूतकसमाप्ति, पातकाचें प्रायश्चित्त, जिनमंदिरप्रतिष्ठा, नवीन गृह बांधणें ह्या कृत्यांत आणि ग्रहांची पीडा होत असतां, महामारी वगैरे मोठ्या रोगांची शांति करावयाची असतां, गर्भाधान करावयाचें असतां, आणि पिता वगैरे मरण पावले असतां, होमकृत्यांत जें कुंडाचें लक्षण सांगितलें आहे त्याप्रमाणें कुंड करून कालाला अनुसरून होमविधि करावा.

होमाचें फळ.

कृते होमविधौ लोके सर्वशान्तिः प्रजायते ॥
वक्ष्येऽधुना परग्रन्थे यजमानस्य लक्षणम् ॥ ७८ ॥

अर्थ— असा होमविधि केला असतां लोकांत सर्वप्रकाराची शांति होते. आतां पुढील ग्रंथांत यजमानाचें लक्षण (यजमान कोण असावा हें) सांगतों.

यजमान.

यजमानस्तु मुख्योऽत्र पत्नी पुत्रश्च कन्यका ॥
ऋत्विक् शिष्यो गुरुर्भ्राता भागिनेयः सुतापतिः ॥ ७९ ॥
एतेनैव हुतं यत्तु तद्धुवं स्वयमेव हि ॥
कार्यवशात्स्वयं कर्ता कर्तुं यदि न शक्यते ॥ ८० ॥

अर्थ— पूजादिविधि करणारा मुख्य जो असेल तो यजमान होय. जर कांहीं तशाच अपरिहार्य अडचणीमुळे तो यजमान तें कृत्य करण्याला समर्थ नसेल, तर त्याच्याकरितां त्याची पत्नी, पुत्र, कन्या, ऋत्विक्, शिष्य, गुरु, बंधु, बहिणीचा मुलगा, जांवई ह्यांपैकीं कोणींतरी करावें. ह्यांनीं आपल्याकरितां जे हवन वगैरे केलें असेल तें आपण—ह्मणजे मुख्यकर्त्यानेंच—केल्याप्रमाणें होतें.

होमाचा काल.

भानौ समुदिते विप्रो जुहुयाद्धवनं तथा ॥
अनुदिते तथा प्रातर्गवां च मोचनेऽपि वा ॥ ८१ ॥
हस्तादूर्ध्वं रविर्यावद्भुवं हित्वा न गच्छति ॥
तावदेव हि कालोऽयं प्रातस्तूदितहोमिनाम् ॥ ८२ ॥

अर्थ— होमाचा काल सांगतात— सूर्य उदय पावल्यावर ब्राह्मणानें हवन करावें. किंवा सूर्योदयाच्या पूर्वीं होम करावा. अथवा गायी रानांत सोडण्याच्या वेळीं होम करावा. जे सूर्य उदय पावल्यावर होम करणारे आहेत त्यांचा काल, प्रातःकाळीं सूर्य उदय पावून भूमीपासून एक हात जोंपर्यंत वर आला नाहीं, तोंपर्यंतच असतो.

प्रातर्द्वादश नाड्यस्तु सायं तु नव नाडिकाः ॥

होमकालः समुद्दिष्टो मुनिभिस्तत्त्वदृष्टिभिः ॥ ८३ ॥

अर्थ— वर सांगितलेला होमकाल मुख्यकाल होय. गौणकाल तत्त्वदर्शी मुनींनी प्रातःकालीं सूर्योदयापासून बारा घटका होईतोंपर्यंत आणि सायंकाली सूर्यास्तानंतर नऊ घटकापर्यंत सांगितला आहे.

अग्निहोत्र्याची प्रतिष्ठा.

एवं प्रतिदिनं कुर्वन्नग्नेरुपासनाविधिम् ॥
अग्निहोत्री द्विजः प्रोक्तः स विप्रैर्ब्रह्मवेदिभिः ॥ ८४ ॥
धार्मिको भूमिदेवोऽसावाहिताग्निर्द्विजोत्तमैः ॥
आर्यश्चोपासकः शिष्टः पुण्यात्मेति प्रकीर्तितः ८५ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें प्रतिदिवशीं अग्न्युपासनेचा विधि जो करतो, तो अग्निहोत्र द्विज होय. (ह्या ठिकाणीं 'द्विज' शब्द घातल्यानें अग्निहोत्रविधि त्रैवर्णिकांनीं करतां येतो असें सिद्ध होतें.) असें ब्रह्मवेत्ते विप्र ह्मणतात. असा अग्निहोत्री जो असेल, तोच धार्मिक आणि भूदेव ह्मणजे भूमीवरील देव होय. त्यालाच आहिताग्नि (ज्यानें अग्नि ठेवला आहे असा) ह्मणतात. त्रैवर्णिकामध्यें श्रेष्ठ अशा लोकांनीं ह्यालाच आर्य, उपासक, शिष्ट, पुण्यात्मा असें ह्मटलें आहे.

अग्निहोत्राचें फल.

आहिताग्निर्द्विजश्चैको यत्र ग्रामे वसत्यहो ॥
ससेतयो न तत्र स्युः शाकिनीभूतराक्षसाः ॥ ८६ ॥
व्याघ्रसिंहगजाद्याश्च पीडां कुर्वन्ति नो कदा ॥
अकाले मरणं नास्ति सर्पव्याधिभयं न च ॥ ८७ ॥
प्रजा नृपप्रधानाद्याः सर्वेऽत्र सुखिनो जनाः ॥
धनधान्यैः परिपूर्णा गोधनं तुष्टिपुष्टिदम् ॥ ८८ ॥
बहवः सन्ति ते यत्र अग्निहोत्रद्विजाः पुरे ॥
तस्य देशे क्वचिन्न स्यादाधिव्याधिप्रपीडनम् ॥ ८९ ॥
तेभ्यो दानं नृपैर्देयं यथेष्टं गोकुलादिकम् ॥
ग्रामक्षेत्रगृहामलरत्नाभरणवस्त्रकम् ॥ ९० ॥

अर्थ— आहिताग्नि एक द्विज ज्या गांवांत रहातो, त्या ठिकाणी सातही प्रकारची महाभयाचीं साधनें (अतिवृष्टि, अवर्षण, उंदीर, डोळ, राघू, स्वदेशांतील युद्ध, आणि दुसऱ्या देशांशी युद्ध) उत्पन्न होत नाहीत. शाकिनी, भुतें, राक्षस, व्याघ्र, सिंह, हत्ती वगैरे पशु, हे केव्हांही त्या ठिकाणी पीडा करीत नाहीत. त्या गांवांत कोणालाही अपमृत्यु येत नाही, सर्पाची आणि रोगांची भीति उत्पन्न होत

नाहीं. त्या गांवांतील प्रजा आणि राजा, प्रधान, वगैरे सर्व सुखी असतात. त्या ठिकाणी धन आणि धान्य विपुल असतें, आणि पहाण्यावरोबर संतोष देणाऱ्या व गांवाचें पोषण करणाऱ्या अशा गायी पुष्कळ असतात. आणि ते अग्निहोत्री द्विज पुष्कळ ज्या नगरांत असतात त्या देशांत कोठेंही काळजी आणि रोग ह्यांची पीडा होत नाहीं. असल्या अग्निहोत्री ब्राह्मणांना राजानें गायी, गांवें, क्षेत्रें, घरें, भांडी, रत्नें, अलंकार, वस्त्र ह्या वस्तू वाटतील तितक्या दान कराव्यात.

श्रीजिनपूजा.

जिनबिम्बमथानीय पूर्वं देवगृहे न्यसेत् ॥
सिध्दादीनां तु यन्त्राणि स्वस्वस्थाने निवेशयेत् ॥ ९१ ॥
जिनेन्द्रसदनद्वारे क्षेत्रपालान् समर्चयेत् ॥
मध्यदेशे तु सद्देवान् गन्धर्वांस्तत्र दक्षिणे ॥ ९२ ॥
किन्नरान्वामभागे च भूतप्रेतांश्च दक्षिणे ॥
शेषांश्च वलिदानेन तर्पयेद्वामभागतः ॥ ९३ ॥
ब्रह्मभागे तु ब्रह्माणं अष्टौ दिशाधिपान्बहिः ॥
अर्घ्यपाद्ययज्ञभागैरमृतैः प्राक्प्रतर्पयेत् ॥ ९४ ॥

अर्थ— मग ( अग्न्युपासन झाल्यावर ) जिनबिंब आणून तें प्रथम देवघरांत ठेवावें. सिध्दादिकांची यंत्रें आपापल्या ठिकाणीं ठेवावींत. जिनमंदिराच्या द्वारांत क्षेत्रपालांची पूजा करावी. पूर्वी जे आठ हात लांबीरुंदीच्या भूमीवर आठ भाग करावयास सांगितले आहेत, त्याप्रमाणें केलेल्या भागांतील मध्यभागीं श्रीजिनेंद्राचे पूजन करावें. त्याच्या दक्षिणेकडील बाजूस गंधर्वांची पूजा करावी. आणि डावीकडे किन्नरांची पूजा करावी. भूत, प्रेत, इत्यादिकांची पूजा दक्षिणेकडे करावी. आणि डाव्या अंगाला बाकीच्या देवतांना बलिदान करून त्यांचा संतोष करावा. त्या भूमीतील ब्रह्मभागांत ब्रह्मदेवाची पूजा करावी. आणि त्या भूमीच्या बाहेरच्या बाजूस आठ दिशेला आठ दिक्पालांना अर्घ्य, पाद्य, यज्ञभाग आणि उदक ह्यांच्या योगानें अगोदरच ( पूजेला आरंभ करतांना ) संतुष्ट करावें. तात्पर्य, दिक्पालांची पूजा प्रथम करून नंतर क्षेत्रपाल वगैरे वर सांगितलेल्या देवतांची पूजा करावी.

ग्रहबलि.

गृहाङ्गणे ततो गत्वा मध्यपीठे सुधाशिनाम् ॥
तत्तद्दिनाधिपस्यापि शान्त्यर्थं बलिमर्पयेत् ॥ ९५ ॥

अर्थ— नंतर घराच्या अंगणांत जाऊन अंगणाच्या मध्यभागीं देवांना आणि त्या त्या तिथीच्या देवतेला त्यांची शांति व्हावी ह्मणून बलिदान करावें.

न पश्येद्भूबलिं चिरं दत्वा गृहे बलिं द्विजः ॥
स्वयं नैवोद्धरेन्मोहादुद्धरेच्छ्रीर्विनश्यति ॥ ९६ ॥

अर्थ—हा घरांत जो वलि दिलेला असतो तो आपण फार वेळ पाहूं नये, आणि आपण स्वतः तो वलि काढून टाकूं नये. अविचारानें स्वतः काढून टाकिला असतां लक्ष्मीचा नाश होतो.

चाण्डालपतितेभ्यश्च पितृजातानशेषतः ॥
वायसेभ्यो बलिं रात्रौ नैव दद्यान्महीतले ॥ ९७ ॥
ततोऽपि सर्वभूतेभ्यो जलाञ्जलिं समर्पयेत् ॥
दशदिक्षु च पितृभ्यास्त्रिवर्णैः क्रमतः सदा ॥ ९८ ॥
ये भूताः प्रचरन्तीति पात्रे दद्याद्बलिं सुधीः ॥
इत्थं कुर्यात् द्विजो यज्ञान् दिवा नक्तं च नित्यशः ॥ ९९ ॥

अर्थ— नंतर चांडाल, पतित (भ्रष्ट झालेले जीव) पितर, (मृत झालेले आपले संबंधी) जीव आणि वायस ह्या सर्वांना भूमीवर वलिदान करावें. ह्मणजे त्यांना त्यांना उद्देशून भूमीवर थोडें अन्न टाकावें. वायसांना रात्रि वलि देऊं नये. नंतर दहा दिशांकडे सर्वभूतांच्या उद्देशानें जलांजलि दान कराव्यात. आणि पितरांनाही जलांजलि द्यावी. ह्याप्रमाणें क्रमानें नित्य करावें. मग "ये भूताः प्रचरान्ति" ह्या मंत्रानें

पात्रांत बलिदान करावें. ह्याप्रमाणें त्रैवर्णिकानें रोज दिवसां आणि रात्री करावें. ह्याला नित्ययज्ञ ह्मणतात.

स्त्रियाचीं कृत्यें.

गृहस्त्रिया च किं कार्यं गृहकृत्यं तदुच्यते ॥
भर्त्रा तु पूजिते देवे गृहदेवांश्च तर्पयेत् ॥ २०० ॥

अर्थ— आतां घरांत असलेल्या स्त्रीनें कोणतें गृहकृत्य करावयाचें तें सांगतों. पतीनें देवाची पूजा केल्यावर तिनें गृहदेवतांचें पूजन करावें.

चार प्रकारच्या देवता.

देवाश्चतुर्विधा ज्ञेयाः प्रथमाः सत्यदेवताः ॥
कुलदेवाः क्रियादेवाश्चतुर्था वेश्मदेवताः ॥ १ ॥
सत्यदेवाः परे पञ्च जिनेन्द्रसिद्धसूरयः
पाठकसाधुयोगीन्द्राश्चैते मोक्षस्य हेतवः ॥ २ ॥

अर्थ— देवता चार प्रकारच्या आहेत. ते असे– सत्यदेवता, कुलदेवता, क्रियादेवता आणि चवथ्या गृहदेवता ह्या होत. त्यांत जिनेंद्र, सिद्ध, सूरि, पाठक आणि योगींद्र असे साधु, हे पंच परमेष्ठी ह्या सत्यदेवता होत. ह्या देवता मोक्षसाधक आहेत.

क्रियादेवता.

छत्रचक्राग्निभेदाच्च क्रियादेवास्त्रयो मताः॥
सर्वविघ्नहराः पूज्या हव्यपक्वान्नदीपकैः ॥ ३ ॥

अर्थ— क्रियादेवता ह्या छत्र, चक्र आणि अग्नि अशा तीन प्रकारच्या आहेत. त्या सर्वविघ्नांचें हरण करणाऱ्या असल्यानें होमद्रव्य, अन्न, दीप इत्यादिकांच्या योगानें त्यांचें पूजन करावें.

कुलदेवता.

वंशे पुरातनैरिष्टा नित्यसौख्यविधायकाः ॥
चक्रेश्वर्यम्बिकापद्मा इत्यादिकुलदेवताः ॥ ४ ॥

अर्थ— आपल्या वंशांत नेहमी सुख देणाऱ्या ह्मणून पूर्वजांनी ज्यांचें पूजन केलें असेल त्या कुलदेवता समजाव्यात. त्या चक्रेश्वरी, अंबिका, पद्मावती वगैरे होत.

गृहदेवता

विश्वेश्वरीधराधीशश्रीदेवीधनदास्तथा ॥
गृहे लक्ष्मीकरा ज्ञेयाश्चतुर्धा वेश्मदेवताः ॥ ५ ॥

अर्थ— विश्वेश्वरी, धरणेंद्र, श्रीदेवी आणि कुबेर ह्या चार गृहदेवता होत. ह्या देवता घरांत

संपत्ति देणाऱ्या आहेत.

सत्यदेव

साक्षात्पुण्यस्य हेत्वर्थं मुक्त्यर्थं मुक्तिदायकाः ॥
पूज्याः पूज्यैश्च सम्पूज्याः सत्यदेवा जिनादयः ॥ ६ ॥

अर्थ— साक्षात्पुण्य ( सम्यग्दर्शनज्ञानचारित्र ) त्याला साधनीभूत असल्या कारणानें मुक्तिदायक असे आणि पूज्य अशा लोकांनीही ज्यांची पूजा केली आहे असे सत्यदेव जे जिनेंद्र वगैरे देव, ते मोक्ष प्राप्तीकरिता पूजिले पाहिजेत.

सत्क्रियादेवताः पूज्या होमे शान्त्यर्थमीश्वराः ॥
जनन्यः श्रीजिनेन्द्राणां विश्वेश्वर्य इति स्मृताः ॥ २०७ ॥
विश्वेश्वर्यः पराः पूज्याः कुलस्त्रीभिर्निकेतने ॥
अवन्ध्या जायन्ते तासां पूजनात्तु कुलस्त्रियः ॥ २०८ ॥

अर्थ— क्रिया देवता ह्या होमकर्मात शांतीकरितां अवश्य पूजाव्यांत. कारण, त्या देवता त्या कर्माच्या मुख्य स्वामिणी असतात. जिनेंद्राच्या ज्या माता त्यांना विश्वेश्वरी म्हणतात. कुलीनस्त्रियांनी ह्या विश्वे- [illegible]

कुबेरपूजनाद्गेहे लक्ष्मीर्वसति शाश्वती ॥
धरेन्द्रपूजनात्पुत्रप्राप्तिर्भवति चोत्तमा ॥ २०९ ॥

अर्थ— कुबेराच्या पूजनानें घरात निरंतर लक्ष्मी वास करते. आणि धरणेंद्राच्या पूजनानें उत्तमपुत्राची प्राप्ति होते.

श्रीदेवीपूजनाद्गर्भास्थितो बालो न नश्यति ॥
वस्त्रैर्भूषैः फलैश्चान्नैः सम्पूज्या वेश्मदेवताः ॥ २१० ॥

अर्थ— श्रीदेवीच्या पूजनानें गर्भामध्ये असलेलें मूल नाश पावत नाही. म्हणून वस्त्र, भूषणें, फलें आणि अनेक प्रकारचीं पक्वान्नें ह्यांच्या योगानें ह्या गृहदेवतांचें पूजन करावें.

ज्वालिनी रोहिणी चक्रेश्वरी पद्मावती तथा ॥
कूष्माण्डिनी महाकाली कालिका च सरस्वती ॥ २११ ॥
गौरी सिध्दायनी चण्डी दुर्गा च कुलदेवताः ॥
पूजनीयाः परं भक्त्या नित्यं कल्याणमीप्सुभिः ॥ २१२ ॥

अर्थ— ज्वालिनी, रोहिणी, चक्रेश्वरी, पद्मावती, कूष्मांडिनी, महाकाली, कालिका, सरस्वती, सिध्दायनी चंडी आणि दुर्गा ह्या कुलदेवता होत. आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा करणाऱ्या मनुष्यानें यांचें पूजन भक्तीनें नित्य उत्कृष्ट रीतीनें करावें.

पूज्याश्चतुर्विधा देवा धर्मार्थकाममीप्सुभिः
ईप्सितार्थप्रदा विघ्नहराश्च भाविसिद्धिदाः ॥ २१३ ॥

अर्थ- वर सांगितलेले चारही प्रकारचे देव धर्म, अर्थ आणि काम ह्या पुरुषार्थांची इच्छा करणाऱ्यांनी पूजा करण्याला योग्य आहेत. ते देव पूजकाचे मनोरथ पूर्ण करणारे, विघ्नांचा नाश करणारे आणि भावी जी मोक्षसिद्धि तिला देणारे आहेत.

ये पूजयन्ति तान् देवान् तेषां गृहेषु शाश्वती ॥
लक्ष्मीर्वसति गोऽश्वादिमाहिषीसर्वसम्पदः ॥ २१४ ॥

अर्थ— जे ह्या देवांची पूजा करतात त्यांच्या घरांत निरंतर लक्ष्मी वास करते. आणि गायी, घोडे म्हशी वगैरे पशु, ह्या सर्व संपत्ति त्यांच्या घरांत सदोदित राहतात.

इह जन्मनि संक्लेशव्याधयो न कदाचन ॥
भवन्ति तस्य देवानां सामर्थ्यात्पुण्यसद्मनि ॥ १५ ॥

अर्थ— त्याच्या त्या पुण्यकारक घरांत त्या देवतांच्या सामर्थ्यामुळें त्या पूजा करणाऱ्याला ह्या जन्मांत संक्लेश आणि व्याधि ह्यांची पीडा केव्हांही होत नाहीं.

अन्त्ये सन्न्यासमादाय समाधिमरणं भवेत् ॥

स्वर्गमुक्तिप्रदं रम्यमनन्तसुखसागरम् ॥ १६ ॥

अर्थ— आणि त्याला अंतकाली स्वर्ग मोक्ष ह्या दोहोंची प्राप्ति करून देणारें, सर्व सुखांचा समुद्रच कीं काय! असें आणि आनंद देणारें असें सर्वसंगपरित्यागपूर्वक समाधिमरण प्राप्त होतें.

इत्येवं कथितो जिनेन्द्रवचनादाचारधर्मो मया ॥
श्रीभट्टारकसोमसेनगणिना संक्षेपतः सत्क्रियः ॥
देवाराधनहोमनित्यमहसां लक्ष्मीप्रमोदास्पदं ।
ये कुर्वन्ति नरा नरोत्तमगुणास्तेऽहो लभन्ते शिवम् ॥ १७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें मीं श्रीभट्टारक सोमसेन गणधरानें श्रीजिनेंद्राच्या वचनावरून सत्क्रियास्वरूप आचारधर्म संक्षेपानें सांगितला. देवांची उपासना, होम आणि नित्यपूजोत्सव ह्यांच्यापासून उत्पन्न होणारी संपत्ति आणि आनंद ह्यांचें मुख्यस्थान असलेला अशा ह्या धर्माचें जे लोक आचरण करतात, ते सर्वांत श्रेष्ठ असे होत्साते मोक्षाला प्राप्त होतात.

सरस्वत्याः प्रसादेन काव्यं कुर्वन्ति पण्डिताः ॥
ततः सैषा समाराध्या भक्त्या शास्त्रे सरस्वती ॥ १८ ॥

अर्थ— श्रीसरस्वती देवीच्या कृपेनें पंडित काव्य करण्यास समर्थ होत असतात. ह्मणून शास्त्रामध्यें

प्रवेश होण्याकरितां तीचेच आराधन भक्तीनें केलें पाहिजे.

ब्रह्मसूरिद्विजेन्द्रेण यदुक्तं जिनधर्मिणाम् ॥
प्रोक्तं महापुराणे वा तदेवात्र प्रकाशितम् ॥ २१९ ॥

अर्थ— ब्रह्मसूरि नांवाच्या विद्वान् आणि सदाचारसंपन्न अशा ब्राह्मणानें जिनधर्मी लोकांना उद्देशून जें सांगितलें आहे आणि महापुराणांत जें सांगितलें आहे तेंच ह्या ग्रंथांत स्पष्ट केलें आहे. अर्थात् निराळें कांहीं सांगितलेलें नाहीं.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारकथने, भट्टारकश्रीसोमसेन-
विरचिते गृहकर्मदेवतापूजानिरूपणीयो नाम
चतुर्थोऽध्यायः समाप्तः ॥ श्रीरस्तु ॥

॥ श्रीवीतरागाय नम ॥

## ॥ पंचमोऽध्यायः ॥

वासुपूज्यं जगत्पूज्यं लोकालोकप्रकाशकम् ॥
नत्वा वक्ष्येऽत्र पूजानां मन्त्रान् पूर्वपुराणतः ॥ १ ॥

अर्थ— लोक आणि अलोक ह्यांचें स्पष्ट ज्ञान करून देणाऱ्या, जगत्पूज्य अशा भगवान् वासुपूज्यजिनेंद्राला वंदन करून पूर्व पुराणाला अनुसरून पूजेचे मंत्र ह्या अध्यायांत सांगतों.

सन्ध्यास्थानात्स्वगेहस्य ईशान्यां प्रविकल्पिते ॥
जिनागारे व्रजेद्धीमानीर्यापथविशुद्धितः ॥ २ ॥
पादौ प्रक्षाल्य गेहस्य कपाटं समुद्घाटयेत् ॥
मुखवस्त्रं परित्यज्य जिनास्यमवलोकयेत् ॥ ३ ॥

अर्थ— श्रावकानें ईर्यापथशुद्धि करून संध्या करीत असलेल्या स्थानापासून निघावें. आणि आपल्या घराच्या ईशान्यदिशेला केलेल्या जिनमंदिरांत जावें. मंदिराजवळ गेल्यावर त्यानें आपले पाय स्वच्छ धुवून मंदिराचें द्वार उघडावें. आणि जिनबिंबाचें मुखवस्त्र काढून टाकून श्रीजिनाचें मुख अवलोकन करावें.

कपाटोद्घाटन

ॐ ऱ्हाँ अर्हं कपाटमुद्घाटयामि स्वाहा ॥ कपाटोद्घाटनम् ॥

अर्थ— 'ॐ ऱ्हाँ' इत्यादि मंत्र ह्मणून मंदिराचें द्वार उघडावें.

द्वारपालानुज्ञापन

ॐ ऱ्हीं अर्हं द्वारपालमनुज्ञापयामि स्वाहा ॥ द्वारपालानुज्ञापनम् ॥

अर्थ— 'ॐ ऱ्हाँ" इत्यादि मंत्रानें द्वारपालाची आज्ञा घ्यावी.

ॐ ऱ्हाँ अर्हं निःसही ३ रत्नत्रयपुरस्सराय विद्यामण्डलनिवेशनाय समयाय निस्सही जिनालयं प्रविशामि स्वाहा ॥ अन्तःप्रवेशनमन्त्र ॥

अर्थ— 'ॐ ऱ्हीं" इत्यादि मंत्रानें जिनमंदिरांत प्रवेश करावा.

ईर्यापथशोधन

ईर्यापथे प्रचलताऽद्य मया प्रमादा- । देकेन्द्रियप्रमुखजीवनिकायबाधा ॥
निर्वर्तिता यदि भवेदयुगान्तरेक्षा । मिथ्या तदस्तु दुरितं गुरुभक्तितो मे ॥ ४ ॥
ईर्यापथशोधनम् ॥

अर्थ— 'ईर्यापथे' इत्यादि मंत्र ह्मणून ईर्यापथशोधन करावें. ह्या वरील श्लोकाचा अर्थ असा-

मार्गानें चालत असलेल्या माझ्याकडून आज चुकीनें एकेंद्रिय वगैरे जीवनिकायाला जर पीडा झाली असेल, किंवा एका युगापेक्षां ( चार हातापेक्षां ) अधिक माझी दृष्टी गेली असेल तर तें सर्व माझें पातक पंच गुरूंच्या भक्तीनें मिथ्या होवो!

मुखवस्त्रोद्घाटन

क्वणत्कनकघाण्टिकं विमलचीनपट्टोज्वलं ।
बहुप्रकटवर्णकं कुशलशिल्पिभिर्निर्मितम् ॥
जिनेन्द्रचरणाम्बुजद्वयं समर्चनीयं मया ॥
समस्तदुरितापहृद्वदनवस्त्रमुद्घाट्यते ॥ ५ ॥

ॐ ह्रीं मुखवस्त्रमुद्घाटयामि स्वाहा ॥ मुखवस्त्रोद्घाटनम् ॥

अर्थ— ज्यांत असलेल्या सुवर्णाच्या घागऱ्या शब्द करीत आहेत, जें स्वच्छ अशा चीन देशांतील वस्त्रानें सुंदर दिसत आहे, ज्यावरील अनेक वर्ण स्पष्ट दिसत आहेत, जें कुशल अशा कारागिरांनीं तयार केलें आहे आणि जें सर्व पातकांचा नाश करणारें आहे असें श्रीजिनेंद्राचें चरणकमल मला पूजावयाचें आहे; ह्मणून त्यावरील वस्त्र काढतों. हा श्लोक ह्मणून "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें देवाच्या अंगावरील मुखवस्त्र काढावें.

श्रीमुखावलोकन

श्रीमुखालोकनादेव श्रीमुखालोकनं भवेत् ॥
आलोकनविहीनस्य तत्सुखावाप्तयः कुतः ॥ ६ ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राचें मुखावलोकन केलें ह्मणजेच लक्ष्मीचें मुख पहावयास मिळतें, ह्मणजे संपत्ति प्राप्त होतें ह्मणून तें मुखावलोकन ज्यानें केलें नाहीं त्याला त्या सुखाची प्राप्ति कशी होणार? व्हावयाची नाहीं.

ॐ ह्रीँ अर्हं नमोऽर्हत्परमेष्ठिभ्यः श्रीमुखावलोकनेन मम सर्वशान्तिर्भवतु स्वाहा ॥
श्रीमुखावलोकनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें अर्हत्परमेष्ठीचें (प्रतिबिंबाचें) मुखावलोकन करावें.

यागभूमिप्रवेश.

ॐ ह्रीँ अर्हं यागोर्वीं प्रविशामि स्वाहा ॥ यागभूमिप्रवेशनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें यागभूमीत (पूजा करण्याच्या जागेंत) प्रवेश करावा.

पुष्पांजलि

ॐ ह्रीँ क्ष्वीँ भूः स्वाहा ॥ पुष्पाञ्जलिः ॥

अर्थ— ह्या मंत्रानें जिनचरणावर पुष्पांजलि द्यावी.

वाद्यघोष.

ॐ ह्रीँ वाद्यमुद्घोषयामि स्वाहा ॥ तदाप्रभृति बहिर्वाद्यघोषणम् ॥

अर्थ— तेव्हांपासून बाहेर वाद्यें वाजविण्यास आरंभ करावा.

ॐ ह्रीँ अर्हं वास्तुदेवाय इदमर्घ्यं पाद्यं गन्धं पुष्पं दीपं धूपं चरुं बलिं स्वस्तिकमक्षतं यज्ञभागं यजामहे प्रतिगृह्यतां प्रतिगृह्यतां प्रतिगृह्यतामिति स्वाहा ॥

यस्यार्थं क्रियते कर्म स प्रीतो नित्यमस्तु मे ॥
शान्तिकं पौष्टिकं चैव सर्वकार्येषु सिद्धिदः ॥ ७ ॥

अर्थ— " ॐ ह्रीँ अर्हं " ह्या मंत्रानें वास्तुदेवतेला अर्घ्य, पाद्य वगैरे द्यावेत. नंतर " यस्यार्थं " हा श्लोक ह्मणावा. त्याचा अर्थ असा–ज्या देवतेकरितां मी हें शांतिक किंवा पौष्टिक कर्म करीत आहे ती देवता नेहमी माझ्यावर संतुष्ट असो. आणि माझ्या सर्व कर्मांत सिद्धि देवो!

भूमिशोधन

ॐ ह्रीं वायुकुमाराय सर्वविघ्नविनाशनाय महीसम्मार्जनं कुरु कुरु हूं फट् स्वाहा ॥ दर्भपूलेन यागभूमिं परितः सम्मार्जनम् ॥ पूर्वेशान्ययोर्मध्ये वायुकुमारायार्घ्यप्रदानम् ॥ एवमुत्तरत्रापि ॥

अर्थ— " ॐ ऱ्हीं " इत्यादिमंत्रानें यागभूमीचें संमार्जन करण्याची वायुकुमाराला प्रार्थना करून दर्भाच्या जुडीनें चोहीकडून पूजेची जागा ( जिनमंदिर ) लोटून साफ करावी. नंतर पूर्व आणि ईशान्य ह्या दोन दिशांच्या मध्यभागीं वायुकुमाराला अर्घ्यप्रदान करावें. पुढेंही ह्याप्रमाणेंच करावें.

ॐ ऱ्हीं मेघकुमाराय हं सं वं मं झं ठं ठं क्षालनं कुरु कुरु अर्हं धरां प्रक्षाल्य भूमिशुद्धिं करोमि स्वाहा ॥ दर्भपूलोपात्तजलेन तदा भूमिं सिञ्चेत् ॥

अर्थ— " ॐ ऱ्हीं मेघकुमाराय " दर्भाच्या जुडीनें पाणी घेऊन भूमीवर सेचन करावें.

ॐ ऱ्हीं अर्हं अग्निकुमाराय भूमिं ज्वालय ज्वालय अं हं सं वं ठं यं क्षः फट् स्वाहा ॥ ज्वलद्दर्भपूलानलेन भूमिज्वालनम् ॥

अर्थ— ह्या मंत्राने दर्भाची जुडी पेटवून भूमी जाळावी.

नागसंतर्पण

ॐ ऱ्हीं क्रौं वौषट् षष्ठिसहस्रसंख्येभ्यो नागेभ्योऽमृताञ्जलिं प्रसिञ्चामि स्वाहा ॥ ऐशान्यां दिशि जलाञ्जलिम् ॥

अर्थ— " ॐ ऱ्हीं क्रौं " ह्या मंत्रानें नागांना ईशान्यदिशेकडे जलांजलि द्यावी.

क्षेत्रपालार्चन

ॐ ऱ्हीं क्रौं अत्रस्थक्षेत्रपाल आगच्छागच्छ संवौषट् इदमर्घ्यमित्यादि पूर्ववत् ॥

अर्थ— " ॐ ऱ्हीं क्रौं ह्या मंत्राने तेथील क्षेत्रपालाला अर्घ्यप्रदान करावे.

भूम्यर्चन

ॐ नीरजसे नमः । ॐ दर्पमथनाय नमः । ॐ शीलगन्धाय नमः । ॐ अक्षताय नमः । ॐ विमलाय नमः । ॐ परमसिद्धाय नमः । ॐ ज्ञानोद्योताय नमः । ॐ श्रुतधूपाय नमः । ॐ अभीष्टफलदाय नमः ॥ जलैर्गन्धदर्भादिभिश्च भूम्यर्चनम् ॥

अर्थ— ' ओं नीरजसे नमः ' इत्यादि मंत्रानें जल, गंध, दर्भ इत्यादिकांच्या योगानें भूमीचें पूजन करावें.

यन्त्रोद्धार

कर्णिकामध्येऽर्हदादयोऽष्टौ । ततोऽष्टदले जयाद्यष्टौ । ततः षोडशदलेषु षोडशविद्यादेवताः । चतुर्विंशतिदलेषु चतुर्विंशतियक्षीदेवताः । ततो द्वात्रिंशद्दलेषु शक्राः । ततो वज्राग्रे चतुर्विंशतियक्षदेवताः । ततो दिक्पाला दश । ततो नवग्रहाः । ततोऽनावृतयक्षाः । एवं यन्त्रोद्धारः ॥

अर्थ— आतां यंत्राची रचना सांगतात— हे यंत्र कमलाकार आहे. त्याच्या मध्यभागी असलेल्या कर्णिकेत " अर्हत " वगैरे आठ लिहावेत. त्या कर्णिकेच्या भोवत्याने आठ दले काढून त्यांत जयादि आठ

देवता लिहाव्यात. त्याच्या पुढे सोळा दलें काढून त्यांत सोळा विद्यादेवता लिहाव्यात. त्यांच्या पुढे चोवीस दलें काढून चोवीस यक्षीदेवता त्यांत लिहाव्यात. त्यांच्या पुढे बत्तीस दलें काढून त्यांत बत्तीस इंद्र लिहावेत. त्याच्या पुढे वज्राकृति काढून त्या वज्राच्या अग्रभागीं चोवीस यक्षदेवता लिहाव्यात. त्याच्या पुढें दहा दिक्पाल नवग्रह हे लिहून, त्याच्या पुढे अनावृत यक्षदेवता लिहाव्यात. ह्याप्रमाणे यंत्ररचना करावी.

दर्भासन.

तद्दक्षिणभागे— ॐ ह्रीं अर्हं क्ष्मीं ठ ठ दर्भासनं निक्षिपामि स्वाहा ॥ दर्भासनस्थापनम् ॥

अर्थ— त्या यंत्राच्या दक्षिणेकडील बाजूला "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें दर्भासन घालावें.

ॐ ह्रीं अर्हं निस्सही हूं फट् दर्भासने उपविशामि स्वाहा ॥ दर्भासने उपवेशनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं अर्हं' इत्यादि मंत्रानें त्या दर्भासनावर बसावें.

मौनधारण.

ॐ ह्रीं अर्हं ह्रूं मौनस्थितायाहं मौनव्रतं गृह्णामि स्वाहा ॥ मौनग्रहणम् ॥

अर्थ— "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें मौनग्रहण करावें.

अगशोधन.

ॐ ह्रीं अर्हं भूः प्रतिपद्ये भुवः प्रतिपद्ये चतुर्विंशतितीर्थकृच्चरणशरणं प्रतिपद्ये ममाङ्गानि शोधयामि स्वाहा ॥ वस्त्राञ्चलेन स्वाङ्गस्य शोधनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीं " इत्यादि मंत्राने वस्त्राच्या पदराने आपलें शरीर शुद्ध करावें.

हस्तप्रक्षालन.

ॐ ह्रीं अर्हं असुज्जुरभव तथा हस्तौ प्रक्षालयामि स्वाहा । हस्तद्वयपवित्रीकरणम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीं ' इत्यादि मत्राने दोनी हात धुवून शुद्ध करावेत.

पुजापात्रशुद्दि

ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः नमोऽर्हते भगवते श्रीमते पवित्रजलेन पात्रशुद्धिं करोमि स्वाहा ॥ पात्रेषु पूजांगद्रव्यस्थापनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीं " इत्यादि मंत्रानें सर्व पूजापात्रांवर शुद्ध जलानें प्रोक्षण करून निरनिराळ्या पात्रांतून पूजेला लागणाऱ्या वस्तु निरनिराळ्या ठेवाव्यात.

पूजाद्रव्यशुद्दि

ॐ ह्रो अर्हं झ्रौं झ्रौं वं मं हं सं तं पं झ्वी क्ष्वी हं सं अ सि आ उ सा

समस्तजलेन शुद्धपात्रे निक्षिप्तपुष्पादिपूजाद्रव्याणि शोधयामि स्वाहा ॥
पूजाद्रव्यशोधनम् ॥

अर्थ— "ॐ ह्रीँ" इत्यादि मंत्रानें पूजेच्या सामग्रीवर जलप्रोक्षण करावें.

विद्यागुरुपूजन

ॐ ह्रीँ अर्हं आग्नेय्यां दिशि अस्मद्विद्यागुरुभ्यो बलिं ददामि स्वाहा ॥
विद्यागुरुपूजनम् ॥

अर्थ— "ॐ ह्रीँ" इत्यादि मंत्राने विद्यागुरूला बलिदान करावें.

सिद्धार्चन.

ॐ ह्रीँ सिद्धपरमेष्ठिभ्योऽर्घ्यं समर्पयामि स्वाहा ॥ सिद्धायार्घ्यनिवेदनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें सिद्धपरमेष्ठीना अर्घ्यदान करावें.

॥ सकलीकरणम् ॥

अग्निमण्डलमध्यस्थै रेफैर्ज्वालाशताकुलैः ॥
सर्वाङ्गदेशजैर्ध्यात्वा ध्यानदग्धवपुर्मलम् ॥ १ ॥

दर्भासने स्थित्वा ध्यायन्निदं पठेत् । ॐ ह्रीँ अर्हं भगवतो जिनभास्करस्य बोधस-

हस्रकिरणैर्मम कर्मेन्धनस्य द्रव्यं शोषयामि घे घे स्वाहा ॥ इत्युच्चार्य कर्मेन्धनानि शोषयेत् ॥ शोषणम् ॥

अर्थ— अग्निमंडलाच्या मध्यभागी असणारे व शेकडो ज्वालांनीं व्याप्त झालेले जे रेफ, ते आपल्या शरीरापासून उत्पन्न होऊन आपल्या शरीरांत असलेला सर्व मल (पाप) त्यांनी जळला आहे असें ध्यान करावें. दर्भासनावर बसून ह्याप्रमाणें ध्यान करून "ॐ ह्रीँ" इत्यादि मंत्र ह्मणावा. आणि कर्मरूपी इंधन शुष्क करावें.

ॐ ह्राँ ह्रीँ ह्रूँ ह्रौँ ह्रः ॐ ॐ ॐ ॐ रं रं रं रं ह्म्ल्व्र्यूँ सं दह दह कर्ममलं दह दह दुःखे घे घे स्वाहा ॥ इत्युच्चार्य कर्मेन्धनानि दग्धानीति स्मरेत् ॥

अर्थ— ॐ ह्राँ इत्यादि मंत्राचा उच्चार करून कर्मेंधन जळून गेलें असें चिंतन करावें.

ॐ ह्रीँ अर्हं श्रीजिनप्रभुजिनाय कर्मभस्मविधूननं कुरु कुरु स्वाहा ॥ इत्युच्चार्य तद्भस्मानि विधूतानि स्मरेत् ॥

अर्थ— ॐ ह्रीँ इत्यादि मंत्राचा उच्चार करून कर्मेंधनाचें झालेलें भस्म उडून गेलें असें चिंतन करावें.

प्लावनम् । ततः पञ्चगुरुमुद्राग्रे अ सि आ उ सा इत्येतान् तदुपरि झं वं ह्वः पः हः इत्यमृतबीजानि निक्षिप्य तन्मुद्रां शिरस्यधोमुखमुद्धृत्य—ॐ अमृते अमृतोद्भवे

अमृतवर्षिणि अमृतं स्रावय स्रावय सं सं क्लीं क्लीं ब्लूं ब्लूं द्रां द्रां द्रीं द्रीं द्रावय द्रावय स्वाहा—इत्युच्चार्य ततः स्रवत्पीयूषधाराभिरात्मानं स्नापयेत् ॥ अभिषवणम् ॥

अर्थ— नंतर पंचगुरुमुद्रा करून त्यावर क्रमाने 'अ सि आ उ सा' हीं पांच अक्षरे ठेवून (ठेविलीं आहेत अशी कल्पना करून) त्या अक्षरांवर क्रमाने "झं वं ह्वः पः हः" हीं अमृतबीजे ठेवावीत. (अमृतबीजें ठेविली आहेत अशी कल्पना करावी). मग ती मुद्रा आपल्या मस्तकावर अधोमुख धारण करून "ॐ अमृते" इत्यादि मंत्र ह्मणावा. आणि त्या पंचपरमेष्ठिमुद्रेंतून स्रवणाऱ्या अमृतधारांनी आपल्याला स्नान घातले आहे अशी कल्पना करावी. ह्याला "अभिषवण ह्म० स्नान" म्हणतात.

एवं त्रिधा विशुद्धः सन् करन्यासं विदध्यात् ॥
हस्तद्वयकनीयस्याद्यङ्गुलीनां यथाक्रमम् ॥
मूले रेखात्रयस्योर्ध्वमग्रे च युगपत्सुधीः ॥ १ ॥

इति पञ्चनमस्कारान् विन्यस्य । ॐ ह्रीं अर्हं वं मं हं सं तं पं अ सि आ उ सा हस्तसम्पुटं करोमि स्वाहा ॥ इति हस्तौ सम्पुटेत् ॥ इति करन्यासः ॥

अर्थ— वर सांगितल्याप्रमाणें अभिषवणविधि तीन वेळां करून शुद्ध होऊन करन्यास (हातावर अर्हतादि देवतांचें स्थापन) करावे. ते असें— दोनी हातांच्या कनिष्ठिका (शेवटचें बोट) वगैरे बोटांच्या मुळांशी

ज्या तीन रेषा असतात (ह्या रेषा तळहात आणि बोट ह्यांच्या संधीत असतात) त्यांवर, त्या रेषांच्या वरती (पहिल्या पेऱ्यावर) आणि बोटांच्या शेंड्याला अशा तीन ठिकाणी (ही ठिकाणें प्रत्येक बोटाचीं तीन तीन मिळून पंधरा होतात) क्रमानें पंचनमस्कार मंत्राचा न्यास करावा. तो पाचही बोटांवर एकदम करावा. ह्मणजे प्रथम पाचही बोटांच्या मुळाशी असलेल्या तीन रेखांवर पंचनमस्कार मंत्राचा न्यास करावा. नंतर त्यावरील पेऱ्यावर करावा. आणि नंतर सर्व बोटांच्या अग्रांवर करावा. ह्याप्रमाणे झाल्यावर "ॐ ह्रीं अर्हं" इत्यादि मंत्रानें दोनी हात नमस्कार करतांना आपण जसे जोडतो त्याप्रमाणे जोडावेत. ह्यास "करन्यास" ह्मणतात.

ततोऽङ्गुष्ठयुग्मेनैव स्वाङ्गन्यासं कुर्यात् ॥ ॐ ह्रां णमो अरिहंताणं स्वाहा। इति मन्त्रं हृदि ॥ ॐ ह्रीं णमो सिद्धाण स्वाहा। ललाटे ॥ ॐ ह्रूं णमो आयरियाणं स्वाहा। दक्षिणकर्णे ॥ ॐ ह्रौं णमो उवज्झायाणं स्वाहा। पश्चिमे ॥ ॐ ह्रः णमो लोए सव्वसाहूणं स्वाहा। वामकर्णे ॥ ॐ ह्रां णमो अरिहंताणं स्वाहा ॥ शिरोमध्ये ॥ ॐ ह्रीं णमो सिद्धाणं स्वाहा। शिरोऽग्रेयभागे ॥ ॐ ह्रूं णमो आयरियाणं स्वाहा। नैर्ऋत्ये ॥ ॐ ह्रौं णमो उवज्झायाणं स्वाहा। शिरोवायव्याम् ॥ ॐ ह्रः णमो लोए सव्वसाहूणं स्वाहा। शिर ईशान्ये ॥ इति द्वितीयन्यासः ॥

अर्थ— नंतर एकमेकाला जुळलेल्या हातांच्या अंगठ्यांनी पुढील न्यास करावा. तें असें—'ॐ ह्रॉं' इत्यादि मंत्रानें दोनी अंगठ्यांनी एकदम हृदयाला स्पर्श करावा. (पुढेंही ह्याप्रमाणेच दोनी अंगठ्यांनी स्पर्श करावा.) "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्राने कपाळाला स्पर्श करावा. "ॐ ह्रूं" इत्यादि मंत्रानें उजव्या कानाला स्पर्श करावा "ॐ ह्रौं" इत्यादि मंत्रानें मस्तकाच्या मागील बाजूस स्पर्श करावा. "ॐ ह्रः" इत्यादि मंत्राने डाव्या कानाला स्पर्श करावा. हा प्रथम न्यास झाला. पुनः "ॐ ह्रां" इत्यादि मंत्रानें मस्तकाच्या मध्यभागी जुळलेल्या दोनी अंगठ्यांनी स्पर्श करावा. "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें मस्तकाच्या आग्नेयभागी स्पर्श करावा. "ॐ ह्रूं" इत्यादि मंत्राने मस्तकाच्या नैर्ऋत्यभागी स्पर्श करावा "ॐ ह्रौं" इत्यादि मंत्राने मस्तकाच्या वायव्यभागी स्पर्श करावा. "ॐ ह्रः" इत्यादि मंत्राने मस्तकाच्या ईशान्यभागी स्पर्श करावा. हा दुसरा न्यास होय.

ॐ ह्रां णमो अरिहंताणं स्वाहा ' दक्षिणे भुजे ॥ ॐ ह्रीं णमो सिद्धाणं स्वाहा ॥ वामभुजे ॥ ॐ ह्रूं णमो आयरियाणं स्वाहा । नाभौ ॥ ॐ ह्रौं णमो उवज्झायाणं स्वाहा । दक्षिण कुक्षौ ॥ ॐ ह्रः णमो लोए सव्वसाहूणं स्वाहा । वामकुक्षौ ॥ इति तृतीयोऽङ्गन्यासः ॥ इत्यङ्गन्यासभेदाः ॥

अर्थ— तसेच हात जोडलेले असताना "ॐ ह्रां" इत्यादि मंत्रानें उजव्या हाताच्या दंडास स्पर्श

करावा. " ॐ ह्रीं " इत्यादि मंत्रानें डाव्या हाताच्या दंडास स्पर्श करावा. " ॐ ह्रूं " इत्यादि मंत्रानें नाभीला स्पर्श करावा " ॐ ह्रौं " इत्यादि मंत्रानें पोटाच्या उजव्या बाजूस स्पर्श करावा. " ॐ ह्रः " इत्यादि मंत्राने पोटाच्या डाव्या बाजूस स्पर्श करावा. हा तिसरा न्यास होय. हे अंगन्यासाचे तीन प्रकार सांगितले आहेत.

वामायामथ तर्जन्यां न्यस्यैवं पञ्चमन्त्रकम् ॥
पूर्वादिदिक्षु रक्षार्थं दशस्वपि निवेशयेत् ॥ १ ॥

अर्थ— नंतर डाव्या हाताच्या तर्जनीवर ( आंगठ्याजवळच्या बोटावर ) पंचनमस्कार मंत्राची योजना एके ठिकाणीच करून ती तर्जनी—भूतप्रेतादिकांपासून आपलें रक्षण होण्याकरिता—दहाही दिशांकडे दाखवावी. त्याचा आरंभ पूर्वदिशेकडून करावा.

ॐ क्षां क्षीं क्षूं क्षें क्षैं क्षों क्षौं क्षं क्षः स्वाहा । इति द्वादश कूटाक्षराणि ॥

ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रें ह्रैं ह्रों ह्रौं ह्रं ह्रः स्वाहा । इति द्वितीयद्वादश शून्यबीजानि ॥

इति दशदिशां बन्धः ॥

अर्थ— " ॐ क्षां " इत्यादि बारा अक्षरांना ' कूटाक्षरें ' आणि " ॐ ह्रां " इत्यादि अक्षरांना " द्वादशशून्यबीजें " ह्मणतात. ह्यांच्या योगानें दिग्बंधन करावें. ह्यापैकीं एकेक अक्षराचा एकेक दिशेला न्यास

करावा. ह्याप्रमाणें दहा दिशांना दहा अक्षरांचा न्यास करावा. पुनः पुढील दहा अक्षरांचा (ॐ ऱ्हॉ इत्यादि अक्षरांचा) न्यास करावा. ह्याला 'दिग्बंधन' ह्मणतात.

कवचॉस्तु करन्यासं कुर्यान्मन्त्रेण मन्त्रवित् ॥

अर्थ— मंत्र जाणणाऱ्या मनुष्यानें मागे सांगितल्याप्रमाणे करन्यास करून पुढीलप्रमाणें कवचन्यास करावा.

ॐ हृदयाय नमः। शिरसे स्वाहा ॥ शिखायै वषट् ॥ कवचाय हूं ॥ अस्त्राय फट् ॥

इति शिखाबन्धः ॥

अर्थ— वरील मंत्राने क्रमाने हृदय, मस्तक, ह्यांना स्पर्श करून, शेंडीला स्पर्श करून 'वषट्कार' करावा. ह्मणजे चिटकी वाजवावी. सर्वांगांत कवच धारण केलें आहे अशी भावना करून 'हुंकार' करावा. अस्त्राकरितां 'फट्कार' करावा. ह्मणजे तीन वेळां टाळी वाजवावी. हे झाल्यावर शिखा बांधावी.

अथ परमात्मध्यानम् ॥

ॐ ऱ्हीँ नमो अरिहंताणं अर्हद्भ्यो नमः ॥ २१ वारं ॥

ॐ ऱ्हीँ अर्हं णमो सिद्धाणं सिद्धेभ्यो नमः ॥ २१ वारं ॥ परमात्मध्यानमन्त्रः ॥

अर्थ— हे दोन मंत्र परमात्म्याच्या ध्यानाचे आहेत. ह्याचा प्रत्येकाचा एकवीस वेळां जप करावा.

एवं तु कुर्वतः पुंसो विघ्ना नश्यन्ति कुत्रचित् ॥

आधिव्याधिः क्षयं याति पीडयन्ति न दुर्जनाः ॥ १ ॥ इति सकलीकरणम् ॥

अर्थ— ह्याप्रमाणे करणाऱ्या मनुष्याची सर्व विघ्नें नाश पावतात. त्याच्या आधि व्याधि नष्ट होतात. आणि दुर्जन त्याला कोणतीही पीडा करीत नाहीत. हा सकलीकरणाचा विधि सांगितला.

ततः आव्हानस्थापनसन्निधीकरणं कृत्वा जिनश्रुतसूरीन् पूजयेत् ॥

अर्थ— नंतर जिन, श्रुत आणि सूरि ह्या देवतांचें आव्हान, स्थापन आणि सन्निधीकरण करून त्यांची पूजा करावी. त्यांच्या पूजेचे मंत्र पुढें सांगतात.

जिनश्रुतसूरिपूजामंत्र

ॐ ह्रीँ अर्हं श्रीपरब्रह्मणे अनन्तानन्तज्ञानशक्तये जलं निर्वपामि स्वाहा ॥ एवं गन्धादि । अष्टद्रव्यपूजनम् । जिनपूजा ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि श्रीजिनपूजेचा मंत्र आहे. ह्या मंत्रानें जल, गंध वगैरे अष्टद्रव्यांनी श्रीजिनाची पूजा करावी. तीं पूजाद्रव्यें नवीन असावीत. ही जिनपूजा होय.

ॐ ह्रीँ परमब्रह्ममुखकमलोत्पन्नद्वादशाङ्गश्रुतेभ्यः स्वाहा ॥ श्रुतपूजामन्त्रः ॥

अर्थ— हा श्रुतपूजेचा मंत्र होय. ह्यानें श्रुतपूजा करावी.

ॐ ह्रीँ शिवपदसाधकेभ्य आचार्यपरमेष्ठिभ्यः स्वाहा ॥ आचार्यपूजामन्त्रः ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं' इत्यादि सूरिपूजनाचा मंत्र होय. ह्या मंत्राने सूरीचे पूजन करावे.

ततो जिनपादार्पितचन्दनैः स्वाङ्गमलंकुर्यात् ॥

अर्थ— नंतर श्रीजिनेंद्राच्या चरणावर अर्पण केलेल्या गंधानें आपले शरीर अलंकृत करावे.

कलशस्थापन व श्रीपीठस्थापन

ततः– ॐ ह्रीं स्वस्तये कलशस्थापनं करोमि स्वाहा ॥ यन्त्रात्प्राक्कलशस्थापनम् ॥ ॐ ह्रीं नेत्राय संवौषट् । कलशार्चनम् ॥ ॐ ह्रीं स्वस्तये पीठमारोपयामि स्वहा ॥ यन्त्रात्प्रत्यक् पीठारोपणम् ॥ ॐ ह्रीं अर्हं क्ष्मां ठः ठः श्रीपीठस्थापनं करोमि स्वाहा । श्रीपीठप्रक्षालनम् ॥ ॐ ह्रीं दर्पमथनाय नमः । पीठदर्भः ॥ ॐ ह्रीं सम्यग्दर्शनज्ञान-चारित्रेभ्यः स्वाहा पीठार्चनम् ॥ ॐ ह्रीं श्रीं श्रीलेखनं करोमि स्वाहा । श्रीकारले-खनम् ॥ ॐ ह्रीं श्रीं श्रीयन्त्रं पूजयामि स्वाहा । श्रीयन्त्रार्चनम् ॥

अर्थ— नंतर यंत्राच्या पूर्वेकडे कलशस्थापन, कलशपूजन, यंत्राच्या पश्चिमेकडे पीठस्थापन [ पीठ ठेवणें ] पीठाचे प्रक्षालन, त्यावर दर्भ ठेवणे, पीठाचे अर्चन, त्या पीठावर श्रीकार काढणे, आणि त्या श्रीकाराचे पूजन करणे, इतका विधि करावा. त्याचे मंत्र वर सांगितले आहेत; आणि ते समजण्यासारखे आहेत. ते मंत्र ह्मणून मंत्रात सांगितलेला विधि करावा.

जिनप्रतिमास्थापनादिमंत्र

ॐ धात्रे वषट् ॥ सिंहासनस्थजिनं श्रीपादयोः स्पृष्ट्वा प्रतिमामानयेत् ॥

अर्थ— "ॐ धात्रे वषट्" या मंत्रानें सिंहासनावर असलेली जिनप्रतिमा–प्रथम त्या प्रतिमेच्या पायाला स्पर्श करून नंतर— उचलून पूजेच्या ठिकाणीं आणावी.

ॐ ऱ्हीँ श्रीवर्णे प्रतिमास्थापनं करोमि स्वाहा । श्रीवर्णे प्रतिमास्थापनम् ॥

अर्थ— मग "ॐ ऱ्हीँ" इत्यादि मंत्रानें पीठावर काढलेल्या श्रीवर्णावर त्या प्रतिमेचें स्थापन करावें.

ॐ ऱ्हीँ अर्हं श्रीपरब्रह्मणे अर्घ्यं निर्वपामि स्वाहा ॥ अर्घ्यदानमन्त्रः ॥

अर्थ— 'ॐ ऱ्हीँ' इत्यादि मंत्रानें त्या प्रतिमेला अर्घ्य द्यावें.

ॐ नमः परब्रह्मणे श्रीपादप्रक्षालनं करोमि स्वाहा ॥ श्रीपादौ प्रक्षाल्य तज्जलैरात्मानं सिञ्चेत ॥पाद्यम् ॥

अर्थ— 'ॐ नमः' इत्यादि मंत्रानें प्रतिमेचे पाय धुवून तें पादोदक आपल्या अंगावर शिंपडावें.

ॐ ऱ्हाँ ऱ्हीँ ऱ्हूँ ऱ्हौँ ऱ्हः अ सि आ उ सा एहि एहि संवौषट् ॥ आव्हानम् ॥ एवं अत्र तिष्ठ तिष्ठ ठः ठः स्थापनम् ॥ पुनः मम सन्निहितो भव भव वषट् सन्निधीकरणम् ॥

अर्थ— 'ॐ ऱ्हाँ' इत्यादि मंत्रानें त्या प्रतिबिंबाच्या ठिकाणी श्रीजिनेंद्राचें आव्हान करावें. पुढें

'ॐ ह्रॉं- सा' येथपर्यंत ह्मणून 'अत्र' इत्यादि मंत्रानें त्या प्रतिबिंबाच्या ठिकाणीं श्रीजिनेंद्राचें स्थापन करावें. पुनः 'ॐ ह्रॉं- सा' येथपर्यंत म्हणून 'मम' इत्यादि मंत्रानें सन्निधीकरण ( जिनेंद्राला आपल्या जवळ ठेवणें ) करावें.

ॐ ह्रीं अ सि आ उ सा नमः ॥ पंचगुरुमुद्राधारणम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं' इत्यादि मंत्रानें पंचगुरुमुद्रा करावी.

ॐ वृषभाय दिव्यदेहाय सद्योजाताय महाप्राज्ञाय अनन्तचतुष्टयाय परमसुखप्रतिष्ठिताय निर्मलाय स्वयम्भुवे अजरामरपरमपदप्राप्ताय चतुर्मुखपरमेष्ठिने महते त्रैलोक्यनाथाय त्रैलोक्यप्रस्थापनाय अधीष्टदिव्यनागपूजिताय परमपदाय ममात्र सन्निहिताय स्वाहा ॥ अनेन पंचगुरुमुद्रानिर्वर्तनम् ॥ ततोऽपि पाद्यम् ॥

अर्थ— 'ॐ वृषभाय' इत्यादि मंत्रानें पंचगुरुमुद्रा करावी. आणि नंतर पुनः जिनेंद्राला पाद्य द्यावें.

ॐ ह्रीं क्ष्वीं क्ष्वीं वं मं हं सं तं पं द्रां द्रीं द्रां द्रीं हं सः स्वाहा ॥ जिनस्याचमनम् ॥

अर्थ—'ॐ ह्रीं' इत्यादि मंत्रानें जिनेंद्राला आचमन द्यावें.

ॐ ह्रीं क्रौं समस्तनीराजनद्रव्यैर्नीराजनं करोमि अस्माकं दुरितमपनयतु भवतु भगवते स्वाहा ॥ नीराजनार्चनम् ॥

अर्थ—'ॐ ह्रॉं क्रौं' इत्यादि मंत्रानें श्रीजिनेंद्राला नीराजनाच्या वस्तूंनीं नीराजन करावें. मूर्तीला कोणाची दृष्ट न लागावी याकरितां त्याच्यावरून ओवाळून टाकावें.

ॐ ह्रौं क्रौं प्रशस्तवर्णसर्वलक्षणसम्पूर्णायुधवाहनयुवतिजनसहिता इन्द्राग्नियमनिर्ऋतिवरुणपवनकुबेरेशानशेषशीतांशवो दश दिग्देवता आगच्छत ॥ इत्यादि दिक्पालार्चनम् ॥

अर्थ—'ॐ ह्रौं क्रौं' इत्यादि मंत्रानें दिक्पालाचें पूजन करावें.

ॐ ह्रॉं स्वस्तये कलशोद्धारणं करोमि स्वाहा ॥ कलशोद्धारणम् ॥

अर्थ—'ॐ ह्रौं' इत्यादि मंत्रानें यंत्राच्या पुढें पूर्वीं स्थापन केलेला कलश उचलून घ्यावा.

ॐ ह्रौं श्रीं क्लीं ऐं अर्हं वं मं हं सं तं पं वं मं हं सं हं हं सं सं तं तं पं पं झं झं झ्वीं झ्वीं क्ष्वीं क्ष्वीं द्रीं द्रीं द्रां द्रां द्रावय द्रावय नमोऽर्हते भगवते श्रीमते पवित्रतरजलेन जिनमभिषेचयामि स्वाहा ॥ जलस्नपनम् ॥

अर्थ—'ॐ ह्रौं' इत्यादि मंत्रानें श्रीजिनाला त्या कलशोदकानें स्नान घालावें.

ॐ ह्रौं श्रीं–इत्यादि श्रीमते सर्वरसेषु पवित्रतरनालिकेररसाम्ररसकदलीपनसेक्षुरसघृतदुग्धदधिभिः जिनमभिषेचयामि स्वाहा ॥

अर्थ—'ॐ ह्रीँ श्रीँ' इत्यादि 'श्रीमते' येथपर्यंत वरील मंत्र म्हणून त्याच्या पुढें सर्वरसेपु' इत्यादि म्हणून श्रीजिनाला नारळाचें दूध, आंब्याचा रस, केळी, फणस, उंसाचा रस, तूप, दूध, दही, ह्यांच्या योगानें स्नान घालावें.

ॐ नमोऽर्हते भगवते कङ्कोलैलालवङ्गादिचूर्णैर्जिनाङ्गमुद्वर्तयामि स्वाहा ॥

अर्थ—'ॐ नमो' इत्यादि मंत्रानें कंकोळ, वेलदोडे, लवंगा, इत्यादिकांच्या चूर्णानें श्रीजिनेंद्राचें अंग चोळावें.

ॐ ह्रीँ श्रीँ क्लीँ इत्यादि श्रीमते पवित्रतरचतुष्कोणकुम्भपरिपूर्णजलेन जिनमभिषेचयामि स्वाहा ॥ कोणकुम्भजलस्नपनम् ॥

अर्थ—'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें पीठाच्या चार कोपऱ्याला ठेवलेल्या चार कलशांतील उदकानें श्रीजिनाला स्नान घालावें.

ॐ ह्रीँ निखिललोकपवित्रीकरणगन्धोदकेनाभिषेचयामि जिनम् ॥
गन्धोदकेनोत्तमाङ्गस्य सेचनम् ॥ इति स्नपनविधिः ॥

अर्थ—'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें श्रीजिनेंद्राच्या मस्तकावर गंधोदकानें सेचन करावें. हा स्नपनविधि म्ह० स्नानविधि सांगितला.

अष्टद्रव्यार्चनमंत्र

ततस्तत्प्रतिमामानीय यन्त्रमध्ये संस्थाप्य सम्पूजयेत ॥ स्नपनाभावे अधिवासनात्मालङ्करणपर्यन्तं विधानमाचर्य यन्त्रे एव प्रतिमाया आ-ह्वानादिकं कृत्वा सम्यक् पूजयेत् ॥ तद्यथा— ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा जलं गृहाण गृहाण नमः ॥ एवं गन्धाक्षतकुसुम-चरुदीपधूपफलैश्च जिनं पूजयेत् ॥ पूर्णार्घं जाप्यं जपेत् ॥

अर्थ— ह्याप्रमाणें स्नानविधि झाल्यावर प्रतिमा पूर्वी सांगितलेल्या यंत्राच्या मध्यभागी ठेवून तिची पूजा करावी. जर प्रतिमेला स्नान घालावयाचें नसेल तर आवाहन, स्थापन वगैरे पासून जिनाच्या चरणावरील गंध आपल्या अंगाला लावून घेण्यापर्यंत विधि करून यंत्राच्या ठिकाणीं प्रतिमेचें आवाहन करून पूजा करावी. ती पूजा अशी की, 'ॐ ह्रां' इत्यादि मंत्रानें जिनेंद्राला जल अर्पण करावें. मग मंत्रांत 'जलं' ह्या ठिकाणी क्रमानें गंध, अक्षता, कुसुम, चरु, दीप, धूप, फल ह्या शब्दांचा उपयोग करून ते ते पदार्थ जिनाला समर्पण करावेत. ह्याप्रमाणें पूजा झाल्यावर पूर्णार्घ्य देऊन जप करावा.

जयादिदेवतार्चनमंत्र

ततः पञ्चपरमेष्ठिनां पूजां कुर्यात् ॥ इति कर्णिकाभ्यर्चनम् ॥

अर्थ— नंतर पंचपरमेष्ठींची पूजा करावी. हें यंत्रांतील कर्णिकेचें पूजन झालें.

अष्टपत्रेषु— ॐ ह्रीँ जये विजये अजिते अपराजिते जम्भे मोहे स्तम्भे स्तम्भिनि सर्वा अप्यायुधवाहनसमेता आयात आयात इदमर्घ्यं चरुममृतमिव स्वस्तिकं यज्ञभागं गृहीत गृहीत स्वाहा॥ इति जयादिदेवीरभ्यर्चयेत् ॥

अर्थ— नंतर त्या यंत्रांतील कर्णिकेच्या सभोंवतीं असलेल्या अष्टदलांत जया, विजया, अजिता, अपराजिता, जंभा, मोहा, स्तंभा आणि स्तंभिनी ह्यांचें पूजन 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें करावें. ह्यांनाच जयादि अष्ट देवता असें ह्मणतात.

विद्यादेवतार्चनमंत्र

षोडशपत्रेषु— ॐ ह्रीँ रोहिणि प्रज्ञप्ते वज्रशृङ्खले वज्राङ्कुशे अप्रतिचक्रे पुरुषदत्ते कालि महाकालि गान्धारि गौरि ज्वालामालिनि वैराटि अच्युते अपराजिते मानसि महामानसि चेति सर्वा अप्यायुधवाहनसमेता आयात आयातेदमर्घ्यं गृह्णीत गृह्णीत स्वाहा ॥ इति विद्यादेवतार्चनम् ॥

अर्थ— मग त्या अष्टदलाच्या भोंवतीं असलेल्या षोडश दलामध्यें रोहिणी, प्रज्ञप्ति, वज्रशृंखला, वज्रांकुशा, अप्रतिचक्रा, पुरुषदत्ता, काली, महाकाली, गांधारी, गौरी, ज्वालामालिनी, वैराटी, अच्युता, अपरा-

जिता, मानसी, महामानसी ह्या सोळा विद्यादेवतांचें " ॐ ऱ्हीं " इत्यादि मंत्रानें पूजन करावें.

शासनदेवतार्चनमंत्र

चतुर्विंशपत्रेषु- ॐ ऱ्हीं चक्रेश्वरि रोहिणि प्रज्ञप्ति वज्रशृङ्खले पुरुषदत्ते मनोवेगे कालि ज्वालामालिनि महाकालि मानवि गौरि गांधारि वैराटि अनन्तमति मानसि महामानसि जये विजये अपराजिते बहुरूपिणि चामुण्डे कूष्माण्डिनि पद्मावति सिद्धायिनि सर्वा अप्यायुधवाहनसमेता आगात आयात इदमर्घ्यं गृह्णीत गृह्णीत स्वाहा ॥ इति शासनदेवतापूजनम् ॥

अर्थ— नंतर षोडशदलांच्या भोवती असलेल्या चोवीस दलामध्यें चक्रेश्वरी, प्रज्ञप्ती, वज्रशृंखला, पुरुषदत्ता, मनोवेगा, काली, ज्वालामालिनी, महाकाली, मानवी, गौरी, गांधारी, वैराटी, अनंतमती, मानसी महामानसी, जया, विजया, अपराजिता, बहुरूपिणी, चामुंडा, कूष्मांडिनी, पद्मावती आणि सिद्धायिनी ह्या चतुर्विंशति शासनदेवतांचें " ॐ ऱ्हीं " इत्यादि मंत्रानें पूजन करावें.

इंद्रार्चनमंत्र

द्वात्रिंशत्पत्रेषु- ॐ ऱ्हीं असुरेन्द्र नागेन्द्र सुपर्णेन्द्र द्वीपेन्द्रो दधीन्द्र स्तनितेन्द्र विद्युदिन्द्र दिगिन्द्र अग्नीन्द्र वाय्विन्द्र किन्नरेन्द्र किम्पुरुषेन्द्र महोर-

गेन्द्र गन्धर्वेन्द्र यक्षेन्द्र राक्षसेन्द्र भूतेन्द्र पिशाचेन्द्र चन्द्रादित्य सौधर्मेन्द्र ईशानेन्द्र सनत्कुमारेन्द्र माहेन्द्रेन्द्र ब्रह्मेन्द्र लान्तवेन्द्र शुक्रेन्द्र शतारेन्द्रानतेन्द्र प्राणतेन्द्रारणेन्द्राच्युतेन्द्र सर्वेऽप्यायातायात यानायुधयुवतिजनैः सार्धं भूर्भुवः स्वः स्वधा इदमर्घ्यं चरुममृतमिव स्वस्तिकं यज्ञभागं गृह्णीत गृह्णीत ॥

इतीन्द्राणामभ्यर्चनम् ॥

अर्थ— चतुर्विंशति दलांच्या सभोवतीं असलेल्या बत्तीस दलांमध्यें असुरेंद्र वगैरे बत्तीस इंद्रांची पूजा करावी.

यक्षार्चनमंत्र

अथ वज्राग्रस्थापितचतुर्विंशतियक्षाः। ॐ ह्रीं गोमुख महायक्ष त्रिमुख यक्षेश्वर तुम्बरु पुष्पाक्ष मातङ्ग श्यामजित ब्रह्मेश्वर कुमार चतुर्मुख पाताल किन्नर गरुड गन्धर्व खगेन्द्र कुबेर वरुण भृकुटि गोमेद धरण मातङ्गाः सर्वेऽप्यायुधवाहनयुवतिसहिता आयातायात इदमर्घ्यं गन्धमित्यादि गृह्णीत गृह्णीत स्वाहा ॥ यक्षार्चनम् ॥

अर्थ— त्या बत्तीस दलाच्या भोवती असलेल्या चोवीस वज्राच्या अग्रावर स्थापित केलेल्या गोमुख

वगैरे चोवीस यक्षाची पूजा "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें करावी.

दिक्पाल व नवग्रह

अथ दिक्पालाः। ॐ इन्द्राग्नियमनैर्ऋत्यवरुणपवनकुबेरेशानधरणसोमाः सर्वेऽप्यायुधवाहनयुवतिसहिता आयातायात इदमर्घ्यमित्यादि ॥ दिक्पालार्चनम् ॥ ॥ अथ ग्रहाः। आदित्यसोममंगलबुधबृहस्पतिशुक्रशनिराहुकेतवः सर्वेऽप्यायुधवाहनवधूचिन्हसपरिवारा आयातायात इदमर्घ्यं स्वाहा ॥ इति नवग्रहपूजा ॥

अर्थ— नंतर इंद्रादि अष्टदिक्पाल व सूर्यादिनवग्रह ह्यांची पूजा करावी.

अनावृतपूजा.

ॐ ह्रीं औं क्रौं हे अनावृत आगच्छागच्छ अनावृताय स्वाहा ॥ इत्यनावृतपूजा ॥ एवं महायन्त्रं समाराध्य मूलविद्यामष्टशतवारान् जपेत् ॥ इति देवताराधनाविधिः ॥

अर्थ— मग "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें अनावृत देवतेचें पूजन करावें. ह्याप्रमाणे महायंत्राचें आराधन झाल्यावर मूलमंत्राचा एकशे आठ वेळा जप करावा. हा देवताराधनाचा विधि सांगितला.

ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा अस्य देवदत्तस्य सर्वोपद्रवशान्तिं कुरु कुरु स्वाहा ॥ अयं मूलमन्त्रः ॥

अर्थ— ॐ ह्रीं इत्यादि मंत्राला मूलमंत्र ह्मणतात. ह्याचा जप करावा. जप करतांना मंत्रात ज्या ठिकाणीं देवदत्तस्य असें आहे, त्या ठिकाणी जप करणाऱ्यानें ज्याच्याबद्दल आपण जप करीत आहोत त्याचें नांव घालावें.

शांतिकर्म

ज्वररोगोपशान्त्यर्थं श्वेतवर्णैर्यन्त्रमुद्धार्य सम्पूज्य पश्चिमाभिमुखः सूरिः ज्ञानमुद्रा पद्मासनं श्वेतजापैरष्टोत्तरशतं जपेत् पश्चिमरात्रौ । त्रिपञ्चसप्तदिनाभ्यन्तरे ज्वरो मुञ्चति ॥ एवमन्येषामपि रोगाणामनुष्ठेयम् ॥ इति शान्तिकर्म ॥

अर्थ— ज्वररोगाची शांति करावयाची असल्यास पांढऱ्या रंगानें यंत्र काढून त्याची पूजा मध्यरात्रीच्या पुढें करून पांढऱ्या रंगाच्या मालेनें वरील मंत्राचा एकशे आठ जप करावा. तोंड पश्चिमेकडे करून पद्मासनानें बसावें, आणि ज्ञानमुद्रा करावी. ह्याप्रमाणें केलें असतां तीन, पाच किंवा सात दिवसात ज्वर निघतो. दुसरा कोणताही रोग असल्यास असेंच अनुष्ठान करावें. ह्याला शांतिकर्म ह्मणतात.

पौष्टिककर्म

एवं पौष्टिकेऽपि तथैव । उत्तराभिमुख इति विशेषः ॥ ॐ ह्राँ ह्रीँ ह्रूँ ह्रौँ ह्रः अ सि

आ उ सा अस्य देवदत्तनामधेयस्य मनःपुष्टिं कुरु कुरु स्वाहा ॥ पुष्टिकर्म ॥

अर्थ— पौष्टिक कर्मातही वरील प्रमाणेंच सर्व अनुष्ठान करावें. फक्त जप करणाऱ्यानें उत्तरेकडे तोंड करावें, एवढें अधिक आहे. ॐ ऱ्हाॅ इत्यादि पौष्टिक कर्मात जप करण्याचा मंत्र समजावा. हा पुष्टिकर्माचा विधि जाणावा.

वशीकरण.

अथ वश्यकर्मणि रक्तवर्णैर्यन्त्रोद्धारः रक्तपुष्पैः। स्वास्तिकासनपद्ममुद्राङ्कितः पूर्वाह्णे यक्षाभिमुखः— ॐ ऱ्हाॅ ऱ्हीॅ ऱ्हूॅ ऱ्हौॅ ऱ्हः अ सि आ उ सा अमुं राजानं वश्यं कुरु कुरु वषट्— वामहस्तेन मन्त्रं जपेत् ॥ इति वश्यकर्म ॥

अर्थ— आतां एखाद्या राजाला वश करावयाचें असल्यास तांबड्या रंगानें यंत्र काढून तांबड्या फुलांनीं त्याची पूजा करावी. आणि स्वास्तिकासन करून उत्तरेकडे तोंड करून पूर्वाह्णात— ॐ ऱ्हाॅ— इत्यादि मंत्राचा जप करावा. तो जप डाव्या हातानें माळा धरून करावा मंत्रांत अमुं राजानं ह्या ठिकाणीं त्या राजाचें नांव घालावें. ह्याला वश्यकर्म ह्मणतात.

आकर्षण.

अथाकृष्टिकर्मणि। रक्तवर्णैर्यन्त्रोद्धारः पूर्वाभिमुखो दण्डासनाङ्कुशमुद्रायुतः ॐ ऱ्हाॅ

ह्रौं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा एनां स्त्रियमाकर्षयाकर्षय संवौषट् ॥ एवं भूतप्रेतवृष्ट्यादीनामप्याकर्षणम् ॥

अर्थ— आकृष्टि म्हणजे ओढून आणणें, हे कर्म करावयाचें असल्यास तांबड्या रंगानें यंत्र काढावे. आणि जप करणाऱ्याने दंडासन करून अंकुशमुद्रा करावी. नंतर ' ॐ ह्रॉं ' इत्यादि मंत्राचा जप करावा. ह्या जपानें भूत, प्रेत, पर्जन्य इत्यादिकांचेंही आकर्षण होते.

अथ स्तम्भनम्

हरितालादिपीतवर्णैर्यन्त्रोद्धारः । पूजा सर्वा पीता । पीता जपमाला वज्रासनं शंखमुद्रा ॥ ॐ ह्रॉं ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा साधकस्य एतन्नामधेयस्य क्रोधं स्तम्भय स्तम्भय ठः ठः ॥ एवं शार्दूलादीनां क्रोधस्तम्भनम् ॥

अर्थ— स्तंभन करावयाचें असल्यास हरताळ वगैरे पिवळ्या रंगानें यंत्रोद्धार करावा. पूजेची सर्व द्रव्यें पिवळी असावीत. जपाची माळ पिवळी असावी. जप करणाऱ्यानें वज्रासन करून शंखमुद्रा करावी. आणि " ॐ ह्रॉं " इत्यादि मंत्राचा जप करावा. ह्या मंत्राने व्याघ्रादिकाच्या क्रोधाचेंही स्तंभन होतें. मंत्रात "एतन्नामधेयस्य" ह्या ठिकाणी ज्याच्या क्रोधाचें स्तंभन करावयाचें असेल त्याचें नांव घालावें.

अतिवृष्टौ सत्यां कर्मणि— ॐ ह्रॉं ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा अत्र एनां

वृष्टिं स्तम्भय ठः ठः ॥ इति स्तम्भनम् ॥

अर्थ— अतिवृष्टि होऊ लागल्यास जप करतांना “ ॐ ऱ्हॉं ” इत्यादि मंत्राचा जप करावा. हा स्तंभनाचा विधि सांगितला आहे.

उच्चाटनकर्म

अथोच्चाटनकर्माणि कृष्णवर्णैर्यन्त्रोध्दारः । अपराण्हे मरुदिंमुखः कुर्कुटासनः पल्लवमुद्रा नीलजाप्यैर्जप ॐ ऱ्हॉं ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः अ सि आ उ सा देवदत्ताना-मधेयं अत उच्चाटय उच्चाटय फट् फट् ॥ इति जपेत् ॥ एवं भूतादीनामप्युच्चा-टनम् ॥ इत्युच्चाटनकर्म ॥

अर्थ— उच्चाटन ( हाकून देणें ) करावयाचें असल्यास काळ्या रंगानें यंत्र काढावें. दोन प्रहरानंतर वायव्यदिशेकडे तोंड करून, कुर्कुटासनानें बसून, पल्लवमुद्रा करून काळ्या रंगाच्या मण्यांनी “ ॐ ऱ्हॉं ” इत्यादि मंत्राचा जप करावा. ह्या मंत्रांत ‘ देवदत्तनामधेय ’ ह्या ठिकाणी ज्याचें उच्चाटन करावयाचें असेल त्याचें नांव घालावें. त्या मंत्रानें भूत वगैरेचेंही उच्चाटण होतें.

विद्वेषकर्म

अथ विद्वेषकर्माणि कृष्णवर्णैर्यन्त्रोध्दारः । मध्यान्हे आग्निमुखः । कुर्कुटासनं पल्लव-

मुद्रा कृष्णजाप्यैर्जपः ॥ ॐ ह्रॉं ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा अनयोर्यज्ञदत्त देवदत्तनामधेययोः परस्परमतीव विद्वेषं कुरु कुरु हूं ॥ एवं स्त्रीपुरुषयोर्वा ॥

इति विद्वेषणम् ॥

अर्थ— कोणांमध्ये द्वेष उत्पन्न करावयाचा असल्यास काळ्या रंगानें यंत्र काढावें. मध्यान्हकाली आग्नेयदिशेकडे तोंड करून, कुक्कुटासन न पल्लवमुद्रा करून, काळ्या मण्याच्या मालेने ॐ ह्रॉं इत्यादि मंत्राचा जप करावा. मंत्रांत यज्ञदत्तदेवदत्तयोः ह्या ठिकाणी ज्या दोघांचा द्वेष उत्पन्न करावयाचा असेल त्याची नावें घालावीत. स्त्रीपुरुषांत परस्पर द्वेष उत्पन्न करावयाचा झाला तरी ह्याच मंत्राचा जप करावा.

अभिचारकर्म

अभिचारकर्माणि सर्पविषमिश्रैरुन्मत्तरसमिश्रैः अपराह्णे ईशानादिङ्मुखः कृष्णनक्षो भद्रासनो वज्रमुद्रात्वदिरसपर्यादिकृताक्षमालः। ॐ ह्रॉं ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा अस्य एतन्नामधेयस्य तीव्रज्वरं कुरु कुरु घे घे। इत्युच्चारयेत् । शूलशिरोरोगाणामप्येवं कर्तव्यम्। उच्चाटनादिकर्माणि धर्माधारभूतानां राजादिनामभिलपितानि चेत्तदा विधेयानि ॥

अर्थ— कोणाला पीडा करावयाची असल्यास सर्पाचें विष किंवा मादक द्रव्य ह्यांनीं मिश्र केलेल्या

काळ्या रंगानें यंत्र काढावें. दोन प्रहरानंतर ईशान्येकडे तोंड करून जप करावा. काळें वस्त्र नेसावें. भद्रासन असावें. वज्रमुद्रा, खैराच्या शाईनें रंगविलेल्या मण्याची माळ जपाला असावी. "ॐ ह्रौं" इत्यादि मंत्राचा जप करावा. मंत्रात "एतन्नामधेयस्य" ह्या ठिकाणीं ज्याला पीडा उत्पन्न करावयाची असेल त्याचे नाव घालावें. पोटशूळ, मस्तकशूल वगैरे पीडा उत्पन्न करावयाची असल्यासही त्याच मंत्राचा जप करावा. उच्चाटन वगैरे जीं कर्में वर सांगितलेलीं आहेत; तीं धर्मसंरक्षण करणारे राजे किंवा दुसरे कोणी अधिकारी यांना संमत असल्यास—करावींत नाहीपेक्षां करूं नयेत.

## होमविधि.

इत्याराधनाविधिं समाप्य होमशालायामग्निहोत्रं विदध्यात् ॥ तद्यथा—ॐ ह्रीं क्ष्वीं भूः स्वाहा । पुष्पाञ्जलिः ॥

अर्थ— ह्याप्रमाणें आराधनाविधि संपवून अग्निहोम करण्याकरिता होमशाळेत जावें. आणि तेथील विधि पुढीलप्रमाणें करावा. "ॐ ह्रीं" ह्या मंत्रानें भूमीवर पुष्पांजलि द्यावी.

ॐ ह्रीं अत्रस्थक्षेत्रपालाय स्वाहा ॥ क्षेत्रपालबलिः ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं इत्यादि मंत्रानें क्षेत्रपालाला बलिदान करावें.

ॐ ह्रीं वायुकुमाराय सर्वविघ्नविनाशनाय महीं पूतां कुरु कुरु हूं फट् स्वाहा ॥

भूमिसम्मार्जनम् ॥

अर्थ— " ॐ ह्रीँ वायुकुमाराय " इत्यादि मन्त्रानें भूमीचे समार्जन करावें.

ॐ ह्रीँ मेघकुमाराय धरां प्रक्षालय प्रक्षालय अं हं सं तं पं स्वं झं झं यं क्षः फट् स्वाहा ॥

भूमिसेचनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीँ मेघकुमाराय ' इत्यादि मंत्राने भूमीवर सडा घालावा.

ॐ ह्रीँ अग्निकुमाराय ह्म्ल्व्र्यूँ ज्वल ज्वल तेजःपतये अमिततेजसे स्वाहा ॥

दर्भाग्निप्रज्वालनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीँ अग्निकुमाराय ' इत्यादि मन्त्राने दर्भ त्या भूमीवर पेटवावेत.

ॐ ह्रीँ क्रौं षष्ठिसहस्रसंख्येभ्यो नागेभ्यः स्वाहा । नागतर्पणम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीँ क्रौँ ' इत्यादि मंत्राने नागाची पूजा करावी.

ॐ ह्रीँ भूमिदेवते इदं जलादिकमर्चनं गृहाण गृहाण स्वाहा । भूम्यर्चनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीँ भूमिदेवते ' इत्यादि मंत्राने भूमीचे पूजन करावें.

ॐ ह्रीँ अर्हं क्षं वं व श्रीपीठस्थापनं करोमि स्वाहा ॥ होमकुण्डात्प्रत्यक् पीठस्थापनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीँ अर्हं ' इत्यादि मंत्राने होमकुंडाच्या पश्चिमेकडे पीठस्थापन करावे.

ॐ ह्रीँ सम्यग्दर्शनज्ञानचारित्रेभ्यः स्वाहा ॥ श्रीपीठार्चनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीँ ' इत्यादि मंत्रानें त्या पीठाचें पूजन करावें.

ॐ ह्रीँ श्रीँ क्लीँ ऐँ अर्हं जगतां सर्वशान्तिं कुर्वन्तु श्रीपीठे प्रतिमास्थापनं करोमि स्वाहा ॥ श्रीपीठे प्रतिमास्थापनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीँ श्रीँ ' इत्यादि मंत्रानें त्या पीठावर जिनप्रतिमा स्थापन करावी.

ॐ ह्रीँ अर्हं नमः परमेष्ठिभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमः परमात्मकेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमोऽनादिनिधनेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमो नृसुरासुरपूजितेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमोऽनन्तज्ञानेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमोऽनन्तदर्शनेभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमोऽनन्तवीर्येभ्यः स्वाहा ॥ ॐ ह्रीँ अर्हं नमोऽनन्तसौख्येभ्यः स्वाहा इत्यष्टाभिर्मन्त्रैः प्रतिमार्चनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीँ अर्हं " इत्यादि आठ मंत्रांनीं त्या प्रतिमेचें पूजन करावें.

ॐ ह्रीँ धर्मचक्रायाप्रतिहततेजसे स्वाहा ॥ चक्रत्रयार्चनम् ॥

अर्थ— ' ॐ ह्रीँ 'धर्मचक्राय ' इत्यादि मंत्रानें चक्रत्रयाचें पूजन करावें.

ॐ ह्रीं श्वेतच्छत्रत्रयश्रियै स्वाहा ॥ छत्रत्रयपूजा ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं' इत्यादि मंत्राने छत्रत्रयाचे पूजन करावे.

ॐ ह्रीं श्रीं क्लीं ऐं अर्हं ह्सौं त्रौं सर्वशास्त्रप्रकाशिनि वद वद वाग्वादिनि अवतर अवतर । अत्र तिष्ठ तिष्ठ ठः ठः । संनिहिता भव भव वषट् । ह्लं नमः सरस्वत्यै जलं निर्वपामि स्वाहा ॥ एवं गन्धाक्षतपुष्पचरुदीपधूपफलवस्त्राभरणादिकम् । प्रतिमाग्रे सरस्वतीपूजा ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं श्रीं' इत्यादि मंत्राने प्रतिमेच्या अग्रभागी जल, गंध, अक्षता, पुष्प, चरु, दीप, धूप, फल, वस्त्र, अलंकार इत्यादिकांच्या योगाने सरस्वतीची पूजा करावी.

ॐ ह्रीं सम्यग्दर्शनज्ञानचारित्रपवित्रतरगात्रचतुरशीतिलक्षगुणाष्टादशसहस्रशीलभरणधरचरणाः आगच्छत आगच्छत संवौषट् ॥ इत्यादि गुरुपादुकापूजा ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं' इत्यादि मंत्राने गणधरांच्या पादुकांचे पूजन करावे.

ॐ ह्रीं कलियुगप्रबन्धदुर्मार्गविनाशनपरमसन्मार्गपरिपालन भगवन् यक्षेश्वर जलार्चनं गृहाण गृहाण ॥ इत्यादि जिनस्य दक्षिणे यक्षार्चनम् ॥

अर्थ— "ॐ ह्रीं कलियुग-" इत्यादि मंत्रानें जिनाच्या उजव्या बाजूस यक्षाचें पूजन करावें.

ॐ ह्रीं कलियुगप्रबन्धदुर्मार्गविनाशिनि सन्मार्गप्रवर्तिनि भगवति यक्षीदेवते जलाद्यर्चनं गृहाण गृहाण । इत्यादि वामे शासनदेवतार्चनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं' इत्यादि मंत्रानें श्रीजिनाच्या डाव्या बाजूस शासनदेवतेचें पूजन करावें.

ॐ ह्रीं उपवेशभूमिः शुध्यतु स्वाहा ॥ होमकुण्डपूर्वभागे दर्भपूलेनोपवेशनभूमि-शोधनम् ॥

अर्थ— "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें दर्भाच्या जुडीनें होमकुंडाच्या पूर्वेकडील बसावयाची भूमि शुद्ध करावी.

ॐ ह्रीं परब्रह्मणे नमो नमः । ब्रह्मासने अत्रोपविशामि स्वाहा ॥ होमकुण्डाग्रे पश्चिमाभिमुखं होता उपविशेत् ॥

अर्थ— "ॐ ह्रीं" इत्यादि मंत्रानें होम करणाऱ्यानें कुंडाच्या पूर्वेकडच्या बाजूस पश्चिमेकडे तोंड करून बसावें.

ॐ ह्रीं स्वस्तये पुण्याहकलशं स्थापयामि स्वाहा ॥ शालिपुञ्जोपरि फलसहितपुण्याहकलशस्थापनम् ॥

अर्थ— "ॐ ह्रीं स्वस्तये" इत्यादि मंत्रानें तांदळाच्या राशीवर पुण्याहवाचनाच्या कलशाची स्थापना करावी. ह्या कलशावर नारळ अथवा दुसरें फळ असावें.

ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः नमोऽर्हते भगवते पद्ममहापद्मतिगञ्छकेसरिपुण्डरीकमहापुण्डरीकगङ्गासिन्धुरोहिद्रोहितास्याहरिद्धरिकान्तासीतासीतोदानारीनरकान्तासुवर्णरूप्यकूलारक्तारक्तोदापयोधिशुद्धजलसुवर्णघटप्रक्षालितवररत्नगन्धाक्षतपुष्पार्चितमामोदकंपवित्रं कुरु कुरु झं झं झौं झौं वं वं मं मं हं हं सं सं तं तं पं पं द्रां द्रां द्रीं द्रीं हं सः ॥ इति जलेन प्रसिञ्च्य जलपवित्रीकरणम् ॥

अर्थ—"ॐ ह्रां" इत्यादि मंत्राने उदकाने सेंचन करून पूजेकरितां ठेवलेले उदक शुद्ध करावे.

ॐ ह्रीं नेत्राय संवौषट् ॥ कलशार्चनम् ॥

अर्थ—"ॐ ह्रीं" इत्यादि मंत्राने कलशाचे पूजन करावे.

ततो यजमानाचार्यः वामहस्तेन कलशं धृत्वा सव्यहस्तेन पुण्याहवाचनां पठन् भूमिं सिञ्चेत् ॥ पुण्याहं पुण्याहं प्रीयन्तां प्रीयन्तां इत्यादि पुण्याहवाचनां पठित्वा कलशं कुण्डस्य दक्षिणे भागे निवेशयेत् ॥

अर्थ— मग होम करणाऱ्या सूरीने (उपाध्यायाने) डाव्या हातात कलश घेऊन उजव्या हाताने—'पुण्याहं पुण्याहं' इत्यादि पुण्यावाचनाचे पठण करीत—भूमीवर उदक शिंपडावें नंतर तो कलश कुंडाच्या उजव्या अंगाला ठेवावा.

ततः ॐ ह्रीँ स्वस्तये मङ्गलकुम्भं स्थापयामि स्वाहा ॥ वामे मङ्गलकलशस्थापनं
तत्र स्थालीपाकप्रोक्षणपात्रपूजाद्रव्यहोमद्रव्यस्थापनम् ॥

अर्थ— नंतर 'ॐ ह्रीँ स्वस्तये' इत्यादि मंत्रानें कुंडाच्या डाव्या अंगास मंगलकलश स्थापन करावा. त्या ठिकाणी स्थालीपाक ( गंध, पुष्प, अक्षता, फल इत्यादिकांनी सुशोभित केलेली पांच पंचपात्री ) प्रोक्षणपात्र, पूजेची सामग्री आणि होमाची सामग्री हें सर्व ठेवावें.

ॐ ह्रीँ परमेष्ठिभ्यो नमो नमः । इति परमात्मध्यानम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्राने परमात्म्याचे ध्यान करावे

ॐ ह्रीँ णमो अरिहंताणं ध्यातृभिरभीप्सितफलदेभ्यः स्वाहा ॥
परमपुरुषस्यार्घ्यप्रदानम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें परमात्म्याला अर्घ्यदान करावें.

तत इद यन्त्रं कुण्डमध्ये लिखेत् ॥ ॐ ह्रीँ नीरजसे नमः । ॐ दर्पमथनाय नमः । इत्यादि ॥
जलैर्दर्भैर्गन्धाक्षतादिभिर्होमकुण्डार्चनम् ॥

अर्थ— नंतर कुंडांत 'नीरजसे नमः' इत्यादि यंत्र लिहावें. जल, दर्भ, गंध, अक्षता वगैरे पदार्थांनी होमकुंडाचें पूजन करावें.

ॐ ॐ ॐ ॐ रं रं रं रं अग्निं स्थापयामि स्वाहा ॥ अग्निस्थापनम् ॥

अर्थ— 'ॐ ॐ' इत्यादि मंत्रानें कुंडांत अग्नीचे स्थापन करावें.

ॐ ॐ ॐ ॐ रं रं रं रं दर्भं निक्षिप्य अग्निसन्धुक्षणं करोमि स्वाहा ॥ अग्निसन्धुक्षणम् ॥

अर्थ— 'ॐ ॐ' इत्यादि मंत्रानें कुंडांत दर्भ टाकून अग्नि प्रज्वलित करावा.

ॐ ह्रीँ क्ष्वीं क्ष्वीं वं मं हं सं तं पं द्रां द्रां हं सः स्वाहा ॥ आचमनम् ॥

अर्थ— 'ॐ ह्रीँ' इत्यादि मंत्रानें आचमन करावें.

ॐ भूर्भुवः स्वः अ सि आ उ सा अर्हं प्राणायामं करोमि स्वाहा ॥ त्रिरुच्चार्य प्राणायामः

अर्थ— 'ॐ भूर्भुवः' इत्यादि मंत्र तीन वेळां ह्मणून प्राणायाम करावा.

ॐ नमोऽर्हते भगवते सत्यवचनसन्दर्भाय केवलज्ञानदर्शनप्रज्वलनाय पूर्वोत्तराग्रं दर्भपरिस्तरणमुदुम्बरसमित्परिस्तरणं च करोमि स्वाहा ॥ होमकुण्डस्य चतुर्भुजेषु पञ्चपञ्चदर्भवेष्टितेन परिधिबन्धनम् ॥

अर्थ— ॐ नमोऽर्हते इत्यादि मंत्रानें कुंडाच्या भोंवत्यानें-पांच पांच दर्भ एकत्र गुंडाळून त्याचें परिस्तरण करावें. ह्मणजे पांच पांच दर्भांची गुंडाळलेली एकेक जुडी कुंडाच्या एकेका बाजूवर ठेवावी. त्यांत दक्षिण आणि उत्तर ह्या दोन बाजूंवर ठेवलेल्या दर्भांच्या जुडीचे शेंडे पूर्वेकडे असावेत. आणि पूर्व व

पश्चिम या दोन बाजूस ठेवलेल्या दर्भाच्या जुडीचे शेंडे उत्तरेकडे असावेत.

ॐ ॐ ॐ ॐ रं रं रं रं अग्निकुमार देव आगच्छागच्छ इत्यादि । इत्यग्निदेवमाहूय प्रसाद्य तन्मौल्युद्भवस्याग्नेरस्य गार्हपत्यनामधेयमत्र सङ्कल्प्य अर्हद्दिव्यमूर्तिभावनया श्रद्धानरूपदिव्यशक्तिसमान्वितसम्यग्दर्शनभावनया समभ्यर्चनम् ॥

अर्थ— ॐ ॐ इत्यादि मंत्रानें अग्निकुमाराचें आवाहन करून, त्याला प्रसन्न करून (प्रज्वलित करून) त्याच्या शेंड्याच्या ज्वालांचें 'गार्हपत्य' असें नांव ठेवावें. आणि त्या ठिकाणीं अर्हतांच्या दिव्यमूर्तीची व श्रद्धानरूपी दिव्यशक्तीनें युक्त असलेल्या सम्यग्दर्शनाची कल्पना करून पूजा करावी. ही त्या अग्नीच्या ज्वालांवरच करावयाची आहे.

ॐ ऱ्हीं क्रौं प्रशस्तवर्णसर्वलक्षणसम्पूर्णस्वायुधवाहनवधूचिन्हसपरिवाराः पञ्चदशतिथिदेवताः आगच्छत आगच्छत इत्यादि कुण्डस्य प्रथममेखलायां तिथिदेवतार्चनम् ॥

अर्थ— 'ॐ ऱ्हीं क्रौं' इत्यादि मंत्रानें कुंडाच्या पहिल्या मेखलेवर पंधरा तिथिदेवतांचें आवाहन करून त्यांचें पूजन करावें. या ठिकाणीं अगदीं खालची जी मेखला ती पहिली समजावी.

ॐ ऱ्हीं क्रौं प्रशस्तवर्णसर्वलक्षणसम्पूर्णस्वायुधवाहनवधूचिन्हसपरिवारा नवग्रहदेवता आगच्छतागच्छत इत्यादि द्वितीयमेखलायां ग्रहपूजा ॥

अर्थ— ॐ ह्रीँ क्रौं ह्या मंत्राने कुंडाच्या दुसऱ्या मेखलेवर नवग्रहांची पूजा करावी.

ॐ ह्रीँ क्रौं प्रशस्तवर्णसर्वलक्षणसम्पूर्णस्वायुधवाहनवधूचिन्हसपरिवाराश्चतुर्णिकायेन्द्रदेवता आगच्छतागच्छतेत्यादि । ऊर्ध्वमेखलायां द्वात्रिंशदिन्द्रार्चनम् ॥

अर्थ— ॐ ह्रीँ क्रौं इत्यादि मंत्राने कुंडाच्या तिसऱ्या मेखलेवर द्वात्रिंशत् ( बत्तीस ) इंद्रांचे पूजन करावे.

ॐ ह्रीँ क्रौं सुवर्णवर्ण सर्वलक्षणसम्पूर्ण स्वायुधवाहनवधूचिन्ह सपरिवार इन्द्रदेव आगच्छागच्छेत्यादि इन्द्रार्चनम् ॥ एवं लघुपीठेषु दशदिक्पालपूजा ॥

अर्थ— ॐ ह्रीँ क्रौं इत्यादि मंत्राने इन्द्राचे पूजन करावे. ही इंद्रदेवता दशदिक्पालांपैकी समजावी. त्याप्रमाणे लहान लहान पीठांवर दहा दिक्पालाची पूजा करावी.

ततः ॐ ह्रीँ स्थालीपाकमुपहरामि स्वाहा ॥ पुष्पाक्षतैरुपहार्य स्थालीपाकग्रहणम् ॥

अर्थ— नंतर ॐ ह्रीँ इत्यादि मंत्राने फुले आणि अक्षता ह्यांनी भरून स्थालीपाक ( पूर्वी सांगितलेली पांच पंचपात्री ) आपल्या जवळ ठेवावा.

ॐ ह्रीँ होमद्रव्यमादधामि स्वाहा ॥ होमद्रव्याधानम् ॥

अर्थ— ॐ ह्रीँ इत्यादि मंत्रानें अग्नीत हवन करण्याचे पदार्थ जवळ ठेवून घ्यावेत.

ॐ ह्रीँ आज्यपात्रमुपस्थापयामि स्वाहा ॥ आज्यपात्रस्थापनम् ॥

अर्थ---'ॐ ऱ्हीं' इत्यादि मंत्रानें तुपाचें भांडें जवळ ठेवावें.

ॐ ऱ्हीं स्रुचमुपस्करोमि स्वाहा ॥ स्रुचस्तापनं मार्जनं जलसेचनं पुनस्तापनमग्रे निधापनं च ॥

अर्थ -- 'ॐ ऱ्हीं' इत्यादि मंत्रानें स्रुची ( अर्थात होम करण्याचें द्रव्य ज्यांत घेऊन होम करतात तें लांकडाचें पात्र ) त्याला संस्कार करावा. तो असा- प्रथम ती स्रुची अग्नीवर धरून तापवावी. मग तिच्यावर जलानें प्रोक्षण करावें नंतर पुनः तापवावी; आणि मग ती आपल्या पुढें ठेवावी.

ॐ ऱ्हीं स्रुवमुपस्करोमि स्वाहा । स्रुवस्थापनं तथा ॥

अर्थ--- 'ॐ ऱ्हीं' या मंत्रानें स्रुवा ( तांब्याची किंवा लांकडाची पळी ) त्यालाही वरील प्रमाणेंच संस्कार करून आपल्या पुढें ठेवावी.

ॐ ऱ्हीं आज्यमुद्वासयामि स्वाहा ॥ दर्भपिण्डोज्वलेन आज्यस्योद्वासनमुत्पाचनमवेक्षणं च ॥

अर्थ-- ॐ ऱ्हीं या मंत्रानें तुपाला संस्कार करावा. दर्भाची जुडी पेटवून ती तुपाचें पात्र उचलून धरून त्याच्या खालीं धरावी. आणि तूप तापवावें. नंतर खालीं ठेवून त्याकडे हवन करणाऱ्यानें पहावें.

ॐ ऱ्हीं पवित्रतरजलेन द्रव्यशुद्धिं करोमि स्वाहा ॥ होमद्रव्यप्रोक्षणम् ॥

अर्थ— 'ॐ ऱ्हीं' इत्यादि मंत्रानें होमाचें द्रव्य शुद्धोदक प्रोक्षण करून शुद्ध करावें.

ॐ ऱ्हीं कुशानादधामि स्वाहा ॥ दर्भिकलादाय सर्वद्रव्यप्रसेचनम् ॥

अर्थ— ' ॐ ऱ्हीं ' इत्यादि मंत्राने दर्भाची जुडी घेऊन तिच्या योगाने होमद्रव्याला स्पर्श करावा.

ॐ ऱ्हीं परमपवित्राय स्वाहा ॥ अनामिकांगुल्यां पवित्रधारणम् ॥

अर्थ— ' ॐ ऱ्हीं ' इत्यादि मंत्राने उजव्या हाताच्या शेवटच्या बोटाच्या जवळ असलेल्या बोटांत दर्भाचे पवित्र धारण करावे.

ॐ ऱ्हीं सम्यग्दर्शनज्ञानचारित्राय स्वाहा ॥ यज्ञोपवीतधारणम् ॥

अर्थ— ' ॐ ऱ्हीं ' इत्यादि मंत्राने यज्ञोपवीत धारण करावें. [ यज्ञोपवीत धारण करावयाचें त्यासंबंधानें असें आहे की, नित्ययज्ञांत रोज रोज नवीन यज्ञोपवीत धारण करण्याचे कारण नाही. गळ्यांत असलेल्या जुन्या यज्ञोपवीतालाच जल व गंध लावावे. ह्मणजे ते रोज नवें झाल्यासारखेंच होतें. आणि नैमित्तकयज्ञांत मात्र नवीन यज्ञोपवीत धारण केलें पाहिजे. असें समजावें. ]

ॐ ऱ्हीं अग्निकुमाराय परिषेचनं करोमि स्वाहा ॥ अग्निपर्युक्षणम् ॥

अर्थ— ' ॐ ऱ्हीं ' इत्यादि मंत्रानें अग्निकुंडाच्या भोंवत्यानें पाणी शिंपडावें.

ततः ॐ ऱ्हीं अर्हं अर्हत्सिद्धकेवलिभ्यः स्वाहा ॥ ॐ ऱ्हीं पञ्चदशातिथिदेवेभ्यः स्वाहा ॥ ॐ ऱ्हीं नवग्रहदेवेभ्यः स्वाहा ॥ ॐ ऱ्हीं द्वात्रिंशदिन्द्रेभ्यः स्वाहा ॥ ॐ ऱ्हीं दशलोकपालेभ्यः स्वाहा ॥ ॐ ऱ्हीं अग्नीन्द्राय स्वाहा ॥

षडेतान् मन्त्रानष्टादशकृत्वः पुनरावर्तनेनोच्चारयन् स्रुवेण प्रत्येकमाज्याहुतिं कुर्यादित्याज्याहुतयः १०८ ॥

अर्थ— नंतर 'ॐ ऱ्हीं अर्हं' इत्यादि सहा मंत्रांनी पळीनें तुपाच्या आहुती अग्नींत घालाव्यात. त्या प्रत्येक मंत्राच्या शेवटीं एकेक याप्रमाणें सहा मंत्रांच्या सहा आहुती होतात. आणि हे सहा मंत्र अठरा वेळां म्हटलें आणि आहुती दिल्या, म्हणजे एकंदर आहुति एकशेंहे आठ होतात.

ॐ ऱ्हां अर्हत्परमेष्ठिनस्तर्पयामि स्वाहा ॥ ॐ ऱ्हीं सिद्धपरमेष्ठिनस्तर्पयामि स्वाहा ॥ ॐ ऱ्हूं आचार्यपरमेष्ठिनस्तर्पयामि स्वाहा ॥ ॐ ऱ्हौं उपाध्यायपरमेष्ठिनस्तर्पयामि स्वाहा ॥ ॐ ऱ्हः सर्वसाधुपरमेष्ठिनस्तर्पयामि स्वाहा ॥ अवांतरे पंच तर्पणानि ॥

अर्थ—वरील तुपाच्या आहुती घालून झाल्यावर 'ॐ ऱ्हां' इत्यादि मंत्रानें पांच वेळ तर्पण करावें. हें तर्पण पुढेंही प्रत्येक द्रव्याचें हवन झाल्यावर करावयाचें असतें; म्हणून याला 'अवांतर तर्पण' (मध्यें करावयाचें तर्पण) असें म्हणतात

ॐ ऱ्हीं अग्निं परिषेचयामि स्वाहा ॥ क्षीरेणाग्निपर्युक्षणम् ॥

अर्थ— नंतर 'ॐ ऱ्हीं' इत्यादि मंत्रानें कुंडाच्या आंत अग्नीच्या भोंवत्यानें दुधाची धार एक वेळ

तेन वस्त्रेण कुम्भास्यं संच्छाद्य शोधयेज्जलम् ॥
शनैः शनैश्च धाराभिर्यथा नोल्लङ्घयेद्धटम् ॥ १४ ॥

अर्थ— पूर्वी सांगितलेल्या वस्त्राने घागरीचें तोंड झांकून त्यावर पाण्याची धार -ज्या तऱ्हेनें पाणी घागरीच्या तोंडावरून वाहून जाणार नाही,—अशा तऱ्हेनें हळूहळू सोडून पाणी शोधावें.

शेपजलत्याग.

शेषं जलं तु तत्रैव तीर्थे निक्षेपयेत्पुनः ॥
तीर्थादागत्य गेहे तु पुनः संशोधयेज्जलम् ॥ १५ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें पाणी शोधीत असतां घागर भरून जें पाणी उरलें असेल, तें पुनः त्या तीर्थातच टाकून द्यावें. मग घरी येऊन पुनः तें पाणी शोधावें.

घटीद्वये गते चापि पुनरेवं विशोधयेत् ॥
प्रातःकाले तु संशोध्य शेषं पूर्वजले क्षिपेत् ॥ १६ ॥
मुहूर्तं गालितं तोयं प्रासुकं प्रहरद्वयम् ॥
उष्णोदकमहोरात्रमगालितमिवोच्यते ॥ १७ ॥

अर्थ— पुढें दोन घटिका गेल्यावर पुनः तें पाणी शोधावें. ह्याप्रमाणें प्रातःकाली दुसऱ्या वेळीं

केल्यावर राहिलेलें पाणी पूर्वीच्या पाण्यांत टाकावें. ह्याप्रमाणें शोधलेलें पाणी दोन घटकापर्यंत निर्जंतुक असतें. वेलदोडे, वाळा, वगैरे पदार्थांचा वास लावलेलें पाणी दोन प्रहरपर्यंत शुद्ध असतें. आणि तापविलेलें पाणी एक अहोरात्रपर्यंत निर्जंतुक असतें. त्याच्या पुढें तें न शोधल्यासारखें होतें.

जलसंस्कार

वासयेत्पाटलीपुष्पैर्मूलैरौसीरकैस्तथा ॥
एलाकर्पूरकाभ्यां तु चन्दनादिसुवस्तुना ॥ १८ ॥

अर्थ— पाडळीची फुलें, वाळा, वेलदोडे, कापूर, चंदन वगैरे पदार्थांचा संस्कार त्या पाण्याला करावा. ह्मणजे ह्यांचा वास लावावा.

जलबिंदूतील जीवाचें परिमाण

एकबिन्दूद्भवा जीवाः पारापतसमा यदि ॥
भूत्वा चरन्ति चेज्जम्बूद्वीपोऽपि पूर्यते च तैः ॥ १९ ॥

अर्थ— पाणी शोधण्याचें कारण त्यातील सर्व जंतु निघून जावेत एवढेंच आहे. ते जंतु किती असतात असें जर ह्मणाल, तर त्याचें प्रमाण असें आहे कीं, पाण्याच्या एका थेंबांत असलेले जंतु जर पारव्या एवढे मोठे होऊन हिंडूं लागतील, तर, त्यांच्या योगानें हें सारें जंबूद्वीप भरून जाईल. इतके जंतु पाण्याच्या

एका थेंबांत असतात. ह्यावरून सर्व समजण्यासारखें आहे.

जलगालनाची आवश्यकता.

तस्माद्यत्नः परः कार्यो धर्माय जलशोधने ॥
नूतनं सुदृढं वस्त्रं ग्राह्यं श्रावकधर्मिणा ॥ २० ॥

अर्थ— पाणी न शोधल्यानें अनंतानंत जंतूंचा नाश होतो, म्हणून पाणी शोधण्याबद्दल फारच खबरदारी घेतली पाहिजे. श्रावकानें पाणी शोधण्यास जें वस्त्र घ्यावयाचें तें नवें असून वळकट असें घ्यावें.

तुच्छवस्त्रनिंदा

पट्टकूलमतिसूक्ष्मं बहुमूल्यं दृढं घनम् ॥
परिधत्ते स्वयं वस्त्रं जलार्थे तु दरिद्रता ॥ २१ ॥

अर्थ— पुष्कळ किमतीचें, वळकट, बारीक, भरीव सुताचें असें उंची वस्त्र आपण नेसावयास घेतों. आणि पाणी गाळण्यास मात्र तसलें वस्त्र मिळूं नये; तेवढ्याकरितां दारिद्र्य यावें; हें अगदीं वाईट!

पेषण ( दळणें )

अथ पेषणं ॥ गोधूमादिसुधान्यानि संशोध्य शुचिभाजने ॥
नूतनानि पवित्राणि पेषयेज्जीवयत्नतः ॥ २२ ॥

अर्थ— आतां स्त्रियांच्या पेषणक्रियेबद्दल सांगतात— नवीं आणि पवित्र अशीं गहूं वगैरे धान्यें शुद्ध अशा भांड्यांत निवडून घेऊन, ती आपल्या शक्तीच्या मानानें जोरानें किंवा हळू दळावींत.

त्याज्य धान्यें.

घुणितं जीर्णितं धान्यं वर्णस्वादविपर्ययम् ॥
पेषयेत्कुट्टयेन्नैव भिक्षुभ्योऽपि न दीयते ॥ २३ ॥

अर्थ— आळ्या झालेलें, जुनें, ज्याचा रंग बदलेला आहे असें, आणि ज्याचा वास वाईट येऊं लागला आहे असें धान्य दळूं नये; आणि कांडूं नये. इतकेंच नव्हें, तर तें धान्य भिक्षेलाही घालूं नये.

किडे झालेलें धान्य उन्हात वगैरे न टाकणें.

घुणितं कीटसंयुक्तं घर्मे मार्गेऽथवा जले ॥
धान्यं प्रसार्यते नैव जीवघातो भवेद्यतः ॥ २४ ॥

अर्थ— आळ्या आणि किडे झालेलें धान्य उन्हांत, रस्त्यावर किंवा पाण्यांत टाकूं नये. कारण त्या योगानेंच त्यांतील जीवांचा नाश होतो.

धान्य पुष्कळ दिवस ठेवण्याचा निषेध.

बहुदिनानि रक्ष्यन्ते न च धान्यानि संग्रहे ॥

उत्पत्तिस्त्रसजीवानां यतः सञ्जायते भुवि ॥ २५ ॥

अर्थ— धान्यें फार दिवस संग्रहीं ठेऊं नयेत. कारण, फार दिवस ठेविल्यामुळें धान्यांत त्रसजीवांची उत्पत्ति होते.

तण्डुलेषु च चूर्णेषु द्विदलेषु च शीघ्रतः ॥

उत्पत्तिस्त्रसजीवानां तस्माद्वेगाद्व्ययो मतः ॥ २६ ॥

अर्थ— तांदुळ, पीठ आणि हरभरे वगैरे डाळीची धान्यें यांत त्रसजीवांची उत्पत्ति फारच जलद होते. ह्मणून त्यांचा व्यय लवकर करावा.

पाककर्म

अथाग्निः ॥ स्नात्वा जलेन वा शीर्षं हस्तौ संशोध्य मृत्स्नया ॥

परिधाय पटं धौतं प्रविशेत्स्त्रीर्महानसे ॥ २७ ॥

अर्थ— आतां स्त्रियाची पाकक्रिया सागतात— स्नान करून, मस्तक आणि हात हे माती लावून स्वच्छ धुवून, आणि धुतलेलें वस्त्र नेसून, स्त्रीयांनी सपाक करण्याच्या घरांत जावें.

चुल्ल्यां संशोध्य जीवादीन् पूर्वभस्म परित्यजेत् ॥

निर्जन्तूनि सुशुष्काणि चेन्धनानि समानयेत् ॥ २८ ॥

अग्निं सन्धुक्षयेच्चुल्ल्यां प्रक्षाल्य स्थालिकास्ततः ॥
स्वयं पाकविधिः कार्यो नानारससमन्वितः ॥ २९ ॥
घृतपक्व पयःपाकं सूपोदनं सशर्करम् ॥
आपूपव्यञ्जनान्येव भाग्यस्येदं फलं विदुः ॥ ३० ॥

अर्थ— नंतर चुलींत काहीं जीवजंतु वगैरे आहेत किंवा काय हें नीट पाहून, ज्यांत जीवजंतु नाहींत असें वाळलेले सर्पण आणून तींत घालावें. मग अग्नि पेटवून, व स्वयंपाकाचीं भांडीं धुवून घेऊन, अनेक रसांनीं युक्त असा पाक स्त्रीनें स्वतः करावा. त्यांत आपल्याला जसें वैभव असेल, त्या मानानें तुपांत तळलेले पदार्थ, दुधात शिजविलेले पदार्थ, वरण, भात, साखरेनें युक्त असे पदार्थ, अनरसे वगैरे पदार्थ, तिखट, लोणचीं वगैरे पदार्थ करावेत. असें पुष्कळ करणें हें भाग्याचें फल आहे.

स्त्रियांचा भोजनकाल

आदौ सन्तर्प्य सत्पात्रं भर्तारं च सुतादिकम् ॥
गृहदेवांश्च सन्तर्प्य ततः स्याद्भोजनं स्त्रियः ॥ ३१ ॥

अर्थ— पाक सिद्ध झाल्यावर प्रथम सत्पात्राला अन्नदान करून, नंतर पति, पुत्र वगैरेंना भोजन घालून, गृहदेवतांना बलिदान करून नंतर स्त्रियांनीं भोजन करावें.

इत्येवं पञ्च कर्माणि कथितानि सुयोषिताम् ॥
नराणां कर्म षष्ठं तु व्यापारः कथ्यतेऽधुना ॥ ३२ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें साध्वी स्त्रियांची पांच कर्मे सांगितलीं. आतां पुरुषांचें सहावें कर्म (व्यापार) सांगतों.

ब्राह्मणाचा उद्योग

ब्राह्मणः सरितं गत्वा वस्त्रं प्रक्षालयेत्ततः ॥ दर्भादि समिधो नीत्वा गृहे संस्थापयेत्ततः ॥ ३३ ॥ सदनं यजमानस्य गत्वा धर्मोपदेशनाम् ॥ तिथिवारं च नक्षत्रं कथयेद्ग्रहशुद्धये ॥ ३४ ॥ श्रीजिनगुणसम्पत्तिं श्रुतस्कंधं द्विकावलिम् ॥ मुक्तावलिं तथाऽन्यं च व्रतोद्देशं समादिशेत् ॥ ३५ ॥ चतुर्दश्यष्टमी चाद्य प्रातर्वा व्रतवासरम् ॥ चान्द्रं बलं गृहाचारं कथयेज्जैनशासनात् ॥ ३६ ॥ कथां व्रतविधानस्य पुराणानि जिनेशिनाम् ॥ ग्रहहोमं गृहाचारं कथयेज्जिनशासनात् ॥ ३७ ॥ यजमानेन यद्दत्तं दानं धान्यं धनं तथा ॥ गृह्णीयाद्धर्षभावेन बहुतृष्णाविवर्जितः ॥ ३८ ॥ आशीर्वादं ततो दद्याद्भक्ताचित्तं न दूषयेत् ॥ गृहमागत्य पुत्रादीन् तोषयेन्मधुरोक्तितः ॥ ३९ ॥ गृहचिन्तां ततः कुर्याद्वस्त्रैर्धा-

न्यैश्च पूरयेत् ॥ गोधनैर्दधिदुग्धैश्च तृणकाष्ठैश्च भूषणैः ॥ ४० ॥

अर्थ— ब्राह्मणानें नदीला जाऊन आपलीं वस्त्रें धुवून, दर्भ, समिधा घेऊन आपल्या घरीं आणून ठेवाव्यात. नंतर यजमानांच्या (श्रावकांच्या) घरीं जाऊन त्यांना धर्मोपदेश करावा. त्यांना तिथि, वार, नक्षत्र वगैरे सांगून त्यांचे इष्टानिष्ट ग्रह सांगावेत. श्रीजिनेंद्राच्या गुणांचें वर्णन करून, श्रुतस्कंध, द्विकावलि, मुक्तावली, तशींच दुसरीं व्रतें वगैरे हें सर्व त्यांनां नीट समजावून सांगावें. चतुर्दशी, अष्टमी त्या दिवशीं असल्यास किंवा दुसरे दिवशीं असल्यास त्यांना सांगावीं. व्रताचा दिवस, गृहस्थांचा आचार, शांतिपूजा वगैरे जिनागमावरून त्यांना सांगावें. व्रताच्या कथा, श्रीजिनेंद्रांचीं पुराणें हीं त्यांना सांगावींत आणि ग्रहहोमाचा विधि जिनशास्त्राला अनुसरून असलेला त्यांना सांगावा. यजमान जें आपल्याला दान देईल, किंवा धान्य अथवा द्रव्य देईल, तें संतोषानें घ्यावें. अधिक आशा करूं नये. मग त्या यजमानाला आशीर्वाद द्यावा. यजमानाच्या मनाला वाईट वाटूं देऊं नये. नंतर घरीं येऊन मधुर भाषणानें पुत्रादिकांचा संतोष करावा मग आपल्या घरांत काय आहे, काय नाहीं, ह्याचा विचार करून, वस्त्र, धान्य, गाय, दहि, दूध, गवत, लाकूडफांटा वगैरे पदार्थांची घरात समृद्धि करावी.

ब्राह्मणांचें लक्षण

दद्याति प्रतिगृह्णाति सद्दानं जिनमर्चति ॥

पठते पाठयत्यन्यानेवं ब्राह्मण उच्यते ॥ ४१ ॥

अर्थ— सद्दान दुसऱ्याला देणें, दुसऱ्यानें दिलेलें आपण घेणें, जिनपूजा करणें, स्वतः स्वाध्याय करणें आणि दुसऱ्याकडून करविणें, ह्या क्रिया करीत असल्यामुळेंच लोक ब्राह्मणाला ब्राह्मण ह्मणतात. ह्मणून ब्राह्मणानें ह्या क्रिया अवश्य केल्या पाहिजेत.

पुत्रपौत्रसुतादीनां लौकिकाचाररक्षणम् ॥
विवाहादिविधानं च कुर्याद्द्रव्यानुसारतः ॥ ४२ ॥
गोऽश्वमहिषीमुख्यानि स्वं स्वं स्थानं निवेशयेत् ॥
सन्ध्यायाः समये सन्ध्यां विप्रः कुर्याच्च पूर्ववत् ॥ ४३ ॥

अर्थ— मुलगा, नातु, मुली ह्यांचे लौकिकाचार संभाळावेत. आणि आपल्याजवळ जसें द्रव्य असेल, त्या मानानें त्यांचीं विवाहादि कार्यें करावींत. प्रत्येक दिवशीं संध्याकाळीं घोडा, गाय, म्हैस, वगैरे जनावरें रानांतून आल्यावर त्यांच्या त्यांच्या ठिकाणावर नेऊन तीं बांधावींत. घोड्याचें ठाण निराळें असावें. संध्याकाळीं ब्राह्मणानें पूर्वी सांगितलेल्या विधीनें संध्या करावी.

क्षत्रियाचा उद्योग.

क्षत्रियाणां विधिं प्रोचे संक्षेपाच्छ्रूयतां त्वहम् ॥ भृत्यो यः क्षत्रियस्तेन गन्तव्यं

राजसद्मनि ॥ ४४ ॥ सभास्थितं महीपालं नत्वाऽग्रे स्थीयते भुवि ॥ सशस्त्रः स्वामिभक्तः सन्करकुड्मलवान्मुदा ॥ ४५ ॥ नृपाज्ञया यथास्थानं तथैवोपविशेत्सुखम् ॥ स्वाम्यर्थं च त्यजेत्प्राणान् स्वाम्यर्थं देहधारणम् ॥ ४६ ॥ एतत्कार्यं प्रकर्तव्यं तच्छ्रुत्वा शीघ्रतः पुनः ॥ तत्कर्तव्यं प्रयत्नेन प्रसन्नः स्याद्यतो नृपः ॥ ४७ ॥ स्वामिद्रोही कृतघ्नश्च यश्च विश्वासघातकः ॥ पशुघाती कृपाहीनः श्वभ्रं याति स निन्दकः ॥ ४८ ॥ नृपाज्ञा यत्र विद्येत स गच्छेत्तत्र वेगतः ॥ सन्ध्यां सामायिकं पात्रदानं तपश्च साधयेत् ॥ ४९ ॥

अर्थ— आतां क्षत्रियांचा आचार थोडक्यांत सांगतों. क्षत्रियांमध्यें जो सेवक असा क्षत्रिय असेल त्यानें राजमंदिरांत जाऊन, सभेंत बसलेल्या राजाला वंदन करून, जमिनीवर उभे राहावें. राजापुढें उभे असतांना आपल्या जवळ शस्त्र असावें. अंतःकरणांत स्वामिभक्ति असावी आणि हात जोडलेले असावेत. मग राजानें बसण्याची आज्ञा केल्यावर तसेंच बसावें. आपल्या स्वामीकरितां प्राण देण्याचा प्रसंग आला तर प्राण द्यावेत. कारण सेवकानें देहधारण करावयाचें तें स्वामीकरितांच करावयाचें आहे. राजानें 'अमुक कार्य कर' अशी आज्ञा केली असतां, तें कार्य मोठ्या प्रयत्नानें त्वरेनें करावें. कारण त्यामुळें स्वामीची आपल्यावर कृपा होते. स्वामिद्रोही, कृतघ्न, विश्वासघातकी, पशु मारणारा, निर्दय आणि स्वामीची

निंदा करणारा असा सेवक नरकांत जातो. ह्मणून अशा गोष्टी करूं नयेत. राजा ज्या ठिकाणी जाण्याची आज्ञा करील, त्या ठिकाणीं त्वरेनें जावें. सेवकानें नेहमीं संध्या, सामायिक, पात्रदान आणि तप ह्या नित्यक्रिया कराव्यात.

राजाचे आचार.

अथ राजा ॥ देवपूजां परां कृत्वा पूर्वोक्तविधिना नृपः ॥
आगत्योपविशेत्स्वस्थः सभायां सिंहविष्टरे ॥ ५० ॥
न्यायमार्गेण सर्वांश्च सुदृष्टया प्रतिपालयेत् ॥
प्रजा धर्मसमासक्ता विना प्रजां कुतो वृषः ॥ ५१ ॥
दुष्टानां निग्रहं कुर्याच्छिष्टानां प्रतिपालनम् ॥
जिनेन्द्राणां मुनीन्द्राणां नमनादिक्रियां भजेत् ॥ ५२ ॥
राजानं धर्मिणं दृष्ट्वा धर्मं कुर्वन्ति वै प्रजा ॥
यथा प्रवर्तते राजा तथा प्रजा प्रवर्तते ॥ ५३ ॥

अर्थ— आतां राजा असलेल्या क्षत्रियाचा आचार सागतात— राजानें प्रातःकाली पूर्वी सांगितलेल्या विधीनें पूजा करून, स्वस्थ मनानें सभेंत सिंहासनावर बसावें. आपल्या धर्माप्रमाणें चालणाऱ्या आपल्या

प्रजेचे कृपादृष्टीनें आणि न्यायाला अनुसरून रक्षण करावें. कारण प्रजेवांचून धर्माची वृद्धी होत नाहीं. राजानें दुष्टांना शिक्षा करावी, सज्जनांचें रक्षण करावें, आणि जिनेंद्र व मुनींद्र यांना नमस्कार करावा. राजा धार्मिक असला ह्मणजे त्याला पाहून प्रजा धर्माचरण करूं लागते. कारण, जसा राजा वागेल तशी प्रजा वागूं लागते. ह्मणून राजानें धार्मिक असावें.

राजाचें लक्षण

ससाङ्गैश्च भवेद्राराजा भयाष्टकविवर्जितः ॥
शक्तित्रयसमोपेतः सिद्धित्रयविराजितः ॥ ५४ ॥

अर्थ— सात अंगें ज्याच्या राज्याला आहेत, ज्याची आठ प्रकारचीं भयें नष्ट झालीं आहेत, जो तीन प्रकारच्या शक्तींनीं युक्त आहे. आणि ज्याला तीन प्रकारच्या सिद्धि प्राप्त झाल्या आहेत तो राजा होय. तात्पर्य, राजाच्या ठिकाणीं इतके गुण असावयास पाहिजेत.

सात अंगें.

अमात्यससुहृत्कोशदुर्गराष्ट्रबलानि च ॥
स्वामिना सह ससैव राज्याङ्गानि सुखाय वै ॥ ५५ ॥

अर्थ— प्रधान, मित्र, कोश, किल्ला, राष्ट्र, सैन्य आणि राजा हीं राज्याचीं सांत अंगें होत. हीं

सातही अंगें सुखसाधनें आहेत.

आठ भीति.

अनावृष्ट्यतिवृष्ट्यग्निसस्योपघातमारिकाः ॥
तस्करव्याधिदुर्भिक्षा एता अष्टौ भीतयः स्मृताः ॥ ५६ ॥

अर्थ— अवर्षण, अतिवृष्टि, अग्निप्रलय, रोगानें धान्याचा नाश, महामारी, दरोडेखोर लोक आणि रोगाची साथ ह्या आठ भीति होत.

शाकिनीभूतवेतालरक्षःपन्नगवृश्चिकाः ॥
मूषकाः शलभाः कीरा इत्यष्टौ भीतिकारकाः ॥ ५७ ॥

अर्थ— शाकिनी, भूतें, वेताळ, राक्षस, सर्प, विंचू, उंदीर, टोळ आणि राघू ह्या आठ वस्तु भीति उत्पन्न करणाऱ्या आहेत.

अमात्यलक्षण

सुपूजायां महीपाले सर्वत्र सुखचिन्तकः ॥
परमनःस्थितं ज्ञानं ज्ञात्वा चरत्यमात्यकः ॥ ५८ ॥

अर्थ— सज्जनांचा सत्कार होण्याबद्दल, आपल्या राजाबद्दल आणि बाकीच्या सर्व कार्याबद्दल जो

संतोषानें विचार करतो आणि दुसऱ्याच्या मनांतील गोष्ट जाणून जो वागतो तो अमात्य होय.

मित्रलक्षण.

अमुत्रात्र हितंकारी धर्मबुद्धिप्रदायकः ॥
गुणवाची परोक्षेऽपि स सुहृत्कथितो बुधैः ॥ ५९ ॥

अर्थ— ह्या लोकीं आणि परलोकीं हित करणारा, धर्माविषयीं बुद्धि उत्पन्न करणारा, मागेंसुद्धां गुणांचेंच वर्णन करणारा असा जो पुरुष, त्याला पंडित लोक मित्र असें ह्मणतात.

कोशलक्षण.

धनधान्यसुवर्णानि वस्त्रशस्त्राणि भेषजम् ॥
रसा रत्नानि भूरीणि सन्ति कोश इति स्मृतः ॥ ६० ॥

अर्थ— द्रव्य, धान्य, सुवर्ण, वस्त्रें, औषधें, रसायनें आणि रत्नें हीं ज्यांत विपुल आहेत, त्याला कोश ( जामदारखाना ) असें ह्मणावें.

दुर्गलक्षण

वैषम्यं वारिणा पूर्णं सर्वधान्यास्त्रसंग्रहः ॥
तृणकाष्ठानि भृत्याश्च पलायनावकाशकम् ॥ ६१ ॥

उपला वह्नियन्त्राणि गुटीगोफणपङ्कसाः ॥
गूढमार्गाः प्रवर्तन्ते यत्र दुर्गः स उच्यते ॥ ६२ ॥

अर्थ— उंच सखल असे प्रदेश, भरपूर पाणी, सर्व प्रकारचीं धान्यें, गवत, लांकूड, अग्नि, चाकर मनुष्यें, पळण्याच्या वाटा, मोठमोठे दगड, अग्नियंत्रें, गोळे, गोफणी, दूध वगैरे पदार्थ आणि गुप्त मार्ग इतक्या गोष्टी जेथें आहेत त्याला दुर्ग ( किल्ला ) ह्मणावें.

राष्ट्रलक्षण.

पुरनगरगुग्रामाः खेटखर्वटपत्तनाः ॥
द्रोणाख्यं वाहनं यत्र सन्ति राष्ट्रः स उच्यते ॥ ६३ ॥

अर्थ— पुर, नगर, मोठीं गांवें, खेट, खर्वट, पत्तनें, द्रोण आणि वाहन हीं ज्यात आहेत त्याला राष्ट्र असें ह्मणावें.

ग्रामादिकाचें लक्षण.

ग्रामो वृत्त्या वृतः स्यान्नगरमुरुचतुर्गोपुरोद्भासिसालं ।
खेटं नद्यद्रिवेष्ट्यं परिवृतमभितः खर्वटं पर्वतेन ॥
ग्रामैर्युक्तं परं स्याद्दलितदशशतैः पत्तनं रत्नयोनि ।

द्रोणाख्यं सिन्धुवेलावलयवलयितं वाहनं चाद्रिरूढम् ॥ ६४ ॥

अर्थ— ज्याच्या भोंवत्यानें कुंपण असेल त्याला ग्राम किंवा गांव ह्मणावें. ज्या गांवाला मोठमोठ्या चार वेशी असतील त्याला नगर असें ह्मणावें. नदी आणि पर्वत ह्यांनीं वेढलेल्या गांवास खेट ह्मणावें. चोहींकडून पर्वतानें वेढलेल्या गांवास खर्वट ह्मणावें. ज्याच्या खालीं शेंकडो गांवें आहेत त्याला पुर ह्मणावें. ज्या ठिकाणी रत्नें उत्पन्न होतात त्या गांवास पत्तन ह्मणावें. समुद्रकिनाऱ्यानें वेढलेल्या गांवास द्रोण ह्मणावें. आणि पर्वतावर असलेल्या गांवास वाहन असें ह्मणावें.

चतुरंग सैन्य.

अञ्जनाद्रिसमा नागा वायुवेगास्तुरङ्गमाः ॥
रथाः स्वर्गविमानाभा भीमा भृत्याश्चतुर्बलम् ॥ ६५ ॥

अर्थ— काजळाच्या पर्वतासारखे हत्ती, वायूसारखा वेग असलेले घोडे, स्वर्गातील विमानासारखे सुशोभित रथ आणि भयंकर शिपाई ह्या चारींना बल असें ह्मणतात.

राजगुण

तेजस्वी शान्तरूपश्च त्यागी भोगी दयापरः ॥
बलिष्ठश्च रणे योद्धा प्रोक्तो राजा स पण्डितः ॥ ६६ ॥

अर्थ— राजा तेजस्वी, शांत आकृतीचा, उदार, संपत्तीचा उपभोग घेणारा, दयाळु, शक्तिमान्, रणांत युद्ध करणारा आणि विद्वान् असा असावा.

तीन शक्ति आणि तीन सिद्धि.

**तिस्रो मन्त्रप्रभूत्साहशक्तयश्च प्रकीर्तिताः ॥**
**वाङ्मनोदैवसिध्यन्ता नृपे तिस्रश्च सिद्धयः ॥ ६७ ॥**

अर्थ— प्रभुशक्ति ( राजाची शक्ति ), मंत्रशक्ति ( मसलती शक्ति ) आणि उत्साहशक्ति ( हुरूप असल्याची शक्ति ) ह्या तीन शक्ति आहेत. आणि वाणीची सिद्धि, मनाची सिद्धि आणि देवतेची सिद्धि ह्या तीन सिद्धि आहेत.

सहा गुण.

**षाड्गुण्यं नृपतौ प्रोक्तं राज्यरक्षणहेतवे ॥**
**सन्धिविग्रहयानासनाश्रयद्वैधभावनम् ॥ ६८ ॥**

अर्थ— तह करणें, युद्ध करणें, शत्रूची तयारी किती आहे हें समजण्याकरितां कांहीं तरी निमित्त काढून शत्रूच्या राज्यांत जाणें, कोठें तरी दबा धरून रहाणें, कोणाचा तरी आश्रय करणें आणि शत्रूच्या सैन्यांत फितुरी करणें हे सहा गुण राजाच्या ठिकाणीं आपल्या राज्याच्या रक्षणाकरितां अवश्य असले पाहिजेत.

चार उपाय व मंत्राचे ( मसलतीचे ) भेद.

समतादर्शनं स्वस्य ददेद्दानमरिं प्रति ॥
भेदः शत्रोश्च सेनाया दण्डः शत्रुनिपातनम् ॥ ६९ ॥
सहायाः साधनोपायो देशकालबलाबले ॥
विपत्तेश्च प्रतीकारः पञ्चधा मन्त्र इष्यते ॥ ७० ॥

अर्थ— समता ह्मणजे सर्वत्र समदृष्टी ठेवणें, दान ह्मणजे शत्रूला नजराणा पाठविणें, भेद ह्मणजे शत्रूच्या सैन्यांत फूट करणें, आणि दंड ह्मणजे शत्रूला मारणें हे चार उपाय होत. हे राजानें योग्य वेळीं योजिले पाहिजेत. आपल्याला सहाय कोण आहे? आपल्याजवळ साधन काय? उपाय कोणता योजला पाहिजे? देश आणि काळ हे आपल्याला अनुकूल आहेत किंवा प्रतिकूल आहेत, आणि आलेलें संकट कसें घालवावें ह्या प्रत्येकाचा विचार करणें हा पांच प्रकारचा मंत्र ( मसलत ) होय.

मुकुटबद्ध राजाचें लक्षण

अष्टादशाक्षौहिणीनां स्वामी मुकुटबन्धकः ॥
क्षोणीलक्ष्म ततो वक्ष्ये जिनागमानुसारतः ॥ ७१ ॥

अर्थ-- अठरा अक्षोहिणीचा जो स्वामी तो मुकुटबद्ध राजा होय. अक्षोहिणींचें लक्षण जिनागमाला

अनुसरून पुढें सांगतों.

सैन्याचे आठ भेद

पत्तिः सेना च सेनास्यं गुल्मो वाहिनिपृतने ॥
चमूरनीकिनी चेति चाष्टधा शृणु तद्विधिम् ॥ ७२ ॥

अर्थ— पत्ति, सेना, सेनामुख, गुल्म, वाहिनी, पृतना, चमू आणि अनीकिनी असे सैन्याचे आठ विभाग आहेत. त्यांची रचना पुढीलप्रमाणें आहे.

पत्तीचें लक्षण

एकविंशतिका अश्वाश्चतुरशीतिपादगाः ॥
गजो हस्ती रथश्चैकः पत्तिरित्यभिधीयते ॥ ७३ ॥

अर्थ— एकवीस घोडे, चवऱ्याऐंशी पायदळ, एक हत्ती आणि एक रथ एवढ्या सैन्याला पत्ति असें ह्मणतात.

सेना वगैरे भेदाचीं लक्षणें.

पत्तिस्त्रिगुणिता सेना तिस्रः सेनामुखं च ताः ॥
सेनामुखानि च त्रीणि गुल्ममित्यनुकीर्त्यते ॥ ७४ ॥

वाहिनी त्रीणि गुल्मानि पृतना वाहिनीत्रिकम् ॥
चमूस्त्रिपृतना ज्ञेया चमूत्रयमनीकिनी ॥ ७५ ॥
अनीकिन्यो दश प्रोक्ताः प्राज्ञैरक्षौहिणीति सा ॥
अष्टादशाक्षौहिणीपः प्रभुर्मुकुटवर्द्धनः ॥ ७६ ॥

अर्थ— तीन पत्ति ह्मणजे एक सेना. तीन सेना ह्मणजे एक सेनामुख. तीन सेनामुखें ह्मणजे एक गुल्म, तीन गुल्में ह्मणजे एक वाहिनी, तीन वाहिनी ह्मणजे एक पृतना, तीन पृतना ह्मणजे एक चमू, तीन चमू ह्मणजे एक अनीकिनी, आणि दश अनीकिनी ह्मणजे एक अक्षौहिणी होय. एका अक्षौहिणींत ४५९,२७० घोडे, १८,३७०८० पायदळ, २१८७० हत्ती, २१८७० रथ, सर्व मिळून २३४००९० इतकें सैन्य असतें. अशा अठरा अक्षौहिणींचा जो स्वामी तो मुकुटबद्ध राजा होय.

मुकुटबद्धराजाचें दुसरें लक्षण.

अथ मतान्तरम् ॥ एकमण्डलभू राजा श्रेण्यश्चाष्टादशाधिपः ॥
मुकुटबद्ध इत्याख्यः स एव मुनिभिः परः ॥ ७७ ॥

अर्थ— एक मंडलाचा अधिपति जो राजा तो अठरा श्रेणीचा अधिपति असल्यास तोच मुकुटबद्ध नांवाचा राजा समजावा, असें मुनींनी सांगितलें आहे. हें दुसरें मत आहे.

श्रेणुचीं नावें.

सेनापतिर्गणपतिर्वणिजां पतिश्च । सेना चतुष्कपुररक्षचतुःसुवर्णाः ॥
मन्त्रीश्वमात्यसुपुरोधमहास्वमात्याः । श्रेण्यो दशाष्टसहिता विबुधश्च वैद्यः ॥ ७८ ॥

अर्थ— सेनापति, ज्योतिषी, श्रेष्ठी, चार प्रकारच्या [ हत्ती, घोडे, पायदळ, रथ ] सेना, कोतवाल, ब्राह्मण वगैरे चार वर्ण, मंत्री, अमात्य, पुरोहित, महामात्य, पंडित आणि वैद्य यांना १८ श्रेणी असें ह्मणतात.

अधिराजा, महाराजा, अर्धमण्डल, मण्डली, अर्धचक्री आणि चक्री यांची लक्षणे.

एतत्पतिर्भवेद्राजा राज्ञां पञ्चशतानि यम् ॥
सेवन्ते सोऽधिराजस्स्यादस्माच्च द्विगुणो भवेत् ॥ ७९ ॥
महाराजस्ततश्चार्धमण्डली मण्डली ततः ॥
महामण्डल्यर्धचक्री ततश्चक्रीत्यनुक्रमात् ॥ ८० ॥

अर्थ— ह्या अठरा श्रेणींचा जो अधिपति तो राजा होय. अशा प्रकारचे पाचशेहे राजे ज्याची सेवा करितात, तो अधिराजा होय. अधिराजाच्या दुप्पट ज्याचें ऐश्वर्य असेल त्याला महाराजा ह्मणावें. त्याच्या दुप्पट असलेल्यास अर्धमंडली ह्मणतात. पुढें मंडली, महामण्डली, अर्धचक्री आणि चक्री असे भेद आहेत; ते दुपटी दुपटीचे आहेत असें समजावें.

चतुरशीतिर्लक्षाश्च मातङ्गाश्च रथास्तथा । अष्टादश सुकोट्योऽश्वा वायुवेगास्तुरङ्गमाः ॥ ८१ ॥ चतुरशीतिः सुकोट्यो यमदूताः पदातयः ॥ द्वात्रिंशत्सुसह-षण्णवतिसहस्राणि स्त्रीणां च गुणसम्पदाम् ॥ ८२ ॥ द्वात्रिंशत्सुसहस्राणि मुकुटबद्धभूभृताम् ॥ तावन्त्येव सहस्राणि देशानां सुनिवेशिनाम् ॥ ८३ ॥ नाटकानां सहस्राणि द्वात्रिंशत्प्रमितानि वै ॥ द्वासप्ततिसहस्राणि पुराणीन्द्रपुरश्रियाम् ॥ ८४ ॥ ग्रामकोट्यश्च विज्ञेया रम्याः षण्णतिप्रमाः ॥ द्रोणामुखसहस्राणि नवतिर्नव चैव हि ॥८५॥ पत्तनानां सहस्राणि चत्वारिंशदथाष्ट च ॥ षोडशैव सहस्राणि खेटानां गरिमा मता ॥८६ ॥ भवेयुरन्तरद्वीपाः षट्पञ्चाशत्प्रमामिताः ॥ संवाहनसहस्राणि संख्यातानि चतुर्दश ॥८७॥ स्थालीनां कोटिरेकोक्ता रन्धने या नियोजिता ॥ कोटीशतसहस्रं स्याद्धलानां कुलवैः समम् ॥ ८८ ॥ तिस्रोऽपि व्रजकोट्यः स्युर्गोकुलैः शश्वदाकुलाः ॥ कुक्षिवासशतानीह सप्तैवोक्तानि कोविदैः ॥ ८९ ॥ दुर्गाटवीसहस्राणि संख्याष्टाविंश-

तिर्मता ॥ म्लेच्छराजसहस्राणि रम्याष्टादशसंख्यया ॥ ९० ॥ कालाख्यश्च महाकालो माणवः पिङ्गलस्तथा ॥ नैसर्प्पः पद्मः पाण्डुश्च शङ्खश्च सर्वरत्नकः ॥ ९१ ॥ ॥ निधयो नव विख्याता वाञ्छितार्थफलप्रदाः ॥ भद्रेण परिणेतव्या देवाधिष्ठितशक्तयः ॥ ९२ ॥ भोग्यं भाण्डं च शस्त्रं च भूषणं देहवस्त्रकम् ॥ धनं वाद्यं बहुरत्नं ददते निधयः क्रमात् ॥ ९३ ॥ चक्रातपत्रदण्डासिमणयश्चर्म काकिणी ॥ चमूगृहपतीभाश्वयोपित्तक्षपुरोधसः ॥ ९४ ॥ रत्नानि निधयो देव्यः पुरं शय्यासने चमूः ॥ भाजनं वाहनं भोज्यं नाट्यं दशाङ्गभोगकाः ॥ ९५ ॥ गणबद्धामराणां तु सहस्राणि च षोडश ॥ इत्यादिविभवैर्युक्तश्चक्रवर्ती भवेद्भुवि ॥ ९६ ॥

अर्थ— आतां चक्रवर्तीची संपत्ति सांगतात— चवऱ्याऐंशी लक्ष हत्ती, तितकेच रथ, अठराकोटी चांगले घोडे, यमदूतासारखें भयंकर असें चवऱ्याऐंशी कोटी पायदळ, शाण्णव हजार सुंदर स्त्रिया, आपल्या ताब्यांत रहाणारे बत्तीस हजार मुकुटबद्ध राजे, चांगले व्यवस्थितरचनेचे बत्तीस हजार देश, बत्तीस हजार नाटकशाळा, अमरावतीप्रमाणे सुशोभित अशीं बहात्तर हजार पुरें, शाण्णव कोटी रम्य अशी गावें, नव्याण्णव हजार

द्रोणमुखें ( नौका ), अठ्ठेचाळीस हजार पत्तनें, सोळा हजार खेट, छप्पन्न अंतर्द्वीपें, चवदा हजार वाहनें, नेहमी स्वयंपाकास लागणारी एक कोटी भांडीं, शंभर हजार कोटी नागर आणि कुळव, ज्यांत गायी पुष्कळ आहेत असे तीन कोटी गौळवाडे, सातशेहे कुक्षिवास (?), अठ्ठावीस हजार किल्ले आणि अरण्यें, अठरा हजार म्लेंच्छ राजे; काल, महाकाल, माणव, पिंगल, नैसर्प, पद्म, पांडू, शंख आणि सर्वरत्न ह्या नांवाचे सर्व प्रकारचें इच्छित फल देणारे आणि त्या त्या निधींच्या देवतांनीं युक्त असल्यामुळें महापुण्यानें प्राप्त होणारे नऊ निधि, (ते क्रमानें– भोग्य पदार्थ, भांडीं, शस्त्रें, भूषणें, गृह, वस्त्रें, द्रव्य, वाद्यें आणि अनेकरत्नें– ह्या वस्तु देत असतात) चक्र, छत्र, दंड, खड्ग, रत्न, चर्म, काकिणी गृहपति, हत्ती, सेनापति, स्त्री, सुतार आणि पुरोहित हीं चवदा रत्नें; निधि, पट्टराण्या, पुर, शय्या, आसन, सैन्य, भांडीं, वाहन, भोज्यपदार्थ आणि नाट्य हे दहा प्रकारचे भोगपदार्थ, आणि सोळा हजार गणी असे देव, इतकें ऐश्वर्य ज्याचें असेल तो भूमीवरील चक्रवर्ती होय.

राजधर्म.

न्यायेन पालयेद्राज्यं प्रजां पालयति स्फुटम् ॥
यः स प्राप्नोति धर्मिष्ठः सदा राज्यमनागतम् ॥ ९७ ॥

अर्थ— जो राज्याचें नीतीनें पालन करतो आणि आपल्या प्रजेचें रक्षण करतो तो धार्मिक राजा,

आपलें नसलेलेंही राज्य मिळवितो.

इत्यतो न्यायमार्गेण हिताय स्वपरात्मने ॥
पालनीयं सदा राज्यं त्रिवर्गफलसाधनम् ॥ ९८ ॥

अर्थ— म्हणून आपल्या आणि दुसऱ्यांच्या कल्याणाकरितां धर्म, अर्थ आणि काम या तीन्ही पुरुषार्थांना प्राप्त करून देणारें राज्य राजानें सर्वदा नीतीनें रक्षण करावें.

सन्यासियोगिविप्रादीँस्तोषयेद्दानमात्रतः ॥
प्रतीत्य शपथैः सर्वाः प्रजा ग्रामं निवासयेत् ॥ ९९ ॥

अर्थ— संन्यासी, योगी आणि ब्राह्मण यांना दान देऊन तुष्ट करावें. आणि शपथेनें सर्वांना विश्वास उत्पन्न करून गांवें वसवावींत.

कर्णजपान् खलाँश्चोरान् परस्त्रीलंपटान्मदान् ॥
देशान्निर्वासयेद्राजा हिंसकान्मद्यपायिनः ॥ १०० ॥

अर्थ— चहाडी करणारे, दुष्ट, चोर, परस्त्रीलंपट, मत्त झालेले, हिंसा करणारे आणि मद्यपान करणारे अशा लोकांना राजानें आपल्या देशांतून हांकून द्यावें.

स्वदेशादागतं वित्तं यथापात्रं समर्पयेत् ॥

खञ्जं भट्टं नटं काणमन्धादीन्प्रतिपालयेत् ॥ १०१ ॥

अर्थ— आपल्या देशांतून वसूलाचें आलेलें द्रव्य राजानें योग्य पात्राला अर्पण करावें. लंगडा, भट्ट नट, काणा, अंधळा वगैरे लोकांचेंही त्या द्रव्यानें पालन करावें.

इत्यादि देशनं कृत्वा सन्ध्यायाः समये ततः ॥
गच्छेज्जिनालयं राजा सन्ध्यादिक क्रियां भजेत् ॥ १०२ ॥

अर्थ— वर सांगितलेल्या लंगडा वगैरे लोकांना रक्षण करण्याविषयीं आपल्या लोकांना देखील आज्ञा करून, संध्या करण्याच्या वेळीं राजानें जिनमंदिरांत जाऊन संध्या वगैरे नित्यक्रिया करावी. ह्याप्रमाणें क्षत्रियांचा आचार सांगितला.

### वैश्याचा आचार

वैश्यस्य सत्क्रियां प्रोचे पुराणस्यानुसारतः ॥
मषी कृषिः पाशुपाल्यं वाणिज्यं वैश्यकर्मणि ॥ १०३ ॥

अर्थ— आतां पुराणाला अनुसरून वैश्याचा सदाचार सांगतों, लिहिणें, शेतकी, पशुरक्षण आणि व्यापार ह्या चार क्रिया वैश्यकर्मांत मुख्य आहेत.

राजसेवां समाश्रित्य कुर्याद्देशस्य लेखनम् ॥

आयव्ययं कुलाचारं दत्तं भुक्तं नृपेण यत् ॥ १०४ ॥

अर्थ— राजाची नोकरी पतकरून वैश्यानें साऱ्या देशासंबंधानें जें लिहावयाचें असेल तें लिहावें. राजाची प्राप्ति ( वसूल ) किती आहे, खर्च किती आहे; राजाचा कुलाचार कसा आहे; राजानें कोणाला काय दिलें; तसेच स्वतःकरितां काय खर्च केलें; ह्या सर्व गोष्टी वैश्यानें लिहाव्यात.

व्ययं तु सदने स्वस्य वाऽऽदायं वा कतिप्रमम् ॥
द्रविणं कस्य किं दत्तं गृहीतं किं च कस्य वा ॥ १०५ ॥

अर्थ— तसेंच आपल्या घरांतील खर्च किती झाला, मिळकत किती झाली हें लिहावें. आणि आपण कोणाला किती द्रव्य दिलें, कोणापासून किती द्रव्य घेतलें हेंही लिहावें.

कति धान्यं कति द्रव्यं सुवर्णं वाऽथ गोधनम् ॥
भुक्तिभाण्डं च संलेख्यं यतो न संशयो भवेत् ॥ १०६ ॥

अर्थ— आपल्या घरात धान्य किती आहे, द्रव्य किती आहे, सोनें किती आहे, गायी म्हशी किती आहेत, भोजनाची भांडी किती आहेत, हें सर्व वैश्यानें लिहून ठेवावें. म्हणजे त्या योगानें संशय उत्पन्न होत नाहीं.

लञ्चं खुचं न गृण्हीयात् कूटलेखं च वर्जयेत् ॥

मायाशल्यं निदानं च क्रौर्यरागातिलोभताम् १०७ ॥

अर्थ— त्यानें, कोणी दिलेली लांच अथवा खुशाली घेऊं नये. कोणाचा खोटा लेख लिहूं नये; आणि मायाशल्य ( कपट ), निदान ( वाईट इच्छा ), क्रूरपणा, विषयावर प्रेम आणि अतिलोभ हे सोडावेत.

कृषिकर्म

किंकरं तु समाहूय दत्वा च वृषभान् परान् ॥
बीजधान्यं धनं वित्तं संस्कुर्यात् कृषिकर्म च ॥ १०८ ॥

अर्थ— वैश्यानें आपल्या चाकराला बोलावून आणून त्याजवळ चांगले बैल, बियांचें धान्य, कृषिकर्मास लागणारें साहित्य आणि द्रव्य हीं देऊन त्याजकडून शेतकी करवावी.

वैश्यानें स्वतः कृषि करण्याचा निषेध

व्रतधारी क्रियाकारी सामायिकी तपोरतः ॥
न कुर्यात् कर्षणं धर्मी भूरिजीवप्रघातकम् ॥ १०० ॥

अर्थ— व्रतें करणारा, नित्यनैमित्तिक क्रिया करणारा, सामायिक करणारा आणि तप करणारा अशा धार्मिक वैश्यानें कृषिकर्म करूं नये. कारण, त्यांत अनंत जीवांची प्राणहानि होते.

पशुपालन— गोमाहिषीतुरंगादीन् संगृह्य च व्ययेत्पुनः ॥

दधि दुग्धं घृतं तक्रं भव्यपात्राय दीयते ॥ ११० ॥
घृतस्य विक्रये दोषो नास्ति व्यापारवर्तिनः ॥
शेषं गव्यं न विक्रीन तृणाद्यैस्तर्पयेद्धनम् ॥ १११ ॥

अर्थ-- गायी, म्हशी, घोडे वगैरे जनावरांचा संग्रह करून त्यांचा विक्रयही करावा. दही, दूध, तूप आणि ताक हे पदार्थ भव्यपात्राला दान करावेत. व्यापार करणाऱ्या वैश्यानें तूप विकलें असता कांहीं दोष नाहीं. बाकीचे पदार्थ मात्र विकूं नयेत. आणि आपल्या गायी वगैरे जनावराचें गवत वगैरेंच्या योगानें पोषण करावें. हें वैश्याचें पशुपालन कर्म सांगितलें. पुढें वाणिज्य ( व्यापार ) कर्म सांगतात.

वाणिज्याचे तीन प्रकार

वाणिज्यं त्रिविधं प्रोक्तं पण्यं वृषभवाहनम् ॥
अब्धिनावादिकं चेति कुटुम्बपोषणाय वै ॥ ११२ ॥

अर्थ- वाणिज्य तीन प्रकारचें आहे. दुकान घालणें, बैलावरून माल परगांवी नेणें आणि समुद्रांतून नौकेतून माल नेणें, हें तीनही प्रकारचें वाणिज्य वैश्यानें आपल्या कुटुंबाच्या पोषणाकरितां करावें.

मोजमाप व ताजवा यांत कमीज्यास्त नसणें

गजयन्त्रे समानत्वं न्यूनाधिक्यविवर्जितम् ॥

अल्पलाभेन कर्तव्यं वस्त्रस्य विक्रयं मुदा ॥ ११३ ॥

अर्थ— गज नांवाचे वस्त्रें मोजण्याचें साधन व ताजवा हे अगदी बरोबर असावेत. त्यांत कमी जास्ती अगदी करूं नये. आणि वस्त्रें मात्र थोडासा नफा घेऊन संतोषानें विकावींत.

वर्षाकालातील व्यवहार

वर्षासु सूक्ष्मवस्त्रेषु जन्तूनां सम्भवो भवेत् ॥
तत्प्रतिलेखनं कार्यं श्रावकैर्धर्महेतवे ॥ ११४ ॥

अर्थ— पर्जन्यकालात बारीक कापडांत जीवजंतू होण्याचा संभव असतो, ह्मणून श्रावकानीं ती वस्त्रें वरचेवर झाडून ठेवावींत. ह्मणजे जीवहिंसा न होऊन धर्मरक्षण होईल.

विकत न घेण्याच्या वस्तु

रोमचर्मभवं वस्त्रं कौशीसं(?) रक्तवर्जितम् ॥
नीचगृहारनालेन संलिप्तं नैव विक्रयेत् ॥ ११५ ॥

अर्थ— लोंकरीचें वस्त्र, चामडीचें वस्त्र, न रंगविलेलें रेशमी वस्त्र आणि नीच मनुष्याच्या घरांतील काजीची खळ ज्याला लाविली आहे असें वस्त्र ही वस्त्रे वैश्यानें विकूं नयेत.

व्यापाराकरिता घेण्याच्या वस्तु

सूत्रं च पट्टसूत्रं च कार्पासं नैव दोषभाक् ॥
पट्टसूत्राण्डकौशाण्डे श्रावकैर्नैव गृह्यते ॥ ११६ ॥ (?)
सुवर्णं रजतं रत्नं गृह्णीयान्मौक्तिकं तथा ॥
कपटं तत्र नो कार्यं वह्निर्लेपादिसम्भवम् ॥ ११७ ॥

अर्थ— सोनें, रुपें, रत्नें आणि मोती हे पदार्थ आपण विकत घ्यावेत. आणि ते विकतांना त्यांच्यावर दुसरें कांहीं द्रव्य लावून त्यांना नसलेलें तेज आणून अशा रीतीनें लबाडी करून विकूं नयेत.

दुसऱ्याला न फसविणें.

कूटद्रव्यं स्वयं ज्ञात्वाऽज्ञानिनं नैव विक्रयेत् ॥
अतिवृद्धं तथा बालं मुग्धं भद्रं न धूर्तयेत् ॥ ११८ ॥

अर्थ— हा माल खोटा आहे असें आपल्याला समजल्यावर तें ज्याला माहीत नाहीं अशा मनुष्याला तो माल विकूं नये. अतिशय म्हातारा मनुष्य, लहान पोर, वेडा झालेला मनुष्य आणि संभावित मनुष्य यांना केव्हांही फसवूं नये.

अग्राह्य द्रव्य.

चोरद्रव्यं नृपद्रव्यं भूपालद्रोहिणस्तथा ॥

चेटीचेटकयोर्वित्तं न ग्राह्यं साधुभिर्जनैः ॥ ११९ ॥

अर्थ— चोराचे जिन्नस, राजाचे जिन्नस, राजद्रोही मनुष्याचे जिन्नस तसेच दास दासी ह्यांचे जिन्नस चांगल्या मनुष्यांनीं विकत घेऊं नयेत.

विस्मृतं पतितं गुप्तवृत्त्या दत्तं च केनचित् ॥
रक्षणे स्थापितं भूमौ क्षिप्तं वा नच गोपयेत् ॥ १२० ॥

अर्थ— कोणाचें विसरलेलें, कोणीं वाटेनें जात असता पडलेलें, कोणीं एकाद्यानें गुप्तपणें ठेवण्याकरितां दिलेलें, तसेंच आपल्याजवळ कोणीं एखाद्यानें रक्षणाकरितां ठेवलेलें आणि कोणीं एखाद्यानें भूमीत पुरून ठेवलेलें अशा प्रकारचें द्रव्य आपण गुप्तपणानें घेऊं नये.

वजनाचे खरेपणाबद्दल

तुलायां न्यायमार्गेण देशधर्मानुसारतः ॥
प्रस्तरादिषु मानेषु न्यूनाधिक्यं न कारयेत् ॥ १२१ ॥

अर्थ— जिन्नस वजन करण्याची तागडी आणि आपल्या देशांतील वहिवाटीप्रमाणें असलेलीं वजनें ह्यांत कमी जास्ती करूं नये.

न्यूनं दीयेत न क्वापि गृण्हीयान्नाधिकं कदा ॥

घृतं गुडादि तैलं च धान्यं तु न कदाचन ॥ १२२ ॥

अर्थ— तूप, गूळ, तेल वगैरे पदार्थ आपण लोकापासून विकत घेतांना जास्ती घेऊं नयेत. आणि दुसऱ्यांस देतांना कमी देऊं नयेत. तसेंच धान्यांत असा प्रकार केव्हाच करूं नये.

व्यापारास अयोग्य वस्तु

मधु च मधुपुष्पाणि कुसुम्भं धायपुष्पकम् ॥ आहिफेनं विषं क्षारं सूक्ष्मधान्यं तिलादिकम् ॥ १२३ ॥ घुणितं सकलं धान्य लाक्षां लोहं च साबुकम् ॥ लोहशस्त्राणि सर्वाणि जीर्णघृतं सतैलकम् ॥ १२४ ॥ पौस्तं माञ्जिष्ठकं क्षेत्रं कूपं जलप्रवाहजम् ॥ इक्षुयन्त्रं तैलयन्त्रं नावं च चर्मभाजनम् ॥ १२५ ॥ लशुनं शृङ्गबेरं च निशाक्षेत्रं च चालजम् ॥ कन्दं मूलं तथा चान्यदनन्तकायिकं परम् ॥ १२६ ॥ सिक्थं च नवनीतं च वनचाटीक्षुकाण्डकम् ॥ पत्राणि नागवल्याश्च वन्हिबाणस्य भेपजम् ॥ १२७॥ खेचरं रोम चर्मास्थि शृङ्गलं पादुकाढ्यम् ॥ मार्जनी च पदत्राणं हिंसोपकरणं परम् ॥ १२८ ॥ इत्यादिकमयोग्य च पूर्वग्रन्थे निषेधितम् ॥ तन्न ग्राह्यं वणिग्वर्यैर्धर्मरक्षणहेतवे ॥ १२९ ॥

अर्थ— मध, मोहाचीं फुलें, कुसुंबा, धायटीची फुलें, अफू, विषें, क्षार, तीळ वगैरे बारीक धान्यें, भाळ्या झालेलें कोणतेंही धान्य, लाक, लोखंड, साबुदाणे, लोखंडाचीं सर्व तऱ्हेची हत्यारें, जुनें तूप, जुनें तेल, पौस्त, मंजिष्टाची लागण केलेली जमीन, पाण्याचा आड, रहाटगाडगें, उंसाचा चरक, तेलाचा घाणा, नौका, चामड्याचे बुदले, लसूण, आलें, हळद लाविलेली जमीन, चाळज (?) कंद, मुळें दुसरे अनंत-कायिक पदार्थ, मेण, लोणी, बागबगीचा, उंसाची कांडी, नागवेलीची पानें, ज्वालाग्राही पदार्थ, (उडविण्याची दारू वगैरे) पारा, लोंकर, चर्म, हाडें, लोखंडाच्या साखळ्या, खडावा, केरसुणी, जोडे आणि हिंसेचीं दुसरी साधनें तसेंच मागें सागितलेले निषिद्ध व अयोग्य पदार्थ वैश्यांनीं घेऊं नयेत. हे पदार्थ विकत घेतल्यानें अहिंसाधर्माची हानी होते.

व्यापार करण्याला अयोग्य मनुष्ये

अजाघ्नगोघ्नमत्स्यघ्नाः कल्लालाश्चर्मकारकाः ॥
पापर्धिकः सुरापायी एतैर्वक्तुं न युज्यते ॥ १३० ॥

अर्थ— बकरी, गायी, मासे ह्यांना मरणारे लोक, कलाल, चांभार, पातकी आणि मद्यपान करणारे ह्या लोकांशीं भाषणसुद्धा करणें योग्य नाहीं.

एतान्किमपि नो देयं स्पर्शनीयं कदाऽपि न ॥

न तेषां वस्तुकं ग्राह्यं जनापवाददायकम् ॥ १३१ ॥

अर्थ— या वर सांगितलेल्या लोकांना आपण कांहीं देऊं नये. त्यांना स्पर्श करूं नये. आणि त्यांच्या जवळची कोणतीही वस्तु आपण घेऊं नये. कारण, त्यामुळें लोकांना अपवाद येतो.

रजको रञ्जकश्चैव भाडिभुञ्जातिलन्तुदौ ॥
चक्राग्निभस्मपाषाणचूर्णं न कारयेत्क्रियाम् ॥ १३२ ॥

अर्थ— परीट, रंगारी, भडभुंजे आणि तेली यांना त्यांनीं आपापलीं कामें करण्यास आपण उत्तेजन देऊं नये. गाडीनें चाक करणें, अग्नि पेटविणें, कोणत्याही वस्तूची राख करणें, आणि दगड फोडणें हीं कामें आपण कोणास करण्यास सांगूं नये. कारण, त्यात फार हिंसा होते.

विप्रक्षत्रियवैश्यैश्च स्पृश्यशूद्रैस्तथा सह ॥
व्यापारकरणं युक्तं नीचैर्नीचत्वमुद्भवेत् ॥ १३३ ॥

अर्थ— ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि स्पर्श करण्याला योग्य असे शूद्र यांच्याशीं व्यापार करावा. नीच मनुष्यांशीं व्यापार केल्यानें आपल्यालाही नीचपणा येतो.

स्पर्श करण्यास योग्य शूद्र.

काछिकमालिकौ कांस्यकनकलोहकारकाः ॥

सूत्रधारः सूचीधारः कुविन्दः कुम्भकारकः ॥ १३४ ॥
रङ्गकारः कुटुम्बी च भाडभुञ्जास्तिलन्तुदः ॥
ताम्बूली नापितश्चैव स्पृश्यशूद्राः प्रकीर्तिताः ॥ १३५ ॥

अर्थ— काछिक ( गवताच्या वगैरे बुथ्या करणारा ), माळी, तांबट, सोनार, लोहार, साळी, शिंपी, कोष्टी, कुंभार, रंगारी, कुणबी, भडभुंजा, तेली, तांबोळी आणि हजाम हे स्पर्श करण्यास योग्य अशा प्रकारचे शूद्र समाजावेत.

दुसऱ्या देशात व्यापार करण्याचा प्रकार

योग्यायोग्यमिदं दृष्ट्वा व्यापारः क्रियते बुधैः ॥
दूरदेशगमार्थं च वृषभं वाहयेन्नरः ॥ १३६ ॥
अल्पभारं परिक्षिप्य शनैः सञ्चालयेद्बुधः ॥
आहारोदकपूरेण यावत्तृप्ति तु पूरयेत् ॥ १३७ ॥
पृष्ठे शोफादिके जाते कृपया परिछेदयेत् ॥
उपशमो न यावन्न तावद्भारं न धारयेत् ॥ १३८ ॥

अर्थ— वरील जातीतही योग्यायोग्य विचार करूनच शहाण्यानें व्यापार करावा. व्यापाराकरिता

दूरदेशी जाण्याचें असल्यास तेलावरून माल न्यावा. तेलावर फार ओझें घालूं नये, आणि त्यें नावेतें, त्यांत पोंचणार जाग असावा. त्याच्या पाठीवर किंवा दुसरीकडे सून आल्यास दयाळूपणानें त्या जागी कापावें. आणि ती जागा चांगली बरी होईपर्यंत त्यावर ओझें घालूं नये.

नौकायान.

जलयाने सदाचारं रक्षेत्स्वमतिगोचरं ॥
कदाचित्कर्मयोगेन मग्ने चेत्संस्मरेज्जिनम् ॥ १३९ ॥

अर्थ— जलमार्गानें नौकेतून जाण्याचा प्रसंग आला असता आपल्या धर्माच्या रक्षणाकरिता सदाचार संभाळावा. कदाचित् दैवी कर्मयोगानें ती नौका बुडण्याचा प्रसंग येईल तर, श्रीजिनेंद्राचें स्मरण करावें

शूद्रकर्म.

व्यापारो वणिजां प्रोक्तः संक्षेपेण यथागमम् ॥
विप्रक्षत्रियवैश्यानां शूद्रास्तु सेवका मताः ॥ १४० ॥

अर्थ— हा वैश्यांना व्यवहार जिनागमांत सांगितल्याप्रमाणें संक्षेपानें सांगितला. आणि ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिघांचा सदाचारही सांगितला. शूद्रांना सेवा करणें हाच सदाचार आहे.

तेषु नानाविधं शिल्पं कर्म प्रोक्तं विशेषतः ॥

जीवदयां तु संरक्ष्य तैश्च कार्यं स्वकर्मकम् ॥ १४१ ॥

अर्थ— शूद्रांमध्यें अनेक प्रकारचें शिल्प करणें ही एक विशेष क्रिया आहे. ती क्रिया त्यांनी जीवदया संभाळून करावी.

व्यापारातील वर्तन

विप्रक्षत्रियविट्शूद्राः प्रोक्ताः क्रियाविशेषतः ॥
जैनधर्मे पराः शक्तास्ते सर्वे बान्धवोपमाः ॥ १४२ ॥
लाभालाभे समं चित्त रक्षणीयं नरोत्तमैः ॥
अतितृष्णा न कर्तव्या लक्ष्मीर्भाग्यानुसारिणी ॥ १४३ ॥

अर्थ— ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण त्यांच्या त्यांच्या क्रियाभेदामुळें सांगितले आहेत. हे चारी वर्ण जैन धर्म पाळण्याला योग्य असल्यानें त्या नात्यानें ते एकमेकाचे बंधूच आहेत असे समजावे. त्यांनी सर्वांनी लाभ किंवा हानी ह्याविषयीं अंतःकरण सम ठेवावे. आणि त्यांनी फार लोभ करूं नये. कारण, लक्ष्मी ही आपापल्या दैवानुसार प्राप्त होणारी आहे.

उद्यमेषु सदा सक्त आलस्यपरिवर्जितः ॥
सदाचारक्रियायुक्तो धनं प्राप्नोति कोटिशः ॥ १४४ ॥

अर्थ— जो आळस टाकून सर्वदा उद्योग करतो, आणि सदाचारानें युक्त असतो, त्याला कोट्यवधि द्रव्य प्राप्त होते. ही गोष्ट त्यांनीं लक्षांत ठेवावी.

सद्व्यापारे तथा धर्मे आलस्यं न हि सौख्यदम् ॥
उद्योगः शत्रुवन्मित्रमालस्यं मित्रवद्रिपुः ॥ १४५ ॥

अर्थ— सदाचार आणि धर्म ह्यांविषयीं आळस केल्यानें सुखप्राप्ति होत नाहीं. उद्योग हा शत्रूप्रमाणे भासणारा असा मित्र आहे. आणि आळस हा मित्राप्रमाणें भासणारा शत्रु आहे.

जिनस्मरणाचे विशेष प्रसंग

पीडायामद्भुते जृम्भे स्वेष्टार्थप्रक्रमे क्षुते ॥
शयनोत्थानयोः पादस्खलने संस्मरेज्जिनम् ॥ १४६ ॥

अर्थ— काहींतरी पीडा उत्पन्न झाली असतां, आपल्या इष्ट कार्याला आरंभ करण्याच्या वेळीं, शिंक आली असतां, निजणें आणि उठणें ह्या वेळीं, पाय अडखळला असतां, किंवा ठेंच लागली असतां, श्रीजिनेंद्राचें स्मरण करावें.

व्यवहारांत वागण्याची पद्धति

अश्रद्धेयमसत्यं च परनिन्दात्मशंसने ॥

मध्यसभं न भाषेत कल्युत्पादवचः सदा ॥ १४७ ॥
अर्थनाशं मनस्तापं गृहदुश्चरितानि च ॥
मानापमानयोर्वाक्यं न वाच्यं धूर्तसन्निधौ ॥ १४८ ॥

अर्थ— दुसरे लोक ज्यावर विश्वास ठेवणार नाहींत असें भाषण, खोटें भाषण, दुसऱ्याची निंदा आणि आपली स्तुति हे प्रकार सभेमध्यें करूं नयेत. तसेंच ज्यायोगानें भांडण उत्पन्न होईल असें भाषणही करूं नये. आपली द्रव्यहानी, मनाची पीडा, घरातील मंडळींचें दुर्वर्तन आणि आपला मान व अपमान या गोष्टी लुच्चा लोकाजवळ सांगूं नयेत.

सम्पत्तौ च विपत्तौ न समानित्तः सदा भवेत् ॥
स्तोकं कालोचितं ब्रूयाद्वचः सर्वहितं प्रियम् ॥ १४९ ॥
न्यायमार्गे सदा रक्तश्चोरबुद्धिविवर्जितः ॥
अन्यस्य चात्मनः शत्रुं भावात्प्रकाशयेन हि ॥ १५० ॥

अर्थ— संपत्ति आणि विपत्ति ह्या दोहोंविषयीं सर्वदा सारखी बुद्धि ठेवावी. लोकांत बोलण्याचा प्रसंग आला असता त्या प्रसंगाला योग्य असें थोडें आणि हितकर व प्रिय असें बोलावें. न्यायमार्गाविषयीं सर्वदा आसक्ति असावी. चोरण्याविषयींची बुद्धि टाकून द्यावी. कोणीही मनुष्य आपला किंवा

दुसऱ्याचा शत्रु आहे असें नुसत्या वाग्व्यापारांनींही दर्शवूं नये.

लोकाशीं वागण्याचा प्रकार

वैराग्यभावनाचित्तो धर्मोदेशवचो वदेत् ॥
लोकाकूतं समालोक्य चरेत्तदनुसारतः ॥ १५१ ॥
सत्त्वे मैत्री गुणे हर्षः समता दुर्जनेतरे ॥
कार्यार्थे गम्यते तस्य गेहं नोचेत्कदा च न ॥ १५२ ॥

अर्थ— अंतःकरणांत वैराग्यभावना करून लोकांना धार्मिक उपदेश करावा. लोकांचा अभिप्राय जाणून त्यांच्या अनुरोधानें वागावें. सर्व जीवांविषयीं मित्रभाव असावा. कोणाचेही ठिकाणीं सद्गुण दिसला असतां आनंद मानावा. चांगल्या किंवा वाईट मनुष्यांविषयीं सारखीच बुद्धि ठेवावी. आपल्या कामाकरितां कोणाच्याही घरीं जावें. काम नसल्यास उगीच जाऊं नये.

हिंसापापकरं वाक्यं शास्त्रं या नैव जल्पयेत् ॥
द्रोहस्य चिन्तनं क्वापि कस्यापि चिन्तयेन्न हि ॥ १५३ ॥

अर्थ— हिंसेचें पातक घडविणारें भाषण करूं नये. तसेंच शास्त्राची बडबड करूं नये. आणि कोणाचें वाईट होण्याबद्दल मनांत चिंतन केव्हांही करूं नये.

दारिद्र्यशोकरोगार्तांस्तोपयेद्भेपजादिना ॥
स्वस्य यदनिष्टं स्यात्तन्न कुर्यात्परे क्वचित् ॥ १५४ ॥

अर्थ— दारिद्र्य, शोक आणि रोग ह्यांनीं पीडित झालेल्या लोकांना औषध वगैरे देऊन संतुष्ट करावें. जें कृत्य लोकांनीं आपल्याबद्दल केलें असतां आपल्याला वाईट वाटतें, तसलें कृत्य दुसऱ्याबद्दल आपण करूं नये.

वस्त्रानें मुखाचें आच्छादन करण्याचे प्रसंग

समीपोक्तौ हासे श्वासे जृम्भे काशे क्षुते तथा ॥
धूमधूलिप्रवृत्तौ च छादयेद्वाससाऽऽननम् ॥ १५५ ॥

अर्थ— दुसऱ्याच्या जवळ जाऊन बोलावयाच्या वेळीं, हंसतांना, मोठ्यानें श्वास सोडतांना, जांभई देण्याच्या वेळीं, शिंक आली असतां आणि धुरांतून अथवा धुरळ्यांतून जावयाचें असतां, तोंड वस्त्रानें आच्छादित करावें.

निद्रेला अयोग्य स्थलें

कूपकण्ठे च वल्मीके चोरवेश्यासुराशिनाम् ॥
सन्निधौ मार्गमध्ये तु न स्वपेत्तु जलाशये ॥ १५६ ॥

अर्थ— आडाच्या तोंडाजवळ, वारुळाच्या शेजारी, चोर, वेश्या आणि मद्यपी ह्यांच्या शेजारी आणि जाण्यायेण्याच्या रस्त्यावर केव्हाही निजूं नये. तसेंच तळ्याच्या कांठावर निजूं नये.

नैको मार्गे व्रजेन्नैकः स्वपेत्क्षेत्रे शवान्तिके ॥
अविज्ञातोदके नैव प्रविशेद्वा गिरौ न हि ॥ १५७ ॥

अर्थ— एकट्यानें मार्गक्रमण करूं नये. शेतांत किंवा प्रेताच्या जवळ एकट्यानें निजूं नये. ज्या पाण्याची आपल्याला माहिती नाही त्या पाण्यांत एकट्यानें शिरूं नये. आणि पर्वतावर चढताना एकट्यानें चढूं नये.

दातृसेवा आणि शास्त्रचिंतन

दातारं पितृबुध्या च सेवेत क्षेमहेतवे ॥
पठितान्यपि शास्त्राणि पुनः पुनः प्रचिन्तयेत् ॥ १५८ ॥

अर्थ— आपला योगक्षेम चालण्याकरितां जो आपल्याला द्रव्य देतो, त्याची पित्याप्रमाणें सेवा करावी. एकनार पढलेल्या शास्त्राचा पुनः पुनः विचार करावा.

सूक्ष्मवस्तु तथा सूर्यं नैकदृष्ट्या विलोकयेत ॥
पादत्राणं विना मार्गे गच्छन्ने हि सुधार्मिकः ॥ १५९ ॥

अर्थ— सूक्ष्मवस्तु आणि सूर्य ह्याच्याकडे सारखी दृष्टी लावून पाहूं नये. पायांत पादत्राण ( जोडा ) घातल्यावांचून धार्मिक मनुष्यानें मार्गावरून चालूं नये.

इतर व्यवहार

मूर्खैः सह वदेन्नैव नोल्लङ्घयेद्गुरोर्वचः ॥
दुर्वाक्यं यदि वा मूर्खैर्दत्तं तन्महेत स्वयम् ॥ १६० ॥

अर्थ— मूर्खाशीं भाषण करूं नये. वडिलांच्या सांगण्याची अमर्यादा करूं नये. आणि दुर्जनांनीं वाईट बोललें असता तें आपण सोसावें.

व्यवहाराद्विवादे वा कालुष्यं नोद्वहेद्धृदि ॥
नाकारण हसेदास्यं नासारन्ध्रं न घर्षयेत् ॥ १६१ ॥

अर्थ— व्यवहारामुळें जर एखादे वेळीं काहीं भांडण झालें तर त्याबद्दल मनात चुरस धरूं नये. कारणावांचून हासूं नये. आणि वरचेवर तोंडावरून हात फिरविणें, नाकांत बोटें घालणें हे व्यापार करूं नयेत.

स्वकार्यं दृढीकृत्य वचनं निर्विकारतः ॥
वृथा तृणादि न छेद्यं नांगुल्याद्यैश्च वादनम् ॥ १६२ ॥

अर्थ— आपल्या कार्याचा मनांत दृढ निश्चय करून मनांत कोप वगैरे विकार न आणितां जें

बोलावयाचें असेल तेंच बोलावें. विनाकारण गवताच्या काड्या मोडणें व बोटांनीं आपल्याच अंगावर वाजविणें हे व्यापार करूं नयेत.

मात्रा पुत्र्या भगिन्या वा नैको रहसि जल्पयेत् ॥
आसने शयने स्थाने याने यत्नपरो भवेत् ॥ १६३ ॥

अर्थ— माता, कन्या अथवा भगिनी ह्यांच्याशीं सुद्धां एकांतीं बोलत बसूं नये. बसण्याची जागा, निजण्याची जागा आणि गाडी वगैरे वाहन ह्यांच्यावर चांगली देखरेख करावी.

जनावर वगैरेवर देखरेख ठेवणे

जीवधनं स्वयं पश्येत् समीपे कारयेत्कृषिम् ॥
वृद्धान् बालॉस्तथा क्षीणान् बान्धवान्परितोषयेत् ॥ १६४ ॥

अर्थ— गायी, बैल वगैरे जें जीवधन असेल तें स्वतः आपण पहावें. शेतकी करावयाची ती गांवाच्या जवळच करावी. आणि त्या योगानें वृद्ध लोक, लहान मुलें, शक्तिहीन झालेले लोक आणि आपले इष्टमित्र ह्यांचें पोषण करावें.

न ओलांडण्याच्या वस्तु.

जिनादिप्रतिमाया वा पूज्यस्यापि ध्वजस्य वा ॥

छायां नोल्लङ्घयेन्नीचच्छायां च स्पर्शयेत्तनुम् ॥ १६५ ॥

अर्थ— जिनादि प्रतिमा, किंवा पूज्य असे ध्वज यांच्या सांवलीचें देखील उल्लंघन करूं नये. आणि नीचलोकांच्या सांवलीचा आपल्या देहाला स्पर्श होऊं देऊं नये.

याचकाशीं व अपकार करणाऱ्याशीं वर्तन.

अदानाक्षेपवैमुख्यमर्थिजनेषु नाचरेत् ॥
अपकारिष्वपि जीवेषु ह्युपकारपरो भवेत् ॥ १६६ ॥

अर्थ— याचना करणाऱ्यांना न देणे, त्यांचा तिरस्कार करणें, किंवा त्यांना विमुख पाठविणें हे व्यवहार करूं नयेत. आपल्यावर अपकार करणाऱ्या जीवावर देखील उपकार करावेत.

सायंकालीं वर्ज करण्याचे व्यवहार

निद्रा स्त्रीभोगभुक्त्यध्वयानं सन्ध्यासु वर्जयेत् ॥
साधुजनैर्विवादं तु मूर्खैः प्रीतिं तु नाचरेत् ॥ १६७ ॥

अर्थ— निद्रा, स्त्रीसमागम, भोजन आणि मार्गक्रमण हे व्यवहार सायंकालच्या वेळीं करूं नयेत. सज्जनाबरोबर कलह करावा, परंतु दुर्जनांशी मैत्री करूं नये.

भोजन न करण्याचीं गृहें

छात्रागारे नृपागारे शत्रुवेश्यागृहे तथा ॥
क्रीतान्नसदने नीचार्चकागारे न भुञ्जयेत ॥ १६८ ॥

अर्थ— शिष्य, राजा, शत्रु, वेश्या ह्यांच्या घरांत आणि जेथें अन्नविक्रय करतात त्या घरांत (खाणावळींत) भोजन करूं नये. तसेंच नीच मनुष्याच्या आणि पूजकाच्या घरांतही भोजन करूं नये.

विश्वास न ठेवण्याच्या वस्तु

नखिनां च नदीनां च शृङ्गिणां शस्त्रपाणिनाम् ॥
वनितानां नृपाणां च चोराणां व्यभिचारिणाम् ॥ १६९ ॥
खलानां निन्दकानां च लोभिनां मद्यपायिनाम् ॥
विश्वासो नैव कर्तव्यो वञ्चकानां च पापिनाम् ॥ १७० ॥

अर्थ— नखांनी प्रहार करणारी जनावरें, नद्या, शिंगांनी मारणारी जनावरें, शस्त्र हातांत असलेले लोक, स्त्रिया, राजे, चोर, व्यभिचार करणारे लोक, दुष्ट लोक, निंदा करणारे लोक, लोभी, मद्यप, दुसऱ्यास फसविणारे (भामटे) आणि पातकी ह्यांच्यावर केव्हाही विश्वास ठेवूं नये.

इतर व्यवहार करून बाहेरून घरात येणें

मध्ये न पूज्ययोर्गच्छेन्न पृच्छेदप्रयोजनम् ॥

बहिर्देशात्समायातः स्नात्वाऽऽचम्य विशेद्गृहम् ॥ १७१ ॥

अर्थ— दोघे पूज्य गृहस्थ उभे राहिले असता त्यांच्या मधून आपण जाऊं नये. कारणावांचून कोणाला कांही विचारूं नये. बाहेरून आलें असता स्नान आणि आचमन करून नंतर घरांत जावें.

कोणत्याही कृत्याच्या आरंभींचें मंगल

आरम्भे तु पुराणस्यान्यव्यापारस्य कस्यचित् ॥
नमः सिद्धेभ्य इत्युच्चैर्नम्रीभूतो वदेद्वचः ॥ १७२ ॥

अर्थ— पुराण वाचण्यास प्रारंभ करण्याच्या पूर्वी, किंवा दुसरें कोणतेंही कृत्य आरंभ करण्याच्या पूर्वी नम्र होऊन " नमः सिद्धेभ्यः " असें उच्चारावें.

ऐहिकपारलौकिक दृष्टि

भुञ्जानोऽप्यैहिकं सौख्यं परलोकं विचिन्तयेत् ॥
स्तनमेकं पिबन्बालोऽन्यस्तनं मर्दयेद्भुवि ॥ १७३ ॥

अर्थ— ह्या लोकींचें सुख भोगीत असतांही मनुष्यानें पारलौकिक सुखाचा अवश्य विचार केला पाहिजे. लहान मूल देखील आईच्या एका स्तनाचें पान करीत असतांही दुसरा स्तन हातानें धरीत असतें; हें आपण पहात नाहीं काय?

कृत्वैवं लौकिकाचारं धर्मं विस्मारयेन्न हि ॥
सन्ध्यादिवन्दनां कुर्याद्दीपं प्रज्वलयेद्गृहे ॥ १७४ ॥

अर्थ— ह्याप्रमाणे लौकिक व्यवहार करीत असताही धार्मिक व्यवहाराचे विस्मरण होऊं नये. संध्यावंदन वेळच्या वेळीं करावें. घरात दीप लावावेत.

दीप आणि त्याच्या मुखाची दिशा

रवेरस्तं समारभ्य यावत्सूर्योदयो भवेत् ॥
यस्य तिष्ठेद्गृहे दीपस्तस्य नास्ति दरिद्रता ॥ १७५ ॥
आयुष्ये प्राङ्मुखो दीपो धनायोदङ्मुखो मतः ॥
प्रत्यङ्मुखोऽपि दुःखाय हानये दक्षिणामुखः ॥ १७६ ॥

अर्थ— सूर्याचा अस्त झाल्यापासून पुनः सूर्योदय होईपर्यंत ज्याच्या घरांत दीप असतो, त्याला केव्हांही दारिद्य येत नाही. दीप पूर्वेकडे तोंड करून ठेविला असतां आयुष्य वाढतें. उत्तरेकडे तोंड करून ठेविला असता द्रव्यप्राप्ति होते. पश्चिमेकडे तोंड करून ठेविला तर दुःख उत्पन्न होतें, आणि दक्षिणेकडे तोंड करून ठेविला असता नाश होतो.

चतुर्दिक्षु तु ते दीपाः स्थापिताः सन्ति चेद्गृहे ॥

शुभदास्तु ततो विश्वे न हि दोषस्तु कश्चन ॥ १७७ ॥

अर्थ— चारी दिशेकडे तोंड करून चार दीप लाविले असता ते शुभकारक होतात. त्यात वर सांगितलेला कसलाही दोष नाही.

इत्येवं कथितास्त्रिवर्णजनितो व्यापारलक्ष्म्यागमो ।
ये कुर्वन्ति नरा नरोत्तमगुणास्तं ते त्रिवर्गार्थिनः ॥
भोगानत्र परत्रजन्मनि सदा सौख्यं लभन्ते पर- ।
मन्ते कर्मरिपुं निहत्य विमलं मोक्षं व्रजन्त्यक्षयम् ॥ १७८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणे त्रैवर्णिकांचा धनप्राप्तीचा आचार सांगितला. धर्म, अर्थ आणि काम ह्या तीन पुरुषार्थांची इच्छा करणारे जे सज्जन हा आचार करतात, ते ह्या लोकीं अनेक सुखें भोगून परलोकींही सर्वदा सुख भोगितात. आणि शेवटीं कर्मरिपूचा नाश करून, निर्दोष आणि अविनाशी अशा मोक्षाला गमन करतात.

त्रिवर्णसल्लक्षणलक्षिताङ्गो । योऽभाणि चातुर्यकलानिवासः ॥
व्यापाररूपः स च सप्तमोऽसा- । वध्याय इष्टो मुनिसोमसेनैः ॥ १७९ ॥

अर्थ— त्रैवर्णिकांच्या सदाचारानें भरलेला आणि चातुर्य व कला ह्याचें वसतिस्थान असा हा सदाचारात्मक सातवा अध्याय सोमसेनमुनींनी निरूपण केला.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारकथने

भट्टारकश्रीसोमसेनविरचिते स्वस्वव्यापारकथनीयो

नाम सप्तमोऽध्यायः समाप्तः ॥

|| श्रीवीतरागाय नम ||

## || अष्टमोऽध्यायः ||

मगल

हरिवंशोदयपर्वतसूर्योऽजेयप्रतापपरिभाव्यः ||
जयति सदरिष्टनेमिस्त्रिभुवनराजीवकाल्हादी || १ ||

अर्थ— हरिवंशरूपी जो उदयपर्वत त्यावरील सूर्यच कीं काय! असा आणि अजिंक्य अशा प्रतापामुळें चितनीय असा आणि त्रिभुवनरूपी कमलाला आनंदित करणारा असा जो सत्पुरुष अरिष्टनेमि तो उत्कर्ष पावत आहे.

चन्द्रप्रभं जिनं वन्दे चन्द्राभं चन्द्रलाञ्छनम् ||
भव्यकुमुदिनीचन्द्रं लोकालोकविकाशकम् || २ ||

अर्थ— चद्राप्रमाणें ज्याची कांति आहे, चंद्र हेंच ज्याचें चिन्ह आहे, जो भव्यजीवरूपी कमलिनीला उल्लसित करीत आहे आणि लोकालोकात्मक अशा संपूर्ण विश्वाचें जो प्रकाशन करीत आहे अशा चंद्रप्रभ-जिनेंद्राला मी नमस्कार करतों.

अध्यायातील विषय

गर्भाधानादयो भव्यास्त्रिंशत्सुक्रिया मताः ॥
वक्ष्येऽधुना पुराणे तु याः प्रोक्ता गणिभिः पुरा ॥ ३ ॥

अर्थ— पूर्वी गणधरांनी पुराणात ज्या श्रावकांच्या तेहेत्तीस क्रिया सांगितलया आहेत, त्या कल्याणप्रद अशा गर्भाधान वगैरे क्रिया आतां सांगतों.

त्रयस्त्रिंशत्क्रिया

आधानं प्रीतिः सुप्रीतिर्धृतिर्मोदः प्रियोद्भवः ॥
नामकर्म वहिर्यानं निषद्या प्राशनं तथा ॥ ४ ॥
व्युष्टिश्च केशवापश्च लिपिसंस्थानसंग्रहः ॥
उपनीतिर्व्रतचर्या व्रतावतरणं तथा ॥ ५ ॥
विवाहो वर्णलाभश्च कुलचर्या गृहीशिता ॥
प्रशान्तिश्च गृहत्यागो दीक्षाद्य जिनरूपता ॥ ६ ॥
मृतकस्य च संस्कारो निर्वाणं पिण्डदानकम् ॥
श्राद्धं च सूतकद्वैतं प्रायश्चित्तं तथैव च ॥ ७ ॥

तीर्थयात्रेति कथिता द्वात्रिंशत्संख्यया क्रियाः ॥
त्रयस्त्रिंशच्च धर्मस्य देशनाख्या विशेषतः ॥ ८ ॥

अर्थ— १ गर्भाधान, २ प्रीति, ३ सुप्रीति, ४ धृति, ५ मोद, ६ प्रियोद्भव, ७ नामकर्म, ८ बहिर्यान, ९ निषद्या, १० अन्नप्राशन, ११ व्युष्टि, १२ केशवाप ( चूडाकरण ), १३ लिपिसंग्रह, १४ उपनयन, १५ व्रतचर्या, १६ व्रतावतरण, १७ विवाह, १८ वर्णलाभ, १९ कुलचर्या, २० गृहीशिता, २१ प्रशांति, २२ गृहत्याग, २३ दीक्षा, २४ जिनरूपता, २५ मृतसंस्कार, २६ निर्वाण, २७ पिंडदान, २८ श्राद्ध, २९ जननाशौच, ३० मृताशौच, ३१ प्रायश्चित्त आणि ३२ तीर्थयात्रा ह्या बत्तीस क्रिया, आणि ३३ धर्मदेशना ही तेहेत्तीसावी क्रिया होय. ह्या क्रिया पुढें विस्तारानें सांगतात.

### अथ गर्भाधानम्

ऋतुमती स्वहस्ते तु यावद्दिनचतुष्टयम् ॥
मल्लिकादिलतां धृत्वा तिष्ठेदेकान्तसद्मनि ॥ ९ ॥
चतुर्थे वासरे पञ्चगव्यैः संस्नापयेच्च ताम् ॥
हरिद्रादिकसत्कस्तुसुगन्धैरनुचर्चयेत् ॥ १० ॥

अर्थ— प्रथमतः ऋतुमती झालेल्या स्त्रीनें चार दिवसपर्यंत मोगरी वगैरेचा वेल आपल्या हातांत धरून

एकांतस्थलीं बसावें. मग चवथे दिवशीं तिला पंचगव्यानें स्नान घालावें. आणि हळद वगैरे मंगलद्रव्यें व सुगंधद्रव्यें यांचें तिच्या अंगाला लेपन करावें.

प्रथम दिवसींचे कृत्य

प्रथमर्तुमती नारी भवत्यत्र गृहाङ्गणे ॥
ब्रह्मस्थानात्पृथग्भागे कुण्डत्रयं प्रकल्पयेत् ॥ ११ ॥
पूर्ववत्पूजयेत्सूरिः प्रतिमां वेदिकास्थिताम् ॥
चक्रच्छत्रत्रयोपेतां यक्षयक्षीसमन्विताम् ॥ १२ ॥

अर्थ— स्त्री प्रथम ऋतुमती झाली म्हणजे घरांतील अंगणांत ब्रह्मस्थान सोडून दुसऱ्या जाग्यांत तीन कुंडें घालावींत. आणि उपाध्यायानें चक्रत्रय, छत्रत्रय, यक्ष यक्षिणी यांनीं युक्त असलेल्या वेदिकेवरील प्रतिमेचें पूर्वी सांगितल्याप्रमाणें पूजन करावें.

ततः कुण्डस्य प्राग्भागे हस्तमात्रं सुविस्तरम् ॥
चतुरस्रं परं रम्यं संस्कुर्याद्वेदिकाद्वयम् ॥ १३ ॥
पञ्चवर्णैस्ततस्तत्र संलिखेदग्निमण्डलम् ॥
अष्टदिशासु पद्माष्टं मध्ये कर्णिकया युतम् ॥ १४ ॥

अर्थ— मग कुंडाच्या पूर्वेकडे एक हात विस्ताराच्या चतुष्कोण अशा दोन वेदिका ( कट्टे ) कराव्यात. त्या प्रत्येकावर पांच रंगानी अग्निमंडल काढावें आणि त्यांवर अष्ट दिशांना मध्यें कर्णिकेनें युक्त अशी आठ कमलें काढावीत.

चवथ्या दिवशीचें कृत्य आणि गर्भाधानविधि

चतुर्थे वाऽह्नि सुस्नातौ जायापती निवेश्य च ॥
तत्र चालङ्कृतौ वृद्धस्त्रीभिश्च क्रियते क्रिया ॥ १५ ॥
मृदा संलिप्य सद्भूमिं निशाचूर्णैश्च तण्डुलैः ॥
तयोरग्रे लिखेद्यन्त्रं स्वस्तिकाकारमुत्तमम् ॥ १६ ॥
तत्र सपल्लवं कुम्भं मालावस्त्रसुसूत्रितम् ॥
स्थापयेन्मङ्गलार्थं तु सयन्त्रं विधिपूर्वकम् ॥ १७ ॥

अर्थ— मग चवथ्या दिवशी स्नान केलेल्या स्त्रीशी सहवर्तमान तिच्या पतीला वृद्ध सुवासिनी स्त्रियांकडून अलंकृत करवून त्या ठिकाणी आणून बसवावें. त्याच्या पुढच्या बाजूस जमीन मातीनें सारवून त्यावर तांदूळांचें व हळदीचें स्वस्तिकाच्या आकाराचें यंत्र काढून त्याच्यावर पंच पल्लव, माला, वस्त्र आणि सूत्र ह्यांनीं सुशोभित केलेला कलश पूजा करून मंगलाकरितां विधिपूर्वक स्थापन करावा.

आचार्यस्तं करे धृत्वा पुण्याहवचनैर्वरैः ॥
सिञ्चयेद्दम्पती तौ च पुण्यक्षेमार्थचिन्तकः ॥ १८ ॥

अर्थ— मग आचार्यानें तो कलश हातांत घेऊन " त्या दंपत्याचें कल्याण व्हावें, त्यांना पुण्य घडावें, त्यांना द्रव्यप्राप्ति व्हावी " अशा प्रकारचें मनांत चिंतन करून पुण्याहवाचनमंत्रांनी त्या दंपत्यावर कुंभांतील जलानें अभिषेक ( सेंचन ) करावा.

त्रिःपरीत्य ततो वह्निं तत्र चोपविशेत्पुनः ॥
सौभाग्यवनिताभिश्च कुङ्कुमैः परिचर्चयेत् ॥ १९ ॥
नीराजनां ततः कृत्वा वर्धयेच्च जलाक्षतैः ॥
वस्त्रताम्बूलभूषाभिः पूज्यौ तौ ताभिरादरात् ॥ २० ॥

अर्थ— अभिषेक झाल्यावर अग्नीला त्या दंपत्यानें तीन प्रदक्षिणा करून पुनः आपल्या पूर्वीच्या जाग्यावर येऊन बसावें. मग सुवासिनी स्त्रियांनीं त्यांना कुंकूं लावावें आणि त्यांना नीराजन (कुरवंडी) करून जलयुक्त अक्षतांनी त्यांची वृद्धी करावी. म्हणजे तुमची दोघांची वृद्धि होवो असें त्यांच्या मस्तकावर अक्षता टाकून म्हणावें. यावेळीं त्या स्त्रियांनीं त्या दंपत्याची वस्त्र तांबूल अलंकार या वस्तूंच्या योगानें प्रेमानें पूजा करावी.

वरवध्वो युवाभ्यां भो अस्मद्वंशोऽस्तु वृद्धिमान् ॥
इत्याशीर्वचनैस्तौ च सन्तोषाद्वा विसर्जयेत् ॥ २१ ॥

अर्थ— आणि हे वधूवरांनो! तुमच्या योगानें आमचा वंश वृद्धीला प्राप्त होवो अशा प्रकारचे आशीर्वाद देऊन त्या दंपत्यास संतोषानें तेथून घरांत पाठवावें.

स्वजातीयाँस्ततः सर्वानन्नदानैश्च तर्पयेत् ॥
सद्गन्धैः पूजयेत्प्रीत्या ताम्बूलाम्बरभूषणैः ॥ २२ ॥

अर्थ— नंतर अन्नदानानें सर्व स्वजातीयांची तृप्ती करावी. आणि सुवासिक गंध, तांबूल वस्त्रें भूषणें इत्यादिकांनी त्यांची संतोषानें पूजा करावी. ह्मणजे सत्कार करावा.

इत्यादिकविधिः कार्यः प्रथमर्तौ स्त्रियो गृहे ॥
ततः सन्तानवृद्धिः स्यात्केवलं धर्महेतुका ॥ २३ ॥

अर्थ— स्त्रीला प्रथम ऋतुदर्शन आपल्या घरीं झालें असतां अशा प्रकारचा विधि करावा. त्या योगानें धार्मिक अशा प्रकारच्या संततीची वृद्धि होते.

अथ स्त्रीसम्भोगः ।

स्वगृहे प्राक् शिरः कुर्याच्छ्वाशुरे दक्षिणामुखः ॥

प्रत्यङ्मुखः प्रवासे च न कदाचिदुदङ्मुखः ॥ २४ ॥

अर्थ— आतां स्त्रीसंभोगासंबंधानें विशेष विधि सांगतात. आपल्या घरीं पूर्वेकडे मस्तक करून शयन करावें. श्वसुराच्या घरी दक्षिणेकडे आणि मार्गात असतां पश्चिमेकडे मस्तक करून शयन करावें. उत्तरेकडे मस्तक करून केव्हांही निजूं नये.

शयनास अयोग्य स्थलें.

तृणे देवालये चैव पाषाणे चैव पल्लवे ॥
अङ्गणे द्वारदेशे तु मध्यभागे गृहस्य च ॥ २५ ॥
रिक्तभूमौ तथा लोष्टे पार्श्वे चोच्छिष्टसन्निधौ ॥
शून्यालये स्मशाने च वृक्षमूले चतुष्पथे ॥ २६ ॥
भूतस्थानेऽहिगेहे वा परस्त्रीचोरसन्निधौ ॥
कुलाचाररतो नित्यं न स्वपेच्छ्रावकः क्वचित् ॥ २७ ॥

अर्थ— गवतावर, देवालयांत, दगडावर, पाल्यावर, अंगणांत, दारांत, मध्यगृहांत, नुसत्या जमिनीवर, ढेकळावर, उष्ट्याच्या जवळ, ज्या घरांत कोणी नाहीं अशा घरांत, स्मशानांत, झाडाखालीं, चव्हाट्यावर, भूताच्या जाग्यांत, सर्पाच्या घरांत, परस्त्री किंवा चोर यांच्या सन्निध कुलाचार संभाळ-

णाऱ्या श्रावकानें कधींही शयन करूं नये.

स्त्रीसमागमाचा काल

ऋतुमत्यां तु भार्यायां तत्र सङ्गादिकं चरेत् ॥
अनृतुमत्यां भार्यायां न सङ्गमिति केचन ॥ २८ ॥

अर्थ— भार्या ऋतुमती असतांना तिच्याशीं समागम करावा. आणि ऋतुमती नसतांना करूं नये असें कित्येक आचार्यांचें ह्मणणें आहे. स्त्री रजस्वला झाल्यापासून सोळा दिवसपर्यंत तिला ऋतुमती असें ह्मणतात. त्यांत पहिले तीन दिवस टाकून राहिलेल्या तेरा दिवसांत ती ऋतुमती असल्यानें समागमाला योग्य आहे असें समजावें. आणि सोळा दिवसांच्या पुढें मात्र तिच्याशीं समागम करूं नये; असें तात्पर्य आहे.

गर्भाधानाङ्गभूतं यत्कर्म कुर्याद्दिवैव हि ॥
रात्रौ कुर्याद्विधानेन गर्भबीजस्य रोपणम् ॥ २९ ॥

अर्थ— गर्भाधान क्रियेच्या अंगभूत असलेलें कर्म दिवसां पूर्वी सांगितल्याप्रमाणें करावें. आणि मुख्य विधि पुढें सांगितल्याप्रमाणें रात्रीं करावा.

स्त्रीसमागमविधि.

मूत्रादिकं ततः कृत्वा क्षालयेत्त्रिफलाजलैः ॥
योनिं रात्रौ गते यामे सङ्गच्छेद्रतिमन्दिरम् ॥ ३० ॥

अर्थ— [ आतां ह्या पुढची क्रिया मराठी भाषेनें सांगणें शिष्टाचाराला अनुसरून जरी योग्य नाहीं, तथापि त्यांत कांहीं गोष्टी नेहमी व्यवहारांत उपयोगी पडण्यासारख्या असल्यानें केवल मराठी भाषाच ज्यांना समजते त्यांना त्या समजणें शक्य नसल्यानें, होईल तितक्या प्रकारानें मर्यादा न जाऊं देतां तेवढ्याच गोष्टी मराठींत लिहून बाकीच्या जशाच्या तशाच संस्कृतांत ठेवितों. ज्यांना तो धार्मिक विधि समजण्याची इच्छा असेल त्यानी संस्कृतज्ञाकडून समजून घ्यावा. ]

नंतर एक प्रहर रात्र संपल्यावर दुसऱ्या प्रहरांत स्त्रीनें मूत्रोत्सर्ग करून त्रिफलेच्या ( हिरडा, बेहेडा, अवळकाठी ह्यांना त्रिफला म्हणतात ) पाण्यानें जननेंद्रिय प्रक्षालन करावें, मग शयनमंदिरांत जावें.

पादौ प्रक्षालयेत्पूर्वं पश्चाच्छय्यां समाचरेत् ॥
मृदुशय्यां स्थितः शेते रिक्तशय्यां परित्यजेत् ॥ ३१ ॥

अर्थ— प्रथम पादप्रक्षालन करून नंतर शय्या करावी. ती शय्या मृदु असावी, खरखरीत असूं नये.

शय्येजवळ असावयाच्या वस्तु

उपानहौ वेणुदण्डमम्बुपात्रं तथैव च ॥

ताम्बूलादिसमस्तानि समीपे स्थापयेद्गृही ॥ ३२ ॥

अर्थ— निजावयाच्या ठिकाणीं पायांतील जोडे, वेळवाची कांठी, पाण्याचें भांडें आणि विड्याचें सामान इतके पदार्थ गृहस्थानें नेहमी जवळ ठेवावेत.

मंगलवस्तु

कुङ्कुमं चाञ्जनं चैव तथा हारीतसुन्दरम् ॥
धौतवस्त्रं च ताम्बूलं संयोगे च शुभावहम् ॥ ३३ ॥

अर्थ— केशर, काजळ, पिवळें रंगविलेलें सुंदर वस्त्र आणि विड्याचें सामान ह्या वस्तु स्त्रीसमागमकालीं मंगलकारक समजाव्यात.

भर्तुः पादौ नमस्कृत्य पश्चाच्छय्यां समाविशेत् ॥
सा नारी सुखमाप्नोति न भवेद्दुःखभाजनम् ॥ ३४ ॥

अर्थ— स्त्रीनें आपल्या पतीला नमस्कार करून मग शय्येवर जावें. असें करणारी स्त्री सुखी होते. केव्हांही दुःखी होत नाहीं.

स्वपेत् स्त्री प्राक् शिरः कृत्वा प्रत्यक्पादौ प्रसारयेत् ॥
ताम्बूलचर्वणं कृत्वा सकामो भार्यया सह ॥ ३५ ॥

चन्दनं चानुलिप्यांगे धृत्वा पुष्पाणि दम्पती ॥
परस्परं समालिंग्य प्रदीपे मैथुनं चरेत् ॥ ३६ ॥
दीपे नष्टे तु यः सङ्गं करोति मनुजो यदि ॥
यावज्जन्म दरिद्रत्वं लभते नात्र संशयः ॥ ३७ ॥
पादलग्नं तनुश्चैव ह्युच्छिष्टं ताडनं तथा ॥
कोपो रोषश्च निर्भर्त्सः संयोगे न च दोषभाक् ॥ ३८ ॥

अर्थ— ताम्बूल भक्षण करून स्त्रियेनें पूर्वेकडे मस्तक करून निजावें आणि पुरुषानेंही त्याचप्रमाणें निजावें. त्या दंपत्यानें एकमेकांस अंगाला चंदन लावून पुष्पमाला घालाव्यात. रतिकालीं दीप असावा. दीप नसतां स्त्रीसमागम करणारा मनुष्य जन्मभर दरिद्री होतो. रतिकालीं एकमेकास पाय लागला असतां व एकमेकांचें उच्छिष्ट भक्षण करणें, एकमेकांवर रागावणें, एकमेकांचा तिरस्कार करणें ह्यांत दोष नाहीं. इतर कालीं असें करणें दोषास्पद होतें.

ताम्बूलेन मुखं पूर्णं कुंकुमादिसमन्वितम् ॥
प्रीतमाल्हादसंयुक्तं कृत्वा योगं समाचरेत् ॥ ३९ ॥
विना ताम्बूवदनां नग्नामाक्रान्तरोदनाम् ॥

दुर्मुखां च क्षुधा युक्तां संयोगे च परित्यजेत् ॥ ४० ॥
भुक्तवानुपविष्टस्तु शय्यायामभिसम्मुखः ॥
संस्मृत्य परमात्मानं पत्न्या जघे प्रसारयेत् ॥ ४१ ॥
अलोमशां च सद्धुचामनार्द्रां सुमनोहराम् ॥
योनिं स्पृष्ट्वा जपेन्मन्त्रं पवित्रं पुत्रदायकम् ॥ ४२ ॥

अर्थ— स्त्रियेला तांबूल भक्षण करवून केशर वगैरे सुगंधि पदार्थांनी तिला प्रेमयुक्त करावें. जिच्या मुखांत तांबूल नाही अशी, नग्न, आक्रोश करणारी, रोदन करणारी, दुर्मुखलेली आणि क्षुधित झालेली अशी स्त्री समागमाला योग्य नव्हे स्त्रीसमागमाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें आपणही उपोषित असूं नये. स्त्रीसमागमकाली श्लोक ४२ यात सांगितलेली क्रिया करून पुढील पुत्रदायक मंत्र मुखानें ह्मणावा.

स्त्रीसमागमकालीं पठन करण्याचा मंत्र

ॐ ह्रीं क्लीं ब्लूं योनिस्थदेवते मम सत्पुत्रं जनयस्व अ सि आ उ सा स्वाहा ॥ १ ॥
इति मंत्रेण गोमयगोमूत्रक्षीरदधिसर्पिःकुशोदकैर्योनिं सम्प्रक्षाल्य श्रीगन्धकुंकुमकस्तूरिकाद्यनुलेपनं कुर्यात् ॥

योनिं पश्यन् जपेन्मन्त्रानर्हदादिसमुद्भवान् ॥

मादृशस्तु भवेत्पुत्र इति मत्वा स्मरेज्जिनम् ॥ ४३ ॥

अर्थ— वरील मंत्र म्हणून स्त्रियेच्या वरांगाला प्रक्षालन संस्कार करावा. आणि श्रीजिनेंद्राचें स्मरण करून आपल्यासारखा पुत्र उत्पन्न होईल अशी भावना करावी. तसेच पंच परमेष्ठीमंत्राचेंही स्मरण करावें.

ॐ ह्रां अर्हद्भ्यो नमः ॥ ॐ ह्रीं सिद्धेभ्यो नमः ॥ ॐ ह्रूं सूरिभ्यो नमः ॥
ओं ह्रौं पाठकेभ्यो नमः ॥ ॐ ह्रः सर्वसाधुभ्यो नमः ॥ इत्यादि स्मरेत् ॥
ॐ ह्रीं श्रीजिनप्रसादात् मम सत्पुत्रो भवतु स्वाहा ॥ इति स्मृत्वा स्त्रियमालिङ्गयेत् ॥

ओष्ठावाकर्षयेदोष्ठैरन्योन्यमवलोकयेत् ॥
स्तनौ धृत्वा तु पाणिभ्यामन्योन्यं चुम्बयेन्मुखम् ॥ ४४ ॥
गलं देहीति मन्त्रेण योन्यां शिश्नं प्रवेशयेत् ॥
योनेस्तु किंचिदधिकं भवेल्लिङ्गं बलान्वितम् ॥ ४५ ॥

ॐ ह्रीं शरीरस्थायिनो देवता मां बलं ददतु स्वाहा ॥ इति स्मृत्वा सम्बन्धयेत् ॥

सन्तुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च ॥
यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम् ॥ ४६ ॥
इच्छापूर्वं भवेद्यावदुभयोः कामयुक्तयोः ॥

रेतः सिञ्चेत्ततो योन्यां तस्माद्गर्भं बिभर्ति सा ॥ ४७ ॥

अर्थ— वर दोन मंत्र आलेले आहेत. त्यातील पहिल्या मंत्राचा उपयोग आलिंगनकाली करावा आणि दुसऱ्या (बलं ददतु स्वाहा) ह्या मंत्राचा उपयोग संभोगकाली करावा. संभोगाच्या पूर्वी स्त्रीला हर्षित आणि उत्तेजित करण्याकरितां जेवढे व्यापार करावयाचे असतात ते सर्व श्लोकांत वर्णन केले आहेत. त्या व्यापारांनी तिला उत्तेजित करून तिचा उपभोग केल्यानें तिचा संतोष होतो. ज्या समागमात स्त्रीच्या योगानें पुरुष आणि पुरुषाच्या योगानें स्त्री अशी उभयता संतुष्ट होतात, तो उच्च प्रतीचा समागम होय. असा स्त्रीपुरुषाचा संतोष ज्या कुलांत नेहमी त्या कुलांत सुखाची वृद्धि असते. आणि अशा समागमाच्या अंतीं जो बीजावाप होतो त्या योगानें स्त्री गर्भवती होते.

ऋतुकालीं स्त्रीसमागमाचें फळ

ऋतुकालोपगामी तु प्राप्नोति परमां गतिम् ॥
सत्कुलः प्रभवेत्पुत्रः पितॄणां स्वर्गदो मतः ॥ ४८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें ऋतुकाली जो स्त्रीसमागम करतो तो उत्तम गतीला प्राप्त होतो. आणि त्याच्यापासून कुलीन आणि आपल्या पितरांना स्वर्गप्राप्ती करून देणारा असा पुत्र उत्पन्न होतो.

ऋतुकालीं स्त्रीसमागम न केल्याचें फळ

ऋतुस्नातां तु यो भार्यां सन्निधौ नोपयच्छति ॥
घोरायां भ्रूणहत्यायां पितृभिः सह मज्जति ॥ ४९ ॥

अर्थ— ऋतुस्नात झालेल्या भार्येशीं जो पुरुष समागम करीत नाहीं, तो आपल्या पितरांशीं सह भयंकर अशा भ्रूणहत्या ( बालहत्या किंवा गर्भहत्या ) नामक पातकांत बुडून जातो.

ऋतुकाळीं स्त्रीने पुरुषसमागम न केल्यास त्याचे फल

ऋतुस्नाता तु या नारी पतिं नैवोपविन्दति ॥
शुनी वृकी शृगाली स्याच्छूकरी गर्दभी च सा ॥ ५० ॥

अर्थ— जी ऋतुस्नात झालेली स्त्री आपल्या पतीशी समागम करीत नाहीं, ती स्त्री कुत्री, लांडगी, कोल्हीण, डुकरीण किंवा गाढवीण होते.

कामयज्ञमिति प्राहुर्गृहिणां सर्वदैव च ॥
अनेन लभते पुत्रं संसारार्णवतारकम् ॥ ५१ ॥ इति गर्भाधानम् ॥

अर्थ— हा इतका गर्भाधानाचा जो विधि वर्णन केला झाला " गृहस्थांचा हा कामयज्ञ आहे " असें मुनि म्हणतात. ह्या विधीनें जो पुत्र प्राप्त होतो, तो आपल्या पितरांना संसारसमुद्रांतून तरून नेणारा होतो. हा गर्भाधानाचा विधि सांगितला.

मोदक्रिया.

गर्भे स्थिरेऽथ सञ्जाते मासे तृतीयके ध्रुवम् ॥
प्रमोदेनैव संस्कार्यः क्रियामुख्यः प्रमोदकः ॥ ५२ ॥

अर्थ— स्त्रीच्या उदरांत गर्भ स्थिर झाल्यावर तिसऱ्या महिन्यात त्या गर्भाचा प्रमोद नांवाचा संस्कार करावा. हा प्रमोद संस्कार सर्व संस्कारांत मुख्य आहे.

तृतीये गर्भसंस्कारो मासे पुंसवनं च सः
आद्यगर्भो न विज्ञातः प्रथमे मासि वै यदि ॥ ५३ ॥

अर्थ— प्रथमच गर्भवती झालेल्या स्त्रीचा गर्भ पहिल्या महिन्यांत जर ज्ञात झाला नाहीं, तर तिसऱ्या महिन्यांत त्याचा ( गर्भाचा ) संस्कार करावा. ह्मणजे त्या संस्कारानें गर्भिणीच्या उदरांतील गर्भ पुरुष चिन्हांनें युक्त होतो.

तैलाभ्यङ्गं जलैरादौ गर्भिणीं स्नापयेच्च ताम् ॥
अलङ्कृत्य च सद्वस्त्रैः करे फलं समर्पयेत् ॥ ५४ ॥
उपलेपं शरीरे तु संस्कुर्याच्चन्दनादिना ॥
पूर्ववद्धोमसत्कार्यं जिनपूजापुरःसरम् ॥ ५५ ॥

वेदिकाग्रे जिनागारे काष्ठनिर्मितपीठयोः ॥
दम्पती तौ च संस्कृत्य भूषणैरुपवेशयेत् ॥ ५६ ॥

अर्थ— प्रथम गर्भिणीला तेल लावून उष्णोदकानें स्नान घालावें. नंतर उत्तमवस्त्र तिला नेसावयास देऊन तिच्या हातांत फल द्यावें. तिच्या शरीराला चंदनादि सुगंधि द्रव्याचें चर्चन करावें. आणि जिनपूजा होम वगैरे विधि पूर्वीप्रमाणें करावा. प्रथम त्या दंपत्याला भूषणादिकांनीं अलंकृत करून जिनमंदिरांत जिनेंद्राच्या समोर पाटावर बसवावें.

अग्रे स्वस्तिकमालेख्यं चन्दनैस्तण्डुलैः पुरः ॥
पूर्ववत्कलशं रम्यं स्थापयेन्मन्त्रपूर्वकम् ॥ ५७ ॥
जिनेन्द्रसिद्धसूरींश्च पूजयेद्भक्तितः परान् ॥
बहुधा धूपदीपैश्च पक्वान्नैः सत्फलैरपि ॥ ५८ ॥
यक्षीयक्षादिदेवानां पूर्णाहुतिमतः परम् ॥
आचार्यः स्वकरे धृत्वा कल्याणकलशं वरम् ॥ ५९ ॥
पुण्याहवाचनैरम्यैर्गर्भिणीं ता प्रसिञ्चयेत ॥
शान्तिभक्तिं ततश्चोक्त्वा देवान् सर्वान् विसर्जयेत् ॥ ६० ॥

अर्थ— नंतर त्यांच्या अग्रभागी गंध आणि तांदुळ ह्यांच्या योगानें स्वस्तिक काढून त्यावर पूर्वी सांगितल्याप्रमाणें कलश स्थापन करावा. नंतर भक्तियुक्त अंतःकरणानें अनेक प्रकारचे धूप, दीप, उत्तम अन्नें, चांगली फळें ह्यांच्या योगानें जिनेंद्र सिद्ध आणि सूरि ह्याची पूजा करून, यक्ष यक्षी वगैरे देवतांना पूर्णाहुति द्यावी. नंतर आचार्यानें आपल्या हातांत तो कलश घेऊन, पुण्याहवाचनमंत्रांनीं त्या गर्भिणीला अभिषेक करावा. नंतर शांतिभक्तीचा पाठ करून सर्व देवतांचें विसर्जन करावें.

ततो गन्धोदकै रम्यैर्गर्भिणी स्वोदरं स्पृशेत् ॥
कलिकुण्डादि सद्यन्त्रं रक्षार्थं बन्धयेद्गले ॥ ६१ ॥
सौभाग्यवत्यः सन्नार्यश्चान्नादिना प्रतोषयेत् ॥
सुप्रमोदश्च सर्वेषां जातीनां समुत्पादयेत् ॥ ६२ ॥

ॐ कं ठं व्हः पः अ सि आ उ सा गर्भार्भकं प्रमोदेन परिरक्षत स्वाहा ॥ १ ॥ इति होमान्ते गन्धोदकेन प्रासिञ्च्य स्वपत्न्युदरं स्वयं स्पृशेद्भर्ता ॥ इति मोदः ॥

अर्थ— नंतर गर्भिणीनें आपल्या उदाराला गंधोदक लावावें. आणि तिच्या गळ्यांत गर्भाच्या रक्षणाकरितां कलिकुंडादि यंत्र बांधावें. सुवासिनी स्त्रियांना त्या दिवशीं अन्नदान करून संतुष्ट करावें. आपल्या सर्व जीतिबांधवानाही आनंदित करावें. “ ॐ कं ठं ” इत्यादि मंत्रानें गर्भिणीच्या पतीनें स्त्रीच्या उदरावर

गंधोदकानें सेचन करून त्याला स्पर्श करावा. हा प्रमोद संस्कार सांगितला.

पुंसवनक्रिया

सद्गर्भस्याथ पुष्टयर्थं क्रियां पुंसवनाभिधाम् ॥
कुर्वन्तु पञ्चमे मासि पुमांसः क्षेममिच्छवः ॥ ६३ ॥
शुचिभिः सलिलैः स्नातो धौतवस्त्रसमन्वितः ॥
स्वभार्यायां क्रियाः कुर्यादाचार्योक्तिन आदरात् ॥ ६४ ॥
जिनपूजां च होमं च गृहे कुर्यात्स पूर्ववत् ॥
आचार्यैः कुलवृद्धाभिः स्त्रीभिः सह सुमार्गगः ॥ ६५ ॥
संस्नाप्य गर्भिणीं तां तु भूपयेद्वस्त्रभूपणैः ॥
उपलेपादिकं कुर्याचन्दनादिसुवस्तुभिः ॥ ६६ ॥
काष्ठपीठे जिनाग्रे तु रक्तवस्त्रप्रच्छादिते ॥
सिन्दूराञ्जनसंयुक्तां गर्भिणीं तां निवेशयेत् ॥ ६७ ॥
पुण्याहवाचनैः सूरिः सन्मन्त्रैस्तां प्रसिञ्चयेत् ॥
पुरुषेण करे तस्याः पूगीपत्राणि दीयन्ते ॥ ६८ ॥

यवाङ्कुरैस्तथा पुष्पैः पल्लवैर्दर्भसंयुतैः ॥
मालां कृत्वा तु कण्ठेऽस्या अर्पयेद्विधिपूर्वकम् ॥ ७९ ॥
यक्षादीनां तु पूर्णार्घं दत्वा शान्तिं पठेद्बुधः ॥
ताम्बूलादिफलैर्वस्त्रैर्विप्रादींस्तोषयेद्गुरुः ॥ ७० ॥

ॐ झं वं ह्रवीं क्ष्वीं हं सः कान्तागले यवमालां क्षिपामि झ्रौं स्वाहा ॥ अनेन कण्ठे मालां क्षिपेत् ॥ ॥ ॐ झं वं व्हः पः हः अ सि आ उ सा कान्तापुरतः पायस दध्योदनहरिद्राम्बुकलशान् स्थापयामि स्वाहा ॥ ॥ अनेन तस्या अग्रे पायसदध्योदनहरिद्राम्बुकलशान् स्थाप्य बालिकाकरेण स्पर्शयेत् ॥ तत्र पायसस्पर्शे पुत्रलाभः । दध्योदनस्पर्शे पुत्रीलाभः ॥ हरिद्राम्बुकलशस्पर्शे उभयोरलाभः ॥

ततः प्रभृति गेहे स्वे वाद्यघोषं प्रघोषयेत् ॥
गीतं च नर्तकीनृत्यं दानं कुर्याद्दीन प्रति ॥ ७१ ॥ इति पुंसवनम् ॥

अर्थ— आतां पुंसवनक्रिया सांगतात— पुढें पाचव्या महिन्यांत त्या गर्भाच्या पोषणाकरितां पुंसवन नावाची क्रिया पतीनें करावी. पतीनें आपण शुद्ध उदकानें स्नान करून धौतवस्त्र परिधान करावें, आणि आचार्य सांगतील त्याप्रमाणें पुंसवन क्रिया प्रेमानें करावी. ह्या क्रियेंत करण्याची जिनपूजा आणि

होम हे विधि पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच करावेत. आचार्यानें त्या गर्भिणीला सुवासिनी अशा वृध्द स्त्रियांकडून मंगलस्नान घालवून वस्त्रभूपणादिकांच्या योगानें सुशोभित करवून, आणि चंदनादि सुगंधि-द्रव्यांनी तिच्या शरीराला लेपन करवून, तांबड्या वस्त्रानें आच्छादित केलेल्या पाटावर तिला आणून बसवावें. त्या गर्भिणीला सिंदूर आणि काजळ लावलेलें असावें. मग आचार्यानें ( उपाध्यायानें ) पुण्याहवाचन मंत्रांनीं तिच्या मस्तकावर कुंभजलानें सेचन करावें. आणि पतीकडून तिला तांबूल देववावा. मग जवाचे अंकुर, फुलें, कोंवळीं पानें आणि दर्भ ह्याची माला करवून पतीकडून तिच्या कंठांत घालवावी. नंतर यक्षादिदेवतांना पूर्णार्घ्य देऊन आचार्यानें शांतिपाठ करावा. त्यावेळीं त्या ठिकाणीं असलेल्या ब्राह्मण वगैरे मंडळींना तांबूल, फल, वस्त्र वगैरे देऊन संतुष्ट करावें. "ॐ झं वं" इत्यादि मंत्रानें गर्भिणीच्या कंठांत यवमाला घालावी. नंतर "झं वं व्हः" इत्यादि मंत्रानें तिच्या अग्रभागी क्षीर, दध्योदन ( दहींभात ) आणि हरिद्राम्बु ( हळदीचें पाणी ) ह्या पदार्थांनीं भरलेलीं तीन पात्रें किंवा तीन कलश ठेवावेत. आणि एखाद्या लहान मुलीला त्यांतील कोणत्याही वस्तूस स्पर्श करण्यास सांगावें. त्या मुलीनें जर पायसाला ( क्षीरीला ) स्पर्श केला तर गर्भिणीला पुत्र होणार असें समजावें. दध्योदनाला स्पर्श केल्यास कन्या होईल असें समजावें. आणि हळदीच्या पाण्याला स्पर्श केल्यास दोनीही होणार नाहींत असें समजावें. म्हणजे अपत्य झाल्यास नपुंसक होईल, किंवा मरून उपजेल, अथवा उपजल्याबरोबर

मरेल असें समजावें. त्या दिवसापासून गर्भिणीच्या पतीनें आपल्या घरात नेहमीं मंगल वांद्यें वाजवावींत गायन करावें, नर्तकी स्त्रियांकडून नृत्य करवावें. आणि दीन अनाथ अशा लोकाना दान करावें. ही पुंसवन क्रिया सांगितली.

सीमन्तविधि.

अथ सप्तमके मासे सीमन्तविधिरुच्यते ॥
केशमध्ये तु गर्भिण्या सीमा सीमन्तमुच्यते ॥ ७२ ॥
शुभेऽन्हि शुभनक्षत्रे सुवारे शुभयोगके ॥
सुलग्ने सुघटिकायां सीमन्तविधिमाचरेत् ॥ ७३ ॥

अर्थ— आतां सीमंतसंस्कार सांगतात— गर्भिणीला सातवा महिना लागला म्हणजे त्यांत सीमंतविधि करावा. गर्भिणीच्या केशांत सीमंत ( भांग ) काढणें याला सीमंतविधि म्हणतात. तो विधि शुभदिवशीं शुभवारीं शुभयोग असतांना शुभलग्नावर आणि शुभमुहूर्तावर करावा.

स्नातां प्रसादितां कान्तामन्तर्वत्नीं च सत्प्रियाम् ॥
प्रत्यगासनगां कृत्वा होमं प्राग्वत्प्रकल्पयेत् ॥ ७४ ॥
पतिपुत्रवती वृद्धा स्वजातीया कुलोद्भवा ॥

गर्भिण्याः केशमध्ये तु सीमन्तं त्रिः समुन्नयेत् ॥ ७५ ॥

अर्थ— स्नान घालून वस्त्रालंकारांनी सुशोभित केलेल्या गर्भिणीला आपल्या जवळ निराळ्या आसनावर बसवून पतीनें जिनपूजा होम वगैरे क्रिया पूर्वींप्रमाणेंच करावी. नंतर सभर्तृक, पुत्रवती आणि कुलीन, अशा स्वजातींतील वृद्धस्त्रियेकडून गर्भिणीच्या केशांच्या मध्यभागीं तीन वेळ भांग काढवावा.

साधनं फलवद्गुच्छद्वयदर्भत्रयान्विता ॥
शलाका खादिराऽऽज्याक्ता सीमन्तोन्नयने भवेत् ॥ ७६ ॥
समिद्धा कुड्मलाभाग्रा शमीवृक्षसमुद्भवा ॥
त्रिस्थानधवलाकारा शलली वा तथा भवेत् ॥ ७७ ॥
तेन तैलार्द्रसिन्दूरैः सीमन्तं चोन्नयेच्च सा ॥
धवस्त्वौदुम्बरं चूर्णं क्षिपेत्तन्मूर्ध्नि चोदरे ॥ ७८ ॥
उदुम्बरकृतां मालां सीमन्तिन्या गले गुरुः ॥
क्षिप्त्वा स्विष्टकृताद्यन्यत्सर्वं प्राग्वत्प्रकल्पयेत् ॥ ७९ ॥

अर्थ— गर्भिणीचा जो सीमंत काढावयाचा त्याला साधन फळें असलेल्या दोन डहाळ्या आणि तीन दर्भ एकत्र करून घ्यावेत; आणि त्यानें भांग काढावा. किंवा खैराची काडी तूपात बुडवून तिनें काढावा.

अथवा शमीची समिधा अगर तीन ठिकाणीं पांढरें असलेलें शालिंद्राचें पंख घेऊन त्यानें सीमंत काढावा. सीमंत काढतांना ज्यानें सीमंत काढावयाचा असेल त्याच्या अग्राला तेलात खललेला सिंदूर लावावा. आणि मग तसल्या काडीनें सीमंत काढावा. मग गर्भिणीच्या पतीनें तिच्या मस्तकावर आणि उदरावर उंबराच्या सालीचें चूर्ण टाकावें. आचार्यानें उंबरांच्या फळांची केलेली माला तिच्या गळ्यांत घालावी. नंतर राहिलेला बाकीचा पूजा वगैरे विधि पूर्वीप्रमाणें करावा.

अथ मन्त्रः ॥ पुण्याहवाचनैराचार्यो गर्भिणीं सिञ्चयेत् ॥ ॐ ऱ्हीं श्रीं क्लीं क्रौं अ सि आ उ सा उदुम्बरकृतचूर्णं समस्ते जठरे चेयं क्ष्वीं क्ष्वीं स्वाहा ॥ अनेनोदरं वा मस्तकं वा उदुम्बरचूर्णेन सेचयेत् ॥

ॐ नमोऽर्हते भगवते उदुम्बरफलाभरणेन बहुपुत्रा भवितुमर्हा स्वाहा ॥

अनेनोदुम्बरफलमालां कण्ठे क्षिपेत पुरुषः ॥ इति सीमन्तविधिः ॥

अर्थ— पुण्याहवाचन मंत्रांनी आचार्यानें गर्भिणीच्या मस्तकावर कुंभजलानें सेचन करावें. नंतर, 'ॐ ऱ्हीं श्रीं' इत्यादि मंत्रानें गर्भिणीच्या पतीनें तिच्या मस्तकावर किंवा उदरावर उंबराच्या सालीचें चूर्ण सिंपडावें. मग 'ॐ नमो' इत्यादि मंत्रानें आचार्यानें तिच्या गळ्यात उंबरांच्या फळाची माला घालावी. हा सीमंतविधि सांगितला.

वरील विधीमन्त्रवार्ने विशेष शास्त्रार्थ

अथ विशेषः ॥ गर्भाधानं प्रमोदश्च सीमन्तः पुंसवं तथा ॥
नवमे मासि चैकत्र कुर्यात्सर्वं तु निर्धनः ॥ ८० ॥
अन्नप्राशनपर्यन्ता गर्भाधानादिकाः क्रियाः ॥
उक्तकाले भवन्त्येता दोषो नाषाढपुष्ययोः ॥ ८१ ॥
मासप्रयुक्तकार्येषु अस्तत्वं गुरुशुक्रयोः ॥
न दोषकृत्तदा मासो रक्षको बलवानिति ॥ ८२ ॥
पुंसवने च सीमन्ते चौलोपनयने तथा ॥
गर्भाधाने प्रमोदे च नान्दीमङ्गलमाचरेत् ॥ ८३ ॥

अर्थ— गर्भाधान, प्रमोद, सीमंत आणि पुंसवन हे संस्कार निरनिराळे करण्यास जर दारिद्र्यामुळें शक्ति नसेल तर नवव्या महिन्यांत एकदमच करावेत. गर्भाधानापासून अन्नप्राशनापर्यंतच्या क्रिया प्राप्त झालेल्या त्या त्या कालीं होत असतात. ह्मणून आषाढ आणि पौष ह्या महिन्यासंबंधी दोष त्यांना लागत नाहींत. ह्मणजे ह्या दोन्ही महिन्यांची अडचण त्या क्रियांना लागू नाहीं. अमक्या महिन्यांत अमकें कृत्य करावें असें ज्या संबंधानें शास्त्रांत सांगितलें आहे, त्या कृत्यांस 'मासप्रयुक्त क्रिया' ह्मणतात. ह्या क्रिया

करावयाच्या प्रसंगीं गुरु किंवा शुक्र यांचा अस्त असला तरी हरकत नाहीं. कारण, त्या क्रिया करण्याला उक्त असलेला महिना हा त्यांचा मुख्य काल आहे. आणि तो मुख्य कालच कोणत्यांही क्रियांना अवश्यक असल्यानें तो इतर दोषांचा नाश करतो. पुंसवन, सीमंत, चौल, उपनयन, गर्भाधान आणि प्रमोद या संस्कारांत नांदीमंगल अवश्य करावें.

गर्भिणीचे धर्म

अथ गर्भिणीधर्माः ॥

भूम्यां चैवोच्चनीचायामारोहणविरोहणे ॥
नदीप्रतरणं चैव शकटारोहणं तथा ॥ ८४ ॥
उग्रौषधं तथा क्षारं मैथुनं भारवाहनम् ॥
कृते पुंसवने चैव गर्भिणी परिवर्जयेत् ॥ ८५ ॥

अर्थ— गर्भिणी स्त्रीचे धर्म सांगतात— गर्भिणी स्त्रीनें उंचसखल भूमीवर चढणें उतरणें, नदी तरून जाणें, गाडींत बसणें, तालीम औषध घेणें, खारट पदार्थ खाणें, मैथुन, ओझें वाहणें या गोष्टी पुंसवन संस्कार झाल्यापासून वर्ज कराव्यात.

गर्भिणीच्या पतीचे धर्म

अथ पतिधर्माः ॥

पुंसो भार्या गर्भिणी यस्य चासौ । सूनोश्चौलं क्षौरकर्मात्मनश्च ॥
गेहारम्भं स्तम्भसंस्थापनं च । वृद्धिस्थानं दूरयात्रां न कुर्यात् ॥ ८६ ॥

अर्थ — आतां गर्भिणीच्या पतीचे धर्म सांगतात– ज्या पुरुषाची भार्या गर्भवती असेल त्यानें आपलें आणि आपल्या पुत्राचे क्षौर (हजामत) करूं नये. नवें घर बांधण्यास प्रारंभ करूं नये. नवा खांब उभा करूं नये. आणि दूर देशांतराला जाऊं नये.

शवस्य वाहनं तस्य दहनं सिन्धुदर्शनम् ॥
पर्वतारोहणं चैव न कुर्याद्गर्भिणीपतिः ॥ ८७ ॥
मासात्तु पञ्चमादूर्ध्वं तस्याः सङ्गं विवर्जयेत् ॥
ऋतुद्वये व्यतीते तु न कुर्यान्मौञ्जीबन्धनम् ॥ ८८ ॥
गर्भिण्यामपि भर्यायां वीर्यपातं विवर्जयेत् ॥
अष्ट मासात्परं चैव न कुर्याच्छ्राद्धभोजनम् ॥ ८९ ॥
क्षौरं चौलं मौञ्जिबन्धं वर्जयेद्गर्भिणीपतिः ॥
भिन्नभार्यासुतस्येह न दोषश्चौलकर्मणि ॥ ९० ॥

अर्थ— तसेंच गर्भिणीपतीने प्रेतवाहन, समुद्रदर्शन आणि पर्वतावर चढणें हे व्यापार करूं नयेत. त्यानें पांचव्या महिन्यापासून तिच्याशी समागम करू नये. तिला चार महिने झाल्यावर त्यानें आपल्या पुत्राचें उपनयन करूं नये. आपली भार्या गर्भिणी आहे असें समजल्यापासून तिचा समागम वर्ज करावा. तिला आठवा महिना लागल्यावर पतीनें श्राद्धभोजन करूं नये. आपलें क्षौर, मुलांचे चौल व उपनयन हे दोन संस्कार त्यानें करूं नयेत. हे संस्कार जी स्त्री गर्भिणी आहे तिलाच दुसरा मुलगा असल्यास त्याचे करूं नयेत. आणि ज्या पुरुषास दोन भार्या असतील त्यानें जी स्त्री गर्भवती नाहीं तिच्या मुलाचा चौल संस्कार करावयाचा असल्यास तो करण्यास हरकत नाहीं तात्पर्य, ज्या मुलाचा चौल करावयाचा आहे त्याची जननी गर्भवती नसली ह्मणजे त्या मुलाचा तो संस्कार बापानें करण्यास हरकत नाहीं.

प्रीति, सुप्रीति आणि प्रियोद्भव

पुत्रजन्मनि सञ्जाते प्रीतिसुप्रीतिके क्रिये ॥
प्रियोद्भवश्च सोत्साहः कर्तव्यो जातकर्मणि ॥ ९१ ॥
सज्जनेषु परा प्रीतिः पुत्रे सुप्रीतिरुच्यते ॥
प्रियोद्भवश्च देवेपूत्साहस्तु क्रियते महान् ॥ ९२ ॥

अर्थ— पुत्राचें जन्म झाले असतां प्रीति, सुप्रीति आणि प्रियोद्भव ह्या क्रिया त्याच्या जातकर्मात कराव्यात. त्यांत पुत्रजन्म ऐकून सज्जनाविषयी जो आदर उत्पन्न होतो त्याला प्रीतिक्रिया ह्मणतात. पुत्राविषयी जी प्रीति ती सुप्रीतिक्रिया होय. आणि पुत्रजन्माच्या निमित्तानें जो देवांचा उत्साह करणें त्याला प्रियोद्भव क्रिया ह्मणतात. [ ह्या ठिकाणी प्रीति, सुप्रीति आणि प्रियोद्भव ह्या तीन क्रियांचें जें स्वरूप सांगितलें आहे, तें इतरत्र कोठे मिळत नाही. उलट श्रीजिनसेनाचार्यांनी महापुराणांत ह्या तीन क्रिया पत्नी गर्भिणी असतांनाच करावयास सांगितल्या आहेत. आणि त्यांचा विधीही अगदी निराळा आहे. असो, ह्या ठिकाणी आह्मांस मूलांत जसें आहे, त्याप्रमाणें लिहावयाचें असल्यानें अधिक विचार करण्याचें कारण नाही. ]

पुत्रजन्मप्रयुक्तक्रिया व नालच्छेदनविधि

पुत्रे जाते पिता तस्य कुर्यादाचमनं मुदा ॥ प्राणायामं विधायोच्चैराचमं पुनराचरेत् ॥ ९३ ॥ पूजावस्तूनि चादाय मङ्गल कलशं तथा ॥ महावाद्यस्य निर्घोषं व्रजेद्धर्मजिनालये ॥ ९४ ॥ ततः प्रारभ्य ? आहूय सद्विप्रान् जिनालये नियोजयेत् ॥ प्रतिदिनं स पूजार्थं यावन्नालं प्रच्छेदयेत् ॥ ९५ ॥ दानेन तर्पयेत्सर्वान् भट्टान् भिक्षुजनान् पिता ॥ वस्त्रभूषण-

ताम्बूलैः स्वजनात् सकलानपि ॥ ९६ ॥ मुखमालोक्य पुत्रस्य पात्रे क्षीराज्यशर्कराः ॥ समिश्र्य पञ्चकृत्वस्तं प्राशयेत्काञ्चनेन सः ॥ ॥ ९७ ॥ स्त्रीपुत्रयोश्च कर्मैवं कर्तव्यं द्रव्यमात्रकम् ॥ ब्रह्मसूत्रे धृतं नालं तेनावेष्ट्य निकृन्तयेत् ॥ ९८ ॥

अर्थ— पुत्र उत्पन्न झाल्याबरोबर त्याच्या पित्यानें आनंदानें आचमन करून प्राणायाम करावा. आणि पुनः आचमन करावें. नंतर सर्वपूजासाहित्य आणि मंगल कलश घेऊन मंगलवाद्याचा घोष करीत जिनमंदिरांत जावें. मग सदाचारसंपन्न अशा उपाध्यायाना बोलावून आणून श्रीजिनेंद्राची नित्य पूजा करण्याकरितां त्यांची योजना करावी. हा सर्व प्रकार नालच्छेदनाच्या पूर्वी करावा. सर्व ब्राह्मणांना आणि यतींना दानाच्या योगानें संतुष्ट करावें. आणि इतर लोकांना वस्त्रें, अलंकार, तांबूल, यांच्या योगानें संतोषित करावें. नंतर पुत्राचें मुख अवलोकन करून, एका पात्रांत दूध, तूप आणि साखर हे पदार्थ एकत्र मिश्रण करून, ते सुवर्णाच्या लहान पळीनें किंवा सोन्याच्या पात्रानें मुलाच्या मुखांत पांच वेळ घालावेत. हा विधि कन्येलाही करावा. पण त्यात मंत्रपाठ करूं नये. मग त्या मुलाचें नालच्छेदन करावें. तें ब्रह्मसूत्रानें नालास वेष्टन करून करावें.

ततस्तन्नाभिनालं तु शुचिस्थाने निवेशयेत् ॥

रत्नमुक्ताफलद्रव्यैर्युक्तं भूमौ मुदा पिता ॥ ९९ ॥

अर्थ— नंतर ते नाभिनाल त्या कुमाराच्या पित्यानें शुद्ध जाग्यांत मोतीं आणि रत्नें यांशी सहवर्तमान पुरावें.

पुत्रजन्मापासून दहा दिवसांतील विधि

प्रसूतौ वनिताऽगारे चतुरङ्गुलमात्रकम् ॥
त्यक्त्वा मृदं मृदा शुच्या गोमयेन तु लेपयेत् ॥ १०० ॥
पञ्चकल्कजलैरुष्णैः सा संस्नायात्सुतान्विता ॥
तौ तृतीये तृतीयेऽन्हि शुचित्वमेवमाचरेताम् ॥ १०१ ॥
वस्त्रभूषणशय्याश्च भोग्यभोजनपात्रकम् ॥
क्षालयेच्छुचिभिस्तोयैः रजकेन यथाविधि ॥ १०२ ॥
जन्मादिपञ्चमे षष्ठे निशीथे बलिमाहरेत् ॥
अर्चयेदष्टदिक्पालान्गीतवाद्यसशास्त्रकैः ॥ १०३ ॥
कृत्वा जागरणं रात्रौ दीपैश्च शान्तिपाठकैः ॥
द्वारे द्वितीयभागे तु सिन्दूरैश्चापि कज्जलैः ॥ १०४ ॥

अर्थ— भार्या ज्या जागीं प्रसूत झाली असेल त्या जागेवर चार बोटें माती टाकून त्यावर माती आणि शेण ह्यांनीं सारवून घ्यावें. मग पाच प्रकारचें कल्क ज्यात मिसळले आहे अशा उष्णोदकानें बाळंतिणीनें त्या मुलासह स्नान करावें. असें स्नान पुढें तीन तीन दिवसांनीं शुद्धीकरितां करावें. बाळंतिणीनीं वस्त्रें, अलंकार, अंथरूण, पांघरूण, जेवणाची भांडीं वगैरे सर्व वस्तु शुद्ध जलानें परटाकडून धुववावींत. मुलाचें जन्म झाल्या दिवसापासून पाचव्या आणि सहाव्या दिवशी रात्रीं अष्टदिक्पालांची पूजा करून त्यांना बलि-दान करावें. गीतवाद्याचा घोष करावा. रात्रीं जागरण करावें, दीप लावावेत. आणि शांतिपाठ करावेत.

जननाशौचाची मर्यादा.

प्रसूतेर्दशमे चान्हि द्वादशे वा चतुर्दशे ॥
सूतकाशौचशुद्धिः स्याद्विप्रादीनां यथाक्रमम ॥ १०५ ॥
प्रसूतिगृहे मासैकं दायादानां गृहेषु च ॥
दशादिनावधिं यावन्न गच्छेद्भुक्तये यतिः ॥ १०६ ॥

अर्थ— प्रसूतिदिनापासून दहाव्या दिवशीं ब्राह्मणाचें जननाशौच निवृत्त होतें. बाराव्या दिवशीं क्षत्रियाचें आणि चवदाव्या दिवशी वैश्याचें जननाशौच जातें. ज्या घरात स्त्री प्रसूत झाली असेल त्या घरांत यतीनें एक महिनापर्यंत भोजन करूं नये. त्याच्या भाईबंदांच्या घरीं दहा दिवस भोजन करूं नये.

पञ्च दिनानि चेटीनां सूतके परिकीर्तितम् ॥
स्वामिगृहे प्रसूताश्चेत्कोदकीनां तथैव च ॥ १०७ ॥
उष्ट्री गौर्महिषी छागी प्रसूता चेद्गृहे यदा ॥
दिनमेकं परित्याज्यं बहिश्चेन्न हि दोषभाक् ॥ १०८ ॥

अर्थ—पुष्कळदासी दासी आपल्या मालकाच्या घरात प्रसूत झाली असतां तें घर पांच दिवस अशुद्ध समजावें. त्याप्रमाणें घोडी पाणक्षी यांसही तसेंच समजावें. उंटीण गाय, म्हैस आणि शेळी हीं जनावरें घरात व्याली असतां तें घर एक दिवस अशुद्ध समजावें. आणि बाहेर व्याली असतां अशुद्ध समजण्याचें कारण नाहीं.

सूतकांती शुद्धि

भाजनानि मृदां यानि पुराणानि तु सन्त्यजेत् ॥
धातुभाण्डानि वस्त्राणि क्षालनाच्छुचितां नयेत् ॥ १०९ ॥
दशान्तु प्रथमे दानं षष्ठे वा सप्तमेऽपि वा ॥
दशमे देवपूजा स्यादन्नदानं तथा बलिः ॥ ११० ॥

जातकर्म.

ॐ ऱ्हीं श्रीं क्लीं ऱ्हौ ऱ्हूं ऱ्हः. नानानुजानुप्रजो भवभव अ सि आ उ सा स्वाहा ॥ १ ॥

अनेन पुत्रमुखमवलोकयेत् ॥

ततश्चैत्यालये पूजाहोमादिकं विधाय तद्गन्धोदकेन स्त्रीपुत्रौ गृहं प्रसिञ्च्य स्वजनान् भोजयेत् ॥ इति जातकर्म ॥

अर्थ— अशौच संपले ह्मणजे अशौचांत स्पर्श केलेलीं मातीचीं जीं जुनीं भांडीं असतील तीं टाकून द्यावींत. धातूचीं जीं भांडीं असतील तीं धुवून घ्यावींत. प्रथम दिवशीं, सहाव्या दिवशीं आणि पाचव्या दिवशीं जननाशौचांत दान करतां येतें. दहाव्या दिवशीं जननाशौचाची समाप्ति होत असल्यानें त्या दिवशीं देवपूजा, अन्नदान व बलिदान करावें. पूर्वी जें पुत्रमुखावलोकन सांगितलें आहे तें "ॐ ऱ्हीं श्रीं" इत्यादि मंत्रानें करावें. अशौच समाप्ति झाल्यावर चैत्यालयांत पूजा होम करून त्या गंधोदकानें स्त्रीपुत्रांना प्रोक्षण करावें, आणि तें गंधोदक घरांत सिंपडावें. नंतर आपल्या स्वजातीयांना भोजन घालावें. हा जातकर्माचा विधि सांगितला.

नामकर्मविधि

द्वादशे षोडशे विंशे द्वात्रिंशे दिवसेऽपि वा ॥ नामकर्म स्वजातीनां
कर्तव्यं पूर्वमार्गतः ॥ १११ ॥ द्वात्रिंशद्दिवसादूर्ध्वं यावत्संवत्सरं भवेत् ॥

नामकर्म तदा कार्यमिति कैश्चिदुदीरितम् ॥ ११२ ॥ कृत्वा होमं जिनेन्द्रार्चां शुभेऽन्हि श्रीजिनालये ॥ स्वगृहे वा ततो भक्त्या महावाद्यानि घोपयेत् ॥११३॥ सुपीठे दम्पती तौ च ससुतौ भूपणान्वितौ ॥ निवेश्य सेचयेत्सूरिः पुण्याहवचनैः परैः ॥ ११४ ॥ जातके नामके चैव ह्यन्नप्राशनकर्मणि ॥ व्रतरोपे च चौले च पत्नीपुत्रौ स्वदक्षिणे ॥११५॥ गर्भाधाने पुंसवने सीमन्तोन्नयने तथा ॥ वधूप्रवेशने शूद्रीपुनर्विवाहमण्डने ॥ ११६ ॥ पूजने कुलदेव्याश्च कन्यादाने तथैव च ॥ कर्मस्वेतेपु वै भार्यां दक्षिणे तूपवेशयेत् ॥ ११७ ॥ कन्यापुत्रविवाहे तु मुनिदानेऽर्चने तथा ॥ आशीर्वादाभिपेके च प्रतिष्ठादिमहोत्सवे ॥ ११८ ॥ वापीकूपतडाकानां वनवाट्याश्च पूजने ॥ शान्तिके पौष्टिके कार्ये पत्नी तूत्तरतो भवेत् ॥ ११९ ॥

अर्थ— आतां नामकर्मविधि सांगतात— पुत्र उत्पन्न झाल्या दिवसापासून बाराव्या सोळाव्या विसाव्या अथवा बत्तीसाव्या दिवशी त्याचें नामकर्म (नाव ठेवणें) आपल्या पूर्वीच्या रूढीस अनुसरून करावें. बत्तीसाव्या दिवसापुढें जर नामकर्म करावयाचें राहिलें तर मुलाला एक वर्ष होईपर्यंत केव्हांही किंवा वर्ष

ज्या दिवशीं पूर्ण होईल त्या दिवशीं नामकर्म करावें; असें कित्येकांचें ह्मणणें आहे. "शुभ" दिवशीं जिनालयात किंवा आपल्या घरांत होम, जिनपूजा वगैरे करून मंगलवाद्याचा घोष करवावा. आणि पुत्रांशीं सहवर्तमान त्या दंपत्याला चांगल्या आसनावर वसवुन उपाध्यायानें मंगलकलशातील उदकानें त्यांच्यावर पुण्याहवाचन मंत्रानीं सेचन करावें. जातकर्म, नामकर्म, अन्नप्राशन, व्रतग्रहण आणि चौल ह्या कर्मांत पत्नी आणि पुत्र ह्यास कर्त्यांच्या उजव्या अंगास बसवावें. तसेंच, गर्भाधान, पुंसवन, सीमन्तोन्नयन, वधूप्रवेश, शूद्रीचा पुनर्विवाह, कुलदेवतेचें पूजन, कन्यादान ह्या कर्मांतही स्त्रीला पतीच्या उजव्या अंगास बसवावें. कन्या अथवा पुत्र ह्यांच्या विवाहांत, मुनीला दान करतांना, आशीर्वाद ग्रहण करताना, अभिषेकाच्या वेळीं बिंबप्रतिष्ठा वगैरे महोत्सवात; विहीर, आड, तळें ह्यांच्या पूजनाचें समयीं, वनवाटीचे पूजनाचे प्रसंगीं आणि शांतिक पौष्टिक कर्मांत पत्नीनें पतीच्या डाव्या अंगास बसावें.

निश्छिद्रे निस्तुषे ताले शिशोः प्रस्तीर्य तत्पिता ॥

( निस्तुषानक्षतांस्ताले शिशोः प्रस्तीर्य वै पिता । इति पाठः साधुः ॥ )

निजनाम लिखेत्तत्र स्वाभीष्टं जन्मनाम च ॥ १२० ॥ क्षीरसर्पिर्युते पात्रे निधाय भूषणानि वै ॥ तत्ताले पूर्वताले च गन्धपुष्पकुशान् क्षिपेत् ॥ १२१ ॥ मस्तके कर्णयोः कण्ठे भुजयुग्मे च वक्षसि ॥ साज्यं पयः कुशैः सिक्त्वा भूषणैर्भूषये-

च्छिशुभम् ॥ १२२ ॥ अष्टोत्तरसहस्रेण नामभिर्यो विराजते ॥ स देवोऽस्मै कुमाराय शुभं नाम प्रयच्छतु ॥ १२३ ॥ इति सम्प्रार्थ्य देवं तं त्रिवारं च द्विजैः सह ॥ यदायाति स तन्नाम घोषयित्वा नमेज्जिनम् ॥ १२४ ॥ पूर्णार्घं यक्षदेवानां दत्वा कर्णौ निशामुखे ॥ संक्षेपान्दोलके रात्रौ बालं प्रीत्या निवेशयेत् ॥ १२५ ॥

अर्थ— मग निस्तुप केलेल्या ( कोंडा काढलेल्या ) अक्षता एका ताटांत पसरून मुलाच्या पित्यानें त्यावर प्रथम आपलें नांव नंतर मुलाला ठेवावयाचें नांव लिहावें. तसेंच दूध आणि तूप मिसळलेलें एका दुसऱ्या ताटांत घालून त्यांत मुलाला घालावयाचे दागिने घालून त्या ताटांत आणि पूर्वीच्या ताटांत गंध फुलें आणि दर्भ टाकावेत. मग मुलाचें मस्तक, दोनी कान, कंठ, दोनी भुजा आणि छाती ह्या ठिकाणीं तें तूप मिसळलेलें दूध दर्भानें लावून त्याला त्या त्या ठिकाणीं घालावयाचे अलंकार घालावेत. मग "अष्टोतरसहस्रेण०" ( जो देव एक हजार आठ नामांच्या योगानें शोभत आहे तो देव ह्या कुमाराला शुभनाम देवो )— ह्या मंत्रानें ब्राह्मणांशीं सहवर्तमान तीन वेळ देवाची प्रार्थना करून, मुलांचें जें नांव ठेवावयाचें असेल त्या नांवाचा मोठ्या स्वरांत उच्चार करून श्रीजिनेंद्राला नमस्कार करावा. आणि नंतर यक्षादिदेवांना पूर्णार्घ्य द्यावेत. ह्याप्रमाणें सर्व विधि करावा. मग त्या दिवशीं सायंकाळीं मुलाचे दोनी कान टोंचावेत. आणि रात्रीं त्या मुलाला पाळण्यांत घालावें.

नामकर्म मंत्र

ॐ ह्रीं श्रीं क्लीं अर्हं बालकस्य नामकरणं करोमि । अभिनन्दननाम्ना आयुरारोग्यैश्वर्यवान् भव भव । अष्टोत्तरसहस्राभिधानार्हो भव भव झ्रौं झ्रौं अ सि आ उ सा स्वाहा ॥ एवं नामकरणं कुर्यात् ॥

कर्णवेधमंत्र

ॐ ह्रीं श्रीं अर्हं बालकस्य ह्रः कर्णनासावेधनं करोमि अ सि आ उ सा स्वाहा ॥ अनेन कर्णवेधनं कुर्यात् ॥

आंदोलारोपणमंत्र

ॐ ह्रीं झ्रौं झ्रौं क्ष्वीं क्ष्वीं आन्दोलं बालकमारोपयामि तस्य सर्वरक्षा भवतु झ्रौं झ्रौं स्वाहा ॥ इत्यान्दोलारोपणं कुर्यात् ॥ इति नामकर्म ॥

अर्थ— "ॐ ह्रीं श्रीं क्लीं" इत्यादि मंत्रानें नामकर्म करावें. त्यात जेथें "अभिनन्दनाम्ना" असें आहे त्या ठिकाणीं मुलाचें नाव उच्चारावें. "ॐ ह्रीं श्रीं अर्हं" इत्यादि मंत्रानें बालकाचा कर्णवेध करावा. कन्या असल्यास कर्ण आणि नासिका ह्या दोनींचा वेध करावा. ह्मणजे हीं दोन्हीं टोंचावीत. "ॐ ह्रीं झ्रौं" इत्यादि मंत्रानें मुलाला पाळण्यांत घालावें. हा नामकर्मविधि सांगितला.

निष्क्रमणविधि

गृहान्निष्क्रमणं सूनोश्चतुर्थे मासि कारयेत् ॥
जिनार्कदर्शनार्थं च तृतीये प्रथमेऽपि वा ॥ १२६ ॥
शुक्लपक्षे सुनक्षत्रे स्नातं भूषणभूषितम् ॥
पुण्याहवचनैर्बालं सिञ्चयेच्च कुशोदकैः ॥ १२७ ॥
विधाय वक्षसि बाल महावाद्यसमान्वितम् ॥
निष्क्रमेद्बन्धुभिः साकं माता पिताऽथवा गृहात् ॥ १२८ ॥
भक्त्या चैत्यालयं गत्वा त्रिः परीत्य प्रपूज्य च ॥
शिशोः सन्दर्शयेत्प्रीत्या वृद्धये जिनभास्करम् ॥ १२९ ॥
सङ्घं सम्पूज्य सद्वस्त्रैः शेषांस्ताम्बूलचन्दनैः ॥
शेषाशिषं समादाय पूर्ववच्च व्रजेद्गृहम् ॥ १३० ॥

ॐनमोऽर्हते भगवते जिनभास्कराय तव मुखं बालकं दर्शयामि दीर्घायुष्यं कुरु कुरु स्वाहा ॥ इति बहिर्यानम् ॥

अर्थ— आतां निष्क्रमण क्रिया ( मुलाला घरांतून प्रथमच बाहेर नेणें ) सांगतात— मुलाचें घरांतून

निष्क्रमण जें करावयाचें तें चवथ्या महिन्यात करावें  हा विधि मुलाला प्रथम जिनबिंबाचें दर्शन करण्याकरितां करावयाचा आहे. तो पहिल्या किंवा तिसऱ्या महिन्यातही केला असता चालतो. तो विधि शुक्लपक्षांत ज्या दिवशीं शुभ नक्षत्र असेल त्या दिवशीं करावा. त्या दिवशीं मुलाला मंगलस्नान घालून त्याला अलंकार घालून पुण्याहवाचनमंत्रांनी दर्भमिश्रित उदकानें त्याच्या मस्तकावर सेंचन करावें. नंतर त्या मुलाची माता किंवा पिता ह्यापैकी कोणीतरी त्याला आपल्या उराशीं धरून मंगलवाद्याचा घोष करीत आपल्या बंधुवर्गाशीं सह घरांतून बाहेर निघावें. भक्तीनें चैत्यालयांत जाऊन तीन प्रदक्षिणा करून श्रीजिनेंद्राची पूजा करून त्या मुलाच्या वृद्धीकरिता त्याला जिनबिंबाचें दर्शन करवावें. त्या ठिकाणीं असलेल्या संघमुनीना वस्त्रें द्यावींत. आणि बाकीच्या मंडळींना तांबूल, गंध वगैरे देऊन सर्वांचा संतोष करून त्यांचे आशीर्वाद घेऊन घरीं यावें. “ ॐ नमोऽर्हते० ” इत्यादि मंत्रानें त्या मुलाला जिनदर्शन करवावें. हा निष्क्रमणाचा विधि सांगितला.

उपवेशनविधि.

पञ्चमे मासि कर्तव्यं शिशोश्चैवोपवेशनम् ॥ सम्पूज्य श्रीजिनं भूमिं कुमारान् पञ्च पूजयेत् ॥ व्रीहिश्यामाकगोधूममाषमुद्गतिला यवाः ॥ एभिः संलेख्य रङ्गावलीं च वस्त्रं प्रसारयेत् ॥ १३२ ॥ स्नापयित्वा शिशुं सम्यक् भूषणैश्च विभूषयेत् ॥

गृहे पद्मासनस्थाने सुमुहूर्ते निवेशयेत् ॥ १३३ ॥ पूर्वमुखे विधायास्यमधःस्थं वामपादकम् ॥ उपरि दक्षिणाङ्घ्रिः स्यादुपर्यस्य करद्वयम् ॥ १३४॥ नीराजनं ततः कुर्याद्विप्रैराशीर्वचः परम् ॥ तद्दिने सज्जनान् सर्वान् भोजयेत्प्रीतिपूर्वकम् ॥ १३५ ॥

ॐ ह्रीं अर्हं अ सि आ उ सा बालकमुपवेशयामि स्वाहा ॥ इत्युपवेशनम् ॥

अर्थ— आतां उपवेशन विधि ( मुलाला वसविण्याची क्रिया ) सांगतात— पांचव्या महिन्यांत मुलाचा उपवेशनाविधि करावा. त्या वेळी श्रीजिनेंद्राची पूजा करून भूमीची आणि पांच मुलांची पूजा करावी. भात गहूं, उडीद, मूग, तीळ आणि जव ह्यांची रांगोळी घालून एक वस्त्र पसरावें. घरांत मुलाला स्नान घालून अलंकारांनीं सुशोभित करून सुमुहूर्तावर त्या वस्त्रावरील पद्मासनावर वसवावें. वसवितांना त्या मुलाचें तोंड पूर्वेकडे करावें. आणि त्याचा डावा पाय खालीं व उजवा पाय वर ठेवून त्यावर दोनी हात ठेवून त्याला वसवावें. मग त्या मुलाला आरती ओंवाळून ब्राह्मणांचे आशीर्वाद घ्यावेत. त्या दिवशीं सर्व सत्पुरुषांना आनंदानें भोजन घालावें. मुलाला वसविण्याच्या प्रसंगीं "ॐ ह्रीं अर्ह" इत्यादि मंत्र ह्मणावा. हा उपवेशनाचा विधि सांगितला.

अन्नप्राशनविधि.

तथा च सप्तमे मासे शुभर्क्षे शुभवासरे ॥

अन्नस्य प्राशनं कुर्याद्बालस्य वृद्धये पिता ॥ १३६ ॥
जिनेन्द्रसदने पूजा महावैभवसंयुता ॥
आदौ कार्या ततो गेहे शुद्धान्नं क्रियते बुधैः ॥ १३७ ॥
ततः प्राङ्मुखमासित्वा पिता माताऽथवा सुतम् ॥
दक्षिणाभिमुखं कृत्वा वामोत्सङ्गे निवेशयेत् ॥ १३८ ॥
क्षीरान्नं शर्करायुक्तं घृताक्तं प्राशयेच्छिशुम् ॥
दध्यन्नं च ततः सर्वान्बान्धवानपि भोजयेत् ॥ १३९ ॥

ॐ नमोऽर्हते भगवते भुक्तिशक्तिप्रदायकाय बालकं भोजयामि पुष्टिस्तुष्टिश्चारोग्यं भवतु भवतु झ्वीं क्ष्वीं स्वाहा ॥ इत्यन्नप्राशनम् ॥

अर्थ— आतां अन्नप्राशनाचा विधि सांगतात. सातव्या महिन्यांत शुभवारीं शुभनक्षत्रावर त्या मुलाला त्याच्या वृद्धीकरितां अन्नप्राशन करवावें. त्या दिवशीं प्रथम जिनालयांत श्रीजिनेंद्राची यथाविधि पूजा करावी, आणि घरांत शुद्ध अन्न तयार करावें. मग मुलाचा पिता किंवा माता ह्यापैकीं पूर्वेकडे तोंड करून बसून आपल्या डाव्या मांडीवर दक्षिणेकडे तोंड करून मुलास बसवावें. आणि दूधभात, साखर व तूप ह्यांनी मिश्र करून मुलाला खाऊं घालावा. मग आपल्या सर्व बंधुवर्गास भोजन घालावें.

मुलाला अन्न खाऊं घालतानां " ॐ नमोऽर्हते भगवते " इत्यादि मंत्र ह्मणावा. हा अन्नप्राशनाचा विधि सांगितला.

गमनविधि ( मुलास चालावयास शिकविणें )

अथास्य नवमे मासे गमनं कारयेत्पिता ॥
गमनोचितनक्षत्रे सुवारे शुभयोगके ॥ १४० ॥
पूजां होमं जिनावासे पिता कुर्याच्च पूर्ववत् ॥
पुत्रं संस्नाप्य सद्वस्त्रैर्भूषयेद्भूषणैः परम् ॥ १४१ ॥
पूर्वादिपूर्वपर्यन्तं गुर्वग्निब्राह्मणान्परान् ॥
प्रदक्षिणाक्रमेणैव धौतवस्त्रं प्रसारयेत ॥ १४२ ॥
तस्योपरि स्थितं पुत्रमुदङ्मुखं मुदा पिता ॥
गमयेद्दक्षिणांघ्र्यग्रं भुजौ सन्धृत्य पाणिना ॥ १४३ ॥
सव्यभागेऽग्निकुण्डं तत्सन्त्यज्य त्रिप्रदक्षिणाः ॥
दत्वाऽग्निगुरुवृद्धेभ्यः प्रणातिं कारयेत्पिता ॥ १४४ ॥

ॐ नमोऽर्हते भगवते श्रीमते महावीराय चतुस्त्रिंशदतिशययुक्ताय बालकस्य पाद-

न्यासं शिक्षयामि तस्य सौख्यं भवतु भवतु क्ष्वीं क्ष्वीं स्वाहा ॥ इति पादन्यासः ॥

अर्थ— आतां पादन्यासाचा ( गमनाचा ) विधि सांगतात. नवव्या महिन्यांत गमनाला योग्य नक्षत्र असतांना शुभवारीं शुभयोगावर मुलाच्या पित्यानें जिनपूजा होम वगैरे विधि पूर्ववत् करून, पुत्राचा पादन्यास विधि ( पावलें टाकणें ) करावा. मुलाला स्नान घालून उत्तम वस्त्रालंकारांनीं सुशोभित करावें. नंतर गुरु, अग्नि आणि ब्राह्मण ह्यांच्या भोंवत्यानें घातलेलें वस्त्र पसरून उत्तरेकडे तोंड करून मुलाला उभें करून त्याच्या हाताला धरून त्याच्या पित्यानें त्याला पूर्वदिशेकडून आरंभ करून चालवावें. चालविण्यास आरंभ करतांना "ॐ नमोऽर्हते" इत्यादि मंत्र म्हणून प्रथम उजवा पाय पुढें टाकवावा. ह्याप्रमाणें त्या पसरलेल्या वस्त्रावरून त्या मुलाकडून तीन प्रदक्षिणा करवाव्यात. प्रदक्षिणा करतांना अग्निकुंड उजव्या हाताला सोडून प्रदक्षिणा कराव्यात. मग अग्नि, गुरु आणि वृद्धलोक ह्यांना त्या मुलाकडून नमस्कार करवावा. हा पादन्यासविधि सांगितला.

व्युष्टिक्रिया.

ततोऽस्य हायने पूर्णे व्युष्टिर्नाम क्रिया मता ॥
वर्षवर्धनपर्यायशब्दवाच्या यथाश्रुतम् ॥ १४५ ॥
तत्रापि पूर्ववद्दानं जैनी पूजा च पूर्ववत् ॥

इष्टबन्धुसमाह्वानं सन्मानादिश्च लक्ष्यते ॥ १४६ ॥ इति व्युष्टिः ॥

अर्थ— आतां व्युष्टि क्रिया सांगतात— व्युष्टि क्रिया ह्मणजे वर्षवृद्धिसंबंधी क्रिया होय. ही क्रिया ज्या दिवशीं मुलाला वर्ष पूर्ण होईल त्या दिवशी करावी. ह्या क्रियेंतही दान, जिनपूजा वगैरे विधि पूर्वीप्रमाणेंच करावा. आपले इष्टजन व बंधु ह्याना भोजन घालून त्याचा सत्कार करावा. ही व्युष्टिक्रिया सांगितली.

चौलकर्म (मुडन विचार)

मुण्डनं सर्वजातीनां बालकेषु प्रवर्तते ॥
पुष्टिबलप्रदं वक्ष्ये जैनशास्त्रानुमार्गतः ॥ १४७ ॥
तृतीये प्रथमे चाब्दे पञ्चमे सप्तमेऽपि वा ॥
चौलकर्म गृही कुर्यात्कुलधर्मानुसारतः ॥ १४८ ॥
चूलाकर्म शिशोर्मातरि गर्भिण्यां यदि वा भवेत् ॥
गर्भस्य वा विपत्तिः स्याद्विपत्तिर्वा शिशोरपि ॥ १४९ ॥
शिशोर्मातरि गर्भिण्यां चूलाकर्म न कारयेत ॥
गते तु पञ्चमे वर्षे दोषयेन्न हि गर्भिणी ॥ १५० ॥

आरभ्याधानमाचौलं कर्मातीतं तु यद्भवेत् ॥
आज्यं व्याहृतिभिर्हुत्वा प्रायश्चित्तं समाचरेत् ॥ १५१ ॥

अर्थ-- सर्व जातींच्या मुलांचें मुंडन करण्याची सर्वांची चाल आहे. परंतु जैनशास्त्राला अनुसरून मुलाला पुष्टि आणि बल देणारा असा मुंडनविधि पुढें सांगतों. पहिल्या तिसऱ्या पांचव्या किंवा सातव्या वर्षी आपल्या कुलांत चालत आलेल्या संप्रदायाला अनुसरून मुलाचें चौलकर्म (शेंडी राखण्याचा विधि) करावें. मुलाची माता गर्भिणी असतांना जर मुलाचें चौलकर्म केलें, तर त्या मातेच्या उदरांतील गर्भाचा नाश होतो. किंवा ज्याचें चौलकर्म केले असेल त्या मुलाचा तरी नाश होतो. ह्मणून मुलाची माता गर्भवती असताना चौलकर्म करूं नये. परंतु मुलाला जर पांच वर्षें पूर्ण झालीं असतील, तर मात्र मुलाची आई गर्भिणी जरी असली, तरी सातवे वर्षी त्याचें चौलकर्म अवश्य करावें. ह्यांत गर्भिणीपणाचा दोष उत्पन्न होत नाहीं. चौलकर्म ज्या मुलाचें करावयाचें त्याचे जर गर्भाधानापासून चौलापर्यंतचे मागले संस्कार केलेले नसतील तर प्रथम व्याहृतिमंत्रानें आज्याहुती देऊन प्रायश्चित्त करावें.

चौलार्हं बालकं स्नायात्सुगन्धशुभवारिणा ॥
शुभेऽह्नि शुभनक्षत्रे भूषयेद्वस्त्रभूषणैः ॥ १५२ ॥
पूर्ववद्धोमं पूजां च कृत्वा पुण्याहवाचनैः ॥

उपलेपादिकं कृत्वा शिशुं सिञ्चेत्कुशोदकैः ॥ १५३ ॥
यवमाषतिलव्रीहिशमीपल्लवगोमयैः ॥
शरावान् षट् पृथक्पूर्णान् विन्यस्येदुत्तरादिशि ॥ १५४ ॥
धनुःकन्यायुग्ममत्स्यवृषमेषेषु राशिषु ॥
ततो यवशरावादीन् विन्यस्येत्परितः शिशोः ॥ १५५ ॥
क्षुरं च कर्तरीं कूर्चसस्तकं घर्षणोपलम् ॥
निधाय पूर्णकुम्भाग्रे पुष्पगन्धाक्षतान् क्षिपेत् ॥ १५६ ॥
मात्रङ्कस्थितपुत्रस्य स धौतोऽग्रे स्थितः पिता ॥
शीतोष्णजलयोः पात्रे सिञ्चेच्च युगपज्जलैः ॥ १५७ ॥
निशामस्तु दधि क्षिप्त्वा तज्जले तैः शिरोरुहान् ॥
सव्यहस्तेन संसेच्य प्रादक्षिण्येन घर्षयेत् ॥ १५८ ॥
नवनीतेन संघर्ष्य क्षालयेदुष्णवारिणा ॥
मङ्गलकुम्भनीरेण गन्धोदकेन सिञ्चयेत् ॥ १५९ ॥

अर्थ— चौलकर्म करण्यास योग्य झालेल्या मुलाला शुभ नक्षत्रानें युक्त असलेल्या शुभदिनीं सुगंध

अशा उदकानें स्नान घालून वस्त्रालंकारांनीं सुशोभित करावें. पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच होम आणि पूजा करून मुलाच्या अंगास गंध लावून पुण्याहवाचनमंत्रांनीं त्याच्या मस्तकावर दर्भानीं सेंचन करावें. जव, उडीद, तीळ, भात, शमीचीं पानें आणि गायीचें शेण ह्यांनीं भरलेले सहा शराव ( मातीच्या झांकण्या ) धनु, कन्या, मिथुन, मीन, वृषभ आणि मेष ह्या लग्नावर उत्तरेकडील बाजूला निरानिराळे स्थापन करावेत. मग ते शराव मुलाच्या जवळ आणून ठेवावेत. नंतर क्षुर ( वस्तरा ), कातरी, दर्भाचे सात कूर्च आणि क्षुर घासण्याचा दगड, हे पदार्थ एका जलपूर्ण कुंभावर ठेवून त्यांच्यावर गंध, पुष्पें अक्षता टाकाव्यात. मग मातेच्या मांडीवर बसलेल्या पुत्राच्या पुढें स्नान करून उभा असलेल्या पित्यानें एका हातानें उष्णोदकाचें भांडें व दुसऱ्या हातानें शीतोदकाचें भांडें घेऊन, त्या दोन्हीं पात्रांतील पाणी दुसऱ्या एक पात्रांत एकदम ओतावें. त्या पाण्यात हळद, दह्यावरील पाणी आणि दही टाकून त्या पाण्यानें मुलाचे मस्तकावरील केंश उजव्या हातानें प्रदक्षिणाकार भिजवावेत. मग केंशांना थोडेंसें लोणी लावून घासून उष्णोदकानें ते केंश धुवावेत. नंतर मंगलकुंभातील उदकानें धुवून गंधोदकानें धुवावेत.

ततो दक्षिणकेशेषु स्थानत्रयं विधीयते ॥
प्रथमस्थानके तत्र कर्तनाविधिमाचरेत् ॥ १६० ॥
शालिपात्रं निधायाग्रे खादिरस्य शलाकया ॥

पञ्चदर्भैः सुपुष्पैश्च गन्धद्रव्यैः क्षुरेण च ॥ १६१ ॥
वामकरेण केशानां वर्ति कृत्वा च तत्पिता ॥
अङ्गुष्ठाङ्गुलिभिश्चैतद्धृत्वा हस्तेन कर्तयेत् ॥ १६२ ॥

अर्थ— नंतर मुलाच्या उजव्या बाजूकडील केंशांत तीन जागा कराव्यात. त्यांतील पहिल्या जाग्यांतील केंशांचें कर्तन प्रथम करावें. तें कर्तन करावयाचे वेळीं मुलापुढें भात नांवाचें धान्य घातलेला शराव ठेवून, खदिराची एक समिधा, पांच दर्भ, फुलें, गंध आणि क्षुर हे पदार्थ डाव्या हातांत घेऊन, त्याच हातानें मुलाच्या पित्यानें केंश वळून अंगठा आणि बोटें ह्यांनीं धरावेत. आणि उजव्या हातानें कातरीनें ते केंश कातरावेत.

ॐ नमोऽर्हते भगवते जिनेश्वराय मम पुत्र उपनयनमुण्डमुण्डितो महाभागी भवतु भवतु स्वाहा ॥ ॥ इत्युच्चरन्केशाँसंछिद्य शमीपर्णैः सह भार्यायै दद्यात् ॥ साऽपि तथा भवतु इत्युक्त्वा क्षीरघृतमिश्रितान् कृत्वा गोमयशरावे क्षिपेत् ॥

अर्थ— केंश कातरण्याच्या वेळीं " ॐ नमोऽर्हते० " इत्यादि मंत्र ह्मणून केश कातरावेत. आणि ते कातरलेले केंश मुलाच्या मातेच्या हातांत द्यावेत. तिनें " तथा भवतु " असें ह्मणून त्या केंशांना दूध आणि तूप लाऊन गोमयाच्या शरावात टाकावेत.

**द्वितीयस्थाने तिलपात्रमग्रे निधाय पूर्वोक्तशस्त्रशेषैश्च– ॐ नमः सिद्धपरमेष्ठिने मम पुत्रो निर्ग्रन्थमुण्डभागी भवतु स्वाहा ॥ इत्युक्त्वा केशान् प्रच्छिद्य तस्यै दद्यात् ॥ सा तथा करोतु ॥**

अर्थ— मग दुसऱ्या स्थानाचे केंश कातरताना तिळांचें पात्र मुलापुढें ठेवून पूर्वी सांगितल्याप्रमाणें शस्त्र व बाकीचे पदार्थ हातात घेऊन " ॐ नमः सिद्धपरमेष्ठिने " इत्यादि मंत्र ह्मणून पूर्वीप्रमाणें केंश कातरून मातेच्या हातांत द्यावेत. तिनें ' तथा भवतु ' असें ह्मणून केंशाना दूध आणि तूप लावून ते गोमयशरावात टाकावेत.

**तृतीयस्थाने यवशरावमग्रे निधाय पूर्वोक्तशस्त्रशेषैश्च– ॐ र्‍हीं नम आचार्यपरमेष्ठिने मम पुत्रो निष्क्रान्तिमुण्डभागी भवतु स्वाहा ॥ इत्युक्त्वा केशान् संछिद्य पूर्ववत्कुर्यात् ॥**

अर्थ— तिसऱ्या स्थानाचे केश कातरावयाच्या वेळीं पूर्वीप्रमाणेंच शस्त्र वगैरे पदार्थ हातांत घेऊन ' ॐ र्‍हीं नमः ' इत्यादि मंत्र ह्मणून केश कातरून मातेच्या हातांत द्यावेत. तिनें पूर्वीप्रमाणेंच सर्व करावें.

**वामभागे केशानां भागद्वयं कृत्वा तत्र प्रथमभागे माषपात्रमग्रे निधाय शस्त्रशेषैश्च– ॐ नम उपाध्यायपरमेष्ठिने मम पुत्र ऐन्द्रभागी भवतु स्वाहा ॥ इत्युच्चार्य पूर्ववत् कुर्यात् ॥**

अर्थ— ह्याप्रमाणें उजव्या बाजूचे केंश कातरल्यावर मग डाव्या बाजूचे केंश कातरावेत. डाव्या बाजूला केंश कातरण्याचीं दोन स्थानें करावीत. त्यातील प्रथमभागांतील केंश कातरावयाच्या वेळीं उडिदानें भरलेला शराव मुलाचे पुढें ठेवून, पित्यानें आपल्या हातांत शस्त्र आणि बाकीचे पदार्थ घेऊन 'ॐ नम उपाध्यायपरमेष्ठिने' इत्यादि मंत्र ह्मणून केंश कातरावेत. आणि पुढील विधि पूर्वीप्रमाणेंच करावा.

द्वितीयस्थाने शमीपल्लवपात्रं निधाय शस्त्रशेषैश्च– ॐ ह्रौं नमः सर्वसाधुपरमेष्ठिने
मम पुत्रः परमराज्यकेशभागी भवतु स्वाहा ॥ इत्युक्त्वा पूर्ववत्कुर्यात् ॥

अर्थ— मग डावेकडील दुसऱ्या ठिकाणचे केंश कातरतांना शमीपल्लवांचें पात्र पुढें ठेवून शस्त्र आणि बाकीचे पदार्थ हातांत घेऊन 'ॐ ह्रौं नमः' इत्यादि मंत्र ह्मणून केंश कातरावेत. पुढील विधि पूर्वीप्रमाणें करावा.

तत्रोष्णोदकेन केशान् प्रक्षाल्य 'ॐ ह्रीं पञ्चपरमेष्ठिप्रसादात् केशान्वय
शिरो रक्ष कुशली कुरु नापित' इत्युक्त्वा नापिताय पिता क्षुरं दद्यात् ॥
नापितोऽपि 'भवदीप्सितार्थो भवतु' इत्युक्त्वा शिखां परिरक्ष्य शेषके-
शान् मुण्डयेत् ॥ ततस्तान् केशान् क्षीरघृतधान्यगोमयपालाणि च महा-
वाद्यविभवेन नद्यां क्षिपेत् ॥ ततः कुमारं स्नापयित्वा वस्त्रभूषणैरलंकृत्य

**गृहमानीय यक्षादीनामर्घ्यं दत्वा पुण्याहवाचनैः पुनः सिंचयित्वा सज्जनान् भोजयेत् ॥ इति चौलकर्म ॥**

अर्थ— मग त्या मुलाचे मस्तकावरील सर्व केश उष्णोदकानें धुवून ' ॐ ऱ्हीं पंचपरमेष्ठि–० ' इत्यादि मंत्र म्हणून मुलाच्या पित्यानें क्षुर नापिकाकडे ( हजामाकडे ) द्यावा. नापितानेंही ' भवदीप्सितार्थो भवतु ' असें म्हणून त्या मुलाच्या मस्तकावर शेंडी राखून बाकीचे केंश काढावेत. मग ते पूर्वीचे केंश दूध, तूप, धान्याची पात्रें आणि गोमयाचें पात्र ह्या सर्ववस्तु मंगलवाद्यांचा घोष करीत नदीत, नदी नसल्यास तळावांत अथवा विहीरांत नेऊन टाकावींत. मग तेथें कुमाराला स्नान घालून वस्त्रभूषणांनीं अलंकृत करून तसाच मंगलवाद्यांचा घोष करीत घरीं आणावें. मग यक्षादिदेवतांना अर्घ्यप्रदान करून पुण्याहवाचनमंत्रांनीं मुलाच्या मस्तकावर सेंचन करवावें. ह्याप्रमाणें विधि झाल्यावर सदाचारसंपन्न अशा आपल्या स्वजातीयांना भोजन घालावें. हा चौलाचा विधि सांगितला.

लिपिसंख्यान [ अक्षराभ्यास ]

**द्वितीयजन्मनः पूर्वमक्षराभ्यासमाचरेत् ॥**
**मौञ्जीबन्धनतः पश्चाच्छास्त्रारम्भो विधीयते ॥ १६३ ॥**
**पञ्चमे सप्तमे चाब्दे पूर्वं स्यान्मौञ्जिबन्धनात् ॥**

तत्र चैवाक्षराभ्यासः कर्तव्यस्तूदगयने ॥ १६४ ॥

अर्थ— उपनयन करण्याच्या पूर्वी मुलाला अक्षरें शिकविण्यास प्रारंभ करावा. आणि उपनयन झाल्यावर शास्त्राभ्यास करण्यास प्रारंभ करावा. मौंजीबंधन करण्याच्या पूर्वी ह्मणजे पांचव्या किंवा सातव्या वर्षी मुलाला अक्षरें शिकविण्यास प्रारंभ करावा. तो उत्तरायणांत करावा.

मृगादिपञ्चस्वपि तेषु मूले । हस्तादिके च क्रियतेऽश्विनीषु ॥
पुर्वात्रये च श्रवणत्रये च । विद्यासमारम्भमुशान्ति सिध्द्यै ॥ १६५ ॥

अर्थ— मृग, आर्द्रा, पुनर्वसू, पुष्य, आश्लेषा, मूल, हस्त, चित्रा, स्वाती, अश्विनी, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, श्रवण, धनिष्ठा, शततारका ह्या नक्षत्रांवर विद्या शिकविण्यास आरंभ करावा. ह्मणजे कार्यसिद्धि होते.

आदित्यादिषु वारेषु विद्यारम्भफलं क्रमात् ॥
आयुर्जाड्यं मृतिर्मेधा सुधीः प्रज्ञा तनुक्षयः ॥ १६६ ॥
अनध्यायाः प्रदोषाश्च षष्ठी रिक्ता तथा तिथिः ॥
वर्जनीया प्रयत्नेन विद्यारम्भेषु सर्वदा ॥ १६७ ॥
विद्यारम्भे शुभा प्रोक्ता जीवज्ञसितवासराः ॥

मध्यमौ सोमसूर्यौ च निन्द्यश्चैव शनिः कुजः ॥ १६८ ॥

उदग्गते भास्वति पञ्चमेऽब्दे । प्राप्तेऽक्षरस्वीकरणं शिशूनाम् ॥

सरस्वतीं क्षेत्रसुपालकं च । गुडोदनाद्यैरभिपूज्य कुर्यात् ॥ १६९ ॥

अर्थ— रविवारीं विद्यारंभ केला असतां आयुष्य वाढतें, सोमवारीं बुद्धीला जडपणा येतो. मंगळवारीं मृत्यु प्राप्त होतो. बुधवारी बुद्धीला धारणाशक्ति येते. गुरुवारीं बुध्दि कुशल होते. शुक्रवारीं विद्यारंभ केल्यानें बुध्दीला समजण्याची शक्ति येते. आणि शनिवारीं विद्यारम्भ करणाऱ्याच्या शरीराचा नाश होतो. असें सात वारांचें फल आहे. अनध्यायाच्या तिथि, प्रदोष, षष्ठी आणि रिक्तातिथि ( चतुर्थी नवमी आणि चतुर्दशी ) ह्या तिथींवर विद्यारंभ करूं नये. गुरुवार, बुधवार आणि शुक्रवार हे वार विद्यारंभास शुभ समजावेत. सोमवार आणि रविवार हे मध्यम समजावेत. आणि मंगळवार व शनिवार हे कनिष्ठ समजावेत. मुलाला पांचवें वर्ष लागलें असता उत्तरायणात मुलाचा लिपिग्रहणविधि करावा. त्या वेळीं सरस्वती आणि क्षेत्रपाल ह्यांची गूळभात वगैरे पदार्थांनीं पूजा करावी.

एवं सुनिश्चिते काले विद्यारम्भं तु कारयेत् ॥

विधाय पूजामम्बायाः श्रीगुरोश्च श्रुतस्य च ॥ १७० ॥

पूर्ववद्धोमपूजादि कार्यं कृत्वा जिनालये ॥

पुत्रं संस्नाप्य सद्भूषैरलंकृत्य विलेपनैः ॥ १७१ ॥
विद्यालयं ततो गत्वा जयादिपञ्चदेवताः ॥
सम्पूज्य प्रणमेद्भक्त्या निर्विघ्नग्रन्थसिद्धये ॥ १७२ ॥
वस्त्रैर्भूषैः फलैर्द्रव्यैः सम्पूज्याध्यापकं गुरुम् ॥
हस्तद्वयं च संयोज्य प्रणमेद्भक्तिपूर्वकम् ॥ १७३ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें वर सांगितलेल्या शुभ मुहूर्तांपैकी एखादा मुहूर्त निश्चित करून त्या दिवशीं माता गुरु आणि शास्त्र ह्यांची पूजा करून मुलाचा विद्यारंभ करावा. मुलाला स्नान घालून त्याला वस्त्रालंकारांनी सुशोभित करावें. मग जिनालयात जाऊन होम, पूजा वगैरे विधि पूर्वीप्रमाणेंच करावा. नंतर विद्यालयांत जाऊन त्या ठिकाणी आरंभलेल्या कार्याची निर्विघ्नपणें सिद्धि होण्याककिरितां जया वगैरे पांच देवतांची पूजा करून, त्यांना मुलानें भक्तीनें नमस्कार करावा. नंतर वस्त्रें, भूपणें, फलें व द्रव्य ह्यांच्या योगानें अध्यापकाची ( शिकविणाऱ्या गुरूची ) पूजा करून, हात जोडून त्याला भक्तीनें नमस्कार करावा.

प्रांमुखो गुरुरासीनः पश्चिमाभिमुखः शिशुः ॥
कुर्यादक्षरसंस्कारं धर्मकामार्थसिद्धये ॥ १७४ ॥

विशालफलकादौ तु निस्तुषाखण्डतण्डुलान् ॥
उपाध्यायः प्रसार्याथ विलिखेदक्षराणि च ॥ १७५ ॥
शिष्यहस्ताम्बुजद्वन्द्वधृतपुष्पाक्षतान् सितान् ॥
क्षेपयित्वाऽक्षराभ्यर्णे तत्करेण विलेखयेत् ॥ १७६ ॥
हेमादिपीठके वाऽपि प्रसार्य कुङ्कुमादिकम् ॥
सुवर्णलेखनीकेन लिखेत्तत्राक्षराणि वा ॥ १७७ ॥
नमः सिद्धेभ्य इत्यादौ ततः स्वरादिकं लिखेत ॥
अकारादि हकारान्तं सर्वशास्त्रप्रकाशकम् ॥ १७८ ॥

अर्थ— गुरूनें पूर्वेकडे तोंड करून बसावें आणि शिष्यानें पश्चिमेकडे तोंड करून बसावें. मग त्या शिष्याला धर्म, अर्थ आणि काम ह्या तीन पुरुषार्थांची सिद्धि होण्याकरितां अक्षरें शिकवावींत. तीं अक्षरें एखाद्या मोठ्या फळीवर न मोडलेले तांदूळ पसरून प्रथम अध्यापकानें लिहावींत. मग शिष्याच्या हातांत पांढरीं फुलें पांढऱ्या अक्षता देऊन त्या लिहिलेल्या अक्षरांच्या समीप त्याच्याकडून टाकवून, तीं पूर्वी गुरूनें काढलेलीं अक्षरें त्याच्याकडून काढवावींत. किंवा सोन्याच्या तगडावर कुंकू अथवा केशराचें चूर्ण पसरून त्यावर सोन्याच्या लेखणीनें अक्षरें काढावींत, आणि तीं शिष्याकडून काढवावींत. त्यांत प्रथम 'नमः सिद्धेभ्यः'

असें लिहावें. नंतर अकारादि स्वर, नंतर ककारापासून हकारापर्यंतची अक्षरें लिहावींत. आणि तीं त्या मुलाकडून काढवावींत. हीं अक्षरें सर्वशास्त्रांत मुलाचा प्रवेश करून देणारीं आहेत.

ॐ नमोऽर्हते नमः सर्वज्ञाय सर्वभाषाभाषितसकलपदार्थाय बालकमक्षराभ्यासं कारयामि द्वादशाङ्गश्रुतं भवतु भवतु ऐं श्रीं ह्रीं क्लीं स्वाहा ॥ इत्यक्षराभ्यासः ॥

अर्थ— मुलाकडून अक्षरें काढविण्याच्या समयीं "ॐ नमोऽर्हते" इत्यादि मंत्र ह्मणावा. हा अक्षराभ्यासविधि सांगितला.

पुस्तकग्रहण ( वाचन ) विधि.

ततश्चाधीत्य सर्वाणि चाक्षराणि गुरोर्मुखात् ॥
सुदिने पुस्तकं ग्राह्यं होमपूजादि पूर्ववत् ॥ १७९ ॥
उपाध्यायं च सम्मान्य वस्त्रभूषैश्च पुस्तकम् ॥
हस्तौ द्वौ मुकुलीकृत्य प्राङ्मुखश्च समाविशेत् ॥ १८० ॥
उपाध्यायेन तं शिष्यं पुस्तकं दीयते मुदा ॥
शिष्योऽपि च पठेच्छास्त्रं नान्दीपठनपूर्वकम् ॥ १८१ ॥ इति पुस्तकग्रहणम् ॥

अर्थ— मग त्या शिष्यानें गुरु सांगील त्याप्रमाणें सर्व अक्षरांचा अभ्यास करावा. नंतर शुभ दिवस

पाहून त्या दिवशीं पुस्तक वाचण्यास आरंभ करावा. पुस्तकवाचनारंभ करण्याच्या पूर्वी होम पूजा वगैरे विधि पूर्वीप्रमाणेंच करावा. मग वस्त्रें, भूषणें ह्यांच्या योगानें गुरूचा सत्कार करून मुलानें दोन्ही हात जोडून पूर्वेकडे तोंड करून बसावें. उपाध्यायानें (गुरूनें) त्या मुलाला संतोषानें शास्त्राचें पुस्तक द्यावें. शिष्यानें मंगलपाठ करून शास्त्र पठण्यास आरंभ करावा. हा पुस्तकग्रहणाविधि सांगितला.

गर्भाधानसुमोदपुंसवनकाः सीमन्तजन्माभिधा ।
वाह्येयानसुभोजने च गमनं चौलाक्षराभ्यासनम् ॥
सुप्रीतिः प्रियसद्भवो गुरुमुखाच्छास्त्रस्य संग्राहणं ।
एताः पञ्चदश (?) क्रियाः समुदिता अस्मिन् जिनेन्द्रागमे ॥ १८२ ॥

कुर्वन्ति धन्याः पुरुषाः प्रवीणा । आचारशुद्धिं च शिवं लभन्ते ॥
भुक्त्वेह लक्ष्मीविभवं गुणाढ्याः । श्रीसोमसेनैरुपसंस्तुतास्ते ॥ १८३ ॥

अर्थ— गर्भाधान, मोद, पुंसवन, सीमन्त, जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण, अन्नप्राशन, प्रियोद्भव, ग्रहण, सुप्रीति, पादन्यास, शास्त्रग्रहण वगैरे पंधरा (?) क्रिया जिनागमांत सांगितलेल्या ह्या

ठिकाणीं सांगितल्या आहेत. जे धन्य पुरुष ह्या क्रिया करतात ते शुद्धाचार आणि कल्याण ह्या दोहोंस मिळवितात. आणि त्यामुळें ते सर्वगुणसंपन्न होऊन व संपत्तीचें ऐश्वर्य भोगून श्रीसोमसेनमुनींनीहि स्तुति करण्याला योग्य असे होतात.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारकथने भट्टारकश्रीसोम-
सेनविरचिते गर्भाधानादिपञ्चदशक्रियाप्ररूपणो
नामाष्टमोऽध्यायः समाप्तः ॥
श्रीरस्तु ॥ शुभं भवतु ॥

श्रीवीतरागाय नमः ॥

## ॥ त्रैवर्णिकाचारस्य नवमोऽध्यायः ॥

मंगल

वन्दे श्रीसुमहेन्द्रकीर्तिसुगुरुं विद्याब्धिपारप्रदं ।
कालेऽस्यापि तपोनिधिं गुणगणैः पूर्णं पवित्रं स्वयम् ॥
नग्नत्वादिकदुष्टसत्परिषहैर्भग्नो न यो योगिराट् ।
पायान्मां स कुबुद्धिकष्टकुहरात्संसारपाथोनिधेः ॥ १ ॥

अर्थ— ज्ञानसमुद्राचें परतीर दाखविणारा, अनेकगुणांनी युक्त असलेला, पवित्र, आणि या पंचमकालींहि जो तपोनिधीच आहे असा जो श्रीमहेंद्रकीर्ति सद्गुरु, त्याला मी नमस्कार करतो. जो योगिराज, मी नग्न आहें अशा दुष्टकल्पनांनी खिन्न झाला नाहीं, तो-दुर्बुद्धीमुळें उत्पन्न होणाऱ्या अनंत दुःखाचा मोठा खड्डाच की काय! अशा—ह्या संसारसमुद्रापासून माझें रक्षण करो!!

अजितं जितकामारिं मुक्तिनारीसुखप्रदम् ॥
यज्ञोपवीतसत्कर्म नत्वा वक्ष्ये गुरुक्रमात् ॥ २ ॥

अर्थ— ज्यानें कामरूपी शत्रु जिंकला आहे आणि जो मुक्तिरूपी स्त्रीला सुख देत आहे अशा श्री-

अजितनाथाला नमस्कार करून, उपनयन नावाची क्रिया गुरुपरंपरेला अनुसरून मी सांगतो.

उपनयनाचा काल

गर्भाष्टमेऽब्दे कुर्वीत ब्राह्मणस्योपनायनम् ॥
गर्भादेकादशे राज्ञो गर्भात्तु द्वादशे विशः ॥ ३ ॥
ब्रह्मवर्चसकामस्य कार्यं विप्रस्य पञ्चमे ॥
राज्ञो बलार्थिनः षष्ठे वैश्यस्येहार्थिनोऽष्टमे ॥ ४ ॥

अर्थ— ब्राह्मणाच्या मुलाचें उपनयन गर्भापासून आठव्या वर्षी करावें. क्षत्रियपुत्राचें गर्भापासून अकराव्या वर्षी करावें. आणि वैश्यपुत्राचें गर्भापासून बाराव्या वर्षी करावें. व्रतचर्या आणि अध्ययन अधिक व्हावें अशी इच्छा करणाऱ्या ब्राह्मणपुत्राचें उपनयन पांचव्या वर्षी करावें. बल वाढावें अशी इच्छा करणाऱ्या क्षत्रियपुत्राचें उपनयन सहाव्या वर्षी करावें. आणि द्रव्य पुष्कळ मिळावें अशी इच्छा करणाऱ्या वैश्यपुत्राचें उपनयन आठव्या वर्षी करावें.

उपनयनाची शेवटची कालमर्यादा

आ षोडशाच्च द्वाविंशाच्चतुर्विंशात्तु वत्सरात् ॥
ब्रह्मक्षत्रविशां कालो ह्युपनयनजः परः ॥ ५ ॥

अत ऊर्ध्वं पतन्त्येते सर्वधर्मबहिष्कृताः ॥
प्रतिष्ठादिषु कार्येषु न योज्या ब्राह्मणोत्तमैः ॥ ६ ॥

अर्थ— सोळा वर्षें, बावीस वर्षें आणि चोवीस वर्षें इतका काल क्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्यांच्या उपनयनाची शेवटची मर्यादा आहे. ह्या कालापर्यंत ज्यांचें उपनयन झालें नाहीं ते सर्वधर्मांपासून बहिष्कृत होऊन भ्रष्ट होतात. चांगल्या ब्राह्मणांनी प्रतिष्ठा वगैरे धर्मकृत्यांत त्यांची योजना करूं नये.

उपनयन करण्यास योग्य आचार्य

अथाचार्यः— पितैवोपनयेत्पूर्वं तदभावे पितुः पिता ॥
तदभावे पितुर्भ्राता सकुल्यो गोत्रजो गुरुः ॥ ७ ॥
व्रतबन्धं कुमारस्य विना पितुरनुज्ञया ॥
यः करोति द्विजो मोहान्नरकं सोऽधिगच्छति ॥ ८ ॥

अर्थ— आता मुलाचें उपनयन कोणी करावें ह्याबद्दल सांगतात— पुत्राचें उपनयन पित्यानेच करावें. पिता नसल्यास ( मृत झाला असल्यास ) पितामहानें करावें. तो नसल्यास चुलत्यानें करावें. तो नसल्यास त्या कुलांतील पुरुषानें करावें. तोही नसल्यास त्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या पुरुषानें करावें. मुलाचा उपनयनसंस्कार त्याच्या पित्याच्या आज्ञेवांचून जर दुसऱ्यानें कोणी अज्ञानानें केला, तर तो करणारा

मनुष्य नरकांत जातो.

पुत्राचे सात प्रकार

पुत्रनिश्चयः ॥ स्वाङ्गजः पुत्रिकापुत्रो दत्तः क्रीतश्च पालितः ॥
भगिनीजः शिष्यश्चेति पुत्राः सप्त प्रकीर्तिताः ॥ ९ ॥

अर्थ— आता पुत्र किती प्रकारचे आहेत ते सांगतात— आपल्यापासून उत्पन्न झालेला, मुलीचा मुलगा, दत्तक घेतलेला, विकत घेतलेला, पाळलेला, आपल्या बहिणीचा मुलगा आणि आपला शिष्य असे सात प्रकारचे पुत्र शास्त्रांत सांगितले आहेत.

यज्ञोपवीत

सूत्रं बलं हस्तमानं चत्वारिंशच्छताधिकम् ॥
तत्त्रैगुण्यं बहिर्वृत्त्याऽन्तर्वृत्त्या त्रिगुणं पुनः ॥ १० ॥
गृहभार्या समादाय स्वयं हस्तेन कर्तयेत् ॥
तेन सूत्रेण सत्कार्यं शुभ्रं यज्ञोपवीतकम् ॥ ११ ॥

अर्थ— एकशेहे चाळीस हात लांबीचे बळकट सूत घेऊन ते त्रिगुणित करून त्याला पीळ घालावा. तो बाहेरच्या बगलेने घालावा. पुनः त्याचे त्रिगुणित करून आंतील बाजूने त्याला पीळ घालावा. हे सूत आपल्या

पत्नीनें स्वहस्तानें काढलेलें असावें. त्या सुतास वरीलप्रमाणें दोन वेळ पीळ घातल्यावर त्याच यज्ञोपवीत करावें. तें शुभ्रवर्ण असावें.

उपनयनादिकांना प्रतिबंध केव्हा असतो आणि केव्हा नसतो

नान्दीश्राद्धे कृते पश्चादुल्कापाताग्निवृष्टिषु ॥
सूतकादिनिमित्तेषु न कुर्यान्मौञ्जीबन्धनम् ॥ १२ ॥
यस्य माङ्गलिकं कार्यं तस्य माता रजस्वला ॥
तदा न तत्प्रकर्तव्यमायुःक्षयकरं हि तत् ॥ १३ ॥
माता सहैव भुञ्जीत ऊर्ध्वं माता रजस्वला ॥
व्रतबन्धः प्रशस्तः स्यादित्याह भगवान्मुनिः ॥ १४ ॥
नान्दीश्राद्धे कृते पश्चात्कन्यामाता रजस्वला ॥
कन्यादानं पिता कुर्यादित्यादि जिनभाषितम् ॥ १५ ॥

अर्थ— नांदीश्राद्ध केल्यावर जर उल्कापात, अग्निप्रवेश, अतिवृष्टि, अशौच वगैरे निमित्तें प्राप्त होतील, तर मुंजीबंधन करूं नये. ज्या मुलाचें मंगलकृत्य करावयाचें त्या मुलाची माता जर रजस्वला झाली, तर त्याचें तें मंगलकृत्य करूं नये; केलें असतां त्याच्या आयुष्याचा नाश होतो. मौंजीबंधाच्या संस्कारांत

मुलानें मातेबरोबर एकत्र बसून भोजन करावें. हें भोजन झाल्यावर जर माता रजस्वला झाली, तर मौंजीबंधन करण्यास हरकत नाहीं; असें भगवान् जिनाचें सांगणें आहे. नांदीश्राद्ध केल्यानंतर जर कन्येची माता रजस्वला होईल तर कन्यादान एकट्या पित्यानेंच करावें; असें श्रीजिनानीं सांगितलें आहे.

उपनयनकाल व विधि.

शुभे ग्रहे शुभे योगे मौञ्जीबन्धोचितं सुतम् ॥
संस्नाप्य भूषयित्वा तं मात्रा सह तु भोजयेत् ॥ १६ ॥
केशानां मुण्डनं कृत्वा शिखाशेषं तु रक्षयेत् ॥
हरिद्राज्यसुसिन्दूरदूर्वादिकं विलेपयेत् ॥ १७ ॥
पुनः संस्नाप्य पुण्याहवारिभिः सिक्त्वा कुशाम्बुभिः ॥
आज्यभागावसानान्तैः सुगन्धिभिर्विलेपयेत् ॥ १८ ॥
नान्दीश्राद्धं च पूजां च होमं च वाद्यघोषणम् ॥
सर्वं कुर्याच्च तस्याग्रे पूर्ववद्गुरुपूजनम् ॥ १९ ॥

अर्थ— सर्व ग्रह शुभस्थानीं असतांना व शुभयोग असतांना मुंजीबंधनाला योग्य झालेल्या पुत्रास स्नान घालून, अलंकारानीं भूषित करून, त्याच्या मातेबरोबर त्यास भोजनास घालावें. नंतर त्याच्या

मस्तकाची शेंडी सोडून बाकीचें मुंडन करावें. मग त्याला हळद, तूप, सिंदूर, दुर्वा वगैरे द्रव्यांचें लेपन करून पुनः स्नान घालावें. त्याच्या मस्तकावर पुण्याहवाचनमंत्रांनीं दर्भमिश्रित उदकानें सेचन करून, त्याच्या शरीराला सुगंधिद्रव्यानें लेपन करावें. नांदीश्राध्द, पूजा, होम, मंगलवाद्याचा घोष वगैरे सर्व विधि करावा. नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें गुरूचें पूजन करावें.

आसन्ने सुमुहूर्ते तु ग्रहस्तोत्रादिकं पठेत् ॥
परमेष्ठिनमस्कारमन्त्रं च संस्मरेत्सदा ॥ २० ॥
पद्मासनस्थः पुत्रोऽसौ प्रमाद्यमुदगाननः ॥
निर्निमेषं निरीक्षेत पितास्यं जन्मशुद्धये ॥ २१ ॥
पुत्रस्य सन्मुखं स्थित्वा तत्पिता सुमुहूर्तके ॥
पुत्रास्यं दृष्ट्वा गन्धेन ललाटे तिलकं न्यसेत् ॥ २२ ॥

अर्थ— सुमुहूर्त जवळ आला ह्मणजे ग्रहांचीं स्तोत्रें वगैरे पठण करावीं. पंचपरमेष्ठींच्या नमस्कारमंत्राचें स्मरण करावें. मग पद्मासनानें बसलेल्या पुत्रानें आपल्या पित्याला संतुष्ट करण्याकरितां उत्तरेकडे तोंड करून आपल्या जन्माच्या शुध्दि ( उपनयनास दुसरा जन्म असें ह्मणतात ) करितां डोळे न मिटतां पित्याच्या मुखाकडे पहावें. पित्यानें पुत्राच्या सन्मुख बसून सुमुहूर्तावर पुत्राच्या मुखाकडे पाहून त्याच्या

कपालाला गंधाचा टिळा लावावा.

मौंजीधारण

मुञ्जत्रिवर्तिवलितां मौञ्जीं त्रिगुणितां शुभाम् ॥
कौपीनकटिसूत्रोर्ध्वं कटिलिंगं प्रकल्पयेत् ॥ २३ ॥

ॐ न्हीं कटिप्रदेशे मौंजीबन्धं प्रकल्पयामि स्वाहा ॥ इत्युक्त्वा कट्यां त्रिलिंगसम-न्वितां मौंजीं बध्नीयात् ॥

अर्थ— मुंज (मोळ) नांवाच्या गवताची तिपदून केलेली सुरेख दोरी, कौपीन आणि कटिसूत्र ह्याच्या [illegible] म्हणून "ओं न्हीं कटिप्रदेशे" इत्यादि मंत्राचा उच्चार करून-तीन गांठी देऊन बांधावी.

[illegible]भगवते तीर्थंकरपरमेश्वराय कटिसूत्रं कौपीनसहितं मौंजीबन्धनं [illegible]बन्धो भवतु अ सि आ उ सा स्वाहा ॥ इति कट्यां मुंजीं धृत्वा क्षिपेत् ॥

[illegible]र्हते" इत्यादि मंत्रानें ती मौंजी हातानें धरून तिच्यावर पुष्प अक्षता टाकाव्यात.

यज्ञोपवीत धारण

रत्नत्रयात्मकं सूत्रं यज्ञसूत्रं सुनिर्मलम् ॥

हरिद्रागन्धसाराक्तमुरोलिङ्गं प्रकल्पयेत् ॥ २४ ॥

ॐ नमः परमशान्ताय शांतिकराय पवित्रीकृतार्हं रत्नत्रयस्वरूपं यज्ञोपवीतं दधामि मम गात्रं पवित्रं भवतु अर्हं नमः स्वाहा ॥ इत्यनेन यज्ञोपवीतमुरसि धारयेत् ॥

अर्थ— रत्नत्रयस्वरूपी पवित्र आणि निर्मल असें यज्ञोपवीत हळद आणि चंदन ह्यांनीं चर्चित करून हृदयावरील चिन्ह समजून " ॐ नमः परमशान्ताय " इत्यादि मंत्र ह्मणून धारण करावें.

पुष्पमालादिधारण

जिनराजपदाम्भोजशेषसंसर्गपावनीम् ॥
ब्रह्मग्रन्थिं शिखामेव शिरोलिङ्गं प्रकल्पयेत् ॥ २५ ॥

ॐ नमोऽर्हते भगवते तीर्थंकरपरमेश्वराय कटिसूत्रपरमेष्ठिने ललाटे शेखरं शिखायां पुष्पमालां च दधामि मां परमेष्ठिनः समुद्धरन्तु ॐ श्रीं ह्रीं अर्हं नमः स्वाहा ॥ अनेन शिरसि पुष्पमालां धृत्वा तिलकं कृत्वा नवीनवस्त्रोत्तारियपरीधानं कुर्यात् ॥

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या पायांवरील गंध अक्षता ह्या पदार्थांचा स्पर्श ( नमस्काराच्या वेळीं ) होत असल्यानें पवित्र असलेली आणि ब्रह्मग्रंथीनें युक्त अशी जी शिखा तीच शिरोलिंग ( मस्तकावरील चिन्ह ) समजावें. " ॐ नमोऽर्हते " इत्यादि मंत्रानें मस्तकावर पुष्पमाला धारण करून कपालावर तिलक करून पांघरण्याचें

एक आणि नेसण्याचें एक अशीं दोन नवीन वस्त्रें धारण करावीत.

अन्तरीयोत्तरीये द्वे नूत्ने धृत्वा स मानवः ॥
आचम्य तर्पणान्यर्घ्यानपि कृत्वा यथाविधि ॥ २६ ॥
ततोऽञ्जलिं च संयोज्य गन्धाक्षतफलान्वितम् ॥
आचार्यं याचयेत्पुत्रो व्रतानि मुक्तिहेतवे ॥ २७ ॥
तच्छ्रुत्वा श्रावकाचाराद्व्रतानि गुरुरादिशेत् ॥
गृह्णीयात्तानि सम्प्रीत्या बीजमन्त्रं गुरोर्मुखात् ॥ २८ ॥

ॐ ऱ्हीं श्रीं क्लीं कुमारस्योपनयनं करोमि अयं विप्रोत्तमो भवतु अ सि आ उ सा स्वाहा ॥ इति त्रिरुच्चार्य अघोरं पञ्चनमस्कारमुपादिशेत् ॥

अर्थ— त्या कुमारानें नेसावयाचें आणि पांघरावयाचें अशीं दोन वस्त्रें धारण करून आचमन करून तर्पण आणि अर्घ्यदान यथाविधि करावें. नंतर आपलया अंजलींत गंध, अक्षता आणि फल हीं घेऊन आपलयास मोक्षाची प्राप्ति व्हावी ह्या इच्छेनें कुमारानें आपलयास व्रतें सांगण्याबद्दल आचार्याजवळ प्रार्थना करावी. ती कुमाराची याचना ऐकून आचार्यानें [ उपनयन करणाऱ्यानें ] श्रावकाचारांतून त्याला व्रतांचा उपदेश करावा कुमारानें त्या व्रतांचें आणि बीजमंत्रांचें संतोषानें ग्रहण करावें. कुमाराला व्रतांचा उपदेश कर-

ण्याच्या प्रसंगीं " ॐ ऱ्हीं श्रीं क्लीं " इत्यादि मंत्र आचार्यांनी तीन वेळां उच्चारून नंतर त्याला व्रतें आणि पंचनमस्कारमंत्र ह्यांचा उपदेश करावा.

उपनयनांगभूत दण्डधारण वगैरे विधि.

शुद्धं विवाहपर्यन्तं ब्रह्मचर्यं परिव्रजेत् ॥
त्रैवर्ण्याचारसूत्रं च छत्रदण्डसमन्वितम् ॥ २९ ॥
विप्रादीनां तु पालाशखादिरोदुम्बराः क्रमात् ॥
दण्डाः स्वोच्चास्तुरीयांशबद्धहारिद्रकर्पटाः ॥ ३० ॥
अग्नेरुत्तरतः स्थित्वा प्राङ्मुखस्त्रिजलाञ्जलीन् ॥
पुष्पाक्षतान्वितान् कृत्वा बटुस्तिष्ठेन्निजासने ॥ ३१ ॥
होमपूजादिकं कार्यं कृत्वा पूर्णाहुतिं गुरुः ॥
अग्रे यद्यत्तु कर्तव्यं तत्तु तस्मै निवेदयेत् ॥ ३२ ॥

अर्थ— कुमारानें विवाहापर्यंत ब्रह्मचर्यव्रत ग्रहण करावें. नंतर त्रैवर्णिकाचाराचें सूत्र, छत्र आणि दंड ह्यांचें ग्रहण करावें. दंड घ्यावयाचा तो ब्राह्मणानें पळसाचा, क्षत्रियानें खैराचा आणि वैश्यानें उंबराचा घ्यावा. तो दंड आपल्या उंची इतकाच उंच असावा. आणि त्याचा शेवटचा (वरील)

चतुर्थांश हळदीनें रंगविलेल्या कापडानें गुंडाळलेला असावा. मग त्या वटूनें अग्नीच्या उत्तरेकडे उभा राहून पूर्वेकडे तोंड करून, पुष्पें, अक्षता ह्यांनीं युक्त अशा जलाच्या तीन अंजली देऊन, आपल्या आसनावर बसावें. मग गुरूनें होम, पूजा वगैरे करून, पूर्णाहुति देऊन, पुढें जें जें करावयाचें तें सर्व त्या वटूला सांगावें.

निर्गत्य सदनाच्छिष्यस्त्वङ्गणे ह्याचमं परम् ॥
कृत्वा सूर्यं समालोक्य एकमर्घं समुत्तरेत् ॥ ३३ ॥
शमीव्रीह्यक्षतैर्लाजैः क्षीराज्यचरुभिस्तथा ॥
संसिञ्च्य जुहुयादग्नौ शान्त्यर्थं तिस्र आहुतीः ॥ ३४ ॥
संवृतौष्ठद्वयं वक्त्रं धौतं तापितपाणिना ॥
त्रिः समृज्याग्न्युपस्थानं कृत्वाऽग्निं विसृजेत्पुनः ॥ ३५ ॥
आविद्याभ्यसनं चान्ते भिक्षावृत्तिप्रयोजनम् ॥
गुरोरादेशमादाय बहिर्गच्छेत्स पात्रयुक् ॥ ३६ ॥

अर्थ,— मग वटूनें घरांतून निघून अंगणात यावें. आणि आचमन करून सूर्याला अवलोकन करून एक अर्घ्य द्यावें. नंतर अग्नीच्या सभोवतीं परिषेचन करून [ पाणी शिंपडून ] शमी, साळीचें भात, अक्षता,

लाह्या, दूध, तूप आणि चरु ह्याच्या तीन आहुती अग्नीत हवन कराव्यात. नंतर दोनी ओंठ मिटून पाण्यानें मुखप्रक्षालन करून आपले हात अग्नीवर तापवून मुखावरून—वरून खाली ह्याप्रमाणे तीन वेळ—फिरवावत. ह्मणजे हातांनीं तोंड तीन वेळ पुसावें. मग अग्नीचें उपस्थान (स्तुति) करून अग्नीचें विसर्जन करावे. वटूनें विद्याभ्यास होईपर्यंत भिक्षा मागावयाची असते. ह्मणून गुरूची आज्ञा घेऊन भिक्षेचे पात्र हातांत घेऊन घरांतून बाहेर निघावें.

भिक्षाटनाचा विधि

सव्यपादं विधायाग्रे शनैर्गच्छेद्गृहाद्बहिः ॥
ब्राह्मणानां गृहे गत्वा भिक्षां याचेत शिक्षया ॥ ३७ ॥
भिक्षाकाले तु निःशङ्को भिक्षां देहीति वाग्वदेत् ॥
यथा शृण्वन्ति गेहस्थास्त्रिवर्णाचारसंयुताः ॥ ३८ ॥
प्रथमकरणादी द्वौ चरणद्रव्ययुग्मकम् ॥
अनुयोगाश्च चत्वारः शाखा विप्रमते मताः ॥ ३९ ॥
तासां मध्ये तु या शाखा यस्य वंशे प्रवर्तते ॥
तामुक्त्वा गृहिणी तस्मै सन्दद्यात्तण्डुलाञ्जलिम् ॥ ४० ॥

अर्थ— त्या बटूनें उजवा पाय पुढे करून (प्रथम पुढे टाकून) घरातून हळू हळू बाहेर जावें. त्यानें ब्राह्मणाच्या घरीं जाऊन; गुरूनें शिकविल्याप्रमाणें भिक्षा मागावी. भिक्षा मागावयाच्या वेळीं न लाजतां घरांतील मंडळीस ऐकूं जाईल इतक्या मोठ्या स्वरानें "भिक्षां देहि" असें वाक्य उच्चारावें. जैनमतांत प्रथमानुयोग, करणानुयोग, चरणानुयोग, आणि द्रव्यानुयोग अशा ब्राह्मणाच्या चार शाखा आहेत. त्यांपैकीं जी शाखा आपल्या कुळांत परंपरेनें चालू असेल त्या शाखेचें नाव घेऊन घरांतील स्त्रीनें ओंजळभर तांदळाची भिक्षा घालावी.

भिक्षायाचनकं दृष्ट्वा बन्धुवर्गो वदेदिदम् ॥
दूरदेशान्तरे पुत्र मा गच्छ त्वं तु बालकः ॥ ४१ ॥
अत्रैव गुरुसान्निध्ये विद्याभ्यासं सदा कुरु ॥
मध्ये कुटुम्बवर्गस्य सर्वेषां सुखदायकः ॥ ४२ ॥
अङ्गीकृत्य वचस्तेषां गच्छेच्चासौ जिनालयम् ॥
क्रियां कुर्यात्तु होमादिसम्भवां जिनपूजनम् ॥ ४३ ॥
ब्राह्मणादींस्ततः सर्वान् भोजयित्वा यथाविधि ॥
वस्त्रभूषणताम्बूलैः पुण्यार्थं परिपूजयेत् ॥ ४४ ॥

अर्थ— त्या कुमारास भिक्षा मागत असलेला पाहून त्याच्यावर प्रेम करणाऱ्या लोकांनी त्याला 'बाळा! तूं लहान आहेस! ह्मणून भिक्षा मागण्याकरिता फार लाब जाऊं नको; येथेंच गुरूजवळ राहून विद्याभ्यास कर! आणि कुटुंबांत सर्वांना संतोषित कर!!!' असें सांगावें. त्या त्यांच्या भाषणाचा स्वीकार करून, त्या कुमारानें जिनमंदिरांत जाऊन होम, पूजा वगैरे क्रिया करावी. मग ब्राह्मण वगैरे सर्व मंडळीस भोजन घालून, वस्त्रें, भूषणें आणि तांबूल ह्यांच्या योगानें पुण्यप्राप्तीकरितां त्यांचा सत्कार करावा.

बोधिपूजन ( अश्वत्थपूजन )

चतुर्थवासरे चापि संस्नातः पितृसन्निधौ ॥ संक्षिप्तहोमपूजादि कर्म कुर्याद्यथोचितम् ॥ ४५ ॥ शुचिस्थानस्थितं तुङ्गं छेददाहादिवर्जितम् ॥ मनोज्ञं पूजितुं गच्छेत्सुयुक्त्याऽश्वत्थभूरुहम् ॥ ४६ ॥ दर्भपुष्पादिमालाभिर्हरिद्राक्तसुतन्तुभिः ॥ स्कन्धदेशमलकृत्य मूलं जलैश्च सिंचयेत् ॥ ॥ ४७ ॥ वृक्षस्य पूर्वदिग्भागे स्थण्डिलस्थाग्निमण्डले ॥ नव नव समिद्भिश्च होमं कुर्याद्घृतादिकैः ॥ ४८ ॥ पूतत्वयज्ञयोग्यत्वबोधित्वाद्या भवन्तु मे ॥ त्वद्वद्बोधिद्रुमत्वं च मद्वचिन्हधरो भव ॥४९॥ तं वृक्षमिति सम्प्रार्थ्य सर्वमंगलहेतुकम् ॥ वृक्ष वन्हि त्रिः परीत्य ततो गच्छेद्गृहं

मुदा ॥ ५० ॥ एवं कृते न मिथ्यात्वं लौकिकाचारवर्तनात् ॥ भोजना-
नन्तरं सर्वान् सन्तोष्य निवसेद्‌गृहे ॥ ५१ ॥ प्रतिमासं क्रियां कुर्या-
द्धोमपूजापुरःसराम् ॥ श्रावणे तु विशेषेण सा क्रियाऽऽवश्यकी मता ॥ ५२ ॥

अर्थ — पूर्वी सांगितल्याप्रमाणे उपनयन झाल्यापासून चवथ्या दिवशी त्या कुमाराने आपल्या पित्याच्या सन्निध (चौकोनाच्या जागेत) स्नान करून; होम, पूजा, वगैरे कृत्य संक्षेपानें यथाविधि करावें. मग शुद्ध जाग्यात असलेला, उंच आणि न जळलेला व न तोडलेला असा एक सुंदर पिंपळाचा वृक्ष पाहून त्याची पूजा करण्याकरिता त्या ठिकाणी कुमारानें गमन करावें. दर्भ, पुष्पांच्या माला, हळदीनें रंगविलेलें सूत, ह्यांच्या योगानें त्या पिंपळाच्या डहाळीला सुशोभित करून; त्याच्या मुळाला पाणी घालावें. त्या वृक्षाच्या पूर्वेकडील बाजूस स्थंडिल घालून त्यावर अग्नि तयार करावा. आणि त्या अग्नीत तूप वगैरे पदार्थ आणि नऊ नऊ समिधा ह्यांच्या योगानें होम करावा. नंतर "हे महावृक्षा ! माझी सर्व चिन्हे मी तुला समर्पण करीत आहे. तुझ्याप्रमाणे माझाही यज्ञकर्मात उपयोग होवो. तुझ्याप्रमाणें माझ्या ठिकाणीही पवित्रत्व असूं दे! आणि तुझ्याप्रमाणे माझ्या ठिकाणी बोधित्व असूं दे. तूंही माझी चिन्हे धारण कर." ह्याप्रमाणे त्या सर्व मंगलाला साधनीभूत असलेल्या वृक्षाची प्रार्थना करून व अग्निसहित त्या वृक्षाला तीन प्रदक्षिणा करून नंतर त्या वटून आनंदाने आपल्या घरीं जावें.

ह्याप्रमाणें हा विधि केला म्हणजे तो वटु केव्हांही मिथ्यात्वी होत नाहीं. मग लौकिकाचाराला अनुसरून सर्वांना भोजन घातल्यावर त्याचा संतोष करून वटूनें स्वस्थपणें स्वगृहीं रहावें. पुढें प्रत्येक महिन्याला वटूनें ही क्रिया, होम पूजा वगैरे विधिपूर्वक करावी. त्यांत श्रावण महिन्यांत अवश्य करावी.

उपनयन होऊन वर्ष झाल्यानंतरची क्रिया

वर्षेऽतीते त्रिकालेषु सन्ध्यावन्दनसत्क्रियाम् ॥
सदा कुर्यात्स पुण्यात्मा यज्ञोपवीतधारकः ॥ ५३ ॥

अर्थ— पुढें एक वर्ष समाप्त झाल्यावर त्या शुद्ध अंतःकरणाच्या कुमारानें त्रिकालीं संन्ध्यावदन क्रिया करावी.

यज्ञोपवीतसंख्या

उपवीतं वटोरेकं द्वे तथेतरयोः स्मृते ॥
एकमेव महत्पूतं सावधिब्रह्मचारिणाम् ॥ ५४ ॥
यज्ञोपवीते द्वे धार्ये पूजायां दानकर्मणि ॥
तृतीयमुत्तरीयार्थं वस्त्राभावे तदिष्यते ॥ ५५ ॥
स्कन्धादिनाभिपर्यन्तं ब्रह्मसूत्रं पवित्रकम् ॥

न्यूने रोगप्रवृत्तिः स्याद्धिके धर्मनाशनम् ॥ ५६ ॥
आयुःकामः सदा कुर्यात् द्वित्रियज्ञोपवीतकम् ॥
पञ्चभिः पुत्रकामः स्याद्धर्मकामस्तथैव च ॥ ५७ ॥
यज्ञोपवीतेनैकेन जपहोमादिकं कृतम् ॥
तत्सर्वं विलयं याति धर्मकार्यं न सिध्यति ॥ ५८ ॥
पतितं त्रुटितं वाऽपि ब्रह्मसूत्रं यदा भवेत् ॥
नूतनं धारयेद्विप्रः स्नानसङ्कल्पपूर्वकम् ॥ ५९ ॥
यज्ञोपवीतमेकैकं प्रतिमन्त्रेण धारयेत् ॥
आचम्य प्रतिसङ्कल्पं धारयेन्मुनिरब्रवीत् ॥ ६० ॥
एकमन्त्रैकसङ्कल्पं धृतं यज्ञोपवीतकम् ॥
एकस्मिँस्त्रुटिते सर्वं त्रुटितं नात्र संशयः ॥ ६१ ॥

अर्थ— आतां यज्ञोपवीताविषयीं सांगतात. बटूनें एक यज्ञोपवीत घालावें. गृहस्थ आणि वानप्रस्थ ह्यांनीं दोन दोन घालावींत. आणि सानाविब्रह्मचर्य करणारानेंही पवित्र असें एकच यज्ञोपवीत घालावें. पूजा आणि दानकर्म ह्या क्रिया करताना दोन यज्ञोपवीतें असावींत. आणि तिसरें यज्ञोपवीत उत्तरीय

वस्त्राकरिता असावें. कारण वस्त्र नसल्यास त्याचा उपयोग होतो. यज्ञोपवीत तालूच्या छिद्रापासून नाभीपर्यंत लांब असावें. त्यापेक्षां न्यून असल्यास रोगोत्पत्ति होते. आणि अधिक असल्यास धर्माचा नाश होतो. आयुष्याची इच्छा करणाऱ्यानें दोन किंवा तीन यज्ञोपवीतें घालावींत. आणि पुत्राची इच्छा करणाऱ्यानें व धार्मिक होण्याची इच्छा करणाऱ्यानें पांच यज्ञोपवीतें घालावींत. एकच यज्ञोपवीत घालून जर जप होम वगैरे कृत्य केलें तर तें कृत्य निष्फल होतें आणि धर्मकृत्याची सिद्धि होत नाहीं. ज्यावेळीं यज्ञोपवीत गळ्यांतून पडेल किंवा तुटेल, त्यावेळीं स्नान करून दुसरें यज्ञोपवीत धारण करावें. दोन किंवा अधिक यज्ञोपवीतें धारण करणाऱ्यांनीं प्रत्येक यज्ञोपवीत धारण करतांना मंत्र आणि संकल्प वेगळा वेगळा म्हणावा, आणि यज्ञोपवीत धारण करावें. असें मुनींनीं सांगितलें आहे. कारण, एकदाच मंत्र म्हणून जर सर्व यज्ञोपवीतें एकदम धारण केलीं तर तीं सर्व एकरूप झाल्यामुळें त्यांतील एक तुटलें असतां तीं सर्व तुटलीं असें समजावें लागेल; ह्यांत संशय नाहीं.

यज्ञोपवीत तुटलें म्हणजे

यज्ञोपवीतं चानन्तं मुञ्जीं दण्डं च धारयेत् ॥
नष्टे भ्रष्टे नवं धृत्वा नष्टं नैव जले क्षिपेत् ॥ ५२ ॥

अर्थ-- यज्ञोपवीत, अनंत, मुंजी आणि दंड ह्या वस्तु श्रावकानें सर्वदा धारण कराव्यात. त्यांपैकीं यज्ञो-

पवीत, अनंत आणि मुंजी हीं तुटलीं असता किंवा गळ्यातून वगैरे पडलीं असतां नवीन धारण करावीत. आणि तीं जलांत टाकून द्यावींत. त्याचप्रमाणें दंड मोडला असतां नवीन घ्यावा. आणि मोडलेला पाण्यांत टाकून द्यावा.

उत्तरीयवस्त्रधारण

सदोपवीतवच्चार्यं वासः सकलकर्मसु ॥
सह यज्ञोपवीतेन बध्नीयाज्जलकर्मणि ॥ ६३ ॥

अर्थ— यज्ञोपवीताप्रमाणेंच ( डाव्या खांद्यावरून व उजव्या हाताच्या खालून ) उत्तरीय वस्त्रहि सर्व कर्मांत धारण करावें. आणि जलातील कर्म करावयाचें असताना तें उत्तरीयवस्त्र यज्ञोपवीतावरोबर बांधावें.

वर्णभेदानें यज्ञोपवीतभेद

कार्पासमुपवीतं स्याद्विप्रस्योर्ध्वं त्रिवृत्कृतम् ॥
हेमसूत्रमयं राज्ञो वैश्यस्य पट्टसूत्रकम् ॥ ६४ ॥
उच्छिष्टं नोरणं छिन्नं छिद्रितं विनयाकुलम् ॥
भुक्तोत्सरे त्वलक्ष्याये सक्षान्तु न धारयेत् (?) ॥ ६५ ॥
सूतके पातके म्लाने तैलस्याभ्यङ्गके तथा ॥

कण्ठादुत्तार्य सूत्रं तु कुर्युर्वै क्षालनं द्विजाः ॥ ६६ ॥ इति यज्ञोपवीतकर्म ॥

अर्थ— ब्राह्मणांनी कापसाचें यज्ञोपवीत धारण करावें. क्षत्रियांनीं सुवर्णाचें आणि वैश्यांनीं पट्टसूत्राचें यज्ञोपवीत धारण करावें. तोंडात धरलेलें, दोनी हातानीं धरून गळ्यातून वर उचललेलें, तुटलेलें, दोघांनीं सूत काढून केलेलें, विधवेनें सूत काढून केलेलें, भोजनानंतर केलेलें, आणि अनध्यायाच्या दिवशीं केलेलें असें सप्ततंतु (यज्ञोपवीत ह्यावरून यज्ञोपवीत सात पदरांचें असावें असें दिसतें) धारण करूं नये. आशौच संपलें असतां, पातक केलें असता, यज्ञोपवीत मलिन झालें असता, अंगांना तेल लावून स्नान करावयाचें असता, त्रैवर्णिकांनीं यज्ञोपवीत गळ्यातून बाहेर काढून स्वच्छ धुवावें. ही यज्ञोपवीतक्रिया सांगितली.

व्रतचर्यामहं वक्ष्ये क्रियामस्योपबिभ्रतः ॥

कट्यूरूरःशिरोलिङ्गमनूचानव्रतोचितम् । ६७ ॥

अर्थ— गुरुजवळ अध्ययन करणाऱ्या शिष्याला उचित अशीं—कंबर, मांड्या, हृदय आणि मस्तक ह्यांचीं—चिन्हें धारण करणाऱ्या त्या कुमाराची व्रतचर्या सांगतो

कटिलिंग

कटिलिङ्गं भवेदस्य मौञ्जीबन्धं त्रिभिर्गुणैः ॥

रत्नत्रयविशुद्ध्यर्थं तद्धि चिन्हं द्विजन्मनाम् ॥ ६८ ॥

अर्थ— तीन रज्जूंनी केलेली मौंजी ही या वटूचें कटिलिंग होय. ती ज्याअर्थी रत्नत्रयाच्या विशुद्धीचें साधन असल्यानें ती त्रैवर्णिकांचें चिन्ह आहे.

ऊरुलिंग

तच्चेष्टकरुलिंगं च सधौतमितशाटकम् ॥

आर्हतानां कुलं पूतं विशालं चेति सूचने ॥ ६९ ॥

अर्थ— जिनमताचें अनुसरण करणाऱ्यानें कुल पवित्र असून विशाल आहे हें दाखविण्याकरिता त्या वटूला धुतलेलें शुभ्रवर्ण असें नेमण्याचें वस्त्र हें ऊरूंचें ( मांड्यांचें ) चिन्ह अवश्य असलें पाहिजे.

उरोलिंग ( हृदयाचें चिन्ह )

उरोलिङ्गमथास्य स्याद्ग्रन्थितं सप्तभिर्गुणैः ॥

यज्ञोपवीतकं सप्तपरमस्थानसूचकम् ॥ ७० ॥

अर्थ— सात जीं परमस्थानें त्यांचें सूचक असें सात सूत्रांनीं तयार केलेलें यज्ञोपवीत हें ह्या वटूचें हृदयावरील चिन्ह होय.

शिरोलिंग

शिरोलिंगं च तस्येष्टं परं मौण्ड्यमनाविलम् ॥
मौण्ड्यं मनोवचःकायगतमस्योपबृंहितम् ॥ ७१ ॥

अर्थ— मुंडन हें या वटूच्या मस्तकाचें चिन्ह अवश्य असलें पाहिजे. त्या योगानें याचें मन, वाणी आणि शरीर यांच्या मुंडनाची ( निर्दोषतेची ) वृद्धि होते.

एवम्प्रायेण लिङ्गेन विशुद्धं धारयेद्व्रतम् ॥ ७२ ॥
स्थूलहिंसाविरत्यादि ब्रह्मचर्योपबृंहितम् ॥

अर्थ— अशा प्रकारच्या या चार चिन्हांनीं युक्त असल्यानें शुद्ध अशीं स्थूलहिंसाविरति, ब्रह्मचर्य वगैरे व्रतें त्या वटूनें धारण करावीं.

ब्रह्मचाऱ्याला निषिद्ध आचार

दन्तकाष्ठग्रहो नास्य न ताम्बूलं न चाञ्जनम् ॥
न हरिद्रादिभिः स्नानं शुद्धिस्नानं दिनम्प्रति ॥ ७३ ॥
न खट्वाशयनं तस्य नान्याङ्गपरिघट्टनम् ॥
भूमौ केवलमेकाकी शयीत व्रतशुद्धये ॥ ७४ ॥

अर्थ— या वटूनें दंतधावन करूं नये. तांबूल भक्षण, डोळ्यांत काजळ घालणें, हळद लावून स्नान

करणें हे व्यापार करूं नयेत. त्यानें शरीरशुद्धीकरितां मात्र प्रतिदिवशीं स्नान करावें. ह्यानें माच्यावर किंवा पलंगावर निजूं नये. दुसऱ्याच्या अंगाशीं आपलें अंग घासूं नये. एकट्यानें भूमीवर निजावें. म्हणजे शुद्धव्रताचें पालन होतें.

व्रतावतरण

श्रावणे मासि नक्षत्रे श्रवणे पूर्ववत्क्रियाम् ॥
पूर्वहोमादिकं कुर्यान्मौञ्जीं कट्याः परित्यजेत् ॥ ७५ ॥
तत आरभ्य वस्त्रादीन् गृह्णीयात्परिधानकम् ॥
शय्यां शयीत ताम्बूलं भक्षयेद्गुरुसाक्षितः ॥ ७६ ॥

अर्थ— पुढें श्रावण महिन्यांतील श्रवणनक्षत्रावर पूर्वीप्रमाणें होमादिक क्रिया करून त्या बटूनें कंबरेची मुंजी सोडून टाकावी. मग त्या दिवसापासून वस्त्रें धारण करावीत. शय्येवर निजावें. आणि तांबूलभक्षणही करावें. ह्या क्रिया गुरूच्या साक्षीनें कराव्यात.

दुसरा पक्ष

अथवा— यावद्विद्यासमाप्तिः स्यात्तावदस्येदृशं व्रतम् ॥
ततोऽप्यूर्ध्वं व्रतं तु स्याद्यन्मूलं गृहमेधिनाम् ॥ ७७ ॥

सूत्रमौपासकं चास्य स्यादध्येयं गुरोर्मुखात् ॥
विनयेन ततोऽन्यच्च शास्त्रमध्यात्मगोचरम् ॥ ७८ ॥

अर्थ— किंवा विद्या समाप्त होईपर्यंत ह्या वटूनें पूर्वी सांगितलेलें व्रत करावें. आणि विद्यासमाप्ति झाल्यानंतर गृहस्थांचीं व्रतें ग्रहण करावीत. त्या वटूनें उपासकसूत्रांचें अध्ययन गुरुमुखापासून करावें. नंतर अध्यात्मशास्त्राचें अध्ययन करावें. तात्पर्य त्या वटूनें पूर्वी सांगितल्याप्रमाणें श्रावणमासीं व्रतत्याग करावा; किंवा विद्याध्ययनाची समाप्ति झाल्यावर करावा.

व्रतावतरणविधीचा मुख्यकाल आणि तदुत्तर व्यवहार

व्रतावतरणं चेदं गुरुसाक्षिकृतार्चनम् ॥
वत्सरात् द्वादशादूर्ध्वमथवा षोडशात्परम् ॥ ७९ ॥
वस्त्राभरणमाल्यादिग्रहणं गुर्वनुज्ञया ॥
शस्त्रोपजीविवर्ग्यश्चेद्धारयेच्छस्त्रमप्यदः ॥ ८० ॥
वैश्यश्चेद्व्यवहारादिव्यापारं कारयेन्मुदा ॥
दोषे जाते त्रयो वर्णाः प्रायश्चित्तं हि कुर्वते ॥ ८१ ॥

अर्थ— ह्या क्रियेस व्रतावतरणक्रिया (व्रतसमाप्ति) असें म्हणतात. ह्यात गुरूच्या समक्ष पूजा होम

[illegible] सोळा वर्षांनी करावी. ती क्रिया [illegible]
[illegible] पर्यंत [illegible]
[illegible] व्यापार करावा. [illegible]
आपल्या हातून कांहीं दोष झाल्यास पुढे लिहिलेली प्रायश्चित्तें करावीत.

दोष आणि प्रायश्चित्त

अथ प्रायश्चित्तम् ॥ मद्यमांसमधु भुंक्ते अज्ञानात्पलपञ्चकम् ॥
उपवासत्रयं चैकभक्तं द्वादशकं तथा ॥ ८२ ॥
अन्नदानान्यष्टैकस्मिन् प्रत्येकाद्दोत्तरं सानम् ॥
तीर्थयात्राद्वयं पुष्पाक्षतानां व्ययः स्वशक्तितः ॥ ८३ ॥

अर्थ— मद्य, मांस आणि मध हे पदार्थ जर पांच तोळ्यापर्यंत न समजून भक्षण केले, तर तीन उपवास करून बारा दिवस एकभक्त (एकवार भोजन) करावें. एकएकाचे आठ अन्नदानें आणि तितकींच स्नानें करावीत. दोन वेळ तीर्थयात्रा करावी. आणि पुष्पें आणि अक्षता यांचा व्यय आपल्या शक्तीप्रमाणें करावा.

म्लेच्छादिकाच्या घरीं भोजनाचे प्रायश्चित्त

म्लेच्छादीनां च गेहे तु भुक्ते त्रिंशदुपोषणम् ॥
एकभुक्तानि पञ्चाशत्पात्रदानं शतद्वयम् ॥ ८४ ॥
एका गौः पञ्च कुम्भाश्चाभिषेकानां शतद्वयम् ॥
[illegible] तीर्थयात्राद्वयं कुर्या[illegible] ॥ ८५ ॥

अर्थ— म्लेच्छ [illegible] घरात त्यांचे अन्न [illegible] भोजन केले असता, तीस उपोषणे करावीत. पन्नास दिवस एकभुक्त करणे. दोनशे सत्पात्राला [illegible]. एक गाय आणि पाच कलश दान करावेत. दोनशे स्नाने करावीत. पुष्प आणि [illegible] आपल्या शक्तीप्रमाणे व्यय करावा. आणि दोन वेळ तीर्थयात्रा कराव्यात

विजातीयगृहभोजनप्रायश्चित्त

विजातीयानां गेहे तु भुक्ते चोपोषणं नव ॥
एकभक्ताश्च पञ्चाशदत्राभिषेकाः स्मृताः ॥ ८६ ॥

अर्थ— विजातीयाच्या घरी भोजन केले असता, नऊ उपोषणे आणि पंधरा दिवस एकभुक्त व पंधरा स्नाने करावीत.

अग्नीत देहत्यागाचे प्रायश्चित्त

मृतेऽग्नौ पातके प्रोक्ताः प्रोपधाः पञ्चविंशतिः ॥
एकभुक्त्यन्नदानाभिषेकपुष्पशतत्रयम् ॥ ८७ ॥

अर्थ— अग्नीमध्यें देह टाकून जर कोणी मृत झाला असेल तर त्याच्या पातकनाशाकरितां त्याचें और्ध्वदेहिक करणाऱ्यानें पचवीस प्रोपधोपवास करावेत. आणि एकभक्त, अन्नदान, स्नान आणि पुष्पें ही प्रत्येक तीनशेहे करावीत.

गिरिपतनादिप्रायश्चित्त

गिरेः पातोऽहिदष्टश्च गजादिपतनान्मृतः ॥
प्रोपधाः पञ्च पक्वान्नयात्राभिषेकविंशतिः ॥ ८८ ॥
तीर्थयात्राश्च गोदानं गन्धपुष्पाक्षताद्यः ॥
यथाशक्ति गुरोः पूजा द्रव्यदानं जिनालये ॥ ८९ ॥

अर्थ— डोंगराच्या कड्यावरून पडणें, सर्पदंश, हत्ती वगैरे वरून पडणें ह्या योगानें जर कोणी मृत झाला असेल, तर त्याच्याकरिता और्ध्वदेहिक (उत्तरक्रिया) करणाऱ्याने पाच प्रोपधोपवास करावेत. वीस सत्पात्राना अन्नदान करावें. वीस स्नानें करावीत. आणि तीर्थयात्रा, गोदान, गंध, पुष्प, अक्षता, गुरुपूजा, जिनालयांत द्रव्य देणें हे सर्व आपल्या शक्तीप्रमाणे करावें.

प्रायश्चित्तेषु सर्वेषु शिरोमुण्डं विधीयते ॥
काश्मीरागुरुपुष्पादिद्रव्यदानं स्वशक्तितः ॥ ९० ॥
ग्रहपूजा यथायोग्यं विप्रेभ्यो दानमुत्तमम् ॥
संघपूजा गृहस्थेभ्यो ह्यन्नदानं प्रकीर्तितम् ॥ ९१ ॥

अर्थ-- सर्व प्रकारच्या प्रायश्चित्तात शिरोमुंडन अवश्य केलें पाहिजे केशर, चंदन, पुष्पें वगैरे देणें आणि जिनालयात द्रव्य देणें, हें आपल्या शक्तीप्रमाणें करावें. तसेंच ग्रहपूजा, ब्राह्मणांना गाय वगैरे देणें, संघपूजा आणि गृहस्थांना अन्नदान, हे सर्व विधि प्रायश्चित्तांत अवश्य केले पाहिजेत.

चांडालादिसंसर्गप्रायश्चित्त.

चाण्डालादिकसंसर्गं कुर्वन्ति वनितादिकाः ॥
पञ्चाशत्प्रोषधश्चैकभक्तः पञ्चशतानि च ॥ ९२ ॥
सुपात्रदानं यात्राश्च पञ्चाशत्पुष्पचन्दनम् ॥
सङ्घपूजा च जापं च द्रव्यदानं जिनालये ॥ ९३ ॥

अर्थ— घरांतील स्त्रिया वगैरे चांडालादिकांना स्पर्श करितात, त्याबद्दल पन्नास प्रोषधोपवास ज्यांनीं चांडालादिकांशीं संगर्ग केला असेल, त्यांनीं करावेत. पांचशेंहे एकभक्तें करावींत. पन्नास सुपात्रांना

अन्नदान करावें. यात्रा कराव्यात. पुष्प आणि चंदन हीं पन्नास लोकांना द्यावींत. मंत्रपूजा, जप, जिनालयांत द्रव्यदान हे व्यवहार यथाशक्ति करावेत.

मालिकादिशूद्रसंसर्गप्रायश्चित्त

मालिकादिकसंसर्गं कुर्वन्ति वनितादयः ॥
प्रोषधाः पञ्च चैकादश पात्राणि चिंशतिः ॥ ९४ ॥

अर्थ— माळी वगैरे लोकांशीं स्त्रियादिकांचा संसर्ग होतो त्यास प्रायश्चित्त पांच प्रोषधोपवास, दहा एक भक्त, आणि तीस सुपात्राना अन्नदान वगैरे करावें.

अशुचिसंसर्गप्रायश्चित्त

सूतके जन्ममृत्योश्च प्रोषधाः पञ्च शक्तितः ॥
एकभक्ता दशैकान्यपात्रदानं च चन्दनम् ॥ ९५ ॥

अर्थ—जन्म मृत्यु संबंधाच्या आशौचात संसर्ग झाला असता आपल्या शक्तीप्रमाणें पांच प्रोषधोपवास करावेत. एकभक्त एकापासून दहापर्यंत. पात्रदान आणि चंदन यांचेंही प्रमाण एकापासून दहापर्यंत करावें.

अग्नि पुढ्यात गेले असता प्रायश्चित्त

आयाते मुखेऽग्निमण्डे चोपवासास्त्रयो मताः ॥

एकभुक्ताश्च चत्वारो गन्धाक्षताः स्वशक्तितः ॥ ९६ ॥

अर्थ—आपल्या तोंडात कोणत्याही कारणानें अस्थीचा तुकडा आला असतां तीन उपवास करावेत. चार एकभक्तें करावीत. आणि गंध, अक्षता ह्यांचें प्रमाण आपल्या शक्तीप्रमाणें समजावें.

अस्थिस्पर्शप्रायश्चित्त

स्पर्शितेऽस्थिकरे स्वाङ्गे स्नात्वा जपशतत्रयम् ॥
अस्थि यथा तथा चर्मकेशश्लेष्ममलादिकम् ॥ ९७ ॥

अर्थ—अस्थि ज्याच्या हातात आहे असा मनुष्य आपल्या शरीराला स्पर्श करील तर तत्काल स्नान करून तीनशेहे जप करावा. कातडें, केश, थुंकी, मल वगैरेंच्या स्पर्शासंबंधानें हेंच प्रायश्चित्त समजावें.

गर्भपातनप्रायश्चित्त.

गर्भस्य पातने पापे प्रोषधा द्वादश स्मृताः ॥
एकभक्ताश्च पञ्चाशत् पुष्पाक्षताश्च शक्तितः ॥ ९८ ॥

अर्थ—गर्भपाताचें पातक केलें असतां, बारा प्रोषधोपवास करावेत पन्नास एकभक्त आणि अक्षता आणि पुष्पें ( श्रीजिनेंद्रावर चढविण्याची ) ह्यांचें प्रमाण आपल्या शक्तीप्रमाणें समजावें.

द्वीन्द्रियादिघातप्रायश्चित्त

अज्ञानाद्वा प्रमादाद्वा विकलत्रयघातने ॥
प्रोषधा स्त्रित्रिचत्वारो जपमालास्तथैव च ॥ ९९ ॥

अर्थ— न समजून किंवा चुकीनें द्वीन्द्रिय, त्रींद्रिय आणि चतुरिंद्रिय या जीवांचा नाश आपल्याकडून झाला असतां क्रमानें दोन, तीन, चार प्रोषधोपवास करावेत. आणि जपाच्या माला तितक्याच. ह्मणजे दोन तीन चार कराव्यात. तात्पर्य दोनशेहे, तीनशेहे, चारशेहे जप करावा.

तृणभक्षकपशूंचें प्रायश्चित्त

घातिते तृणभुग्जीवे प्रोषधा अष्टाविंशतिः ॥
पात्रदानं च गोदानं पुष्पाक्षताः स्वशक्तितः ॥ १०० ॥

अर्थ—गवत खाणाऱ्या जीवांचा नाश केला असतां अठ्ठावीस प्रोषधोपवास करावेत. पात्रदान, गोदान आणि फुलें व अक्षता चढविणें हें आपल्या शक्तीप्रमाणें करावें.

जलचरस्थलचरमूषकमार्जारादिवधप्रायश्चित्त

जलस्थलचराणां तु पक्षिणां घातकः पुमान् ॥
गृहे मूषकमार्जारश्वादीनां दन्तदोषिणाम् ॥ १०१ ॥
प्रोषधा द्वादशैकान्ताभिषेकाश्चानु षोडश ॥

गोदानं पात्रदानं तु यथाशक्ति गुरोर्मुखात् ॥ १०२ ॥

अर्थ— जलचर, स्थलचर, पक्षी आणि घरांतील उंदीर, मांजर, श्वान वगैरे ज्यांच्या दांतांत विष आहे अशा प्राण्यांचा वध करणाऱ्या मनुष्यानें बारा प्रोषधोपवास करावेत. आणि एकभक्त व स्नानें सोळा सोळा करावींत तसेंच गोप्रदान, पात्रदान हीं गुरु सांगील त्याला अनुसरून आपल्या शक्तीप्रमाणें करावींत.

गवादिवधप्रायश्चित्त

गोमहिषीछागीनां वधकर्ता त्रिविंशतिः ॥
प्रोषधानेकभक्तानां शतं दानं तु शक्तितः ॥ १०३

अर्थ— गाय, म्हैस, शेळी ह्यांचा वध करणाऱ्यानें तेवीस प्रोषधोपवास करावेत. शंभर एकभक्त करावेत आणि पात्रदानें आपल्या शक्तीप्रमाणें करावींत.

मनुष्यवधप्रायश्चित्त

मनुष्यघातिनः प्रोक्ता उपवासाः शतत्रयम् ॥
गोदानं पात्रदानं तु तीर्थयात्राः स्वशक्तितः ॥ १०४ ॥

अर्थ— मनुष्याचा वध करणाऱ्यानें तीनशेहे उपवास करावेत; आणि गोदान, पात्रदान व तीर्थयात्रा

हीं आपल्या शक्तीप्रमाणें करावीत.

आपल्याकरिता मनुष्यवध झाला असता प्रायश्चित्त

यस्योपरि मृतो जीवो विषादिभक्षणादिना ॥
क्षुधादिनाऽथवा भृत्ये गृहदाहे नरः पशुः ॥ १०५ ॥
कूपादिखनने वाऽपि स्वकीयेऽत्र तडागके ॥
स्वद्रव्ये द्रव्यगे भृत्ये मार्गे चौरेण मारिते ॥ १०६ ॥
कुड्यादिपतने चैव रण्डावन्हौ प्रवेशने ॥
जीवघातिमनुष्येण संसर्गे क्रयविक्रये ॥ १०७ ॥
प्रोषधाः पञ्च गोदानमेकभक्ता द्विपञ्चकाः ॥
संघपूजा दयादानं पुष्पं चैव जपादिकम् ॥ १०८ ॥

अर्थ— आपल्याकरितां एखाद्या मनुष्यानें विष भक्षण करून प्राण दिला असतां, किंवा कोणी मनुष्य आपल्याकरितां क्षुधेने मेला असतां, किवा आपले घर पेटलें असतां त्यांत एखादा नोकर किवा एखादें जनावर मेलें असतां; आपला आड, विहीर वगैरे खाणींत असतांना कोणी मेलें असतां, आपलें द्रव्य घेऊन येणारा नोकर वाटेंत चोरांनी मारला गेला असता, आपल्या घराची भित पडून कोणी मेलें असता,

एखाद्या विधवेनें आपल्या सांगण्यानें अग्निप्रवेश केला असता ( सती गेली असतां ), जीवांची हिंसा करणाऱ्या मनुष्याशीं आपला संसर्ग झाला किंवा त्याच्याशीं देवघेवीचा व्यापार झाला असतां, पाच प्रोषधोपवास करावेतः आणि एक गोदान करावें. बावन्न एकभक्तें करावीत. संघपूजा, दयादानें, पुष्पें चढविणें आणि जप वगैरे करणें हे सर्व करावें.

आपल्या पात्राना दुसऱ्यानीं स्पर्श केला असता

स्वतोऽन्यैः स्पर्शितं भाण्डं मृण्मयं चेत्परित्यजेत् ॥
ताम्रारलोहभाण्डं चेच्छुध्यते शुद्धभस्मना ॥ १०९ ॥
वन्हिना कांस्यभाण्डं चेत्काष्ठभाण्डं न शुध्यति ॥
कांस्यं ताम्रं च लोहं चेदन्यभुक्तेऽग्निना वरम् ॥ ११० ॥

अर्थ— स्वजातीयाशिवाय दुसऱ्यानें आपलें मातीचें भांडे शिवलें असतां तें टाकून द्यावें. तांब्याचें पितळेचें किंवा लोखंडाचें भांडे असल्यास शुद्ध राख लावून घासल्यानें शुद्ध होतें. काशाचें भांडें अग्नीनें शुद्ध होतें. लाकडाचें पात्र कशानें शुद्ध होत नाहीं. काशें, तांबें आणि लोखंड ह्या धातूंचीं भांडीं अग्नीनें शुद्ध केल्यास फार चांगलें.

भांड्यात मद्यादिपदार्थ पडले असता

यद्भाजने सुरामांसविण्मूत्रश्लेष्ममाक्षिकम् ॥
क्षिप्तं ग्राह्यं न तद्भाण्डमन्यायः श्रावकोत्तमैः ॥ ११ ॥

अर्थ— ज्या भांड्यांत मद्य, मांस, मल, मूत्र, कफ, मध हे पदार्थ पडले असतील, तर ते भांडे उत्तम श्रावकाने घेऊं नये. घेतले असतां मोठाच अन्याय होईल.

सूप वगैरेस अन्यस्पर्श झाला असता

चालनी वस्त्रं शूर्पं च मुसलं घटयन्त्रकम् ॥
स्वतोऽन्यैः स्पर्शितं शुद्धं जायते क्षालनात्परम् ॥ ११२ ॥

अर्थ— चालण, वस्त्र, सूप, मुसळ, रहाट हे पदार्थ आपल्यावांचून इतरांनी (इतर जातीच्या मनुष्यांनी) शिवले असता धुवून टाकिल्यानें शुद्ध होतात.

स्वप्नभक्षितवस्तुत्याग

स्वप्ने तु येन यद्भुक्तं तत्त्याज्यं दिवसत्रयम् ॥
मद्यं मांसं यदा भुङ्क्ते तदोपवासकद्वयम् ॥ ११३ ॥

अर्थ— स्वप्नांत जे खाल्ले असें वाटेल तो पदार्थ तीन दिवस खाऊं नये. जर स्वप्नांत मद्य मांस खाल्लें असेल तर दोन उपवास करावेत.

ब्रह्मचर्यभगप्रायश्चित्त

ब्रह्मचर्यस्य भङ्गे तु निद्रायां परवशतः ॥
सहस्रैकं जपेज्जापमेकभक्तत्रयं भवेत् ॥ ११४ ॥

अर्थ— निद्रेंत पराधीन असल्यामुळें जर ब्रह्मचर्याचा भंग झाला ( स्वप्नावस्थेनें रेतःस्खलन झालें ) तर एक हजार जप करावा. आणि तीन दिवस एकभक्त करावें.

स्वप्नात जनन्यादिकाचा समागम झाला असता

मात्रा तथा भागिन्या च समं संयोग आगते ॥
उपवासद्वयं स्वप्ने सहस्रैकं जपोत्तमम् ॥ ११५ ॥

अर्थ-स्वप्नांत भगिनी किंवा माता ह्यांच्याशीं समागम होईल तर दोन उपवास करून एक हजार जप करावा.

रात्रिभोजनादिप्रायश्चित्त

मिथ्यादृशां गृहे रात्रौ भुक्तं वा शूद्रसद्मनि ॥
तदोपवासाः पञ्च स्युर्ज्जाप्यं तु द्विसहस्रकम् ॥ ११६ ॥

अर्थ— मिथ्यादृष्टीच्या घरांत भोजन केलें असतां, रात्री भोजन केले असता अथवा शूद्राच्या घरांत भोजन केले असतां पांच उपवास करावेत. आणि दोन हजार जप करावा.

इत्येवमल्पशः प्रोक्तः प्रायश्चित्तविधिः स्फुटम् ॥
अन्यो विस्तरतो ज्ञेयः शास्त्रेष्वन्येषु भूरिषु ॥ ११७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें प्रायश्चित्ताचा विधि थोडक्यात सांगितला. ह्यापेक्षां अन्यविधि दुसऱ्या अनेक शास्त्रांत विस्तारानें असलेला समजून घ्यावा.

इत्थं मौञ्जीबन्धनं पालनीयं । प्रायश्चित्तं वर्जयेत्को नु पापः ॥
धर्म्यं कर्म प्रायशो रक्षणीयं । पुण्याश्लिष्टैः सोमसेनैर्मुनीन्द्रैः ॥ ११८ ॥

अर्थ— ह्याप्रमाणे मौंजीबंधनाचें व्रत रक्षण करावें. त्यांत कोणत्याही पातकी मनुष्यानें प्रायश्चित्ताचा त्याग करणें योग्य होईल काय? कधींही होणार नाहीं. पुण्यसंपादन करणाऱ्या सोमसेनमुनींनी "धर्मकर्माचें अवश्य रक्षण करावें" असें सांगितलें आहे.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपणे भट्टारक-
श्रीसोमसेनविरचिते व्रतस्वरूपकथनीयो नाम

॥ नवमोऽध्यायः समाप्तः ॥

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

## दशमोऽध्यायः

भुवनकमलमित्रः सर्वदा यः पवित्रः । सुकृतकरचरित्रः पालितानेकमित्रः ॥
स जयति जिनदेवः सद्य एवैन्मुदं वः । शिवपदमपि भक्त्या धर्मनाथो जिनेन्द्रः ॥ १ ॥

अर्थ—त्रिभुवनरूपी कमलाचा जो मित्र, जो सर्वदा पवित्र आहे, ज्याचें चरित्र पुण्योत्पादक आहे, आणि ज्यानें आपल्यावर श्रद्धान करणाऱ्या अनेक लोकांचें रक्षण केलें आहे असा श्री जिनदेव उत्कर्ष पावत आहे. जो धर्मसंस्थापक श्रीजिनेंद्र मोक्षाला जाता झाला असूनही तुमच्या भक्तीमुळें तुम्हाला तत्काल आनंद उत्पन्न करीत आहे.

व्रतग्रहणविधि

अथोपवीतान्वित एव शिष्यो । महागुणाढ्यो विभवै रुपेतः ॥
व्रजेज्जिनेन्द्रालयमुन्नताङ्गं । समावृतोऽसौ परितः कुटुम्बैः ॥ २ ॥

अर्थ—नंतर यज्ञोपवीत धारण करणाऱ्या व गुणवान् आणि अनेक ऐश्वर्यांनीं युक्त अशा आणि आपल्या

कुटुंबांतील मनुष्यांनी वेढलेल्या अशा शिष्यानें भव्य अशा जिनेंद्रालयात गमन करावें.

पादौ प्रक्षाल्य जैनेन्द्रं प्रविशेत्सदनं शनैः ॥
पूजां शान्तिं विधायात्र सङ्गच्छेद्गुरुसन्निधौ ॥ ३ ॥

अर्थ—त्या शिष्यानें आपले पाय धुवून त्या जिनमंदिरात हळूहळू गमन करावें. मग त्या ठिकाणी पूजा आणि शांतिपाठ करून गुरुच्या जवळ यावें.

गुरुच्या सन्निध येणे

फलं धृत्वा गुरोरग्रे महाभक्तिसमन्वितः ॥
पञ्चाङ्गं नमनं कुर्यात्करयुग्मशिरः स्थितः ॥ ४ ॥
समाधानं च सम्पृच्छ्योपविशेच्छिनयाद्भुवि ॥
धर्मवृध्यादिना सोऽपि तोपयेच्छिष्यवर्गकम् ॥ ५ ॥

अर्थ—हातामध्यें फल धारण करून गुरूच्या अग्रभागीं शिष्यानें गमन करावें, आणि गुरूला पंचांगनमस्कार करून, आणि हात जोडून मस्तकावर ठेवून, त्याला "आपलें समाधान आहे ना?" असें विचारून वसावें. गुरूनेही शिष्याला धर्मवृद्धि असल्यावद्दल विचारून त्याचा संतोष करावा.

गुरुप्रार्थना

स्वामिन् ब्रूहि कृपां कृत्वा श्रावकाचारविस्तरम् ॥
तच्छ्रुत्वा श्रीगुरुश्चापि ब्रूयाद्धर्मं तु तम्प्रति ॥ ६ ॥

अर्थ—मग " भगवन् आह्मावर कृपा करून आह्माला श्रावकाचार विस्तारानें सांगा " अशी शिष्यानें गुरुला प्रार्थना करावी. ती प्रार्थना ऐकून त्यानेंही त्या शिष्याला धर्म सांगावा.

धर्मकथन

मिथ्यात्वत्यजनं पूर्वं सम्यक्त्वग्रहणं तथा ॥
द्वादशभेदभिन्नानां व्रतानां परिपालनम् ॥ ७ ॥

अर्थ—तो असा-प्रथम मिथ्यात्वाचा त्याग करून सम्यक्त्व ग्रहण करावें. आणि बारा प्रकारांच्या व्रतांचें रक्षण करावें. ह्मणजे श्रावकाची बारा व्रतें पाळावींत.

मिथ्यात्वत्यागाची आवश्यकता.

उक्तं च—मिच्छत्तं वेदंतो जीवो विवरीयदंसणो होदि ॥
ण य धम्मं रोचिदिह्मो मुहुरं पि जहा जुरिदो ॥ ८ ॥

अर्थ—प्रथम मिथ्यात्वाचा त्याग करण्याचें कारण असें सांगितलें आहे कीं, मिथ्यात्वी जीवाला विपरीत

दर्शन होतें. ज्याप्रमाणें ज्वरिताला मधुर पदार्थही गोड लागत नाहीं, त्याप्रमाणें त्याला सद्धर्म गोड लागत नाहीं. ह्मणजे त्याची सद्धर्मावर प्रीति असत नाहीं. ह्मणून प्रथम मिथ्यात्वाचा त्याग अवश्य करावा.

नरत्वेऽपि पशूयन्ते मिथ्यात्वग्रस्तचेतसः ॥
पशुत्वेऽपि नरायन्ते सम्यक्त्वव्यक्तचेतनाः ॥ ९ ॥

अर्थ— ज्यांचें अंतःकरण मिथ्यात्वानें ग्रासलें आहे ते जीव मनुष्य असूनही पशूप्रमाणें होतात; आणि ज्यांचें मन सम्यक्त्वानें युक्त आहे ते पशूदेखील मनुष्याप्रमाणें होतात.

केषाञ्चिदन्धतमसायते गृहीतं ग्रहायतेऽन्येषाम् ॥
मिथ्यात्वमिह गृहीतं शल्यति सांशयिकं परेषाम् ॥ १० ॥

अर्थ— कित्येकांनी स्वीकारलेलें मिथ्यात्व त्यांना अंधाराप्रमाणें कांहींच दिसूं देत नाहीं. कित्येकांचें मिथ्यात्व एखाद्या पिशाचाप्रमाणें त्यांना सोडीत नाहीं. कित्येकांचें मिथ्यात्व त्यांचें त्यांनाच बाणाप्रमाणें टोचूं लागतें; आणि कित्येकांचें मिथ्यात्व संशय उत्पन्न करतें.

कुधर्मस्थोऽपि सद्धर्मं लघुकर्मतया द्विषन् ॥
भद्रः स देश्यो द्रव्यत्वाभाभद्रस्तद्विपर्ययात् ॥ ११ ॥

अर्थ— जन्मांतरींच्या आपल्या दुष्कर्मामुळें सद्धर्माचा द्वेष करणारा जीव कुधर्मी असून जर भव्य

अर्थ—क्षुधा, तृषा, रोग, भय, विषयप्रीति, रोष, मरण, स्वेद ( घाम ), खेद, अराति ( असंतोष ) चिंता, जन्म, वृद्धपणा, आश्चर्य, मद, निद्रा, विषाद ( दुःख ) आणि मोह हे अठरा दोष ज्याच्यामध्यें नाहींत असा परमकारुणिक असलेला श्रीजिनेंद्र सर्व लोकांचें पातकापासून रक्षण करो. कारण, हाच सर्वजीवाचें मुख्य दैवत ( मुख्य देव ) आहे.

अध्ययन करण्यास योग्य असें शास्त्र

पूर्वापराविरुद्धं यदाप्तोद्दिष्टं सुयुक्तिमत् ॥
यथार्थवाचकं शास्त्रं तदध्येयं शिवाप्तये ॥ १७ ॥

अर्थ—ज्यांत मागें सांगितलेल्यांत आणि पुढें सांगितलेल्यात विरोध नाहीं, जें युक्तीनें भरलेलें आहे, जें आप्तानें ( खरें बोलणाऱ्यानें ) सांगितलें असल्यानें सत्यवस्तूचें प्रतिपादन करतें आहे असें शास्त्र कल्याणाची प्राप्ति होण्याकरितां अवश्य शिकावें.

तपस्व्याचें लक्षण.

विषयाशावशातीतो निरारम्भोऽपरिग्रहः ॥
ज्ञानध्यानतपोरक्तस्तपस्वी स प्रशस्यते ॥ १८ ॥

अर्थः— जो विषयेच्छेच्या ताब्यांत सांपडला नाहीं, जो कांहीं करीत नाहीं, ज्यानें परिग्रह टाकून-

मिथ्याज्ञानाविषयीं अश्रद्धान.

मतेषु विपरीतेषु यदुक्तं दुष्टबुध्दिभिः ॥
श्रध्देयं न कदा तत्त्वं हिंसापातकदोषदम् ॥ १४ ॥

अर्थ— विपरीत मतात दुष्ट बुद्धीच्या लोकांनीं जें सांगितलें आहे, त्या तत्त्वावर केव्हांही विश्वास ठेवूं नये. कारण, त्यामुळें हिंसादिपातकांचा दोष उत्पन्न होतो.

देव कोणता?

सर्वदर्शी च सर्वज्ञः सिद्ध आप्तो निरञ्जनः ॥
अष्टादशमहादोषै रहितो देव उच्यते ॥ १५ ॥

अर्थ— सर्व पहाणारा, सर्व जाणणारा, सिद्ध, आप्त, अज्ञानरहित आणि अठराप्रकारचे महादोष ज्याच्यामध्यें नाहींत त्यालाच देव ह्मणतात.

क्षुत्तृड्रुग्भयरागरोषमरणस्वेदाश्च खेदारति-।
चिन्ताजन्मजराश्च विस्मयमदौ निद्रा विषादस्तथा ॥
मोहोऽष्टादशदोषदुष्टरहितः श्रीवीतरागो जिनः।
पायात्सर्वजनान् दयालुरघतो जन्तो परं दैवतम् ॥ १६ ॥

अर्थ—क्षुधा, तृषा, रोग, भय, विषयप्रीति, रोष, मरण, स्वेद ( घाम ), खेद, अरति ( असंतोष ) चिंता, जन्म, वृद्धपणा, आश्चर्य, मद, निद्रा, विषाद ( दुःख ) आणि मोह हे अठरा दोष ज्याच्यामध्यें नाहींत असा परमकारुणिक असलेला श्रीजिनेंद्र सर्व लोकांचें पातकापासून रक्षण करो. कारण, हाच सर्वजीवांचें मुख्य दैवत ( मुख्य देव ) आहे.

अध्ययन करण्यास योग्य असें शास्त्र.

पूर्वापराविरुद्धं यदाप्तोद्दिष्टं सुबुद्धिमत् ॥
यथार्थवाचकं शास्त्रं तदध्येयं शिवाप्तये ॥ १७ ॥

अर्थ—ज्यांत मागें सांगितलेल्यांत आणि पुढें सांगितलेल्यात विरोध नाहीं, जें युक्तीनें भरलेलें आहे, जें आप्तानें ( खरें बोलणाऱ्यानें ) सांगितलें असल्याने सत्यवस्तूचें प्रतिपादन करतें आहे असें शास्त्र कल्याणाची प्राप्ति होण्याकरितां अवश्य शिकावें.

तपस्व्याचे लक्षण

विषयाशावशातीतो निरारम्भोऽपरिग्रहः ॥
ज्ञानध्यानतपोरक्तस्तपस्वी स प्रशस्यते ॥ १८ ॥

अर्थः— जो विषयेच्छेच्या ताब्यात सापडला नाहीं, जो कांहीं करीत नाहीं, ज्यानें परिग्रह वाळग-

लेला नाहीं आणि जो ज्ञान, ध्यान आणि तपश्चर्या यांत नेहमीं गढून राहिला आहे तोच स्तुत्य तपस्वी होय.

सम्यग्दृष्टीचें लक्षण

एतेषां निश्चयो यस्य निःशङ्कत्वेन वर्तते ॥
सम्यग्दृष्टिः स विज्ञेयः शङ्काद्यष्टकवर्जितः ॥ १९ ॥

अर्थः— देव, शास्त्र आणि तपस्वी यांच्याविषयीं ज्याचा निःशंक असा निश्चय झाला आहे आणि ज्याला शंका वगैरे आठ दोष नाहींत तो सम्यग्दृष्टि समजावा. आतां सम्यक्त्वाचीं अंगें सांगतात.

निःशंकितांग

देवे मन्त्रे गुरौ शास्त्रे क्वचिदनिश्चयो न चेत् ॥
फल्गुदोषान्न कर्तव्यः संशयः शुद्धदृष्टिभिः ॥ २० ॥

अर्थः— आपला देव, आगमांत सांगितलेले मंत्र, आपला गुरु आणि आपलें शास्त्र यांच्याविषयीं तुच्छ दोष मनांत आणून सम्यग्दृष्टीनें संशय घेऊं नये. कारण, परमतांत सांगितलेले देव, मंत्र, गुरु आणि शास्त्र यांत तरी दृष्टिगोचर होण्यासारखें अधिक माहात्म्य आहे कोठें? मुळींच नाहीं.

निष्कांक्षितांग

कर्मपरवशे सान्ते दुःखैरन्तरितोदये ॥
पापबीजे सुखेऽनास्था श्रद्धाऽनाकाङ्क्षणा स्मृता ॥ २१ ॥

अर्थः— पूर्वकर्माच्या आधीन असलेलें, नाश पावणारें, ज्याच्या प्राप्तीकरितां अनेक दुःखें भोगावीं लागतात असें आणि पातकाची उत्पत्ति करणारें असें जें विषयसुख त्याविषयीं इच्छा न करणें ह्याला 'निष्कांक्षा' ह्मणतात. हें सम्यक्त्वाचें दुसरें अंग आहे.

निर्विचिकित्सांग

स्वभावतोऽशुचौ काये रत्नत्रयपवित्रिते ॥
निर्जुगुप्सा गुणप्रीतिर्मता निर्विचिकित्सता ॥ २२ ॥

अर्थ— स्वभावतः अशुद्ध असून सम्यग्दर्शनज्ञानचारित्र ह्या रत्नत्रयामुळें शुद्ध झालेल्या शरीराची न करतां त्याच्या गुणावर प्रेम करणें ह्यास निर्विचिकित्सांग ह्मणतात.

अमूढदृष्टित्व

कापथे पथि दुःखानां कापथस्थेऽप्यसम्मतिः ॥
असम्पृक्तिरनुत्कीर्तिरमूढा दृष्टिरुच्यते ॥ २३ ॥

अर्थ— दुःखप्रद अशा मिथ्यामार्गाविषयीं आणि त्या दुर्मार्गानें वागणाऱ्या मनुष्याविषयीं आपली

असंमति दाखविणें, त्याची स्तुति न करणें ह्याला अमूढदृष्टि नांवाचें सम्यक्त्वांग ह्मणतात.

उपगूहन.

स्वयंशुद्धस्य मार्गस्य बालाशक्तजनाश्रयाम् ॥
वाच्यतां यत्प्रमार्जन्ति तद्वदन्त्युपगूहनम् ॥ २४ ॥

अर्थ— स्वभावतः शुद्ध असलेल्या अशा धर्ममार्गाची (जैनधर्माची) लहान मुलें किंवा मूर्खलोक व अशक्त लोक ह्यांच्या वर्तनामुळे जी निंदा होते, ती घालविणे ह्याला उपगूहन नांवाचें अंग ह्मणतात.

स्थितीकरण

दर्शनाच्चरणाद्वाऽपि चलतां धर्मवत्सलैः ॥
प्रत्युपस्थापनं प्राज्ञैः स्थितीकरणमुच्यते ॥ २५ ॥

अर्थ— सम्यग्दर्शन आणि सम्यक्चारित्र ह्यापासून भ्रष्ट होत असलेल्या लोकांना धर्माविषयी प्रेम करणाऱ्या शहाण्या लोकांनी ताळ्यावर आणणे ह्याला उपगूहन नांवाचें अंग ह्मणतात.

वात्सल्य

जैनधर्मयुतान् भव्यान् रोगचिन्तादिपीडितान् ॥
वैयावृत्यं सदा कुर्यात्तद्वात्सल्यं निगद्यते ॥ २६ ॥

अर्थ— जैनधर्मातील भव्यजीव जर रोग किंवा चिंता ह्यांनी पीडित झाले असतील तर त्यांची सेवा करणें त्यांना मदत करणें ह्याला वात्सल्य नांवाचें सम्यक्त्वाचें अग ह्मणतात.

प्रभावना

अज्ञानतिमिरव्याप्तिमपाकृत्य यथायथम् ॥
जिनशासनमाहात्म्यप्रकाशः स्यात्प्रभावना ॥ २७ ॥

अर्थ— जीवांचा अज्ञानरूपी अंधकार ( गैरसमजूत ) होईल तितकी घालवून जिनांनी सांगितलेल्या शास्त्राचें महत्व प्रकट करणें ह्याला प्रभावना नांवाचें सम्यक्त्वांग ह्मणतात.

ह्या सम्यक्त्वांगाची आवश्यकता

अष्टाङ्गैः पालितं शुद्धं सम्यक्त्वं शिवदायकम् ॥
न हि मन्त्रोऽक्षरन्यूनो निहन्ति विषवेदनाम् ॥ २८ ॥

अर्थ— वर जीं हीं सम्यक्त्वाचीं आठ अंगें सागिनलीं त्या आठही अंगानीं युक्त असें सम्यक्त्व पाळिलें असतां तें मोक्षप्रद होतें. त्यांतील एखादें अंग नसणें बरें नाहीं. कारण, सर्पाचें विष दूर करणाऱ्या मंत्रांतील जर एखादें अक्षर कमी असलें तर त्या तसल्या मंत्रानें विषापासून होत असलेली पीडा कमी होत नाहीं.

सम्यक्त्वाचे पचवीस दोष

मूढत्रयं मदाश्चाष्टौ तथाऽनायतनानि षट् ॥
अष्टौ शंकादयो दोषाः सम्यक्त्वे पञ्चविंशतिः ॥ २९ ॥

अर्थ— तीन मूढ, आठ प्रकारचे मद, सहा अनायतने आणि शंका वगैरे आठ दोष हे सम्यक्त्वाचे पंचवीस दोष आहेत. ह्या दोषांचे विवेचन पुढें क्रमानें करतात.

लोकमूढता

गोयोनिं गोमयं मूत्रं चन्द्रसूर्यादिपूजनम् ॥
अग्नौ गिरेः प्रपातश्च विज्ञेया लोकमूढता ॥ ३० ॥

अर्थ— गायीचें जननेंद्रिय, गायीचें शेण, गायीचें मूत्र ह्यांना पवित्र मानणें, चंद्रसूर्य वगैरेचें पूजन करणें, अग्नीत देहत्याग करणें, डोंगराच्या कड्यावरून उडी मारणें ह्याला लोकमूढ नांवाचा दोष ह्मणतात.

देवतामूढ

वरोपलिप्सयाऽऽशावान् रागद्वेषमलीमसाः ॥
देवता यदुपासीत देवतामूढमुच्यते ॥ ३१ ॥

अर्थ— रागद्वेषांनीं ज्याचें अंतःकरण वाईट झालें आहे अशांची ( अशा देवांची ), आपल्याला वराची प्राप्ती होईल अशा इच्छेनें आशाबद्ध झालेला मनुष्य देवाप्रमाणें जें पूजन करतो त्याला देवतामूढ ह्मणतात.

पाखंडमूढता

सग्रन्थारम्भहिंसानां संसारावर्तवर्तिनाम् ॥
पाखण्डिनां पुरस्कारो ज्ञेया पाखण्डमूढता ॥ ३२ ॥

अर्थ— पुष्कळ परिग्रह बाळगणारे, अनेक दुरुद्योग करणारे आणि हिंसा करणारे असे असल्यामुळें संसाराच्या भोंवऱ्यांत फिरत असलेले जे पाखंडी लोक त्यांना पुढाकार देणें ( त्यांचें अनुसरण करणें ) ह्याला पाखंडमूढता ह्मणतात.

आठ मद

ज्ञानं पूजां कुलं जातिं बलमृद्धिं तपो वपुः ॥
अष्टावाश्रित्य मानित्वं श्रीयते तन्मदाष्टकम् ॥ ३३ ॥

अर्थ— ज्ञान, गौरव, कुल, जाति, बल, संपत्ति, तप आणि शरीर ह्या वस्तूंबद्दल जें अभिमान बाळगणें त्याला अष्टमद ह्मणतात.

सहा अनायतनें

कुदेवस्तस्य भक्तश्च कुशास्त्रं तस्य पाठकः ॥
कुगुरुस्तस्य शिष्यश्च षण्णां सङ्गं परित्यजेत् ॥ ३४ ॥

अर्थ— कुदेव आणि त्याचे भक्त, कुशास्त्र आणि त्याचें अध्ययन करणारे, कुगुरु आणि त्याचे शिष्य ह्या सहांची संगती सोडून द्यावी.

शकादि आठ दोष

शङ्काऽऽकांक्षा जुगुप्सा च मौढ्यमनुपगूहनम् ॥
अस्थितीकरणं चाप्यवात्सल्यं चाप्रभावना ॥ ३५ ॥
एतेऽष्टौ मिलिता दोषास्त्याज्याः सम्यक्त्वधारिभिः ॥
सदैव गुरुशास्त्राणां भक्तिः कार्या निरन्तरम् ॥ ३६ ॥

अर्थ— शंका (जिनशास्त्राविषयी संशय), आकांक्षा (विषयसुखाची इच्छा) जुगुप्सा (शरीराची निंदा), मौढ्य (तीन प्रकारची मूढता), अनुपगूहन (स्वजातीयाचे दोष उघड करणें), अवात्सल्य (जिनमताने वागणाऱ्याबद्दल कळकळ न बाळगणें) आणि अप्रभावना (जैनशास्त्राची प्रतिष्ठा न करणें) हे आठ दोष सम्यक्त्वी मनुष्याने टाकून द्यावेत. आणि गुरु व शास्त्र ह्यांचे ठिकाणी सर्वदा भक्ति ठेवावी.

तीन प्रकारचे सम्यक्त्व

सम्यक्त्वं त्रिविधं ज्ञेयं क्षायिकं चौपशामिकम् ॥
क्षायोपशामिकं चेति उत्तमाधममध्यमम् ॥ ३७ ॥

अर्थ— क्षायिकसम्यक्त्व (सम्यक्त्वाला प्रतिबंध करणाऱ्या कर्मांचा नाश झाल्यामुळें उत्पन्न होणारें सम्यक्त्व) औपशमिकसम्यक्त्व [प्रतिबंधक कर्मांच्या उपशमामुळें झालेलें सम्यक्त्व] आणि क्षायोपशमिक-सम्यक्त्व [सम्यक्त्वप्रतिबंधककर्मांचा यत्किंचित् अनुदय आणि यत्किंचित् उदय ह्यांपासून उत्पन्न होणारें सम्यक्त्व] असें सम्यक्त्व तीन प्रकारचें आहे. त्यांत पहिलें उत्तम, दुसरें मध्यम आणि तिसरें कनिष्ठ समजावें.

तीन प्रकारचें सम्यक्त्व

मिथ्यासमयमिथ्यात्वसम्यक्प्रकृतयस्त्रयः ॥
आद्यं कषायतुर्यं च चतुःप्रकृतयः पुनः ॥ ३८ ॥
क्षायिकं च क्षयात्तासां शमनाच्चौपशमिकम् ॥
मिश्रात्तान्मिश्रसम्यक्त्वमिति मोक्षप्रदायकम् ॥ ३९ ॥

अर्थः— मिथ्यात्व, समयमिथ्यात्व, सम्यक्प्रकृति आणि अनंतानुबंधी असे क्रोध, मान, माया, लोभ ह्या सात प्रकृति आहेत. ह्यांच्या क्षयापासून क्षायिकसम्यक्त्व उत्पन्न होतें उपशमापासून औप-शमिक सम्यक्त्व उत्पन्न होतें. आणि क्षय व उपशम ह्या दोहोंपासून क्षायोपशमिक किंवा मिश्र सम्यक्त्व होतें. असें हें सम्यक्त्व मुक्तीला कारण आहे.

सम्यक्त्याचे आठ गुण

उक्तं च- संवेउ णिव्वेउ णिंदा गरिहा च उवसमो भत्ती ॥

वच्छल्लं अणुकंपा अठ्ठगुणा हुंति सम्मत्ते ॥ ४० ॥

अर्थः— संवेग ( धर्म व धर्मफल ह्याविषयीं प्रीति ), निर्वेग ( वैराग्य ), आपली निंदा आपण करणें, गर्हा ( स्वतःस तुच्छ मानणे ) उपशम ( रागद्वेपरहित होणें ), पंच गुरूंविषयीं भक्ति, वात्सल्य आणि दया हे आठ गुण सम्यक्त्वाच्या ठिकाणीं असतात.

चत्तारि वि खेत्ताइं आउगबंधे ण होइ सम्मत्तं ॥

अणुव्वयमहव्वयाइं ण हवइ देवाउगं मोत्तुं ॥ ४१ ॥

छसु हिठ्ठमासु पुढवीसु जोइसवणभवणसव्वइत्थीसु ॥

वारसमिच्छोवाये सम्माइठ्ठे ण होदि उववादो ॥ ४२ ॥

पंचसु थावरवियळे असण्णिणिगोयम्मि छकुभोगेसु ॥

सम्मादिठ्ठी जीवो उववज्जदि ण णियमेण ॥ ४३ ॥

अर्थ— चारही गतीपैकीं कोणत्याही गतीच्या आयुष्याचा वंध झाल्यानंतरही जीवाला सम्यक्त्व होऊं शकतें. देवगतीच्या आयुष्याचा वंध झाल्यानंतरही अणुव्रतें आणि महाव्रतें होऊं शकतात. वाकीच्या तीन गतींचा वंध झाल्यानंतर अणुव्रतें व महाव्रतें होऊं शकत नाहीत. ४१. प्रथम नरक सोडून वाकीच्या सहा

नरकभूमींत ज्योतिष्क, व्यंतर, भवनवासी आणि तीन प्रकारच्या स्त्रिया; अर्थात् देवांगना, मानुषी आणि तिर्यंची इतक्या ठिकाणीं सम्यग्दृष्टी जीवाची उत्पत्ति होत नाहीं. ४२. पांच स्थावर, विकलत्रय, असंज्ञि-पंचेंद्रिय आणि सहा कुभोगभूमी इतक्या ठिकाणीं सम्यग्दृष्टिजीव निश्चयानें उत्पन्न होत नाहीं.

दंसणमोहोदयदो उप्पज्जइ जं पयत्थसद्दहणं ॥
चलमलिणमगाढं तं वेदगसम्मत्तमिदि जाणे ॥ ४४ ॥

अर्थ- दर्शनमोहनीयकर्माच्या उदयानें [सम्यक्त्वाचा एकदेश घात करणाऱ्या कर्माच्या उदयानें] जें पदार्थ-श्रद्धान उत्पन्न होतें तें वेदकसम्यक्त्व असें समजावें. तें चल, मलिन आणि अगाढ असें तीन प्रकारचें आहे.

दंसणमोहुवसमदो उप्पज्जइ जं पयत्थसद्दहणं ॥
उवसमसम्मत्तमिद पसण्णमळपंकजोपसमं ॥ ४५ ॥

अर्थ— दर्शनमोहनीयकर्माचा उपशम झाला असतांना जें पदार्थश्रद्धान होतें, तें उपशमसम्यक्त्व होय. हें सम्यक्त्व ज्यांतील गाळ तळाला बसला आहे अशा पाण्याप्रमाणें असतें.

खीणे दंसणमोहे जं सद्दहणं सुणिम्मळं होइ ॥
तं खाइयसम्मत्तं णिच्चं कम्मक्खवणहेदुं ॥ ४६ ॥

अर्थ— दर्शनमोहनीयकर्माचा पूर्ण नाश झाला असतांना जें निर्मळ असें पदार्थश्रद्धान होतें, तें क्षायिक-

सम्यक्त्व समजावें. हें क्षायिकसम्यक्त्व नित्य ह्मणजे नाश न पावणारें व कर्मक्षयाला कारण असें असतें.

वयणेहि वि हेदूहिं वि इंदियभयआणयेहि रूवेहिं ॥
वीभच्छजुगुंच्छाहि वि तेलोयेण वि ण चालेज्ज ॥ ४७ ॥

अर्थ— दुर्भाषणानें, भलतींच कारणें दाखविल्यानें, नेत्रादि इंद्रियांना भय वाटेल अशा प्रकारचीं रूपें ( भयंकर रूपें ) दाखविल्यानें, पहाण्यावरोबर चिळस येईल अशा वस्तु दाखविल्यानें, निंदा केल्यानेंही आणि त्रैलोक्य जरी उलटून पडलें तरीही क्षायिकसम्यक्त्व मुळींच चळत नाहीं.

दंसणमोहक्खवणा पट्ठवगो कम्मभूमिजादो जो ॥
मणुजो केवलिमूळे णिट्ठवगो होइ सव्वत्थ ॥ ४८ ॥

अर्थ— कर्मभूमींत जन्मलेला मनुष्य, केवलीच्या पायांजवळ जाऊन दर्शनमोहनीयकर्माचा नाश करण्यास आरंभ करितो; आणि त्याची समाप्ति चार गतीपैकीं कोणत्याही गतींत असतांना त्यास करतां येते.

दंसणमोहक्खविदे सिज्झदि एक्केव विदियतिदियभवे ॥
णो विच्छदि तुरियभवं ण विणस्सादि सेससम्मं व ॥ ४९ ॥

अर्थ— दर्शनमोहाचा पूर्णनाश झाला ह्मणजे जीव एकाच भवांत मुक्त होतो. फारतर दुसऱ्या किंवा तिसऱ्या भवांत सिद्धीस पोंचतो. चवथ्या भवाची अपेक्षा त्यास रहात नाहीं. कारण, क्षायिकसम्यक्त्व

हे औपशमिक आणि मिश्र सम्यक्त्वाप्रमाणें नाश पावणारें नाहीं.

सम्यक्त्वाची योग्यता

व्रताद्भ्रष्टस्य सम्यक्त्व वर्तते यदि चेतसि ॥
आर्द्रः सिध्यति भव्यः स चारित्रधरणक्षणे ॥ ५० ॥

अर्थ— व्रतापासून भ्रष्ट झालेल्या मनुष्याच्या मनांत जर सम्यक्त्व असेल तर कांहीं आर्द्रता ( ओलावा ) असल्यानें त्यानें चारित्र धारण केल्यावरोवर तो भव्य मोक्षयोग्य होतो.

सम्यक्त्वाची प्रशंसा

विद्यावृत्तस्य सम्भूतिस्थितिवृद्धिफलोदयाः ॥
न सन्त्यसति सम्यक्त्वे बीजाभावे तरोरिव ॥ ५१ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें बीज नसल्यास वृक्षाची उत्पत्ति, स्थिति, वृद्धि आणि फलोद्गम ह्या गोष्टी होत नाहीत, त्याप्रमाणें, सम्यक्त्व जर नसेल तर ज्ञान आणि चारित्र ह्यांची उत्पत्ति, त्यांची स्थिति, त्यांची वृद्धि आणि त्यांच्यापासून फलाची ( मोक्षाची ) उत्पत्ति ह्या गोष्टीही होत नाहीं.

न सम्यक्त्वसमं किञ्चित्त्रैकाल्ये त्रिजगत्यपि ॥
श्रेयोऽश्रेयश्च मिथ्यात्वसमं नान्यत्तनूभृताम् ॥ ५२ ॥

अर्थ— तीन्ही कालांत आणि या त्रिभुवनात सम्यक्त्वासारखें जीवांचें कल्याण करणारें दुसरें कांहीं नाहीं, आणि अकल्याण करणारें मिथ्यात्वासारखें दुसरें नाहीं.

दुर्गत्यायुषो बन्धात्सम्यक्त्वं यस्य जायते ॥
गतिच्छेदो न तस्यास्ति तथाऽप्यल्पतरा स्थितिः ॥ ५३ ॥

अर्थ— आयुष्याचा बंध झाल्यामुळें जीवाला दुर्गति प्राप्त झाली असतां ज्याला सम्यक्त्व उत्पन्न झालें आहे, त्याच्या त्या दुर्गतीचा जरी नाश होत नाहीं, तथापि त्या दुर्गतीत त्याची फारच थोडी स्थिति होते.

सम्यग्दर्शनाचा महिमा

सम्यग्दर्शनशुद्धा नारकतिर्यङ्नपुंसकस्त्रीत्वानि ॥
दुष्कुलविकृताल्पायुर्दरिद्रतां च व्रजन्ति नाप्यव्रतिकाः ॥ ५४ ॥

अर्थ— सम्यग्दर्शनानें शुद्ध झालेले जीव जरी अव्रतिक असले, तथापि ते नरकगतीत आणि तिर्यग्गतीत जन्म पावत नाहींत. ते नपुंसक किंवा स्त्री होत नाहींत. ते दुष्कुलांत जन्म पावत नाहींत. ते अंगविकल होऊन जन्माला येत नाहींत, आणि ते अल्पायु किंवा दरिद्री होत नाहींत.

ओजस्तेजोविद्यावीर्ययशोवृद्धिविजयविभवसनाथाः ॥
उत्तमकुला महार्था मानवतिलका भवन्ति दर्शनपूताः ॥ ५५ ॥

अर्थ— सम्यग्दर्शनानें पवित्र झालेले जीव बल, कांति, विद्या, अतिशय उत्साह, कीर्ति, वृद्धि ( शरीराची वाढ ), विजय आणि ऐश्वर्य ह्यांनी युक्त होतात. ते उत्तम कुलांत जन्म पावतात. त्यांची संपत्ति मोठी असते, आणि ते सर्वांत श्रेष्ठ होतात.

अष्टगुणपुष्टितुष्टा दृष्टिविशिष्टाः प्रकृष्टसन्तुष्टाः ॥
अप्सरसां परिषदि चिरं रमन्ते जिनेन्द्रभक्ताः स्वर्गे ॥ ५६ ॥
अणिमा महिमा लघिमा गरिमाऽन्तर्धानकामरूपित्वम् ॥
प्राप्तिः प्राकाम्यवशित्वेशित्वाप्रतिहततत्वमिति वैक्रियकाः ॥ ५७ ॥

अर्थ— आठ गुणांच्या वृद्धीमुळें संतुष्ट झालेले सम्यग्दर्शनयुक्त जीव अत्यंत संतुष्ट होऊन जिनेंद्राची भक्ती करणारे असे होत्साते स्वर्गांत अप्सराच्या सभेंत चिरकाल रममाण होतात. अणिमा ( लहान होणें ) महिमा ( मोठें होणें ) लघिमा ( हलकें होणें ) गरिमा ( जड होणें ) अंतर्धान ( गुप्त होणें ) कामरूपित्व ( पाहिजे तसलें स्वरूप घेणें ) प्राप्ति ( पाहिजे ती वस्तु मिळविणें ) प्राकाम्य ( इच्छेचा भंग न होणें ) वशित्व ( स्वतंत्रपणा असणें ) ईशित्व ( सर्व स्थावरजंगमावर हुकूम चालणें ) अप्रतिहतत्व ( कोठेंही प्रतिबंध न होणें ) ह्या अकरा वैक्रियकसिद्धि आहेत.

नवनिधिसप्तद्वयरत्नाधीशाः सर्वभूमिपतयश्चक्रम् ॥

वर्तयितुं प्रभवन्ति स्पष्टदृशः क्षत्रमौलिशेखरचरणाः ॥ ५८ ॥

अर्थ— जे सम्यग्दृष्टि असतात ते जीव, नऊ निधि आणि चतुर्दश रत्नें ह्यांचे स्वामी होऊन संपूर्ण क्षत्रिय ज्यांच्या चरणावर आपली मस्तकें नम्र करीत आहेत असे होत्साते संपूर्ण पृथ्वीचे पति ( सार्वभौम राजे ) होऊन चक्ररत्नाची प्रवृत्ति करण्यास समर्थ होतात. हे सम्यग्दर्शनाचें वर्णन केलें. आतां सम्यग्ज्ञानाचें स्वरूप सागतात.

सम्यग्ज्ञानाचे लक्षण

अन्यूनमनतिरिक्तं याथातथ्यं विना च विपरीतात् ॥
निःसन्देहं वेत्ति यदाहुस्तज्ज्ञानमागमिनः ॥ ५९ ॥

अर्थ— कोणत्याही वस्तूच्या स्वरूपांत कमीजास्ती न होतां व भलतेंच न भासतां वस्तूचें स्वरूप जसें असेल तसेच जे निःसंशय जाणणे त्याला आगमज्ञ मुनि सम्यग्ज्ञान असे ह्मणतात.

सम्यग्ज्ञानाचे कार्य

प्रथमानुयोगमर्थाख्यानं चरितं पुराणमपि पुण्यम् ॥
बोधिसमाधिनिधानं बोधति बोधः समीचीनः ॥ ६०

अर्थ— तें सम्यग्ज्ञान– चतुर्विध पुरुपार्थाचे व्याख्यान, महापुरुपांची चरित्रें, पुण्यकारक पुराणे

ह्या रूपाचा, आणि ज्ञान व समाधि ह्यांचें भांडारच की काय! असा जो प्रथमानुयोग [ त्या नावाचें शास्त्र ] त्याला जाणतें.

लोकालोकविभक्तेर्युगपरिवृत्तेश्चतुर्गतीनां च ॥
आदर्शमिव तथा मतिरवैति करणानुयोगं च ॥ ६१ ॥

अर्थ— तें सम्यग्ज्ञान—लोकाकाश आणि अलोकाकाश ह्यांचा विभाग, युगांचे फेरे, आणि जीवाच्या चार गति ह्यांचा आरसाच की काय असें जें करणानुयोग नावाचें शास्त्र त्याला जाणतें.

गृहमेध्यनगाराणां चारित्रोत्पत्तिवृद्धिरक्षाङ्गम् ॥
चरणानुयोगसमयं सम्यग्ज्ञानं विजानाति ॥ ६२ ॥

अर्थ— गृहस्थ आणि यति ह्यांच्या चारित्राची उत्पत्ति, वृद्धि आणि रक्षण ह्यांचें साधनीभूत असलेलें जें चरणानुयोग नांवाचें शास्त्र, त्यालाही सम्यग्ज्ञान जाणतें.

द्रव्यानुयोगातील विषय

जीवाजीवसुतत्त्वे पुण्यापुण्ये च बन्धमोक्षौ च ॥
द्रव्यानुयोगदीपः श्रुतविद्यालोकमातनुते ॥ ६३ ॥

अर्थ— जीव, अजीव, पुण्य, पाप, बंध मोक्ष इत्यादि वस्तूवर द्रव्यानुयोगरूपी दीप ( द्रव्यानुयोग

नांवाचे जे शास्त्र तोच कोणीएक दीप) श्रुतज्ञानरूप प्रकाश पसरतो. (सम्यग्ज्ञान असलें ह्मणजे, द्रव्यानुयोगशास्त्रांत प्रतिपादन केलेली जीवादितत्वें समजतात). तात्पर्य, सम्यग्ज्ञानाने प्रथमानुयोग, करणानुयोग, चरणानुयोग आणि द्रव्यानुयोग ह्या चारही प्रकारच्या शास्त्रांचें ज्ञान होतें. आणि जर सम्यग्ज्ञान नसेल तर तें शास्त्रज्ञान होत नाहीं. हे सम्यग्ज्ञानाचें वर्णन झालें. आतां सम्यक्चारित्राचें वर्णन करितात—

सम्यक्चारित्र.

अथ चारित्रम्– हिंसानृतचौर्येभ्यो मैथुनसेवापरिग्रहाभ्यां च ॥
पापप्रणालिकाभ्यो विरतिः सञ्ज्ञस्य चारित्रम् ॥ ६४ ॥

अर्थ— हिंसा, खोटें भाषण, चोरी, स्त्रीसेवन आणि परिग्रह हीं जीं पातकाला जीवप्रदेशांत सहज प्रवेश करतां येण्याची साधनें त्यांपासून निवृत्त होणें हें सम्यग्ज्ञानी मनुष्याचें चारित्र होत.

चारित्राचे दोन विभाग.

सकलं विकलं चरणं तत्सकलं सर्वसङ्गविरतानाम् ॥
अनगाराणां विकलं सागाराणां ससङ्गानाम् ॥ ६५ ॥

अर्थ— ते चारित्र सकल [संपूर्ण] आणि विकल [असंपूर्ण] असें दोन प्रकारचें आहे. त्यांत

सर्वसंग परित्याग करून जे मुनि झाले त्यांचें चारित्र सकल होय, आणि जे गृहस्थ असतात त्यांचें जें चारित्र ते विकल होय.

सागाराचे लक्षण

अनाद्यविद्यादोषोत्थचतुःसञ्ज्ञाज्वरातुराः ॥
शश्वत्सज्ज्ञानविमुखाः सागारा विषयोन्मुखाः ॥ ६६ ॥

सागार [ गृहस्थ ] हे अनादिकालापासून प्राप्त झालेल्या अज्ञानापासून उत्पन्न झालेला जो
अर्थ— सागार [ गृहस्थ ] हे अनादिकालापासून प्राप्त झालेल्या अज्ञानापासून उत्पन्न झालेला जो चतुःसंज्ञारूपी ज्वर [ आहार, भय, मैथुन आणि परिग्रह ह्या चार संज्ञा होत ] त्यानें पीडित झालेले असतात. सम्यग्ज्ञान प्राप्त करून घेण्याविषयीं नेहमीं विमुख असतात, आणि विषयसेवनाविषयीं अत्यंत उत्सुक असतात, ह्मणून असे जे असतात त्यांनाच सागार ह्मणतात.

गृहस्थो मोक्षमार्गस्थो निर्मोहो नैव मोहवान् ॥
अनगारो गृही श्रेयान् निर्मोहो मोहिनो मुनेः ॥ ६७ ॥

अर्थ— कोणी गृहस्थ मोक्षमार्गप्रवृत्त असून मोहरहित असा जर असेल तर तो देखील अनगारच होय, आणि ज्यानें घर सोडलें आहे परंतु मोह सुटला नाहीं, तो अनगार नव्हे. ह्मणून मोहयुक्त असलेल्या मुनीपेक्षां मोहरहित असलेला गृहस्थ फार चांगला.

सम्यग्दृष्टिजीवाचें लक्षण.

अष्टमूलगुणाधारो सप्तव्यसनदूरगः ॥
सद्गुरुवचनासक्तः सम्यग्दृष्टिः स उच्यते ॥ ६८ ॥

अर्थ— श्रावकाचे आठ मूलगुण धारण करणारा, सप्तव्यसनांपासून दूर असलेला, आणि गुरूच्या भाषणावर विश्वास ठेवणारा जो श्रावक, त्याला सम्यग्दृष्टि म्हणतात.

गृहस्थाचे मूलगुणाष्टक

मद्यादौ श्रद्धधज्जैनीमाज्ञां हिंसामपासितुम् ॥
मद्यमांसमधून्युज्झेत्पञ्चक्षीरफलानि च ॥ ६९ ॥

अर्थ— श्रावकानें सम्यक्त्वी व्हावयानें असल्यास श्रीजिनेंद्रांनीं सांगितलेल्या शास्त्रावर विश्वास ठेवून हिंसात्याग करण्याकरितां मद्य, मांस, मधु आणि पंचोदुंबर यांचा त्याग अवश्य करावा. हेच श्रावकाचे आठ मूलगुण होत.

दुसरीं मतें

अष्टैतान् गृहिणां मूलगुणान् स्थूलवधादि वा ॥
फलस्थाने स्मरेत् द्यूतं मधुस्थान इहैव च ॥ ७० ॥

अर्थ— किंवा स्थूलहिंसाविरति, स्थूलासत्यविरति, स्थूलचौर्यविरति, स्थूलाब्रह्मचर्यविरति आणि स्थूलपरिग्रहविरति हे पांच; मद्यत्याग, मांसत्याग आणि द्यूतत्याग हे तीन, मिळून आठ होतात. हेही आठ मूलगुण समजावेत.

मद्यपलमधुनिशाशनपञ्चफलीविरतिपञ्चकाप्तनुती ॥
जीवदया जलगालनमिति च क्वचिदष्टमूलगुणाः ॥ ७१ ॥

अर्थ— मद्यत्याग, मधुत्याग, मांसत्याग, रात्रिभोजनत्याग, पंचोदुंबरत्याग, पंचपरमेष्ठिनमस्कार, जीवदया आणि जलगालन हे श्रावकाचे आठ मूल गुण होत; असें कित्येकांचें मत आहे.

गृहस्थाच्या चारित्राचे तीन भेद

गृहिणां त्रेधा तिष्ठत्यणुगुणशिक्षाव्रतात्मकं चरणम् ॥
पञ्चत्रिचतुर्भेदं त्रयं यथासंख्यमाख्यातम् ॥ ७२ ॥

अर्थ— गृहस्थांचें चारित्र अणुव्रत, गुणव्रत आणि शिक्षाव्रत असें तीन प्रकारचें आहे. त्यांत अणुव्रताचे पांच भेद आहेत, गुणव्रताचे तीन आणि शिक्षाव्रताचे चार असे भेद आहेत.

अणुव्रताचें लक्षण

प्राणातिपातवितथव्याहारस्तेयकाममूर्च्छाभ्यः ॥

स्थूलेभ्यः पापेभ्यो व्युपरमणमणुव्रतं भवति ॥ ७३ ॥

अर्थ— स्थूलहिंसा, स्थूलानृत, स्थूलचौर्य, स्थूलाब्रह्मचर्य आणि स्थूलपरिग्रह यांपासून निवृत्त होणें यास अणुव्रत ह्मणतात.

हिंसात्यागानें प्रयोजन.

स्वयमेवात्मनाऽऽत्मानं हिनस्त्यात्मा कषायवान् ॥
पूर्वं प्राण्यन्तराणां तु पश्चात्स्याद्वा न वा वधः ॥ ७४ ॥

अर्थ— रागद्वेषादि कषायांनीं युक्त झालेला आत्मा हा कषायवान् झाल्यामुळें प्रथम आपण आपल्याला मारतो. मग दुसऱ्या प्राण्याचा वध होवो किंवा न होवो.

स्थूलहिंसात्यागानें लक्षण.

सङ्कल्पात्कृतकारितमननाद्योगत्रयस्य चरसत्वान् ॥
न हिनस्ति यत्तदाहुः स्थूलवधाद्विरमणं निपुणाः ॥ ७५ ॥

अर्थ— मन, वाणी आणि शरीर या तिहींच्या योगानें त्रसजीवाची हिंसा स्वतः न करणें, दुसऱ्याकडून न करविणें आणि करीत असलेल्या किंवा करणाऱ्या अशा कोणाला आपली संमति न दाखविणें यास 'स्थूलहिंसाविरति किंवा अहिंसाणुव्रत' असें शास्त्रज्ञ ह्मणतात.

अहिंसाणुव्रताचे अतीचार.

छेदनबन्धनपीडनमतिभारारोपणं व्यतीचाराः ॥
आहारवारणाऽपि च स्थूलवधाद्व्युपरतेः पञ्च ॥ ७६ ॥

अर्थ— कोणाला तरी कापणें, बांधून घालणें, पीडा देणें, अतिशय ओझें घालणें आणि आहार न देणें हे अहिंसाणुव्रताचे पांच अतीचार आहेत. ते अहिंसाणुव्रत करणाऱ्यानें करूं नयेत.

सत्याणुव्रताचें स्वरूप.

स्थूलमलीकं न वदति न परान्वादयति सत्यमपि विपदे ॥
यत्तद्वदन्ति सन्तः स्थूलमृषावादवैरमणम् ॥ ७७ ॥

अर्थ— मोठें खोटें न बोलणें ( लोकांस हें बोलणें खोटें असें जें सहज समजण्यासारखें आहे, तसलें भाषण आपण स्वतः न बोलणें ) दुसऱ्याकडून न बोलविणें आणि दुसऱ्याला ज्यामुळें त्रास भोगावा लागेल असें खरें भाषणही स्वतः न करणें, व दुसऱ्याकडून न करविणें, ह्यास स्थूलासत्यविरति किंवा सत्याणुव्रत असें विद्वान् लोक ह्मणतात.

सत्याणुव्रताचे अतीचार

परिवादरहोभ्याख्यापैशुन्यं कूटलेखकरणं च ॥

न्यासापहारिताऽपि च व्यतिक्रमाः पञ्च सत्यस्य ॥ ७८ ॥

अर्थ— दुसऱ्याची निंदा करणे, गुप्त गोष्ट सांगणे, चहाडी करणे, खोटा लेख लिहिणें आणि दुसऱ्याची ठेव घेणे हे पांच सत्याणुव्रताचे अतीचार आहेत. ते करूं नयेत.

अचौर्याणुव्रताचे स्वरूप

निहितं वा पतितं वा सुविस्मृतं वा परस्वमविसृष्टम् ॥
न हरति यन्न च दत्ते तदकृशचौर्यादुपारमणम् ॥ ७९ ॥

अर्थ— ठेवलेली, पडलेली, किंवा विसरलेली अशी दुसऱ्याची वस्तु त्यानें दिल्यावांचून आपण न घेणे, व दुसऱ्यास न देणें ह्यास स्थूलचौर्यविरति किंवा अचौर्याणुव्रत ह्मणतात.

अचौर्याणुव्रताचे अतीचार

चौरप्रयोगचौरार्थादानविलोपसदृशसम्मिश्राः ॥
हीनाधिकविनिमानं पञ्चास्तेये व्यतीपाताः ॥ ८० ॥

अर्थ— चोरीचा उपाय सांगणें, दुसऱ्यानें चोरलेले पदार्थ घेणे, राजाची आज्ञा मोडणे, अधिक किमतीच्या पदार्थात कमी किमतीचा पदार्थ मिसळणें आणि माप कमीजास्ती करणे हे अचौर्यव्रताचे पांच अतीचार आहेत.

परदारनिवृत्ति अणुव्रताचें स्वरूप.

न च परदारान् गच्छति न परान् गमयति च पापभीतेर्यत् ॥
सा परदारनिवृत्तिः स्वदारसन्तोषनामापि ॥ ८१ ॥

अर्थ— पापाच्या भीतीमुळें परस्त्रीशी आपण समागम न करणें आणि दुसऱ्याकडून न करविणें, आणि स्वस्त्रीविषयीं संतुष्ट असणें, ह्याला परदारविरति नावाचें अणुव्रत ह्मणतात.

परदारनिवृत्त्यणुव्रताचे अतीचार.

अन्यविवाहकरणानङ्गक्रीडाविटत्वविपुलतृषः ॥
इत्वरिकागमनं चास्मरस्य पञ्च व्यतीचाराः ॥ ८२ ॥

अर्थ— दुसऱ्याचें लग्न जुळविणें किंवा करणें, भलत्याच इंद्रियाचे ठिकाणीं कामलीला करणें, कामोत्पादक भाषण बोलणें, स्वस्त्रीविषयीं अत्यंत आसक्ति करणें आणि वेश्येकडे कामसेवनाकरितां जाणें हे पांच परदारविरतिव्रताचे अतीचार आहेत, ते करूं नयेत.

परिग्रहपरिमाणाणुव्रताचें स्वरूप

धनधान्यादिग्रन्थं परिमाय ततोऽधिकेषु निस्पृहता ॥
परिमितपरिग्रहः स्यादिच्छापरिमाणनामाऽपि ॥ ८३ ॥

अर्थ— धन, धान्य वगैरे जो परिग्रह, त्याचें परिमाण करून ( अमुक इतकें द्रव्य मी सांठवीन; अमुक इतकें धान्य सांठवीन असें परिमाण ठरवून ) त्यापेक्षा अधिकाची इच्छा न करणें; ह्याला परिग्रहपरिमिति किंवा इच्छापरिमाण असें ह्मणतात.

परिग्रहपरिमाणव्रताचे अतीचार

अतिवाहनातिसंग्रहविस्मयलोभातिभारवहनानि ॥
परिमितपरिग्रहस्य च विक्षेपाः पञ्च लक्ष्यन्ते ॥ ८४ ॥

अर्थ— घोडे, गाड्या वगैरे वाहनें अधिक बाळगणें, गरज नसलेल्या वस्तूंचा पुष्कळ संग्रह करणें, दुसऱ्याची संपत्ति पाहून आश्चर्य मानणें, लोभ असणें आणि आपल्याला न जाईल असें ओझें घेणें हे पांच परिग्रहपरिमाणाचे अतीचार आहेत.

सहा अणुव्रतें,

वधादसत्याच्चौर्याच्च कामाद्ग्रन्थान्निवर्तनम् ॥
पञ्चकाणुव्रतं रात्रिभुक्तिः षष्ठमणुव्रतम् ॥ ८५ ॥

अर्थ— हिंसा, असत्य, चौर्य, स्त्रीसंग आणि परिग्रह ह्या प्रत्येकापासून निवृत्त होणें हीं पांच अणुव्रतें आहेत. आणि रात्रिभोजनाचा त्याग करणें हें सहावें अणुव्रत आहे.

रात्रिभोजनत्याग करणाऱ्याचा भोजनकाळ

अन्हो मुखेऽवसाने च यो द्वे द्वे घटिके त्यजेत् ॥
निशाभोजनदोषज्ञोऽश्नात्यसौ पुण्यभोजनम् ॥ ८६ ॥

अर्थ— प्रातःकालीच्या आरंभीच्या दोन घटिका टाकून, आणि सायंकालच्या शेवटच्या दोन घटिका टाकून जो भोजन करतो, तो श्रावक रात्रिभोजनाचा दोष जाणणारा असल्यानें पुण्यकारक भोजन करतो, असें समजावें.

अणुव्रतें पाळल्याचें फळ.

पञ्चाणुव्रतनिधयो निरतिक्रमणाः फलन्ति सुरलोकम् ॥
यत्रावधिरष्टगुणा विद्यन्ते कामदा नित्यम् ॥ ८७ ॥

अर्थ— पांच अणुव्रतें पाळणारें आणि अतीचार न होऊं देणारे असें जे जीव असतात ते–ज्या ठिकाणीं इच्छित फल देणारें अवधिदर्शन आणि आठ मूल गुण नेहमीं असतात– अशा स्वर्गाची प्राप्ति करून घेतात.

गुणव्रतें

दिग्व्रतमनर्थदण्डव्रतं च भोगोपभोगपरिमाणम् ॥
अनुबृंहणाद्गुणानामाख्यन्ते गुणव्रतान्यार्याः ॥ ८८ ॥

अर्थ— दिग्व्रत, अनर्थदंडव्रत आणि भोगोपभोगपरिमाण हीं तीन व्रतें गुणांना वाढविणारीं असल्यानें त्यांना गुणव्रतें असें ह्मणतात.

दिग्व्रताचें स्वरूप.

दिग्वलयं परिगणितं कृत्वाऽतोऽहं बहिर्न यास्यामि ॥
इति सङ्कल्पो दिग्व्रतमामृत्यनुपापनिवृत्त्यै ॥ ८९ ॥

अर्थ— दहाही दिशांच्या बाजूस मोजून मर्यादा करून, त्या मर्यादेच्या बाहेर मी जाणार नाहीं, असा मरणापर्यंतचा संकल्प पापनिवृत्तीकरितां करणें; त्याला दिग्व्रत ह्मणतात

मकराकरसरिदटवीगिरिजनपदयोजनानि मर्यादाम् ॥
प्राहुर्दिशां दशानां प्रतिसंहारे प्रसिद्धानि ॥ ९० ॥

अर्थ— समुद्र, नद्या, अरण्य, पर्वत आणि देश (गावें) ह्यांच्या दहा दिशांच्या बाजून मर्यादा कराव्यात. किंवा ‘ अमुक योजनें पर्यंत ’ अशी मर्यादा करावी; आणि त्याच्या बाहेर जाऊं नये.

दिग्व्रताचे अतीचार.

ऊर्ध्वाधस्तिर्यग्व्यतिपाताः क्षेत्रवृद्धिरवधीनाम् ॥
विस्मरणं दिग्विरतेरत्याशाः पञ्च मन्यन्ते ॥ ९१ ॥

अर्थ— ऊर्ध्वभागांत पूर्वी केलेल्या मर्यादेचें उल्लंघन करणें, खालच्या भागात मर्यादेचें उल्लंघन करणें, बाजूच्या मर्यादेचें उल्लंघन करणें, पूर्वी ठरविलेल्या क्षेत्रापेक्षा अधिक क्षेत्र वाढविणें आणि पूर्वी केलेली मर्यादा विसरणें हे पांच दिग्विरतिव्रताचे अतीचार आहेत.

अनर्थदंडव्रताचें स्वरूप.

अभ्यन्तरं दिगवधेरपार्थकेभ्यः सपापयोगेभ्यः ॥
विरमणमनर्थदण्डव्रतं विदुर्व्रतधराग्रण्यः ॥ ९२ ॥

अर्थ— आपण जी देशमर्यादा केली असेल त्या मर्यादेंत कारणावांचून घडणारीं जीं पातकें, त्यापासून निवृत्त होणें, यास व्रती पुरुष अनर्थदंडविरतिव्रत समजतात.

अनर्थदंडव्रताचे अतीचार

पापोपदेशहिंसादानापध्यानदुःश्रुतीः पञ्च ॥
प्राहुः प्रमादचर्यामनर्थदण्डानदण्डधराः ९३ ॥

अर्थ— दंडाला ( अशुभमन, अशुभवचन अशुभकाय यांना ) न धारण करणारे जे गणधर ते पापोपदेश हिंसादान, अपध्यान, दुःश्रुति आणि प्रमादचर्या असे पांच प्रकारचे अनर्थदंड आहेत असे म्हणतात. किंवा या पांचासही अनर्थदंड असें म्हणतात.

पापोपदेश

तिर्यक्क्लेशवाणिज्याहिंसारम्भप्रलम्भनादीनाम् ॥
कथाप्रसङ्गप्रसवः स्मर्तव्यः पाप उपदेशः ॥ ९४ ॥

अर्थ— पशुपक्षी इत्यादि तिर्यक् जीवांना पीडा करणें, व्यापार करणें, हिंसा करणें, शेतकी, लोकांना फसविणें, वगैरेंच्या संबंधानें गोष्टी बोलण्याचा प्रसंग आणणें, हा पापोपदेश समजावा.

हिंसादान

परशुकृपाणखनित्रज्वलनायुधशृङ्गशृङ्खलादीनाम् ॥
वधहेतूनां दानं हिंसादानं ब्रुवन्ति बुधाः ॥ ९५ ॥

अर्थ— हिंसेला साधनीभूत असलेल्या ज्या-कुऱ्हाड, तरवार, कुदळ अग्नि, शस्त्र, शिंग, सांखळी वगैरे-वस्तू, त्या देणें, यांस हिंसादान म्हणतात.

अपध्यान.

वधबन्धच्छेदादेर्द्वेषाद्रागाच्च परकलत्रादेः ॥
आध्यानमपध्यानं शासति जिनशासने विशदाः ॥ ९६ ॥

अर्थ— एखाद्याच्या द्वेषामुळें त्याचा वध करावा, त्याला बांधून घालावें, त्याचा एखादा अवयव

कांपावा असा विचार करणें, आणि प्रेमानें परस्त्रीचें चिंतन करणें, ह्याला जैनशास्त्रांत प्रवीण असलेले पंडित अपध्यान असें ह्मणतात.

दु श्रुति

आरम्भसङ्गसाहसमिथ्यात्वद्वेषरागमदमदनैः ॥
चेतः कलुषयतां श्रुतिरपाधियां दुःश्रुतिर्भवति ॥ ९७ ॥

अर्थ— हिंसा घडविणारा उद्योग, परिग्रह, धाडस, मिथ्यात्व, द्वेष, राग, गर्व आणि कामेच्छा ह्यांच्या योगानें अंतःकरण विघडविणारीं जीं दुष्टांचीं भाषणें, त्यांचें श्रवण करणें, ह्याला दुःश्रुति असें ह्मणतात.

प्रमादचर्या

क्षितिसलिलदहनपवनारम्भं विफलं वनस्पतिच्छेदम् ॥
सरणं सारणमपि च प्रमादचर्यां प्रभाषन्ते ॥ ९८ ॥

अर्थ— कारणावांचून व्यर्थ जमीन खणणें, पाण्यावर कांठीनें मारणें, कारणावांचून अग्नि पेटविणें, वायूवर आघात करणें, विनाकारण झाडें तोडणें, उगींच हिंडणें आणि दुसऱ्यास हिंडावयास लावणें ह्यांला प्रमादचर्या असें ह्मणतात.

अनर्थदंडविरतीचे अतीचार.

कन्दर्पं कौत्कुच्यं मौखर्यमतिसाधनं पञ्च ॥
असमीक्ष्य चाधिकरणं व्यतीतयोऽनर्थदण्डकृद्विरतेः ॥ ९९ ॥

अर्थ— स्त्रीसंभोगाची इच्छा व्यक्त होईल अशी थट्टेनें भाषण करणें, त्या प्रकारच्याच अंगचेष्टा करणें, व्यर्थ वडवड करणें, भोगोपभोगाची सामग्री विनाकारण वाढविणें, आणि विचार केल्यावांचून कारणापेक्षा अधिक कांहींतरी करणें, हे पांच अनर्थदंडविरतिव्रताचे अतीचार आहेत.

भोगोपभोगपरिमाणव्रत.

अक्षार्थानां परिसंख्यानं भोगोपभोगपरिमाणम् ॥
अर्थवतामप्यवधौ रागरतीनां तनूकृतये ॥ १०० ॥

अर्थ— ज्याचें अवश्य कारण आहे अशा-इंद्रियसेव्य-विषयांची मर्यादा ठरविणें, त्याला भोगोपभोगपरिमाणव्रत म्हणतात. हें व्रत रागादि मनोविकार कमी करण्याकरिता अवश्य करावें.

भोग आणि उपभोग ह्यांचे लक्षण.

भुक्त्वा परिहातव्यो भोगो भुक्त्वा पुनश्च भोक्तव्यः ॥
उपभोगोऽशनवसनप्रभृतिः पाञ्चेन्द्रियो विषयः ॥ १०१ ॥

अर्थ— एकवार अनुभवल्यानें त्याज्य होणारा ‘ म्हणजे दुसऱ्या वेळीं अनुभव करता न येणारा ’ असा

जो पंचेंद्रियांचा विषय असलेला पदार्थ त्यास भोग ह्मणतात. जसें खाण्याचे पदार्थ. आणि ज्याचा पुनः पुनः अनुभव करता येतो असा जो पंचेंद्रियाचा विषय त्यास उपभोग ह्मणतात. जसें वस्त्र वगैरे पदार्थ. हा भोग आणि उपभोग ह्या शब्दांचा अर्थ सांगितला आहे.

मधुमासमद्यवर्जन.

त्रसहतिपरिहारार्थं क्षौद्रं पिशितं प्रमादपरिहृतये ॥
मद्यं च वर्जनीयं जिनचरणौ शरणमुपयातैः ॥ १०२ ॥

अर्थ— जिनचरणाची भक्ति करणाऱ्या श्रावकानें त्रस जीवांची हिंसा होऊं नये ह्मणून, मध आणि मांस वर्ज्य करावें. आणि आपल्या हातून प्रमाद होऊं नये ह्मणून मद्य वर्ज्य करावें.

व्रतिकानीं त्याज्य पदार्थ

अल्पफलबहुविघातान्मूलकमार्द्राणि शृङ्गवेराणि ॥
नवनीतनिम्बकुसुमं कैतकमित्येवमवहेयम् ॥ १०३ ॥

अर्थ— ज्यापासून फल थोडें, परंतु पुष्कळ त्रस जीवाचा नाश मात्र होतो असें असल्यामुळें, मुळा, आलें लोणी, निंबाचें फूल, केवडा ह्या पदार्थांचा त्याग करावा.

उदुंबरत्यागाचें कारण

सूक्ष्माः स्थूलास्तथा जीवाः सन्त्युदुम्बरमध्यगाः ॥
तन्निमित्तं जिनोद्दिष्टं पञ्चोदुम्बरवर्जनम् ॥ १०४ ॥

अर्थ— सूक्ष्म आणि स्थूल असे दोनी प्रकारचे जीव उदुंबरांत असतात. म्हणून श्रीजिनानीं पंचोदुंबरांचा त्याग करण्यास सांगितलें आहे.

फलभक्षणत्याग.

रससम्पृक्तफलं यो दशति त्रसतनुरसैश्च सम्मिश्रम् ॥
तस्य च मांसनिवृत्तिर्विफला खलु भवति पुरुषस्य ॥ १०५ ॥

अर्थ— त्रसजीवांच्या शरीररसानें युक्त असलेलें असें रसभरित फल जो भक्षण करतो, त्या पुरुषानें मांसत्याग केलेला व्यर्थ आहे; असें समजावें.

गालितजल वगैरेंत जंतु होण्याचा काल.

गालितं शुद्धमप्यम्बु सम्मूर्च्छति मुहूर्ततः ॥
अहोरात्रात्तदुष्णं स्यात्काञ्जिकं दूरवन्हिकम् ॥ १०६ ॥

अर्थ— गाळलेलें असें शुद्ध पाणीही दोन घटिकांनीं जीवयुक्त होतें. तेंच ( गाळलेलें ) पाणी तापविलें तर एक दिवसानें त्यांत जीव उत्पन्न होतात, आणि कांजीत ती थंड झाल्याबरोबर जीव उत्पन्न होतात.

तिलतण्डुलतोयं च प्रासुकं भ्रामरीगृहे ॥
न पानीयं मतं तस्मान्मुखशुद्धिर्न जायते ॥ १०७ ॥

अर्थ— भिक्षेकरितां गेलेल्या घरांतील तीळ तादुळ ह्यांनीं मिश्र केलेलें पाणी शुद्ध समजावें. परंतु तें वास्तविक पाणी नसल्यानें, तें तोंड धुण्याच्या वगैरे उपयोगीं नाहीं.

जल निर्जंतुक होण्यास उपाय

एलालवङ्गतिलतण्डुलचन्दनाद्यैः । कर्पूरकुंकुमतमालसुपल्लवैश्च ॥
सुप्रासुकं भवति खादिरभस्मचूर्णैः । पानीयमग्निपचितं त्रिफलाकषायैः ॥ १०८ ॥

अर्थ— वेलदोडे, लवंगा, तीळ, तांदुळ, चंदन, कापूर, केशर, ताडाचीं कोवळीं पानें, खैराची राख, अग्नि आणि त्रिफलेचा ( हिरडा, बेहेडा, आवळकाठी ह्यांचा ) काढा ह्यांतील कशाचाही योग पाण्यास केला असतां पाणी निर्जंतुक होतें.

चम्मगदे जलणेहे उपज्जइ वियलतियं पंचिदियं ॥
संधाने पुण भुत्ते सीइजुए मंसवए अइचारी ॥ १०९ ॥

अर्थ— चामड्याच्या बुदल्यांतील पाणी किंवा तेल ह्यांत विकलेंद्रिय आणि पंचेंद्रिय ( ? ) जीव उत्पन्न होतात, ह्मणून तें त्याज्य आहे. आंबलेला पदार्थ भक्षण केल्यानें मांसत्यागव्रताचा अतीचार होतो.

[ चामड्याच्या बुदल्यांतील पाणी वगैरेंत पंचेंद्रिय जीव कसे उत्पन्न होतात? ही शंका आहे. ]

शिक्षाव्रताचे भेद.

देशावकाशिकं वा सामयिकं प्रोषधोपवासो वा ॥
वैयावृत्त्यं शिक्षाव्रतानि चत्वारि शिष्टानि ॥ ११० ॥

अर्थ— देशावकाशिक, सामयिक, प्रोषधोपवास आणि वैयावृत्त्य हीं चार शिक्षाव्रतें आहेत.

देशावकाशिकाची मर्यादा

गृहदारग्रामाणां क्षेत्रनदीदावयोजनानां च ॥
देशावकाशिकस्य स्मरन्ति सीम्नां तपोवृद्धाः ॥ १११ ॥

अर्थ— घर, दार, गांव, शेत, नदी, अरण्य किंवा योजन ह्या देशावकाशिकव्रताच्या मर्यादा होत. असें मुनि मानतात.

सामयिकव्रत

आसमयमुक्ति मुक्तं पञ्चाघानामशेषभावेन ॥
सर्वत्र च सामयिकाः सामयिकं नाम शंसन्ति ॥ ११२ ॥

अर्थ— कांहीं एका नियमित कालापर्यंत हिंसादि पांच प्रकारच्या पातकाचा सर्वप्रकारे त्याग करणें

ह्याला सामायिक शिक्षाव्रत ह्मणतात.

प्रोषधोपवास.

पर्वण्यष्टम्यां च ज्ञातव्यः प्रोषधोपवासस्तु ॥
चतुरभ्यवहार्याणां प्रत्याख्यानं सदेच्छाभिः ॥ ११३ ॥

अर्थ— चतुर्दशी आणि अष्टमी या दिवशी व्रत करण्याच्या इच्छेनें चारही प्रकारच्या आहाराचा दिवसभर त्याग करणें, ह्याला प्रोषधोपवासव्रत ह्मणतात.

वैयावृत्य.

दानं वैयावृत्यं धर्माय तपोधनाय गुणनिधये ॥
अनपेक्षितोपचारोपक्रियमगृहाय विभवेन ॥ ११४ ॥

अर्थ— सम्यक्त्वादि गुणांचा समुद्र अशा अनगार तपस्व्याला ( यतीला ) धर्माच्या बुद्धीनें-त्यानें आपली स्तुति करावी, किंवा कांहीं तरी प्रत्युपकार करावा अशी इच्छा न करता-दान करणें; ह्याला वैयावृत्य नावाचें शिक्षाव्रत ह्मणतात.

व्यापत्तेर्व्यपनोदः पदयोः संवाहनं च गुणरागात् ॥
वैयावृत्यं यावानुपग्रहोऽन्योऽपि संयमिनाम् ॥ ११५ ॥

अर्थ— संयमी मुनीचे–सद्गुणाविषयींच्या प्रेमामुळें–क्लेश घालविणें, त्याचे पाय रगडणें, आणि दुसऱ्याही शक्य तितका त्याचा उपयोग करणें, याला देखील वैयावृत्त्य शिक्षाव्रतच ह्मणतात.

दानविधि.

नवपुण्यैः प्रतिपत्तिः सप्तगुणसमाहितेन शुद्धेन ॥
अपसूनारम्भाणामार्याणामिष्यते दानम् ॥ ११६ ॥

अर्थ— सप्तगुणांनीं युक्त असलेल्या शुद्धभावाच्या योगें करून नऊ प्रकारच्या पुण्यकर्मांनीं यतीचा सत्कार करुन पापनिवृत्त झालेल्या श्रावकांनीं त्याना दान करणें योग्य आहे.

नऊ पुण्यकर्में.

स्थापनमूच्चैःस्थानं पादोदकमर्चनं प्रणामश्च ॥
वाक्कायहृदयेषणशुद्धय इति नवविधं पुण्यम् ॥ ११७ ॥

अर्थः—यतीला आदरपूर्वक बसविणें, उच्चस्थान देणें, पाय धुण्यास पाणी देणें, पूजा करणें, नमस्कार, वाणीची शुद्धि, शरीराची शुद्धि, आणि एषणाशुद्धि, ( पाहून अन्न देणें ) हीं नऊ पुण्यकर्में समजावींत.

दात्याचे सात गुण

श्रद्धा भक्तिस्तुष्टिर्विज्ञानमलुब्धता क्षमा सत्त्वम् ॥

यत्रैते सप्तगुणास्तं दातारं प्रशंसन्ति ॥ ११८ ॥

अर्थ— श्रद्धा, भक्ति, संतोष, ज्ञान, निर्लोभपणा, क्षमा आणि धैर्य हे सात गुण ज्याच्या ठिकाणीं असतील त्या दात्याची सर्व लोक स्तुति करतात.

श्रावकाच्या एकादश प्रतिमा.

अथैकादश प्रतिमाः ॥ दंसण वय सामाइय पोसह सचित्त राइभत्तेय ॥
बंभारंभपरिग्गह अणुमणुमुद्दिट्ठ देशविरदेदे ॥ ११९ ॥

अर्थ— आता श्रावकाच्या अकरा प्रतिमा सांगतात–दर्शन, व्रत, सामायिक, प्रोषध, सचित्तविरति, रात्रिभोजनत्याग, ब्रह्मचर्य, आरंभत्याग, परिग्रहत्याग, अनुमतित्याग आणि उद्दिष्टत्याग ह्या श्रावकाच्या अकरा प्रतिमा आहेत. ह्या प्रतिमा धारण करणारे श्रावक पांचव्या गुणस्थानातील होत.

सचित्तविरतिव्रत

दर्शनव्रतसामायिकप्रोषधोपवासकाः ॥
प्रोक्ताःप्रागेव प्रोचेऽथ सचित्तव्रतलक्षणम् ॥ १२० ॥
मूलफलशाकशाखाकरीरकन्दप्रसूनबीजानि ॥
नामानि योऽत्ति सोऽयं सचित्ताविरतो दयामूर्तिः ॥ १२१ ॥

अन्नं पानं खाद्यं लेह्यं नाश्नाति यो विभावर्याम् ॥
स च रात्रिभुक्तविरतः सत्त्वेष्वनुकम्पमानमनाः ॥ १२४ ॥

अर्थ— अन्न, पान, खाद्य आणि लेह्य असा चार प्रकारचा आहार ज्या दयालु श्रावकानें रात्रीं वर्ज्य केला, तो रात्रिभुक्तविरत समजावा.

रात्रिभुक्तविरताची प्रशंसा.

यो निशि भुक्तिं मुञ्चति तेनानशनं कृतं च षण्मासम् ॥
संवत्सरस्य मध्ये निर्दिष्टं मुनिवरेणेति ॥ १२५ ॥

अर्थ— ज्यानें रात्रिभोजनाचा त्याग केला त्यानें एका संवत्सरांत सहा महिने उपवास केल्यासारखें होतें, असें मुनिवरानें सांगितलें आहे.

रात्रिभुक्तव्रताचें दुसरें स्वरूप.

मणवयणकायकदिकारिदाणुमोदेहिं मेहुणम् ॥
णवधा दिवसम्मिजो विवज्जादिगुणम्मि सावओ छट्ठो ॥ १२६ ॥

अर्थ— मन, वचन आणि काय यांतील प्रत्येकानें करणें, करविणें आणि अनुमोदन देणें अशा नऊ प्रकारांनीं दिवसा मैथुनाचा त्याग करणें ह्यालाही रात्रिभुक्तव्रतच म्हणतात.

गृहस्थधर्मशक्तश्चोपनयब्रह्मचारिकः ॥ १३० ॥

अर्थ— ब्रह्मचारी, गृहस्थ वानप्रस्थ आणि भिक्षु असे चार आश्रम–ज्याप्रमाणें क्रियाभेदामुळें ब्राह्मणादि चार वर्ण भिन्न आहेत, त्याप्रमाणें क्रियाभेदामुळें भिन्न असलेले जसे–सातव्या अध्यायांत सांगितले आहेत. त्यांत श्रावकाध्ययनसूत्राचा विचार करून गृहस्थधर्म आचरण्यास समर्थ असा जो श्रावक, त्यास उपनय ब्रह्मचारी ह्मणावें.

अवलंबब्रह्मचाऱ्याचें लक्षण.

स्थित्वा क्षुल्लकरूपेण कृत्वाऽभ्यासं सदाऽऽगमे ॥
कुर्याद्विवाहक सोऽत्रावलम्बब्रह्मचारिकः ॥ १३१ ॥

अर्थ—गरीबीनें वागून व सर्वदा आगमाचा अभ्यास करून, जो विवाह करतो तो अवलंबब्रह्मचारी श्रावक समजावा.

अदीक्षाब्रह्मचाऱ्याचें लक्षण

विना दीक्षां व्रतासक्तः शास्त्राध्ययनतत्परः ॥
पठित्वोद्वाहं यः कुर्यात्सोऽदीक्षाब्रह्मचारिकः ॥ १३२ ॥

अर्थ— दीक्षा ग्रहण केल्यावाचून व्रत करण्याविषयीं तत्पर असलेला आणि शास्त्राध्ययन करण्यांत

गळून गेलेला, व शास्त्राध्ययन समाप्त करून विवाह करणारा असा जो श्रावक तो अदीक्षाब्रह्मचारी समजवा.

गूढब्रह्मचाऱ्याचे लक्षण

आ बाल्याच्छास्त्रसत्प्रीतः पित्रादीनां हठात्पुनः ॥
पठित्वोद्वाहं यः कुर्यात्स गूढब्रह्मचारिकः ॥ १३३ ॥

अर्थ— लहानपणापासून शास्त्राभ्यास करण्यांत रत झालेला व शास्त्राभ्यास संपल्यावर पिता वगैरे वडील मनुष्यांच्या बलात्कारामुळें ज्यानें विवाह केला आहे असा जो श्रावक तो गूढब्रह्मचारी समजावा.

नैष्ठिकब्रह्मचाऱ्याचे लक्षण

यावज्जीवं तु सर्वस्त्रीसङ्गं करोति नो कदा ॥
नैष्ठिको ब्रह्मचारी स एकवस्त्रपरिग्रहः ॥ १३४ ॥

अर्थ— जो यावज्जीव कोणत्याही स्त्रीचा समागम न करील व ज्यानें एका वस्त्रावांचून अन्य परिग्रह बाळगलेला नाहीं तो नैष्ठिकब्रह्मचारी समजावा.

गृहस्थाचे लक्षण

सन्ध्याध्ययनपूजादिकर्मसु तत्परो महान् ॥
त्यागी भोगी दयालुश्च सद्गृहस्थः प्रकीर्तितः ॥ १३५ ॥

अर्थः— संध्या, अध्ययन ( स्वाध्याय ) पूजा वगैरे कर्मे करण्याविषयीं तत्पर असून, दान करणारा उपभोग घेणारा व जीवदया करणारा असा जो असेल तो उत्तम गृहस्थ समजावा.

वानप्रस्थलक्षण.

प्रतिमैकादशधारी ध्यानाध्ययनतत्परः ॥
प्राक्कषायाद्विदूरस्थो वानप्रस्थः प्रशस्यते ॥ १३६ ॥

अर्थ— अकराही प्रतिमा धारण करणारा, ध्यान आणि अध्ययन ह्यांविषयीं तत्पर असलेला व सर्व कषायांचा ज्यानें त्याग केला आहे असा जो असेल तो वानप्रस्थ समजावा.

भिक्षुलक्षण.

सर्वसङ्गपरित्यक्तो धर्मध्यानपरायणः ।
ध्यानी मौनी तपोनिष्ठः स ज्ञानी भिक्षुरुच्यते ॥ १३७ ॥

अर्थ— ज्यानें सर्वसंगपरित्याग केला आहे, व जो धर्मध्यानांत आसक्त असून मौन धारण करून तपश्चर्या करीत असेल तो भिक्षु समजावा. पुढें आठवी प्रतिमा सांगतात.

आरम्भनिवृत्ति.

सेवाकृषिवाणिज्यप्रमुखारम्भतो व्युपरतिः ॥

प्राणातिपातहेतोर्याऽसावारम्भविनिवृत्तिः ॥ १३८ ॥

अर्थ— ज्यापासून प्राणनाश होईल अशा सेवा, कृषि अथवा वाणिज्य वगैरे कर्माचा त्याग करणें ह्याला आरंभनिवृत्तिप्रतिमा ह्मणतात.

नववी प्रतिमा.

मोत्तूण वत्थमेत्तं परिग्गहं जो विवज्जदे सेस ॥
तत्थ वि मुच्छं ण करेदि वियाण सो सावचो णवमो ॥ १३९ ॥

अर्थ— एक वस्त्र सोडून (एका वस्त्रावांचून) बाकीच्या सर्वपरिग्रहाचा जो त्याग करतो, आणि असलेल्या वस्त्राविषयींही जो ममता ठेवीत नाहीं, तो नववी प्रतिमा धारण करणारा श्रावक समजावा.

बाह्यपरिग्रहाचे प्रकार.

क्षेत्रं वास्तु धनं धान्यं दासी दासश्चतुष्पदम् ॥
यानं शय्यासनं कुप्यं भाण्डं चेति बहिर्दश ॥ १४० ॥

अर्थ— शेत, घर, द्रव्य, धान्य, दास, दासी, जनावरें, वाहनें, शय्या, आसन, तांबे, पितळ वगैरे धातु आणि भांडीं हे दहा बाह्यपरिग्रह समजावेत.

अंतरंगपरिग्रहाचे प्रकार

मिथ्यात्ववेदहास्यादिषट्कषायचतुष्टयम् ॥
रागद्वेषौ च सङ्गाः स्युरन्तरङ्गाश्चतुर्दश ॥ १४१ ॥

अर्थ— मिथ्यात्व, तीन वेद ( स्त्रीवेद, पुवेद आणि नपुंसकवेद ), हास्य वगैरे सह, चार कषाय हे चवदा अंतरंगपरिग्रह समजावेत.

बाह्यग्रन्थविहीना दरिद्रमनुजास्तु पापतः सन्ति ॥
पुनरभ्यन्तरसङ्गत्यागी लोकेऽतिदुर्लभो जीवः ॥ १४२ ॥

अर्थ— पूर्वीच्या पापकर्मामुळें दरिद्री झालेले असे पुष्कळ लोक बाह्यग्रंथ रहित असतात. परंतु अंतरंगाचा त्याग करणारा जीव या लोकात अत्यंत दुर्लभ आहे.

दहावी प्रतिमा.

पुट्ठो वा पुट्ठो वा णियगेहपरेहिं सगिहकज्जे ॥
अणुमणणं जो ण कुणदि वियाण सो सावयो दसमो ॥ १४३ ॥

अर्थ-- प्रपचाच्या कोणत्याही कार्याबद्दल घरातील मनुष्यांनी कांही विचारिलें असतां किंवा नसतां आपण अनुमति जो देत नाही तो दहावी प्रतिमा धारण करणारा श्रावक समजावा.

अकराव्या प्रतिमेचे दोन प्रकार

एकादशके स्थाने सूत्कृष्टः श्रावको भवेत् द्विविधः ॥
वस्त्रैकधरः प्रथमः कौपीनपरिग्रहोऽन्यस्तु ॥ १४४ ॥

अर्थ— उद्दिष्टविरति नावाची जी अकरावी प्रतिमा त्यांतील उत्कृष्ट श्रावक दोन प्रकारचा असतो. त्यांत पहिला एकवस्त्र धारण करणारा आणि दुसरा फक्त कौपीन धारण करणारा होय.

गृहतो मुनिर्वनमित्वा गुरूपकण्ठे व्रतानि परिगृह्य ॥
भिक्षाशनस्तपस्यन्नुत्कृष्टश्चेलखण्डधरः ॥ १४५ ॥

अर्थ— तो अकराव्या प्रतिमेतील श्रावक गृह वगैरे परिग्रहाचा त्याग करून वनांत जाऊन गुरूजवळ व्रतें घेऊन भिक्षा मागून निर्वाह करणारा व वस्त्राचा एक तुकडा अंगावर धारण करणारा असा असतो.

अकरावी प्रतिमा धारण करणाऱ्याचा आचार

अथाशाधरः– स्वयं समुपविष्टोऽद्यात्पाणिपात्रेऽथ भाजने ॥
स श्रावकगृहं गत्वा पाणिपात्रस्तदङ्गणे ॥ १४६ ॥
स्थित्वा भिक्षां धर्मलाभं भणित्वा प्रार्थयेत वा ॥
मौनेन दर्शयित्वाऽङ्गं लाभालाभे समोऽचिरात् ॥ १४७ ॥
निर्गत्यान्यगृहं गच्छेद्भिक्षोद्युक्तश्च केनाचित् ॥

भोजनायार्थितोऽद्यात्तद्भुक्त्वा यद्भिक्षितं मनाक् ॥ १४८ ॥
प्रार्थयेतान्यथा भिक्षां यावत्स्वोदरपूरणीम् ॥
लभेत प्रासुपात्रान्तस्तत्र संशोध्य तां चरेत् ॥ १४९ ॥

अर्थ— आतां अकराव्या प्रतिमेला धारण करणाऱ्या श्रावकाचा आचार आशाधर पंडितांनीं सांगितलेला येथें सांगतात. अकराव्या प्रतिमेला धारण करणाऱ्यानें आपण खालीं बसून हातांत किंवा भांड्यात अन्न घेऊन भोजन करावें. त्यानें भिक्षेकरितां श्रावकांच्या घरीं जाऊन अंगणांत उभें राहून ' धर्मलाभ होवो, ' असें ह्मणून आपल्या हातांतच भिक्षेविषयीं याचना करावी. किंवा मौन धारण करून हातानें भिक्षेची खूण करावी. भिक्षा घातल्यास आनंद मानूं नये; व न घातल्यास खेदही मानूं नये. तेथें फार वेळ उभें राहूं नये. थोडा वेळ भिक्षेची वाट पाहून लागलीच दुसऱ्या घरीं जावें. कोणीं ' आपण आज येथेंच भोजन करा ' अशी प्रार्थना केल्यास त्या घरीं आपण भिक्षा मागून आणलेलें अन्न भक्षण करावें. तें थोडें असल्यास आपलें पोट भरेपर्यंत लागेल तितकें अन्न मागून घ्यावें. अन्न प्रासुक अशा पात्रांत ठेवून नीट पाहून भक्षण करावें.

कौपीनोऽसौ रात्रिप्रतिमायोगं करोति नियमेन ॥
लोचं पिच्छं धृत्वा भुङ्क्ते ह्युपविश्य पाणिपुटे ॥ १५० ॥

अर्थ— कौपीन धारण करणाऱ्यानें रात्रीं नियमानें प्रतिमायोग करावा. केशलुंचन करावें, पिच्छधारण करावें. आणि बसून पाणिपात्रांत भोजन करावें.

देशविरतांनीं न करण्याचीं कर्में

वीरचर्या च सूर्यप्रतिमा त्रैकाल्ययोगनियमश्च ॥
सिद्धान्तरहस्यादावध्ययनं नास्ति देशविरतानाम् ॥ १५१ ॥

अर्थ— वीरचर्या, सूर्यप्रतिमा, तिन्हीं काळीं योग करण्याचा नियम आणि सिद्धांतरहस्यादिकांचें अध्ययन हीं कर्में देशविरतांनीं करूं नयेत.

अकरा प्रतिमांतील उत्तम, मध्यम, अधम विभाग.

आद्याः स्युः षड् जघन्याः स्युर्मध्यमास्तदनु त्रयः ॥
शेषौ द्वावुत्तमावुक्तौ जैनेषु जिनशासने ॥ १५२ ॥

अर्थ— ह्या वर सांगितलेल्या अकरा प्रतिमांपैकीं पहिल्या सहा प्रतिमा धारण करणारे जैन कनिष्ठ, त्या पुढच्या तीन प्रतिमा धारण करणारे मध्यम आणि शेवटच्या दोन प्रतिमा धारण करणारे उत्तम होत, असें जैनशास्त्रांत सांगितलें आहे.

गुरूपदेशश्रवणानतरचें कृत्य.

सद्व्रतानि गुरूक्तानि चेति श्रुत्वोपनीतवान् ॥
गृह्णीयाच्च यथाशक्ति अमुत्रात्र सुखावहम् ॥ १५३ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें गुरूनीं सांगितलेलीं सद्व्रतें श्रवण करून शिष्यानें आपल्या शक्तीप्रमाणें सुखकर होतील अशीं व्रतें ग्रहण करावीत.

वाद्यादिविभवैर्युक्तो गृहं गत्वा स धर्मधीः ॥
ताम्बूलैः स्वजनान् सर्वान्मानयेद्धर्महेतवे ॥ १५४ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें व्रतग्रहण झाल्यानंतर त्यानें मंगलवाद्यें वाजत असतां समारंभानें आपल्या घरीं येऊन, आपल्या सजातीयाचा तांबूलादि देऊन धर्मवृद्धीकरितां सत्कार करावा.

यज्ञोपवीतं कथितं मुनीन्द्रै- । रत्नत्रयं वा व्यवहाररूपम् ॥
त्रिवर्गपुम्भिर्ध्रियते मनोज्ञं । धर्मार्थकामाभिमुखैः सुखाय ॥ १५५ ॥

अर्थ— यज्ञोपवीत हें बाह्य रत्नत्रय आहे असें मुनींद्रांनीं सांगितलें आहे. म्हणून धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ प्राप्त करून घेण्याची इच्छा करणाऱ्या त्रैवर्णिकश्रावकांनीं तें सुंदर असें यज्ञोपवीत सुखप्राप्तीकरितां धारण केलें जातें.

विद्याभ्यासः सदा कार्यः सतां मध्ये सुभूषणम् ॥

सत्पूरुषैस्त्विदं प्रोक्तं सोमसेनैः शिवाप्तये ॥ १५६ ॥

अर्थ— चांगल्या लोकांत भूषण प्राप्त होण्याकरितां विद्याभ्यास सर्वदा करावा; असें सत्पुरुष जे सोमसेन मुनी त्यांनीं सर्वांच्या कल्याणाकरितां सांगितलें आहे.

इत्येवं कथितानि जैनसमये सारव्रतानि क्षितौ ।
ये कुर्वन्ति सुधर्मसाञ्चितधियो धन्यास्तु ते मानवाः ॥
संसाराम्बुधिपारगाः शिवसुखं प्राप्ता इव प्रस्तुता ।
देवेन्द्रादिसुरैर्नराधिपगणैः श्रीसोमदेवैः पुनः ॥ १५७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें जैनशास्त्रांत सांगितलेली जी हीं मुख्य व्रतें, तीं जे धार्मिक लोक करितात, ते धन्य समजावेत. ते ह्या संसारसमुद्रांतून पार होऊन, मुक्त झालेले असेच कीं काय! इंद्रादि देवांनीं स्तुति केले जातात. तसेंच त्यांची नृपति स्तुति करतात आणि सोमसेनमुनीही त्यांची स्तुति करीत आहेत.

इतिश्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपणे भट्टारक-
श्रीसोमसेनाविरचिते व्रतस्वरूपकथनियो
नाम दशमोऽध्यायः समाप्तः ॥

|| श्रीवीतरागाय नम ||

|| एकादशोऽध्यायः ||

वन्दे त्वा जिनवर्द्धमानमनघं धर्मद्रुसद्बीजकं ।
कर्मारातितमोदिवाकरसमं नानागुणालंकृतम् ॥
स्याद्वादोदयपर्वताश्रिततरं सामन्तभद्रं वचः ।
पायान्नः शिवकोटिराजमहितं न्यायैकपात्रं सदा ॥ १ ॥

अर्थ— हे श्रीवर्द्धमानजिना! धर्मरूपी वृक्षाचें सद्बीज, कर्मरूपी जे शत्रु, तोच जो अंधकार, त्याचा नाश करण्यास सूर्यासारखा आणि अनेक सद्गुणानीं सुशोभित असा जो तूं, त्या तुजप्रत मी नमस्कार करतो!! स्याद्वादरूपी पर्वताच्या शिखरावर चढलेलें, शिवकोटी नांवाच्या राजानें ज्याची फारच प्रतिष्ठा केली आहे असें, आणि न्यायानें (युक्तींनीं) भरलेलें पात्रच कीं काय असें, जें श्रीसमंतभद्राचार्याचें शास्त्ररूपी वचन तें आमचें सर्वांचें सर्वदा रक्षण करो!!

जिनसेनमुनिं नत्वा वैवाहविधिमुत्सवम् ॥
वक्ष्ये पुराणमार्गेण लौकिकाचारसिद्धये ॥ २ ॥

अर्थ— श्रीजिनसेनमुनीला नमस्कार करून लौकिक आचार चालण्याकरितां प्राचीनपद्धतीनें विवाहवि-

धिरूपी महोत्सवाचें निरूपण करतो.

विवाह करण्याला योग्य कन्या

अन्यगोत्रभवां कन्यामनातङ्कां सुलक्षणाम् ॥
आयुष्मतीं गुणाढ्यां च पितृदत्तां वरेद्वरः ॥ ३ ॥

अर्थ— दुसऱ्या गोत्रांत उत्पन्न झालेली, रोगरहित, सुलक्षणांनीं युक्त, दीर्घायु, गुणवती अशी कन्या; तिच्या पित्यानें दिली असतां तिच्याशीं विवाह करावा.

वराचें लक्षण.

वरोऽपि गुणवान् श्रेष्ठो दीर्घायुर्व्याधिवर्जितः ॥
सुकुली तु सदाचारो गृह्यतेऽसौ सुरूपकः ॥ ४ ॥

अर्थ— वर देखील गुणवान्, मुलीपेक्षां मोठा, दीर्घायु, निरोगी, कुलीन, सदाचारसंपन्न आणि सुरूप असा असावा.

वराचे गुण

सत्यं शौचं क्षमा त्यागः प्रज्ञौजः करुणा दमः ॥
प्रशमो विनयश्चेति गुणाः सत्वानुवर्त्तिणः ॥ ५ ॥

अर्थ— सत्य, शुद्धता, क्षमा, औदार्य, बुद्धि, बल, करुणा, इंद्रियनिग्रह, शांति आणि विनय हे गुण जीवद्रव्याचे आहेत. हे वराचे ठिकाणीं असावेत.

वपुः कान्तिश्च दीप्तिश्च लावण्यं प्रियवाक्यता ॥
कलाकुशलता चेति शरीरान्वयिनो गुणाः ॥ ६ ॥
कुलजातिवयोविद्याकुटुम्बरूपसम्पदः ॥
चारित्रं पौरुषं चेति शरीरान्वयिनो गुणाः ॥ ७ ॥

अर्थ— बळकट शरीर, कांति, तेज, सौंदर्य, गोड बोलणें, कलेंत कुशलपणा हे शरीरासंबंधी गुण समजावेत. किंवा उत्तम कुल, जाति, वय, विद्या, परिवार, सुरूपणा, संपत्ति, सदाचार, पराक्रम हे गुण शरीरासंबंधी असें समजावें. हे गुण वराचे ठिकाणीं असावेत.

पूर्वमायुः परीक्षेत पश्चाल्लक्षणमेव च ॥
आयुर्हीनजनानां च लक्षणैः किं प्रयोजनम् ॥ ८ ॥

अर्थ— प्रथम वराच्या आयुष्याची परीक्षा करावी. कारण, ज्यांना आयुष्य कमी आहे त्यांच्यामध्यें पुष्कळ गुण असून काय उपयोग आहे?

तथा विज्ञाय यत्नेन शुभाशुभमिति स्थितम् ॥

लक्षणं शुभकन्यायां शुभकन्यां वरेद्वरः ॥ ९ ॥

अर्थ— त्याचप्रमाणें सुंदर अशा कन्येच्या ठायींही शुभाशुभ लक्षणें पहावीत. आणि नंतर वरानें त्या कन्येशीं विवाह करावा.

दुर्लक्षणकन्येचें फल

मातरं पितरं चापि भ्रातरं देवर तथा ॥
पतिं विनाशयेन्नारी लक्षणैः परिवर्जिता ॥ १० ॥

अर्थ— शुभलक्षणांनी रहित असलेली कन्या, आई, बाप, भाऊ, दीर, पति ह्यांचा नाश करते.

कन्यापरीक्षेचे अवयव

हस्तौ पादौ परीक्षेत अङ्गुलीश्च नखांस्तथा ॥
पाणिरेखाश्च जङ्घे च कटिं नाभिं तथैव च ॥ ११ ॥
ऊरुश्चोदरमध्यं च स्तनौ कर्णौ भुजावुभौ ॥
वक्षःस्थलं ललाटं च शिरः केशांस्तथैव च ॥ १२ ॥
रोमराजिं स्वरं वर्णं ग्रीवां नासादयस्तथा ॥
एतत्सर्वं परीक्षेत सामुद्रिकविदार्यकः ॥ १३ ॥

अर्थ— हात, पाय, बोटें, नखें, हातावरील रेखा, पायाच्या पोटऱ्या, कंबर, नाभि, मांड्या, पोटाचा भाग, स्तन, कान, दोनी भुजा, वक्षस्थल, कपाळ, मस्तक, केश, अंगावरील केश, स्वर, वर्ण, कंठदेश, नाक, वगैरे सर्व अवयवांची सामुद्रिक शास्त्रज्ञाकडून नीट परीक्षा करवावी.

कन्येचीं शुभाशुभलक्षणें

पादौ समाङ्गुली स्निग्धौ भूम्यां यदि प्रतिष्ठितौ ॥
कोमलौ चैव रक्तौ च सा कन्या गृहमण्डिनी ॥ १४ ॥

अर्थ— पाय सरळ बोटें असलेले असून तुळतुळीत, व भूमीवर साफ रहाणारे, मृदु आणि रक्तवर्ण जर असतील तर ती कन्या घराला शोभा आणणारी होईल.

अङ्गुष्ठेनातिरक्तेन भर्तारं चैव मन्यते ॥
अल्पवृत्तः पतिं हन्याद्बहुवृत्तः पतिव्रता ॥ १५ ॥

अर्थ— पायाचा अंगठा जर अतिशय रक्तवर्ण असेल तर ती पतीला मान्य होते. थोडासा वर्तुलाकृति ( लांबट वर्तुलाकृति ) असल्यास ती पतीचा नाश करणारी होते. आणि चांगला वर्तुलाकृति असेल तर ती कन्या पतिव्रता होते.

उन्नतैश्चन्द्रवत्सौख्यं मुसलैश्च तथैव च ॥

सूचितैः पद्मपत्रैश्च पुत्रवत्यः स्त्रियो मताः ॥ १६ ॥

अर्थ— पायांचीं वोटें चंद्राकार असून उंच असतील तर सुख होईल. मुसलाप्रमाणें सरळ सुंदर आणि कमलाच्या पानाप्राणें रक्तवर्ण असतील तर ती स्त्री पुत्रवती होईल.

चक्रं पद्मं ध्वजश्छत्रं स्वस्तिकं वर्द्धमानकम् ॥
यासां पादेषु दृश्यन्ते ज्ञेयास्ता राजयोषितः ॥ १७ ॥

अर्थ— चक्र, पद्म, ध्वज, छत्र, स्वस्तिक आणि वर्धमानक हीं चिन्हें ज्यांच्या पायांवर असतील त्या मुली राजस्त्रिया होणार असें समजावें.

यस्याः प्रदेशिनी चापि अङ्गुष्ठादधिका भवेत् ॥
दुष्करं कुरुते नित्यं विधवा वा भविष्यति ॥ १८ ॥

अर्थ— जिच्या पायाच्या अंगठ्याजवळचें वोट अंगठ्यापेक्षां लांब असेल ती स्त्री नेहमी दुष्कृत्य करणारी होईल. किंवा विधवा होईल.

यस्याः पादतले रेखा तर्जनीसुप्रकाशिनी ॥
भर्तारं लभते शीघ्रं भर्तुः प्राणप्रिया भवेत् ॥ १९ ॥

अर्थ— जिच्या पायाच्या तळव्यावर अंगठ्याजवळच्या वोटापाशी स्पष्ट दिसणारी रेघ असेल तिचा

विवाह लवकर होईल. आणि ती पतीला प्राणप्रिय होईल.

पादेऽपि मध्यमा यस्याःक्षितिं न स्पृशति यदि ॥
द्वौ पूरुषावतिक्रम्य सा तृतीये न गच्छति ॥ २० ॥

अर्थ— जिच्या पायांच्या बोटांतील मधलें बोट जमिनीवर टेकत नाहीं ती स्त्री दोन पुरुष सोडून तिसऱ्याशीं समागम करणार नाहीं. ( पति आणि जार हे दोन पुरुष )

अङ्गुल्यश्चाप्यतिक्रम्य यस्याः पादप्रदेशिनी ॥
कुमारी रमते जारैर्यौवने चैव का कथा ॥ २१ ॥

अर्थ— जिच्या पायांतील अंगठ्याजवळचें बोट बाकीच्या सर्व बोटांपेक्षां अधिक लांब असेल ती कुमारी असतानांच जाराशीं रममाण होते. मग तरुणी झाल्यावर तिची गोष्ट काय सांगावयाची आहे?

पादे मध्यमिका चैव उन्नता चाधिगच्छति ॥
वामहस्ते धरेज्जारं दक्षिणे तु पतिं पुनः ॥ २२ ॥

अर्थ— जिच्या पायांतील मधलें बोट उंच असेल ती डाव्या हातांत जार आणि उजव्या हातांत पति धारण करील. ह्मणजे स्पष्टपणें व्यभिचार करील.

पादेऽप्यनामिका यस्या महीं न स्पृशति यदि ॥

दुःशीला दुर्भगा चैव तां कन्यां परिवर्जयेत् ॥ २३ ॥

अर्थ— जिच्या पायाच्या बोटांपैकीं अनामिका नांवाचें बोट ( चवथें बोट ) जमिनीवर टेकत नाहीं, ती स्त्री दुस्स्वभावाची आणि दुर्दैवी होईल. ती वर्ज्य करावी.

यस्यास्त्वनामिका न्हस्वा तां विदुः कलहप्रियाम् ॥
भूमिं न स्पृशते यस्याः खादते सा पतिद्वयम् ॥ २४ ॥

अर्थ— जिची पायाची अनामिका आंखूड असेल ती नेहमीं भांडण करणारी होईल. आणि ती अनामिका आंखूड असून जर जमिनीवर टेकत नसेल तर ती स्त्री दोन पतींना मारणारी होईल.

पादे कनिष्ठिका यस्या भूमिं न स्पृशते यदि ॥
कुमारी रमते जारे यौवने का विचारणा ॥ २५ ॥

अर्थ— जिच्या पायाचें शेवटचें बोट जमिनीवर टेकत नाहीं ती मुलगी असतानांच जाराशीं रममाण होईल. मग तिची तारुण्यांतील गोष्ट काय सांगावी?

उन्नता पार्ष्णिर्दुःशीला महापार्ष्णिर्दरिद्रता ॥
दीर्घपार्ष्णिरातिक्लिष्टा समपार्ष्णिः सुशोभना ॥ २६ ॥

अर्थ— पायाची टाच उंच असल्यास ती स्त्री दुःशीला निघते. मोठी असल्यास दरिद्री होते. लांबट

असल्यास क्लेश भोगणारी होते, आणि सारखी असल्यास स्त्री चांगली निपते.

अङ्गुष्ठैर्महिषाकारैर्बन्धनं कलहप्रिया ॥
निर्गूढगुल्फैर्या नारी सा नारी सुखमेधते ॥ २७ ॥

अर्थ— जिचे आंगठे रेड्याच्या आकाराचे असतात ती स्त्री नेहमीं कलहप्रिय असते, आणि ती पतीला बंधनाप्रमाणें जखडून टाकिते. जिच्या पायाचे घोटे बाहेर आलेले अगदीं दिसत नाहींत ती फार सुखी होते.

कूर्मपृष्ठं भगं यस्याः कृष्णं स्निग्धं सुशोभनम् ॥
धनधान्यवती चैव पुत्रान् सूते न संशयः ॥ २८ ॥

अर्थ— जिचें गुह्येंद्रिय कासवाच्या पाठीसारखें असून, तुळतुळीत, कृष्णवर्ण आणि सुशोभित असतें ती स्त्री धनधान्यसमृद्धीनें युक्त होते. व पुत्र प्रसवणारी होते.

गम्भीरनाभिर्या नारी सा नारी सुखमेधते ॥
रोमभिः स्वर्णवर्णैश्च निर्वृत्ता त्रिवलीयुता ॥ २९ ॥

अर्थ— जिची नाभी खोल असते, आणि जिच्या अंगावरील केश सोन्याच्या रंगाचे असतात व जिच्या उदरावर तीन वळ्या असतात ती स्त्री फार सुखी होते.

रक्ताजिव्हा सुखा नारी मुसला च धनक्षया ॥

श्वेता च जनयेन्मृत्युं कृष्णा च कलहप्रिया ॥ ३० ॥

अर्थ— जिची जिव्हा रक्तवर्ण असते ती स्त्री सुख देणारी होते. मुसलासारखी जिव्हा असल्यास धनाचा नाश होतो. पांढरी असल्यास पतीला मृत्यु येतो, आणि काळी असल्यास स्त्री कलह करणारी होते.

श्वेतेन तालुना दासी दुःशीला कृष्णतालुना ॥
हरितेन महापीडा रक्ततालुः शुभांगना ॥ ३१ ॥

अर्थ— जिच्या टाळूचा रंग पांढरा असतो ती स्त्री दासी होते, काळा असल्यास दुःशीला होते. हिरवा असल्यास फार पीडा देणारी होते, आणि तांबडा असल्यास ती स्त्री सुलक्षणा निघते.

ललाटं त्र्यङ्गुलं यस्याः शिरोरोमविवर्जितम् ॥
निर्मलं च समं दीर्घमायुर्लक्ष्मीसुखप्रदम् ॥ ३२ ॥

अर्थ— जिचे कपाळ तीन बोटे रुंद असून केशरहित, स्वच्छ, सरळ आणि दीर्घ असते ती स्त्री दीर्घायु, संपत्तियुक्त आणि सुखी असते.

अतिप्रचण्डा प्रबला कपालिनी । विवादकर्त्री स्वयमर्थचोरिणी ॥
आक्रन्दिनी सत्तगृहप्रवेशिनी । त्यजेच्च भार्यां दशपुत्रपुत्रिणीम् ॥ ३३ ॥

अर्थ— शरीराने ओबडधोबड असलेली, जिच्यामध्ये शक्ति फार आहे अशी, कपाळ फारच मोठें अस-

लेली, पतीशीं वाद करणारी, स्वतः घरातील द्रव्य चोरणारी, मोठ्यानें ओरडणारी आणि रोज सात घरात हिंडणारी अशी भार्या–तिला दहा पुत्र होणारे असले तथापि– सोडून द्यावी.

पिङ्गाक्षी कूपगल्ला परपुरुषरता श्यामले चोष्ठजिव्हे ।
लम्बोष्ठी लम्बदन्ता प्रविरलदशना स्थूलजङ्घोर्ध्वकेशी ॥
गृध्राक्षी वृत्तपृष्ठिर्गुरुपृथुजठरा रोमशा सर्वगात्रे ।
सा कन्या वर्जनीया सुखधनरहिता निन्द्यशीला प्रदिष्टा ॥ ३४ ॥

अर्थ— डोळे पिंगट असणें, गालावर खळगे असणें, परकीय पुरुषावर प्रेम करणें, ओठ आणि जीभ काळी असणें, ओठ लांब असणें, दात लांब अथवा विरळ असणें, पायाच्या पिंडऱ्या मोठ्या असणें डोकीचे केश वर उभारलेले असणें, गिधाडाप्रमाणें डोळे असणें, पाठीला कुबड असणें, पोट मोठें आणि विस्तृत ( लांब ) असणें, सर्वांगावर केश असणें ही स्त्रियांची दुर्लक्षणें आहेत. ह्यांपैकीं कोणत्याही लक्षणानें युक्त असलेली कन्या वर्ज करावी. कारण, तशा प्रकारची कन्या सुख आणि संपत्ति ह्यांनीं रहित असते; आणि दुःशीला होते; असें आचार्यांनीं सांगितलें आहे.

विवाह करण्यास योग्य कन्या.

इत्थं लक्षणसंयुक्तां षडष्टराशिवर्जिताम् ॥

वर्णाविरुद्धसन्त्यक्तां सुभगां कन्यकां वरेत् ॥ ३५ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें वर जी सुलक्षणें सांगितलीं आहेत त्यांनी युक्त, पतीच्या जन्मराशीपासून जिची जन्म राश सहावी किंवा आठवी पडत नाहीं, जिचा वर्ण पतीच्या वर्णाशी विरुद्ध नाहीं अशा कन्येशीं विवाह करावा.

रूपवती स्वजातीया स्वतो लघ्वन्यगोत्रजा ॥
भोक्तुं भोजयितुं योग्या कन्या बहुकुटुम्बिनी ॥ ३६ ॥

अर्थ— रूपवती असून आपल्या जातींत उत्पन्न झालेली, आपल्यापेक्षां वयानें व शरीरानें लहान, भिन्नगोत्रांत उत्पन्न झालेली आणि जिचा परिवार पुष्कळ आहे अशी कन्या विवाह करण्यास योग्य होय असें समजावें.

सुतां पितृष्वसुश्चैव निजमातुलकन्यकाम् ॥
स्वसारं निजभार्यायाः परिणेता न पापभाक् ॥ ३७ ॥

अर्थ— बापाच्या बहिणीची मुलगी, आपल्या मावळ्याची मुलगी, आणि आपल्या बायकोची बहीण ह्या मुलींशी विवाह करणारा पातकी होत नाहीं. (ह्या कन्या विवाहाला योग्य होत)

अविवाह्यकन्या

पुत्री मातृभगिन्याश्च स्वगोत्रजनिताऽपि वा ॥
श्वश्रूस्वसा तथैतासां वरीता पातकी स्मृतः ॥ ३८ ॥

अर्थ— आपल्या आईच्या बहिणीची मुलगी, आपल्या गोत्रांत उत्पन्न झालेली मुलगी, आणि आपल्या सासूची बहीण ह्या मुलींशीं विवाह करणारा वर पातकी समजावा.

यस्यास्तु न भवेद्भ्राता न विज्ञायेत वा पिता ॥
नोपयच्छेत तां प्राज्ञः पुत्रिकां धर्मशङ्कया ॥ ३९ ॥

अर्थ— जिला बंधु नाहीं, जिचा पिता कोण? हे माहिती नाहीं त्या मुलीशीं- धर्महानी होईल ह्मणून- विवाह करूं नये.

स्ववयसोऽधिकां वर्षैरुन्नतां वा शरीरतः ॥
गुरुपुत्रीं वरेन्नैव मातृवत्परिकीर्तिता ॥ ४० ॥

अर्थ— आपल्या पेक्षां वयानें अधिक, किंवा शरीरानें उंच अशी कन्या, आणि आपल्या गुरूची कन्या ह्यांच्याशीं विवाह करूं नये. कारण, त्या मातृसम आहेत.

विवाहकर्मांतील पाच अंगें.

वाग्दानं च प्रदानं च वरणं पाणिपीडनम् ॥

सप्तपदीति पञ्चाङ्गो विवाहः परिकीर्तितः ॥ ४१ ॥

अर्थ— वाग्दान, प्रदान, ( मुलीला वस्त्रालंकार देणें ) वरण ( लग्नास सर्वांनीं संमति देणें ) पाणिपीडन ( वरानें वधूचें पाणिग्रहण करणें ) आणि सप्तपदी हीं विवाहाचीं पांच अंगें आहेत.

वाग्दान.

वाग्दानम्—विवाहमासतः पूर्वं वाग्दानं क्रियते बुधैः ॥
कलशेन समायुक्तं सम्पूज्य गणनायकम् ॥ ४२ ॥
"सान्निधौ द्विजदेवानां कन्या माम सुताय ते ॥
त्वयाऽद्य क्रियतामद्य सुरूपा दीयते मया ॥ ४३ ॥
पुत्रमित्रसुहृद्वर्गैः समवेतेन निश्चितम् ॥
कायेन मनसा वाचा सम्प्रीत्या धर्मवृद्धये ॥ ४४ ॥"

अर्थ— विवाह ज्या महिन्यांत व्हावयाचा असेल त्या महिन्याच्या पूर्वी कन्येच्या पित्यानें वाग्दान करावें. वाग्दान करावयाच्या वेळीं कलश आणि गणधर ह्यांची पूजा करावी. नंतर मुलीच्या पित्यानें वरपित्यास उद्देशून "सान्निधौ द्विजदेवानां" इत्यादि दोन श्लोक म्हणून त्याची प्रार्थना करावी. त्या श्लोकांचें तात्पर्य असें—पुत्र, मित्र आणि माझ्यावर प्रेम करणारी इतर मंडळी ह्यांच्याशीं सहवर्तमान असलेला मी

आज देव आणि द्विज ह्यांच्या सान्निध रूपवती असलेली अशी माझी कन्या सद्धर्माची वृद्धि होण्याकारितां कायावाचामनें करून तुझ्या पुत्राला संतोषानें देत आहे. हा माझा निश्चय झालेला आहे. तूं आपल्या पुत्राकरितां माझ्या मुलीचा स्वीकार कर!

कन्या ते मम पुत्राय स्वीकृतेयं मयाऽद्य वै ॥
एतेषां सन्निधावेव मम वंशाभिवृद्धये ॥ ४५ ॥

अर्थ— मग वराच्या पित्यानें "कन्या ते" इत्यादि श्लोक ह्मणावा. त्यांचें तात्पर्य—तुझी ही कन्या माझ्या पुत्राकरिता माझ्या वशाची वृद्धि होण्याच्या हेतूनें ह्या सर्वांसमक्ष मी स्वीकारिली आहे.

सम्बन्धगोत्रमुच्चार्य दद्याद्धै कन्यकां पिता ॥
हस्ते पितुर्वरस्याथ ताम्बूलं साक्षतं फलम् ॥ ४६ ॥
दास्येऽहं तेऽद्य पुत्राय सुरूपां मम कन्यकाम् ॥
आसाद्य विवाहार्थं द्रव्यमाङ्गलिकानि च ॥ ४७ ॥
स्वीकृता मम पुत्राय मयाऽद्य तव पुत्रिका ॥
सफल-साक्षतं दद्याद्यथाचारं परस्परम् ॥ ४८ ॥

अर्थ— नंतर कन्येच्या पित्यानें संबंध आणि गोत्र ह्यांचा उच्चार करून अक्षता तांबूल व फल ह्यांच्याशी

सहवर्तमान ती कन्या वरपित्याच्या हातीं द्यावी. आणि "दास्येऽहं" इत्यादि श्लोक ह्मणावा. ( माझी ही रूपावती कन्या आज तुझ्या पुत्राला मी देतो. विवाहाकरितां तूं मंगलद्रव्यें संपादन कर! ) मग वरपित्यानें "स्वीकृता मम ( तुझी कन्या आज मी माझ्या पुत्राकरितां स्वीकारिली. " ) असें ह्मणावें. नंतर जसा आचार असेल त्याप्रमाणें फल, अक्षता, तांबूल वगैरे एकमेकांनीं एकमेकास द्यावें. हा वाग्दानविधि सांगितला.

प्रदानविधि

अथ प्रदानम् ॥ कन्याया वरणात्पूर्वं प्रदानं चैव कारयेत् ॥
सम्पूज्य कन्यकां दद्याद्वस्त्रालङ्कारभूषिताम् ॥ ४९ ॥
प्रदानं पट्टकूलादि कर्णकण्ठादिभूषणम् ॥
लब्ध्वाऽऽशिषोऽथ विप्रेभ्यस्तेभ्यो दद्यात्फलानि च ॥ ५० ॥

अर्थ— कन्यावरणविधि होण्याच्या पूर्वी प्रदानविधि करावा. हा विधि वरपित्यानें करावा. त्यानें वस्त्रालंकारानें भूषित असलेल्या कन्येचें पूजन करून तिला पट्टवस्त्र ( पैठणी वगैरे उंची वस्त्र ), गळ्यांत कानांत वगैरे घालण्याचे अलंकार द्यावेत. नंतर ब्राह्मणांपासून आशीर्वाद ग्रहण करून, त्यांना तांबूल फल वगैरे द्यावें.

वरणविधि

अथ वरणम्– प्रार्थयेद्गुणसम्पूर्णान् मधुपर्केण पूजितः ॥

मदर्थं वृणीध्वं कन्यामिति दत्वा च दक्षिणाम् ॥ ५१ ॥
गोत्रोद्भवस्य गोत्रस्य सम्बन्धस्यामुकस्य च ॥
नप्त्रे पौत्राय पुत्राय ह्यमुकाय वराय वै ॥ ५२ ॥
कन्याया अपि गोत्रस्य यथापूर्वमुदुच्चरेत् ॥
नप्त्रीमथ च पौत्रींच पुत्रीं कन्यां यथाविधि ॥ ५३ ॥
कन्यासमीपमागत्य ब्राह्मणैः सह वै पिता ॥
इत्युक्त्वा भो द्विजा यूयं वृणीध्वं कन्यकामिमाम् ॥ ५४ ॥
प्रत्यूचुः सज्जनाः सर्वे वयं चैनां वृणीमहे ॥
सुप्रयुक्तेति सूक्तं वै जपेयुः सज्जनास्ततः ॥ ५५ ॥

अर्थ— मग कन्यावरणविधि करावा. मधुपर्कानें ज्याची पूजा केली आहे अशा वरानें सदाचार संपन्न असलेल्या ब्राह्मणाना दक्षिणा देऊन "मदर्थं कन्यां वृणीध्वं," ह्मणजे माझ्याकरितां ह्या कन्येला तुह्मी कबूल करा अशी प्रार्थना करावी. मग कन्येच्या पित्यानें कन्येजवळ येऊन "अमुकगोत्रांत उत्पन्न झालेला, अमुक नांवांच्या मनुष्याचा पणतु, अमुक नांवाच्याचा नातु, अमुक नांवाच्याचा पुत्र,

अमुक्या नांवाचा हा जो वर त्याच्या करितां; अमक्या गोतांत उत्पन्न झालेली, अमक्याची पणती अमक्याची नात, अमक्याची मुलगी, अमुक नांवाची जी ही कन्या तिला, हे ब्राह्मण हो! तुह्मी कबूल करा!!" असें ह्मणावें. नंतर सर्वांनीं "वृणीमहे ह्मणजे आह्मी कबूल करतो" असें ह्मणावें. मग त्यांनीं 'सुप्रयुक्त' हें सूक्त पठण करावें. हा कन्यावरणविधि सांगिला. (ह्यांत 'अमुक' शब्दाचे ठिकाणीं त्यांचीं त्यांचीं नांवें घ्यावींत.)

पाणिपीडनविधि

धर्मे चार्थे च कामे च युक्तेति वरिता त्वया ॥
इयं गृण्हाति पाणिभ्यां पाणीति पाणिपीडनम् ॥ ९६ ॥

अर्थ—धर्म, अर्थ आणि काम ह्या तिन्ही पुरुषार्थांच्या ठिकाणीं ही योजली आहे असें समजून तूं वरलेली ही तुझी पत्नी, आपल्या हातांनी तुझे हात धरित आहे, असें वरास सांगावें हा पाणिपीडनविधि सांगितला.

सप्तपदीविधि

अभ्युक्तामयतीशान्यां वधूं सप्तपदानि तु ॥
साऽभ्युक्ता समयेत्पूर्वं दक्षिणं पादमात्मनः ॥ ९७ ॥
इति प्रसज्ञातपश्चांगविवाहः सम्प्रदर्शितः ॥

अर्थ— भोजन न केलेल्या वधूला पतीनें ईशान्यदिशेकडे सात पावलें नेणें आणि तिनें आपला उजवा पाय प्रथम पुढें टाकून सात पावलें जाणें ह्यास सप्तपदीविधि ह्मणतात. ह्याप्रमाणें प्रसंगानें पंचांगयुक्तविवाह कसा होतो तें संक्षेपानें सांगितलें. आतां पुढें विस्तारानें सांगतों.

विशेषविधि अंकुरारोपण

विवाहस्याथ पूर्वेद्युराचार्यो बन्धुसंयुतः ॥ संस्नातो धौतवस्त्राढ्यो ग्रहयज्ञं प्रकल्पयेत् ॥ ५८ ॥ विवाहाहस्तु पूर्वाह्णे वरं संस्नाप्य भूषणैः ॥ वस्त्रैश्च भूषयेद्रम्यैर्निशाचूर्णाद्यलङ्कृतम् ॥५९॥ सौभाग्यवनिताभिश्च सह माता वरस्य वा ॥ घटद्वयं स्वयं धृत्वा वाद्यैर्गच्छेज्जलाशयम् ॥ ६० ॥ फलगन्धाक्षतैः पुष्पैः सम्पूज्य जलदेवताः ॥ घटान् भृत्वा जलैर्धृत्वा मूर्ध्नि गच्छेज्जिनालयम् ॥ ६१ ॥ तथाऽऽनीतमृत्तिकायां वपेद्बीजानि मङ्गलैः ॥ घटं संस्थाप्य वेद्यग्रे शुभद्रव्यैः समर्चयेत् ॥ ६२ ॥ वेद्यां गृहाधिदेवं संस्थाप्य दीपं प्रज्वालयेत् ॥ सारमानं दृषदं न्यसेत्तत्पुरस्तन्तुभिर्वृताम् ॥ ६३ । गुडजीरकसामुद्रहरिद्राक्षतपुञ्जकान् ॥ पृथक्पञ्च तथा कन्या गृहेऽप्येष विधिर्भवेत् ॥ ६४ ॥ इत्यङ्कुरविधानम् ॥

अर्थ— विवाह करण्याचा मुहूर्त ज्या दिवशीं निश्चित झाला असेल त्याच्या पूर्वदिवशीं गृहस्थाचार्यानें

स्नान करून शुद्ध वस्त्रें धारण करून, ब्राह्मणांशीं सह ग्रहयज्ञ करावा. त्या दिवशी प्रातःकाली वराला हळद लावून मंगल स्नान घालून वस्त्रालंकारांनी सुभोभित करावें. वराच्या मातेनें सुवासिनी स्त्रिया आपल्या बरोबर घेऊन, स्वतः दोन कलश घेऊन वाजतगाजत एका जलाशयावर जावें. आणि त्या ठिकाणीं फल, गंध, अक्षता, फुलें ह्यांच्या योगानें जलदेवतांचें पूजन करून ते दोनी कलश पाण्यानें भरून आपल्या मस्तकावर घेऊन जिनालयांत गमन करावें. येतानां बरोबर थोडी शुद्ध मृत्तिका आणलेली असावी. त्या मृत्तिकेंत धान्याचे बीज पेरावें. आणि एका कलशांतील पाणी त्या मृत्तिकेवर घालून दुसरा कलश वेदीच्या आग्रभागीं ठेवून त्याचे मंगलद्रव्यांनीं पूजन करावें वेदीवर आपल्या कुलदेवतेची स्थापना करून तिच्यापुढें दीप लावून ठेवावा. दगडाचा पाटा आणि वरवंडा ह्या दोनीला सुतानें गुंडाळून ते वेदीच्या आग्रभागीं ठेवावेत. आणि त्यांच्यावर गूळ, जिरे, मीठ, हळद आणि तांदूळ ह्यांचे पांच निरानिराळे पुंज घालावेत. ह्या सर्व विधींस अंकुरविधान ह्मणतात. हा विधि कन्येच्या घरीही करावा.

त्या दिवशींचें वराचे कृत्य

वरः स्नानादियुक् पश्चात्स्वस्तिवाचनपूर्वकम् ॥
होमं विधाय भुञ्जीत पित्राचार्यादिसंयुतः ॥ ६५ ॥

अर्थ— नंतर स्नान वगैरे करून बसलेल्या वरानें त्याच दिवशी पुण्याहवाचन करून ग्रहयज्ञ करावा.

आणि आपला पिता, आचार्य वगैरे मंडळींशीं भोजन करावें.

वराचें वधूगृही गमन

अपरेद्युः कृतस्नानो धौतवस्त्रधरो वरः ॥
स्वलङ्कृतः सितच्छत्रपदातिजातिबान्धवैः ॥ ६६ ॥
धृतो वधूगृहं गच्छेद्वाद्यवैभवगर्जितः ॥
नीयमानो नरैः प्रीत्या तत्रस्थैः कन्यकाश्रितैः ॥ ६७ ॥
तण्डुलादिभिराकीर्णे चन्द्रोपकादिभूपिते ॥
पवित्रे श्वशुरावासे सज्जनैर्निवसेद्वरः ॥ ६८ ॥
गमागमक्रिया सर्वा विधेया वनितादिभिः
देशकुलानुसारेण वृद्धस्त्रीभिर्निरूपिता ॥ ६९ ॥

अर्थ— दुसऱ्या दिवशीं ( विवाहाच्या दिवशीं ) वरानें स्नान करून शुद्धवस्त्रें व अलंकार धारण करून, शुभ्रवर्ण छत्र धारण करून आपल्या जातिबांधवांसहवर्तमान मंगलवाद्याचा घोष पुढें सुरू करून वधूच्या घरीं जावें. त्यावेळीं वधूच्या घरच्या मंडळींनीं त्याला सामोरें येऊन घेऊन जावें. तंडुलादि मंगलद्रव्यें ज्यांत पसरलीं आहेत व जें शुभ्रवर्ण छत देऊन सुशोभित केलें आहे अशा आपल्या श्वशुराच्या

घरांत वरानें प्रतिष्ठित लोकांशीं सह प्रवेश करून बसावें. ह्या जाण्यायेण्याच्या कामांत स्त्रियाही असव्यात. आणि तो व्यवहार वृद्धास्त्रिया सांगतील त्याप्रमाणें देशाचार आणि कुलाचार ह्याला अनुसरून करावा.

विवाहाचे आठ प्रकार

विवाहभेदाः— ब्राह्मो दैवस्तथा चार्षः प्राजापत्यस्तथाऽऽसुरः ॥
गान्धर्वो राक्षसश्चैव पैशाचश्चाष्टमोऽधमः ॥ ७० ॥

अर्थ— ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस आणि पैशाच असे विवाहाचे आठ भेद आहेत. त्यांचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें जाणावें.

ब्राह्मविवाह.

आछाद्य चार्हयित्वा च व्रतशीलवते स्वयम् ॥
आहूय दानं कन्याया ब्राह्मो धर्मः प्रकीर्तितः ॥ ७१ ॥

अर्थ— व्रतें आणि शील ह्यांनीं युक्त असलेल्या वराला आपण आपल्या घरीं बोलावून आणून त्याला वस्त्रें देऊन व त्याची पूजा करून जें कन्यादान केलें जातें त्यास ब्राह्मविवाह ह्मणतात.

दैवविवाह.

यज्ञे तु वितते सम्यक् जिनार्चाकर्म कुर्वते ॥

अलंकृत्य सुतादानं दैवो धर्मः प्रचक्ष्यते ॥ ७२ ॥

अर्थ— मोठ्या यज्ञात यथाविधि जिनपूजा करणाऱ्याला अलंकार घालून कन्यादान करणें ह्याला दैवविवाह ह्मणतात.

आर्षविवाह

एकं वस्त्रयुगं द्वे वा वरादादाय धर्मतः ॥
कन्याप्रदानं विधिवदार्षो धर्मः स उच्यते ॥ ७३ ॥

अर्थ— वरापासून एक किंवा दोन वस्त्रयुग्में ( धोतरजोडे ) घेऊन त्याला धर्माप्रमाणें यथाविधि कन्यादान करणे ह्याला आर्षविवाह ह्मणतात.

प्राजापत्यविवाह.

सहोभौ चारतां धर्ममिति त चानुभाष्य तु ॥
कन्याप्रदानमभ्यर्च्य प्रजापत्यो विधिः स्मृतः ॥ ७४ ॥

अर्थ— 'तुह्मी दोघे एकमेकाबरोबर धर्माचरण करा!' असे वराला सांगून त्याची पूजा करून जें कन्यादान केलें जातें, त्याला प्राजापत्यविवाह ह्मणतात.

आसुरविवाह

ज्ञातिभ्यो द्रविणं दत्वा कन्यायै चैव शक्तितः ॥
कन्यादानं यत्क्रियते चासुरो धर्म उच्यते ॥ ७५ ॥

अर्थ— मुलीच्या आप्तांना व मुलीला द्रव्य देऊन जें मुलीशीं विवाह करणें त्याला आसुरविवाह ह्मणतात.

गांधर्वविवाह.

स्वेच्छयाऽन्योन्यसंयोगः कन्यायाश्च वरस्यच ॥
गान्धर्वः स तु विज्ञेयो मैथुन्याः कामसम्भवः ॥ ७६ ॥

अर्थ— वर आणि वधू ह्यांचा एकमेकांच्या इच्छेनें जो समागम होतो त्याला गांधर्वविवाह ह्मणतात. हा विवाह कन्येच्या इच्छेनें होत असतो.

राक्षसविवाह.

हत्वा भित्वा च छित्वा च क्रोशन्तीं रुदतीं गृहात् ॥
प्रसह्य कन्याहरणं राक्षसो विधिरुच्यते ॥ ७७ ॥

अर्थ— मारामारी करून, एकमेकांची डोकी फोडून, हातपाय तोडून, रडत ओरडत असलेल्या कन्येला बलात्कारानें ओढून नेऊन विवाह करणें ह्याला राक्षसविवाह ह्मणतात.

पैशाचविवाह.

सुप्तां मत्तां प्रमत्तां वा रहो यत्रोपगच्छति ॥
स पापिष्ठो विवाहानां पैशाचः कथितोऽष्टमः ॥ ७८ ॥ इत्यष्टौ विवाहाः ॥

अर्थ— निजलेली, किंवा कैफानें धुंद झालेली अथवा वेडी झालेली अशा कन्येशीं कोणी नसतानां एकांतीं समागमकरणें ह्याला पैशाच विवाह ह्मणतात. हा विवाह अत्यंत निंद्य असल्यानें पातकी आहे. असें आठ विवाह सांगितले.

पहिल्या चार प्रकारच्या विवाहातील विशेषविधि

कन्यादानं निशीथे चेद्वरायोपोषिताय च ॥
उपोषितः सुतां दद्यात् ब्राह्मादिषु चतुर्ष्वपि ॥ ७९ ॥

अर्थ— कन्यादान जर रात्रीं करावयाचें असेल तर वरानें व कन्येच्या पित्यानें उपोषित असावें. कारण ब्राह्म, दैव, आर्ष, आणि प्राजापत्य ह्या चार प्रकारच्या विवाहांत कन्यादान करणाऱ्यानें उपोषित राहून उपोषित असलेल्या वरालाच कन्यादान करावें असें शास्त्रानें सांगितलें आहे.

दुसरें मत

अन्यमतम्– कन्यदानं निशीथे चेद्दिवा भोजनमाचरेत् ॥
पुनः स्नात्वा जपेन्मन्त्रं पिता कन्यां प्रयच्छतु ॥ ८० ॥

अर्थ— आता ह्याबद्दल दुसरें मत असें आहे कीं, कन्यादान जर रात्रीं व्हावयाचें असेल, तर कन्येच्या पित्यानें दिवसा भोजन करून कन्यादानाच्या वेळीं स्नान करून मंत्रजप करावा. आणि कन्यादान करावें.

भुक्त्वा समुद्वहेत्कन्यां सावित्रीग्रहणं तथा ॥
गान्धर्वासुरयोरेव विधिरेष उदाहृतः ॥ ८१ ॥

अर्थ— वरानें भोजन करून वधूशीं विवाह करावा; असें जें मत आहे, तो विधि गांधर्वविवाह आणि आसुरविवाह ह्यासंबंधाचा आहे असें समजावें.

कन्येचे बांधव.

पिता पितामहो भ्राता पितृव्यो गोत्रिणो गुरुः ॥
मातामहो मातुलो वा कन्याया बान्धवाः क्रमात् ॥ ८२ ॥

अर्थ— पिता, पितामह, भ्राता, चुलता, गोत्रजपुरुष, गुरु, मातामह, आणि मातुल हे कन्येचे बांधव क्रमानें समजावेत. हे कन्येचे दान करण्यास अधिकारी आहेत.

कन्यादान करणारा कोणी नसल्यास.

पित्रादिदात्रभावे तु कन्या कुर्यात्स्वयंवरम् ॥

इत्येवं केचिदाचार्याः प्राहुर्महति सङ्कटे ॥ ८३ ॥

अर्थ— पिता वगैरे वर सांगितलले जे कन्यादानाचे अधिकारी त्यापैकीं कोणीही नसल्यास कन्येनें आपला विवाह आपणच करावा असें कित्येक आचार्यांचें मत आहे. परंतु तें अतिसंकटसमयीं ग्राह्य समजावें.

विवाहविधि

अथ विवाहकर्म— कन्यायाः सदनं गच्छेत् मण्डपे तोरणान्विते ॥
कन्याया जननी वेगादागत्य पूजयेद्वरम् ॥ ८४ ॥

अर्थ— वराने वधूच्या घरी गमन करावें. नंतर तोरणांनीं युक्त असलेल्या मंडपांत वधूच्या मातेनें येऊन वराची पूजा करावी.

कन्यापित्रादिभिर्दत्ते चोदुम्बरादिवृक्षकैः ॥
निर्मिते चासने सम्यक् सुदृष्ट्योपविशेद्वरः ॥ ८५ ॥

अर्थ— औदुंवर वगैरे वृक्षाच्या लाकडाचें केलेलें आणि वधूच्या पित्यानें दिलेलें जें आसन त्यावर वरानें नीट निरखून पाहून बसावें.

वरपूजन

ततः प्रक्षालयेत्पादौ वरस्यार्घ्यं विधाय च ॥

यज्ञोपवीतं मुद्रादिभूपा एवार्पयेद्वरे ॥ ८६ ॥

अर्थ— नंतर वधूच्या पित्यानें वराचे पाय धुवावेत. त्याला अर्घ्य, यज्ञोपवीत, मुद्रा ( अंगठ्या ) वगैरे अलंकार द्यावेत.

वधूपूजन

ततः पाद्यं समादाय कन्यकां सेचयेच्छनैः ॥
अर्घ्यदानं ततो दत्वा कन्यकामपि पूजयेत् ॥ ८७ ॥

अर्थ— नंतर पाद्य घेऊन ( पाय धुण्याचे पाणी घेऊन ) वधूच्या पायावर घालावे आणि तिला अर्घ्य द्यावें. त्याप्रमाणें वधूचीही पूजा करावी.

अर्घ्यदान

तद्वरोऽपि प्रदत्तार्घ्यमञ्जल्या ( ? )ऽऽदाय सादरम् ॥
निरीक्ष्याङ्गुलिरन्ध्रैस्तत्स्रावयेद्भाजने शनैः ॥ ८८ ॥

अर्थ— तें वधूच्या पित्यानें दिलेलें अर्घ्य वरानें आपल्या ओंजळींत आदरानें घेऊन, अवलोकन करून बोटांच्या संधीतून हळूहळू खाली भांड्यांत सोडावें.

आचमन

सन्नालपात्रसम्पूर्णपूतशीतलवारिणा ॥
तद्वन्निवेद्य दत्तेन कुर्यादाचमनं ततः ॥ ८९ ॥

अर्थ— नंतर वधूच्या पित्यानें- स्वच्छ अशा नालपात्रांत (गिंडी नांवाच्या भांड्यांत) भरून ठेवलेलें शुद्ध असें शीतोदक-त्यांत जीव आहेत कीं काय, हें नीट पाहून वराच्या हातावर आचमनाकरितां द्यावें, आणि वरानें त्या उदकानें आचमन करावें.

मधुपर्क.

कांस्यतालास्थितं त्यक्तकांस्यपात्रपिधानकम् ॥
प्राशयेन्मधुपर्कार्घं दधि तद्वत्समन्त्रकम् ॥ ९० ॥

अर्थ— नंतर काशाच्या पात्रात असलेलें व ज्यावरील काशाचें आच्छादनपात्र काढून टाकिलें आहे असें मधुपर्काचें दहिं वरानें समंत्रक प्राशन करावें.

ॐ ह्रीं भगवतो महापुरुषस्य पुरुषवरपुण्डरीकस्य परमेण तेजसा व्याप्त-लोकस्य लोकोत्तरमङ्गलस्य मङ्गलस्वरूपस्य संस्कृत्य पादावर्घेनाभिजनेनानु-कृत्याय उद्वासितचत्वरेऽभ्यागतायाभियोगवयोमधुपर्काय समदत्तिसमन्वि-तायार्घ्यस्य पाद्यस्य विधिमासाद्य दध्यमृतं विश्राणयते जामात्रे अमुष्मै

ॐ ॥ इति मन्त्रयेत् ॥

अर्थ— " ॐ ऱ्हीं भगवतो " इत्यादि मंत्रानें मधुपर्काचें अभिमंत्रण करावें.

ॐ नमोऽर्हते भगवते मुख्यमङ्गलाय प्रासामृताय कुमारं दध्यमृतं प्राशयामि झं वं ह्वः पः हः अ सि आ उ सा स्वाहा ॥ इति मधुपर्कमन्त्रः । त्रिः प्राशयेत् ॥

अर्थ— " ॐ नमोऽर्हते " इत्यादि मंत्रानें तीन वेळ मधुपर्काचें प्राशन करवावें.

वराला वस्त्रालंकारदान

मालाभरणवस्त्राद्यैरलङ्कृत्य वरं ततः ॥
कन्याभ्रात्रे प्रदद्यात्तद्वस्त्रं तेन धृतं पुरा ॥ ९१ ॥

अर्थ— नंतर वधूच्या पित्यानें माला, अलंकार वस्त्रें वगैरेंनीं वराला अलंकृत करावें. आणि त्या वरानें पूर्वीं धारण केलेलें वस्त्र वधूच्या भावाला द्यावें.

वधूला वस्त्रालंकारदान

वरानीतैस्तु सद्वस्त्रैर्भूषणैश्च स्रगादिभिः ॥
स्नातामभोजनां कन्यां पिताऽलङ्कारयेत्ततः ॥ ९२ ॥

अर्थ— तसेंच वरानें आणलेल्या वस्त्रें, भूषणें, माला वगैरे पदार्थांनीं स्नान केलेल्या आणि भोजन

न केलेल्या वधूस तिच्या पित्यानें अलंकृत करावी.

यज्ञोपवीतग्रहण

पुनराचमनं कृत्वा ताम्बूलाक्षतचन्दनैः ॥
यज्ञोपवीतवस्त्राणि स्वीकुर्याच्च वरोत्तमः ॥ ॥ ९३ ॥

अर्थ— वरानें नंतर आचमन करून वधूच्या पित्यानें दिलेल्या तांबूल, अक्षता, चंदन, यज्ञोपवीत वस्त्र ह्या वस्तूंचा स्वीकार करावा.

वस्त्रदानाचा मंत्र

भूयात्सुपद्मनिधिसम्भवसारवस्त्रं । भूयाच्च कल्पकुजकल्पितदिव्यवस्त्रम् ॥
भूयात्सुरेश्वरसमर्पितसारवस्त्रं । भूयान्मयाऽर्पितमिदं च सुखाय वस्त्रम् ॥९४॥ वस्त्रप्रदानमन्त्रः

अर्थ— ' भूयात्सुपद्मनिधि ' इत्यादि मंत्र वरास वस्त्र देणेचा आहे.

कन्याया मातुलस्तस्माद्वरं धृत्वा करेण वै ॥
गृहस्याभ्यन्तरं प्राप्य (?) कन्यामप्यानयेत्ततः ॥ ९५ ॥

अर्थ— नंतर वधूच्या मामानें वराच्या हाताला धरून वेदिकेच्या [ वहुलयाच्या ] जवळ न्यावें. नंतर कन्येलाही त्या ठिकाणीं त्यानेंच आणावी.

वेदिकाग्रे ततः कुर्यात्स्वास्तिकं स्थण्डिलान्वितम् ॥
पूर्वापरदिशो रम्यं तण्डुलपुञ्जकद्वयम् ॥ ९६ ॥

अर्थ— मग त्या वेदिकेच्या पुढल्या बाजूस स्थंडिलानें युक्त असें स्वास्तिक करावें, आणि त्यावर पूर्वेकडे एक आणि पश्चिमेकडे एक अशा दोन तांदुळांच्या राशि कराव्यात.

वहुल्यानें लक्षण

वेदीलक्षणम्– विस्तारितां हस्तचतुष्टयेन । हस्तोच्छ्रितां मन्दिरवामभागे ॥
स्तम्भैश्चतुर्भिः कृतनिर्मितांगां । वेदीं विवाहे प्रवदन्ति सन्तः ॥ ९७ ॥

अर्थ— आतां प्रसंगानें वेदीचें प्रमाण वगैरे सांगतात– विवाहांतील वेदी चार हात लांब, चार हात रुंद आणि एक हात उंच असावी. ती घराच्या डाव्या बाजूस असावी, आणि तिच्या चारी कोपऱ्यांवर चार खांब उभे केलेले असावेत.

अन्यमतं— कन्याहस्तैः पञ्चभिः सप्तभिर्वा । वेदीं कुर्यात्कूर्मपृष्ठोन्नताङ्गाम् ॥
रम्ये हर्म्ये कारयेद्वामभागे । जायापत्योराशिषो वाचयित्वा ॥ ९८ ॥

अर्थ— कन्येच्या हातानें पाच हात किंवा सात हात वेदी करावी. ती कांसवाच्या पाठीप्रमाणें मध्यभागीं उंच असावी, आणि घराच्या डाव्या हाताला असावी. असें दुसऱ्या आचार्यांचें मत आहे.

उपनयनातील वेदीचे लक्षण

व्रतबन्धवेदी- प्राक्पश्चिमोर्ध्वपदषट्कयुक्त- । मुदीच्ययाम्यानि पदानि पञ्च ॥
एवंविधा ज्योतिषरत्ननिर्मिता । बटोः शतायुर्भवतीह वेदिका ॥ ९९ ॥

अर्थ— आतां उपनयनाच्या वेदीचें प्रमाण सांगतात. उपनयनाची वेदी पूर्वपश्चिम सहा पावलें लांब असावी. आणि दक्षिणोत्तर पांच पावलें रुंद असावी. अशा प्रकारची ज्योतिषशास्त्रात सांगितल्याप्रमाणें वेदी केली असतां वटू शतायु होतो.

अन्यमतं- आचार्यस्य पदैः षड्भिः पंचभिर्वाऽथ सप्तभिः ॥
विस्तृता चतुरस्रा च बटोर्वेदी करोन्नता ॥ १०० ॥

अर्थ— उपनयनाच्या वेदीबद्दल दुसऱ्या आचार्यांचें मत असें आहे की, वेदी आचार्याच्या पावलानें सहा पांच किंवा सात पावलें लांबरुंद आणि वटूच्या हातानें एक हात उंच अशी चतुष्कोणी असावी.

लम्बा भित्तिर्द्विहस्ता च ह्युन्नता त्रिंशदङ्गुला ॥
प्रत्यक् वेद्या विवाहे च विस्तृता द्वादशांगुलम् ॥ १०१ ॥
अष्टावष्टौ प्रकुर्वीत सोपानान्यथ पार्श्वयोः ॥
तदग्रे कलशाकारामिति पूजाविदां मतम् ॥ १०२ ॥

अर्थः— त्या वेदीच्या पश्चिमेच्या अंगास एक भिंत दोन हात लांब, तीस बोटें उंच आणि बारा अंगुलें रुंद अशी घालावी. त्या भिंतीच्या दोन्ही बाजूस आठ आठ पायऱ्या कराव्यात, आणि त्या भिंतीच्या शेवटास एक कलशाकार कळस करावा. असें पूजाशास्त्र जाणणाऱ्यांचें मत आहे.

पीठाचें ( पाटाचें ) प्रमाण

अथ पीठं- अष्टत्रिंशांगुलं दीर्घमुन्नतं स्यात्षडंगुलम् ॥
अष्टांगुलं च विस्तारं कुर्यादौदुम्बरादिना ॥ १०३ ॥

अर्थ— आता पीठाचें ( पाटाचें ) प्रमाण सांगतात. पीठ अडतीस अंगुलें लांब, सहा अंगुलें उंच आणि आठ अंगुलें रुंद असें उंबराच्या वगैरे काष्ठाचें करावें.

विवाहः स्याद्दिने यस्मिन्दिवा वा यदि वा निशि ॥
होमस्तत्रैव कर्तव्यो यथानुक्रमणेन तु ॥ १०४ ॥

अर्थ— विवाह दिवसा किंवा रात्री ज्या दिवशीं असेल त्याच दिवशीं अनुक्रमानें जशा प्राप्त होतील, त्याप्रमाणें क्रिया करून, होम त्याच दिवशीं करावा.

विवाहांत सप्तपदीची आवश्यकता

तावद्विवाहो नैव स्याद्यावत्सप्तपदी भवेत् ॥

तस्मात्सप्तपदी कार्या विवाहे मुनिभिः स्मृता ॥ १०५ ॥

अर्थ— सप्तपदी होईपर्यंत विवाह झाला असें होत नाहीं. ह्मणून विवाहांत सप्तपदीचा विधि अवश्य केला पाहिजे; असें मुनींचें मत आहे.

विवाहहोमाच्या वेळीं कन्या ऋतुमती झाली असता.

विवाहहोमे प्रक्रान्ते कन्या यदि रजस्वला ॥
त्रिरात्रं दम्पती स्यातां पृथक्शय्यासनाशनौ ॥ १०६ ॥

अर्थ— विवाहहोम सुरूं झाल्यावर जर कन्या रजस्वला होईल, तर त्या वधूवरानें तीन दिवस शयन, आसन, भोजन हे व्यापार पृथक् पृथक् करावेत.

चतुर्थेऽहनि संस्नाता तस्मिन्नग्नौ यथाविधि ॥
विवाहहोमं कुर्यात्तु कन्यादानादिकं तथा ॥ १०७ ॥

अर्थ— चवथ्या दिवशीं तिनें स्नान केल्यावर पूर्वीच्या त्या अग्नीवर विवाहहोम यथाविधि करावा. आणि कन्यादान वगैरे जे विधि राहिले असतील तेही करावेत.

विवाहदिवसापासून चार दिवसात कन्या ऋतुमती झाली असता

चतुर्थी मध्ये कन्या चेद्भवेद्यदि रजस्वला ॥

त्रिरात्रमशुचिस्त्वेषा चतुर्थेऽह्नि शुध्यति ॥ १०८ ॥
पूजां न होमं कुर्वीत प्रायश्चित्तं विधीयते ॥
जिन सम्पूजयेद्भक्त्या पुनर्होमो विधीयते ॥ १०९ ॥ इति प्रसंगाद्रेदिकादिलक्षणम् ॥

अर्थ— विवाह दिवसापासून चार दिवसात जर वधू रजस्वला होईल, तर ती तीन दिवस अशुद्ध असते, व चवथ्या दिवशी शुद्ध होते. म्हणून पूजा होमादिक विधि करूं नये. ती कन्या शुद्ध झाल्यावर प्रायश्चित्त केलें पाहिजे. त्याकरितां भक्तीनें जिनपूजा प्रथम करून मग विवाहहोम पुनः करावा असें दुसरें एक मत आहे

उभयोः पार्श्वयोः काण्डसंयुक्त पुञ्जपञ्चकम् ॥
शाल्यादिपञ्चधान्यानां याचारकस्य सन्निधौ ॥ ११० ॥

अर्थ— बहुल्याच्या दोनी बाजूस काडांशी सहवर्तमान भात वगैरे पाच धान्यांचे पाच ढीग घालावेत.

पूर्वोक्तराश्योर्मध्ये च तथोपरि सुवस्त्रकम् ॥
पटं प्रसार्य ते तत्र चानयेद्वरकन्यके ॥ १११ ॥

अर्थ— नंतर पूर्वी सांगितलेल्या ज्या तांदळांच्या दोन राशि, त्यांच्या मध्यभागीं चागलें वस्त्र उभें पसरून ( अंतःपट धरून ) त्या ठिकाणीं त्या वधूवरांना आणावें.

अंत पट धरल्यावर वधूवरानीं उभें रहाणें वगैरे

पूर्वदिक्ताण्डुलिराशौ प्रत्यङ्मुखा हि कन्यका ॥
प्राङ्मुखः पश्चिमे राशाववतिष्ठति सद्वरः ॥ ११२ ॥
गुर्वादिसज्जनैः स्तोत्रं पठनीयं जिनस्य वै ॥
मङ्गलाष्टकमित्यादि कल्याणसुखदायकम् ॥ ११३ ॥
कन्याया वदनं पश्येद्वरो वरं च कन्यका ॥
शुभे लग्ने सतां मध्ये सुखप्रीतिप्रवृद्धये ॥ ११४ ॥
सगुडान् जीरकानास्ये ललाटे चन्दनाक्षतान् ॥
कण्ठे मालां क्षिपेत्तस्याः साऽपि तस्य तदा तथा ॥ ११५ ॥

अर्थ— मग पूर्वेकडील तांदळाच्या राशीवर पश्चिमेकडे तोंड करून वधूस व पश्चिमेकडील तांदळाच्या राशीवर पूर्वेकडे तोंड करून वरास उभें करावें. नंतर गुरु वगैरे सद्गृहस्थांनी जिनस्तोत्र मंगलाष्टक वगैरे पठण करावें. हीं स्तोत्रें व मंगलाष्टकें वधूवरांना कल्याण आणि सुख ह्यांची प्राप्ति करून देणारी असतात. हें झाल्यावर शुभ मुहूर्तावर अंतःपट काढून वधूवरांनीं परस्परांचें सुख आणि प्रीति ह्यांच्या वृद्धीकरितां एकमेकांचें मुखावलोकन करावें. मग वरानें वधूच्या मुखांत गूळ आणि जिरे घालावेत. तिच्या कपाळाला गंध आणि अक्षता लावाव्यात. आणि तिच्या गळ्यांत फुलांची माळ घालावी. वधूनेंही वरास त्याप्रमाणेंच सर्व करावें.

कन्यावरण व कन्यादानविधि.

एतद्गोत्रे प्रजातस्यैवैतन्नाम्नः प्रपौत्रकः ॥ अस्य पौत्रोऽस्य पुत्रश्चाप्येतदाख्योऽहमित्यथ ॥ ११६ ॥ एतद्गोत्रे प्रजातस्यैवैतन्नाम्नः प्रपौत्रिकाम् ॥ पौत्रीमस्यास्य पुत्रीमप्येतदाख्यामिमां वृणे ॥ ११७ ॥ इति कन्याचतुर्थीं च प्रपौत्रादिपदे स्वके ॥ प्रयोज्य प्रददेत्कन्यां वरणे समये वरः ॥ ११८ ॥ स्वपक्षं पूर्वमुक्त्वैवमपरं च वदन्वदेत् ॥ त्वं वृणीष्वेति वा तुभ्यं प्रयच्छामीति मातुलम् ॥ ११९ ॥ दक्षिणं पाणिमेतस्याः ससुवर्णाक्षतोदकम् ॥ पित्रा समन्त्रकं दत्तं गृह्णीयात्स प्रयत्नतः ॥ १२० ॥ धर्मेण पालयेत्यादि कन्यापितरि वक्तरि ॥ धर्मेणार्थेन कामेन पालयामीत्यसौ वदेत् १२१

अर्थ— आतां कन्यावरणाचा व कन्यादानाचा विधि सांगतात. कन्यावरणाच्या वेळीं वरानें प्रथम— " अमक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमक्याचा पणतु, आमक्याचा नातु अमक्याचा पुत्र, अमुक नांवाचा मी; अमक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमक्याची पणती, आमक्याची नात, अमक्याची कन्या, अशा अमुक नांवाच्या ह्या कन्येस वरतों—असें म्हणावें. मग वधूच्या पित्यानें " त्वं वृणीष्व " म्हणजे तूं वर, किंवा " तुभ्यं प्रयच्छामि म्हणजे तुला देतों " असें म्हणावें. नंतर वरपक्षाकडील मातुल वगैरे मंडळींनी—अमक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमुक पुरुषाचा पणतु, आमक्याचा नातु, अमक्याचा पुत्र, अमुक नांवाचा हा

जो वर त्याच्याकरितां; अमक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमक्याची पणती, अमक्याची नात, अमक्याची कन्या, अमुक नांवाची जी ही वधू तिला आम्ही वरतों—असें ह्मणावें. त्यास वधूपक्षाच्या मंडळींनीं "वरा" असें उत्तर द्यावें. ह्याप्रमाणें तीन वेळ करावें. नंतर वधूपक्षाकडील मंडळींनीं पुढें सांगितल्याप्रमाणें अमक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमक्याची पणती, अमक्याची नात, अमक्याची कन्या, अमुक नांवाची जी ही वधू तिला तुह्मीं वरा असें ह्मणावें. त्याला वराकडील मंडळींनें 'वरतों' असें उत्तर द्यावें. ह्याप्रमाणें तीन वेळ करावें. मग, वधूच्या पित्यानें सुवर्ण अक्षता आणि उदक ह्यासह वधूचा उजवा हात वराच्या हातात देऊन कन्यादान करावें. नंतर त्यानें वरास "ह्या वधूचें धर्मानें, अर्थाच्या योगानें आणि कामाच्या योगानें (इच्छित पूर्ण करण्यानें) तूं पालन कर" अशी प्रार्थना करावी. वरानें "मी धर्मानें, अर्थानें व कामानें हिचें रक्षण करतों" असें प्रतिवचन द्यावें.

कन्यावरण मंत्र.

ॐ एकेन प्रकाश्येन पूर्वेण पुरुषेण श्रीवत्सेन ऋषिणा प्रतीते श्रीवत्स-
गोत्रे प्रजाताय तस्य प्रपौत्राय तस्य पौत्राय तस्य पुत्राय देवदत्तनाम-
धेयाय अस्मै कुमाराय भवतः कन्यां वृणीमहे इति वरसम्बन्धिभिस्त्रिः
प्रार्थनीयम् ॥ तदा कन्यासम्बन्धिभिर्वृणीध्वमिति त्रिः प्रतिवक्तव्यम् ॥

ततः एकेन प्रकारेण पूर्वेण पुरुषेण काश्यपेन ऋषिणा प्रतीते काश्यपगोत्रे प्रजातां तस्य प्रपौत्रीं तस्य पौत्रीं तस्य पुत्रीं देवदत्तानामधेयां इमां कन्यां वृणीध्वं इति कन्यासम्बन्धिभिस्त्रिर्वक्तव्यम् ॥ तदा वरसम्बन्धिभिर्वृणीमहे इति प्रतिवक्तव्यम् ॥ इति कन्यावरणमन्त्रः ॥

अर्थ— "ॐ एकेन" इत्यादि कन्यावरणाचे मंत्र आहेत. त्यांत प्रथम वरपक्षाच्या मंडळींनी "ॐ एकेन" येथपासून "वृणीमहे" येथपर्यंत म्हणावें. त्याला वधूपक्षाच्या मंडळींनी तुम्ही "वृणीध्वं" असें उत्तर द्यावें. याप्रमाणें तीन वेळ करावें. नंतर वधूपक्षाच्या मंडळींनी "ॐ एकेन" येथपासून "वृणीध्वं" येथपर्यंत म्हणावें. नंतर वरपक्षाच्या मंडळींनी तुम्ही "वृणीमहे" असें उत्तर द्यावें. यास कन्यावरणविधि म्हणतात.

कन्याप्रदानमंत्र

ततश्च कन्यापिता— ॐ नमोऽर्हते भगवते श्रीमते वर्द्धमानाय श्रीबलायुरारोग्यसन्तानाभिवर्धनं भवतु । इमां कन्यामस्मै कुमाराय ददामि क्ष्वीं क्ष्वीं क्ष्वीं हं सः स्वाहा ॥ इत्यनेन गन्धोदकधारापूर्वकं कन्याप्रदानं कुर्यात् ॥

अर्थ— नंतर वधूच्या पित्यानें "ॐ नमोऽर्हते" इत्यादि मंत्र ह्मणून पूर्वी सांगितल्याप्रमाणे सुवर्ण, अक्षता आणि उदक ह्यांसहवर्तमान कन्येचा उजवा हात वराच्या उजव्या हातांत देऊन वराच्या हातावर गंधोदकाची धार सोडून कन्यादान करावें. कन्यादान विधि.

वर्धापनविधि.

ततश्च कुलवानिता दम्पतीपरस्परहस्तपूर्णाक्षतपुञ्जं मस्तके त्रिवारं क्षेपयेत् । मन्त्राः । ॐ ह्रीं सम्यग्दर्शनाय स्वाहा ॥ ॐ ह्रीं सम्यग्ज्ञानाय स्वाहा ॥ ॐ ह्रीं सम्यक्चारित्राय स्वाहा ॥ इति वर्धापयेत् ॥

अर्थ— नंतर कोणीतरी कुलीन सुवासिनीनें त्या दंपत्याच्या एकमेकांच्या हातांतील अक्षता परस्परांच्या मस्तकावर तीन तीन वेळ टाकवाव्यात. त्याचे मंत्र वर सांगितले आहेत. ह्यास वर्धापन ह्मणतात. ह्याचा विधि पुढें लिहिल्याप्रमाणे करावा.

वर्धापनविधींतील कर्म.

साज्यदुग्धार्द्रपाणिभ्यां वरस्तत्कन्यकाञ्जलिम् ॥
द्विरुन्मृज्य ततस्तत्र द्विः क्षिप्त्वा धवलाक्षतान् ॥ १२२ ॥
साक्षतं स्वाञ्जलिं तत्र कन्यापित्रा निषेचितम् ॥

शान्त्याद्याशीर्भिरेवं तु पित्तान्मूर्ध्नि चाक्षता ॥ १२३ ॥

मूर्ध्नि तण्डुलनिक्षेपः स्याद्रत्नत्रयमन्त्रतः ॥

कन्याऽप्येवं द्विरुन्नुत्य मूर्ध्नि क्षेपान्तमाचरेत् ॥ १२४ ॥

अर्थ—प्रथम वरानें आपल्या दोनी हातांस तूप व दूर लावून ते हात दोन वेळ वधूच्या ओंजळीस पुसावेत. नंतर त्या ओंजळींत स्वच्छ पांढऱ्या अक्षता घालाव्यात. नंतर वधूच्या पित्यानें वराच्या ओंजळीस तूप, दूर लावून त्यात दोन वेळां अक्षता घालाव्यात. याप्रमाणें झाल्यावर शांतिमंत्रानें किंवा आशीर्वादमंत्रानें वरानें वधूच्या मस्तकावर आपल्या ओंजळींतील अक्षता टाकाव्यात. नंतर वधूनें आपल्या ओंजळीतील अक्षता वराच्या मस्तकावर टाकाव्यात. याप्रमाणें तीन वेळ वरानें केल्यावर वधूनें प्रथम वराच्या ओंजळीस दूर तूप लावून त्यांत अक्षता घालाव्यात. नंतर वधूच्या पित्यानें वधूच्या ओंजळीस दूर तूप लावून त्यात अक्षता घालाव्यात. मग वधूनें शांतिमंत्रानें किंवा आशीर्वादमंत्रानें प्रथम वराच्या मस्तकावर अक्षता टाकाव्यात. नंतर वरानें वधूच्या मस्तकावर अक्षता टाकाव्यात. याप्रमाणें तीन वेळ करावें. या क्रियेंत शांतिमंत्र किंवा आशीर्वादमंत्र याची योजना करणेस वर सांगितलेंच आहे; तसें करावें. किंवा रत्नत्रयमंत्राची योजना करावी. ते मंत्र वर दिलेलेच आहेत. हा वधूपनविधि सांगितला.

कंकणबंध.

अथ कंकणम्— त्रिस्त्रिरावेष्टितं सूत्रं नाभिदघ्नेऽनयोः पृथक् ॥
ऊर्ध्वं चाधः समादाय कृत्वा पञ्चगुणं ततः ॥ १२५ ॥
हरिद्राकल्कमालिप्य वलित्वा तत्करेऽर्पयेत् ॥
मदनफलमन्यं वा मणिं सत्रेण योजयेत् ॥ १२६ ॥
वाद्यैर्मन्त्रैः समायुक्तं सौवर्णं राजतं पिता ॥
ताभ्यां तौ कंकणं हस्ते बध्नीयातां मिथः क्रमात् ॥ १२७ ॥

अर्थ— आतां कंकणाचा विधि सांगतात– वधूवराच्या नाभिप्रदेशाजवळ त्यांच्या दोघांच्या भोंवतीं सुताचे तीन तीन वेढ्याचे दोन फेर करावेत. त्यांत वरील फेर खालीं आणि खालचा फेर वरतीं घेऊन, खालीं घेतलेला फेरे पायांखालून काढून घ्यावा, व वर घेतलेला फेर त्याच्या मस्तकांवरून काढून घ्यावा. नंतर तो प्रत्येक फेर पंचगुण ( पाच पदरी ) करावा. ( ह्यांतील एकेक पदरांत सुताचे दोरे सहा सहा येतात. ह्मणून त्या एकंदर पंचगुण केलेल्या दोऱ्यांत सुताचे पदर तीस येतात. ही गोष्ट लक्षांत आणावी ) नंतर त्या सुताला पाण्यात कालविलेली हळद लाऊन तें वळून त्या वधूवरांच्या हातांत द्यावें, आणि त्यांच्याकडून त्या सुतात गेळफळ किंवा एखादा सोन्याचा अथवा रुप्याचा मणि बांधवून तें एकमेकांकडून

एकमेकांच्या हातात बांधावें. त्यात प्रथम वधूनें वराच्या हातात कंकण बांधावें, आणि नंतर वरानें वधूच्या हातांत बांधावें.

कंकणबंधन मंत्र

अथ मन्त्रः । ॐ जायापत्योरेनयोर्गृहीतपाण्योरेतस्मात्परमा चतुर्थदिवसादा-
होस्विद्वा सप्तमादिज्यापरमस्य पुरुषस्य गुरूणामुपास्तिर्देवतानामर्चनाऽग्नि-
होत्रं सत्कारोऽभ्यागतानां विश्राणनं वनीपकानामित्येवं विधातुं प्रतिज्ञायाः
सूलकंकणं सूत्रव्यपदेशभाक् रजनीसूत्रं मिथो मणिबन्धे प्रणह्यते॥ कंकणसूत्रबन्धनमन्त्रः

अर्थ— " ओं जायापत्योरेतयोः " या मंत्रानें वधूवरांनी एकमेकांच्या मणगटांत कंकण सूत्र बांधावें. [ चर्तापनाविधि आणि कंकणबंधनविधि यासंबंधानें कित्येक पुस्तकांत प्रथम कंकणबंधन करून नंतर चर्तापन करावें असाही पाठ आहे. तथापि ज्या देशांत जशी रूढी असेल त्याप्रमाणें त्यांनी करावें. ]

गिरहोमविधि

यज्ञवस्त्रान्वितौ तौ च वीक्ष्य पूर्णं घटद्वयम् ॥ कुण्डात्प्रत्यग्दिशयागत्यो-
पविशेतां समासने ॥ १२८ ॥ नूतनौदुम्बरे पीठे धौतवस्त्रप्रसारिते ॥
वामदक्षिणयोः प्रत्यक् प्राङ्मुखौ तौ सुदम्पती ॥ १२९ ॥ उपाध्याय-

स्ततः कुर्याद्धोमं सन्मन्त्रपूर्वकम् ॥ महावाद्यनिनादेन मङ्गलाष्टकपा-
ठतः ॥ १३० ॥ कन्याया दक्षिणं पाणिं सांगुष्ठं सव्यपाणिना ॥ गृहीत्वा
चाथ वामस्थां कृत्वाऽन्नाहुतीर्हुनेत् ॥ १३१ ॥ पुरस्ताद्वरवध्वोश्च स्थापनां
कुरु पत्रिकी (?) ॥ ततश्च होमकुण्डाग्रे सङ्कल्पः सूरिणोच्यते ॥ १३२ ॥

अर्थ— नंतर ज्यांच्या एकमेकांच्या वस्त्रांना गांठीं मारल्या आहेत अशा त्या दंपत्यानें पूर्वी स्थापन केलेल्या दोन पूर्णकलशांचें दर्शन करून अग्निकुंडाच्या पश्चिमेकडे येऊन पीठावर वसावें हें पीठ उंब-राच्या लांकडाचें नवें केलेलें असावें, व त्याच्यावर धुतलेलें वस्त्र पसरलेलें असावें. त्या पीठावर वधूच्या डाव्या अंगास वरानें व वराच्या उजव्या अंगास वधूनें पूर्वेकडे तोंड करून वसावें. मग उपा-ध्यायानें होमविधीस मंत्रपूर्वक आरंभ करावा. मग मंगलवाद्यांचा घोष होत असतां व मंगलाष्टकांचें पठन चाललें असतां वरानें वधूचा उजवा हात अंगठा न सोडतां धरून तिला आपल्या डाव्या बाजूस वसवून अग्नींत चरूच्या आहुती द्याव्यात. मग उपाध्यायानें होमकुण्डाजवळ बसून पुण्याहवाचनाचा संकल्प करावा.

पुढील विधीचा क्रम.

पुण्याहवाचनां पश्चात्पञ्चमण्डलपूजनम् ॥ नवानां देवतानां च पूजनं च
यथाविधि ॥ १३३ ॥ तथैवाघोरमन्त्रेण होमश्च समिधाहुतिम् ॥ लाजा-

हुतिं वधूहस्तद्वयेन च वरेण च ॥ १३४ ॥ वरस्य वामपार्श्वे तु कन्यायाः उपवेशनम् ॥ शिला स्थाप्या तयोरग्रे मण्डले लोष्टसंयुता ॥१३५॥ शिलाग्रे स्थापिताः सप्त पुञ्जा अक्षतसम्भवाः ॥ एतेषां पुरतोऽर्थं दम्पत्योः स्थापनं मतम् ॥ १३६ ॥ ततो दक्षिणपादस्य योऽङ्गुष्ठो यावरञ्जितः ॥ गृहीतव्यो वरेणैव सप्तकृत्वो मुहुर्मुदा ॥ १३७ ॥ स्थानानां परमाणां च सप्तानां गुणवत्तया ॥ सङ्कल्पेन क्रमेणैव स्प्रष्टव्याः सप्तपुंजकाः ॥ १३८ ॥ शिलायाः स्पर्शनं पश्चात्कर्तव्यं तेन यत्नतः ॥ अग्नेः प्रदक्षिणं कर्म स्पर्शनं तृणजं पुनः ॥ १३९ ॥ पूर्णाहुतिस्ततः कार्या समन्ताद्रुपवेशनम् ॥ नीराजनावलोके च तथाऽऽकर्णनमाशिषः ॥ १४० ॥

अर्थ— मग पुण्याहवाचन, पंचमंडलपूजन, नवग्रहपूजन, अघोरमंत्रानें होम आणि समिधाहोम हीं कर्में करावींत. नंतर वधूवराच्या उभयतांच्या हातानें लाजाहोम करावा. यावेळीं वधू वराच्या डाव्या बाजूस असावी. मग अग्निकुंडाच्या पुढल्या बाजूस ( किंवा अग्निकुंडाच्या उत्तरेच्या बाजूस ) मंडलावर लहान दगडानें युक्त अशी मोठी शिला ( पाटा वरवंटा ) ठेवावी. त्या शिळेवर तांदळाच्या सात राशी घालाव्यात; आणि त्याच्या ( शिळेच्या ) पलीकडे दंपत्याला नेऊन उभें करावें. मग अळित्यानें रंगविलेला

वधूचा उजवा पाय वरानें आपल्या हातानें धरून सात परमस्थानांचें मनांत स्मरण करून, प्रत्येक परमस्थानाच्या संकल्पानें एकेका राशीला तिच्या पायाचा स्पर्श करवावा. मग अग्नीला प्रदक्षिणा करून पूर्णाहुति द्यावी. नंतर जवळच कोठें तरी बसून आरती ओवाळून घेऊन वधूवरानें आशीर्वाद मंत्रांचें श्रवण करावें. हा विवाहविधींतील मुख्यक्रियांचा क्रम सांगितला आहे. येथून पुढें पुण्याहवाचनाचा संकल्प वगैरे सांगतात.

पुण्याहवाचनाचा संकल्प

अथ वेदिकादिग्भागे दम्पती उपवेश्य भूमिशुद्धिं विधाय पुण्याहवाचनां पठेत् ॥ ॐ अद्य भगवतो महापुरुषस्य पुरुषवरपुण्डरीकस्य परमेण तेजसा व्यासलोकालोकोत्तममङ्गलस्य मङ्गलस्वरूपस्य गर्भाधानाद्युपनयनपर्यन्तक्रियासंस्कृतस्यास्य देवदत्तनाम्नः कुमारस्योपनीतिव्रतसमाप्तौ शास्त्रसमभ्यसनसमाप्तौ समावर्तनान्ते ब्रह्मचर्याश्रमेनेतरे गृहस्थाश्रमस्वीकारार्थं अग्निसाक्षिकं देवतासाक्षिकं बन्धुसाक्षिकं ब्राह्मणसाक्षिकं पाणिग्रहणपुरःसरं कलत्रे गृहीते सति अनयोर्दम्पत्योः सर्वपुष्टिसम्पादनार्थं विधीयमानस्य होमकर्मणो नान्दीमुखे पुण्याहवाचनां करिष्ये ॥ इति मंत्रेण पुन्याहवाचनां कृत्वा साज्यसमिधो होमयेत् ॥ ततो व्रीहिलाजान्नहोमं कुर्यात् ॥

अर्थ— वेदिकेच्या जवळ त्या दंपत्याला बसवून उपाध्यायानें भूमिशुद्धि करून पुण्याहवाचनाचें पठण करावें. त्यांत प्रथम " ॐ अद्य भगवतो " येथपासून " पुण्याहवाचनां करिष्ये " येथपर्यंत पुण्याहवाचनाचा संकल्प करून पुण्याहवाचन करावें. मग घृतयुक्त समिधांनें हवन करावें. नंतर व्रीहि, लाजा आणि चरु यांचा होम करावा.

सप्तपदीमंत्र.

ततः शिलाग्रस्थापितसप्ताक्षतपुञ्जाग्रे करेण कन्यांगुष्ठस्पर्शनम् । ॐ सज्जातये स्वाहा ॥ ॐ सद्गार्हस्थ्याय स्वाहा ॥ ॐ परमसाम्राज्याय स्वाहा ॥ ॐ परमपारिव्राज्याय स्वाहा ॥ ॐ परमसुरेन्द्राय स्वाहा ॥ ॐ परमार्हन्त्याय स्वाहा ॥ ॐ परमनिर्वाणाय स्वाहा ॥ इति कन्यांगुष्ठेन सप्तपरमस्थानस्पर्शनमन्त्रः ॥

अर्थ— नंतर शिलेवर घातलेल्या तांदळाच्या सात राशीस वरानें वधूचा उजवा पाय हातानें धरून पायाच्या अंगठ्यानें स्पर्श करवावा. " ॐ सज्जातये स्वाहा " वगैरे सात मंत्र म्हणावेत. यालाच सप्तपदीविधि म्हणतात.

ततः पश्चात्पूर्णाहुतिं अन्ते पुण्याहं निगद्य प्रदक्षिणां कारयेत् । शांतिधारा पुष्पाञ्जलिप्रणामौ भक्त्या क्षमापना आशिषो भस्मप्रदानम् ॥ तद्यथा–

भस्मग्रहण मंत्र.

ॐ भगवतां महापुरुषाणां तीर्थंकराणां तद्देशानां गणधराणां शेषकेवलिनां पाश्चात्यकेवलिनां भवनवासिनामिंद्रा व्यन्तरज्योतिष्का इन्द्राः कल्पाधिपा इन्द्राः सम्भूय सर्वेऽप्यागताः अग्निकुंडके चतुरस्रत्रिकोणवर्तुलके वा अग्नीन्द्रस्य मौलेरुध्दृतं दिव्यमग्निं तत्र प्रणीतेन्द्रादीनां तेषां गार्हपत्याहवनीयौ दक्षिणाग्निरिति नामानि त्रिधा विकल्प्य हि श्रीखण्डदेवदार्वाद्यैस्तरां प्रज्वाल्य तानर्हदादिमूर्तीन् रत्नत्रयरूपान्विचित्योत्सवेन महता सम्पूज्य प्रदक्षिणीकृत्य ततो दिव्यं भस्मादाय ललाटे दोःकण्ठे हृदये समालभ्य प्रमोदेरन् तद्वदिदानीं तानग्नीन् हुत्वा दिव्यैर्द्रव्यैस्तस्मात्पुण्यं भस्म समाहृतमनयोर्दम्पत्योश्च ( एताभ्यां दम्पतीभ्यां ) भव्येभ्यः सर्वेभ्यो दीयते ततः श्रेयो विधेयात्। कल्याणं क्रियात्। सर्वाण्यपि भद्राणि प्रदेयात्। सद्धर्मश्रीबलायुरारोग्यैश्वर्याभिवृद्धिरस्तु ॥ भस्मप्रदानमन्त्रोऽयम् ॥

अर्थ-- नंतर उपाध्यायानें पूर्णाहुति, अंती पुण्याहवाचन, प्रदक्षिणा, शांतिधारा, पुष्पांजलि, प्रणाम,

[illegible]
मंत्रानें सर्वांस वाटें.

[illegible]

मनोरथाः सन्तु मनोज्ञसम्पदः । सत्कीर्तयः सम्प्रति सम्भवन्तु वः ॥
व्रजन्तु विघ्ना निधनं बलिष्ठा । जिनेश्वरश्रीपदपूजनाद्यः ॥ १४१ ॥
शान्तिः शिरोधृतजिनेश्वरशासनानां । शान्तिर्निरन्तरतपोभरभावितानाम् ॥
शान्तिः कषायजयजृम्भितवैभवानां । शान्तिः स्वभावमहिमानमुपागतानाम् ॥ १४२ ॥
जीवन्तु संयमसुधारसपानतृप्ता । नन्दन्तु शुक्लसहजोदयसुप्रसन्नाः ॥
सिध्यन्तु सिध्दसुखसङ्गकृताभियोगा- । स्तीव्रास्तपन्तु जगतां त्रितये जिनाज्ञाः ॥१४३॥
श्रीशान्तिरस्तु शिवमस्तु जयोऽस्तु नित्य- । मारोग्यमस्तु तव पुष्टिसमृद्धिरस्तु ॥
कल्याणमस्त्वभिसुखस्य च वृद्धिरस्तु । दीर्घायुरस्तु कुलगोत्रधनं सदाऽस्तु ॥ १४४ ॥
इत्याशीर्दानमाचार्येण कार्यम् ॥

अर्थ— नंतर गृहस्थाचार्यानें " मनोरथाः सन्तु " इत्यादि मंत्रांनी आशीर्वाद द्यावेत.

पुढील चार दिवसाचे कृत्य

शिरस्यक्षतपुञ्जस्य धारणं शुद्धमानसम् ॥
नमस्कारोऽग्निदेवस्य मूर्ध्नो प्रणमनं परम् ॥ १४५ ॥
सभायाः पूजनं वस्त्रैस्ताम्बूलाद्यैर्विशेषतः ॥
सदा गुणवता चापि ध्रुवतारानिरीक्षणम् ॥ १४६ ॥
गृहस्याभ्यन्तरे वण्टाढ्यस्याप्यवलोकनम् ॥
तथा बन्धुजनैः सार्धं पयः प्रभृतिभोजनम् ॥ १४७ ॥

अर्थ— वरील आशीर्वाद मंत्र झाल्यानंर उपाध्यायानी दिलेल्या अक्षता वधूवरांनीं मस्तकावर धारण कराव्यात; व त्यांना नमस्कार करावा. अतःकरण शुद्ध ठेवावें. अग्निदेवतेला मस्तक नम्र करून प्रणाम करावा. सभेंतील लोकांचे वस्त्र, तांबूल इत्यादिकानी पूजन करावें. नंतर वधूवरांनी आकाशांतील ध्रुवाची चादणी अवलोकन करावी. घरांत बांधलेल्या दोन घाटी पहाव्यात. नंतर आपल्या आप्तइष्टांसह दूध वगैरे सात्विक पदार्थांनीं भोजन करावें.

ततः प्रभृति नित्यं च प्रभाते पौष्टिकं मतम् ॥
निशीथे शान्तिहोमेऽन्हि चतुर्थे नागतर्पणम् ॥ १४८ ॥
तदग्रे च प्रभाते च गृहमण्डपयोः पृथक् ॥

सम्मार्जनं च कर्तव्यं मृत्स्ना गोमयलेपनम् ॥ १४९ ॥
पौष्टिकहोमान्तरके सकलैः सह बन्धुभिश्च्युतोष्णीषैः ॥
कार्यं हि पंक्तिभोजनमप्यन्न गचात्र ताम्बूलम् ॥ १५० ॥

अर्थ— वधूवरानें त्या दिवसापासून प्रतिदिवशी प्रातःकालीं पौष्टिककर्म करावें, आणि रात्रीं शांतिहोम करावा. चवथ्या दिवशीं नागतर्पण करावें. त्याच्या दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं घर आणि मंडप झाडून काढून माती आणि शेण यांनीं दोन्हीं सारवावींत. प्रतिदिवशीं पौष्टिकहोम झाल्यानंतर आपल्या आप्त इष्टांसह वधूवरांनीं भोजन करावें. त्यावेळीं डोक्याला पागोटें वगैरे कोणीं घालूं नये. नंतर सर्वांना विडे द्यावेत.

विशाले मनोज्ञे समे भूमिभागे । विवाहस्य सन्मण्डपे शोभमाने ॥
बृहत्कार्णिकं चाष्टपत्रं सुपद्मं । सरःसंयुतं वा चतुर्द्वारमुक्तम् ॥ १५१ ॥
चतुर्भिस्तथाऽस्त्रैरूपेतं विशेषा- । द्वरैः पञ्चचूर्णैर्विरच्यैव साधु ॥
दधन्मण्डयन्पज्च वा कार्णिकान्तः । स्थितः पालिकामूर्ध्नि तस्या विचित्रम् ॥ १५२ ॥
नवीनं घटं पंचभिश्चाकरत्नै- । स्तथा ससभिर्धान्यकैः पूर्यमाणम् ॥
सदर्भं सदूर्वं विधानेन युक्तं । विचित्रेण संस्थापयेच्चारु पत्नी ॥ १५३ ॥

अर्थ— विस्तृत अशा सुंदर आणि समपृष्ठ असलेल्या मंडपांतील भूमीवर ज्याची कर्णिका मोठी आहे

असें अष्टदलांचें कमल काढावें. त्याच्या पलीकडे चार द्वारांचा चतुष्कोण काढावा. ह्या कमलाच्या दलांत आणि त्याच्या वाहेरच्या चतुष्कोणांत पांच प्रकारचे उत्तम रंग भरावेत. कमलाच्या कर्णिकेच्या आंत पांच मंडलें काढावींत; आणि त्यांतील मधल्या मंडलावर चित्रविचित्र रंगविलेला असा नवीन कलश पंचरत्नें आणि सप्तधान्ये ह्यांनीं भरून व त्यांत दर्भ आणि दूर्वा घालून व वरती आंकण ठेवून वधूनें ठेवावा.

दलेष्वष्टसु प्राक्प्रभृत्याह्वयेषु । लिखेदष्टनागान् स्वमन्त्रैः प्रसिद्धान् ॥
अलंकृत्य साक्षाद्बहिर्मण्डलेभ्यः । सदीशानकोणादिषु प्रायेशोऽमी ॥ १५४ ॥
घटाः स्थापनीयाश्चतुःसंख्ययाऽतो । मुखेष्वप्यमीषां नवाः पल्लवाश्च ॥
प्रसूनैस्तथा मालया चारुवस्त्रैः । सहादर्शकैः शोभमानान् विशेषात् ॥ १५५ ॥

अर्थ— त्या कमलाच्या पूर्वेकडील दलांपासून आठ नागांची नांवें व ते आठ नाग रंगानें काढावेत. कमलाच्या वाहेर जो चतुष्कोण काढलेला असतो, त्या चतुष्कोणाच्या ईशान्येच्या कोपऱ्यापासून चारी कोपऱ्यास चार कलश ठेवावेत. त्या कलशांच्या तोंडावर नवीन कोमल पल्लव, फुलें, माला वस्त्र आणि आरसा ह्या वस्तु ठेवून कलशांस सुशोभित करावें.

बहिः प्राक्सुपूर्वेभ्य एतेभ्य एव । स्वयं द्वारकेभ्यो गजो लेखनीयः ॥
सुचूर्णैर्हयो वा गजस्तद्दृक्षा । सपुच्छः सशृङ्गः सलिङ्गः सकर्णः ॥ १५६ ॥

अर्थ— त्या चतुष्कोणाच्या जी चार द्वारें त्यांच्या बाहेर पूर्वेकडे गज, दक्षिणेकडील द्वाराच्या बाहेर अश्व, पश्चिमेकडील द्वाराच्या बाहेर पुनः गज आणि उत्तरेकडील द्वाराच्या बाहेर वृषभ अशी चार चित्रें रंगानें काढावीत. वृषभाचें पुच्छ, शिंगें, लिंग, कर्ण वगैरे अवयव स्पष्ट काढावेत.

तथा नैर्ऋते कन्यकापित्रभीष्ट- । प्रतापादि गोत्रं तथाऽग्रेऽन्हिशीतिः ॥
ककुभ्यायुगस्यैव गोत्रं वरस्य । प्रतापादि लेख्यं तथेशानकोणे ॥ १५७ ॥
सदित्येवमेतन्महामण्डलं वै- । शपूजार्थनानागोगनद्रव्यपूर्णम् ॥
अमत्रैस्तथैवांकुराणां शुभाना- । मलंकृत्य चाचार्यसाधूपदेशात् ॥ १५८ ॥
सरागेऽपि सन्ध्याभिधाने कशीरः । वरस्यापि कन्याः शुभे स्नानके वा ॥
इदं चासनं युज्यते चादरेण । सुमाङ्गल्यवादित्रगीतादिपूर्वम् ॥ १५९ ॥
क्रिया नापितस्यैव तैलावमर्दो । जलस्थानमेतद्धि पश्चाद्विधेयम् ॥
अलंकारशोभा सुवस्त्रैः सुमाल्यै-स्ततः स्थापनं पीठयुग्मं पृथक् वै ॥ १६० ॥

अर्थ— त्या चतुष्कोणांत नैर्ऋत्यदिशेला कन्येच्या पित्याचें गोत्र, कुळ, नांव वगैरे लिहावें. त्याच प्रमाणें वायव्य आणि ईशान्य दिशेला वराच्या पित्यानें गोत्र, कुळ, नाव वगैरे लिहावें. त्या मंडलाच्या आंत जिनेंद्राच्या पूजेचे पदार्थ ठेवावेत, आणि अंकुरांचीं पात्रें सभोंवतीं ठेवून त्या मंडलाला सुशोभित

करावें. मग सन्ध्याकालचा रक्तवर्ण दिसू लागला म्हणजे, वधूवरांच्या मंगलस्नानाकरितां चांगले दोन पाट मंडपांत मांडावेत. स्नानाच्या वेळीं मंगलवाद्यें वाजवावींत. ह्यावेळीं नापिताकडून वराच्या अंगाला तेल लाववावें. तें स्नान घालण्याच्या ठिकाणींच लावावें. त्या ठिकाणीं वधूवरांना स्नानास बसण्याकरितां दोन पाट निरनिराळे घालावेत. स्नानानंतर त्यांना वस्त्रभूषणें, माला वगैरेंच्या योगानें सुशोभित करावें.

गंधाक्षत देण्याचा मंत्र

अथ मन्त्रः । ॐ सद्दिव्यगात्रस्य गन्धधारादिकन्चक्रं सुगन्धं योभवीति सुगन्धोऽपि निजेन गन्धेन सुरादयः सर्वे भृशं जायन्ते गान्धिलाः यस्य पुनस्तंतन्यते ह्यनन्तं ज्ञानं दर्शनं वीर्यं सुखं च सोऽयं जिनेन्द्रो भगवान् सर्वज्ञो वीतरागः परा देवता तत्पदोरर्चितप्रार्चितप्रतिलब्धा अमी गन्धा भाले भुजयोः कण्ठे हृत्प्रदेशे त्रिपुण्ड्रादिरूपेण भाक्तिकैः प्रश्रयेण सन्धार्यन्ते ते भवन्तु सर्वस्मा अपि श्रेयसे लाभे ( भाले ) सन्धारिता अक्षता अप्येवं भवन्तु ॥ इति गन्धाक्षतप्रदानमन्त्रः ॥

अर्थ— हा मंत्र गंधाक्षता देण्याचा आहे ह्या मंत्रानें वराला व इतरांना गंधाक्षता द्याव्यात.

ताली वध विधि.

रात्रौ ध्रुवतारादर्शनानन्तरे विद्वद्विशिष्टबन्धुजनैश्च सभापूजा ॥ चतुर्थीदिने वधूवरयोरपि महास्नानानि च स्नपनार्चनाहोमादिकं कृत्वा तालीबन्धनं कुर्यात् ॥

अर्थ— रात्रीं ध्रुवाची चांदणी वधूवरांनीं अवलोकन केल्यानंतर विद्वान्, शिष्ट आणि आप्त इष्ट ह्या मंडळीचा सत्कार करावा. विवाह झालेल्या दिवसापासून चवथ्या दिवशीं वधूवराला महास्नान ( चौक न्हाण) घालावें. मग जिनेंद्राचें स्नपन, अर्चन, होम वगैरे कर्मे संपल्यावर तालीबंधन ( मंगलसूत्रबंधन ) करावें.

तद्यथा— वरेण दत्ता सौवर्णी हरिद्रासूत्रग्रन्थिता ॥
ताली करोतु जायाया अवतंसश्रियं सदा ॥ १६१ ॥

ॐ एतस्याः पाणिगृहीत्यास्तालीं बध्नामि इयं नित्यमवतंसलक्ष्मीं निदध्यात् ॥

इति कन्याकण्ठे तालीबन्धमन्त्रः ॥

अर्थ— तें असें— वरानें दिलेली, पिवळ्या सुतात गांठविलेली ही सोन्याची ताली ह्या वधूचा मुख्यालंकार होवो. “ ॐ एतस्याः ” इत्यादि मंत्रानें वरानें वधूच्या कंठांत ताली बांधावी. हें तालीबंधन विवाह झाल्या दिवसापासून चवथ्या दिवशीं करावें.

आशीर्वादमन्त्र.

ततः— ॐ इन्द्रस्य शच्या सम्बन्धो यथा रत्या वरस्य च ॥
सम्बन्धमाला सम्बन्धं दम्पत्योस्तनुतात्तथा ॥ १६२ ॥

ॐ पुलोमजापत्न्या सार्धं यथा पाकशासनस्य रोहिण्या देव्या जैवातृकस्यैव यथा कन्दर्पदेवस्य साकं रत्या देव्या सम्बन्धस्तथा कल्याणसम्प्रासयोर्वधूवरयोरनयोः करोतु सम्बन्धं बन्धमाला तनोतु भाग्यं सौभाग्यं च शान्तिं कान्तिं दीर्घमायुष्यमपत्यानां बहूनां लब्धिं चापि दद्यात् ॥

अर्थ— " इंद्रस्य शच्या संबंधो " इत्यादि मंत्रानें–तालीबंधन केल्यावर उपाध्यानें–वधूवराला आशीर्वाद करावा.

मालाबंधनमंत्र

ॐ भार्यापत्योरेतयोः परिणतिं प्रासयोस्तुरीये घस्रे नक्तं वेलायां त्रैतासपर्यायाश्च तौ सम्बध्येते सम्बन्धमाला अतो लब्धिर्बह्वपत्यानां द्राघीय आयुश्चापि भूयात् ॥ अनेन कन्यावरयोः कण्ठे मालारोपणम् ॥ इति मालामन्त्रः ॥

अर्थ— " ॐ भार्यापत्योरेतयोः " ह्या मंत्राने चवथ्या दिवशीं रात्रीं वधूवरांनी एकमेकांच्या कंठांत माला घालाव्यात.

सुहोमावलोकः पुनर्मंगलीयं । समूत्रं कसाइन्वयेत्कण्ठदेशे ॥
स्वसम्बन्धमालापरीवेष्टनं च । सुकर्पूरगोशीर्षयोर्लेपनं च ॥ १६३ ॥

अर्थ— ह्या ठिकाणीं प्रथम होम करून नंतर तालीबंध करून मग माळा घालाव्यात. नंतर वधूवरांच्या अंगाला कापूर आणि गोरोचना यांची उटी लावावी.

वधूभिर्गृपात्तार्घपात्राभिराभिः । प्रवेशो वरस्यैव तद्धच वध्वाः ॥
शुभे मण्डपे दक्षिणीकृत्य तं वै । प्रदायाशु नागस्य साक्षाद्बलिं च ॥ १६४ ॥

अर्थ— मग हातात आरत्या घेतलेल्या सुवासिनी स्त्रियांसह वधूवरांनी (ज्या ठिकाणीं वर सांगितलेलें नागमंडल काढलें असेल तेथें) प्रवेश करावा, आणि त्या मंडपाला प्रदक्षिणा करून नागांना बलिदान करावें.

स्वपितृगोत्रसुचिन्हितमण्डले हृयसमीपे वधूमपि दर्शयेत् ॥ स्वपितृ-
गोत्रसुचिन्हितमण्डले नृपसमीपे वरस्य मता स्थितिः ॥

अर्थ— नागवलीच्या वेळीं वधूला तिच्या पित्याचें गोत्र वगैरे जिकडे लिहीलें असेल तिकडे उभी करावी आणि वराला त्याच्या पित्याचें गोत्र जिकडे लिहीलें असेल तिकडे उभा करावा.

उपाध्यायवाग्भिः समीपे समेत्य । स्वके मंचके चोपविश्यैव साधु ॥
सताम्बूलसत्तण्डुलैः प्रीत एव । च्युतं कंकणं स्थापयेत्सूत्रकं च ॥ १६५ ॥

समित्समारोपणपूर्वकं तथा । हुताशपूजावसरार्चनं मुदा ॥
गृहीतवीटी च वरो वधूयुतो । विलोकनार्हं स्वपुरं व्रजेत्प्रभोः ॥ १६६ ॥
ततः शेषहोमं कृत्वा पूर्णाहुतिं कुर्यात् ॥
ॐ रत्नत्रयार्चनमयोत्तमहोमभूति- । र्युष्माकमावहतु पावनदिव्यभूतिम् ॥
षट्खण्डभूमिविजयप्रभवां विभूतिं । त्रैलोक्यराज्यविषयां परमां विभूतिम् १६७
इति भस्मप्रदानमन्त्रः ॥

अर्थ— मग उपाध्यायाने सांगितल्यावर वधूवरांनी एकमेकांच्या जवळ यावें; आणि एका मंचकावर वसावें, आणि पुढील सर्व क्रिया झाल्यावर सोडलेलें कंकण आणि सूत ही दोन्हीं तांबूल आणि तादूळ ह्यांसह ठेवावीत. मग समिधेच्या ठिकाणी अग्नीचा समारोप करून अग्नीची पूजा करावी. नंतर सर्व मंडळींचा सत्कार करून वरानें विडा घेऊन आपल्या पत्नीसह आपल्या नगरीस गमन करावें. असा विधि करावयाचा आहे. त्यांत प्रथम राहिलेला होम समाप्त करून अग्नीत पूर्णाहुति घालून " ॐ रत्नत्रयार्चनमयोत्तम " इत्यादि मंत्राने अग्नीतील भस्म ग्रहण करावें.

सुवर्णप्रदानमत्र

हिरण्यगर्भस्य हिरण्यतेजसो । हिरण्यवत्सर्वसुखावहस्य ॥

प्रसादतस्तेऽस्तु हिरण्यगर्भेना । हिरण्यदानेन सुखी भव त्वम् ॥ १६८ ॥
सुवर्णविश्राणनमेव चाद्य । सुवर्णलाभं च हिरण्यकान्तिम् ॥
स्वर्णार्थसौख्यं परिणायमेत- । द्वधूवराभ्यां नियतं ददातु ॥ १६९ ॥
हिरण्यविश्राणनमेव चाद्य । हिरण्यलाभं च हिरण्यकान्तिम् ॥
हिरण्यगर्भोपमपुत्रजातं । वधूवराभ्यां नियतं ददातु ॥ १७० ॥
इतिस्वर्णदानमन्त्रः ॥

अर्थ— वरील मंत्र वधूच्या पित्यानें वधूवराला सुवर्णदान केल्यावर अशीर्वाद देण्याचा आहे. ह्या मंत्रानें उपाध्यायानें अशीर्वाद द्यावा.

तदनन्तरं कंकणमोचनं कृत्वा महाशोभया ग्रामं प्रदक्षिणीकृत्य
पयःपानानिधुवनादिकं सुखेन कुर्यात् ॥ स्वग्रामं गच्छेत् ॥

अर्थ— सुवर्णदान केल्यानंतर वधूवरांचे कंकण सोडावें. मग मोठ्या समारंभाने नगराला प्रदक्षिणा करावी. त्या रात्री वधूवरांनी दुध प्यावें. व प्रिय वाटल्यास वरानें स्त्रीसमागमही करावा. नंतर वराने आपल्या ग्रामाला गमन करावें.

अर्थः— विवाहकर्म समाप्त झाल्यावर वरानें आपल्या पत्नीसह आपल्या घरीं गमन करावें. घर जर दुसऱ्या गांवीं असेल, तर कांहीं तरी वाहनावरून तेथें जावें.

गृहप्रवेश.

विवाहमारभ्य वधूप्रवेशो ॥ युग्मे दिने षोडशवासरावधि ॥
न चासमाने यदि पञ्चमेऽह्नि । शस्तस्तदूर्ध्वं न दिवा प्रशस्तः ॥ १७ ॥

अर्थ— वराच्या घरांत वधूचा प्रवेश विवाह झाल्यापासून सोळा दिवसांच्या आत कोणत्याही दिवशीं करावा. विषमदिनीं करूं नये. विषमदिवशींच जर करण्याचा प्रसंग आला तर पांचव्या दिवशीं करावा. त्याच्या पुढें कोणत्याही विषमदिवशीं करूं नये. तसें दिवसां वधूप्रवेश करूं नये.

वधूप्रवेशनं कार्यं पञ्चमे सप्तमेऽपि वा ॥
नवमे वा शुभे वर्षे सुलग्ने शशिनो बले ॥ १७८ ॥

अर्थ— वधूप्रवेश पांचव्या, सातव्या किंवा नवव्या वर्षीं शुभ लग्नावर चंद्रबल असतांना करावा.

उद्वाहे चतुरष्टषड्दशादिने शस्तं वधूवेशनं ।
मासे तु द्विचतुःषडष्टदशसु श्रीपश्रमायुःप्रदम् ॥
वर्षे तु द्विचतुःषडष्टमशुभं पश्चाष्टमुख्या परैः (?) ।

पूर्णः पुण्यमनोरथो विभवदो वध्वाः प्रवेशो भवेत् ॥ १७९ ॥

अर्थ— विवाहांत चार, आठ, सहा आणि दहा ह्या दिवशीं वधूप्रवेश होणें फार चांगलें आहे. या कालांत न झाल्यास दुसरा, चवथा, सहावा, आठवा किंवा दहावा ह्या महिन्यांत करावा. पांचव्या महिन्यांत केला असतां तो संपत्ति आणि आयुष्य देणारा होतो. दोन, चार, सहा आणि आठ ह्या वर्षांत वधूचा गृहप्रवेश अशुभ समजावा.

अथ देवोत्थापनम्.

समे च दिवसे कुर्याद्देवतोत्थापनं बुधः ॥
षष्ठे च विषमे नेष्टं त्यक्त्वा पञ्चमसप्तमौ ॥ १८० ॥

अर्थ— समदिवशीं देवोत्थापन करावें त्यांत सहावा दिवस वर्ज्य समजावा. आणि पांच व सात हे दोन दिवस सोडून बाकीचे विषम दिवस वर्ज्य समजावेत.

प्रतिष्ठादिनमारभ्य षोडशाह्नाच्च मध्यतः ॥
मण्डपोद्वासनं कुर्याद्विवाहे चेद्व्रतेष्वगम् (?) ॥ १८१ ॥

अर्थ— विवाहकार्यांत मंडपप्रतिष्ठा ज्या दिवशीं केली असेल त्या दिवसापासून सोळा दिवसांचे आंत मंडपाचें उद्वासन ( काढून टाकणें ) करावें.

॥ अथ विशेषः ॥

विवाहे दम्पती स्यातां त्रिरात्रं ब्रह्मचारिणौ ॥
अलंकृता वधूश्चैव सहशय्यासनाशनौ ॥ १७१ ॥
वध्वा सहैव कुर्वीत निवासं श्वशुरालये ॥
चतुर्थदिनमत्रैव केचिदेवं वदन्ति हि ॥ १७२ ॥

अर्थ—त्या वधूवरांनी विवाह झाल्यापासून तीन रात्रि होईपर्यंत ब्रह्मचर्यानें असावें. वधूच्या अंगावर अलंकार असावेत. त्यांनीं एका शय्येवर शयन करावें, एका आसनावर बसावें; आणि एकाच पात्रांत भोजन करावें. तसेंच वधूसह वरानें आपल्या श्वशुराच्याच घरांत रहावें. कित्येक ग्रंथकार "चवथ्या दिवशीं श्वशुराच्या घरीच वरानें रहावें" असें ह्मणतात.

चतुर्थीमध्ये जायन्ते दोषा यदि वरस्य चेत् ॥
दत्तामपि पुनर्दद्यात्पिताऽन्यस्मै विदुर्बुधाः ॥ १७३ ॥
प्रवरैक्यादिदोषाः स्युः पतिसङ्गादधो यदि ॥
दत्तामपि हरेद्दद्यादन्यस्मा इति केचन ॥ १७४ ॥

अर्थः— विवाह झाल्यापासून चवथ्या दिवशीचें कृत्य होण्याच्या पूर्वींच जर वराचे दोष समजतील

तर त्या वधूचें दान जरी झालें आहे, तथापि तिला पित्यानें पुनः दुसऱ्या वराला द्यावी; असें धर्मज्ञ मुनि मानतात. कित्येक धर्मज्ञाचें असें मत आहे, कीं, तिला पतिसमागम होण्याऱ्या पूर्वी जर तिच्या पित्याला जामातानें आणि आपलें प्रवर किंवा गोत्र एक असल्याचें ज्ञान होईल, तर त्यानें दान केलेली अशीही कन्या परत घेऊन दुसऱ्या वराला द्यावी.

कलौ तु पुनरुद्वाहं वर्जयेदिति गालवः ॥
कस्मिँश्चिद्देशे इच्छन्ति न तु सर्वत्र केचन ॥ १७५ ॥

अर्थः— कलियुगांत पुनर्विवाह करूं नये असें गालवमुनीचें मत आहे. परंतु, कित्येक देशांतील कितीएक लोक पुनर्विवाह करावा असें म्हणतात. तथापि सर्वत्र असें मत नाहीं.

वरे देशान्तरं प्राप्ते वर्षत्रीन् सम्प्रतीक्षते ॥
कन्याऽन्यस्मै प्रदातव्या वाग्दाने च कृते सति ॥ १७६ ॥

अर्थः— कन्येचें वाग्दान झाल्यानंतर जर वर देशांतरीं गेला तर त्याची तीन वर्षे वाट पहावी. नंतर वाग्दान जरी झालें आहे तथापि ती कन्या दुसऱ्या वराला द्यावी.

विवाहानन्तरं गच्छेत्सभार्यः स्वस्य मन्दिरम् ॥
यदि ग्रामान्तरे तत्स्यात्तत्र यानेन गम्यते ॥ १७७ ॥

विवाहात्प्रथमे पौपे त्वापाढे चाधिमासके ॥
न च भर्तुर्गृहे वासश्चैत्रे तातगृहे तथा ॥ १८२ ॥

अर्थ— विवाह झाल्यानंतर पहिल्यानें येणारा पौप, आपाढ आणि अधिकमास ह्या महिन्यांत वधूनें पतिगृहीं राहूं नये. आणि चैत्र महिन्यांत पित्याच्या घरीं राहूं नये.

विवाहाच्या अडचणी

लग्नप्रतिघातः ॥ कृते वाग्भिश्च सम्बन्धे पश्चान्मृत्युश्च गोत्रिणाम् ॥
यदा न मङ्गलं कार्यं नारीवैधव्यदं ध्रुवम् ॥ १८३ ॥

अर्थ— कन्येचें वाग्दान केल्यानंतर जर आपला एखादा गोत्रज मृत्यु पावला तर विवाह करूं नये. कारण, तसा विवाह केला असता कन्येला खचित वैधव्य प्राप्त होतें.

वरवध्वोः पिता माता पितृव्यश्च सहोदरः ॥
एतेपां मरणे मध्ये विवाहः क्रियते न हि ॥ १८४ ॥

अर्थ— विवाहनिश्चय झाल्यावर वर अथवा वधू ह्यांपैकीं कोणाचेही पिता, माता, चुलता आणि भ्राता ह्यांपैकीं कोणी मृत झाले असतां विवाह करूं नये.

पितुर्मातुश्च पत्न्याश्च वर्पमर्धं तदर्धकम् ॥

सूनोर्भ्रातुश्च मासार्धमन्येषां मासमात्रकम् ॥ १८५ ॥
तदन्ते शान्तिकं कृत्वा यथोक्तविधिना ततः ॥
पुनश्चोद्वाहेऽथ वाग्दानं कृत्वा लग्नं विधीयते ॥ १८६ ॥

अर्थ— पिता मृत झाला असतां एक वर्ष टाकावें. मातेला सहा महिने, पत्नीला तीन महिने, पुत्र आणि बंधु ह्यांना अर्धा महिना असा काल टाकून नंतर यथोक्त विधीनें शांतिकर्म करून पुनः वाग्दान वगैरे विधि करून विवाह करावा.

विवाहानंतर वर्ज्य कृत्ये

स्नानं सतैलं तिलमिश्रकर्म । प्रेतानुयानं करकप्रदानम् ॥
अपूर्वतीर्थामरदर्शनं च । विवर्जयेन्मङ्गलतोऽब्दमेकम् ॥ १८७ ॥

अर्थ— तेल लावून स्नान करणें, ज्या कर्मांत तिळांचा उपयोग होतो तें कर्म करणें, प्रेताच्या मागून जाणें, मातीची घागर दान करणें, पूर्वी न पाहिलेलें तीर्थ अथवा देव ह्यांचें दर्शन घेणें हीं कृत्यें विवाहानंतर एक वर्ष वर्ज्य करावींत.

ऊर्ध्वं विवाहात्तनयस्य नैव । कार्यो विवाहो दुहितुः समार्धम् ॥
अप्राप्य कन्यां श्वशुरालयं च । वधूप्रवेशश्च गृहे न चादौ ॥ १८८ ॥

अर्थ— पुत्राच्या विवाहानंतर सहा महिन्याच्या आंत कन्येचा विवाह करूं नये. आणि कन्येला श्वशुर-गृहीं पाठविल्यावांचून स्नुषेला आपल्या घरीं आणूं नये. ह्मणजे कन्येचा विवाह केल्यावांचून सहा महि-न्याच्या आंत पुत्राचा विवाह करूं नये.

एकोदरप्रसूतानामेकस्मिन्नेव वत्सरे ॥
न कुर्याच्चौलकर्माणि विवाहं चोपनायनम् ॥ १८९ ॥

अर्थ— एका मातेच्या उदरांतून उत्पन्न झालेल्या दोघां बंधूंचीं चौलादि कर्मे व विवाह आणि उपनयन हीं कर्मे एकाच वर्षांत करूं नयेत.

न पुंविवाहोर्ध्वमृतुत्रयेऽपि । विवाहकार्यं दुहितुश्च कुर्यात् ॥
न मण्डनाच्चापि हि मुण्डनं च । गोत्रैकतायां यदि नाब्दमेकम् ॥ १९० ॥

अर्थ— पुरुषविवाहानंतर सहा महिन्यांच्या आंत कन्याविवाह करूं नये. तसेंच विवाह केल्यावर चौल, उपनयन वगैरे मुंडनकर्म एक वर्षाच्या आंत करूं नये.

वरील निषेधाचा अपवाद

फाल्गुने चेद्विवाहः स्याच्चैत्रे चैवोपनायनम् ॥
अब्दभेदाच्च कुर्वीत नर्तुत्रयविलम्बनम् ॥ १९१ ॥

अर्थ— जर फाल्गुन महिन्यांत विवाह झाला असेल तर त्या पुढें येणाऱ्या चैत्रांत संवत्सर बदलेल असल्यानें उपनयन करावें. अशा प्रसंगी सहा महिने घालविण्याचें कारण नाहीं.

एकमातृप्रसूतानां पुत्रीणां परिवेदने ॥
दोषः स्यात्सर्ववर्णेषु न दोषो भिन्नमातृषु ॥ १९२ ॥

अर्थ— एकमातेपासून उत्पन्न झालेल्या कन्यांमध्यें जर वडील मुलीचा विवाह करण्याच्या अगोदर कनिष्ठ मुलीचा विवाह केला तर दोष होतो. हा दोष कोणत्याही वर्णांत होतो. परंतु त्या कन्या जर भिन्नोदर ( दोन्ही मातांपासून उत्पन्न झालेल्या ) असतील तर मात्र दोष नाहीं.

॥ अथ कन्यारजोदोषः ॥

विवाहाच्या पूर्वी कन्या ऋतुमती झाली असतां

असंस्कृता तु या कन्या रजसा चेत्परिप्लुता ॥
भ्रातरः पितरस्तस्याः पतिता नरकालये ॥ १९३ ॥

अर्थ— विवाह संस्कार होण्याच्या पूर्वीं जी कन्या रजस्वला होईल तिचे मातापितर आणि बंधु नरकांत जातील.

पितुर्गेहे तु या कन्या रजः पश्येदसंस्कृता ॥

सा कन्या वृषली ज्ञेया तत्पतिर्वृषलीपतिः ॥ १९४ ॥

अर्थ— विवाहसंस्कार न झालेली कन्या जर पित्याच्या घरांत ऋतुमती होईल तर शूद्री होते, आणि तिच्याशीं जो कोणी विवाह करील तोही शूद्रीचा पति होतो. म्हणजे शूद्रासारखा होतो.

अथ द्वितीयविवाहः ॥

दुसऱ्या विवाहाबद्दल

अप्रजां दशमे वर्षे सप्रजां द्वादशे त्यजेत् ॥
मृतप्रजां पञ्चदशे सद्यस्त्वप्रियवादिनीम् ॥ १९५ ॥

अर्थ— जिला मुळींच संतति होत नाहीं ती ऋतुमती झाल्यापासून दहाव्या वर्षीच तिचा त्याग करावा. कन्यासंततीच होते तिचा बाराव्या वर्षी त्याग करावा. जिची संतति उत्पन्न होऊन मरते तिचा पंधराव्या वर्षी त्याग करावा, आणि अप्रिय भाषण करणाऱ्या स्त्रीचा तत्काल त्याग करावा.

दुसरें मत

व्याधिता स्त्रीप्रजा वन्ध्या ह्युन्मत्ता विगतार्तवा ॥
अदुष्टा लभते त्यागं तीर्थतो न तु धर्मतः ॥ १९६ ॥

अर्थ— अनिवार्य अशा व्याधीनें युक्त झालेली, जिला कन्यासंततीच होत आहे अशी, आपल्यापेक्षा

उत्तम कुलांत उत्पन्न झालेली, जिचा विटाळ बंद झाला आहे अशी आणि जिच्यामध्यें कोणताही दोष- अर्थात् पुत्रसंतति न होणें ह्यावांचून कोणताही दोष- नाहीं अशी स्त्री फक्त शास्त्रानें त्याज्य होते. धर्मकृत्यांत तिचा त्याग केला पाहिजे असें नाहीं.

सुरूपां सुप्रजां चैव सुभगामात्मनः प्रियाम् ॥
धर्मानुचारिणीं भार्यां न त्यजेद्गृहसत्पती ॥ १९७ ॥

अर्थ— सुरूप, जिला प्रजा चांगली होते आहे अशी, भाग्यशालिनी, आपल्याला प्रिय असलेली आणि धर्माचरण करणारी अशी जी स्त्री तिचा सद्गृहस्थानें केव्हांच त्याग करूं नये.

भार्या मृत झाल्यास विवाहाचा काल.

प्रमदामृतवत्सरादितः । पुनरुद्वाहविधिर्यदा भवेत् ॥
विषमे परिवत्सरे शुभः । समवर्षे तु मृतिप्रदो भवेत् ॥ १९८ ॥

अर्थ— पत्नी मृत झाल्यापासून दुसरा विवाह ज्यावेळीं होईल, त्यावेळीं तो विषम संवत्सरांत झाला असतां शुभ समजावा. आणि सम संवत्सरांत झाला असतां मृत्युदायक होतो.

दुसरें मत.

मतान्तरम्— पत्नीवियोगे प्रथमे च वर्षे । नो चेद्विवर्षे पुनरुद्वहेत्सः ॥

अयुग्ममासे तु शुभप्रदं स्यात् । श्रीगौतमाद्या मुनयो वदन्ति ॥ १९९ ॥

अर्थ— पत्नी मृत झाली असतां पहिल्या वर्षी किंवा दुसऱ्या वर्षी त्यानें पुनः विवाह करावा. तो विषम महिन्यांत केला असतां शुभकारक होतो; असें गौतमादि मुनिवर्यांचें मत आहे.

अपुत्रिणी मृता भार्या तस्य भर्तुर्विवाहकम् ॥
युग्माब्दे युग्ममासे वा विवाहाहः शुभो मतः ॥ २०० ॥

अर्थः— ज्याची पत्नी पुत्रवती नसून मृत झाली असेल त्यानें सम वर्षात व सममासांत जरी विवाह केला तरी त्याला तो विवाह शुभकर होतो.

प्रजावत्यां तु भार्यायां मृतायां वैश्यविप्रयोः ॥
प्रथमेऽब्दे न कर्तव्यो विवाहोऽशुभदो भवेत् ॥ २०१ ॥

अर्थः—पत्नी पुत्रवती असून जर मृत झाली असेल तर वैश्य आणि ब्राह्मण ह्यांनीं पहिल्या संवत्सरांत विवाह करूं नये. कारण तो विवाह त्याला कल्याणप्रद होत नाहीं.

तृतीयविवाह.

अथ तृतीयभार्या—अकृत्वाऽर्कविवाहं तु तृतीयां यदि चोद्वहेत् ॥
विधवा सा भवेत्कन्या तस्मात्कार्या विचक्षणा ॥ २०२ ॥

अर्थः—अर्कविवाह ( रुईच्या झाडाशीं विवाह ) केल्यावांचून जर कोणी मनुष्य तिसऱ्या भार्येशीं विवाह करील, तर ती कन्या विधवा होईल. म्हणून तिसऱ्या विवाहासंबंधानें फार विचार करावा.

अर्कविवाहविधी

अर्कसान्निध्यमागत्य कुर्यात्स्वस्त्यादिवाचनाम् ॥
अर्कस्याराधनां कृत्वा सूर्यं सम्प्रार्थ्य चोद्वहेत् ॥ २०३ ॥

अर्थः—रुईच्या झाडाजवळ येऊन स्वस्तिवाचन वगैरे विधि करून त्या अर्कवृक्षाची पूजा करावी. नंतर सूर्याची प्रार्थना करून त्या अर्कवृक्षाशीं विवाह करावा.

विवाहयुक्तिः कथिता समस्ता । संक्षेपतः श्रावकधर्ममार्गात् ॥
श्रीब्रह्मसूत्रप्रथितं पुराण- । मालोक्य भट्टारकसोमसेनैः २०४ ॥

अर्थः— भट्टारक सोमसेनमुनींनीं ब्रह्मसूत्र नांवानें प्रसिद्ध असलेलें पुराण अवलोकन करून श्रावकांच्या धर्ममार्गाला अनुसरून सर्व विवाहपद्धति संक्षेपानें सांगितली आहे.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपणे भट्टारकसोमसेनविरचिते
विवाहविधिवर्णनो नाम एकादशोऽध्यायः ॥ समाप्तः ॥

---

|| श्रीवीतरागाय नम ||

## द्वादशोऽध्यायः ||

अथ नत्वा क्रियावन्तं कर्मातीतं जिनेश्वरम् ||
क्रियाविशेष एतर्हि वच्म्यहं शास्त्रतोऽर्थतः || १ ||

अर्थ-- आतां क्रियावान् असूनही कर्मापासून मुक्त झालेल्या श्रीजिनेश्वराला नमस्कार करून श्रावकाची वर्णलाभ वगैरे क्रिया शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें मी सांगतों.

यस्य वर्णः सुवर्णाभो वर्णा येन विवर्णिताः ||
स कुन्थुनाथनामा च सार्वभौमास्थितोऽर्च्यते || २ ||

अर्थ- सुवर्णाप्रमाणें ज्याच्या शरीराचा वर्ण आहे व ज्यानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण ( जाति ) सांगितले आहेत. अशा आणि सार्वभौम ह्या पदवीवर असलेल्या श्रीकुंथुनाथाची मी पूजा करतो.

वर्णलाभ

इत्थं विवाहमुचितं समुपाश्रितस्य । गार्हस्थ्यमेकमनुतिष्ठत एव पुंसः ||
स्वीयस्य धर्मगुणसद्भावविवृद्धयेऽहं । वक्ष्ये विधानत इतो भुवि वर्णलाभम् || ३ ||

अर्थ— पूर्वी सांगितल्याप्रमाणें योग्य प्रकारे विवाहविधि करून गृहस्थधर्माचें आचरण करणाऱ्या जैनश्रावकच्या धर्म, सद्गुण आणि संघ ह्यांची वृद्धी होण्याकरितां मी येथून पुढें त्याची वर्णलाभ नांवाची क्रिया यथाविधि सांगतों.

स ऊढभार्योऽप्यकथीह ताव- । त्पुमान् पितुः सद्मनि चास्वतन्त्रः ॥
गार्हस्थ्यसिध्द्यर्थमतो ह्यमुष्य । विधीयते सम्प्रति वर्णलाभः ॥ ४ ॥

अर्थ— पुरुषानें भार्याग्रहण केल्यावरही आपल्या पित्याच्या घरीं त्याच्या परतंत्रतेनेंच असावें असें शास्त्रांत सांगितलें आहे. परंतु अशाने त्याच्या गृहस्थधर्माची सिद्धि होत नाहीं; ती व्हावी ह्मणून शास्त्रानेंच त्याची वर्णलाभ नांवाची क्रिया सांगितली आहे.

वर्णलाभाचे स्वरूप.

अनुज्ञया द्रव्यभृतः पितुः प्रभोः । सुखं परिप्राप्तधनान्नसम्पदः ॥
पृथक्कृतस्यात्र गृहस्थ वर्तनं । स्वशक्तिभाजोऽकथि वर्णलाभकः ॥ ५ ॥

अर्थ— घरांतील सर्वसंपत्ति ज्याच्या ताब्यांत आहे अशा पित्याच्या आज्ञेनें धन, धान्य वगैरे संपत्ति ज्याला मिळाली आहे, व पित्यानें ज्याला विभक्त केले आहे अशा स्वतः समर्थ झालेल्या पुरुषाचा जो गृहस्थधर्माचा आचार त्याला वर्णलाभ असें ह्मणतात.

विधाय सिद्धप्रतिमार्चनं च । क्रमेण कृत्वा परमानुपासकान् ॥
पिताऽस्य पुत्रस्य धनं समर्पये- । द्यथर्द्धि साक्षीकृतमुख्यसज्जनः ॥ ६ ॥

अर्थ— पित्यानें सिद्धप्रतिमेचें पूजन करून उपासकांचा यथायोग्य सत्कार करून गांवांतील संभावित गृहस्थाच्या साक्षीनें आपली संपत्ति ज्या मानानें असेल त्या मानानें विभाग करून त्या पुत्राच्या हिश्शाला येणारें द्रव्य त्याच्या ( पुत्राच्या ) स्वाधीन करावें.

धनं ह्युपादाय समस्तमेत- । त्स्थित्वा गृहे स्वस्य पृथग्यथास्वम् ॥
कार्यस्त्वया दानपुरस्सरोऽङ्ग । सुखाय साक्षात् गृहिधर्म एव ॥ ७ ॥
यथाऽस्मकाभिः सद्धर्ममर्जितं । यशोऽमल स्वस्य धनेन यत्नतः ॥
श्रियेऽथवाऽस्मत्पितृदत्तकेन वै । तथा यशो धर्ममुपार्जय त्वकम् ॥ ८ ॥
इत्येवमेतर्ह्यनुशिष्य चैनं । नियोजयेदुत्तमवर्णलाभे ॥
स चाप्यनुष्ठातुमिहार्हति स्वं । धर्मं सदाचारतयेति पूर्णम् ॥९॥ इति वर्णलाभः॥

अर्थ— ते द्रव्य पुत्राच्या स्वाधीन करावयाच्या वेळीं पित्यानें पुत्राला पुढीलप्रमाणें उपदेश करावा. "बाबारे! हें द्रव्य घेऊन तूं आपल्या घरांत निराळें स्वतंत्रपणें राहून पारलौकिक सुखाच्या प्राप्तीकरितां दान करून, गृहस्थाचा धर्मच चालवावा; आणि ज्याप्रमाणें आह्मी आमच्या पित्यानें दिलेल्या द्रव्याच्या

योगानें धर्म आणि निर्दोष कीर्ति संपादन केली, त्याप्रमाणे तूंही ह्या द्रव्याच्या योगानें धर्म आणि कीर्ति संपादन कर!! ” ह्याप्रमाणें मुलाला उपदेश करून तें द्रव्य त्याच्या स्वाधीन करून वर्णलाभक्रियेकडे त्याची योजना करावी, आणि त्यानें आपला गृहस्थधर्म सदाचारानें पाळावा. ही वर्णलाभक्रिया सांगितली.

कुलचर्या.

पूजा श्रीजिननायकस्य च गुरोः सेवाऽथवा पाठके(?)।
द्वेधा संयम एव सत्तप इतो दानं चतुर्धा परम् ॥
कर्माण्येव षडत्र तस्य विधिवत्सद्वर्णलाभं शुभं।
प्राप्तस्यैवमुशन्ति साधुकुलचर्यां साधवः सर्वतः ॥ १० ॥

अर्थ— आतां वर सांगितल्याप्रमाणें ज्याचा वर्णलाभक्रिया झालेली आहे त्याची कुलचर्या नांवाची क्रिया सांगतात. विधीप्रमाणें ज्याला वर्णलाभ झाला आहे त्या श्रावकानें श्रीजिनपूजा, गुरूची सेवा, स्वाध्याय, दोन प्रकारचा संयम, तप आणि चार प्रकारचे दान हीं षट्कर्मे यथाविधि करणें, ह्याला कुलचर्या असे ह्मणतात.

गृहेशिता

धर्मे दार्ढ्यमथोद्वहन् स्वकुलचर्यां प्राप्तवानञ्जसा।

शास्त्रेण क्रियया विवाहविधिना वृत्त्या च मन्त्रैः शुभैः ॥
स्वीकुर्याद्धि गृहेशितां स्वमनघं चौन्नत्यमेकं नयन् ।
नानाकाव्यकृतेन शुद्धयशसा लिप्सुर्यशः सुन्दरम् ॥११॥

अर्थ— आपल्या कुलांत चाललेले आचार चालविणारा व धर्माचे ठिकाणीं स्थिर बुद्धि ठेवून उत्तम कीर्ति होण्याची इच्छा करणारा असा जो हा श्रावक त्यानें शास्त्राभ्यास, विहितक्रिया, सदाचार आणि मंत्रपाठ इत्यादिकांच्या योगानें आपल्या घरांतील मंडळीमध्यें आपली निर्दोष अशी उन्नति संपादन करावी; त्यानें अनेक काव्यग्रंथ रचून शुद्ध यश संपादन करावें. यालाच गृहेशिता ह्मणतात.

प्रशांति

अथ प्रशान्तिः । लब्ध्वा सूनुमतोऽनुरूपमुचितं सोऽयं गुणानां गृहं ।
साक्षादात्मभरक्षमं शुभतया देदीप्यमानं सदा ॥
तत्रारोपितसद्गृहस्थपदवीभारः प्रशान्तिप्रियः ।
संसाराङ्गसुभोगनिःस्पृहमतिः स्वाध्यायदीपात्तपः ॥ १२ ॥

अर्थ— आतां प्रशांति नांवाची क्रिया सांगतात. श्रावकानें गृहेशितेचा लाभ करून घेतल्यावर आपल्याला शोभेल असा गुणवान् व शुभलक्षणांनीं सुशोभित असा पुत्र आपलें संसाराचें ओझें घेण्यास

समर्थ झाला म्हणजे त्याला आपली गार्हस्थ्यपदवी देऊन ( संसाराचें कृत्य त्याजकडे सोंपवून ) शास्त्राच्या विचारानें अंतःकरणास शांतीचें प्रेम उत्पन्न करून, संसारसुखाविषयीं निरिच्छ होणें ह्याला प्रशांति म्हणतात.

गृहत्याग

अथ गृहत्यागः। गृहाश्रमे स्वं बहुमन्यमानः। कृतार्थमेवोद्यतबुद्धिरास्ते ॥
त्यागे गृहस्यैष विधिः क्रियायाः। सिद्धार्थकानां पुरतो विधेयः ॥ १३ ॥
आहूय सर्वानपि सम्मतांश्च। तत्साक्षि पुत्राय निवेद्य सर्वम् ॥
गृहे न्यसेच्चापि कुलक्रमोऽयं। पाल्यस्त्वयाऽस्मत्कपरोक्षतोऽङ्ग ॥ १४ ॥
त्रिधा कृतं द्रव्यमिहेत्थमेत-। दस्माकमत्यर्थमतो नियोज्यम् ॥
धर्मस्य कार्याय तथांश एको। देयो द्वितीयः स्वगृहव्ययाय ॥ १५ ॥
परस्तृतीयः सहजन्मनां वा। समं विभागाय विचारणीयः ॥
पुनः समस्तस्य च संविभागे। पुत्रैः समस्त्वं सहसैवमुक्त्वा ॥ १६ ॥
ज्येष्ठः स्वयं सन्ततिमेकरूपा-। मस्माकमप्याददतूपनीय ॥
श्रुतस्य वृत्तेरथवा क्रियाया। मन्त्रस्य न्यासादिभिविस्त्वतन्द्रः ॥ १७ ॥
कुलस्य चाम्नाय इहानुपाल्यो। गुरुश्च देवोऽपि सदाऽर्चनीयः ॥

इत्येवमग्र्यं ह्यनुशिष्य पुत्रं । ज्येष्ठं त्यजेन्मोहकृतं विकारम् ॥ १८ ॥
दीक्षामुपादातुमतो जनोऽसौ । गृहं स्वकीयं स्वयमुत्सृजेच्च ॥
कामार्थचित्तं परिहाय धर्म- । ध्यानेन तिष्ठेत्कतिचिद्दिनानि ॥ १९ ॥

अर्थ— गृहस्थाश्रमांत आपण कृतार्थ झालों आहोंत अशी आपली मौढी ज्याला वास्तविक भासत असेल त्या श्रावकानें गृहाच्या त्यागाचा पुढील विधि सिद्धप्रतिमेच्या अग्रभागीं करावा. आपल्याला मान्य असलेल्या गांवांतील शिष्टमंडळींना बोलावून आणून त्यांच्या समक्ष आपल्या पुत्राला आपल्या घरांतील सर्व संपत्ति दाखवून घरांतच ठेवावी. आणि त्याला सांगावें कीं, बाबारे ! ही आमची कुलपरंपरेची वहिवाट आमच्या मागें देखील तूं चालवावी. ह्या सर्व द्रव्याचे तीन विभाग केलेले आहेत. त्यांतील एका विभागाची योजना धर्मकृत्याकडे कर; एक विभाग संसाराकडे खर्च कर ह्मणजे त्या विभागांतून तुझ्या बंधुभगिनींचें पोषण व त्यांचीं उपनयन विवाह वगैरे कृत्यें कर. आणि एक विभाग हा तुझ्या बंधूशीं सह तूं सारखा वाटून घे. तूं माझा ज्येष्ठपुत्र आहेस; ह्मणून तुझ्याशीं एकोप्यानें असलेल्या ह्या माझ्या संततीचें तूं रक्षण कर. तुला शास्त्र, उपजीविकेचें साधन, धर्मक्रिया आणि मंत्र हे सर्व मीं शिकविले असल्यानें तूं विधि समजणारा व उद्योगी आहेस; ह्मणून आमचा हा कुलाचार असाच पुढें चालीव. गुरु आणि देव ह्यांची पूजा कर! ह्याप्रमाणें ज्येष्ठपुत्राला उपदेश करून श्रावकानें आपल्या अंतःकरणांतील मोह

सोडून द्यावा. आणि दीक्षा घेण्याकरितां त्यानें आपलें घर सोडून अर्थ काम ह्यांचें चिंतन न करतां धर्मध्यानांत कांहीं दिवस घालवावेत. हा गृहत्यागाचा विधि सांगितला.

दीक्षाविधि.

अथ दीक्षा । किञ्चित्समालोक्य सुकारणं त- । द्वैराग्यभावेन गृहान्निसृत्य ॥
गुरोः समीपं भवतारकस्य । व्रजेच्छिवाशाकृतचित्त एकः ॥ २० ॥
नत्वा गुरुं भावविशुद्धबुध्या । प्रयाय दीक्षां जिनमार्गगां सः ॥
पूजां विधायात्र गुरोर्मुखाच्च । कुर्याद्व्रतानि प्रथितानि यानि ॥ २१ ॥

अर्थ— वैराग्याला कांहींतरी कारण दिसल्याबरोबर विरक्त होऊन गृहत्याग केलेल्या श्रावकानें एकट्यानेंच मोक्षाबद्दल इच्छा धरून संसारांतून तारून नेणाऱ्या गुरूकडे गमन करावें. नंतर त्या गुरूला शुद्धभावनेनें नमस्कार करून त्याच्याकडून श्रीजिनांनीं सांगितलेली दीक्षा घ्यावी. मग गुरूची पूजा करून त्याच्या मुखांतून व्रतें श्रवण करून तीं करावीत.

दीक्षा घेतल्यानतरचीं कर्तव्ये.

महाव्रतानि पञ्चैव तथा समितयः शुभाः ॥
गुप्तयस्तिस्र इत्येवं चारित्रं तु त्रयोदश ॥ २२ ॥

हिंसासत्याङ्गनासङ्गस्तेयपरिग्रहाच्च्युतः ॥
व्रतानि पञ्चसंख्यानि साक्षान्मोक्षसुखासये ॥ २३ ॥
ईर्याभाषैषणादाननिक्षेपमलमोचनाः ॥
पञ्च समितयः प्रोक्ता व्रतानां मलशोधिकाः ॥ २४ ॥

अर्थः— पांच महा व्रतें, पांच समिति आणि तीन गुप्ति अशा प्रकारें चारित्र तेरा प्रकारचें आहे. त्यांत अहिंसा, सत्य, ब्रह्मचर्य, अचौर्य आणि परिग्रहत्याग हीं पांच महाव्रतें होत. हीं व्रतें साक्षात् मोक्षसुख देणारीं असल्यानें अवश्य केलीं पाहिजेत. तसेंच ईर्यासमिति, भाषासमिति, एषणासमिति, आदाननिक्षेपसमिति आणि उत्सर्गसमिति अशा पांच समिति आहेत

युगान्तरदृष्टितोऽग्रे गच्छेदीर्यापथे प्रभुः ॥
भाषा विचार्य वक्तव्या वस्तु ग्राह्यं निरीक्ष्य च ॥ २५ ॥
प्रासुका भुज्यते भुक्तिर्निर्जन्तौ मुच्यते मलः ॥
समितयश्च पञ्चैता यतीनां व्रतशुद्धये ॥ २६ ॥

अर्थ— चालतांना पुढें चार हातापर्यंतच नजर देऊन चालणें ह्याला ईर्यासमिति म्हणतात. विचार करून बोलणें ह्याला भाषासमिति म्हणतात. कोणतीही वस्तु नीट पाहून घेणें व ठेवणें ह्याला आदाननिक्षेप-

समिति ह्मणतात. प्रासुक भोजन करणें ह्याला एषणासमिति ह्मणतात. आणि जंतु नसलेल्या प्रदेशांत मलोत्सर्ग करणे ह्याला उत्सर्गसमिति ह्मणतात. ह्या पांचही समिति यतीच्या व्रताच्या शुद्धीला साधनीभूत आहेत. ह्मणून यतींनें समितींचें रक्षण अवश्य केलेच पाहिजे.

गुप्ति आणि तप ह्याचे प्रकार.

यत्नेन परिरक्षेत मनोवाक्कायगुप्तयः ॥
द्वादशधा तपः प्रोक्तं कर्मशत्रुविनाशकम् ॥ २७ ॥
अनशनावमोदर्यं तृतीयं वस्तुसंख्यकम् ॥
रसत्यागं पृथक्शय्याऽऽसनं भवति पञ्चमम् ॥ २८ ॥
कायक्लेशं भवेच्छष्ठं षोढा बाह्यतपः स्मृतम् ॥
विनयः प्रायश्चित्ताख्यं वैयावृत्यं तृतीयकम् ॥ २९ ॥
कायोत्सर्गं तथा ध्यानं षष्ठं स्वाध्यायनामकम् ॥
अभ्यन्तरमिति ज्ञेयमेवं द्वादशधा तपः ॥ ३० ॥

अर्थः— मनोगुप्ति, कायगुप्ति आणि वचनगुप्ति अशी गुप्ति तीन प्रकारची आहे. तिचें रक्षणही यतीनें फार प्रयत्नाने करावे. तप बारा प्रकारचें आहे. त्यात अनशन, अवमोदर्य, वस्तुसंख्या, रसत्याग, पृथ-

कृशय्यासन आणि कायक्लेश हें सहा प्रकारचें बाह्यतप आहे आणि विनय, प्रायश्चित्त, वैयावृत्य, कायोत्सर्ग, ध्यान आणि स्वाध्याय असें सहा प्रकारचें आंतरतप आहे. हें तप कर्मशत्रूचा नाश करणारें आहे.

वृद्ध्यर्थं तपसां साध्याः क्षुधादिकपरीषहाः ॥
क्षुत्तृट्शीतोष्णदंशाश्च रत्यरती च नग्नता ॥ ३१ ॥
नारी चर्या निषद्या च शय्याक्रोशवधास्तथा ॥
याच्ञालाभतृणस्पर्शा मलरोगाविति द्वयम् ॥ ३२ ॥
सत्कारश्च पुरस्कारः प्रज्ञा ज्ञानमदर्शनम् ॥
एते द्वाविंशतिर्ज्ञेयाः परीषहा अघच्छिदः ॥ ३ ॥

अर्थ--- तपाच्या वृद्धीकरितां परीषह जिंकले पाहिजेत. ते परीषह क्षुधा, तृषा, शीत, उष्ण, दंश, अरति, नग्नता, स्त्री, चर्या, निषद्या, शय्या, आक्रोश, वध, याचना, अलाभ, तृणस्पर्श, मल, रोग, सत्कार-पुरस्कार, प्रज्ञा, अज्ञान आणि अदर्शन असे बावीस आहेत. त्यांचा जय केल्यानें पातकाचा नाश होतो.

यतीचे मूलगुण.

अष्टाविंशतिसंख्याता मूलगुणाश्च योगिनः ॥
व्रतसमितीन्द्रियनिरोधाः पृथक् ते पञ्चपञ्चधा ॥ ३४ ॥

षडावश्यकका लोचोऽदन्तवणमचेलता ॥
स्थितिभोजनं भूशय्या अस्नानमेकभोजनम् ॥ ३५ ॥

अर्थ— यतीचे मूलगुण अठ्ठावीस आहेत. ते असे— व्रतें पांच, समिति पांच, इंद्रियनिग्रह पांच, आवश्यक सहा, लोच, अदंतधावन, अचेलता ( वस्त्र नसणें ), स्थितिभोजन उभे राहून जेवणें, भूमीवर निजणें, अस्नान आणि एकभोजन.

षडावश्यकें.

सामयिकं तनूत्सर्गः स्तवनं वन्दनास्तुतिः ॥
प्रतिक्रमश्च स्वाध्यायः षडावश्यकमुच्यते ॥ ३६ ॥

अर्थ— सामयिक, कायोत्सर्ग, स्तवन, वंदनास्तुति, प्रतिक्रमण आणि स्वाध्याय हीं सहा आवश्यकें ( अवश्य करण्याचीं कर्में ) होत.

यतीचा व्यवहार

सर्वैः सह क्षमा कार्या दुर्जनैः सज्जनैरपि ॥
मृदुत्वं सर्वजीवेषु मार्दव कृपयान्वितम् ॥ ३७ ॥
कपटो न हि कर्तव्यः शत्रुमित्रजनादिषु ॥

दयाहेतुवचो वाच्यं सत्यरूपं यथार्थकम् ॥ ३८ ॥

अर्थः— यतीनें सज्जन किंवा दुर्जन ह्यांच्यावर सर्वदा क्षमा करावी. सर्व जीवांशी दयेनें मृदु वर्तन ठेवावें. शत्रु आणि मित्र ह्या दोघांबद्दलही कपट करूं नये. कोणाशीं बोलावयाचें झाल्यास दयेनें जें खरें असेल तेंच बोलावें.

यतीचा दहा प्रकारचा धर्म

देवपूजादिकार्यार्थं विधेयं शौचमुत्तमम् ॥
पञ्चेन्द्रियनिरोधो यो दयाधर्मस्तु संयमः ॥ ३९ ॥
द्वादशभेदभिन्नं हि शरीरशोषकं तपः
विद्यादिदानं पात्रेभ्यो दत्तं चेत्त्याग उच्यते ॥ ४० ॥
बाह्यान्तर्भेदसंयुक्तं परिग्रहं परित्यजेत् ॥
सर्वस्त्री जननीतुल्या ब्रह्मचर्यं भवेदिति ॥ ४१ ॥
दशलक्षणधर्मोऽयं मुनीनां मुक्तिदायकः ॥
निश्चयव्यवहाराभ्यां द्विविधोऽपि जिनागमे ॥ ४२ ॥

अर्थः— देवपूजादि कर्माकरितां उत्कृष्ट शुद्धता ठेवणें, पांचही इंद्रियांचा निग्रह करणें, सर्वांवर दया

करणे, संयम पाळणे, शरीराला शुष्क करणारे असे बारा प्रकारचें तप करणें, विद्या शिकविणे, सत्पात्राला दान करणें, अंतःपरिग्रहाचा त्याग करणें, बाह्यपरिग्रहाचा त्याग करणें, आणि सर्व स्त्रियांना मातेप्रमाणें समजणें ह्मणजे ब्रह्मचर्य पाळणें ह्या दहा लक्षणांनी युक्त असलेला आणि जिनागमात निश्चयनय व व्यवहारनय ह्या दोन नयांच्या अपेक्षेनें सांगितलेला जो धर्म, तो यतीनां मोक्षप्राप्ति करून देणारा आहे.

पाच आचार आणि आचार्यांचे छत्तीस गुण

सम्यक्त्वं निर्मलं यत्र दर्शनाचार उच्यते ॥<br>
द्वादशाङ्गश्रुताभ्यासो ज्ञानाचारः प्रकीर्तितः ॥ ४३ ॥<br>
सुनिर्मलं तपो यत्र तपआचार एव सः ॥<br>
तपस्तु क्रियते शक्तिर्वीर्याचार इति स्मृतः ॥ ४४ ॥<br>
चारित्रं निर्मलं यत्र चारित्राचार उत्तमः ॥<br>
पञ्चाचार इति प्रोक्तो मुनीनां नायकैः परः ॥ ४५ ॥<br>
द्वादशधा तपोभेदा आवश्यकाः परे हि षट् ॥<br>
पञ्चाचारा दश धर्मास्तिस्रः शुद्धाश्च गुप्तयः ॥ ४६ ॥<br>
आचार्याणां गुणाः प्रोक्ताः षट्त्रिंशच्छिवदायकाः ॥

द्वात्रिंशदन्तरायाः स्युर्मुनीनां भोजने मताः ॥ ४७ ॥

अर्थ— दर्शनाचार, ज्ञानाचार, तपआचार, वीर्याचार आणि चारित्राचार असा पांच प्रकारचा आचार आहे. निर्दोष अशा सम्यक्त्वास दर्शनाचार ह्मणतात. द्वादशांग श्रुताच्या अभ्यासाला ज्ञानाचार ह्मणतात. निर्मल तपाला तपाचार ह्मणतात. तप करण्याविषयीं जी शक्ति तिला वीर्याचार ह्मणतात. आणि निर्दोष अशा चारित्राला चारित्राचार ह्मणतात. बारा तपश्चर्या, सहा आवश्यक, पांच आचार, दहा धर्म, आणि तीन शुद्ध अशा गुप्ति हे छत्तीस आचार्यांचे गुण समजावेत. पुढें मुनीच्या भोजनाचे बत्तीस अंतराय सांगतात.

यतीचे भोजनांतराय.

मौनत्यागे शिरस्ताडे मार्गे हि पतिते स्वयम् ॥ मांसामेध्यास्थिरक्ता-
दिसंस्पृष्टे शवदर्शने ॥ ४८ ॥ ग्रामदाहे महायुद्धे शुना दष्टे त्विदं पथि
॥ सचित्तोदे करे क्षिप्ते शङ्कायां मलमूत्रयोः ॥ ४९ ॥ शोणितमांसच-
र्मास्थिरोमविट्पूयमूत्रके ॥ दलनं कुट्टनं छर्दिर्दीपप्रध्वंसदर्शने ॥ ५० ॥
ओतौ स्पृष्टे च नग्नस्त्रीदर्शने मृतजन्तुके ॥ अस्पृश्यस्य ध्वनौ मृत्युवाद्ये
दुष्टविरोदने ॥ ५१ ॥ कर्कशाक्रन्ददुःशब्दे शुनकस्य ध्वनौ श्रुते ॥ हस्त-

मुक्ते व्रते भग्ने भाजने पतितेऽथवा ॥ ५२ ॥ पादयोश्च गते मध्ये मार्जा-
रमूषकादिके ॥ अस्थ्यादिमलमिश्रान्ने सचित्तवस्तुभोजने ॥ ५३ ॥
आर्तरौद्रादिदुर्ध्याने कामचेष्टोद्भवेऽपिच ॥ उपविष्टे पद्ग्लानात्पतने
स्वस्य मूर्च्छया ॥ ५४ ॥ हस्ताच्च्युते तथा ग्रासेऽव्रतिनःस्पर्शने सति ॥
इदं मांसेति सङ्कल्पेऽन्तरायाश्च मुनेः परे ॥ ५५ ॥

अर्थ— मस्तकावर कसलाही प्रहार झाल्यामुळे मौन सोडणें, आपण रस्त्यांत अडखळून पडणें; मांस, अपवित्र वस्तु, हाड किंवा रक्त ह्यांचा स्पर्श होणें; प्रेत दिसणें, गांवात आग लागणें, भयंकर युद्ध होणे, मार्गांत कुत्र्यानें आपल्याला दंश करणें, न गाळलेल्या पाण्याचा स्पर्श होणें, भोजनकाली आपल्याला मलमूत्राचा संशय उत्पन्न होणें; रक्त, मांस, चर्म, अस्थि, केश, विष्ठा, पू, मूत्र ह्या पदार्थांचा स्पर्श होणें; ज्या घरांत भोजन करावयाचें त्या घरांत भोजनाच्या वेळी कोणी दळूं लागणें किंवा कांडूं लागणें, आपल्यास ओकारी येणें किंवा दुसरें कोणी ओकत असलेलें दिसणें, भोजन करताना दिवा विझणें, मांजराचा स्पर्श होणें, नग्नस्त्री दिसणें, कोणी जीवजंतु मरणें, अस्पृश्य मनुष्याचा शब्द कानावर पडणें, मृत्युवाद्याचा शब्द ऐकणें, कोणी रडलेलें ऐकूं येणें, कर्कश ओरडणे किंवा दुष्ट शब्द ऐकूं येणें, कुत्र्याचा शब्द ऐकणें, हात सुटणें, व्रतभंग होणें, भाडें पडणें, मांजर उंदीर वगैरे जीव पायांमधून जाणें, अन्नांत अस्थि किंवा केर असणें, सचित्तवस्तु

( न वाळलेले भाजी वगैरे पदार्थ ) भोजनात असणें, आर्त किंवा रौद्र अशा प्रकारचें चिंतन होणें, कामचेष्टा उत्पन्न होणें, एकाएकी अशक्तपणा आल्यामुळें खालीं बसणें किंवा मूर्च्छा येऊन पडणें, हातांतून घास गळणें, अव्रती मनुष्याचा स्पर्श होणें, हें मांस असावें असें आपल्यास वाटणें, हे बत्तीस-मुनीच्या भोजनाचे-अंतराय आहेत. ह्यापैकीं कोणताही अंतराय झाला असता मुनीनें भोजनाचा त्याग करावा.

ह्याविषयीं दुसरें मत.

मतान्तरम् ॥ विण्मूत्राजिनरक्तमांसमदिरापूयास्थिवान्तीक्षणा- ॥
दस्पृश्यान्त्यजभाषणश्रवणतास्वग्रामदाहेक्षणात् ॥
प्रत्याख्याननिषेवणात्परिहरेद्भव्यो व्रती भोजनेऽ ।
प्याहारं मृतजन्तुकेशकलितं जैनागमोक्तक्रमम् ॥ ५६ ॥

अर्थ— आता ह्या भोजनांतरायाविषयीं दुसरें मत सांगतात. विष्ठा, मूत्र, चर्म, रक्त, मांस, मद्य, पू, अस्थि आणि वांति ह्यापैकीं कोणताही जिन्नस भोजनाच्या जागीं दिसणें, अंत्यजादिकांचा शब्द ऐकूं येणें, आपण ज्या गांवात रहातो त्या गांवाला आग लागणे, ज्या पदार्थाचा त्याग केला आहे ते पदार्थ भोजनांत असणें, आणि अन्नात मेलेला जीव किंवा केश सांपडणे हे यतीच्या भोजनाचे अंतराय समजावेत. ह्यापैकीं कोणतीही गोष्ट घडली असता यतीनें भोजनाचा त्याग करावा.

तिसरे मत.

अन्यत्— कागा मेज्जा छद्दी रोहण रुहिरं च अंसुपादं च ॥
जण्हू हेठा परिसं जण्हूवरिवादिक्कमो चेव ॥ ५७ ॥

अर्थ— दुसऱ्यांचे मत सांगतात. यति भोजनाच्या निमित्ताने निघाला असतां त्याच्या मस्तकावर कावळा वगैरे पक्ष्यानें हगणें हा काकांतराय होय. यतीच्या पायाला अशुद्ध पदार्थाचा स्पर्श होणे हा अमेध्यांतराय होय. यतीला ओकारी येणे हा छर्दि नांवाचा अंतराय होय. यतीला मार्गांत कोणी अडविणे हा रोधनांतराय होय. आपल्या अंगांतून अथवा दुसऱ्याच्या अंगांतून रक्त आलेलें दृष्टी पडणें हा रुधिरांतराय होय. आपल्या नेत्रांतून अश्रु येणे किंवा दुसऱ्याच्या नेत्रांतून आलेले पाहणे हा अश्रुपातांतराय होय. यतीच्या गुडघ्याच्या खालीं स्पर्श होणें हा जान्वधःपरामर्श नांवाचा अंतराय होय. गुडघ्यांच्या वर स्पर्श होणें हा जानूपरिव्यतिक्रम नावाचा अंतराय होय.

णाहिअहोणिग्गमणं पच्चक्खिदसेवणा य जंतुवहो ॥
कागादिपिंडहरणं पाणीदो पिंडपडणं च ॥ ५८ ॥

अर्थ— यतीने श्रावकाच्या घरांत प्रवेश करतांना दार लहान असल्यामुळें नाभीच्या खालीं डोकें जाईल इतके वाकून प्रवेश करणें हा नाभ्यधोनिर्गमन नावाचा अंतराय होय. ज्या वस्तूचा

त्याग केला असेल ती वस्तु खाण्यात येणें हा स्वमत्याख्यातसेवन नावाचा अंतराय होय. आपल्या समक्ष एखाद्या जीवाचा वध होणें हा जीववध नांवाचा अंतराय होय. कावळा वगैरे पक्ष्यानें हातांतून घास घेऊन जाणें हा काकादिपिंडहरण नामक अंतराय होय. भोजन करीत असतां यतीच्या हातांतून घास गळून पडणें हा पिंडपतन नांवाचा अंतराय होय.

पाणिये जंतुवहे मंसादिदंसणे य उवसग्गे ॥
पादंतरपंचिंदिय संपादो भायणाणं पि ॥ ५९ ॥

अर्थ— भोजन करीत असतां यतीच्या हातांत एखाद्या जंतूचा वध होणें, हा पाणिजंतुवध नावाचा अंतराय होय. मांस वगैरे पदार्थ दिसणें हा मांसादिदर्शनांतराय होय. यतीला देवमनुष्यादिकांपासून पीडा होणें हा उपसर्गनामक अंतराय होय. यतीच्या दोनी पायांच्या मधून एखादा पंचेंद्रियजीव (उंदिर मांजर वगैरे) जाणें हा पंचेंद्रियगमन नांवाचा अंतराय होय. भोजन देत असलेल्या श्रावकाच्या हातांतून भोजनपात्र पडणें हा भाजनसंपातांतराय होय.

उच्चारं पस्सवणं अभोज्जगिहपवेसणं तहा पडणं ॥
उववेसणं च दंसो भूमीसंफासु णिट्ठिवणं ॥ ६० ॥

अर्थ— भोजन चाललें असतां रोगादिकांमुळें यतीला शौचास होणें हा उच्चार नांवाचा अंतराय होय.

लघ्वी होणें हा प्रस्रवणांतराय होय. ज्याच्या घरांत भोजन करावयाचें नाहीं त्याच्या घरांत न समजून यतीनें जाणें हा अभोज्यगेहप्रवेश नामक अंतराय होय. यतीनें मूर्छा येऊन पडणें हा पतनांतराय होय. यतीनें भोजन करतांनां बसणें हा उपवेशन नामक अंतराय होय. त्याला श्वानादिकांचा दंश होणें हा दंश नामक अंतराय होय. सिद्धभक्ति झाल्यानंतर यतीचा हात भूमीला लागणे हा भूमिस्पर्श नामक अंतराय होय. यतीनें कफ, किंवा थुंकी भोजन करताना थुंकणें हा निष्ठीवनांतराय होय.

उदरकिमिणिग्गमणं अदत्तगहणं पहार गामदाहो य ॥
पादेण किंचिगहणं करेण किंचि वा भूमीदो ॥ ६१ ॥

अर्थ— भोजन करतांना यतीच्या उदरांतून एखादा कृमि निघणे हा कृमिनिर्गमन नांवाचा अंतराय होय. न दिलेला पदार्थ यतीनें खावयास घेणें हा अदत्तग्रहण नांवाचा अंतराय होय. यतीला शस्त्रादिकांचा प्रहार होणें हा शस्त्रप्रहार नांवाचा अंतराय होय. गावांत आग लागणें हा ग्रामदाह नांवाचा अंतराय होय. यतीनें पायानें भूमीवरील एखाद्या वस्तूचें ग्रहण करणें हा पादग्रहण नांवाचा अंतराय होय. हातानें भूमीवरील एखाद्या वस्तूचें ग्रहण करणें हा हस्तग्रहण नांवाचा अंतराय होय. असे हे बत्तीस अंतराय सांगितले.

चवदा मल

णहरोमजंतुअत्थिकणकुंडयपूयरुहिरमंसचम्माणि ॥

फुलकंदमूलबीया छिपणमला चोद्दसा होंति ॥ ६२ ॥

अर्थ— आतां अन्नांतील चवदा मल सांगतात. नखें, केश, जंतु, हाडें, कोंडा, मोड, पू, रक्त, मांस, चर्म, फूल, कंद, मूळ आणि बिया हे चवदा मल आहेत.

इत्येवं मिलित्वा सर्वे षट्चत्वारिंशदात्मकाः ॥
अन्तराया मुने रम्याः सर्वजीवदयावहाः ॥ ६३ ॥

अर्थ— हे सर्व मिळून शेचाळीस अंतराय होतात. हे अंतराय यतीनें सर्वजीवांवर दया उत्पन्न करणारे असल्यानें अवश्य पाळावेत.

भोजनांतरायाची उपेक्षा करणाऱ्याची निंदा

अन्तराया मता येषां न सन्ति ते तपस्विनः ॥
ज्ञेया भ्रष्टा दयातीताः श्वभ्रावासनिवासिनः ॥ ६४ ॥
येषां न सन्ति मूढानामन्तराया दुरात्मनाम् ॥
क धर्मः क दया तेषां क पावित्र्यं क शुद्धता ॥ ६५ ॥

अर्थ— ज्यांना अंतराय मान्य नाहींत ते तपस्वी भ्रष्ट निर्दय आणि नरकांत पडणारे समजावेत. ज्या दुष्ट आणि मूर्ख यतींना अंतराया पाळावयाचे नाहीत, त्यांना धर्म, दया, पवित्रता आणि शुद्धता कोठून असणार?

शौचमूलो भवेद्धर्मः सर्वजीवदयाप्रदः ॥
पवित्रत्वदयाभ्यां तु मोक्षमार्गः प्रवर्तते ॥ ६६ ॥

अर्थ— शुद्धता हे ज्याचें मूल आहे असा धर्म, सर्वजीवांविषयीं दया उत्पन्न करणारा होतो. ह्मणून शुद्धता आणि दया ह्या दोहोंन्या योगानें मोक्षमार्ग प्रवृत्त झाला आहे.

यतीचें भोजन

यथालब्धं तु मध्याह्ने प्रासुकं निर्मलं परम् ॥
भोक्तव्यं भोजनं देहधारणाय न भुक्तये ॥ ६७ ॥

अर्थ— मध्यान्हाच्या वेळी निर्जंतुक आणि अतिशय निर्मल असें अन्न जसलें मिळेल तसलें यतीनें देहधारण होण्याकरितां भक्षण करावें. भोजन करावयाचें ह्मणून नव्हे. तात्पर्य, यतीनें अन्नाची रुचि पहात बसूं नयें.

मनोवचनकायैश्च कृतकारितसम्मतैः ॥
नवधा दोषसंयुक्तं भोक्तुं योग्यं न सन्मुनेः ॥ ६८ ॥

अर्थ— मन, वचन आणि शरीर व त्या प्रत्येकाचें कृत, कारित, अनुमोदन ह्या नऊ प्रकारच्या दोषांनीं युक्त असलेलें अन्न चांगल्या यतीनें भक्षण करूं नये.

भिक्षावृत्ति.

मध्याह्नसमये योगे कृत्वा सामयिकं मुदा ॥
पूर्वस्यां तु जिनं नत्वा ह्याहारार्थं व्रजेच्छनैः ॥ ६९ ॥
पिच्छं कमण्डलुं वामहस्ते स्कन्धे तु दक्षिणम् ॥
हस्तं निधाय सन्दृष्ट्या स व्रजेच्छ्रावकालयम् ॥ ७० ॥
गत्वा गृहाङ्गणे तस्य तिष्ठेच्च मुनिरुत्तमः ॥
नमस्कारपदान्पंच नववारं जपेच्छुचिः ॥ ७१ ॥

अर्थ— मध्यान्हाचा समय प्राप्त झाला असतां संतोषानें सामायिक करून, पूर्व दिशेकडे श्रीजिनाला नमस्कार करून यतीनें आहाराकरितां हळू हळू निघावें. त्यानें पिंछि आणि कमंडलु डाव्या हातांत घेऊन उजवा हात खांद्यावर ठेवावा; आणि रस्त्यानें नीट पाहात श्रावकाच्या घरीं जावें. तेथें अंगणांत उभा राहून पंचनमस्कारपदांचा नऊ वेळ जप करावा. म्हणजे नऊ वेळा जप होईपर्यंत उभें रहावें.

भिक्षादानविधि.

तं दृष्ट्वा शीघ्रतो भक्त्या प्रतिगृह्णाति भाक्तिकः ॥
प्रासुकेन जलेनाङ्घ्री प्रक्षाल्य परिपूजयेत् ॥ ७२ ॥

अर्थ— त्या मुनीला पाहून भक्तिमान् श्रावकानें त्वरेनें येऊन निर्जंतुक अशा उदकानें यतीचे पाय धुवून त्याची पूजा करावी.

षट्चत्वारिंशद्दोषैश्च रहितं प्रासुकं वरम् ॥
गृह्णीयाद्भोजनं गात्रधारणं तपसेऽपि च ॥ ७३ ॥
दोषान् संक्षेपतो वक्ष्ये यथाम्नायं गुरोर्मुखात् ॥
दाता स्वर्गं व्रजेद्बोक्ता शिवसौख्याभिलाषुकः ॥ ७४ ॥

अर्थ— मग यतीनें शेचाळीस दोष ज्यांत नाहींत असें देहधारण करणारें अन्न तपश्चर्या होण्याकरितां भक्षण करावें. हे शेचाळीस दोष शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें व गुरूंच्या मुखांतून ऐकिल्याप्रमाणें मी सांगतों. कारण, हे दोष समजल्यानें अन्नदान करणाऱ्याच्या हातून ते घडणार नाहींत. आणि त्यामुळें त्याला स्वर्गप्राप्ति होईल.

अन्नाचे दोष

उद्देशं साधिकं पूति मिश्रं प्राभृतिकं बलिम् ॥
न्यस्तं प्रादुष्कृतं क्रीतं प्रामित्यं परिवर्तनम् ॥ ७५ ॥
निषिद्धाभिहितोद्भिन्ना आच्छाद्यं मालरोहणम् ॥

धात्रीभृत्यनिमित्तं च वन्याजीवातिक (?) तथा ॥ ७६ ॥
क्रोधो लोभः स्तुतिपूर्वं स्तुतिपश्चाच वैद्यकम् ॥
मानं माया तथा विद्या मन्त्रचूर्णं वशीकरम् ॥ ७७ ॥
शङ्कापिहितसंक्षिप्ता निक्षिप्तस्राविकौ तथा ॥
परिणतसाधारणदायकलिप्तमिश्रकाः ॥ ७८ ॥
अङ्गारधूमसंयोज्या अप्रमाणास्तथा त्विमे ॥
पञ्चत्वारिंशद्दोषास्तु ह्येषणाशुद्धिघातकाः ॥ ७९ ॥

अर्थ— १ उद्देश, २ साधिक, ३ पूति, ४ मिश्र, ५ प्राभृतिक, ६ वलि, ७ न्यस्त, ८ प्रादुष्कृत, ९ क्रीत, १० प्रामित्य, ११ परिवर्तन, १२ निपिद्ध, १३ अभिहित, १४ उद्भिन्न, १५ आच्छाद्य, १६ मालारोहण, १७ वार्ता, १८ भृत्य, १९ निमित्त २० वनीपक, २१ जीवनक २२ क्रोधपूर्व २३ लोभपूर्व, २४ स्तुतिपूर्व २५ स्तुतिपश्चात्, २६ वैद्यक, २७ मान, २८ माया, २९ विद्या, ३० मंत्र ३१ चूर्ण, ३२ वशीकरण, ३३ शंका, ३४ पिहित, ३५ संक्षिप्त, ३६ निक्षिप्त, ३७ स्राविक, ३८ अपरिणत, ३९ साधारण, ४० दायक, ४१ लिप्त, ४२ मिश्रक, ४३ अंगार, ४४ धूम, ४५ संयोज्य आणि ४६ अप्रमाण हे शेचाळीस दोष एषणाशुद्धीचा नाश करणारे आहेत. ह्या दोषांचे विवेचन क्रमाने करतात—

राहिलेलें अन्न देणें हा वलिदोष समजावा.

न्यस्तदोष.

सत्पात्रभाजनादन्नं स्थापितं चान्यभाजने ॥
न्यस्तदोषोऽयमुद्दिष्टः सद्भिरागमपारगैः ॥ ८६ ॥

अर्थ— ज्या भांड्यातील अन्न सत्पात्राला ( यतीला ) देण्याला योग्य असते अशा शुद्ध भाड्यांतून तें अन्न काढून दुसऱ्या भाड्यांत ठेवणें, हा न्यस्तदोष होय; असे आगमज्ञांनी सांगितलें आहे.

प्रादुष्किकदोष.

आहारभाजनादीनामन्यस्माच्च प्रदेशतः ॥
अन्यत्र नयनं दीपप्रज्वालनमतोऽपि च ॥ ८७ ॥
प्रादुष्किको मतो दोषो वर्जनीयः शुभार्थिभिः ॥

अर्थ— भोजनाचीं पात्रें ज्या जागीं मांडली असतील त्या जाग्यांतून ती पात्रें दुसऱ्या जाग्यांत उचलून नेणे आणि चागलें दिसण्याकरिता दिवा लावणें ह्याला प्रादुष्किक दोष ह्मणतात. कल्याणाची इच्छा करणाऱ्या दात्यानें हा दोष करूं नये.

क्रीतदोष.

स्वान्यद्रव्येण यद्भोज्यं सद्गृहीतं यदा भवेत् ॥ ८८ ॥
विद्यामन्त्रेण वा दत्तं तत्क्रीतं दोष इत्यसौ ॥

अर्थ— दुसऱ्याच्या द्रव्यानें ( दुसऱ्याकडून पैसे घेऊन खानावळी प्रमाणें ) जें अन्न तयार केलेलें असतें, किंवा विद्येच्या प्रभावानें अथवा मंत्रप्रभावानें जें अन्न तयार केलेलें असतें तें अन्न क्रीत दोषानें युक्त असें समजावें.

प्रामित्यदोष.

स्वकीयं परकीयं चेद्द्रव्यं यच्चेतनेतरत् ॥ ८९ ॥
दत्वाऽऽनयनं पात्रे प्रामित्यं दोष एव सः ॥

अर्थ— आपला किंवा दुसऱ्याचा कोणताही अचेतन पदार्थ तो देऊन अन्न आणणें आणि यतीला देणें हा प्रामित्यदोष समजावा.

परिवर्तनदोष.

स्वान्नं दत्वाऽन्यगेहाद्वा यदानीयोत्तमं शुभम् ॥ ९० ॥
अन्नं ह्यादीयतेऽत्यर्थं परिवर्तनमुच्यते ॥

अर्थ— आपल्या घरात तयार केलेलें अन्न देऊन दुसऱ्याच्या घरांतील चांगलें आणि पवित्र अन्न

आणणें ह्याला परिवर्तन दोष ह्मणतात.

निषिद्धदोष

मध्ये केनापि गृहिणा निषिद्धं भोजनादिकम् ॥ ९१ ॥
दातव्यं न मुनिभ्यश्च तथापि खलु गृह्यते ॥
स निषिद्धो महादोषः परिपाट्या प्रकीर्तितः ॥ ९२ ॥

अर्थ— मुनीला अन्नदान करण्याची इच्छा झाली असतां मध्येंच कोणीतरी गृहस्थानें " हें अन्न मुनीला देऊं नका " असा निषेध केल्यावरही तेंच अन्न मुनीला देण्याकरितां ठेवणें हा निषिद्ध नांवाचा महादोष आहे; असें परंपरेनें सांगत आले आहेत.

अभिहितदोष

यस्मात्कस्माद्विना पंक्त्या गृहादष्टमतः परम् ॥
आनीतं गृह्यते चान्नं तदेवाभिहितं मतम् ॥ ९३ ॥

अर्थ— यतीनें ह्या घरातून त्या घरांत अशा क्रमानें, नियमित घरें भिक्षा मागावयाची असतां मध्येंच क्रम सोडून नियमित घरांच्या पलीकडच्या घरीं ( आठ घरांच्या पुढच्या घरी ) जाऊन भिक्षा आणणें आणि तें अन्न भक्षण करणें, हा अभिहित नांवाचा दोष समजावा.

उद्भिन्नदोष.

घृतादिभोजनं सारं मुद्रितं कर्दमादिना ॥
उद्भिद्य दीयते दोष उद्भिन्नः परिपठ्यते ॥ ९४ ॥

अर्थ— तूप वगैरे भोजनांतील मुख्य पदार्थ, केरकचऱ्यानें मिश्रित झाले असतां त्यांतील केरकचरा काढून तें अन्न देणें, हा उद्भिन्न दोष होय.

आच्छाद्यदोष.

संयतान्परमान्दृष्ट्वा राजचोरादिभीतितः ॥
दानं ददाति स प्रोक्तो दोष आच्छाद्यनामकः ॥ ९५ ॥

अर्थ— उत्तम संयमी मुनींला पाहून राजा, चोर वगैरेंच्या भीतीनें दान देणें, कोणाला न समजेल अशा प्रकारें दान देणें हा आच्छाद्य नामक दोष होय.

मालारोहणदोष.

निःश्रेण्यादिकमारुह्य द्वितीयगृहभूमितः ॥
आदाय दीयते ह्यन्नं तन्मालारोहणं मतम् ॥ ९६ ॥

—शिडी वगैरेवर उभा राहून दुसऱ्या मजल्यांतून अन्न घेऊन यतीला देणें हा मालारोहण नांवाचा दोष होय.

धात्रीदोष.

गृहिणीमेव चोद्दिश्य यदुत्पादितमन्नकम् ॥
तद्धात्रीदोष इत्येषः कीर्तनीयो मनीषिभिः ॥ ९७ ॥

अर्थ— घरच्या मालकाच्या बायकोकरितां ह्मणून जें अन्न तयार केलेलें आहे, तें यतीला देण्यास घेतलें असतां धात्रीदोष होतो.

भृत्यदोष

स्वपरग्रामदेशादेरादेशं च निवेद्य च ॥
गृह्णाति किञ्चिदाहारं दोषस्तद्भृत्यसंज्ञकः ॥ ९८ ॥

अर्थ— यतीनें आपल्या गावांतील किंवा दुसऱ्या गांवांतील निरोप सांगून अन्न घेणें हा भृत्यदोष समजावा.

निमित्तदोष.

व्यञ्जनाङ्गस्वरच्छिन्नभौमान्तरिक्षलक्षणम् ॥
स्वप्नं चेत्यष्टानिमित्तं करोति तन्निमित्तकम् ॥ ९९ ॥

अर्थ— यतीनें व्यंजन, अग, स्वर, छिन्न, भौम, अंतरिक्ष आणि स्वप्न हीं आठ निमित्तें पाहून त्यांची फलें सांगून अन्न मिळविणें ह्यास निमित्तदोष ह्मणतात.

वनीपकदोष

पाखण्डिकृपणादीनामतिर्थीनां तु दानतः ॥
पुण्यं भवेदिति प्रोच्य अथाहरवनीपकम् ॥ १०० ॥

अर्थ— पाखंडी आणि कृपण अशा अतिथींना दान करण्यानें पुण्य होतें असें सांगून अन्न मिळविणें हा वनीपक दोष असें ह्मणतात.

जीवनकदोष

जातिः कुलं तपः शिल्पकर्म निर्दिश्य चात्मनः ॥
जीवनं कुरुतेऽत्यर्थं दोषो जीवनसञ्ज्ञकः ॥ १०१ ॥

अर्थ— यतीनें आपली जाति, कुल, तपश्चर्या आणि कसब लोकांना सांगून त्या महत्वावर अन्न मिळविणें ह्याला जीवनदोष ह्मणतात.

क्रोधदोष व लोभदोष.

क्रोधं कृत्वाऽशनं ग्राह्यं क्रोधदोषस्ततो मतः ॥
कश्चिल्लोभं प्रदर्श्याप्ति लोभदोषः स कथ्यते ॥ १०२ ॥

अर्थ— आपल्याला कोप आला आहे असें यतीनें लोकांना दाखवून त्याच्याकडून अन्न घेणें ह्याला

क्रोधदोष ह्मणतात. आणि लोकांना ' अमुक काम करून देतो ' असा लोभ दाखवून भोजन मिळविणें ह्याला लोभ दोष ह्मणतात.

स्तुतिपूर्वदोष व स्तुतिपश्चाद्दोष

त्वमिन्द्र चन्द्र इत्युक्त्वा भुक्तेऽन्नं स्तुतिदोषभाक् ॥
पूर्वं भुङ्क्ते स्तुयात्पश्चात्स्तुतिपश्चान्मलो मतः ॥ १०३ ॥

अर्थ-- अन्नदान करणाऱ्याची ' तूं इंद्र चंद्र आहेस " वगैरे स्तुति करून भोजन करणे ह्याला स्तुतिपूर्व-दोष ह्मणतात. आणि भोजन झाल्यावर दान करणाराची स्तुति करणें ह्याला स्तुतिपश्चात् दोष ह्मणतात.

वैद्यदोष, मानदोष व मायादोष

कृत्वा भेषजमत्यन्नं वैद्यदोषः स उच्यते ॥
आत्मपूजादिकं लोकान् प्रतिपाद्यातियत्नतः ॥ १०४ ॥
उदरं पूरयत्येव मानदोषो विधीयते ॥
मायां कृत्वाऽन्नमादत्ते मायादोषः प्रकीर्तितः ॥ १०५ ॥

अर्थ— औषध देऊन भोजन करणें ह्याला वैद्यदोष ह्मणतात. आपली पूजा केली पाहिजे असें लोकांना सांगून त्यांच्याकडून तसें करवून पोट भरणें ह्याला मानदोष ह्मणतात. कांहीं जादू वगैरे

करून यतीनें लोकाना भुलवून अन्न मिळविणे हा मायादोष होय.

विद्यादोष व मंत्रदोष.

कृत्वा विद्याचमत्कारं योऽस्ति विद्याख्यदोषकः ॥
मंत्रयन्त्रादिकं कृत्वा योऽस्ति वै मन्त्रदोषकः ॥ १०६ ॥

अर्थ— कांहीं विद्येचा चमत्कार दाखवून (बालग्रहावर तोडगा करून देणे वगैरे) भोजन करणे ह्याला विद्यादोष ह्मणतात. आणि मंत्र, यंत्र वगैरे करून भोजन मिळविणें ह्याला मंत्रदोष असें ह्मणतात.

चूर्णदोष व वशीकरणदोष

दत्वा चूर्णादिकं योऽस्ति चूर्णदोषः स इष्यते ॥
वशीकरणकं कृत्वा वशीकरणदोषकः ॥ १०७ ॥

अर्थ— लोकांना चूर्ण वगैरे (अंगारा वगैरे) देऊन भोजन करणें ह्याला चूर्णदोष ह्मणतात. वशीकरण करून देऊन भोजन करणें हा वशीकरण दोष होय.

शंकादोष व पिहितदोष.

असमदर्थं कृतं चान्नं न वा शङ्काख्यदोषकः ॥
साचित्तेनावृतं योत्ति पिहितो दोष उच्यते ॥ १०८ ॥

अर्थ— हें अन्न माझ्याकरितां केलें आहे किंवा नाहीं? अशा शंकेनें भोजन करणें हा शंकादोष होय. सचित्तवस्तूनें युक्त असलेलें अन्न भक्षण करणें हा पिहितदोष होय.

सक्षितदोष

स्निग्धेन वा स्वहस्तेन देयं वा भाजनेन वा ॥
संक्षिप्तदोषो निर्दिष्टो वर्जनीयो मनीषिभिः ॥ १०९ ॥

अर्थ— तैलादिकानें चिकट झालेल्या हातानें अथवा पात्रानें यतीला आहार देणे हा संक्षिप्त दोष होय. बुद्धिमान् लोकांनी ह्या दोषाचा त्याग करावा.

निक्षिप्तदोष.

सचित्तवारिभिर्यद्धि प्रसिच्यान्नं तु दीयते ॥
निक्षिप्तदोष इत्युक्तः सर्वथाऽऽगमवर्जितः ॥ ११० ॥

अर्थ— न गाळलेलें पाणी अन्नावर सिंपडून अन्न देणें हा निक्षिप्तदोष होय. हा दोष आगमांत त्याज्य ह्मणून सांगितला आहे.

स्रावितदोष.

घृततक्रादिकं चैव स्रवल्येवान्नकं बहु ॥

तदन्नं गृह्यतेऽत्यर्थं स्रावितो दोष उच्यते ॥ १११ ॥

अर्थ— ज्या अन्नांतून तूप, ताक वगैरे पुष्कळ गळत आहे तसलें अन्न फार भक्षण करणें हा स्रावित नांवाचा दोष होय.

अपरिणतदोष.

त्रिफलादिरजोभिश्च रसैश्चैव रसायनैः ॥
गृह्णात्यपरिणतं वै दोषोऽपरिणतः स्मृतः ॥ ११२ ॥

अर्थ— त्रिफला वगैरेंच्या चूर्णानीं किंवा रसानीं अथवा रसायनांनीं युक्त असलेलें अन्न भक्षण करणें हा अपरिणत नांवाचा दोष होय. कारण, ह्यातील त्रिफलाचूर्ण वगैरे पदार्थ शिजलेले नसतात.

साधारणदोष.

गीतनृत्यादिकं मार्गे कुर्वन्नानीय चान्नकम् ॥
गृहे यद्दीयते दोषः स साधारणसञ्ज्ञकः ॥ ११३ ॥

अर्थ— मार्गात गायन, नृत्य इत्यादिक व्यापार करून अन्न मिळवून घरीं आणून तें अन्न यतीला देणें हा साधारण नांवाचा दोष होय.

दायकदोष.

रोगी नपुंसकः कुष्ठी उच्चार मूत्रलिप्तकः ॥
गर्भिणी ऋतुमत्येव स्त्री ददात्यन्नमुत्तमम् ॥ ११४ ॥
आशौचाचारसंलीनः स दोषो दायकस्य वै ॥

अर्थ— रोगी, नपुंसक, कोड भरलेला, शौचास किंवा लघ्वीस जाऊन शुद्ध न होतां तसाच आलेला पुरुष, अथवा वरील लक्षणाची व गर्भिणी, रजस्वला अशी स्त्री, ह्यांनीं यतीला अन्न देणें, ह्यांत अशुचित्व गुप्त असल्यानें हा दायक नांवाचा अन्नदान करणाऱ्याचा दोष आहे.

लिप्तदोष.

अप्रासुकेन लिप्तेन हस्तेनैव विशेषतः ॥ ११५ ॥
भाजनेन ददात्यन्नं लिप्तदोषः स कीर्तितः ॥

अर्थ— निर्जतुक नव्हे अशा पदार्थानें लिप्त असलेल्या हातानें किंवा भांड्यानें अन्न देणें हा लिप्त दोष होय.

मिश्रदोष

आमपात्रादिके पात्रे सचित्तेनार्द्रं मिश्रितम् ॥ ११६ ॥
ददात्याहारकं भक्त्या मिश्रदोषः प्रकीर्तितः ॥

अर्थ— मातीच्या कच्च्या ( न भाजलेल्या ) पात्रातून सचित्त आणि आर्द्र ( सजीव आणि ओल्या )

अशा पदार्थांनीं मिसळलेलें अन्न यतीला देणें हा मिश्र दोष होय.

अगारदोष.

गृध्या यो मूर्च्छितं ह्यन्नं भुङ्क्ते चाङ्गारदोषकः ॥ ११७ ॥

अर्थ— फार क्षुधा लागल्यामुळें जीवजंतूंनीं मिश्र झालेलें किंवा आंबलेलें असें अन्न भक्षण करणें हा अंगारदोष ( उदरातील अग्नीचा दोष ) होय.

धूमदोष व संयोज्यदोष

भोज्याद्यलाभे दातारं निन्दन्नत्ति स धूमकः ॥
शीतमुष्णेन संयुक्तं दोषः संयोजनः स्मृतः ॥ ११८ ॥

अर्थ—आपणास आवडणारें अन्न न मिळाल्यामुळें दान करणाऱ्याची निंदा करीत भोजन करणें हा धूमक नांवाचा दोष होय, शीत व उष्ण असें अन्न मिसळून खाणें हा संयोजन नांवाचा दोष होय.

अप्रमाणकदोष.

प्रमाणतोऽन्नमत्यत्ति दोषश्चैषोऽप्रमाणकः ॥
इत्येवं कथिता दोषाः षट्चत्वारिंशदुक्तितः ॥ ११९ ॥
इत्येवं कथितो धर्मो मुनीनां मुक्तिसाधकः ॥

संक्षेपतो मया ग्रन्थे वर्णाचारप्रसङ्गतः ॥ १२० ॥

अर्थ— प्रमाणापेक्षा अधिक अन्न भक्षण करणें हा अप्रमाणक नांवाचा दोष होय. ह्याप्रमाणें हे शेचाळीस दोष सांगितले. अशाप्रकारें मुक्तिसाधक असा मुनींचा धर्म, त्रैवर्णिकांच्या आचारांत संक्षेपानें सांगितला.

आदौ श्रीवर्णलाभ. सुखकरकुलचर्या गृहाधीशता च ।
सर्वेभ्यश्च प्रशान्तिर्मनसि कृतगृहत्यागता वा सुदीक्षा ॥
अध्यायेऽस्मिन्गरिष्ठाः शिवसुखफलदा वर्णिता धर्मभेदा ।
ये कुर्वन्तीह भव्याः सुरनरपतिभिस्ते लभन्ते सुपूजाम् ॥ १२१ ॥

अर्थ— ह्या अध्यायांत प्रथम गृही श्रावकाची वर्णलाभ क्रिया सांगून नंतर कुलचर्या, गृहीशिता, सर्व-परिग्रहापासून अंतःकरणांत प्रशांति, गृहत्याग आणि दीक्षा ह्या भुक्तिमुक्ति देणाऱ्या श्रेष्ठ क्रिया सांगितल्या आहेत. ह्या क्रिया जे भव्यजीव करतात, ते स्वर्गातील इंद्र आणि पृथ्वीवरील सार्वभौम राजे ह्यांनीं देखील पूजा करण्याला योग्य असे होतात.

धर्मोपदेशं प्रवदन्ति सन्तो । धन्यास्तु ते ये सुचरन्ति भव्याः ॥
पूज्याः सुरैर्भूपतिभिश्च नित्यं । तेषां गुणान्वाञ्छति सोमसेनः ॥ १२२ ॥

अर्थ— साधु लोक धर्माचा उपदेश करतात. जे भव्यजीव त्या धर्माचें आचरण करतात ते देव आणि नृपति ह्यांनी निरंतर पूज्य असे होतात. ह्मणून श्रीसोमसेनमुनि त्या भव्यजीवांचे सद्गुण आपल्याला प्राप्त व्हावेत अशी इच्छा करीत आहे.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारनिरूपणे भट्टारकश्रीसोमसेन
विरचिते वर्णलाभादिपञ्चक्रियावर्णनो नाम
द्वादशोऽध्यायः समाप्तः

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

## ॥ त्रयोदशोऽध्यायः ॥

वन्दे तं शान्तिनाथं शिवसुखविधिदं सेवितं भव्यलोकै-।
रादौ चक्रेण राज्यं सकलभरतजं साधितं येन पुण्यात् ॥
पश्चाद्दीक्षां समादाय तु कलिलमलं छिन्नकं ध्यानचक्रैः।
शुद्धज्ञानेन भव्याः सुसमवसरणे बोधिता मोक्षहेतोः ॥ १ ॥

अर्थ— पूर्वार्जित पुण्यकर्मामुळे ज्यानें चक्ररत्नाच्या सहाय्यानें प्रथम सर्व भरतखंडाचे राज्य मिळविलें. नंतर दीक्षा घेऊन शुक्लध्यानरूपी चक्रानें ज्यानें संपूर्ण पातकांचा नाश केला, नंतर समवसरणसभेंत मोक्षप्राप्तीकरितां सर्व भव्यजीवांना ज्यानें शुद्धज्ञानाच्या योगानें उपदेश केला, तो भुक्तिमुक्ति आणि सदाचार देणारा व भव्यजीवांनी सेविलेला जो शांतिनाथ तीर्थंकर, त्याला मी नमस्कार करतों.

कर्मकलंकविमुक्तं मुक्तिश्रीवल्लभं गुणैर्युक्तम् ॥
सिद्धं नत्वा वक्ष्ये द्विधा स्फुटं सूतकाध्यायम् ॥ २ ॥

अर्थ— कर्मकलंकापासून मुक्त झालेल्या व मुक्तिलक्ष्मीचा प्रियपति आणि सद्गुणांनी युक्त असलेल्या श्रीसिद्धाला नमस्कार करून, मी सूतकाध्याय सांगतों.

क्षत्रियवैश्यविप्राणां सूतकाचरणं विना ॥
देवपूजादिकं कार्यं न स्यान्मोक्षप्रदायकम् ॥ ३ ॥

अर्थ— क्षत्रिय, वैश्य आणि ब्राह्मण ह्या त्रैवर्णिकांनीं आशौच पाळल्यावांचून त्यांचीं देवपूजादि धर्मकृत्यें त्यांना मोक्षप्रद होत नाहींत.

आशौचाचे प्रकार

सूतकं स्याच्चतुर्भेदमार्तवं सौतिकं तथा ॥
मार्तं तत्संगजं चेति तत्रार्तवं निगद्यते ॥ ४ ॥

अर्थ— आशौच हें ऋतुसंबंधी, प्रसूतिसंबंधी, मृत्युसंबंधी आणि अशुचि असलेल्या मनुष्याच्या संसर्गासंबंधी असें चार प्रकारचें आहे. त्यांत ऋतुसंबंधी आशौच प्रथम सांगतों.

ऋतूचे प्रकार.

रजः पुष्पं ऋतुश्चेति नामान्यस्यैव लोकतः ॥
द्विविधं तत्तु नारीणां प्राकृतं विकृतं भवेत् ॥ ५ ॥

प्राकृतं जायते स्त्रीणां मासे मासे स्वभावतः ॥
अकाले द्रव्यरोगाद्युद्रेकात्तु विकृतं मतम् ॥ ६ ॥

अर्थ— रज, पुष्प आणि ऋतु ही तीन स्त्रियांच्या विटाळाची नांवें लोकप्रसिद्ध आहेत. हा स्त्रियांचा ऋतु स्वाभाविक आणि विकृत (शरीरप्रकृतीत बिघाड झाल्यामुळें उत्पन्न होणारा) असा दोन प्रकारचा आहे. त्यांत महिन्यामहिन्यास स्वाभाविकपणें उत्पन्न होणारा ऋतु प्राकृत किंवा स्वाभाविक समजावा. आणि ऋतुकाली स्त्रियांच्या शरीरांतून जाणारे द्रव्य किंवा रोग ह्यांच्या आधिक्यामुळें उत्पन्न जो ऋतु तो विकृत समजावा.

अकालीं ऋतुस्राव

अकाले यदि चेत् स्त्रीणां तद्रजो नैव दुष्यति ॥
पञ्चाशद्वर्षादूर्ध्वं तु अकाल इति भाषितः ॥ ७ ॥

अर्थ— अकाली जर स्त्रीला रजोदर्शन होईल तर त्यांत कांहीं दोष (आशौच) नाहीं. पन्नास वर्षांच्या पुढे स्त्रियांचा अकाल समजावा; असें मुनींनी सांगितले आहे.

आशौच धरण्याचा प्रकार.

रजसो दर्शनात्स्त्रीणामाशौचं दिवसत्रयम् ॥

कालजे चार्धरात्राच्चेत्पूर्वं तत्कस्यचिन्मतम् ॥ ८ ॥
रात्रावेव समुत्पन्ने मृत्यौ रजसि सूतके ॥
पूर्वमेव दिनं ग्राह्यं यावन्नोदेति वै रविः ॥ ९ ॥
रात्रेः कुर्यात्रिभागं तु द्वौ भागौ पूर्ववासरे ॥
ऋतौ सूते मृते चैव ज्ञेयोऽन्त्यांशः परेऽहनि ॥ १० ॥

अर्थ— स्त्रियांना रजोदर्शन झाल्या दिवसापासून तीन दिवस अशुद्धपणा असतो. हें योग्य कालीं उत्पन्न होणाऱ्या ऋतुसंबधानें समजावें. रजोदर्शन जर मध्यरात्रीच्या पूर्वीं होईल तर पूर्वीचा दिवस धरावा असें एक मत आहे. मृत्यु, ऋतु आणि प्रसूति ह्या गोष्टी रात्री सूर्योदय होईपर्यंत केव्हांही झाल्यास पूर्वीचाच दिवस धरावा असें दुसरें एक मत आहे. आणि रात्रीचे तीन भाग करून पहिले दोन भाग पूर्व दिवसांत धरावेत आणि तिसरा भाग पुढच्या दिवसांत धरावा असेही एक मत आहे. ह्यांत ज्या देशांत जशी रूढी असेल तसें त्यांनी ग्रहण करावें. तीनही प्रकार शास्त्रोक्त असल्यानें कोणताही स्वीकारल्यास दोष नाही.

योग्यकालावाचून मध्येच स्त्री ऋतुमती झाल्यास.

ऋतुकाले व्यतीते तु यदि नारी रजस्वला ॥

तत्र स्नानेन शुद्धिः स्यादष्टादशदिनात्पुरा ॥ ११ ॥

अर्थ— योग्यकाळीं स्त्री ऋतुमती होऊन तो काल गेल्यावर पुढें अठरा दिवसांच्या आंत पुनः ऋतुमती झाल्यास ती नुसत्या स्नानानें शुद्ध होते. तीन दिवस अशुद्ध रहाण्याचें कारण नाहीं.

दिनाचेत् षोडशादर्वाङ्नारी या चातियौवना ॥
पुना रजस्वलाऽपि स्याच्छुद्धिः स्नानेन केचन ॥ १२ ॥

अर्थ— तारुण्य उत्कट असल्यामुळें जर स्त्री सोळा दिवसांच्या आंत पुनः ऋतुमती झाली तर ती फक्त स्नान करून शुद्ध होते. असें कित्येकांचें म्हणणें आहे.

रजस्वलायाः पुनरेव चेद्रजः । प्राग्दृश्यनेऽष्टादशवासराच्छुचिः
अष्टादशाहे यदि चेद्दिनद्वया- । देकोनविंशे त्रिदिनात्ततः परम् ॥ १३ ॥

अर्थ— रजस्वला झालेली स्त्री पुनः जर अठराव्या दिवसाच्या पूर्वी रजस्वला होईल तर ती शुद्धच समजावी. अठराव्या दिवशीं आल्यास दोन दिवस अशुद्ध समजावी, आणि एकोणिसाव्या दिवशीं आल्यास तीन दिवस अशुद्ध समजावी. असें एक मत आहे.

रजोयुताऽष्टादशवासरे पुनः । प्रायेण या यौवनशालिनी वधूः ॥
त्र्यहेण सा शुध्यति द्वेचापिन्ययो । रजोनियुक्ताशुचिमार्तेव मति ॥ १४ ॥

अर्थ— रजस्वला झालेली स्त्री तारुण्य अधिक असल्यामुळें अठरा दिवसांत पुनः रजस्वला होईल तर ती तीन दिवसानींच दैविक व पैतृककर्माला योग्य होते. कारण, तिच्या ठिकाणी ऋतुस्राव होत असल्यामुळे अशुद्धता असते. असें एक मत आहे.

रजस्वला यदि स्नाता पुनरेव रजस्वला ॥
अष्टादशदिनादर्वाक् शुचित्वं न निगद्यते ॥ १५ ॥

अर्थ— रजस्वला स्त्री चवथ्या दिवशी स्नान केल्यानंतर ऋतुमती झाल्यापासून अठरा दिवसांच्या आंत जर पुनः ऋतुमती होईल तर ती शुद्ध म्हणवीत नाही असें एक मत आहे.

ऋतुमती स्त्रीचा आचार.

काले ऋतुमती नारी कुशासने स्वपेत्सती ॥
एकांतस्थानके स्वस्था जनस्पर्शनवर्जिता ॥ १६ ॥
मौनयुक्ताऽथवा देवधर्मवार्ताविवर्जिता ॥
मालतीमाधवीवल्लीकुन्दादिलतिकाकरा ॥ १७ ॥
रक्षेच्छीलं दिनत्रयं ... ॥
अञ्जनाभ्यङ्गस्रग्गन्धलेपनमण्डनोज्झिता ॥ १८ ॥

देवं गुरुं नृपं स्वस्य रूपं च दर्पणेऽपि वा ॥
न च पश्येत्कुदेवं च नैव भाषेत तैः समम् ॥ १९ ॥
वृक्षमूले स्वपेन्नैव खट्वाशय्यासने दिने ॥
मन्त्रपञ्चनमस्कार जिनस्मृतिं स्मरेध्दृदि ॥ २० ॥
अञ्जलावश्नीयात्पर्णपात्रे ताम्रे च पैत्तले ॥
भुक्तं चेत्कांस्यजे पात्रे तत्तु शुध्यति वन्हिना ॥ २१ ॥

अर्थ— योग्यकाली ऋतुमती झालेल्या स्त्रीनें दर्भ अंथरून त्यांवर शयन करावें. स्वस्थमनानें एकांतीं वसावें. कोणास स्पर्श करूं नये. तिनें तीन दिवस मौन धारण करावें. किंवा देवाधर्माच्या गोष्टी बोलूं नयेत. मालतीची वेल, मोगरीची वेल किंवा कुंदाची वेल तिनें तीन दिवस हातांत धरावी. आपलें शील रक्षण करावें. तीन दिवस दही, दूध वगैरे गोरसावांचून एक वेळ भोजन करावें. तिनें डोळ्यांत अंजन घालूं नये. अंगाला तेल लावूं नये. माळा व अलंकार घालूं नयेत. तिनें देव, गुरु, राजा आणि कुलदेवता ह्यांचें दर्शन करूं नये. गुरु वगैरे ह्यांच्याशी भाषण करूं नये. दर्पणांत आपलें मुख पाहूं नये. झाडाखाली व माचा किंवा बाजलें ह्यांच्यावर; व अंथरुणावर निजूं नये. दिवसां निजूं नये. पंचनमस्कार मंत्र आणि जिनदेव ह्यांचें मनात स्मरण करावें. तिनें तीन दिवस आपल्या ओंजळींत किंवा पानावर,

अथवा तांब्याच्या पितळेच्या भांड्यात अन्न घेऊन भोजन करावें. काश्याच्या पात्रांत भोजन केले असतां तें अग्नींतून भाजून काढिलें ह्मणजे शुद्ध होतें.

रजस्वलेची शुद्धि.

चतुर्थे दिवसे स्नायात्प्रातर्गोसर्गतः पुरा ॥
पूर्वाह्णे घटिकाषट्कं गोसर्ग इति भाषितः ॥ २२ ॥
शुद्धा भर्तुश्चतुर्थेऽह्नि भोजने रन्धनेऽपि वा ॥
देवपूजागुरूपास्तिहोमसेवासु पञ्चमे ॥ २३ ॥

अर्थ— मग चवथ्या दिवशी प्रातःकाली तिनें गाई रानात सोडण्याचा काल होण्याच्या पूर्वी स्नान करावें. प्रातःकालच्या सहा घटिका नंतर गाई सोडण्याचा काल समजावा. ती स्त्री चवथ्या दिवशीं फक्त आपल्या पतीला अन्न शिजवून घालण्याला शुद्ध समजावी. बाकी देवपूजा, गुरुसेवा, होम वगैरे कृत्याला पांचव्या दिवशी शुद्ध समजावी.

दोघीं ऋतुमतींनीं एकमेकींशी भाषण वगैरे केल्यास प्रायश्चित्त

अस्नाते यदि संलापं कुरुतश्चोभयोस्तयोः ॥
अतिमात्रमघं तस्माद्वर्ज्यं सम्भाषणादिकम् ॥ २४ ॥

अर्थ— ऋतुमती स्त्रिया स्नान केल्यावाचून जर एकमेकींशीं भाषण करितील तर त्या दोघींसही मोठें पातक लागते. ह्मणून ऋतुमतीशीं बोलणे वगैरे त्याज्य समजावे.

संलापे तु तयोः शुद्धिं कुर्यादेकोपवासतः ॥
तद्व्यात्सहसंवासे तत्र्यात्पंक्तिभोजने ॥ २५ ॥

अर्थ— ऋतुमतींनीं एकमेकींशीं फक्त भाषणच केलें तर त्या दोघींकडून एकादिवस उपवास करवून त्यांना शुद्ध करून घ्यावें. त्यांनीं सहवास (एका जाग्यांत रहाणे) केला असतां दोन उपवास करवावेत. त्या दोघींनीं एकमेकींच्या पंक्तीला भोजन केलें असतां दोघींकडूनही तीन उपवास करवावेत.

विजातीय ऋतुमतींच्या वरील व्यवहाराचे प्रायश्चित्त

ऋतुमत्योर्विजात्योस्तु संलापादि भवेद्यदि ॥
तदाऽधिकायाः शुद्धिः प्रागुक्तादेवाधिकाद्भवेत् ॥ २६ ॥

अर्थ— निरनिराळ्या जातींच्या दोन ऋतुमती स्त्रिया जर एकमेकींशीं भाषण करतील तर त्यांत उच्च जातीची जी स्त्री असेल तिची शुद्धता पूर्वी सांगितल्यापेक्षा अधिक प्रायश्चित्त केल्यानें ह्मणजे द्विगुणप्रायश्चित्त केल्यानें होते.

अन्यस्यास्तु विशुद्धिः स्यात्पूर्वोक्तादानतोऽपि वा ॥

यदि समं तयोर्गोत्रं तदा शुद्धिस्तु पूर्ववत् ॥ २७ ॥

अर्थ— नीच जातीची जी स्त्री असेल तिची शुद्धता पूर्वी सांगितलेल्या प्रकारानें होते, आणि जर दोघा ऋतुमतींचे एकच कुल असेल तर त्या दोघींचीही शुद्धि पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रायश्चित्त केल्यानें होते.

सूतकं प्रेतकं वाऽथमन्त्यस्पर्शनमेव वा ॥
मध्ये रजसि जातं चेत्स्नात्वा भुञ्जीत पुष्पिणी ॥ २८ ॥

अर्थ— स्त्री रजस्वला असतांना मध्यें जननाशौच किंवा मृताशौच प्राप्त झालें असतां किंवा अंत्यजादिकांचा स्पर्श झाला असतां रजस्वलेनें तत्काल स्नान करून भोजन करावें.

आर्तवं भुक्तिकाले चेदन्नं त्यक्त्वाऽऽस्यगं च तत् ॥
स्नात्वा भुञ्जीत शङ्का चेत्परं स्नानेन शुध्यति ॥ २९ ॥
मध्ये स्नानं तु कार्यं चेत्तद्भवेदुध्दृतैर्जलैः ॥
नावगाहनमेतस्यास्तडागादौ जले तदा ॥ ३० ॥

अर्थ— भोजन करीत असतां जर स्त्री रजस्वला होईल तर तिनें तोंडांतील घास टाकून स्नान करून भोजन करावें, आणि उगीच शंका आली असें असल्यासही स्नानानेंच शुद्ध होते. तात्पर्य, भोजन करीत आसतां ऋतूची शंका आली असतांही स्नान केलेंच पाहिजे. हें जें स्त्रियांनी मध्येंच स्नान करावयाचें असतें,

तें जलाशयांतून पाणी वर काढून घेऊन स्नान करावें. जलाशयात शिरून त्यांत बुडी मारूं नये,

आशौचात प्रथमऋतुदर्शन झाल्यास.

सूतके प्रेतकाशौचे पुष्पं चेत् सिञ्चयेज्जलम् ॥
शिरस्यमृतमन्त्रेण पूतं द्विजकरच्युतम् ॥ ३१ ॥

अर्थ— जननाशौच आणि मृताशौच असतांना जर स्त्री ऋतुमती ( प्रथमऋतुमती ) होईल तर अमृतमंत्रानें ब्राह्मणाकडून तिच्या मस्तकावर उदक सेंचन करावें. कारण ब्राह्मणाच्या हातून पडलेलें उदक शुद्ध असल्यानें ती शुद्ध होते. ह्याचें तात्पर्य— ती स्त्री त्या आशौचांतून मुक्त होते असें नसून फक्त आशौचामध्यें प्रथम ऋतुमती झाल्याचा जो तिचा दोष असतो तेवढा जातो. बाकीचें पूर्वी प्राप्त झालेलें आशौच तिला आहेच.

कुर्याद्दानं च पात्राय मध्यमाय यथोचितम् ॥
कुर्यादेकत्र भुक्त्यादि पुष्पिणी तत्र तत्र च ॥ ३२ ॥

अर्थ— वरील विधि करून मध्यमपात्राला योग्य असें दान करावें; आणि त्या ऋतुमतीनें आपला भोजनादि व्यवहार एकाच ठिकाणीं करावा. ह्मणजे ऋतुमतीनें जसें वागण्यास पूर्वी सांगितलें आहे त्याप्रमाणें वागावें.

ऋतुमतीनें अज्ञानानें कोठे स्पर्श केल्यास.

अज्ञानाद्दृक्स्त्रगे पुष्पे स्पृष्टं यद्यत्तया तदा ॥
हस्तादर्वाक् स्थितं चापि तत्सर्वं दूषितं भवेत् ॥ ३३ ॥

अर्थ— ज्या स्त्रीला ऋतु म्हणजे काय? याचें ज्ञान नाहीं, ती स्त्री ऋतुमती होऊन जर स्पर्श करील, तर, तिनें स्पर्श केलेले पदार्थ, व तिच्यापासून एक हात लांबीच्या आंत असलेले पदार्थ अशुद्ध होतात.

ऋतुमतीनें स्पर्श केलेलें अन्न अज्ञानानें भक्षिल्यास

अज्ञानाद्दुर्ज्ञानतो वाऽपि तत्पाणिदत्तमोदनम् ॥
अन्यद्वा योऽत्ति नाश्नीयादसावेकद्विवासरम् ॥ ३४ ॥

अर्थ— न समजल्यामुळें किंवा भलतीच समजूत झाल्यामुळें जर कोणी ऋतुमतीच्या हातांतील अन्न भक्षण करील तर त्यानें एक दिवस किंवा दोन दिवस उपवास करावेत.

ऋतुमतीच्या सान्निध्याचा दोष

यामादर्वाक्तदभ्यर्णे पल्यङ्कासनवस्त्रके ॥
कुड्यादिसंयुते पंक्त्यासने स्नायात्सचेलकम् ॥ ३५ ॥

अर्थ— ऋतुमती झालेल्या स्त्रीच्या नजीकच्या जाग्यांत माचा, जाजम, वस्त्र ह्या वस्तु एक प्रहरापेक्षा कमी वेळ जरी असल्या तथापि त्या अशुद्ध होतात. तसेंच ती ज्या भिंतीला टेकून बसली असेल त्या

भिंतीला टेकून तिच्याच ओलीला बसले असतां अंगावरील वस्त्रांसह स्नान केलें पाहिजे.

रजस्युपरते तस्य क्षालनं स्नानमेव वा ॥
रजः प्रवर्तने यावत्तावदाशौचमेव हि ॥ ३५ ॥

अर्थ— मग त्या स्त्रीला तीन दिवस झाल्यावर चवथ्या दिवशीं वर सांगितलेले तिच्या जवळ असलेले पदार्थ धुवून टाकावेत. आणि त्या वस्तु धुणारानें स्नान करावें. स्त्री ऋतुमती झाली ह्मणजे तीन दिवस आशौच हें सामान्यतः प्राप्त होतें. पण पुढेंही जर ऋतु अंगावर जात असेल तर ऋतु जाण्याचा बंद होईपर्यंत ती अशुद्धच समजावी.

ऋतुमती बसत असलेल्या स्थलाची शुद्धि

ऋतुमत्या कृता यत्र भुक्तिः सुप्तिः स्थितिश्चिरम् ॥
निषद्या च तदुद्देशं मृज्याद्विर्गोमयैर्जलैः ॥ ३७ ॥

अर्थ— ऋतुमतीनें ज्या ठिकाणीं भोजन, शयन, उभें राहणें, बसणें हे व्यापार केले असतील त्या जागा शेण आणि पाणी ह्यांनीं दोन वेळ सारवाव्यात.

तिला स्पर्श करणाऱ्या मुलाची शुद्धि.

तया सह तद्बालस्तु स्पृष्टः स्नानेन शुध्यति ॥

तां स्पृशन्स्तनपायी चेत्प्रोक्षणेनैव शुध्यति ॥ ३८ ॥

अर्थ— तिच्या जवळ असणारा तिचा मुलगा सोळा वर्षापर्यंतच्या वयाचा असल्यास तो स्नानानें शुद्ध होतो. आणि स्तनपान करणारा असा असल्यास ( अगदींच लहान असल्यास ) अभिमंत्रण केलेल्या उदकानें प्रोक्षण केले ह्मणजे शुद्ध होतो.

तिने भोजन केलेल्या पात्रात शुद्ध केल्यावाचून भोजन केल्यास.

तद्भुक्तपात्रे भुञ्जानोऽन्नमथान्नादसंस्कृते ॥
उपवासद्वयं कुर्यात्सचेलस्नानपूर्वकम् ॥ ३९ ॥

अर्थ— त्या ऋतुमती स्त्रीनें ज्या पात्रात भोजन केलें असेल तें पात्र शुद्ध केल्यावांचून त्यांत भोजन करणाऱ्यानें सचेल स्नान करून दोन उपवास करावेत. ह्मणजे शुद्ध होतो.

यदि स्पृशाति तत्पात्रं तद्वस्त्रं तत्प्रदेशकम् ॥
तदा स्नात्वा जपेदष्टशतकृत्वोऽपराजितम् ॥ ४० ॥

अर्थ— ऋतुमतीचें भांडें, तिचें वस्त्र, तिची जागा याला जर कोणी शुद्ध केल्यावांचून स्पर्श करील, तर त्यानें स्नान करून अपराजित मंत्राचा एकशेंहे आठ वेळां जप करावा.

अनुक्तं यद्यदत्रैव तज्ज्ञेयं लोकवर्तनात् ॥

सूतकं प्रेतकाशौचं मिश्रं वाऽथ निरूप्यते ॥ ४१ ॥

अर्थ— ह्या ठिकाणीं ऋतुमतीच्या संबंधानें जें जें सांगितलेलें नसेल तें सर्व लोकाचारावरून समजावें. आतां जननाशौच, मृताशौच आणि त्यांचें मिश्रण ह्या संबंधानें निरूपण करूं.

जननाशौच आणि मृताशौच ह्यांचा शास्त्रार्थ.

जातकं मृतकं चेति सूतकं द्विविधं स्मृतम् ॥
स्रावः पातः प्रसूतिश्च त्रिविधं जातकस्य च ॥ ४२ ॥

अर्थ— लौकिकांत मृताशौचाला सूतक म्हणण्याची वहिवाट पडली आहे. परंतु शास्त्रांत सूतक हा सामान्यशब्द मानिला आहे. त्याचे जातक ( उत्पत्तिसंबंधी आशौच ) आणि मृतक ( मृत्युसंबंधी आशौच ) असे दोन प्रकार आहेत. त्यांत जातकाचे स्राव, पात आणि प्रसूति असे तीन प्रकार आहेत.

स्राव, पात आणि प्रसव ह्यांचा काल

मासत्रये चतुर्थे च गर्भस्य स्राव उच्यते ॥
पातः स्यात्पञ्चमे षष्ठे प्रसूतिः सप्तमादिषु ॥ ४३ ॥

अर्थ— गर्भ धारण झाल्यापासून चार महिने संपेपर्यंत मध्येंच जर तो उदरांतून बाहेर आला तर त्याला स्राव म्हणतात. पांचव्या किंवा सहाव्या महिन्यांत आला असतां पात म्हणतात. आणि सातव्या

महिन्यांत किंवा त्याच्या पुढें आला असतां प्रसूति म्हणतात.

गर्भस्रावाचें आशौच.

माससंख्यादिनं मातुः स्रावे सूतकमिष्यते ॥
स्नानेनैव तु शुध्यन्ति सपिण्डाश्चैव वै पिता ॥ ४४ ॥

अर्थ— स्राव झाला असतां ज्या महिन्यात स्राव झाला असेल तितके दिवस आईला आशौच समजावें, आणि सपिंड ( भाईबंद ) व पिता हे स्नानानें शुद्ध होतात.

गर्भपाताचें आशौच

पाते मातुर्यथामासं तावदेव दिनं भवेत् ॥
सूतकं तु सपिण्डानां पितुश्चैकदिनं भवेत् ॥ ४५ ॥

अर्थ— पात झाला असता ज्या महिन्यात पात झाला असेल तितके दिवस मातेला आशौच असतें, आणि सपिंड व पिता ह्यांना एक दिवस आशौच असतें.

जननाशौच

प्रसूतौ चैव निर्दोषं दशाहं सूतकं भवेत् ॥
क्षत्रस्य द्वादशाहं सच्छूद्रस्य पक्षमात्रकम् ॥ ४६ ॥

अर्थ— प्रसूति झाली असता आईबाप व सपिंड या सर्वांस दहा दिवस जननाशौच असते. हे आशौच क्षत्रियांना बारा दिवस असतें, आणि शूद्रांना पंधरा दिवस असतें.

त्रिदिनं यत्र विप्राणां वैश्यानां स्याच्चतुर्दिनम् ॥
क्षत्रियाणां पञ्चदिनं शूद्राणां च दिनाष्टकम् ॥ ४७ ॥

अर्थ— जेव्हां ब्राह्मणाला तीन दिवस आशौच असते त्या ठिकाणीं वैश्याला चार दिवस, क्षत्रियांना पांच दिवस, आणि शूद्रांना आठ दिवस आशौच समजावें.

नालच्छेदनाच्या पूर्वी मूल मृत झालें असता.

नाभिच्छेदनतः पूर्वं जीवन् यातो मृतो यदि ॥
मातुः पूर्णमतोऽन्येषां पितुश्च त्रिदिनं मतम् ॥ ४८ ॥

अर्थ— जीवंत उपजलेलें मूल नालच्छेदनाच्या पूर्वीच जर मृत झालें, तर मातेला दहा दिवस आशौच असतें, आणि सपिंडांना व पित्याला तीन दिवस जननाशौच असतें.

उदरात मृत झालेलें मूल जन्मलें असता

मृतस्य प्रसवे चैव नाभिच्छेदनतः परम् ॥
मातुः पितुश्च सर्वेषां जातीनां पूर्णसूतकम् ॥ ४९ ॥

अर्थ— मेलेले मूल उपजलें असता किंवा उपजलेलें मूल नालच्छेदन केल्यानंतर मृत झालें असतां ाप वगैरे सर्वांस जननाशौच दहा दिवस परिपूर्ण समजावें.

दहा दिवसाच्या आत मूल मेलें असता.

अनतीतदशाहस्य बालस्य मरणे सति ॥
पित्रोर्दशाहमाशौचं तदर्पैति च सूतकात् ॥ ५० ॥

अर्थ— ज्या मुलाला दहा दिवस झाले नाहीत असें मूल मेलें असता आईबापाला दहा दिवस आशौच असते पण ते जननाशौचाची समाप्ति झाली ह्मणजे समाप्त होतें.

दहाव्या दिवशीं किंवा अकराव्या दिवशीं मूल मृत झालें असता.

दशाहस्यान्तदिवसे मृतादूर्ध्वं दिनद्वयम् ॥
अघं ततः प्रभाते तु दिवसत्रितयं पुनः ॥ ५१ ॥

अर्थ— दहाव्या दिवशीं मूल मेलें असतां पुढें दोन दिवस मृताशौच असतें. आणि अकराव्या दिवशीं मेलें असतां पुढें तीन दिवस मृताशौच असतें.

नामकरणाच्या पूर्वी मूल मृत झालें असता आशौचविधि.

नाम्नः प्राक् प्रस्थिते बाले कर्तव्य स्नानमेव च ॥

तिलोदनं तदर्थं तु तत्पिण्डश्च व्रतात्परम् ॥ ५२ ॥
संस्कारः स्यान्निखननं नाम्नः प्राक् बालकस्य तु ॥
तदूर्ध्वमशनादर्वाग्भवेत्तद्दहनं च वा ॥ ५३ ॥
निखनने विधातव्ये संस्थितं बालकं तदा ॥
वस्त्राद्यैर्भूषितं कृत्वा निक्षिपेत्काष्ठवद्भुवि ॥ ५४ ॥

अर्थ— नामकरण संस्कार होण्याच्या पूर्वी मूल मृत झाले असतां सर्वांनी स्नान करावें. मृताच्या उद्देशाने तिलोदन व पिंडदान वगैरे क्रिया त्याचे उपनयन झाले असल्यास करावयाच्या असतात. म्हणून ह्या मुलाच्या त्या क्रिया करावयाच्या नाहीत. नामकरणाच्या पूर्वी मृत झालेल्या मुलास निखनन [ पुरणे ] हा संस्कार करावा. नामकरणाच्या पुढे अन्नप्राशनक्रिया होण्याच्या आंत निखनन किंवा दाह करावा. त्यांत निखनन करावयाचें असता मृत मुलाला वस्त्रादिकांनी भूषित करून भूमीत काष्ठाप्रमाणे पुरावें.

दंतोत्पत्ति झाल्यावर मूल मृत झाले असता आशौच व विधि

दन्तादुपरि बालस्य दहनं संस्कृतिर्भवेत् ॥
तयोरन्यतर वाऽऽहुर्नाम्नोऽयमयनान्तरैः (?) ॥ ५५ ॥

अर्थ— मुलाला दंतोत्पत्ति झाल्यानंतर तें मृत झाल्यास त्याचा दाहसंस्कार करावा; किंवा खनन केलें तरी हरकत नाहीं. आणि सहा महिन्याच्या पुढें नामकरण करावयाचें असल्यास मात्र हाच ह्मणजे दाहसंस्कारच केला पाहिजे.

जातदन्तशिशोर्नाशे पित्रोर्भ्रातुर्दशाहकम् ॥
प्रत्यासन्नसपिण्डानामेकरात्रमथ भवेत् ॥ ५६ ॥
अप्रत्यासन्नबन्धूनां स्नानमेव तदोदितम् ॥
आचतुर्थाः समासन्ना अनासन्नास्ततः परे ॥ ५७ ॥
स्थापने भूषणे वाहे दहने चापि संस्थितम् ॥
संस्पृशेयुः समासन्ना नत्वनासन्नबान्धवः ॥ ५८ ॥

अर्थ— ज्याला दांत उत्पन्न झाले आहेत अशा मुलाचा मृत्यु झाला असतां आईबाप आणि त्या मुलाचे बंधु (सहोदर) ह्यांना दहा दिवस मृताशौच असतें. आणि जवळच्या भाऊबंदांना एक दिवस आशौच असते. दूरच्या भाऊबंदांनी स्नान केलें ह्मणजे त्यांची शुद्धि होते. ह्या ठिकाणीं चवथ्या पुरुषापर्यंतचे पुरुष जवळचे भाऊबंद आणि चवथ्या पुरुषाच्या पुढचे पुरुष दूरचे भाऊबंद समजावेत. प्रेताला स्नान घालणें, भूषणें घालणें, त्याला वाहून नेणें, दहन करणें वगैरे संबंधानें प्रेताला स्पर्श करण्याचा प्रसंग

असल्यास जवळच्या भाऊबंदांनींच स्पर्श करावा. दूरच्या भाऊबंदांनी करूं नये.

चौलसंस्कार झालेल्या मुलाचें आशौच

कृतचौलस्य बालस्य पितुर्भ्रातुश्च पूर्ववत् ॥
आसन्नेतरबन्धूनां पञ्चाहैकाहमिष्यते ॥ ५९ ॥

अर्थ— ज्याचें चौलकर्म केलें आहे अशा मुलाचें मरण झालें असतां आईबाप व बंधु ह्यांना दहा दिवस आशौच असतें आणि जवळच्या व दूरच्या भाऊबंदांस क्रमानें पांच दिवस आणि एक दिवस आशौच असतें.

उपनयन झाल्यावर कुमार मृत झाला असता.

मरणे चोपनीतस्य पित्रादीनां तु पूर्ववत् ॥
आसन्नानां तु सर्वेषां पूर्ववत्सूतकं मतम् ॥ ६० ॥
पञ्चमानां तु षड्रात्रं षष्ठानां तु चतुर्दिनम् ॥
सप्तमानां त्रिरात्रं स्यात्तदूर्ध्वं न प्लवं मतम् ॥ ६१ ॥

अर्थ— उपनयन झालेला मुलगा मरण पावला असतां आईबाप, बंधु व जवळचे भाऊबंद ह्यांना दहा दिवस आशौच असतें, आणि दूरच्या भाऊबंदांपैकी पांचव्या पुरुषास सहा दिवस, सहाव्यास चार दिवस

आणि सातव्यास तीन दिवस आशौच असतें. सातव्या पुरुषाच्या पुढील पुरुषांस आशौच नाहीं. त्यांनीं फक्त स्नानमात्र केलें पाहिजे.

जननाशौचात पियानें दान करण्याचा विधि.

जननेऽप्येवमेवाघं मात्रादीनां तु सूतकम् ॥
तदा नाघं पितुर्भ्रातुर्नाभिकर्तनतः परम् ॥ ६२ ॥
पिता दद्यात्तदा स्वर्णताम्बूलवसनादिकम् ॥
अशुचिनस्तु नैव स्युर्जनास्तत्र परिग्रहे ॥ ६३ ॥
तदात्व एव दानस्यानुपपत्तिर्भवेद्यदि ॥
तदहः सर्वमप्यत्र दानयोग्यमिति स्मृतम् ॥ ६४ ॥

अर्थ— जननाशौचहीं वरील प्रमाणेंच समजावें. त्यांत एवढा मात्र विशेष आहे. तो हा कीं, मुलाचें नालच्छेदन केल्यानंतर त्या मुलाच्या बापास व बंधूस आशौच नसतें. ह्मणून त्यांनीं नालच्छेदन केल्यानंतर सुवर्ण, तांबूल, वस्त्र, वगैरे दान करावें. तें दान घेणारे लोकही अशुद्ध होत नाहींत. नालच्छेदन केल्याबरोबर दान करण्यास सवड नसल्यास तो सर्व दिवस संपेपर्यंत दान करावें. तेवढा एक दिवस त्यांना जननाशौच नसतें. तें दुसऱ्या दिवसापासून पुनः सुरू होतें.

मातेला जननाशौच

तदा पुम्प्रसवे मातुर्दशाहमनिरीक्षणम् ॥
अघं विंशतिरात्रं स्यादनाधिकारलक्षणम् ॥ ६५ ॥
स्त्रीसूतौ तु तदेव स्यादनिरीक्षणलक्षणम् ॥
पश्चादनधिकाराघं स्यात्त्रिंशद्दिवस भवेत् ॥ ६६ ॥

अर्थ-- पुत्र झाला असतां त्याच्या आईला दहा दिवस अनिरीक्षणस्वरूप आशौच (तिचें मुखावलोकन दहा दिवस कोणीं न करणें हें आशौच) असतें. आणि पुढें वीस दिवस कर्मानधिकारलक्षण आशौच (कर्म करण्यास अधिकार नसणें हें आशौच) असतें. आणि कन्या झाली असतां मातेला दहा दिवस अनिरीक्षण आशौच असतें. व पुढें तीस दिवसपर्यंत तिला कर्मानाधिकाररूपी आशौच असतें.

बाळंतिणीशीं सहवासाचे आशौच

तस्याः सहैकवासादिसंसर्गे पितुरप्यघम् ॥
अनिरीक्षाद्यसंसर्गे त्वस्पृश्याद्यशनाद्भवेत् (?) ॥ ६७ ॥

अर्थ— बाळंतिणीच्या जवळ तिला स्पर्श करून बसणें वगैरे व्यवहार मुलाच्या पित्यानें केला असतां त्याला देखील दहा दिवस अनिरीक्षणरूप आशौच असतें.

कोणतें अशौच कोणत्या आशौचात जातें त्याविषयीं.

मृतकं मृतकेनैव सूतकं सूतकेन च ॥
शावेन शुध्यते सूतिः शावं सूत्या न शुध्यति ॥ ६८ ॥

अर्थ— एक मृताशौच प्राप्त झाल्यानंतर जर दुसरें मृताशौच प्राप्त झालें, तर पहिलें आशौच समाप्त झाल्यानें दुसरें आशौच समाप्त होतें. तसेंच एक जननाशौच प्राप्त झाल्यानंतर जर दुसरें जननाशौच प्राप्त झालें तर पहिल्याच्या समाप्तीनें दुसऱ्याची समाप्ति होतें, आणि मृताशौच प्राप्त झाल्यावर जर जननाशौच प्राप्त झालें तर मृताशौची समाप्ति झाल्यानें जननाशौचाची समाप्ति होते, परंतु जननाशौज प्राप्त झाल्यानंतर जर मृताशौच प्राप्त झालें, तर जननाशौचाच्या समाप्तीनें मृताशौचाची समाप्ति होत नाहीं असें समजावें.

देशान्तराचें लक्षण

महानद्यन्तरे यत्र गिरिर्वा व्यवधायकः ॥
वाचो यत्र विभिद्यन्ते तद्देशान्तरमुच्यते ॥ ६९ ॥
त्रिंशद्योजनदूरं वा प्रत्येकं देशभेदतः ॥
प्रोक्तं मुनिभिराशौचं सपिण्डानामिदं भवेत् ॥ ७० ॥

अर्थ— आतां देशातराचें लक्षण सागतात. मधून महानदी ( स्वतः समुद्राला मिळणारी नदी )

गेली असल्यास त्या नदीच्या दोनी तीरांवरील दोन निरनिराळे देश समजावेत. मधून एखादा पर्वत गेला असल्यास त्या पर्वताच्या दोहोंकडील बाजूंच्या देशांना देशांतर ( निराळे देश ) समजावे, आणि भाषाभेद असला ह्मणजे त्याला देशांतर समजावे. किंवा तीस योजनांच्या पलीकडच्या देशाला देशांतर समजावें. पूर्वी जे अशौचाचे प्रकार सांगितले आहेत ते जवळच्या भाऊबंदाला देशांतरीं देखील मास होतात असें मुनींनी सांगितलें आहे.

देशांतरीं असलेल्या पुत्राला देशांतरीं मृत झालेल्या मातापितराचें आशौच

पितरौ चेन्मृतौ स्यातां दूरस्थोऽपि हि पुत्रकः ॥
श्रुत्वा तद्दिनमारभ्य पुत्राणां दशरात्रकम् ॥ ७१ ॥

अर्थ— आतां पुत्राविषयीं विशेष सांगतात. दूरदेशीं असलेल्या पुत्राचे आई किंवा बाप हे मेले असतां ज्या दिवशीं ते मेल्याचें समजेल त्या दिवसापासून पुढें दहा दिवस त्यानें आशौच धरावें.

पत्नी व पति यांच्याविषयीं विशेष

पत्न्या अपि तथाऽऽशौचं भवेदेव विनिश्चितम् ॥
पत्न्याशौचं भवेद्भर्तुरित्येवं मुनिरब्रवीत् ॥ ७२ ॥
दूरस्था निधनं भर्तुर्दशाहात् श्रूयते यदि ॥

भार्या कुर्यादघं पूर्णं पत्न्या अपि पतिस्तथा ॥ ७३ ॥

अर्थ— पत्नी मृत झाल्यानें पतीला प्राप्त होणारें आशौच आणि पति मृत झाल्यानें पत्नीला प्राप्त होणारें आशौच हीं दोन्हीं वरीलप्रमाणेंच समजावींत. दूर देशीं असलेल्या पत्नीनें जर पतीचें मरण दहा दिवसांचे पुढें ऐकिलें तर तिनें ऐकिल्या दिवसापासून दहा दिवस आशौच धरावें. पत्नीचें आशौचही पतीनें त्याप्रमाणेंच धरावें. असें मुनींनीं सांगितलें आहे.

मातापित्रोर्यथाऽऽशौचं दशाहं क्रियते सुतैः ॥
अनेकेऽब्देऽपि दम्पत्योस्तथैव स्यात्परस्परम् ॥ ७४ ॥

अर्थ— पुत्र मातापित्यांचें आशौच वत्सरांतरींही जसें दहा दिवस धरतात, त्याप्रमाणेंच पति आणि पत्नी ह्यांनींही एकमेकांचें आशौच केव्हांही दहा दिवस धरलें पाहिजे.

पित्याच्या दशाहाशौचात माता मृत झाल्यास

पितुर्दशाहमध्ये चेन्माता यदि मृता तदा ॥
दहेन्मन्त्राग्निना प्रेतं न कुर्यादुदकक्रियाम् ॥ ७५ ॥

अर्थ— पित्याच्या दशाह आशौचामध्यें जर माता मृत झाली तर तिच्या प्रेताच्या मंत्राग्नीनें दाह करावा. आणि पुढील क्रिया करूं नये.

पैतृकादूर्ध्वमेव स्यान्मात्राशौचं तु पक्षिणी ॥
विधायोदकधारादि कुर्यान्मातुः क्रियां ततः ॥ ७६ ॥

अर्थ—- पित्याचे दहा दिवस झाल्यावर मातेचें आशौच पक्षिणी [ दीड दिवस ] धरून नंतर तिची उदकदानादि क्रिया करावी.

मातेच्या दशाहाशौचात पिता मृत झाल्यास

मातुर्दशाहमध्ये तु मृतः स्याद्यदि वै पिता ॥
पितुर्मरणमारभ्य दशाहं शावकं भवेत् ॥ ७७ ॥
एकमेव पितु श्चाद्यं कुर्याद्दशे दशाहनि ॥
ततो वै मातृकं श्राद्धं कुर्यादाद्यादि षोडश ॥ ७८ ॥

अर्थ—- मातेच्या दहा दिवसाच्या आशौचांत जर पिता मृत होईल तर पुत्रानें पित्याच्या मरणादिवसापासून पुढें दहा दिवस आशौच धरावें. नंतर प्रथम पित्याचें एकच श्राद्ध दहावे दिवशीं करून मग मातेचीं पहिल्या श्राद्धापासून सर्व षोडश श्राद्धें करावीत. नंतर पित्याचीं सर्व श्राद्धें करावींत.

दोघेही एकाच दिवशीं मृत झाल्यास

एकस्मिन्नेव काले चेन्मरणं श्रूयते तयोः ॥

दूरगोऽप्याचरेत्पुत्रो ह्याशौचमुभयोः समम् ॥ ७९ ॥

अर्थ— आणि माता व पिता हे दोघे जर एका दिवशींच मृत झाले, किंवा दोघांच्या मरणांची वार्ता पुत्राला एकदमच कळली तर त्यानें दोघांचेंही आशौच एकदमच धरावें.

दूरदेशीं गेलेल्या मनुष्याचें वर्तमान न कळल्यास व तो पुन आल्यास.

दूरदेशं गते वार्ता दूरतः श्रूयते न चेत् ॥
यदि पूर्ववयस्कस्य यावत्स्यादष्टविंशतिः ॥८०॥
तथा मध्यवयस्कस्य ह्यब्दाः पञ्चदशैव तत ॥
तथाऽपूर्ववयस्कस्य स्यात् द्वादशवत्सरम् ॥८१॥
अत ऊर्ध्वं प्रेतकर्म कार्यं तस्य विधानतः ॥
श्राद्धं कृत्वा षडब्दं तु प्रायश्चित्तं स्वशक्तितः ॥८२॥
प्रेतकार्ये कृते तस्य यदि चेत्पुनरागतः ॥
घृतकुम्भेन संस्नाप्य सर्वौषधिभिरप्यथ ॥८३॥
संस्कारान्सकलान्कृत्वा मौञ्जीबन्धनमाचरेत् ॥
पूर्वपत्न्या सहैवास्य विवाहः कार्य एव हि ॥८४॥

अर्थ- रजस्वला स्त्री मृत झाली असतां तिला पंचगव्यानें स्नान घालून दुसरें वस्त्र नेसवून विधिपूर्वक दहन करावें.

बाळंतीण मृत झाली- असता.

सूतिकायां मृतायां तु कथं कुर्वन्ति याज्ञिकाः ॥
कुम्भे सलिलमादाय पंचगव्यं तथैव च ॥ ९० ॥
पुण्याहवाचनैर्मन्त्रैः सिक्त्वा शुद्धिं लभेत्तु सा ॥
तेनापि स्नापयित्वा तु दाहं कुर्याद्यथाविधि ॥ ९१ ॥

अर्थ— प्रसूत झालेली स्त्री दहा दिवसांच्या आंत मृत झाली असतां कसें करतात? ह्याचें उत्तर असें कीं, अभिमंत्रण केलेल्या कलशांतील उदक आणि पंचगव्य ह्यांच्या योगानें पुण्याहवाचनाच्या मंत्रांनी तिला सिंचन करून, कलशोदकानें स्नान घालावें, ह्मणजे ती शुद्ध होते. मग तिचा यथाविधि दाह करावा.

दुसरे मत

दशाहाभ्यन्तरे चैव म्रियते चेत्प्रसूतिका ॥
कथं तस्या भवेच्छुद्धिर्दाहकर्म कथं भवेत् ॥ ९२ ॥
शूर्पेण स्नापयेद्देहीं दशवारं ततो जलैः ॥
पञ्चपल्लवसंकल्पैः पञ्चगव्यैः कुशोदकैः ॥ ९३ ॥

कारयित्वा ततः स्नानमभिषिञ्चेत्कुशोदकैः ॥
दाहयित्वा विधानेन मन्त्रवत्पैतृमेधिकम् ॥ ९४ ॥

अर्थ— प्रसूत झालेली स्त्री दहा दिवसांच्या आत मरण पावली असता तिची शुद्धता कशी करावी? आणि तिचें दहन कसें करावें? ह्या प्रश्नाचें उत्तर असें कीं, तिच्या अंगावर दहा वेळां सुपानें पाणी घालावें. मग नुसत्या जलानें तिला स्नान घालावें. नंतर पंचपल्लवमिश्रित उदक, पंचगव्य, कुशोदक ह्यांनी क्रमानें स्नान घालावें. ह्याप्रमाणें केल्यावर तिचें विधिपूर्वक दहन करून तिची उत्तरक्रिया करावी.

गर्भिणी स्त्री मृत झाल्यास.

प्रवक्ष्यामि क्रमेणैव शौचं हि गृहमेधिनाम् ॥ गर्भिण्यां तु मृतायां तु कथं कुर्वन्ति मानवाः ॥ ९५ ॥ गर्भिण्या मरणे प्राप्ते षण्मासाभ्यन्तरे यदि ॥ सदैव दहनं कुर्याद्गर्भच्छेदं न कारयेत् ॥ ९६ ॥ प्रेतां स्मशानं नीत्वाऽथ भर्ता पुत्रः पिताऽपि वा ॥ छेदयेदूर्ध्वं षण्मासाज्ज्येष्ठभ्राताऽपि चोदरम् ॥ ९७ ॥ नाभेरधो वामभागे गर्भच्छेदो विधीयते ॥ ततः पुण्याहमन्त्रेण सेचयेद्बालकान्विताम् ॥ ९८ ॥ जीवन्तं बालकं नीत्वा पोषणाय प्रदापयेत् ॥ उदरं चाव्रणं कृत्वा पृषदाज्येन पूरयेत् ॥

अर्थ- रजस्वला स्त्री मृत झाली असतां तिला पंचगव्यानें स्नान घालून दुसरें वस्त्र नेसवून विधिपूर्वक दहन करावें.

बाळंतीण मृत झाली असता.

सूतिकायां मृतायां तु कथं कुर्वन्ति याज्ञिकाः ॥
कुम्भे सलिलमादाय पंचगव्यं तथैव च ॥ ९० ॥
पुण्याहवाचनैर्मन्त्रैः सिक्त्वा शुद्धिं लभेत्तु सा ॥
तेनापि स्नापयित्वा तु दाहं कुर्याद्यथाविधि ॥ ९१ ॥

अर्थ— प्रसूत झालेली स्त्री दहा दिवसांच्या आंत मृत झाली असतां कसें करतात? ह्याचें उत्तर असें कीं, अभिमंत्रण केलेल्या कलशांतील उदक आणि पंचगव्य ह्यांच्या योगानें पुण्याहवाचनाच्या मंत्रांनी तिला सेंचन करून, कलशोदकानें स्नान घालावें, ह्मणजे ती शुध्द होते. मग तिचा यथाविधि दाह करावा.

दुसरे मत

दशाहाभ्यन्तरे चैव म्रियते चेत्प्रसूतिका ॥
कथं तस्या भवेच्छुद्धिर्दाहकर्म कथं भवेत् ॥ ९२ ॥
शूर्पेण स्नापयेद्देही दशवारं ततो जलैः ॥
पञ्चपल्लवसंकल्पैः पञ्चगव्यैः कुशोदकैः ॥ ९३ ॥

कारयित्वा ततः स्नानमभिषिञ्चेत्कुशोदकैः ॥
दाहयित्वा विधानेन मन्त्रवत्पैतृमेधिकम् ॥ ९४ ॥

अर्थ— प्रसूत झालेली स्त्री दहा दिवसांच्या आंत मरण पावली असतां तिची शुद्धता कशी करावी? आणि तिचें दहन कसें करावें? या प्रश्नाचें उत्तर असें की, तिच्या अंगावर दहा वेळां सुपानें पाणी घालावें. मग तुसत्या जलानें तिला स्नान घालावें. नंतर पंचपल्लवमिश्रित उदक, पंचगव्य, कुशोदक यांनी क्रमानें स्नान घालावें. याप्रमाणें केल्यावर तिचें विधिपूर्वक दहन करून तिची उत्तरक्रिया करावी.

गर्भिणी स्त्री मृत झाल्यास.

प्रवक्ष्यामि क्रमेणैव शौचं हि गृहमेधिनाम् ॥ गर्भिण्यां तु मृतायां तु कथं कुर्वन्ति मानवाः ॥ ९५ ॥ गर्भिण्या मरणे प्राप्ते षण्मासाभ्यन्तरे यदि ॥ सद्यैव दहनं कुर्याद्गर्भच्छेदं न कारयेत् ॥ ९६ ॥ प्रेतां स्मशानं नीत्वाऽथ भर्ता पुत्रः पिताऽपि वा ॥ छेदयेदूर्ध्वं षण्मासाज्ज्येष्ठभ्राताऽपि चोदरम् ॥ ९७ ॥ नाभेरधो वामभागे गर्भच्छेदो विधीयते ॥ ततः पुण्याहमन्त्रेण सेचयेद्बालकान्विताम् ॥ ९८ ॥ जीवन्तं बालकं नीत्वा पोषणाय प्रदापयेत् ॥ उदरं चाव्रणं कृत्वा पृषदाज्येन पूरयेत् ॥

॥ ९९ ॥ मृद्भस्मकुशगन्धोदैः पंचगव्यैः सुमन्त्रितैः ॥ स्नापयित्वा पिधा-
यान्यवस्त्रं तचाथ तां दहेत् ॥ १०० ॥

अर्थ— आतां गृहस्थांची आशौचापासून शुद्धि क्रमानें सांगतो. त्यांत गर्भिणी स्त्री मृत झाली असतां लोक कसें करतात? हे सांगतो. गर्भिणी स्त्री जर सहा महिने होण्याच्या पूर्वी मरण पावली तर तिला स्मशानात नेऊन त्या गर्भाशीं सहवर्तमान तिचें दहन करावें. गर्भच्छेद करूं नये. आणि सहा महिन्यापेक्षा अधिक दिवस झाले असतील तर तिला स्मशानात नेऊन तिचा पति, पुत्र, किंवा ज्येष्ठभ्राता ह्यांपैकीं कोणीही तिचें उदर नाभीच्या खालीं डाव्या बाजूला कापावें आणि आतील मूल बाहेर काढावे मग पुण्याहवाचनाच्या मंत्रांनीं त्या बालकासह तिला सेचन करावें. बालक जीवत असल्यास तो पोषणाकरितां कोणाच्यातरी स्वाधीन करावा. उदराच्या छेदांत दही आणि तूप भरून तो छेद बुजवून टाकावा. मग अभिमंत्रण केलेल्या मृत्तिका, भस्म, दर्भ, चंदन ह्यांनीं मिश्रित अशा उदकानें व पंचगव्यानें तिला स्नान घालून, दुसऱ्या वस्त्रानें तिला आच्छादन करून तिचें यथाविधि दहन करावें.

पतीच्या दशाहाशौचात पत्नी प्रसूत झाल्यास

मृते पत्यौ दशाहे स्त्री सूयते च रजस्वला ॥
मृत्वा शुद्धा यथाकालं स्नात्वा चाभरणं त्यजेत् ॥ १०१ ॥

अर्थ— पति मृत झाल्यावर त्याला दहा दिवस होण्याच्या आंतच जर त्याची स्त्री प्रसूत झाली तर ती पुढें ऋतुमती होऊन तिनें योग्यकाळीं [ चवथ्या दिवशीं ] स्नान केलें म्हणजे शुद्ध होते. मग तिनें अलंकार वगैरे सौभाग्यवस्तूंचा त्याग करावा.

वाईट मृत्यु.

विद्युत्तोयाग्निचाण्डालसर्पपाशद्विजादपि ॥
वृक्षव्याघ्रपशुभ्यश्च मरणं पापकर्मणाम् ॥ १०२ ॥

अर्थ— आता दुर्मरण सांगतात— वीज, पाणी, अग्नि, चाडाळ, सर्प, फास, पक्षी, वृक्ष, वाघ आणि अन्यपशु यांच्यापासून पातकी मनुष्याला मरण प्राप्त होतें.

आत्मघात केल्यास.

आत्मानं घातयेद्यस्तु विषशस्त्राग्निना यदि ॥
स्वेच्छया मृत्युमाप्नोति स याति नरकं ध्रुवम् ॥ १०३ ॥
देशकालभयाक्रान्तोऽपि संस्कर्तुं नैव शक्यते ॥
नृपाद्याज्ञां समादाय कर्तव्या प्रेतसत्क्रिया ॥ १०४ ॥
वर्षादूर्ध्वं भवेत्तस्य प्रायश्चित्तं विधानतः ॥

शान्तिकादिविधिं कृत्वा प्रोषधादिकसत्तपः ॥ १०५ ॥
मृतस्यानिच्छया सद्यः कर्तव्या प्रेतसत्क्रिया ॥
प्रायश्चित्तविधिं कृत्वा नैव कुर्यान्मृतस्य तु ॥ १०६ ॥
शस्त्रादिना हते सप्तदिनादर्वाक् मृतो यदि ॥
भवेद्दुर्मरणं प्राहुरित्येवं पूर्वसूरयः ॥ १०७ ॥

अर्थ—विष, शस्त्र किंवा अग्नि ह्यांच्या योगानें जो मनुष्य आपला घात करून घेईल तो स्वेच्छेने मृत्यु पावल्यामुळें नरकाला प्राप्त होतो. असा मृत्यु झाला असता देशकालादिकांच्या भीतीमुळे त्यांची दहनादि क्रिया करणें शक्य नसते. ह्मणून राजाची आज्ञा घेऊन त्याच्या प्रेताचें दहन करावे. नंतर एक वर्ष पूर्ण झाल्यावर प्रायश्चित्त, शांतिविधि, प्रोषधोपवास वगैरे करावेत. आणि आपली इच्छा नसतां वरील प्रकारानें जो मरण पावला असेल त्याचा प्रेतसंस्कार तत्काल करावा. प्रायश्चित्तविधि करण्याची गरज नाही. ज्याला शस्त्रादिकांचा प्रहार झाला आहे असा मनुष्य सात दिवसांच्या आंत जर मृत होईल तर ते दुर्मरण समजावे. असें प्राचीन विद्वानांचे ह्मणणें आहे.

कन्येचें आशौच.

अथ पुत्रीप्रसङ्गः। कन्यानां मरणे चौलात्प्राग्बन्धोः स्नानमिष्यते ॥

व्रतावांगघमेकाहं विवाहात्प्राग्दिनत्रयम् ॥ १०८ ॥
ऊढानां मरणे पित्रोराशौचं पक्षिणी मतम् ॥
ज्ञातीनां वाःप्लवो भर्तुः पूर्णं पक्षस्य चोदितम् ॥ १०९ ॥

अर्थ— आतां कन्येविषयीं सांगतात— चौलसंस्कार करण्याच्या पूर्वी जर कन्या मृत झाली तर तिच्या आईबाप वगैरे बंधुगणानें फक्त स्नान करावें. चौलानंतर व्रतबंध होण्याच्या पूर्वी मृत झाली असतां एक दिवस आशौच धरावें. व्रतबंधानंतर विवाह होण्याच्या पूर्वी मृत झाल्यास तीन दिवस आशौच धरावें. कन्येचा विवाह झाल्यावर जर ती मृत होईल तर तिच्या मातापितरांनी पक्षिणी आशौच धरावें. बंधु वगैरेंनीं स्नान करावें. आणि पति व त्याचे भाऊबंद ह्यांनी दहा दिवस पूर्ण आशौच धरावें.

पक्षिणी वगैरेचें लक्षण.

पक्षिणीलक्षणं— द्विदिवा रात्रिरेका च पक्षिणीत्यभिधीयते ॥
अहोरात्रमिति प्रोक्तं नैशिकीत्यभिधीयते ॥ ११० ॥
आसायमहरेव स्यात्सद्यस्तत्काल उच्यते ॥
एवं विचार्य निर्णीतमाशौचे तु मनीषिभिः ॥ १११ ॥

अर्थ— आता पक्षिणीचें लक्षण सांगतात— सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत असे दोन दिवस, आणि

त्या दोन दिवसाच्या मधली रात्र, ह्या कालाला पक्षिणी असें ह्मणतात. एका अहोरात्राला नैशिकी ह्मणतात. (?) अहोरात्राला एकाह अशी संज्ञा असावी. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतच्या कालाला एकाह ( एक दिवस ) ह्मणतात. आणि ' सद्यः ' ह्याचा अर्थ ' तत्काल ' ह्मणजे त्याच वेळी, असा आहे. असे अर्थ आशौचाच्या प्रकारणांत पंडित लोकांनी ठरविलेले आहेत. ह्यावरून पक्षिणी वगैरे शब्दाचे अर्थ जाणावेत.

प्रसूतास्वथवा तासु मृतासु पितृसद्मनि ॥
मात्रादीनां त्रिरात्रं स्यात्तत्पक्षस्यैकवासरम् ॥ ११२ ॥

अर्थः— आपल्या बापाच्या घरांत कन्या प्रसूत झाली असतां अथवा मृत झाली असतां तिच्या मातापितरांना जननाशौच आणि मृताशौच ही दोन्हीं अशौचे तीन तीन दिवस समजावीत. आणि त्या मुलीचे बधु वगैरे मंडळींना एक दिवस आशौच समजावें.

कन्येला मातापितराचें आशौच.

पुत्रीगृहेऽथवाऽन्यत्र प्रमृतौ पितरौ यदि ॥
दशाहाभ्यन्तरे पुत्र्यास्त्रिरात्र शावसूतकम् ॥ ११३ ॥

अर्थ— कन्येचे आईबाप कन्येच्या घरांत अथवा दुसऱ्या कोठेंही मृत झाले असतां दहा दिवसांच्या आंत केंव्हाही कन्येला समजल्यास तिनें तीन दिवस आशौच धरावें.

भ्रात्याला भगिनीचें व भगिनीला भ्रात्याचे अशौच

स्वसुर्गृहे मृतो भ्राता भ्रातुर्वाऽथ गृहे स्वसा ॥
अशौचं त्रिदिनं तत्र पक्षिण्यौ वा परत्र तु ॥ ११४ ॥

अर्थ— बहिणीच्या घरात भाऊ आणि भावाच्या घरात बहीण मृत झाली असता एकमेकांनीं एकमेकांचें आशौच तीन दिवस धरावें. ते जर दुसऱ्या ठिकाणीं मृत झाले तर परस्परांनीं परस्परांचें पक्षिणी आशौच धरावें.

भगिनीसूतकं चैव भ्रातुश्चैवाऽथ सूतकम् ॥
नैव स्याद्भ्रातृपत्न्याश्च तथा च भगिनीपतेः ॥ ११५ ॥

अर्थ— भगिनीचें सूतक भावाच्या बायकोला असत नाहीं. आणि भावाचें सूतक बहिणीच्या नवऱ्याला असत नाहीं.

परस्परं श्रुते मृत्यौ स्वस्वभ्रात्रोस्तदा तयोः ॥
पत्न्याः पत्युर्भवेत्स्नानं कुटुम्बिनामपि स्मृतम् ॥ ११६ ॥

अर्थ— बहिणीच्या नवऱ्यानें आपल्या बायकोचा बंधु मृत झालेल्याचें ऐकलें म्हणजे फक्त स्नान करावें. तसेंच भावाच्या बायकोनें आपल्या नवऱ्याची बहीण मेल्याचें ऐकलें म्हणजे स्नान करावें.

मातामहादिकाचें आशौच.

मातामहो मातुलश्च म्रियते वाऽथ तत्स्त्रियः ॥
दौहित्रो भागिनेयश्च पित्रोर्वै म्रियते स्वसा ॥ ११७ ॥
स्वगृहे त्र्यहमाशौचं परत्र स्यात्तु पक्षिणी ॥
श्रुतं बहिर्दशाहाच्चेत्स्नानेनैव च शुध्यति ॥ ११९ ॥

अर्थ— आईचा बाप, मावळा, आईची आई, मामाची बायको, मुलीचा मुलगा, बहिणीचा मुलगा, बापाची बहीण, आईची बहीण ह्यापैकीं कोणीही आपल्या घरांत आशौच ज्याला धरावयाचें आहे त्याच्या घरांत मृत झाले असतां त्यानें तीन दिवस आशौच धरावें. बाहेर दुसरीकडे मृत झाले असतां पक्षिणी; आणि दहा दिवस होऊन गेल्यावर समजल्यास फक्त स्नान केल्यानें शुद्धि होते.

ज्यांचें आशौच धरण्याचें कारण नाहीं ते

व्याधितस्य कदर्यस्य ऋणग्रस्तस्य सर्वदा ॥
क्रियाहीनस्य मूर्खस्य स्त्रीजितस्य विशेषतः ॥ ११९ ॥
व्यसनासक्तचित्तस्य पराधीनस्य नित्यशः ॥
श्राद्धत्यागविहीनस्य पण्ढपाखण्डपापिनाम् ॥ १२० ॥

पतितस्य च कुष्टस्य भस्मान्तं सूतकं भवेत् ॥
यदि दग्धं शरीरं चेत्सूतकं तु दिनत्रयम् ॥ १२१ ॥

अर्थ— महाव्याधीनें ग्रासलेला, कृपण, ऋणानें गांजलेला, क्रियाहीन, मूर्ख, स्त्रीच्या इच्छेप्रमाणे वागणारा, व्यसनात गढलेला, नेहमी दुसऱ्याच्या ताब्यांत वागणारा, मातापितरांची श्राद्धं न करणारा, यतीला अन्नदान न करणारा, नपुंसक, पाखंडी, भ्रष्ट झालेला आणि दुष्ट असलेला अशा लोकांचे आशौच त्याच्या शरीराची रक्षा होईपर्यंतच समजावें. जर कदाचित् आपल्याला समजण्याच्या पूर्वीच त्याच्या देहाचें दहन झालेलें असेल तर तीन दिवस आशौच धरावें.

व्रत करणारे वगैरेनीं आशौच न धरण्याविषयीं

व्रतिनां दीक्षितानां च याज्ञिकब्रह्मचारिणाम् ॥
नैवाशौचं भवेत्तेषां पितुश्च मरण विना ॥ १२२ ॥

अर्थ— व्रत करणारे, दीक्षा घेतलेले, यज्ञ करणारे आणि ब्रह्मचारी ह्यांना कोणाचे आशौच धरावें लागत नाहीं. फक्त पिता मृत झाला असतां मात्र ह्यांनीं आशौच धरलें पाहिजे.

श्रोत्रियादिकाचे आशौच.

श्रोत्रियाचार्यशिष्यर्षिशास्त्राध्यायाश्च वै गुरुः ॥

मित्रं धर्मी सहाध्यायी मरणे स्नानमादिशेत् ॥ १२३ ॥

अर्थ— श्रोत्रिय, आचार्य, शिष्य, ऋषि, शास्त्राध्यापक, गुरु, मित्र, धार्मिक मनुष्य आणि सहाध्यायी ह्यांचा मृत्यु झाला असतां स्नान करावें.

यज्ञादिकर्म आरंभ केले असता.

समारब्धेषु वा यज्ञमहान्यासादिकर्मसु ॥
बहुद्रव्यविनाशे तु सद्यः शौचं विधीयते ॥ १२३ ॥

अर्थ— यज्ञ, महान्यास वगैरे कर्म आरंभिलीं असतां मध्येच आशौच प्राप्त झाल्यास तत्काल शुद्धि होते असे समजावें. तसेंच आपला मोठा द्रव्यनाश होण्याचा प्रसंग आला असतांही तत्काल शुद्धि होते. असे शास्त्रानें ठरविलें आहे.

प्रेताच्या संस्काराचा अग्नि

सन्न्यासविधिना धीमान् मृतश्चेद्धार्मिकस्तदा ॥
ब्रह्मचारी गृहस्थश्च देहसंस्कार इष्यते ॥ १२४ ॥
कायमाने गृहाद्बाह्ये शवं प्रक्षाल्य नूतनैः ॥
वसनैर्गन्धपुष्पाद्यैरलंकुर्याद्यथोचितम् ॥ १२५ ॥

अथ संस्कृतये तस्य लौकिकाग्नि यथाविधि ॥
आदाय प्रयते देशे कुर्यादौपासनानलम् ॥ १२६ ॥
विद्वच्छिष्टपुरुषशवसंस्करणाय वै ॥
एष औपासनोऽग्निः स्यादन्येषां लौकिको भवेत् ॥ १२७ ॥

अर्थ— कोणी धार्मिक मनुष्य गृहस्थ अथवा ब्रह्मचारी संन्यासविधीनें मरण पावला अससां त्याच्या देहाला सस्कार करणे इष्ट आहे. ह्मणून तो मृत झाल्यावर त्याचा देह घरांतून बाहेर आणून तें मेत धुवावें. नंतर नवीन वस्त्रे आणि गंध, फुलें इत्यादिक वस्तूंनीं त्या प्रेताला सुशोभित करावें, मग त्या प्रेताच्या संस्काराकरिता शुद्ध स्थली लौकिक अग्नि ( चुलीतील अग्नि ) आणून त्याचा यथाविधि औपासनाग्नि तयार करावा हा औपासनाग्नि ज्ञानवान् आणि धार्मिक अशा मनुष्याच्या प्रेताचा दहनविधि करावयाचा असेल, तरच तयार करावा. बाकीच्या लोकांच्या प्रेताचा लौकिकाग्नीनेंच दाह करावा.

सन्तापाग्नि वगैरे अग्नींच्या ग्रहणाचे प्रसंग

कन्याया विधवायाश्च सन्तापाग्निरिहेष्यते ॥
अन्यासां वनितानां स्यादन्वग्निरिह कर्मणि ॥ १२८ ॥

अर्थ— विवाह न झालेली मुलगी किंवा विधवा स्त्री ह्यांच्या दहनाला संतापाग्नि असणें योग्य आहे.

आणि इतर स्त्रियाच्या दहनाला अन्वग्नि असावा.

लौकिकाग्नीचे ग्रहण व लौकिकाग्नीचे लक्षण

द्विजातिव्यतिरिक्तानां सर्वेषां लौकिको भवेत् ॥
गृहे पाकादिकार्यार्थं प्रयुक्तो लौकिकोऽनलः ॥ १२९ ॥

अर्थ— त्रैवर्णिकावांचून बाकीच्या सर्व जातींतील मनुष्यांच्या प्रेतक्रियेस लौकिका अग्निसावा. घरात स्वयंपाक वगैरे करण्याकरितां तयार केलेला जो अग्नि तो लौकिकाग्नि होय.

औपासनाग्नीचे लक्षण.

योग्यप्रदेशे संस्थाप्य द्रव्यैस्तैः शास्त्रचोदितैः ॥
हुत्वा संस्कृत्य बाह्याग्निरौपासन इति स्मृतः ॥ १३० ॥

अर्थ— योग्यप्रदेशी (स्थंडिल किंवा कुंड ह्यांत) लौकिकाग्नीची स्थापना करून शास्त्रांत सांगितलेल्या द्रव्यानी हवन करून संस्कार करून तयार केलेला जो अग्नि तो औपासनाग्नि होय.

सतापाग्नीचें लक्षण.

दर्भैर्दर्भैरिति पञ्चकृत्वः सन्तापयेत्ततः ॥
काष्ठौघैर्बोधितो वन्हिः सन्तापाग्निरितीरितः ॥ १३१ ॥

अर्थ— पांच वेळ दर्भ पेटवून उत्पन्न केलेल्या अग्नीस लाकडाच्या योगानें प्रज्वलित केला म्हणजे त्याला संतापाग्नि म्हणतात.

अन्वग्नीचें लक्षण.

चुल्यामग्निं समुज्वाल्य न्यस्य स्थालीं तदूर्ध्वतः ॥
तत्र स्थितैः करीषाद्यैर्बोधितोऽन्वग्निरिष्यते ॥ १३२ ॥

अर्थ— चुलींत अग्नि पेटवून त्याच्यावर पात्र ठेवून त्यांत वाळलेल्या शेणी वगैरे इंधन टाकून प्रज्वलित केलेल्या अग्नीस अन्वग्नि म्हणतात.

तत्तच्छरीरसंस्कारे यस्तु योग्य इतीष्यते ॥
अग्निं तमेव काष्ठाद्यैरुखायां प्रतिबोधयेत् ॥ १३३ ॥

अर्थ— त्या त्या शरीराच्या दाहक्रियेला जो योग्य अग्नि असेल तो अग्नि काष्ठादिकाच्या योगानें शेगडींत किंवा गाडग्यांत प्रज्वलित करावा.

प्रेतवहनादिकाविषयीं.

वोढारश्चाथ चत्वारः कल्पनीयाः सजातयः ॥
त एव योज्या भूपायां वाहे दाहे शवस्य हि ॥ १३४ ॥

अर्थ— प्रेत वाहणारे चार असामी आपल्या जातीचेच असावेत. आणि त्यांनीं प्रेताला भूषित करणें, वाहणें, दाह करणे ह्या क्रिया कराव्यात.

शोभमाने विमाने च शाययित्वा शवं दृढम् ॥
मुखाद्यङ्गं समाच्छाद्य वस्त्रैः स्रग्भिस्तदूर्ध्वतः ॥ १३५ ॥
तद्विमानं समाधृत्य शनैर्ग्रामाभिमस्तकः ॥
वोढारस्ते नयेयुस्तं नयेदेक उखानलम् ॥ १३६ ॥

अर्थ— सुशोभित विमान करून त्यांत तें प्रेत न हालेल अशा प्रकारें निजवावें. मग वस्त्राने त्याचें मुख वगैरे सर्व शरीर झाकावे; आणि त्याच्यावर फुलांच्या माळा घालाव्यात. मग तें विमान उचलून चार असामींनीं त्या प्रेताचें मस्तक गांवाकडे होईल अशा रीतीनें खांद्यावर घेऊन हळू हळू न्यावें. आणि एका मनुष्यानें तो अग्नि बरोबर न्यावा.

अर्धमार्गातील क्रिया

विमानमवरोप्याथ मार्गस्यार्धे निवेश्य च ॥
विधूत्य तन्मुखं स्वीयो मुहुस्तोयैस्तु सिञ्चयेत् ॥ १३७ ॥
विमानस्य पुरोदेशे गच्छेयुर्ज्ञातयस्ततः ॥

शवानुगमनं कुर्युः शेषा मार्गे स्त्रियोऽपि च ॥ १३८ ॥

अर्थ— स्मशानाच्या अर्ध्या वाटेवर गेल्यानंतर तें विमान खालीं ठेवावें. मग त्या मृताच्या जवळच्या मनुष्यानें (पुत्र वगैरेनें) त्याच्या तोंडावरील आच्छादन काढून त्याच्या तोंडांत थोडेंसें पाणी घरचेवर घालावें. विमानाच्या पुढें त्या मृत झालेल्या मनुष्याच्या नातलगांनीं गमन करावें आणि बाकीच्या मंडळींनीं व स्त्रियांनी मागून गमन करावें.

चितेवरील प्रेतसंस्कार.

प्रमादपरिहारार्थं परीक्ष्यैवं प्रयत्नतः ॥
स्मशानाभिमुखं पश्चान्नीत्वा तत्रावरोप्य च ॥ १३९ ॥
ततः संस्थितमुद्धृत्य चितायां पूर्वदिङ्मुखम् ॥
उपवेश्योत्तरास्यं वा मुखरन्ध्रेषु सप्तसु ॥ १४० ॥
सुवर्णेनोद्धृतं सर्पिर्दधि च स्पर्शयेत्ततः ॥
अक्षतांश्च तिलांश्चापि मस्तके प्रक्षिपेदनु ॥ १४१ ॥

अर्थ— चुकी न व्हावी म्हणून अशा तऱ्हेनें परीक्षा करून मग तें प्रेत स्मशानाकडे नेऊन तेथें ठेवावें. मग पूर्वेकडे अथवा उत्तरेकडे मस्तक करून त्या प्रेताला चितेवर ठेवावें. नंतर तूप आणि

दही सोन्याच्या तुकड्यानें घेऊन त्या प्रेताचें तोंड, नाकाचीं दोन छिद्रें, दोन डोळे आणि दोन कान ह्या सात ठिकाणीं घालावें. अक्षता आणि तीळ त्याच्या मस्तकावर टाकावेत.

एकवारं जलं सव्यधारया पातयेत्ततः ॥
द्विवारमपसव्येन शवनालकसेचकः ॥ १४२ ॥
ततोऽपि सर्वबन्धूनां पर्ययास्तु त्रयो मताः ॥
पूर्वान्त्यौ सव्यवृत्त्यैव मध्यमस्त्वपसव्यतः ॥ १४३ ॥
मुक्तकेशाः कनिष्ठा ये प्रलम्बितकरद्वयाः ॥
पर्ययद्वितयं कुर्युस्तृतीय वृद्धपूर्वकम् ॥ १४४ ॥

अर्थ— त्या प्रेताच्या मुखात प्रथम ज्यानें पाणी घातलें असेल त्यानें चितेवरील प्रेताच्या मुखांत एकवार सरळें पाणी द्यावें. आणि नंतर दोन वेळा अंगठ्याकडून पाणी द्यावें. मग बाकीच्या सर्व मंडळींनीं तीन पर्यय (क्रम) करावेत. त्यात पहिल्या आणि तिसऱ्या पर्ययांत प्रेताच्या मुखांत पाणी सव्यानें घालावें. आणि मधल्या दुसऱ्या पर्ययांत अपसव्यानें घालावें. त्यांत पहिला आणि तिसरा पयय मृत झालेल्या मनुष्यापेक्षां जे लहान असतील त्यांनीं केश मोकळे सोडून सरळ हातानें पाणी देऊन

प्रारंभ करावा. आणि मधला पर्यय मृत झालेल्या मनुष्यापेक्षां वृद्ध असलेल्या आप्तस्त्रीयांनी अपसव्यानें प्रारंभ करावा.

ततः प्रदक्षिणीकुर्याच्चितापार्श्वे परिस्तरम् ॥
खादिरैरिन्धनैरन्यैरथवा हस्तविस्तृतम् ॥ १४५ ॥

अर्थ— नंतर त्या चितेला प्रदक्षिणा करावी. मग चितेवर एका बाजूस खैराच्या किंवा दुसऱ्या लाकडाचें एकहात विस्ताराचें परिस्तर(? स्थंडिल असा अर्थ असावा) करावें.

उखावह्निं समुद्दीप्य सकृदाज्यं प्रयोज्य च ॥
पर्युक्ष्य निक्षिपेत्पश्चाच्छनैस्तत्र परिस्तरे ॥ १४६ ॥
ततः समन्तात्तस्योर्ध्वं निदध्यात्काष्ठसञ्चयम् ॥
सर्वतोऽग्निं समुज्वाल्य सम्प्लुष्यात्तत्कलेवरम् ॥ १४७ ॥

अर्थ— मग त्या शेगडीतील किंवा गाडग्यांतील पूर्वी आणलेला अग्नि प्रज्वलित करून त्यावर एक तुपाची आहुति घालून त्या अग्नीच्या भोंवत्यानें उदकानें सेचन करून, तो अग्नि त्या परिस्तरावर टाकावा. नंतर त्या परिस्तरावर चोहीकडून लाकडांचा ढीग घालून, त्या चितेवर तो अग्नि चोहीकडून पेटवावा, आणि ते मृताचें शरीर दहन करावें.

चिता रचणे वगैरेचे मंत्र व विधि

ॐ ह्रीं ह्रः काष्ठसञ्चयं करोमि स्वाहा ॥ १ ॥ ॐ ह्रीं ह्रौं झौं अ सि आ उ सा काष्ठे शवं स्थापयामि स्वाहा ॥ २ ॥ इति मंत्रेण पञ्चामृतैरभिषिञ्च्य तत्पुत्रादयो वा त्रिःप्रदक्षिणां कृत्वा काष्ठे शवं स्थापयेयुः ॥

अर्थ— 'ॐ ह्रीं ह्रः' इत्यादि मंत्रानें लांकडे गोळा करावीत, नंतर 'ॐ ह्रीं ह्रौं' इत्यादि मंत्रानें त्या काष्ठांवर ते प्रेत ठेवावें. ते मृताच्या पुत्रानें किंवा दुसऱ्या कोणी तरी पंचामृतानें अभिषेक करून त्याला तीन प्रदक्षिणा घालून ठेवावें.

ॐ ॐ ॐ ॐ रं रं रं रं अग्निसन्धुक्षणं करोमि स्वाहा ॥ अनेनाग्निं सन्धुक्ष्य सर्पिरादिना प्रसिञ्च्य प्रज्वाल्य जलाशयं गत्वा स्नानं कुर्यात् ॥

अर्थ— नंतर 'ॐ ॐ' इत्यादि मंत्रानें अग्नि वाढवून त्यावर तूप वगैरे घालून प्रज्वलित करून मग जलाशयांत जाऊन स्नान करावें.

अथोदकान्तमायान्तु सर्वे ते ज्ञातिभिः सह ॥
वोढारस्तत्र कर्ता च यान्तु कृत्वा प्रदक्षिणम् ॥ १४८ ॥

अर्थ— मग वाहक, कर्ता वगैरे सर्व मंडळींनी त्या चितेला प्रदक्षिणा करून पाण्याच्या सन्निध प्राप्त व्हावें.

दुर्योगावर मरण झाले असता प्रेतसंस्कार करणाऱ्याला प्रायश्चित्त

तिथिवारर्क्षयोगेषु दुष्टेषु मरणं यदि ॥ मृतस्योत्थापनं चैव दीर्घकालादभूद्यदि ॥ १४९ ॥ तद्दोषपरिहारार्थं कर्ता कृत्वा प्रदक्षिणम् ॥ प्रांजलिः प्रार्थ्य गृण्हीयात्प्रायश्चित्तं विपश्चितः ॥ १५० ॥ यथाशक्ति जिनेज्या च महायन्त्रस्य पूजनम् ॥ शान्तिहोमयुतो जाप्यो महामन्त्रस्य तस्य वे ॥ १५१ ॥ आहारस्य प्रदानं च धार्मिकाणां शतस्य वा ॥ तदर्धस्याथ वा पंचविंशतेः प्रविधीयते ॥ १५२ ॥ तीर्थस्नानानि वन्द्यानि नव वा सप्त पंच वा ॥ दुष्टतिथ्यादिमरणे प्रायश्चित्तमिदं भवेत् ॥ १५३ ॥

अर्थ— तिथि, वार, नक्षत्र आणि योग हे मरणकाली वाईट असले तर अथवा मृत मनुष्य पुष्कळ वेळानें ( स्मशानात नेल्यावर ) उठून बसल्यास त्या दोषाच्या निवारणाकरितां कर्त्यानें ( प्रेतसंस्कार करणाऱ्यानें ] प्रायश्चित्त करावें. त्यानें पंडितांना प्रदक्षिणा करून ह्या दोषाला प्रायश्चित्त सांगण्याबद्दल त्यांची प्रार्थना करावी, आणि प्रायश्चित्त करावें. तें असें—आपल्या शक्तीप्रमाणें जिनपूजा करावी. महायंत्राचें पूजन करावें. शंभर, पंन्नास किंवा पंचवीस धार्मिकांना आहारदान करावें. शांतिहोमयुक्त असा मूलमंत्राचा

जप करावा. नऊ, सात किंवा पांच तीर्थस्नाने करावीत. ह्याप्रमाणे दुष्टतिथ्यादिकांचे ठिकाणी मरण झालें असतां प्रायश्चित्त करावें.

दुष्काळ वगैरेसंबधाने मरण झालें असता

अतिदुर्भिक्षशस्त्राग्निजलयात्रादिना मृते ॥
प्रायश्चित्तं तु पुत्रादेस्तदानीमिदमिष्यते ॥ १५४ ॥
महायन्त्रं समाराध्य शान्तिहोमौ विधाय च ॥
अष्टोत्तरसहस्रेण घटैरष्टशतेन वा ॥ १५५ ॥
जिनस्य स्नपनं कार्यं पूजा च महती तदा ॥
दश तीर्थानि वन्द्यानि नव वा सप्त पञ्च वा ॥ १५६
गोदानं क्षेत्रदानं च तीर्थस्य विदुषामपि ॥
पञ्चानां मिथुनानां तु अन्नदानं सुधर्मिणाम् ॥ १५७ ॥
अब्दादर्वाग्विधायैवं पूजनीयो जिनोत्तमः ॥
एवं कृते तु बन्धूनां स दोष उपशाम्यति ॥ १५८ ॥

अर्थः—अतिशय दुष्काळ, शस्त्र, अग्नि, जलपर्यटन ह्या योगानें जर कोणी मृत झाला, तर त्या वेळी

त्याच्या पुत्रादिकांनीं प्रायश्चित्त करावें.' महायंत्राचें पूजन करून शांतिपाठ आणि होम करावा. अष्टोत्तरसहस्र किंवा अष्टोत्तरशत कलशांनीं श्रीजिनाला आभिषेक करून महापूजा करावी. दहा, नऊ, सात किंवा पाच तीर्थस्नानें करावीत. 'तीर्थक्षेत्रांतील' विद्वान् ब्राह्मणांना गोप्रदान भूमिदान करावें. धार्मिक अशा पांच दंपत्यांना भोजन घालावें. हा प्रायश्चित्तविधि मृताला एक वर्ष पूर्ण होण्याच्या आंत करावा. नंतर श्रीजिनाचें पूजन करावें. याप्रमाणें प्रायश्चित्त केलें म्हणजे मृत झालेल्याच्या बंधुवर्गाचा तो दोष शांत होतो,

प्रायश्चित्त कोणी सांगावें?

विद्वद्भिशिष्टपुरुषैः प्रायश्चित्तमिदं तदा ॥
वक्तव्यं प्रकटं कृत्वा ग्राह्यं कर्त्रा यथाबलम् ॥ १५९ ॥

अर्थ— विद्वान् लोकांनीं प्रायश्चित्त हें सांगावें, आणि कर्त्यानें तें प्रायश्चित्त आपल्या शक्तीप्रमाणें करावें.

क्षौरविधि.

ततः कपालदहने जाते कर्ता च दाहकः ॥
ज्ञातयश्च यथायोग्यं विदध्युर्वपनं तदा ॥ १६० ॥
मातुः पितुः पितृव्यस्य मातुलस्याग्रजस्य च ॥

श्वशुराचार्ययोरेषां पत्नीनां च पितृष्वसुः ॥ १६१ ॥
मातृष्वसुर्भगिन्याश्च ज्येष्ठाया मरणे सति ॥
दृष्टे तदानीं वपनं श्रुते प्राङ्मासतो भवेत् ॥ १६२ ॥
मातरं पितरं ज्येष्ठमाचार्यं श्वशुरं विना ॥
न कार्यं वपनं कन्यामृतौ गर्भवतीं तदा (?) ॥ १६३ ॥

अर्थ—नंतर त्या प्रेताचें मस्तक दहन झाल्यावर कर्ता (पुत्र वगैरे मृताच्या अंत्यकर्माचा अधिकारी) किंवा दहन करणारा आणि मृताचा बंधुवर्ग ह्यांपैकीं ज्यांना अधिकार असेल त्यांनी यथाशास्त्र वपन (क्षौर) करावें. आईबाप मृत झाले असतां पुत्रानें वपन करावें. मातुल, ज्येष्ठभ्राता, श्वशुर, आचार्य आणि ह्यांच्या स्त्रिया, आईची वहीण, बापाची वहीण आणि आपली वडील वहीण ह्यांपैकीं कोणीही मृत्यु पावले असतां वपन करावें. आईबाप किंवा आपल्यापेक्षां वडील असे कोणी मृत झाल्यास व आचार्य, श्वशुर हे मृत झाल्यास वपन करावें. हा वपनविधि मृताच्या मरणकालीं पुत्रादिक तेथें असल्यास त्यांनीं तत्काल करावा. आणि ते जर देशांतरीं असतील तर त्यांनी मृताला एक महिना होण्याच्या आंत मरण कळल्यास करावा. नाहींतर करूं नये. कन्या मृत झाली असतां वपन करूं नये.

वपनानंतर स्नानविधि

ततोऽवगाह्य सलिले काद्दिद्वे सचेलकम् ॥
निमज्योत्थाय वारांस्त्रीन् स्नानं कुर्याद्यथाविधि ॥ १६४ ॥
जलान्निर्गत्य तत्तीरे वस्त्रं निष्पीड्य तत्पुनः ॥
धृत्वाऽऽचम्य ततः प्राणायामं कुर्यात्समन्त्रकम् ॥ १६५ ॥

अर्थ— वपन झाल्यावर कंबरेइतक्या पाण्यांत जाऊन, तीन वेळ नेसलेल्या आणि पांघरलेल्या वस्त्रासह बुड्या मारून यथाविधि स्नान करावें. नंतर पाण्यांतून तीरावर येऊन अंगावरचें वस्त्र पिळून नेसावें. आणि आचमन प्राणायम मंत्रपूर्वक करावेत.

शिलास्थापन व ग्रामप्रवेशविधि.

ततो मृतस्य तस्यास्य रत्नत्रयसमाश्रयम् ॥
देहं विनष्टं सन्न्याससमाधिमृतिसाधनम् ॥ १६६ ॥
उत्कृष्टपरलोकस्य सम्प्राप्तेरपि कारणम् ॥
मत्वेति धर्मवात्सल्याद्बन्धुवात्सल्यतोऽपि च ॥ १६७ ॥
तद्देहप्रतिबिम्बार्थं मण्डपे तद्गिनाऽपि वा ॥
स्थापयेदेकमश्मानं तीरे पिण्डादिदत्तये ॥ १६८ ॥

पिण्डं तिलोदकं चापि कर्ता दद्याच्छिलाग्रतः ॥
सर्वे पि बन्धवो दद्युः स्नात्वा तत्र तिलोदकम् ॥ १६९ ॥
ततोऽपि स्नानमाचार्यो निमज्जनसमन्वितम् ॥
ततः कनिष्ठं कृत्वाऽग्रे सर्वे ग्रामं प्रयान्तु वै ॥ १७० ॥

अर्थः— नंतर–रत्नत्रयाला आश्रय, संन्यास किंवा समाधि ह्यांच्या योगानें मृत्यु येण्याचें साधन, उत्कृष्ट अशा परलोकांच्या प्राप्तीचें बीज असा जो मृत झालेल्या त्या जीवाचा देह तो नष्ट झाला! असें मानून–धर्मप्रेमानें व मृत झालेल्या जीवाविषयींच्या प्रेमानें त्याच्या शरीराची प्रतिकृति ( प्रतिमा ) असें समजून एक पाषाण, जलाशयाच्या तीरावर मंडप करून त्यात किंवा मंडप न घालतां स्थापन करावी. नंतर मृताची उत्तरक्रिया करणाऱ्यानें त्या शिलेपुढें पिंडदान करावें, व तिलोदकदान करावें. मग बाकीच्या बंधुवर्गानेंही स्नान करून त्या शिलेच्या अग्रभागीं तिलोदक द्यावें. नंतर क्रिया सांगणाऱ्या आचार्यानें स्नान केल्यावर त्या ठिकाणीं आलेल्या मंडळींत जो सर्वांत लहान असेल त्याला पुढें करून त्याच्यापेक्षां मोठ्याला त्याच्या पाठीमागें ह्या क्रमानें सर्वांनीं गांवांत जावें.

दुसऱ्या दिवसापासून करण्याची क्रिया.

परेद्युरपि पूर्वाह्णे योषितो ज्ञातयोऽपि वा ॥

गत्वा स्मशानं तत्राग्नौ विदध्युः क्षीरसेचनम् ॥ १७१ ॥
तृतीये दिवसे कुर्यादग्निनिर्वापनं प्रगे ॥
अस्थिसञ्चयनं तुर्ये पञ्चमे वेदिनिर्मितिम् ॥ १७२ ॥
तत्र पुष्पाजंलिं षष्ठे सप्तमे बलिकर्म च ॥
वृक्षस्य स्थापनं पश्चान्नवमे भस्मसंस्कृतम् ॥ १७३ ॥
दशमे तु गृहामत्रवासःशुद्धिं विधाय च ॥
स्नात्वा च स्नापयित्वा च दाहकं भोजयेद्गृहे ॥ १७४ ॥
एवं दशाहपर्यन्तमेतत्कर्म विधीयते ॥
पिण्डं तिलोदकं चापि कर्ता दद्यात्तदाऽन्वहम् ॥ १७५ ॥

अर्थ— दुसऱ्या दिवशी प्रातःकाली स्त्रिया किंवा मृताच्या बंधुगणापैकीं कोणी तरी स्मशानात चितेवरील अग्नीवर दूध शिंपडावें. तिसऱ्या दिवशी सकाळी अग्नि शांत करावा. चवथ्या दिवशी सकाळी मृताच्या अस्थि गोळा कराव्यात. पांचव्या दिवशीं वेदिनिर्माण ( प्रेत दहन केलेल्या जागीं वेदि ह्मणजे, कट्टा ) करावें. सहाव्या दिवशीं त्यावर पुष्पांजलि द्यावी. सातव्या दिवशी बलिदान करावें. आठव्या दिवशीं वृक्षस्थापना करावी. नवव्या दिवशीं भस्मसंस्कार करावा, आणि दहाव्या दिवशी घर, भांडीं

वगैरे वस्तु शुद्ध करून सर्वांना स्नान करून व मंत्र म्हणून करणाऱ्याने स्नान करून त्याला आपल्या घरीं भोजन घालावें. याप्रमाणें दहा दिवसपर्यंत वरील सर्व क्रिया करावी. या दहा दिवसांत उत्तरकर्म करणाऱ्यानें प्रतिदिवशीं पिंड आणि तिलोदक यांचें दान मृताच्या उद्देशानें करावें.

पिण्डप्रदानतः पूर्वमन्ते च स्नानमिष्यते ॥

पिण्डः कापित्थमात्रश्च स च शाल्यन्धसा कृतः ॥ १७६ ॥

तत्पाकश्च बहिः कार्यस्तत्पात्रं च शिलाऽपि च ॥

कर्तुः संव्यानकं चापि बहिः स्थाप्यानि गोपिते ॥ १७७ ॥

अर्थ— पिंडदान करण्याच्या पूर्वी आणि पिंडदान केल्यानंतर असें दोन वेळ कर्त्यानें स्नान करावें. पिंड तांदुळ शिजवून त्याच्या भाताचा कवठा एवढा मोठा करावा. पिंडाकरितां जे तांदुळ शिजवावयाचे ते घरांत शिजवूं नयेत, बाहेर शिजवावेत, आणि भाताचें भांडें, शिळा आणि पिंडदान करतांना असलेलीं नेसावयाचें व पांघरावयाचें अशीं दोन वस्त्रें बाहेरच कोठेतरी गुप्त ठिकाणीं ठेवावीत; घरांत आणूं नयेत.

दिनादि कर्ता [illegible]

कर्तुः प्रेतादिपर्यन्तं न देवादिगुरुश्रमः ॥

नाधीत्यध्यापनादीनि न ताम्बूलं न चन्दनम् ॥ १७८ ॥

न खट्वाशयनं चापि न सदस्युपवेशनम् ॥
न क्षौरं न द्विभुक्तिश्च न क्षीरघृतसेवनम् ॥ १७९ ॥
न देशान्तरयानं च नोत्सवागारभोजनम् ॥
न योषासेवनं चापि नाभ्यङ्गस्नानमेव च ॥ १८० ॥
न मृष्टभक्ष्यसेवा च नाक्षादिक्रीडनं तथा ॥
नोष्णीषधारणं चैषां प्रेतदीक्षा भवेदिह ॥ १८१ ॥

अर्थ— मृताची उत्तरक्रिया करणाऱ्यानें ती क्रिया समाप्त होईपर्यंत देवपूजा वगैरे गृहस्थाश्रमाच्या क्रिया करूं नयेत. अध्ययन अध्यापन करूं नये. तांबूल भक्षण, चंदन धारण करूं नये. पलंगावर शयन करूं नये. सभेंत बसूं नये. क्षौर करूं नये. दोन वेळ भोजन, दूध, तूप ह्यांचें सेवन करूं नये. स्त्रीसमागम करूं नये. तेल लाऊन स्नान करूं नये देशांतरीं गमन करूं नये. ज्याच्या घरांत उत्सव असेल तेथें भोजन करूं नये. गोड अन्न भक्षण करूं नये. फासे सोंगट्या वगैरेंनी खेळूं नये. डोकीला पागोटें वगैरे घालूं नये. ह्याप्रमाणें ही प्रेतदीक्षा समजावी.

यावन्न क्रियते शेषक्रिया तावदिदं व्रतम् ॥
आचार्यकर्तुरेकस्य ज्ञातीनां द्वादशाहतः ॥ १८२ ॥ (?)

अर्थ— आचार्य आणि कर्ता या दोघांनीं हें वरील व्रत सर्व क्रिया समाप्त होईपर्यंत ( चवदा दिवस ) करावें. आणि इतर भाऊबंदांनीं हें व्रत बारा दिवस करावें.

कर्तृनिर्णय व इतर शास्त्रार्थ.

कर्ता पुत्रश्च पौत्रश्च प्रपौत्रः सहजोऽथवा ॥
तत्सन्तानः सपिण्डानां सन्तानो वा भवेदिह ॥ १८३ ॥
सर्वेषामप्यभावे तु भर्ता भार्या परस्परम् ॥
तत्राप्यन्यतराभावे भवेदेकः सजातिकः ॥ १८४ ॥
उपनीतिविहीनोऽपि भवेत्कर्ता कथञ्चन ॥
स चाचार्योक्तमन्त्रान्ते स्वाहाकारं प्रयोजयेत ॥ १८५ ॥
प्रेतकार्यस्य पाश्चात्यक्रिया शेषक्रिया भवेत् ॥
तस्याप्यघस्य संशुद्धिर्दशमे दिवसे भवेत् ॥ १८६ ॥
तदैव पिण्डं पाषाणमुध्दृत्य सलिले क्षिपेत् ॥
तदूर्ध्वं द्वादशाहं तु भवेच्छेषक्रियाक्रमः ॥ १८७ ॥

अर्थ— मृताची क्रिया करण्याचा अधिकार पुत्र, नातु, पणतु, बंधु त्याचे मुलगे आणि दहा दिवस

आशौच धरणारे भाऊबंद इतक्यांना आहे. त्यांत पुत्र नसल्यास क्रमानें पुढच्यापैकीं जो असेल त्याला अधिकार समजावा. हे वर सांगितलेले जे पुरुष त्यांपैकीं जर कोणीच नसेल तर पत्नीला अधिकार आहे. आणि पत्नीचें प्रेतकर्म करण्यास पतीला अधिकार आहे. वर जे अधिकारी सांगितले आहेत त्यांतील जो प्रेत-कर्म करण्याला योग्य असेल त्याचें उपनयन झालें नसलें तरी कांहीं हरकत नाहीं. त्यानें आचार्यानें मंत्र ह्मटल्यावर फक्त स्वाहाकार ह्मणावा. प्रेतदहन केल्यानंतरची जी क्रिया तिला शेषक्रिया ह्मणतात. ती सर्व क्रिया संपेपर्यंत (दहा दिवसपर्यंत) कर्ता अशुचि समजावा. दहा दिवसानंतर तो शुद्ध होतो. कर्त्यानें दहावे दिवशीं पिंड आणि पाषाण पाण्यांत टाकून न्हावेत. मग पुढें बाराव्या दिवसापर्यंत शेषक्रिया क्रमानें करावयाची असते ती करावी.

अस्थिसंचय.

तदाऽस्थिसञ्चयश्चापि कुजवारे निषिध्यते ॥
तथैव मन्दवारे च भार्गवादित्ययोरपि ॥ १८८ ॥
अस्थीनि तानि स्थाप्यानि पर्वतादिशिलाबिले ॥
प्रकृत्यवधिखातोर्व्यामथवा पौरुषावटे ॥ १८९ ॥

अर्थ— मृताच्या अस्थि गोळा करणें तें मंगळवार, शनिवार, शुक्रवार आणि रविवार ह्या वारीं करूं

नये. अस्थि काढून पर्वतांच्या गुहेत ठेवाव्यात. किंवा जमिनींत पुरुषभर ( पांच हात ) किंवा साडेतीन हात खड्डा काढून त्यांत पुरून ठेवाव्यात.

एकादशाहकृत्य.

एकादशेऽह्नि दहनभूषावहनकारकान् ॥
इति षट्पुरुषान् स्नानभोजनैः परितर्पयेत् ॥ १०० ॥

अर्थ— अकराव्या दिवशीं-प्रेताचें दहन करणारा एक, प्रेताला सुशोभित करणारा एक आणि चार वाहक या सहा असामींना-स्नान व भोजन घालून संतुष्ट करावें.

द्वादशाहकृत्य.

द्वादशे दिवसे श्रीमज्जिनपूजापुरस्सरम् ॥
मुनीनां पान्थयानां च श्राद्धं कुर्यात्समाहितः ॥ १०१ ॥
अन्नाद्यक्षप्रदानं तु सद्भ्यः श्राद्धमितीष्यते ॥
मासे मासे भवेच्छ्राद्धं तद्दिने वत्सरावधि ॥ १०२ ॥
अत ऊर्ध्वं भवेदब्दश्राद्धं तु प्रतिवत्सरम् ॥
आद्वादशाब्दमेवैतत्क्रियते प्रेतगोचरम् ॥ १०३ ॥

अर्थ— बाराव्या दिवशीं श्रीजिनाची पूजा करून मुनी आणि बांधव ह्यांना श्राद्ध घालावें. भक्तीनें सज्जनांना अन्न देणें ह्याला श्राद्ध असें ह्मणतात. हें श्राद्ध एक वर्षपर्यंत प्रत्येक महिन्यांतील मृततिथीला करावें. एक वर्षाच्या पुढें प्रतिवर्षी वर्षश्राद्ध बारा वर्षेपर्यंत मृताच्या उद्देशानें करावें.

मृताची बिंबस्थापना

सुप्रसिध्दे मृते पुंसि संन्यासध्यानयोगतः ॥
तद्बिम्ब स्थापयेत् पुण्यप्रदेशे मण्डपादिके ॥ १९४ ॥

अर्थ— एखादा सुप्रसिद्ध पुरुष जर संन्यासविधी करून किंवा ध्यानसमाधीनें मृत्यु पावला असेल तर त्याचें बिंब-शुद्ध भूमीवर मंडप वगैरे करून-करावें.

वैधव्यदीक्षा.

मृते भर्तरि तज्जाया द्वादशाह्नि जलाशये ॥
स्नात्वा वधूभ्यः पञ्चभ्यस्तत्र दद्यादुपायनम् ॥ १९५ ॥
भक्ष्यभोज्यफलैर्गन्धवस्त्रपुष्पपर्णैस्तथा ॥
ताम्बूलैरवतंसैश्च तदा कल्प्यमुपायनम् ॥ १९६ ॥
विधवायास्ततो नार्या जिनदीक्षासमाश्रयः ॥

अथानुतास्विद्वैधव्यदीक्षा वा गृह्यते तदा ॥ १९७ ॥

अर्थ— पति मृत्यु पावला असतां त्याच्या स्त्रीनें बाराव्या दिवशीं जलाशयांत स्नान करून पांच सुवासिनी स्त्रियांना वायने द्यावीत. त्या वायनांत भक्ष्यभोज्य पदार्थ, फलें, गंध, वस्त्र, पुष्पें, द्रव्य, तांबूल आणि फुलांचे तुरे हे पदार्थ असावेत. हे वायन दिल्यावर, त्या विधवा स्त्रीनें जिनदीक्षा घ्यावी हें फार उत्तम; नाहीपेक्षां वैधव्यदीक्षा घ्यावी.

तत्र वैधव्यदीक्षायां देशव्रतपरिग्रहः ॥
कण्ठसूत्रपरित्यागः कर्णभूषणवर्जनम् ॥ १९८ ॥
शेषभूषानिवृत्तिश्च वस्त्रखण्डान्तरीयकम् ॥
उत्तरीयेण वस्त्रेण मस्तकाच्छादनं तथा ॥ १९९ ॥
खट्वाशय्याञ्जनालेपहारिद्रप्लववर्जनम् ॥
शोकाक्रन्दनिवृत्तिश्च विकथानां विवर्जनम् ॥ २०० ॥
प्रातःस्नानं तथा नित्यं जोषमाचमनं तथा ॥
प्राणायामस्तर्पणार्घप्रदानं च यथोचितम् ॥ २०१
त्रिसन्ध्यं देवतास्तोत्र जपः शास्त्रश्रुतिः स्मृतिः ॥

भावना चानुप्रेक्षाणां तथात्मप्रतिभावना ॥ २०२ ॥

पात्रदानं यथाशक्ति चैकभक्तमगृद्धितः ॥
ताम्बूलवर्जनं चैव सर्वमेतद्विधीयते ॥ २०३ ॥

यद्दिने वर्तते श्राद्धं तद्दिने तर्पणं जपः ॥
पूर्वोक्तविधिना सर्वं कार्यं मन्त्रादिसंयुतम् ॥ २०४ ॥

अर्थ— जर वैधव्यदीक्षा ग्रहण केली तर त्या स्त्रीनें पुढीलप्रमाणें वागावें. तिनें देशविरतिव्रत ग्रहण करावें. मंगलसूत्र, कानांतील अलंकार, आणि बाकीचे दागिने ह्यांचा त्याग करावा. एक वस्त्राचा तुकडा नेसावा. अंगावर घ्यावयाच्या दुसऱ्या वस्त्रानें मस्तकावर आच्छादन करावें. पलंगावर शयन करणें, डोळ्यांत काजळ घालणें, अंगाला हळद लावून स्नान करणें ह्यांचा त्याग करावा. पतीबद्दल शोक करून रडूं नये. वाईट गोष्टी बोलूं नयेत. प्रत्येक दिवशीं प्रातःकाळीं स्नान करून नुसतें ( मंत्र न ह्मणतां ) आचमन करून प्राणायाम, तर्पण, अर्घ्यप्रदान ह्या क्रिया कराव्यात. त्रिकाल जिनस्तोत्र ह्मणावें, शास्त्र श्रवण आणि त्याचें चिंतन करावें. द्वादशानुप्रेक्षांची भावना करावी, व आत्मभावना करावी. आपल्या शक्तीप्रमाणें सत्पात्राला दान करावें, एकवेळ भोजन करावें, तेंही फार खाऊं नये, तांबूल भक्षण करूं नये.

श्रेयानुतस्विद्वैधव्यदीक्षा वा गृह्यते तदा ॥ १९७ ॥

अर्थ— पति मृत्यु पावला असतां त्याच्या स्त्रीनें बाराव्या दिवशीं जलाशयांत स्नान करून पांच सुवासिनी स्त्रियांना वायनें द्यावींत. त्या वायनांत भक्ष्यभोज्य पदार्थ, फळें, गंध, वस्त्र, पुष्पें, द्रव्य, तांबूल आणि फुलांचे तुरे हे पदार्थ असावेत. हें वायन दिल्यावर त्या विधवा स्त्रीनें जिनदीक्षा घ्यावी हें फार उत्तम; नाहींपेक्षां वैधव्यदीक्षा घ्यावी.

तत्र वैधव्यदीक्षायां देशव्रतपरिग्रहः ॥
कण्ठसूत्रपरित्यागः कर्णभूषणवर्जनम् ॥ १९८ ॥
शेषभूषानिवृत्तिश्च वस्त्रखण्डान्तरीयकम् ॥
उत्तरीयेण वस्त्रेण मस्तकाच्छादनं तथा ॥ ११९ ॥
खट्वाशय्याञ्जनालेपहारिद्रप्लववर्जनम् ॥
शोकाक्रन्दानिवृत्तिश्च विकथानां विवर्जनम् ॥ २०० ॥
प्रातःस्नानं तथा नित्यं जोपमाचमनं तथा ॥
प्राणायामस्तर्पणार्घप्रदानं च यथोचितम् ॥ २०१
त्रिसन्ध्यं देवतास्तोत्र जपः शास्त्रश्रुतिः स्मृतिः ॥

आशौच धरणारे भाऊबंद इतक्यांना आहे. त्यात पुत्र नसल्यास क्रमानें पुढच्यापैकीं जो असेल त्याला अधिकार समजावा. हे वर सांगितलेले जे पुरुष त्यापैकीं जर कोणीच नसेल तर पत्नीला अधिकार आहे. आणि पत्नीचें प्रेतकर्म करण्यास पतीला अधिकार आहे. वर जे अधिकारी सांगितले आहेत त्यांतील जो प्रेतकर्म करण्याला योग्य असेल त्याचें उपनयन झालें नसलें तरी कांही हरकत नाहीं. त्यानें आचार्यांनें मंत्र ह्मटल्यावर फक्त स्वाहाकार ह्मणावा. प्रेतदहन केल्यानंतरची जी क्रिया तिला शेषक्रिया ह्मणतात. ती सर्व क्रिया संपेपर्यंत ( दहा दिवसपर्यंत ) कर्ता अशुचि समजावा. दहा दिवसांनंतर तो शुद्ध होतो. कर्त्यानें दहावे दिवशीं पिंड आणि पाषाण पाण्यांत टाकून द्यावेत. मग पुढें बाराव्या दिवसापर्यंत शेषक्रिया क्रमानें करावयाची असते ती करावी.

अस्थिसंचय.

तदाऽस्थिसञ्चयश्चापि कुजवारे निषिध्यते ॥
तथैव मन्दवारे च भार्गवादित्ययोरपि ॥ १८८ ॥
अस्थीनि तानि स्थाप्यानि पर्वतादिशिलाबिले ॥
प्रकृत्यवधिस्वातोर्व्यामथवा पौरुषावटे ॥ १८९ ॥

अर्थ— मृताच्या अस्थि गोळा करणें तें मंगळवार, शनिवार, शुक्रवार आणि रविवार ह्या वारीं करूं

अर्थ— वा भव्यजीवा! धर्माच्या प्रभावानें संपत्ति प्राप्त होतात. धर्माच्या योगानें मोक्षाचीं सुखें प्राप्त होतात. धर्मामुळेंच युद्धांत मनुष्यें जगतात; ह्मणून तूं सर्वदा धर्मरूपी साधनाची प्राप्ति करून घे!!

विमलधर्मबलेन सुवस्तुकं । सकलजीवहितं सुखदायकम् ॥
परममोक्षपदं भवनाशनं । भवति राज्यपदं सुरसेवितम् ॥ २०९ ॥

अर्थ— शुद्ध अशा धर्माच्या सामर्थ्यानें संपूर्ण जीवांचें कल्याण करणारें व सुख देणारें असें आणि सद्वस्तूंनीं भरलेलें व संसाराचा नाश करणारें असें मोक्षपद प्राप्त होतें; आणि देव देखील सेवा करीत आहेत असें राज्यपदही प्राप्त होतें. तात्पर्य, धर्मानें भोग आणि मोक्ष हे दोनीही प्राप्त होतात.

धर्मः प्राणिहितं करोति सततं धर्मो जनैर्गृह्यतां ।
धर्मेण प्रभवन्ति राज्यविभवा धर्माय तस्मै नमः ॥
धर्मान्नश्यति पापसन्ततिकुलं धर्मस्य सौख्यं फलं ।
धर्मे देहि मनः प्रभौ वृषकरे भो धर्म मां रक्षय ॥ २१० ॥

अर्थ— धर्म हा जीवाचें सर्वदा हित करणारा आहे; ह्मणून सर्वलोकांनीं तो अवश्य स्वीकारावा. धर्मानें राज्यवैभव प्राप्त होतें, धर्मापासून पातकांच्या समूहाचा नाश होतो; धर्माचें सुख हेंच फल आहे, ह्मणून त्या धर्माला माझा नमस्कार असो! वा भव्य जीवा! असा समर्थ असलेला आणि पुण्य संपादन

करून देणारा जो धर्म त्याचे ठिकाणी तूं आसक्ति ठेव आणि त्याला 'हे धर्मा तू माझें रक्षण कर' अशी प्रार्थना कर!!!

संसारार्णवतारणाय सततं धर्मो जिनैर्भाषितो ।
धर्मो जीवसमूहरक्षणतया जायेत भव्यात्मनाम् ॥
धर्मोद्राज्यपदं परत्र लभते स्वर्गोऽपि धर्माद्भवे- ।
द्धर्मं भो भज जीव मोक्षपददं जैनं सदा निर्मलम् ॥ २११ ॥

अर्थ— धर्म हा संसारसमुद्रातून तरण्याकरिता श्रीजिनांनी सांगितला आहे. ह्मणून तो संपूर्णजीवसमूहाचें रक्षण करतो. भव्यजीवांना धर्मापासून ह्या लोकांत राज्यपद आणि परलोकीं स्वर्ग प्राप्त होतो. ह्मणून हे जीवा! श्रीजिनांनी सांगितलेल्या निर्दोष आणि मोक्षप्राप्ति करून देणाऱ्या धर्माचें तूं सेवन कर!!!

ग्रंथकाराची प्रार्थना.

श्रीमूलसङ्घे वरपुष्कराख्ये । गच्छे सुजातो गुणभद्रसूरिः ॥
तस्यात्र पट्टे मुनिसोमसेनो । भट्टारकोऽभूद्विदुषां वरेण्यः ॥ २१२ ॥

अर्थ— श्रीमूलसंघांतील पुष्कर नांवाच्या गच्छांत श्रीगुणभद्र नांवाचे महापंडित होऊन गेले त्यांच्या पट्टावर विद्वच्छ्रेष्ठ असा श्रीसोमसेनमुनि भट्टारक असता झाला.

धर्मार्थकामाय कृतं सुशास्त्रं । श्रीसोमसेनेन शिवार्थिनाऽपि ॥

गृहस्थधर्मेषु सदा रता ये। कुर्वन्तु तेऽभ्यासमहो सुभव्याः ॥ २१३ ॥

अर्थ— स्वतः मोक्षाची इच्छा करणारा असा असूनही त्या श्रीसोमसेनमुनीनें सर्वलोकाना धर्म, अर्थ, काम ह्या तीन पुरुषार्थांची प्राप्ति होण्याकरितां हें शास्त्र केलें आहे. जे भव्यजीव गृहस्थाश्रमांत गढलेले असतील, त्यांनीं ह्या शास्त्राचा अभ्यास करावा.

छन्दांसि जानामि न काव्यचातुरीं। शब्दार्थशास्त्राणि न नाटकादिकम् ॥
तथापि शास्त्रं रचितं मया हि य-। द्धास्यं न कुर्याद्विबुधोत्तमोऽत्र मे ॥२१४ ॥

अर्थ— मला छंद समजत नाहींत; काव्य करण्याचे चातुर्य माझ्यामध्यें नाहीं, व्याकरणशास्त्र, न्यायशास्त्र आणि साहित्यशास्त्र हीं शास्त्रें मला येत नाहींत. तथापि हें शास्त्र मी अल्प बुद्धीनें रचलें आहे, ह्याबद्दल विद्वान् लोकांनीं मला हंसूं नये.

यद्यस्ति शास्त्रे मम शब्ददूषणं। भव्योत्तमाः शोधनतां सुबुद्धिकाः ॥
कुर्वन्तु धर्माय कृता महीतले। धात्रा सुबुध्याऽत्र परोपकारिणः ॥ २१५ ॥

अर्थ— ह्या माझ्या शास्त्रांत जर शब्ददोष असले तर सुबुद्धि अशा श्रेष्ठ भव्यपुरुषांनीं धर्माकरितां शुद्ध करावा. कारण, ब्रह्मदेवानें परोपकारी जीव सद्बुद्धीनें उत्पन्न केले आहेत. तात्पर्य, परोपकारी जीव दुसऱ्यावर उपकार करण्याच्या हेतूनेंच उत्पन्न केले असल्यानें उपकार करणें हें त्यांचें कर्तव्य आहे.

अब्दे तत्त्वरसर्तुचन्द्रकलिते श्रीविक्रमादित्यजे ।
मासे कार्तिकनामनीह धवले पक्षे शरत्सम्भवे ॥
वारे भास्वति सिद्धनामनि तथा योगे सुपूर्णातिथौ ।
नक्षत्रेऽश्विनिनाम्नि धर्मरसिको ग्रन्थश्च पूर्णीकृतः ॥ २१६ ॥

अर्थ— श्रीविक्रमादित्याच्या सोळाशेहे सदुसष्ठाव्या १६६७ वर्षातील शरदृतूंतील कार्तिक महिन्याच्या शुक्लपक्षांतील रविवारीं पौर्णिमातिथि असतांना, सिद्धनामयोग व अश्विनी नक्षत्र असतांना त्या दिवशीं हा धर्मरसिकनामक ग्रंथ पूर्ण केला.

श्लोका येऽत्र पुरातना विलिखिता अस्माभिरन्वर्थत- ।
स्ते दीपा इव सत्सु काव्यरचनामुद्दीपयन्ते परम् ॥
नानाशास्त्रमतान्तरं यदि नवं प्रायोऽकरिष्यं त्वहं ।
क्वाशाऽमाऽस्य महो तदेति सुधियः केचित्प्रयोगंवदाः ॥ २१७ ॥

अर्थ— ह्या ग्रंथांत आह्मीं जे प्राचीन (अन्यग्रंथांतले) श्लोक प्रकृत अर्थाला अनुसरून लिहिले आहेत ते सज्जनांच्या पुढें केवळ दीपाप्रमाणें आमच्या काव्यरचनेला प्रकाशित करणारे आहेत ह्मणजे आमच्या काव्याचा अर्थ विशेष स्पष्ट करणारे आहेत. जर मीं अन्यशास्त्रांतील नवीन भिन्न मतें घेऊन विस्तृत शास्त्र

रचलें असतें, तर पूर्वीच्या शास्त्रापुढें माझ्या नव्या शास्त्राचें तेज पडेल अशी आशा बाळगण्यास जागा कशी मिळती? कोणी ह्मणतील कीं, प्राचीन श्लोकांचा उतारा कां घेतला? या प्रश्नास उत्तर देण्याकरितां ग्रंथकार ह्मणतात कीं प्राचीन प्रयोग उदाहरणार्थ घेऊन प्रकृत अर्थाची पुष्टि करणें हें कित्येकांना प्रिय असतें.

श्लोकानां यत्र संख्याऽस्ति । शतानि सप्तविंशतिः ॥
तद्धर्मरसिकं शास्त्रं । वक्तुः श्रोतुः सुखप्रदम् ॥ २१८ ॥

अर्थ— ज्यात दोन हजार सातशें २७०० श्लोक आहेत असें हें धर्मरसिक नावाचें शास्त्र वक्ता आणि श्रोता या उभयतांना सुख देणारें आहे.

इति श्रीधर्मरसिकशास्त्रे त्रिवर्णाचारप्ररूपणे भट्टारकश्रीसोमसेनविरचिते
सूतकशुद्धिकथनीयो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥

त्रैवर्णिकाचारग्रन्थः

समाप्तः

हा ग्रंथ व आणखीं जैनधर्माचीं पुस्तकें सोलापूर येथें चाटी गल्लींत जैनबुकडिपोमध्यें मिळतील. विशेष माहितीकरितां खालील पत्त्यावर पत्रव्यवहार करावा.

आपला,

दोशी रावजी सखाराम.

सोलापूर.

